श्रीः

याज्ञवल्क्यस्मृति

# मिताक्षराव्यवहाराध्याय.

(मूळश्लोक, टीका व प्राकृत भाषान्तरसहित).

हें पुस्तक,


## जनार्दन महादेव गुर्जर

(मनुस्मृतिप्राकृतभाषान्तराचे कर्ते.)


ह्यांनीं

लोकहिता[illegible],

विद्वज्जनांचे साहाय्यानें [illegible]


मुंबईमध्यें,

निर्णयसागर छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

कार्तिक शुद्ध १५ शके १८०१.

नवेंबर सन् १८७९ इसवी.

किंमत रुपये ६ (साहा). टपाल वगैरे ६ आणे.

# उपोद्घात.



प्राचीन काळीं या भरतखंडांत अतींद्रियद्रष्टे, सकलविद्यानिष्णात असे मन्वादि ऋषि बहुत होऊन गेले त्यांपैकींच याज्ञवल्क्य हा एक मुख्य धर्मशास्त्रप्रयोजक होय. हा याज्ञवल्क्य योगींद्र, मिथिला नगरींत वास करणारा असे. पूर्वीं कोणेएके समयीं सामश्रवादि ऋषींनीं, याज्ञवल्क्य योगींद्राला असा प्रश्न केला कीं, महाराज, आम्हाला वर्णाश्रमधर्म सांगा. तेव्हां याज्ञवल्क्य योगींद्रानें, त्या सामश्रवादि ऋषींस प्रश्नोत्तररूप जें धर्मशास्त्राचें निरूपण केलें तें सर्व याज्ञवल्क्याच्याच कोणीएका शिष्यानें संग्रहीत करून संक्षेपानें श्लोकात्मक असी स्मृति रचली असें या ग्रंथाच्याप्रथमाध्यायांत ( आचाराध्यायांत) मिताक्षरेच्या आरंभीं विज्ञानेश्वरानें लिहिलें आहे. ( या स्मृतीचे श्लोक सुमारें ८६२ आहेत.)

याज्ञवल्क्य हा फार पुरातनकालीन आचार्य होय. कारण, वैदेह जनक राजाचे सभेंत कहोड, कौषीतक, शाकल्य इत्यादि जे आचार्य होते त्यानीं ब्रह्मविद्यासंबंधीं अनेक प्रश्न, याज्ञवल्क्य योगींद्रास विचारिले, तेव्हां त्यानें त्या सर्व प्रश्नांचीं यथार्थ उत्तरें देऊन त्या सर्वांचें समाधान केलें, त्यानंतर महाब्रह्मनिष्ठ जनक राजानेंहि त्यास पुष्कळ प्रश्न केले, त्यांचींहि त्यानें यथार्थ उत्तरें देऊन राजाचें समाधान केलें. त्यावरून जनक राजा सुप्रसन्न होऊन "हे याज्ञवल्क्य," तुम्ही खरे ब्रह्मनिष्ठ आहां, तुम्हाला मी साष्टांग नमस्कार करितों, असें प्रणामपूर्वक नम्रपणानें बोलून जनक राजानें याज्ञवल्क्यांची मोठी आदरसत्कारपूर्वक पूजा केली, असा इतिहास बृहदारण्यकोपनिषदांत लिहिला आहे.

कलियुगांत प्रथम शककर्ता राजा युधिष्ठिर, दुसरा विक्रम, तिसरा-शालिवाहन; युधिष्ठिरानंतर अर्जुनाचा पौत्र जो परीक्षित राजा त्यानें कितीएक वर्षांपर्यंत राज्य केलें, त्यानंतर परीक्षितीचा पुत्र जनमेजय यानें राज्य केलें. जनमेजयाचे राज्यस्थितिकालीं कलियुगाचीं वर्षें सुमारें १२९ गत झालीं होतीं. जनमेजय राजाचे जे आश्रित सभासद होते त्यांमध्यें वैशंपायन हा मुख्य आचार्य होता. याज्ञवल्क्यानें वैशंपायनाजवळ वेदाभ्यास करण्यास आरंभ केला होता, परंतु कांहीं कारणवशात् परस्पर गुरुशिष्यांचा विरोध उत्पन्न झाला. त्यानंतर याज्ञवल्क्य मुनीनें तपश्चर्या करून सूर्योपासनेच्या योगानें यजुर्वेद प्राप्त करून घेतला, त्यामुळें याज्ञवल्क्य हा शुक्लयजुर्वेदाचा मुख्य आचार्य झाला, हा इतिहास श्रीमद्भागवतादि पुराणांत ( द्वादशस्कंधात ) प्रसिद्ध आहे.

वर सांगितलेल्या इतिहासाचें दृढीकरण याज्ञवल्क्यस्मृतीच्या प्रायश्चित्ताध्यायांत वचन आहे त्यावरून होतें, तें असें कीं,

ज्ञेयं चारण्यकमहं यदादित्यादवाप्तवान् ।
योगशास्त्रं च मत्प्रोक्तं ज्ञेयं योगमभीप्सतेति ॥

अर्थः— जें आरण्यकोपनिषद् सूर्यापासून मला प्राप्त झालें आहे व जें योगशास्त्र मी लिहिलें आहे या उभय ग्रंथांचें योगशास्त्रेच्छु पुरुषानें ज्ञानपूर्वक अध्ययन करावें.

या वचनावरून याज्ञवल्क्य हा योगशास्त्राचाहि आचार्य होता आणि तो याज्ञवल्क्य-योगशास्त्राचा ग्रंथ अद्यापि लोकांत प्रसिद्ध असल्यावरून ठिकठिकाणीं ग्रंथांत त्यास योगीश्वर अशी संज्ञा दिलेली आढळते.

ह्या प्रसिद्ध याज्ञवल्क्यस्मृतीवर विज्ञानेश्वर पंडितानें टीका लिहून त्या टीकेस मिताक्षरा असें नाम दिलें आहे. हा मिताक्षराग्रंथ दुसऱ्या टीकांसारखा केवळ मूल ग्रंथाचा गूढार्थ समजण्याकरितांच उपयुक्त आहे असें नाहीं, तर धर्मशास्त्राच्या खऱ्या विषयांचें यथार्थ ज्ञान होण्यासाठीं अनेक स्मृतिवचनांचा पुष्कळ संग्रह करून त्या वचनांची युक्त संगति लावून असी उत्तम रचना केली आहे कीं, धर्मशास्त्राच्या स्वतंत्र महानिबंधाची योग्यता ह्या ग्रंथास आली आहे.

मिताक्षरा ग्रंथाच्या शेवटीं विज्ञानेश्वरानें एक श्लोक लिहिला आहे तो असाः—नासीदस्ति भविष्यति क्षितितले कल्याणकल्पं पुरं नो दृष्टः श्रुत एव वा क्षितिपतिः श्रीविक्रमार्कोपमः ॥ विज्ञानेश्वरपण्डितो न भजते किंचान्यदन्योपमामाकल्पं स्थिरमस्तु कल्पलतिकाकल्पं तदेतत्रयम् ॥ १ ॥ अर्थः— कल्याण पुरासारखें दुसरें पुर पूर्वीं झालें नाहीं, विद्यमान नाहीं, आणि पुढेंहि होणार नाहीं. तसाच विक्रमादित्य राजासारखा दुसरा राजा पृथ्वीवर पूर्वीं झालेला दृष्ट नाहीं, व ऐकण्यांतहि नाहीं. तसेंच विज्ञानेश्वरासारखा दुसरा पंडितहि नाहीं. यास्तव कल्पलतेसारिखें अमूल्य हें वस्तुत्रय बहुतकालपर्यंत स्थिर राहो.

विज्ञानेश्वराचे स्थितिकालाविषयीं लोकप्रसिद्धि असी आहे कीं, शकवर्ती विक्रमादित्याचे स्थितिसमयी हा पंडित होता. हा पद्मनाभ भट्टाचा पुत्र, कल्याणपुरचा ( कलबुर्गेचा ) राहणारा परमहंस संन्यासी होता. हा बहुधा अकराव्या किंवा बाराव्या संवत् शतकांत होऊन गेला असें अनुमान होतें. सरकारी हिंदुधर्मशास्त्र पृ. ४, ५ पाहा.

मुंबई, वगैरे इलाख्यांत न्यायाचे कामीं ऋणादान, दायविभाग इत्यादिकांचे निर्णयाविषयीं सरकारानें मिताक्षरा, व्यवहारमयूख हे दोन ग्रंथ मुख्य मानिले आहेत. तसेंच वीरमित्रोदयाचेंहि मत ह्या दोन ग्रंथांस अनुकूळ असेल तर तेंहि घेण्यांत येतें.

वीरमित्रोदय हा ग्रंथ मित्रमिश्र यानें केला. यांतील विषय व लेखनशैली व्यवहारमयूखाप्रमाणेंच आहे. हा ग्रंथकार मिताक्षरेचा अनुयायी आहे. त्यांतीलच वाक्यें यांत हमेष आढळतात, व त्याचेंच हा विशेष स्पष्टीकरण करितो, व क्वचिद्व्याख्यानहि करितो.

प्रसंगविशेषीं मिताक्षरेच्या मतांच्याहि पलिकडे हा जातो, त्यांहून निराळींहि मतें लिहितो. वीरमित्रोदय हा ग्रंथ सोळाव्या संवत्शतकाच्या उत्तरार्धापूर्वीं लिहिला नसावा. कारण, हा रघुनंदनाचा उल्लेख करितो, रघुनंदन हा १६ व्या संवत्शतकाच्या आरंभीं झाला. वीरमित्रोदयास सुमारें ४०० वर्षांवर वर्षें झालीं असावीं असें विद्वज्जनांचें मत आहे.

सारांश हा कीं, दाक्षिणात्य, गुर्जर, गौड, मैथिल इत्यादि प्राचीन व अर्वाचीन सर्व विद्वज्जन मिताक्षरा ग्रंथाला, प्रमाण ग्रंथांमध्यें प्रथम वर्गीत गणितात, म्हणून मिताक्षरा ग्रंथ, इतर जे व्यावहारिक व्यवहारमयूख, वीरमित्रोदय, जीमूतवाहनकृत दायविभाग, दायक्रमसंग्रह, दायतत्त्व, विवादचिंतामणि, स्मृतिचंद्रिका, विवादतांडव, इत्यादि ग्रंथ त्या सर्वांपेक्षां हा विशेष मान्य आहे.

ह्या याज्ञवल्क्यस्मृतीचे अध्याय तीन आहेत. पहिला आचाराध्याय, याचे श्लोक ३६७ आहेत. दुसरा व्यवहाराध्याय, याचे श्लोक ३०६ आहेत. तिसरा प्रायश्चित्ताध्याय, याचे श्लोक सुमारें तीनशें आहेत. प्रथमाध्यायांत सर्वांचे वर्णाश्रमधर्म, विवाहादिक सर्व संस्कार सांगितले आहेत. तिसऱ्या अध्यायांत सर्व प्रकारच्या पातकांचीं लक्षणें सांगून त्यांविषयींचीं भिन्न भिन्न प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत.

या दुसऱ्या अध्यायाचीं प्रकरणें २५ आहेत व त्या प्रत्येक प्रकरणांत व्यवहाराचे विषय बहुतच आहेत, ह्मणून ते सर्व सांगणें अशक्य आहे, तथापि त्यांतून कांहीं मुख्य मुख्य विषय खालीं दखवितों.

१ साधारणव्यवहारमातृका प्रकरण—यांत राजानें व्यवहार पाहण्याचा प्रकार, सभासदांची नेमणूक, न्यायाधीश, वादिप्रतिवादी यांचा सर्व विचार आहे.

२ असाधारणव्यवहारमातृका प्रकरण—यांत वादिप्रतिवादी, न्यायाधीश, जामीन यांचा सर्व विचार आहे.

३ ऋणादान प्रकरण ( देणें घेणें )—यांत कुळाला कर्ज देणें, व्याज घेणें, पिता, पुत्र, स्त्रिया यांनीं केलेलें कर्ज व कुटुंबाकरितां झालेलें कर्ज फेडण्याचे अधिकारी कोण कसे व गहाणाचा प्रकार, इत्यादि विषय आहेत.

४ उपनिधिप्रकरण ( ठेवी वगैरे )—यांत ठेवींविषयीं सर्व निर्णय आहेत.

५ साक्षिप्रकरण—यांत साक्षी किती, कसे, वर्ज्य साक्षी, साक्षींस शपथ, परस्पर विरुद्ध साक्षी असतां निर्णयप्रकार वगैरे विषय आहेत.

६ लेख्यप्रकरण—यांत सर्व प्रकारचे रोखे, कर्जखतें, गाहाणखतें, स्वदस्तूरच्या सह्या, दुसऱ्याकडून लिहिवलेला दस्तैवज यांचा निर्णय केला आहे.

७ दिव्यप्रकरण– यांत कोणते अपराधीं कोणतें दिव्य करावें तें, व तीं दिव्यें किती प्रकारचीं, त्यांचे निरनिराळे विधि हें सर्व सांगितलें आहे.

८ दायविभाग प्रकरण–यांत, सत्ता, स्थावर जंगम जिंदगीचे वारीसदार कोण कसे व किती, अविभाज्यधन, स्त्रीधन, तद्विभाग, औरस, दत्तक वगैरे बारा प्रकारचे पुत्रांस विभाग वगैरेचा निर्णय केला आहे.

९ सीमाविवादप्रकरण–यांत गांवाच्या वगैरे शिवेच्या वादांचे निर्णय कसे करावे तें सर्व सांगितलें आहे.

१० स्वामिपालविवाद प्रकरण–यांत गुरांनीं शेतांचा वगैरे नाश केला असतां गुराखी, धनी यांनी नुकसान भरून देणें व कुंपण घालणें, दंड करणें वगैरे विषय आहेत.

११ अस्वामिविक्रय प्रकरण–यांत मालकीवांचून कोणत्याहि जिनसांची खरेदी, विक्री, अदलाबदल, देशांतरसंबंधी व्यापार यांचा निर्णय केला आहे.

१२ दत्ताप्रदानिक प्रकरण–यांत द्यावयास केलेलें द्रव्य द्यावें कोणतें, न द्यावें कोणतें, धर्मार्थ दिलेलें द्रव्य व द्यावयाचें द्रव्य त्याची व्यवस्था वगैरे विषय आहेत.

१३ क्रीतानुशय प्रकरण–यांत खरीद केलेला माल कारणवशात् परत करणें न करणें, माल मुदतींत परत होतो, न होतो, सोनें रुपें वगैरेची वाढ तूट वगैरे विषय आहेत.

१४ अभ्युपेत्याशुश्रूषा प्रकरण–यांत शिष्य, अंतेवासी, दास, ह्यांचें लक्षण; त्यांच्या वर्तणुकीचा प्रकार; दासांचे भेद वगैरे विषय आहेत.

१५ संविद्व्यतिक्रम प्रकरण–यांत धर्मसंबंधानें स्थापलेल्या मंडळ्यांचे सर्व निर्णय आहेत.

१६ वेतनादानप्रकरण, यांत धन्यानें चाकराचा पगार देणें, चाकरी घेणें वगैरे निर्णय आहेत.

१७ जुगार प्रकरण–यांत जुगाराचें लक्षण, पैजेचें लक्षण, जुगाऱ्याचे अड्डे, त्यांला दंड करणें वगैरे विषय आहेत.

१८ वाक्पारुष्यप्रकरण–यांत दुसऱ्याला शिवीगाळी करणें, बीभत्स शब्द बोलणें वगैरे-विषयीं निर्णय आहेत.

१९ दंडपारुष्यप्रकरण–यांत काठी इत्यादिकानें जें दुसऱ्याला ताडन करणें; अंगावर चिखल, माती, राख टाकणें; जखमा करणें; दुसऱ्याचे घराच्या भिंती वगैरे फोडणें; ह्या सर्व विषयांचा निर्णय सांगितला आहे.

२० साहसप्रकरण–यांत साहस कर्में, चोरी, मालांत भेळ करणें, वगैरे सर्व साहस कर्मांचे विषयांचे निर्णय आहेत.

२१ विक्रीयासंप्रदान प्रकरण—यांत बाजारांत माल खरीद करणें, विकणें, किंमत देऊन माल न देईल किंवा खराब देईल, वगैरे विषयांचा निर्णय आहे.

२२ संभूयसमुत्थान प्रकरण—यांत पांथीनें व्यापार करणें, जकात, गलबताचा नोर किती घेणें, पांथीदारांतून कोणी देशांतरीं मृत झाल्यास त्याचा निर्णय वगैरे विषय आहेत.

२३ स्तेयप्रकरण—यांत चोरीचें स्वरूप, चोर धरण्याचा प्रकार, वहम्यानें चोर ओळखण्याचा प्रकार, चोरी धरून देण्याचा प्रकार, चोरांस दंड वगैरे विषयांचे निर्णय आहेत.

२४ स्त्रीसंग्रहणप्रकरण—यांत स्त्रियांचे व्यभिचाराचे प्रकार, गरती स्त्रियांशी व्यभिचार करणारास दंड वगैरे विषयांचे निर्णय आहेत.

२५ प्रकीर्णक प्रकरण—यांत किरकोळ विषय आहेत.

याप्रमाणें या ग्रंथांतील विषयांचें दिक्प्रदर्शन केलें आहे.

**या ग्रंथाचें भाषांतर करण्याचा हेतु**— प्राचीन काळांत जसी लोकभाषा संस्कृत होती, तसी हल्ली नाही आणि सर्व प्राचीन ग्रंथ तर संस्कृत भाषेमध्येंच रचलेले आहेत, आणि लोकभाषा अनेक झाल्या आहेत, ह्मणून संस्कृत ग्रंथांचें भाषांतर झाल्याविना त्यांतील विषयांचें परिज्ञान लोकांस करून देणें अशक्य इत्यादि अडचणी मनांत आणून तें ज्ञान लोकांस अनायासेंकरून व्हावें, या हेतूनें आह्मी ह्या मिताक्षरा ग्रंथाचें भाषांतर शब्दशः केलें आहे. यांत भाषांतरवशात् कोठें स्वकपोलकल्पित असें न्यूनाधिक लेखन प्रायः झालेलें नाहीं, पारिभाषिक शब्द जे ग्रथस्थ आहेत ते तसेच ठेविले आहेत व त्या शब्दांचा कोश या अध्यायाचे शेवटीं देऊन त्यांचा अर्थ विशद केला आहे.

केवळ ही याज्ञवल्क्य स्मृति जरी सर्व व्यावहारिक विषयांचा निर्णय होण्यास अपूर्ती आहे तरी तीवर मिताक्षरा टीका सुबोध, सरळ व जींत उर्वरित विषयांचें यथास्थित विवेचन केलेलें असल्यामुळें तिची अपूर्तता जाऊन सर्व व्यावहारिक निर्णयांविषयीं राजमान्य अग्रेसर झाली आहे, ह्मणून हा मिताक्षराव्यवहाराध्याय दोन चार प्राचीन लिखित पुस्तकांवरून चांगला शुद्धकरून व निरनिराळे पदच्छेद करून छापिला आहे. ह्याचें भाषान्तर आह्मीं वे. शा. सं. रा. रा. "बापु भिकाजी शास्त्री मोघे" यांजकडून करविलें आहे. यांत कचित् स्थळीं, "भ्रान्तेः पुरुषधर्मत्वात्" या न्यायानें लेखनांत न्यूनाधिक्य झालें असल्यास सहृदय पंडित जनानीं क्षमा करून हंसक्षीरन्यायानें गुण ग्रहण करावे असी माझी प्रार्थना आहे.

**जनार्दन महादेव गुर्जर.**

# अनुक्रमणिका.

## साधारण व्यवहारमातृका.

### प्रकरण १.

#### शाखा १.



#### शाखा २.



#### शाखा ३.



#### शाखा ४.



#### शाखा ५.



#### शाखा ६.



#### शाखा ७.

---

## असाधारण व्यवहारमातृका.

### प्रकरण २.

### शाखा १.



### शाखा २.

अंक. पृष्ठ.

## ऋणादान प्रकरण ३.

### शाखा १.



### शाखा २.



### शाखा ३.



### शाखा ४.



### शाखा ५.



### शाखा ६.



### शाखा ७.

---

## उपनिधि प्रकरण ४.

### शाखा १.



---

## साक्षिप्रकरण ५.

### शाखा १.



### शाखा २.

## लेख्य प्रकरण ६.

### शाखा १.



### शाखा २.



### शाखा ३.



### शाखा ४.



## दिव्य प्रकरण ७.

### शाखा १.



### शाखा २.



### शाखा ३.



### शाखा ४.

---

## सीमाविवाद प्रकरण ९.

---

## स्वामिपालविवाद प्रकरण १०.

---

## स्त्रीसंग्रहण प्रकरण २४.

## प्रकीर्णक प्रकरण २५.

**शाखा १.**



**शाखा २.**

# याज्ञवल्क्यस्मृति.



## मिताक्षरा व्यवहाराध्याय.

अभिषेकादिगुणयुक्तस्य राज्ञः प्रजापालनं परमो धर्मः। तच्च दुष्टनिग्रहमन्तरेण न संभवति। दुष्टपरिज्ञानं च न व्यवहारदर्शनमन्तरेण संभवति। तद्व्यवहारदर्शनमहरहः कर्तव्यमित्युक्तम्॥

**व्यवहारान्स्वयं पश्येत्सभ्यैः परिवृतोऽन्वहमिति॥**

स च व्यवहारः कीदृशः कतिविधः कथंचेतीतिकर्तव्यताकलापो नाभिहितस्तदभिधानाय द्वितीयोऽध्याय आरभ्यते॥

**व्यवहारान्नृपः पश्येद्विद्वद्भिर्ब्राह्मणैः सह॥**
**धर्मशास्त्रानुसारेण क्रोधलोभविवर्जितः॥ १॥**

व्यवहारानिति। अन्यविरोधेन स्वात्मसंबन्धितया कथनं व्यवहारः। यथा कश्चिदिदं क्षेत्रादि मदीयमिति कथयति। अन्योऽपि तद्विरोधेन मदीयमिति। तस्यानेकविधत्वं दर्शयति बहुवचनेन। नृप इति न क्षत्रियमात्रस्यायं धर्मः किंतु प्रजापालनाधिकृतस्यान्यस्यापीति दर्शयति। पश्येदिति पूर्वोक्तस्यानुवादो धर्मविशेषविधानार्थः। विद्वद्भिर्वेदव्याकरणादिधर्मशास्त्राभिज्ञैर्ब्राह्मणैर्न क्षत्रियादिभिः। ब्राह्मणैः सहेति तृतीयानिर्देशात्तेषामप्राधान्यम् सहयुक्तेऽप्रधान इति स्मरणात्। अतश्चादर्शनेऽन्यथादर्शने च राज्ञो दोषो न ब्राह्मणानाम्॥

यथाह मनुः। अदण्ड्यान्दण्डयन्राजा दण्ड्यांश्चैवाप्यदण्डयन्। अयशो महदाप्नोति नरकं चाधिगच्छतीति। कथं धर्मशास्त्रानुसारेण नार्थशास्त्रानुसारेण। देशादिसमयधर्मस्यापि धर्मशास्त्राविरुद्धस्य धर्मशास्त्रविषयत्वान्न पृथगुपादानम्। यथा च वक्ष्यति॥ निजधर्माविरोधेन यस्तु सामयिको भवेत्। सोऽपि यत्नेन संरक्ष्यो धर्मो राजकृतश्च य इति॥ क्रोधलोभविवर्जित इति। धर्मशास्त्रानुसारेणेति सिद्धे क्रोधलोभविवर्जित इति वचनमादरार्थम्। क्रोधोऽमर्षः लोभो लिप्सातिशयः॥ १॥

---

१ दर्शनेन विनेति दर्शनं विनेति च पाठान्तरम्।

२ चैव गच्छति। चैव पश्यतीति पाठान्तरम्।

साधारण व्यवहारमातृका[१].

# प्रकरण १ लें.



## शाखा १ ली.

उपोद्घात.

१ राज्याभिषेकादिगुणयुक्त जो राजा[२] त्यानें प्रजांचें पालन करावें; हाच त्याचा मुख्य धर्म होय. तें ( यथान्याय प्रजापालन ) अपराधी लोकांस शिक्षा केल्यावांचून होत नाहीं; आणि अपराधी कोणता व कोणतें कर्म केल्यानें अपराधी होतो हें ज्ञान **व्यवहार** पाहिल्यावांचून होत नाहीं; या हेतूस्तव राजानें प्रतिदिवशीं व्यवहार पाहावे.

**राजानें** स्वतां सभासदांसहवर्तमान प्रत्यहीं व्यवहार पाहत असावें, असें प्रथमाध्यायाचे अंतीं सांगितलें आहे, परंतु त्या **व्यवहाराचें** स्वरूप काय व तो किती प्रकारचा, आणि तो कोणत्या रीतीनें पाहावा, इत्यादि कर्तव्यतासामग्री सांगितली नाहीं ती सविस्तर सांगण्यासाठीं दुसऱ्या अध्यायाचा आरंभ ( याज्ञवल्क्य योगीश्वर ) करितो.

**मूलार्थ**—राजानें क्रोधलोभरहित होऊन विद्वान् ब्राह्मणांसहवर्तमान व **धर्मशास्त्रास** अनुसरून **व्यवहार** पाहावे.

व्यवहाराचें लक्षण.

**टीकार्थ**–२ **व्यवहार** ह्मणजे "कांहीं एका वस्तूविषयीं" दुसरा विरुद्ध बोलत असतां ही माझी आहे असें ह्मणणें. जसें; कोणी एक पुरुष ही जमीन वगैरे मिळकत माझी आहे असें ह्मणतो, दुसरा तद्विरोधी होऊन ह्मणतो कीं, ही माझी आहे. **मूळवचनांत** "व्यवहार पाहावे," असा बहुवचनांत निर्देश केला आहे, यावरून ते व्यवहार अनेक प्रकारचे आहेत.

राजानें धर्मशास्त्रास अनुसरून व्यवहार पहावे.

३ "**मूळवचनांत**" नृपपदाचा निर्देश केला आहे, त्यापेक्षां केवळ क्षत्रियाचाच हा धर्म आहे असें नाहीं; तर जो प्रजांचें पालन करण्याविषयीं अधिकृत असेल त्याचाहि हा धर्म आहे असें दाखवितो. (प्रथमाध्यायाचे राजधर्मनिरूपप्रकणरणीं ९१ अंकाच्या वचनांत ) "**व्यवहार** पाहावे" असें जें सांगितलें तेंच पुनः एथें कथन केलें, यावरून हा विशेष धर्म आहे हें समजण्यासाठीं ही द्विरुक्ति आहे.

विद्वान् म्हणजे वेद, व्याकरण, धर्मशास्त्र जाणणारे अशा ब्राह्मणांसहवर्तमान; क्रोध, लोभ ह्यांचा त्याग करून; व **धर्मशास्त्रास** अनुसरून **व्यवहार** पाहावे. **अर्थशास्त्रास** अनुसरून पाहूं नयेत, आणि क्षत्रियादिकांसहवर्तमान पाहूं नयेत.

१ व्यवहारमातृका म्हणजे व्यवहाराची मांडणी. २ राजा ह्या शब्दांतच इतका अर्थ आहे कीं प्रजांस सुखी ठेवून त्या आपल्यावर प्रीति करीत असें करणें.

४ मूळांत "ब्राह्मणैः सह" (ब्राह्मणांसहवर्तमान) असा सहार्थी[1] तृतीयानिर्देश केल्यावरून ब्राह्मणांकडे मुख्यत्व नाहीं; म्हणून जर राजा व्यवहार अगदींच न पाहील, अथवा विपरीत व्यवहार पाहील तर त्यासंबंधी (खालीं मनुवचनांत सांगितलेला) दोष राजास लागतो, ब्राह्मणांस नाहीं. (कारण, त्यांजकडेस मुख्यत्व नाहीं.)

राजा व्यवहार न पाहील तर त्याबद्दल त्याला दोष.

मनु— जे दंडास पात्र नाहींत त्यांस दंड करणारा, आणि जे दंडास पात्र आहेत त्यांस दंड न करणारा असा राजा (इहलोकीं) मोठी अपकीर्ति पावून अंतीं नरकाप्रत जातो.

जो देशादिकांतला सामयिक धर्म धर्मशास्त्रास अविरुद्ध असेल तो धर्मशास्त्रांतलाच विषय होतो ह्मणून तो पृथक् सांगितला नाहीं. असेंच पुढेंही (१४ व्या प्रकरणीं १ ल्या शाखेच्या ३ ऱ्या अंकाचे मूळवचनांत) सांगितलें आहे कीं, "आपल्या धर्माच्या अविरोधानें जो सामयिक धर्म होईल तो आणि राजकृत धर्म (ह्मणजे राजानें केलेला कायदा) तोहि अवश्य यत्नानें पाळावा." धर्मशास्त्रास अनुसरून व्यवहार पाहावे असें सांगितल्यानेंच क्रोध, लोभरहितत्व अर्थात् सिद्ध झालें असतां "क्रोधलोभविवर्जितः" असें जें वचन तें आदरार्थ सांगितलें. १

देशादि समायिक धर्मीविषयीं.

---

**किंच। श्रुताध्ययनसंपन्ना धर्मज्ञाः सत्यवादिनः ॥**
**राज्ञा सभासदः कार्या रिपौ मित्रे च ये समाः ॥ २ ॥**

श्रुतेन मीमांसाव्याकरणादिश्रवणेन अध्ययनेन वेदाध्ययनेन च संपन्नाः। धर्मज्ञाः धर्मशास्त्रज्ञाः। सत्यवादिनः सत्यवचनशीलाः। रिपौ मित्रे च ये समाः द्वेषरागादिरहिताः एवंभूताः सभासदः सभायां संसदि यथा सीदंति उपविशंति तथा दानमानसत्कारैः राज्ञा कर्तव्याः। यद्यपि श्रुताध्ययनसंपन्ना इत्यविशेषेणोक्तं तथापि ब्राह्मणा एव ॥

यथाह कात्यायनः। स तु सभ्यैः स्थिरैर्युक्तः प्राज्ञैर्मौलैर्द्विजोत्तमैः। धर्मशास्त्रार्थकुशलैरर्थशास्त्रविशारदैरिति ॥ ते च त्रयः कर्तव्याः बहुवचनस्यार्थवत्त्वात् ॥

यस्मिन्देशे निषीदन्ति विप्रा वेदविदस्त्रय इति मनुस्मरणाच्च ॥

---

१. सहार्थी तृतीया ह्मणजे 'सहवर्तमान' असा ज्या तृतीयेचा अर्थ होतो ती. अशा तृतीयाविभक्तीनें निर्दिष्ट जो त्याला मुख्यत्व नाहीं; ह्मणून प्रकृतीं ब्राह्मणांसहवर्तमान म्हणजे ब्राह्मणांस घेऊन राजानें व्यवहार पहावे; ह्यांत राजाकडे मुख्यत्व आणि ब्राह्मणांकडे गौणत्व. सहयुक्तेऽप्रधाने इति पाणिनिः ॥

२. सुबोधिनी—अभिप्राय हा कीं, राजा मुख्य सबब त्याकडे विशेष दोष, ब्राह्मणांस तादृश दोष नाहीं, पण ब्राह्मणांकडे अगदींच दोष नाहीं असें नाहीं. कारण, न्यायसभेंत जाऊं नये, गेलें असतां समंजस बोलावें, कारण, अगदीं न बोलणारा किंवा विपरीत बोलणारा मनुष्य पातकी होतो, असें जें मनू वचन त्यास विरोध येईल.

बृहस्पतिस्तु ॥ सप्त पंच त्रयो वा सभासदो भवंतीत्याह ॥ लोकवेदज्ञधर्मज्ञाः सप्त पंच त्रयोऽपि वा । यत्रोपविष्टा विप्राः स्युः सा यज्ञसदृशी सभेति ॥ न च ब्राह्मणैः सहेति पूर्वश्लोकोक्तानां ब्राह्मणानां श्रुताध्ययनसंपन्ना इत्यादिविशेषणमिति मन्तव्यम् । तृतीयाप्रथमान्तनिर्दिष्टानां विशेषणविशेष्यभावासंभवात् । विद्वद्भिरित्यनेन पुनरुक्तिप्रसंगाच्च ॥

तथाच कात्यायनेन ब्राह्मणानां सभासदां च स्पष्टं भेदो दर्शितः । सप्राड्विवाकः सामात्यः सब्राह्मणपुरोहितः । ससभ्यः प्रेक्षको राजा स्वर्गे तिष्ठति धर्मत इति ॥ तत्र ब्राह्मणा अनियुक्ताः सभासदस्तु नियुक्ता इति भेदः। अत एवोक्तम् । नियुक्तो वाऽनियुक्तो वा धर्मज्ञो वक्तुमर्हतीति । तत्र नियुक्तानां यथावस्थितार्थकथनेऽपि यदि राजाऽन्यथा करोति तदाऽसौ निवारणीयोऽन्यथा दोषः ॥ उक्तंच कात्यायनेन ॥ अन्यायेनापि तं यान्तं येऽनुयान्ति सभासदः । तेऽपि तद्भागिनस्तस्माद्बोधनीयः स तैर्नृप इति ॥ अनियुक्तानां पुनरन्यथाभिधानेऽनभिधाने वा दोषो न तु राज्ञोऽनिवारणे ॥

सभा वा न प्रवेष्टव्या वक्तव्यं वा समञ्जसम् । अब्रुवन्विब्रुवन्वापि नरो भवति किल्बिषीति मनुस्मरणात् ॥ रिपौ मित्रे चेति चकाराल्लोकरञ्जनार्थं कतिपयैर्वणिग्भिरप्यधिष्ठितं सदः कर्तव्यम् ॥ यथाह कात्यायनः ॥ कुलशीलवयोवृत्तवित्तवद्भिरमत्सरैः । वणिग्भिः स्यात्कतिपयैः कुलभूतैरधिष्ठितमिति ॥ २ ॥

## शाखा २ री.

**मूलार्थ**– राजानें वेदशास्त्रसंपन्न, धर्मज्ञ, सत्यवादी, शत्रुमित्रांविषयीं समदर्शी, असे सभासद नेमावे.

सभासदांची नेमणूक व ते कसे असावे.

**टीकार्थ**– १ आणखी वेद, मीमांसा, व्याकरण इत्यादि शास्त्रांचें उत्तम प्रकारें अध्ययन केलेले; धर्मशास्त्र जाणणारे; सत्यवादी (स्वाभाविक सत्य भाषण करणारे); शत्रुमित्रांवर समदृष्टि ठेवणारे (ह्मणजे न्यायाचे कामांत द्वेष अथवा स्नेहभाव न राखणारे ) असे सभासद नेमावे, आणि ते सभेंत जेणेंकरून व्यवहार पहावयास बसतील अशा प्रकारें त्यांचा दान, मान, सत्कार राजानें ठेवावा. मूळवचनांत " वेदशास्त्रसंपन्न " असें साधारण रीतीनें जरी सांगितलें आहे तरी ते ( सभासद ) ब्राह्मणच नेमावे; कारण,

**कात्यायन**– " स्थिर; बुद्धिमंत; परंपरायात; धर्मशास्त्र आणि अर्थशास्त्र[१] यांत कुशल; असे ब्राह्मण सभासद घेऊन ( राजानें न्याय करावा. ) "

सभासद तीन नेमावे.

२ मूळवचनांत बहुवचननिर्देश आहे, यास्तव ते सभासद तीन नेमावे, कारण, बहुवचन त्रित्वसंख्येनें सार्थ होतें व मनुस्मृतिहि अशीच आहे.

---

१ अर्थशास्त्र म्हणजे राजनीतिलक्षण अर्थशास्त्र औशनसादि.

**मनु**– " वेदशास्त्र जाणणारे असे तीन ब्राह्मण ज्या सभेंत बसतात, ( ती न्यायसभा यज्ञासारिखी समजावी )." बृहस्पति तर सात, पांच अथवा तीन सभासद नेमावे असें सांगतो.

**बृहस्पति**– " वेद जाणणारे व लौकिकव्यवहार जाणणारे, आणि धर्मशास्त्रज्ञ असे सात, पांच अथवा तीन ब्राह्मण ज्या सभेंत बसतात ती सभा साक्षात् यज्ञसभाच होय."

चालत्या मूळवचनांत " श्रुताध्ययनसंपन्ना " ( वेदशास्त्रसंपन्न ) असें जें पद आहे तें पहिल्या मूळवचनांत सांगितलेल्या ब्राह्मणांचें विशेषण आहे असें समजूं नये, कारण, त्या दोनही शब्दांच्या विभक्ति निरनिराळ्या आहेत, ( ह्मणजे पूर्ववचनांतील " विद्वद्भिः ब्राह्मणैः " असी तृतीयाविभक्ति आणि चालू वचनांतील " श्रुताध्ययनसंपन्ना " इत्यादि प्रथमाविभक्ति आहे ) यास्तव तृतीयाप्रथमाविभक्तींचा विशेषणविशेष्यभाव होण्याचा संभव नाहीं, आणि पहिल्या मूळवचनांतहि " विद्वद्भिः " असें विशेषण आहे त्याची पुनरुक्ति होण्याचा प्रसंग घडेल.

**कात्यायनानेंहि** ब्राह्मणांचा आणि सभासदांचा स्पष्ट भेद दाखविला आहे, तो असा– **प्राड्विवाक**[1], **अमात्य**, **ब्राह्मण**, **पुरोहित**, आणि **सभासद** ह्यांसहित धर्मतः व्यवहाराचें काम पाहणारा राजा ( पृथ्वीवर असतांहि ) स्वर्गाप्रत राहतो.

ब्राह्मण व सभासद यांचा भेद.

३ त्यांमध्यें ब्राह्मण **अनियुक्त**[2], व सभासद **नियुक्त** इतकाच भेद समजावा. यास्तव ( स्मृतिवचनांत ) सांगितलें आहे कीं, " **नियुक्त** असो किंवा **अनियुक्त** असो; जो पुरुष धर्मशास्त्र जाणता तो ( सभेंत ) बोलण्यास योग्य आहे."

सभासदांनीं राजास अन्यायापासून परावृत्त करावें.

४ **परंतु नियुक्तांनीं** ( सभासदांनीं ) वास्तवार्थ ( खरा विचार ) सांगितल्यानंतरहि जर राजा न ऐकतां विपरीत न्याय करील तर त्याचें निवारण सभासदांनीं करावें, न केल्यास ( सभासदांस ) दोष आहे.

**कात्यायनानेंहि** सांगितलें आहे कीं, " **अन्यायवर्त्ती** राजास जे सभासद अनुसरतात तेहि त्याजबरोबर दोषाचे विभागी होतात, यास्तव त्यांनीं राजाला बोध करीत असावें."

ब्राह्मण कशानें दोषी होतात.

५ **अनियुक्त** ( ब्राह्मण ) विपरीत सांगतील अथवा अगदींच न सांगतील तर मात्र ते दोषी होतात, परंतु ते राजाचें निवारण न केल्यामुळें दोषाधिकारी होत नाहींत; कारण,

**मनु**– " न्यायसभेंत जाऊं नये. अथवा ( गेलें असतां ) न्याययुक्त समंजस भाषण

---

१ प्राड्विवाकाचें लक्षण तिसऱ्या शाखेच्या पहिल्या अंकांतील कात्यायनवचनांत पाहावें. आणि अर्थ तिसऱ्या अंकांत पाहावा. २ अनियुक्त म्हणजे न्यायसभेंत येऊन व्यवहार पहावा एतदर्थ ज्यांस निराळें वेतन नाहीं, कुटुंबपोषणार्थ वर्षाशन, अग्रहार इत्यादिक असल्यास तितकेंच मात्र मिळतें ते, आणि नियुक्त म्हणजे न्यायसभेंत येऊन व्यवहार पाहण्यासाठीं वेतन देऊन नेमलेले ते.—सुबोधिनी.

करावें. कारण, ( माहीत असूनें ) अगदींच न बोलणारा, किंवा न्यायविरुद्ध बोलणारा मनुष्य पातकी होतो, " असें मनुवचन आहे.

६ मूळवचनांत " रिपौ मित्रे च " असा चकार शब्द आहे, याजवरून लोकरंजनार्थ किंतीएक सावकारहि त्या सभेंत असावे.

सावकारांची नेमणूक.

कात्यायन सांगतो. "कुलीन, सुशील, प्रौढ, सदाचारसंपन्न, धनाढ्य, निर्मत्सर, आणि परंपरायात असे कित्येक सावकारहि न्यायसभेंत असावे. २

---

## अपश्यता कार्यवशाद्व्यवहारान्नृपेण तु ॥
## सभ्यैः सह नियोक्तव्यो ब्राह्मणः सर्वधर्मवित् ॥ ३ ॥

व्यवहारान्नृपः पश्येदित्युक्तं तत्रानुकल्पमाह । कार्यान्तरव्याकुलतया व्यवहारानपश्यता नृपेण पूर्वोक्तैः सभ्यैः सह सर्वधर्मवित् सर्वान्धर्मान् शास्त्रोक्तान् सामयिकांश्च धर्मान्वेत्ति विचारयतीति स सर्वधर्मविद ब्राह्मणो न क्षत्रियादिर्नियोक्तव्यो व्यवहारदर्शने । तं च कात्यायनेनोक्तगुणविशिष्टं कुर्यात् ॥ यथाह । दान्तं कुलीनं मध्यस्थमनुद्वेगकरं स्थिरम् । परत्र भीरुं धर्मिष्ठमुद्युक्तं क्रोधवर्जितमिति ॥ एवंभूतब्राह्मणासंभवे क्षत्रियं वैश्यं वा नियुञ्जीत न शूद्रम् ॥

यथाह कात्यायनः ॥ ब्राह्मणो यत्र न स्यात्तु क्षत्रियं तत्र योजयेत् । वैश्यं वा धर्मशास्त्रज्ञं शूद्रं यत्नेन वर्जयेदिति ॥

नारदेन त्वयमेव मुख्यो दर्शितः ॥ धर्मशास्त्रं पुरस्कृत्य प्राड्विवाकमते स्थितः । समाहितमतिः पश्येद्व्यवहाराननुक्रमादिति ॥ प्राड्विवाकमते स्थितो न स्वमते स्थितः । राजा चारचक्षुषा परसैन्यं पश्यतीतिवत्तस्य चेयं यौगिकी संज्ञा । अर्थिप्रत्यर्थिनौ पृच्छतीति प्राट् तयोर्वचनं विरुद्धमविरुद्धं च सभ्यैः सह विविनक्ति विवेचयति वेति विवाकः प्राट् चासौ विवाकश्चेति प्राड्विवाकः ॥

उक्तं च ॥ विवादानुगतं पृष्ट्वा ससभ्यस्तत्प्रयत्नतः । विचारयति येनासौ प्राड्विवाकस्ततः स्मृत इति ॥ ३ ॥

शाखा ३ री.

• याप्रमाणें राजानें स्वतां व्यवहार पाहावे असा मुख्य पक्ष ( पहिल्या शाखेच्या ३ ऱ्या अंकांत ) सांगितला, परंतु राजाला न फावेल तर गौणपक्ष सांगतो.

**मूळार्थ**— कार्यांतराच्या पारतंत्र्यामुळें व्यवहार पाहण्यास राजास न फावेल तर त्यानें सर्वधर्मज्ञ असा एक ब्राह्मण सभासदांसहवर्तमान नेमावा.

**टीकार्थ**— १ कार्यांतर उपस्थित झाल्यामुळें राजाला व्यवहार पहावयास अवकाश न होईल तर त्यानें पूर्वी (२ ऱ्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितलेल्या सभासदांसहवर्तमान व्यवहार पाहण्याकरितां धर्मशास्त्रप्रतिपादित धर्म, व सामयिक धर्म ह्यांतें जाणणारा

राजाला व्यवहार पाहण्याविषयीं न फावेल तर त्यानें आपल्या कामावर ब्राह्मण नेमावा.

असा एक ब्राह्मण ( प्राड्विवाक ) नेमावा, क्षत्रियादिक नेमूं नयेत. आणि तो खालीं कात्यायनानें सांगितलेल्या गुणांचा असावा.

प्राड्विवाकाचें लक्षण.

**कात्यायन**— इंद्रियनिग्रह करणारा, कुलीन, शत्रुमित्रभावरहित, भयकारक नव्हे असा, अचंचल, पापभीरु, धर्मिष्ठ, काम करण्याविषयीं उत्सुक, आणि अक्रोध. ( असा ब्राह्मण न्यायाधीश नेमावा. )

ब्राह्मण प्राड्विवाक न मिळेल तर कोण नेमावा.

२ कदाचित् अशा प्रकारचा गुणवान् ब्राह्मण न मिळेल तर क्षत्रिय नेमावा. तोहि न मिळेल तर वैश्य नेमावा; परंतु शूद्र कदापि नेमूं नये.

**कात्यायनहि** तसेंच सांगतो. ब्राह्मण जेथें न मिळेल तेथें धर्मशास्त्र जाणणारा असा क्षत्रिय किंवा त्याच्या अभावीं तसाच ( धर्मशास्त्रज्ञ ) वैश्य नेमावा, परंतु शूद्र तर प्रयत्नेंकरून वर्ज्य करावा.

**नारदानें** तर ( राजा असला तरी व्यवहार पाहण्याविषयीं ) हा ( प्राड्विवाक)च मुख्य[2] सांगितला आहे. "राजानें धर्मशास्त्रास प्रमाण मानून व प्राड्विवाकाच्या मतास अनुसरून एकाग्रचित्तानें यथानुक्रम व्यवहार पाहावे." "प्राड्विवाकाच्या मतास अनुसरून" असें सांगितल्यावरून स्वमताचा आग्रह धरूं नये. जसें वकील, जासूद इत्यादिकांच्या द्वारें परसैन्यांतील वर्तमान राजा समजतो, तद्वत् प्राड्विवाकाच्या द्वारें व्यवहार पाहावा.

प्राड्विवाक शब्दाचा अर्थ.

३ प्राड्विवाक शब्दाचा योगार्थ असा आहे कीं, वादी आणि प्रतिवादी यांला प्रश्न करणें तो प्राट् ह्मटला आहे, आणि त्या वादिप्रतिवादींचें जें विरुद्ध किंवा न्यायसंमत भाषण असेल त्याचा सभासदांसहवर्तमान विचार करणें तो विवाक, प्राट् असा जो विवाक तो प्राड्विवाक, याप्रमाणें दोन शब्द एकत्र होऊन प्राड्विवाक शब्द झाला आहे.

**स्मृत्यंतरींहि** असें सांगितलें आहे कीं, "विवादसंबंधी ( वादीस अथवा प्रतिवादीस ) उपयुक्त प्रश्न विचारून घेऊन त्याचा सभासदांसहवर्तमान प्रयत्नेंकरून हा न्यायाधीश विचार करितो यास्तव तो प्राड्विवाक ह्मटला आहे." ३

**अपि च । रागाल्लोभाद्भयाद्वापि स्मृत्यपेतादिकारिणः ॥**
**सभ्याः पृथक् पृथक् दण्ड्या विवादाद्विगुणं दमम् ॥ ४ ॥**

**प्राड्विवाकादयः सभ्या यदि रागादिना स्मृत्यपेतं व्यवहारं विचारयन्ति तदा**

१ हा व्यवहार पहाण्याविषयीं राजप्रतिनिधि ह्मटला आहे, आणि हा सभासदांहून निराळा आहे.—सुबोधिनी. २ मुख्य सांगण्याचें कारण, राजा बहुकार्यव्याकुळ असल्यामुळें त्यास अवकाश नसतो, त्याचें चित्तहि स्वस्थ नसतें; आणि धर्मशास्त्रास मुख्यत्व सांगितल्यामुळेंहि राजनियुक्त पुरुष धर्मशास्त्रज्ञच व्यवहार पाहण्याविषयीं अधिकारी, असा नारदाचा अभिप्राय आहे.—सुबोधिनी.

राज्ञा किं कर्तव्यमित्यत आह ॥ पूर्वोक्ताः सभ्या रजसो निरंकुशत्वेन तदभिभूता रागात्स्नेहातिशयाल्लोभाल्लिप्सातिशयाद्भयात्संत्रासात्स्मृत्यपेतं स्मृतिविरुद्धं आदि-शब्दादाचारापेतं कुर्वन्तः पृथक्पृथक् एकैकशो विवादात् विवादपराजयनिमित्ता-द्दमाद्द्विगुणं दमं दण्डयाः न पुनर्विवादास्पदीभूताद्द्रव्यात् । तथा सति स्त्रीसंग्रहणा-दिषु दण्डाभावप्रसंगः । रागलोभभयानामुपादानं रागादिष्वेव द्विगुणो दमो ना-ज्ञानमोहादिष्विति नियमार्थम् ॥

न च राजा सर्वस्येष्टे ब्राह्मणवर्जमिति गौतमवचनात्॥ न ब्राह्मणा दण्डया इति मन्तव्यम् । तस्य प्रशंसार्थत्वात् ॥

यत्तु षड्भिः परिहार्यो राज्ञा वध्यश्चाबंध्यश्चादण्डयश्चाबहिःकार्यश्चापरिवाद्यश्चाप-रिहार्यश्चेति तदपि स एष बहुश्रुतो भवति । लोकवेदवेदाङ्गविद्वाकोवाक्येतिहास-पुराणकुशलस्तदपेक्षस्तद्वृत्तिश्चाष्टाचत्वारिंशत्संस्कारैः संस्कृतस्त्रिषु कर्मस्वभिरतः षट्-सु वा सामयाचारिकेष्वभिविनीत इति प्रतिपादितबहुश्रुतविषयं न ब्राह्मणमात्र-विषयम् ॥ ४ ॥

मूलार्थ–जे सभासद स्नेहानें, लोभानें किंवा भयानें शास्त्रादिविरुद्ध व्यवहार करितात त्या प्रत्येकास विवादाच्या दुप्पट दंड करावा.

टीकार्थ–४ पूर्वीं ( २ ऱ्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितलेले सभासद[१] केवळ रजोगुणानें व्याप्त होऊन जर स्नेहानें ( विशेष प्रीतीनें ), लोभानें ( विशेष लालचीनें ), अथवा भयानें धर्मशास्त्रविरुद्ध, किंवा आचारविरुद्ध न्याय करितात, तर राजानें विवादाच्या, ह्मणजे ज्या ज्या व्यवहारीं जो जो पराजयनिमित्त दंड सांगितला आहे त्या त्या दंडाच्या, दुप्पट दंड प्रत्येक सभासदास[२] करावा. परंतु ज्याविषयीं फिर्याद असेल तिचे दुप्पट दंड करावा असें ह्मणूं नये. कारण, तसें ह्मटल्यास परस्त्रीगमन इत्यादि व्यवहारीं मुळींच दंड संभवणार नाहीं.

सभासदांस दंड.

"प्रीतीनें, लोभानें, भयानें," असा विशेष निर्देश करण्याचें कारण हें कीं, प्रीति, लोभ इत्यादि कारणांमुळें जर विपरीत न्याय झाला तर दुप्पट दंड, अज्ञान अथवा विस्मरण यांहींकडून घडल्यास दंड नाहीं.

**गौतम**–५ राजा सर्वांचा शास्ता, पण ब्राह्मणावांचून; असें जें गौतमवचन आहे तेणें-करून ब्राह्मणाला दंड करूं नये असें समजूं नये. कारण, तें ( गौतमवचन ) ब्राह्मणप्रशं-साबोधक आहे, ह्मणजे ब्राह्मण सर्वांपेक्षां पूज्य आहेत, इतकेंच तें वचन सुचवितें.

**स्मृति**–राजानें ब्राह्मणाचा वध करूं नये, ब्राह्मणाला बांधूं नये, त्याला दंड करूं नये, त्याला जातिबहिष्कृत करूं नये, त्याला कुत्सित शब्दांनीं बोलूं नये, आणि त्यास हद्द-

१ सभासद शब्देंकरून प्राड्विवाक इत्यादि दुसरे नियुक्त सभासद घ्यावे. २ सभासदांस दुप्पट दंड करावा, असें सांगितल्यावरून अनियुक्त ब्राह्मणांस कमी दंड योजावा; कारण, सभासदांकडे दोन अपराध, शास्त्रोल्लंघन व राजाज्ञेचा भंग, अनियुक्तांकडे शास्त्रोल्लंघनाचा मात्र अपराध.

पार करूं नये, " असे जे सहा प्रकार सांगितले आहेत ते, जो ब्राह्मण " लौकिक व्यवहार, वेद, वेदांगें, ह्यांतें जाणणारा; वाकोवाक्य[1], इतिहास, पुराण ह्यांत प्रवीण असून त्यांची अपेक्षा बाळगणारा; व तद्द्वारा उपजीविका करणारा व अठेचाळीस संस्कार[2] ज्याचे झाले आहेत असा व तीनें कर्मांचे[3] ठायीं किंवा षट्कर्मांचे[4] ठायीं आसक्त; तसाच सामयिक व आचारप्राप्त धर्म जाणणारा असा बहुश्रुत," त्याविषयीं मात्र आहेत, साधारण ब्राह्मणाविषयीं सांगितले नाहींत. ४

---

## स्मृत्याचारव्यपेतेन मार्गेणाधर्षितः परैः ॥
## आवेदयति चेद्राज्ञे व्यवहारपदं हि तत् ॥ ५ ॥

व्यवहारविषयमाह । धर्मशास्त्रसमयाचारविरुद्धेन मार्गेण परैराधर्षितोऽभिभूतो यद्राज्ञे प्राड्विवाकाय वा आवेदयति विज्ञापयति चेद्यदि तदावेद्यमानं व्यवहारपदं प्रतिज्ञोत्तरसंशयहेतुपरामर्शप्रमाणनिर्णयप्रयोजनात्मको व्यवहारस्तस्य पदं विषयस्तस्य चेदं सामान्यलक्षणं ॥ स च द्विविधः । शङ्काभियोगस्तत्त्वाभियोगश्चेति ॥

यथाह नारदः । अभियोगस्तु विज्ञेयः शंकातत्त्वाभियोगतः । शङ्काऽसतां तु संसर्गात्तत्त्वं होढाभिदर्शनादिति ॥ होढा लोप्त्रं लिङ्गमिति यावत् । तेन दर्शनं साक्षाद्वा दर्शनं होढाभिदर्शनं तस्मात् । तत्त्वाभियोगोऽपि द्विविधः । प्रतिषेधात्मको विध्यात्मकश्चेति । यथा मत्तो हिरण्यादिकं गृहीत्वा न प्रयच्छति । क्षेत्रादिकं ममायमपहरतीति वा ॥

उक्तश्च कात्यायनेन । न्याय्यं स्वं नेच्छते कर्तुमन्याय्यं वा करोति य इति । स पुनश्चाष्टादशधा भिद्यते ॥

यथाह मनुः । तेषामाद्यमृणादानं निक्षेपोऽस्वामिविक्रयः । संभूय च समुत्थानं दत्तस्यानपकर्म च । वेतनस्यैव चादानं संविदश्च व्यतिक्रमः । क्रयविक्रयानुशयो विवादः स्वामिपालयोः । सीमाविवादधर्मश्च पारुष्ये दण्डवाचिके । स्तेयं च साहसं चैव स्त्रीसंग्रहणमेव च । स्त्रीपुंधर्मो विभागश्च द्यूतमाह्वय एव च । पदान्यष्टादशैतानि व्यवहारस्थिताविहेति । एतान्यपि साध्यभेदेन पुनर्बहुलं गतानि ॥

यथाह नारदः । एषामेव प्रभेदोऽन्यः शतमष्टोत्तरं भवेत् । क्रियाभेदान्मनुष्याणां शतशाखो निगद्यत इति ॥ आवेदयति चेद्राज्ञे इत्यनेन स्वयमेवागत्यावेदयति न राजप्रेरितस्तत्पुरुषप्रेरितो वेति दर्शयति ॥

यथाह मनुः । नोत्पादयेत्स्वयं कार्यं राजा नाप्यस्य पूरुषः । न च प्रापितमन्येन

---

१ वाकोवाक्य म्हणजे प्रश्नोत्तररूप वेदवाक्यें. हीं या ग्रंथाचे आचाराध्यायांत ब्रह्मचारिप्रकरणीं टीकेंत सांगितलीं आहेत. २ गौतमोक्त गर्भाधानादि संस्कार. ३ तीन कर्में म्हणजे दान, अध्ययन, यजन. ४ षट् कर्में म्हणजे यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, आणि दान, प्रतिग्रह.

ग्रसेतार्थं कथञ्चनेति । परैरिति परेण पराभ्यां परैरित्येकस्यैकेन द्वाभ्यां बहुभि व्यवहारो भवतीति दर्शयति ॥

यत्पुनरेकस्य बहुभिः सार्द्धं स्त्रीणां प्रेष्यजनस्य च । अनादेयो भवेद्वादो धर्मवि द्भिरुदाहृत इति नारदवचनं तद्भिन्नसाध्यविषयम् । आवेदयति राज्ञे इत्यनेन राज्ञा पृष्टो विनीतवेष आवेदयेत् । आवेदितं च युक्तं चेन्मुद्रादिना प्रत्यर्थ्याह्वा मकल्पादीनां चानाह्वानमित्याद्यर्थसिद्धमिति नोक्तम् । स्मृत्यंतरे तु स्पष्टार्थमुक्तम्

यथा । काले कार्यार्थिनं पृच्छेत्प्रणतं पुरतः स्थितम् । किं कार्यं का च ते पीडा माभैषीर्ब्रूहि मानव । केन कस्मिन्कदा कस्मात्पृच्छेदेवं सभागतम् । एवं पृष्टः स यद्ब्रूयात्तत्सभ्यैर्ब्राह्मणैः सह । विमृश्य कार्यं न्याय्यं चेदाह्वानार्थमतः परम् । मुद्रां वा निक्षिपेत्तस्मिन्पुरुषं वा समादिशेत् । अकल्पबालस्थविरविषमस्थक्रियाकुलान् । कार्यातिपातिव्यसनिनृपकार्योत्सवाकुलान् । मत्तोन्मत्तप्रमत्तार्त्तान्भृत्यान्नाह्वानयेन्नृपः न हीनपक्षां युवतिं कुले जातां प्रसूतिकाम् । सर्ववर्णोत्तमां कन्यां ता[1] ज्ञातिप्रभुकाः स्मृताः । तदधीनकुटुम्बिन्यः स्वैरिण्यो गणिकाश्च याः । निष्कुला याश्च पतितास्तासामाह्वानमिष्यते । कालं देशं च विज्ञाय कार्याणां च बलाबले । अकल्पादीनपि शनैर्यानैराह्वानयेन्नृपः । ज्ञात्वाभियोगं येऽपि स्युर्वने प्रव्रजितादयः । तानप्याह्वानयेद्राजा गुरुकार्येष्वकोपयन्निति । आसेधव्यवस्थाप्यर्थसिद्धैव नारदेनोक्ता ॥ वक्तव्येऽर्थे ह्यतिष्ठन्तमुत्क्रामन्तं च तद्वचः । आसेधयेद्विवादार्थी यावदाह्वानदर्शनम् । स्थानासेधः कालकृतः प्रवासात्कर्मणस्तथा । चतुर्विधः स्यादासेधो नासिद्धस्तं विलङ्घयेत् । आसेधकाल आसिद्ध आसेधं योऽतिवर्तते । स विनेयोऽन्यथाकुर्वन्नासेद्धा दण्डभाग्भवेत् । नदीसन्तारकान्तारदुर्देशोपप्लवादिषु । आसिद्धस्तं परासेधमुत्क्रामन्नापराध्नुयात् । निर्वेष्टुकामो रोगार्तो यियक्षुर्व्यसने स्थितः । अभियुक्तस्तथान्येन राजकार्योद्यतस्तथा । गवां प्रचारे गोपालाः सस्यावापे कृषीवलाः । शिल्पिनश्चापि तत्कालमायुधीयाश्च विग्रह इति । आसेधो राजाज्ञयाऽवरोधः। अकल्पादयः पुत्रादिकमन्यं वा सुहृदं प्रेषयिष्यंति न च ते परार्थवादिनः ॥

यो न भ्राता न च पिता न पुत्रो न नियोगकृत् । परार्थवादी दण्ड्यः स्याद्व्यवहारेषु विब्रुवन्निति नारदवचनात् ॥ ५ ॥

शाखा ४ थी.

व्यवहाराचा विषय सांगतो.

**मूलार्थ–धर्मशास्त्रविरुद्ध व आचारविरुद्ध** अशा रीतीनें दुसऱ्यांकडून पीडित झाल्या-मुळें ( कोणी मनुष्य ) राजाकडे जाऊन जी फिर्याद करितो ती व्यवहारविषय म्हटली आहे.

**टीकार्थ**–[1] **धर्मशास्त्रविरुद्ध व आचारविरुद्ध** अशा रीतीनें दुसऱ्यांकडून पीडित झाल्या-

[1] ता ज्ञातिप्रभुकाः, ता ज्ञातिप्रमुखा इति च पाठः ।

व्यवहार विषय म्हणजे काय.

मुळें कोणी मनुष्य राजाकडे किंवा प्राड्विवाकाकडे ज्या गोष्टी-विषयीं फिर्याद करितो ती फिर्याद व्यवहारविषय झटली आहे.

व्यवहाराचे अंश.

**२ प्रतिज्ञा, उत्तर, संशय, हेतु, परामर्श, प्रमाण, निर्णय, आणि प्रयोजन** एतद्रूप जो व्यवहार त्याचें हें (पहिला अंक) साधारण लक्षण सांगितलें.

व्यवहार दोन प्रकारचा.

३ तो (व्यवहारविषय) दोन प्रकारचा. **शंकाभियोग** आणि **तत्त्वाभियोग**.

**नारद**–अभियोग (फिर्याद) दोन प्रकारचा. **शंकाभियोग**, आणि **तत्त्वाभियोग**. **शंकाभियोग** ह्मणजे दुर्व्यसनी (जुगारी, व्यभिचारी, दारूबाज इत्यादिक) ह्यांच्या संगतीमुळें (ह्याच्या हातून असें कर्म घडलें असेल अशा शंकेनें) अपराधी धरणें. **तत्त्वाभियोग** ह्मणजे प्रत्यक्ष मुद्दा सांपडल्यामुळें किंवा तें तें दुष्ट कर्म करीत असतां अवलोकन केल्यामुळें अपराधी धरणें.

तत्त्वाभियोगहि दोन प्रकारचा.

तत्त्वाभियोग दोन प्रकारचा.

**प्रतिषेधरूप** आणि **विधिरूप**. **प्रतिषेधरूप** ह्मणजे मजपासून सोनें इत्यादिक द्रव्य घेऊन हा मला तें परत देत नाहीं. **विधिरूप** ह्मणजे माझे क्षेत्र (शेत) इत्यादिकाचा हा अपहार करितो.

**कात्यायनानें**हि न्याययुक्त कर्म करण्याची इच्छा धरीत नाहीं तो अथवा अन्याय्य कर्म करितो तो असे तत्त्वाभियोगाचे दोन प्रकार सांगितले आहेत.

४ आणखी त्या व्यवहाराचे अष्टादश भेद सांगतो.

मुख्यत्वें अठरा प्रकरणें कोणतीं.

**मनु**–१ **ऋणादान**, २ **निक्षेप**, ३ **अस्वामिविक्रय**, ४ **संभूयसमुत्थान**, ५ **दत्ताप्रदानिक**, ६ **वेतनादान**, ७ **संविद्व्यतिक्रम**, ८ **क्रीतानुशय**, ९ **विक्रियासंप्रदान**, १० **स्वामिपालविवाद**, ११ **सीमाविवाद**, १२ **वाक्पारुष्य**, व **दंडपारुष्य**, १३ **स्तेय**, १४ **साहस**, १५ **स्त्रीसंग्रहण**, १६ **स्त्रीपुंधर्म**, १७ **दायविभाग**, आणि १८ **द्यूतसमाह्वय** अशीं व्यवहाराचीं अठरा प्रकरणें आहेत.

हीं (प्रकरणें) फिर्यादीचे भेद बहुत असतात ह्मणून पुष्कळ झालीं आहेत. (ह्याविषयीं वचन).

**नारद**– मनुष्यांच्या क्रियाभेदेंकरून ह्यांचेच अणखी १०८ भेद आहेत, ह्मणून हा व्यवहार **शतशाख** झटला आहे.

---

१ राजाशब्देंकरून पूगश्रेणी (ह्यांचें स्वरूप पुढें दुसऱ्या प्रकरणीं १४ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत सांगितलें आहे) इत्यादिक जे जातीचे व व्यापाराचे अधिकारी आहेत तेहि घ्यावे.—सुबोधिनी.

## शाखा ५ वी.

राजानें किंवा सरकारी मनुष्यानें फिर्यादीस भर देऊं नये.

१. ४ थ्या शाखेच्या १ ल्या अंकांत " राजाकडे जी फिर्याद करितो " असें सांगितल्यावरून फिर्याद करणें ती वादीनें स्वतांच येऊन करावी. राजानें, किंवा राजपुरुषानें ( सरकारी मनुष्यानें ) फिर्याद करण्याविषयीं भर देऊं नये असें सांगतो. (ह्याविषयीं प्रमाण वचन).

**मनु**–राजानें आपण होऊन कोणतेंहि कार्य उपस्थित करवूं नये, व त्याच्या कामदार लोकांनींहि करवूं नये. आणि दुसऱ्या लोकांनीं केलेली फिर्याद कदापि बुडवूं नये.

एका मनुष्याला अनेकांशींहि व्यवहार होतो.

२ ( मूळवचनांत ) " दुसऱ्यांकडून पीडित " असें ह्मटलें आहे, यावरून एका मनुष्याचा एक, दोन किंवा बहुत मनुष्यांशींहि व्यवहार होतो असें दाखवितो.

**नारद**–" एकाचा बहुतांवर ( किंवा बहुतांचा एकावर ) व स्त्रियांचा व चाकरांचा असा वाद राजानें मनास आणूं नये; " असें धर्मवेत्ते ह्मणतात, असें जें नारदाचें वचन तें फिर्यादीचे विषय निरनिराळे असून त्यांविषयीं एकदांच फिर्याद केल्यास ती राजानें मंजूर करूं नये, अशाविषयीं जाणावें.

३ " राजाकडे फिर्याद करितो " असें सांगितलें यावरूनच वादी हुजूर आला असतां राजानें पुसल्यावर त्यानें नम्रपणानें आपला वाका सांगावा. नंतर वादीनें केलेली फिर्याद योग्य दिसल्यास राजानें सरकारी कांहीं एक खूण वादी ह्याजबरोबर देऊन किंवा सरकारी मनुष्य ( शिपाई इ० ) पाठवून त्याच्या प्रतिवादीस बोलावून आणावें.

राजानें कोणाकडून प्रतिवादीला बोलावून आणवावें.

फिर्यादी हुजूर बोलाविल्यावर राजानें त्याला काय पुसावें.

**कात्यायन**–४ फिर्यादी नेमल्यावेळीं न्यायसभेंत येऊन नम्रपणानें पुढें उभा राहिला ह्मणजे त्याला पुसावें कीं, तुझें काय कार्य आहे ? तुला कोणती पीडा झाली आहे ? सांग, भिऊं नको; तुला कोणी, कोठें, केव्हां, कशासाठीं पीडा केली ! ह्याप्रमाणें विचारावें. असें विचारिल्यानंतर तो जें बोलेल त्याविषयीं राजानें किंवा प्राड्विवाकानें सभासद व ब्राह्मण ह्यांसहवर्तमान विचार करून फिर्याद योग्य दिसल्यास वादीजवळ सरकारी खुणेचा शिक्का देऊन किंवा शिपाई पाठवून प्रतिवादीस बोलावून आणावें.

व्याधिग्रस्तादिकांस बोलावूं नये हें अर्थसिद्धच आहे, ह्मणून ( मूळांत ) सांगितलें नाहीं; परंतु स्मृत्यंतरीं स्पष्टार्थ सांगितलें आहे. तें असें;—

---

१ विषय निरनिराळे म्हणजे असें, ह्याजकडे माझे शंभर रुपये येणें आहेत अशी एकानें एकावर फिर्याद केली असतां, ह्यानें माझें कापड चोरलें आहे अशी दुसरा फिर्याद करितो, तिसराहि ह्यानें मला मारिलें अशी फिर्याद करितो, तर असी फिर्याद राजानें घेऊं नये. ह्याप्रमाणेंच बहुतांवर निरनिराळ्या विषयांची एकानें एकसमयावच्छेदेंकरून फिर्याद केलेलीहि घेऊं नये.

**कात्यायन**—५ व्याधिग्रस्त; बाल; वृद्ध; संकटग्रस्त; नित्यनैमित्तिक कर्मीचें अनुष्ठान करणारा; हुजूर आणिलें असतां पाठीमागें कांहीं तरी ज्याचे मोठे कार्याचा नाश होईल असा; इष्टांच्या ( मित्रादिकांच्या ) वियोगानें दुःखित; राजकार्याविषयीं तत्पर; किंवा त्याचे घरीं लग्न, उत्साह इत्यादिक उपस्थित झाल्यामुळें परस्वाधीन; कैफी; भूतग्रस्त; वेडा; आपद्ग्रस्त; आणि चाकर ह्यांस राजानें ( न्यायसभेंत ) बोलावूं नये. आणि अनाथ स्त्री, तरुणी, कुलीन स्त्री, बाळंतीण, ब्राह्मणी स्त्री, कन्या ह्यांसहि बोलावूं नये. कारण, ह्या स्त्रिया आपल्या जातीच्या स्वाधीन असतात.

प्रतिवादी कसा असला तर बोलावण्याविषयीं अयोग्य.

**कात्यायन**—६ स्वातंत्र्यानें कुटुंब पोषण करणाऱ्या, स्वैरिणी, वेश्या, नीच कुळांतल्या, पतित ह्या स्त्रियांस बोलावून आणावें.

कोणकोणत्या स्त्रिया न्यायसभेंत आणाव्या.

**कात्यायन**—७ राजानें देश, काल, जाणून कार्याचें बलाबल पाहून व्याधिग्रस्तादिकांस ( ५ व्या अंकांत सांगितलेल्यांस ) हि वाहनादिक पाठवून हळूहळू आणावें.

राजानें व्याधिग्रस्तादिकांस केव्हां व कसें बोलावून आणावें.

**कात्यायन**—८ तसेंच फिर्यादीचें तारतम्य व कार्याचें गौरव पाहून जे अरण्यांत राहणारे संन्यासी (बैरागी, वानप्रस्थ) इत्यादि असतील त्यांसहि कोप न येई अशा सत्कारानें बोलावून आणावें.

गरज पडल्यास संन्यासी इत्यादिकांसहि बोलावून आणावें.

## शाखा ८ वी.

**आसेधव्यवस्था** (ह्मणजे द्वाही देण्याची व्यवस्था)हि अर्थसिद्धच आहे, ती नारद सांगतो.

**नारद**—१ वक्तव्यार्थ सांगूं लागलें असतां न ऐकतां तेथून जातो तर, आणि आपलें वचन अगदींच मानीत नाहीं तर वादीनें, आपण सरकारांत फिर्याद करून सरकारचें प्रतिवादीस बोलावणें पोंचे तोंपर्यंत त्याला द्वाही द्यावी.

प्रतिवादी न ऐकेल तर त्याला द्वाही द्यावी.

**नारद**—२ स्थान[२]द्वाही, काल[३]कृत द्वाही, प्रवास[४]कृत द्वाही, आणि कर्म[५]कृत द्वाही, अशा चार प्रकारच्या द्वाहीचें असिद्धानें उल्लंघन करूं नये. कारण, योग्य कालीं द्वाही घातली असतां तिचें जो मनुष्य उल्लंघन करितो तो दंडास पात्र होतो. अयोग्यकालीं द्वाही देईल तर द्वाही देणारा दंडास पात्र होतो. ( अयोग्यकाळ कोणते ते नारद सांगतो. )

द्वाही चार प्रकारची.

योग्यकालीं द्वाहीचें उल्लंघन केलें असतां दंड.

---

१ जिच्याविषयां सर्वांस दुःख होतें ती. २ स्थानद्वाही म्हणजे ह्या ठिकाणाहून तूं जाऊं नको. ३ कालकृत द्वाही म्हणजे तूं अमुक कालपर्यंत जाऊं नको. ४ प्रवासकृत द्वाही म्हणजे तूं परगांवास जाऊं नको. ५ कर्मकृत द्वाही म्हणजे तूं अमुक काम करूं नको.

नारद–३नदी उतरून पार जात असतां, दुर्गम अरण्यांतून किंवा दुर्गम देशांतून जात असतां, उपप्लव इत्यादि संकटांत असतां, आश्रमांतर घेण्याविषयीं उद्युक्त, रोगार्त, यज्ञ करण्याविषयीं सिद्ध, इष्टवियोगानें दुःखित, एकानें ज्यावर फिर्याद केली आहे तो, राजकार्य ( सरकारी काम ) करण्याविषयीं उद्युक्त, गुराखी गुरें राखीत असतां, शेतकरी लोक पेरणी करीत असतां, शिल्पी ( सुतार, लोहार इत्यादिक ) आपापलें काम करीत असतां, हत्यारबंद ( शिपाई इत्यादिक ) युद्धांत लढत असतां अशा अडचणीच्या प्रसंगीं द्वाही उल्लंघन करणारा अपराधी होत नाहीं. द्वाही देणारा मात्र दंडास पात्र होतो. द्वाही ह्मणजे राजाज्ञेनें प्रतिबंध करणें.

अडचणीच्या वेळीं द्वाही देणारा दंड्य, आणि द्वाही तोडणारा निरपराधी.

४ प्रतिवादी हा ९ व्या शाखेच्या ९व्या अंकांत सांगितल्याप्रमाणें असल्यामुळें तो स्वतां न येतां पुत्र, पिता, मित्र इत्यादिकांस पाठवील तर ते परार्थवादी होत नाहींत. कारण,

प्रतिवादी हा न्यायसभेंत येण्याविषयीं अयोग्य असल्यास त्यानें कोणाला पाठवावें.

नारद– जो भाऊ नव्हे, पिता नव्हे, अथवा आज्ञांकित ( वकील ) हि नव्हे, असा परस्थ जर वाद सांगेल तर तो परार्थवादी, यास्तव तो दंडास पात्र होतो, व व्यवहारांत विरुद्ध बोलणाराहि दंडास पात्र होतो. ९

**प्रत्यर्थिनोऽग्रतो लेख्यं यथावेदितमर्थिना ॥**
**समामासतदर्धाहर्नामजात्यादिचिन्हितम् ॥ ६ ॥**

प्रत्यर्थिनि मुद्रालेख्यपुरुषाणामन्यतमेनानीते किंकुर्यादित्यत आह ॥ अर्थ्यत इत्यर्थः साध्यः सोऽस्यास्तीत्यर्थी तत्प्रतिपक्षः प्रत्यर्थी तस्याग्रतः पुरतो लेख्यं लेखनीयम्। यथा येन प्रकारेण पूर्वमावेदनकाले आवेदितं तथा । न पुनरन्यथा । अन्यथावादित्वेन व्यवहारस्य भङ्गप्रसङ्गात् ॥

अन्यवादी क्रियाद्वेषी नोपस्थाता निरुत्तरः । आहूतः प्रपलायी च हीनः पंचविधः स्मृत इति । आवेदनकाल एवार्थिवचनस्य लिखितत्वात्पुनर्लेखनमनर्थकमित्यत आह समामासेत्यादि । संवत्सरमासपक्षतिथिवारादिना अर्थिप्रत्यर्थिनाम ब्राह्मणजात्यादिचिह्नितम् । आदिशब्देन द्रव्यतत्संख्यास्थानवेलाक्षमालिङ्गादीनि गृह्यंते ॥ यथोक्तम् । अर्थवद्धर्मसंयुक्तं परिपूर्णमनाकुलम् । साध्यवद्वाचकपदं प्रकृतार्थानुबंधि च । प्रसिद्धमविरुद्धं च निश्चितं साधने क्षमम्। संक्षिप्तं निखिलार्थं च देशकालाविरोधि च । वर्षर्तुमासपक्षाहोवेलादेशप्रदेशवत् । स्थानावसथसाध्याख्याजात्याकारवयोयुतम् । साध्यप्रमाणसंख्यावदात्मप्रत्यर्थिनामवत् । परात्मपूर्वजानेकराजनामभिरङ्कितम् । क्षमालिङ्गात्मपीडावत्कथिताहर्तृदायकम् । यदावेदयते राज्ञे तद्भाषेत्यभिधीयत इति । भाषा प्रतिज्ञा पक्ष इति नार्थान्तरं । आवेदनसमये कार्यमात्रं लिखितं प्रत्यर्थिनोऽग्रतः समामासादिविशिष्टं लिख्यत इति विशेषः । संव-

त्सरविशेषणं यद्यपि सर्वव्यवहारेषु नोपयुज्यते तथाप्याधिप्रतिग्रहक्रयेषु निर्णयार्थमुपयुज्यते ॥

आधौ प्रतिग्रहे क्रीते पूर्वा तु बलवत्तरेति वचनात् ॥ अर्थव्यवहारेऽपि एकस्मिन्संवत्सरे यत्संख्याकं यद्द्रव्यं यतो येन गृहीतं प्रत्यर्पितं च पुनरन्यस्मिन्वत्सरे तद्द्रव्यं तत्संख्याकं ततस्तेन गृहीतं याच्यमानो यदि ब्रूयात्सत्यं गृहीतं प्रत्यर्पितं चेति । वत्सरांतरे गृहीतं प्रत्यर्पितं नास्मिन्वत्सरे इत्युपयुज्यते । एवं मासाद्यपि योज्यम् । देशस्थानादयः पुनः स्थावरेष्वेवोपयुज्यन्ते ॥

देशश्चैव तथा स्थानं संनिवेशस्तथैव च । जातिः संज्ञाधिवासश्च प्रमाणं क्षेत्रनाम च । पितृपैतामहं चैव पूर्वराजानुकीर्तनम् । स्थावरेषु विवादेषु दशैतानि निवेशयेदिति स्मरणात् । देशो मध्यदेशादिः । स्थानं वाराणस्यादि । संनिवेशस्तत्रैव पूर्वापरदिग्विभागपरिच्छिन्नः सम्यगङ्कितिष्ठो गृहक्षेत्रादिः । जातिरर्थिप्रत्यर्थिनोर्ब्राह्मणत्वादिः । संज्ञा च देवदत्तादिः । अधिवासः समीपदेशे निवासी जनः । प्रमाणं निवर्तनादि भूपरिमाणं । क्षेत्रनाम शालिक्षेत्रं क्रमुकक्षेत्रं । कृष्णभूमिः पाण्डुभूमि इति । पितुः पितामहस्य च नामार्थिप्रत्यर्थिनोः पूर्वेषां त्रयाणां राज्ञां नामकीर्तनं चेति । समामासादीनां यस्मिन्व्यवहारे यावदुपयुज्यते तत्र तावल्लेखनीयमिति तात्पर्यार्थः ॥

एवं पक्षलक्षणे स्थिते पक्षलक्षणरहितानां पक्षवदवभासमानानां पक्षाभासत्वं सिद्धमेवेति योगीश्वरेण न पृथक्पक्षाभासा उक्ताः । अन्यैस्तु विस्पष्टार्थमुक्तम् ( * अप्रसिद्धादेः साधयितुमशक्यत्वादनिराकरणम् ) अप्रसिद्धं निराबाधं निरर्थं निष्प्रयोजनम् । असाध्यं वा विरुद्धं वा पक्षाभासं विवर्जयेत् । अप्रसिद्धं मदीयं शशविषाणं गृहीत्वा न प्रयच्छतीत्यादि । निराबाधमस्मद्गृहदीपप्रकाशेनायं स्वगृहे व्यवहरतीत्यादि । निरर्थमभिधेयरहितम् कचटतपजडदगबेत्यादि । निष्प्रयोजनं यथायं देवदत्तोऽस्मद्गृहसन्निधौ सुस्वरमधीत इत्यादि । असाध्यं यथाहं देवदत्तेन सभ्रूभङ्गमुपहसित इत्यादि । एतत्साधनासंभवादसाध्यम् । अल्पकालत्वान्न साक्षिसंभवो लिखितं दूरतोऽल्पत्वान्न दिव्यमिति । विरुद्धं यथाहं मूकेन शप्त इत्यादि । पुरराष्ट्रादिविरुद्धं वा । (* एतेषां स्वभावेनैव निराकरणमिति न निराक्रियते । तत्र च अप्रसिद्धादीनां व्युत्पत्त्यर्थमुपादानं तदप्यनेकपदसंकीर्णस्य निराकरणं न क्रियते) राज्ञा विवर्जितो यश्च यश्च पौरविरोधकृत् । राष्ट्रस्य वा समस्तस्य प्रकृतीनां तथैव च । अन्ये वा ये पुरग्राममहाजनविरोधकाः । अनादेयास्तु ते सर्वे व्यवहाराः प्रकीर्तिता इति ॥

यत्त्वनेकपदसंकीर्णः पूर्वपक्षो न सिद्ध्यतीति तत्र यद्यनेकवस्तुसङ्कीर्ण इत्युच्यते तदा न दोषः। मदीयमनेन हिरण्यं वासो रूपकादि वापहृतमित्येवंविधस्यादुष्टत्वात् । ऋणादानादिपदसंकरे पक्षाभास इति चेत्तदपि न । मदीया रूपका अनेन वृद्ध्या

* इदमधिकमिति प्रतिभाति । कलिकाताराजधानीमुद्रितपुस्तके हस्तलिखितान्यपुस्तके चास्यादर्शनात् ।

गृहीताः सुवर्णं चास्य हस्ते निक्षिप्तम् मदीयं क्षेत्रमयमपहरतीत्यादीनां पक्षत्वमिष्यत एव। किंतु क्रियाभेदात्क्रमेण व्यवहारो न युगपदित्येतावत् ॥

यथाह कात्यायनः। बहुप्रतिज्ञं यत्कार्यं व्यवहारे सुनिश्चितम्। कामं तदपि गृह्णीयाद्राजा तत्त्वबुभुत्सयेति। यस्मादनेकपदसंकीर्णः पूर्वपक्षो युगपन्न सिद्ध्यतीति तस्यार्थः। अर्थिग्रहणात्पुत्रपौत्रादिग्रहणं तेषामेकार्थत्वात्। नियुक्तस्यापि नियोगेनैव तदेकार्थत्वाक्षेपात् ॥

अर्थिना संनियुक्तो वा प्रत्यर्थिप्रहितोऽपि वा। यो यस्यार्थे विवदते तयोर्जयपराजयाविति स्मरणात्। नियुक्तजयपराजयौ मूलस्वामिनोरेव। एतच्च भूमौ फलके वा पाण्डुलेखेन लिखित्वा आवापोद्धारेण विशोधितं पश्चात्पत्रे निवेशयेत् ॥

पूर्वपक्षं स्वभावोक्तं प्राड्विवाकोऽभिलेखयेत्। पाण्डुलेखेन फलके ततः पत्रे विशोधितमिति कात्यायनस्मरणात्। शोधनं च यावदुत्तरदर्शनं कर्तव्यं नातःपरमनवस्थाप्रसंगात् ॥ अत एव नारदेनोक्तम्। शोधयेत्पूर्ववादं तु यावन्नोत्तरदर्शनम्। अवष्टब्धस्योत्तरेण निवृत्तं शोधनं भवेदिति। पूर्वपक्षमशोधयित्वैव यदोत्तरं दापयन्ति सभ्यास्तदा रागाल्लोभादित्युक्तदण्डेन सभ्यान् दण्डयित्वा पुनः प्रतिज्ञापूर्वकं व्यवहारः प्रवर्तनीयो राज्ञेति ॥ ६ ॥

## शाखा ७ वी.

प्रतिवादीस सरकारी शिक्का, आज्ञापत्र, शिपाई; ह्यांतून कोणा एकाकडून (न्यायसभेंत) आणिल्यानंतर काय करावें तें सांगतो.

**मूलार्थ**— वादीनें जसा वाका सांगितला असेल तसा प्रतिवादीच्या समक्ष लिहवावा, आणि तो लेख वर्ष, मास, पक्ष, दिवस, नांव, जाति इत्यादिकांनीं युक्त असावा.

**टीकार्थ**— १ प्रतिवादी कोर्टांत हजर झाल्यावर त्याच्या समक्ष, वादीनें जसा पूर्वीं वाका सांगितला असेल तसाच लिहून घ्यावा, कमज्यास्ती सांगेल तर घेऊं नये. कारण, जबानींत फेर पडेल तर तो वादांत खोटा होईल असें समजावें. ह्यास प्रमाण.

अर्जी लिहून देण्याचा प्रकार कमजास्ती असल तर घेऊं नये.

**स्मृति**— पूर्वीं सांगितल्याच्या विरुद्ध दुसऱ्या तऱ्हेचें लिहून देतो; पुरावा दाखवीत नाहीं, दाखविला असतां विसंगत दाखवितो; वादाला उभा राहत नाहीं; सवाल केले असतां जबाब देत नाहीं; बोलाविलें असतां पळून जातो; असा पांच प्रकारचा वादी खोटा ( लबाड ) समजावा.

२ फिर्याद झाली त्या वेळींच वादीची जबानी लिहून घेतली असते यास्तव पुनः ती लिहून घेणें व्यर्थ आहे असी शंका होईल तन्निरसनार्थ सांगतो कीं ती अर्जी ( भाषा ) वर्ष ( ह्मणजे शक संवत्सर ), मास, पक्ष ( शुक्ल अथवा कृष्ण ), वार, तिथि, वादीप्रतिवादींचीं नांवें, ब्राह्मणादि जाति इत्यादिकांनीं युक्त असावी.

अर्जींत काय काय लिहिलें पाहिजे.

मूळांतील इत्यादिक शब्देंकरून द्रव्य, त्याच्या संख्या, ठिकाण, क्षमा करण्याचें कारण, वेळा वगैरे घ्यावीं.

**स्मृत्यंतर**— प्रयोजनसहित; धर्माला अविरुद्ध; परिपूर्ण; ज्याचीं अक्षरें स्पष्ट, व अन्वय संगतवार; आणि ज्याविषयीं फिर्याद असेल तो अर्थ त्या लेखांत असावा; गौण किंवा लाक्षणिक शब्द ज्यांत नसावे, ( आणि पूर्वीं सांगितलेल्या मजकुराला संगतवार ) आणि जीविषयीं फिर्याद असेल ती वस्तु लोकप्रसिद्ध असावी; व पूर्वापरविरोधरहित व पुरराष्ट्रादिकांस अविरुद्ध, अर्थांतरसंशयरहित; पुरावा करण्याच्या साधनांनीं युक्त; व संक्षिप्त असून सकलार्थयुक्त; देश, काल ( आचार ) ह्यांशीं अविरुद्ध; आणि वर्ष, ऋतु (वसंतादि), मास, पक्ष, तिथि, वार, वेळ, देश, प्रदेश, स्थान, घर, विवादास्पदीभूत जें द्रव्य त्याचें नांव, जात, आकृति, वय, व त्याचें परिमाण, संख्या ह्यांहींकरून युक्त; वादिप्रतिवादींचीं नांवें व उभयतांच्या पित्यांचीं नांवें व अनेक राजांचीं नांवें; क्षमा करण्याचीं कारणें, आपली पीडा, आणि दाता व प्रतिगृहीता इत्यादिकांचा निवेश ज्यांत असावा; असें जें राजाला लेखनद्वारा निवेदन केलें जातें त्याला **भाषा** असें ह्मटलें आहे.

अर्जी कशी असावी.

**भाषा**, **प्रतिज्ञा**, आणि **पक्ष** हे शब्द अर्जीचे पर्यायवाचक शब्द जाणावे.

३ (सारांश) फिर्याद करिते वेळेस (४ थ्या शाखेच्या पहिल्या अंकांत सांगितल्याप्रमाणें) वादीचा नुसता वाका मात्र लिहून घ्यावा, आणि प्रतिवादीच्या समक्ष संवत्सर, मास, इत्यादिक सविस्तरयुक्त जबानी लिहून घ्यावी इतका विशेष आहे.

लेखांत वर्षाचा निवेश कोणकोणत्या व्यवहारीं अवश्य केला पाहिजे.

४ (अर्जीमध्यें) वर्ष लिहिण्याचा निवेश जरी सर्व व्यवहारांत उपयोगी पडत नाहीं, तरी आधि (गहाण), प्रतिग्रह, क्रीत ह्या व्यवहारीं निर्णय करण्याकरितां त्याचा उपयोग पडतो, कारण

**याज्ञवल्क्य**—आधि, प्रतिग्रह आणि क्रीत ह्या व्यवहारीं प्रथम झालेला व्यवहार बलवत्तर प्रमाण होतो. असें (पुढें २ ऱ्या प्रकरणाच्या ८ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) वचन आहे.

देण्याघेण्याचे बाबदींतही संवत्सर लिहिण्याचा उपयोग पडतो.

५ **ऋणादान** इत्यादि धनसंबंधी व्यवहारप्रकरणींहि वर्ष लिहून घेण्याचा उपयोग पडतो. तो असा कीं, कोणीएका सावकारापासून एका कुळानें एके वर्षीं जितकें जें द्रव्य ( रुपये मोहरा वगैरे ) घेतलें तितकें तें त्याच वर्षीं परत दिलें. पुनः दुसऱ्या वर्षीं त्याच कुळानें त्याच सावकारापासून तितक्याच संख्येचें व तेंच[२] ( रुपये मोहरा इत्यादि ) द्रव्य घेतलें. नंतर सावकार त्या कुळापाशीं मागूं लागला असतां कूळ बोलेल कीं, घेतलें

१ भाषा, प्रतिज्ञा, पक्ष म्हणजे वहिवाटींत जी वादीची अर्जी घेतात तिचे हे संस्कृतांत पर्यायशब्द आहेत.

२ तेंच म्हणजे प्रथमतः जर रुपये घेतले असले तर दुसऱ्यानेंहि रुपयेच.

होतें खरें, परंतु परत दिलें. तेव्हां सावकार त्याला कुंठित करील कीं, तें घेतलेलें पर दिलें खरें परंतु तो गतवर्षीचा व्यवहार, ह्या वर्षांत घेतलेलें परत दिलें नाहीं. ह्या रीतीं वर्ष लिहिण्याचा उपयोग होतो. ह्याप्रमाणेंच मास, तिथि, इत्यादिकांचाहि उपयोग पडते तो यथासंभव योजावा.

स्थावरव्यवहारीं देश टिकाण वगैरे लिहिण्याचा विशेष उपयोग पडतो.

६ देश स्थान इत्यादिकांचा उपयोग तर बहुधा स्थावर व्यवहारींच पडतो, कारण,

**स्मृत्यंतर**– देश, स्थान, सन्निवेश, जाति, संज्ञा, अधिवास, प्रमाण, क्षेत्रनाम, बाप व आजा ह्यांचीं नांवें, पूर्वीच्या राजाचें नांव अशीं हीं दहा स्थावरव्यवहारीं लिहावीं.

**देश** ह्मणजे मध्यदेश ( कोंकण) इत्यादिक.*

**स्थान** ह्मणजे काशी ( नाशीक ) इत्यादिक.

**सन्निवेश** ह्मणजे पूर्वेस किंवा उत्तरेस अमुकाचें घर क्षेत्र इत्यादिक.

**जाति** म्हणजे (वादिप्रतिवादींची) ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादिक.

**संज्ञा** ह्मणजे वादिप्रतिवादींचीं नांवें व त्यांच्या बापाचें व आजाचें नांव.

**अधिवास** ह्मणजे शेजारीं राहणारे जन.

**प्रमाण** ह्मणजे घर, क्षेत्र इत्यादिकांचें काठ्या, बिघा इत्यादि परिमाण.

**क्षेत्रनाम** ह्मणजे बागाईत किंवा जिराईत, काळी किंवा पांढर जमीन इत्यादि.

पूर्वीच्या राजांचीं नांवें ह्मणजे पूर्वीं झालेल्या तीन राजांचीं नांवें.

ह्या दहा प्रकारांचा निवेश† स्थावरव्यवहारीं करावा. सारांश वर्ष, मास, इत्यादिकांचा ज्या ज्या व्यवहारीं जितका उपयोग पडेल तितकें तेथें लिहावें.

## शाखा ८ वी.

ह्याप्रमाणें पक्षाचें (अर्जीचें) स्वरूप सांगितलें, तेव्हां ह्या पक्षाच्या स्वरूपाहून निराळे असून पक्षासारिखे भासतात, ते पक्षाभास समजावे हें अर्थसिद्धच आहे, ह्मणून ते योगीश्वरानें ( याज्ञवल्क्यानें ) निराळे सांगितले नाहींत, परंतु इतर ग्रंथकारांनीं स्पष्ट समजण्याकरितां सांगितले आहेत. ते असे;

पक्षाभास ह्मणजे काय.

**स्मृत्यंतर**–१ अप्रसिद्ध, निराबाध, निरर्थ, निष्प्रयोजन, असाध्य, किंवा विरुद्ध अशा प्रकारचा **पक्षाभास** असेल तो टाकावा.

पक्षाभास कोणते.

---

* इत्यादिक म्हणजे प्रांत, परगणा, जिल्हा, तालुका, सुभा वगैरे यथासंभव घ्यावें. म्हणजे असें,– प्रांत कोंकण, परगणा शिरोळ, जिल्हा पुणें, सुभा नगर, तालुका सुवर्णदुर्ग इत्यादिक. † निवेश करण्याच्या रीतीचें दिक्प्रदर्शन मी अमुकाचा पुत्र; अमुकाचा नातू; माझें नांव, वय, जात अमुक; अमुक ठिकाणचा राहणारा; अमुक प्रांतांत अमुक गांवीं अमुकाच्या क्षेत्राच्या किंवा गृहाच्या उत्तरेस किंवा पूर्वेस माझी काळी किंवा पांढर, अमुक बिघे लांबीचें क्षेत्र किंवा घर आहे, आणि, तें अमुकवंशीय राजानें अमुक सालीं दिलें आहे, किंवा खरेदी केलें आहे, त्यावर प्रतिवादी हा अमुकाचा पुत्र अमुक नांवकरी सत्ता करितो.

**अप्रसिद्ध**[1] जसें; ह्यानें माझें सशाचें शृंग घेतलें आहे, तें, हा देत नाहीं.

**निराबाध**, जसें; माझ्या घरांतील दिव्याच्या उजेडानें हा आपल्या घरांतील कामधंदा करितो.

**निरर्थक**, ह्मणजे कांहींच अर्थ ज्यांत नाहीं असे वायकळ शब्द ज्यांत आहेत तो. जसें; कचतप. गजडदब इत्यादि (माझें यानें हरण केलें).

**निष्प्रयोजन**, ह्मणजे हा मनुष्य माझ्या घरासमीप सुस्वर अध्ययन करितो.

**असाध्य**, ह्मणजे ह्या मनुष्यानें कपाळास आंठी घालून माझा उपहास केला. ह्या वादाचा पुरावा करितां येत नाहीं ह्मणून हा असाध्य. कारण, हा फारच थोड्या वेळांतला असल्यामुळें यांत साक्षी संभवत नाहीं. लिहिणें तर दुरापास्तच. हा वाद क्षुल्लक आहे ह्मणून दिव्यप्रमाणहि योग्य नाहीं.

**विरुद्ध**, ह्मणजे मुक्यानें मला शिव्या दिल्या इत्यादि तो. अथवा विरुद्ध ह्मणजे जो वाद शहराशीं व राष्ट्राशीं विरुद्ध तो.

**स्मृति**–२जो विवाद राजानें टाकिला, किंवा जो पौरजनांशीं विरुद्ध, किंवा जो सर्व नगराशीं विरुद्ध अथवा जो सर्व प्रजांशीं विरुद्ध, आणि शहरें, गांव, महाजन[2] ह्यांशीं जे वाद विरुद्ध असतील ते राजानें घेऊं नयेत.

राजानें टाकलेला व शिष्टांशीं विरुद्ध असा वाद मनास आणूं नये.

३ "अनेक[3] प्रकरणें (ऋणादान, ठेव, साहस इत्यादिक) जींत आहेत असी संकीर्ण फिर्याद केली असतां ती सिद्ध होत नाहीं," असें जें सांगितलें त्याचा अर्थ, अनेक वस्तूंनीं (सोनें रूपें इत्यादिकांनीं) संकीर्ण असा केला तर असल्या फिर्यादीस पक्षाभासदोष येत नाहीं, ह्मणजे असें, माझें ह्या मनुष्यानें सोनें, कापड, रुपये इत्यादिक अपहारिलें; अशा प्रकारची फिर्याद निर्दोष आहे.

४ **ऋणादानादिक** प्रकरणांनीं (कर्ज, ठेव, साहस इत्यादिक प्रकरणांनीं) संकीर्ण असा मूळचाच अर्थ घेतला तरी अशा फिर्यादीस पक्षाभासदोष येत नाहीं; कारण, जसें, माझे रुपये ह्या मनुष्यानें व्याजीं घेतले आहेत; आणि मी ह्याजपाशीं सोनें ठेविलें आहे, आणि हा माझें शेत जबरीनें घेतो; इत्यादिक फिर्यादी होतील तर त्या घेण्यालायक आहेत. परंतु त्या निरनिराळ्या असल्या कारणानें अनुक्रमानें ग्राह्य आहेत. सर्व एकदम घेण्यास लायक नाहींत, इतका तात्पर्यार्थ आहे.

**कात्यायन**– "ज्यामध्यें बहुत प्रकारच्या फिर्यादी आहेत असा जो वाद तो जर निर्णययोग्य आहे तर राजानें तत्त्वार्थ समजून निर्णय करण्यासाठीं घ्यावा."

---

१ सशाच्या शिंगाचा मुळींच असंभव म्हणून त्याविषयींची फिर्याद अप्रसिद्ध. २ महाजन म्हणजे शिष्ट, संभावित, राजमान्य लोक. ३ वरती जे पक्षाभास सांगितले त्याप्रमाणें अनेकपदसंकीर्ण व्यवहारालाहि पक्षाभासत्व येईल म्हणून तन्निराकरणार्थ सांगतो. (सुबोधिनी).

तस्मात् अनेक प्रकरणांनीं संकीर्ण ( मिश्रित ) असा वाद एकदांच घेतला जात नाहीं, असा त्याचा ( ३ ऱ्या अंकाचा) अर्थ.

९ वादीशब्देंकरून जो वादीचा पुत्र, पिता इत्यादिक असेल तो वादीच्याच ठिकाणीं समजावा. तसाच नियुक्त (वकील )हि आज्ञेमुळें वादीच्या ठिकाणींच समजावा. कारण, ते एकार्थवादीच आहेत.

वादीशब्देंकरून जो वादीच्या तर्फेचा असेल तो वादीच्या ठिकाणींच समजावा.

**स्मृत्यंतरींहि** असेंच आहे कीं, वादीनें नियुक्त केलेला किंवा प्रतिवादीनें पाठविलेला असा जो कोणी ज्याच्या अर्थाविषयीं वाद सांगतो त्याचा जो जय किंवा पराजय तो मुख्याचा. ह्या स्मृतीवरून वकिलाचे जे जय, पराजय ते त्याच्या मुख्याचेच असें समजावें.

वकील वगैरे वादांत जय पराजय पावले असतां तो मुख्याकडे.

## शाखा ९ वी.

१ नंतर ही अर्जी ( ७ व्या शाखेचा १ ला व २ रा अंक ) भूमीवर किंवा फळीवर खडूनें लिहावी, आणि कमजास्ती जें करणें असेल तें करून शुद्ध केल्यावर कागदावर लिहावी. कारण,

अर्जीचा मसुदा कशावर लिहावा तो प्रकार.

**कात्यायन**– " प्राड्विवाकानें वादीची अर्जी खडूनें फळीवर लिहविलेली शुद्ध करवून नंतर कागदावर लिहवावी. "

२ अर्जी शुद्ध करणें ती प्रतिवादीचा जबाब होण्यापूर्वी केली पाहिजे. जबाब झाल्यानंतर करूं नये, कारण, अशानें अनवस्थाप्रसंग होईल. या कारणास्तवच नारद सांगतो.

अर्जी शुद्ध करण्याचा अवधि.

**नारद**– " जोंपर्यंत प्रतिवादीचा जबाब झाला नाहीं तोंपर्यंत वादीची अर्जी शुद्ध करावी. प्रतिवादीनें जबाब दिल्यानंतर शुद्ध करूं नये. "

३ जर वादीची अर्जी शुद्ध केल्यापूर्वीच सभासद प्रतिवादीकडून जबाब देववितील तर राजानें ३ ऱ्या शाखेच्या ४ थ्या अंकांत सांगितल्याप्रमाणें सभासदांस दंड करून पुनः पहिल्यापासून व्यवहार चालवावा. ६

अर्जी शुद्ध केल्यापूर्वी सभासद उत्तर देववितील तर त्यांस दंड.

---

## श्रुतार्थस्योत्तरं लेख्यं पूर्वावेदकसन्निधौ ।

**एवं शोधितपत्रारूढे पूर्वपक्षे किं कर्तव्यमित्यत आह ॥ श्रुतो भाषार्थो येन प्रर्थिनासौ श्रुतार्थः तस्योत्तरं पूर्वपक्षादुत्तरत्र भवतीत्युत्तरं लेख्यं लेखनीयम् । पूर्वावेदकस्यार्थिनः संनिधौ समीपे उत्तरं च यत्पूर्वोक्तस्य निराकरणं तदुच्यते । य-**

१ अर्थ म्हणजे एका प्रकरणाची (कर्जाची) फिर्याद केल्यावर तिचा निर्णय झाल्यावर ठेवीविषयीं फिर्याद करावी. तिचा फैसला झाल्यावर चोरीबद्दलची फिर्याद करावी, अशा अनुक्रमानें फिर्यादी कराव्या. एकदांच तीन चार विषयांची फिर्याद करूं नये.

थाह । पक्षस्य व्यापकं सारमसन्दिग्धमनाकुलम् । अव्याख्यागम्यमित्येतदुत्तरं तद्विदो विदुरिति । पक्षस्य व्यापकं निराकरणसमर्थं । सारं न्याय्यं न्यायादनपेतम् । असंदिग्धं सन्देहरहितम् । अनाकुलं पूर्वापराविरुद्धम् । अव्याख्यागम्यं अप्रसिद्धपदप्रयोगेण दुःश्लिष्टविभक्तिसमासाध्याहाराभिधानेन वा अन्यदेशभाषाभिधानेन वा यत् व्याख्येयार्थं न भवति तत्सदुत्तरम् । तच्च चतुर्विधम् । संप्रतिपत्तिर्मिथ्या प्रत्यवस्कन्दनं पूर्वन्यायश्चेति ॥

यथाह कात्यायनः । सत्यं मिथ्योत्तरं चैव प्रत्यवस्कन्दनं तथा । पूर्वन्यायविधिश्चैवमुत्तरं स्याच्चतुर्विधमिति । तत्र सत्योत्तरं यथा । रूपकशतं मह्यं धारयतीत्युक्ते सत्यं धारयामीति । यथाह । साध्यस्य सत्यवचनं प्रतिपत्तिरुदाहृतेति । मिथ्योत्तरं तु नाहं धारयामीति । तथाच कात्यायनः । अभियुक्तोऽभियोगस्य यदि कुर्यादपह्नवम् । मिथ्या तत्तु विजानीयादुत्तरं व्यवहारत इति । तच्च मिथ्योत्तरं चतुर्विधम् । मिथ्यैतन्नाभिजानामि तदा तत्र न संनिधिः । अजातश्चास्मि तत्काल इति मिथ्या चतुर्विधमिति । प्रत्यवस्कन्दनं नाम । सत्यं गृहीतं प्रतिदत्तं प्रतिग्रहेण लब्धमिति वा । यथाह नारदः । अर्थिना लिखितो योऽर्थः प्रत्यर्थी यदि तं तथा । प्रपद्य कारणं ब्रूयात्प्रत्यवस्कन्दनं स्मृतमिति । प्राङ्न्यायोत्तरं तु यत्राभियुक्त एवं ब्रूयादस्मिन्नर्थे अनेनाहमभियुक्तस्तत्र चायं व्यवहारमार्गेण पराजित इति ॥ उक्तंच कात्यायनेन । आचारेणावसन्नोऽपि पुनर्लेखयते यदि । सोऽभिधेयो जितः पूर्वं प्राङ्न्यायस्तु स उच्यते इति । एवमुत्तरलक्षणे स्थिते उत्तरलक्षणरहितानामुत्तरवदवभासमानानामुत्तराभासत्वमर्थसिद्धं स्पष्टीकृतं च ।

स्मृत्यन्तरे । सन्दिग्धमन्यत्प्रकृतादत्यल्पमतिभूरि च । पक्षैकदेशव्याप्यन्यत्तथा नैवोत्तरं भवेत् । यद्व्यस्तपदमव्यापि निगूढार्थं तथाकुलम् । व्याख्यागम्यमसारं च नोत्तरं स्वार्थसिद्धय इति । तत्र संदिग्धम् । सुवर्णशतमनेन गृहीतमित्युक्ते सत्यं गृहीतं सुवर्णशतं माषशतं वेति प्रकृतादन्यत् । यथा सुवर्णशताभियोगे पणशतं धारयामीति । अत्यल्पं सुवर्णशताभियोगे पंच[1] धारयामीति । अतिभूरि सुवर्णशताभियोगे द्विशतं धारयामीति । पक्षैकदेशव्यापि हिरण्यवस्त्राद्यभियोगे हिरण्यं गृहीतं नान्यदिति । व्यस्तपदं ऋणादानाभियोगे पदान्तरेणोत्तरम् । यथा सुवर्णशताभियोगे अनेनाहं ताडित इति । अव्यापि देशस्थानादिविशेषणाव्यापि । यथा मध्यदेशे वाराणस्यां पूर्वस्यां दिशि क्षेत्रमनेनापहृतमिति पूर्वपक्षे लिखिते क्षेत्रमपहृतमिति । निगूढार्थं यथा सुवर्णशताभियोगे किमहमेवास्मै धारयामीत्यत्र ध्वनिना प्राड्विवाकः सभ्यो वा अर्थी वा अन्यस्मै धारयतीति सूचयतीति निगूढार्थं । आकुलं पूर्वापरविरुद्धम् । यथा सुवर्णशताभियोगे कृते सत्यं गृहीतं न धारयामीति । व्याख्यागम्यं दुःश्लिष्टविभक्तिसमासाध्याहाराभिधानेन व्याख्यागम्यम् । अदेशभाषाभिधानेन वा । यथा सुवर्णश-

---

१ पञ्चाशतमिति पाठान्तरम् ॥

तद्विषये पितृऋणाभियोगे गृहीतशतवचनात् सुवर्णानां पितुर्न जानामीति अत्र गृहीतशतस्य पितुर्वचनात् सुवर्णानां शतं गृहीतमिति न जानामीति । असारं न्यायविरुद्धम् । यथा सुवर्णशतमनेन वृद्ध्या गृहीतं वृद्धिरेव दत्ता न मूलमित्यभियोगे न सत्यं वृद्धिर्दत्ता न मूलं गृहीतमिति । उत्तरमित्येकवचननिर्देशादुत्तराणां संकरो निरस्तः ॥

यथाह कात्यायनः। पक्षैकदेशे यत्सत्यमेकदेशे च कारणम् । मिथ्या चैवैकदेशे च संकरात्तदनुत्तरमिति । अनुत्तरत्वे च कारणं तेनैवोक्तम् । न चैकस्मिन्विवादे तु क्रिया स्याद्वादिनोर्द्वयोः। न चार्थसिद्धिरुभयोर्नचैकत्र क्रियाद्वयमिति । मिथ्याकारणोत्तरयोः संकरे अर्थिप्रत्यर्थिनोर्द्वयोरपि क्रिया प्राप्नोति।मिथ्याक्रिया पूर्ववादे कारणे प्रतिवादिनीति स्मरणात्।तदुभयमेकस्मिन्व्यवहारे विरुद्धम्।यथा सुवर्णं रूपकशतं चानेन गृहीतमित्यभियोगे सुवर्णं न गृहीतं रूपकशतं गृहीतं प्रतिदत्तं चेति। कारणप्राङ्न्यायसंकरे तु प्रत्यर्थिन एव क्रियाद्वयम् । प्राङ्न्यायकारणोक्तौ तु प्रत्यर्थी निर्दिशेत्क्रियामिति । यथा सुवर्णं गृहीतं प्रतिदत्तं रूपके व्यवहारमार्गेण पराजित इति । अत्र प्राङ्न्याये जयपत्रेण वा प्राङ्न्यायदर्शिभिर्वा भावयितव्यम् । कारणोत्तरे तु साक्षिलेख्यादिभिर्भावयितव्यमिति विरोधः । एवमुत्तरत्रयसंकरेऽपि द्रष्टव्यम् । यथानेन सुवर्णं रूपकशतं वस्त्राणि च गृहीतानीत्यभियोगे सत्यं सुवर्णं गृहीतं प्रतिदत्तं रूपकशतं न गृहीतं वस्त्रविषये तु पूर्वन्यायेन पराजित इति । एवं चतुःसंकरेऽपि । एतेषां चानुत्तरत्वं यौगपद्येन । तस्य तस्यांशस्य तेन तेन विनासिद्धेः क्रमेणोत्तरत्वमेव । क्रमश्चार्थिनः प्रत्यर्थिनः सभ्यानां चेच्छया भवति । यत्र पुनरुभयोः संकरः तत्र यस्य प्रभूतार्थविषयत्वं तत्क्रियोपादानेन पूर्वं व्यवहारः प्रवर्तनीयः । पश्चादल्पविषयोत्तरोपादानेन च व्यवहारो द्रष्टव्यः। यत्र संप्रतिपत्तेः उत्तरान्तरस्य च संकरस्तत्रोत्तरान्तरोपादानेन व्यवहारो द्रष्टव्यः । संप्रतिपत्तौ क्रियाभावात् ।

यथा हारीतेन । मिथ्योत्तरं कारणं च स्यातामेकत्र चेदुभे । सत्यं चापि सहान्येन तत्र ग्राह्यं किमुत्तरमित्युक्तोक्तम् ।

यत्प्रभूतार्थविषयं यत्र वा स्यात्क्रियाफलम् । उत्तरं तत्र तज्ज्ञेयमसंकीर्णमतोन्यथा । संकीर्णं भवतीति शेषः । शेषापेक्षया ऐच्छिकः क्रमो भवतीत्यर्थः । तत्र प्रभूतार्थं यथानेन सुवर्णं रूपकशतं वस्त्राणि च गृहीतानीत्यभियोगे सत्यं सुवर्णं गृहीतं रूपकशतं च न गृहीतं वस्त्राणि तु गृहीतानि प्रतिदत्तानि चेति । अत्र मिथ्योत्तरस्य प्रभूतविषयत्वात् अर्थिनः क्रियामादाय प्रथमं व्यवहारः प्रवर्तयितव्यः । पश्चाद्वस्त्रविषयो व्यवहारः।एवं मिथ्याप्राङ्न्यायसंकरे कारणप्राङ्न्यायसंकरे च योजनीयम् । तथा तस्मिन्नेवाभियोगे सत्यं सुवर्णं रूपकशतं च गृहीतं दास्यामि वस्त्राणि तु न गृहीतानि

१ सुवर्णशतमिति पाठान्तरम् ।

गृहीतानि प्रतिदत्तानीति वा वस्त्रविषये पूर्वं पराजित इति चोत्तरे संप्रतिपत्तेर्भूरिविषयत्वे- पि तत्र क्रियाभावान्मिथ्याद्युत्तरक्रियामादाय व्यवहारः प्रवर्तयितव्यः। यत्र तु मिथ्या- कारणोत्तरयोः कृत्स्नपक्षव्यापित्वं । यथा शृङ्गग्राहिकतया कश्चिद्वदति इयं गौर्मदीया अमुकस्मिन्काले नष्टा अद्यास्य गृहे दृष्टेति । अन्यस्तु मिथ्यैतत् एतत्प्रदर्शितकालात्पूर्व- मेवास्मद्गृहे स्थिता मम गृहे जाता वेति वदति । इदं तावत्पक्षनिराकरणसमर्थत्वान्ना- नुत्तरम् । नापि मिथ्यैव। कारणोपन्यासात् नापि कारणं एकदेशस्याभ्युपगमाभावात् तस्मात्सकारणं मिथ्योत्तरमिदम् ॥ अत्र च प्रतिवादिनः क्रिया । कारणे प्रतिवादि- नीति वचनात् ॥ ननु मिथ्याक्रिया पूर्ववाद इति पूर्ववादिनः कस्मात्क्रिया न भवति तस्य शुद्धमिथ्याविषयत्वात् । कारणे प्रतिवादिनीत्येतदपि कस्माच्छुद्धकारणविषयं न भवति । नैतत् । सर्वस्यापि कारणोत्तरस्य मिथ्यासहचरितरूपत्वात् । शुद्धकारणो- त्तरस्याभावात् ॥ प्रसिद्धकारणोत्तरे प्रतिज्ञातार्थैकदेशस्याभ्युपगमेनैकदेशस्य मिथ्या- त्वम् । यथा सत्यं रूपकशतं गृहीतं न धारयामि प्रतिदत्तत्वादिति । प्रकृतोदाहर- णे तु प्रतिज्ञातार्थैकदेशस्याभ्युपगमो नास्तीति विशेषः ।

एतच्च हारीतेन स्पष्टमुक्तम् । मिथ्याकारणयोर्वापि ग्राह्यं कारणमुत्तरमिति । यत्र मिथ्याप्राङ्न्याययोः पक्षव्यापित्वं यथा रूपकशतं धारयतीत्यभियोगे मिथ्यैतद- स्मिन्नर्थे पूर्वमयं पराजित इति । अत्रापि प्रतिवादिन एव क्रिया । प्राङ्न्यायकारणो- क्तौ तु प्रत्यर्थी निर्दिशेत्क्रियामिति वचनात्।शुद्धस्य प्राङ्न्यायस्याभावादनुत्तरत्वप्रसं- गात् संप्रतिपत्तेरपि साध्यत्वेनोपदिष्टस्य पक्षस्य सिद्धत्वोपन्यासेन साध्यत्वनिराकरणा- देवोत्तरत्वम् । यदा तु कारणप्राङ्न्यायसंकरः यथा शतमनेन गृहीतमित्यभियुक्तः प्र- तिवदति सत्यं गृहीतं प्रतिदत्तं चेत्यस्मिन्नेवार्थे प्राङ्न्यायेनायं पराजित इति । तत्र प्रतिवादिनो यथारुचीति न क्वचिद्वादिप्रतिवादिनोरेकस्मिन्व्यवहारे क्रियाद्वयप्रसंग इति निर्णयः ॥

## शाखा १० वी.

ह्याप्रमाणें वादीची अर्जी शुद्ध करून कागदावर लिहिल्यानंतर पुढें काय करावें तें सांगतो.

**मूळार्थ**— ज्यानें पूर्वोक्त वादीच्या फिर्यादीचा मजकूर ऐकिला अशा प्रतिवादीचें उत्तर वादीच्या समक्ष लिहवावें.

प्रतिवादीकडील उत्तर.

**टीकार्थ**— १ वादीच्या अर्जीचा अर्थ ज्यानें ऐकिला अशा प्रतिवादीचें उत्तर वादीच्या समक्ष लिहवावें. तें उत्तर वादीच्या वादाचें निराकरण होईल असें असलें पाहिजे.

प्रतिवादीकडील उत्तर कसें असलें पाहिजे.

**नारद**— " पक्षव्यापक, सारयुक्त, असंदिग्ध, अनाकुल, आणि अव्याख्यागम्य असें असेल तें सत् ( योग्य ) उत्तर असें विद्वान् म्हणतात." पक्षव्यापक ह्मणजे वादीच्या वादाचें निराकरण करण्याविषयीं समर्थ, सारयुक्त ह्मणजे न्यायसंमत, असंदिग्ध ह्मणजे

**संशयरहित**, अनाकुल ह्मणजे पूर्वापरविरोधरहित, अव्याख्यागम्य ह्मणजे अप्रसिद्ध श॰ व अनेक अर्थ उत्पन्न होतील अशा विभक्ति, समास किंवा अध्याहार यांहींकरून यु॰ नसणें तें अथवा अन्यदेशीय भाषेनें ज्याची व्याख्या करण्याचें प्रयोजन नाहीं तें. तें ॰त्तर चार प्रकारचें.

उत्तराचे प्रकार.

२ **सत्योत्तर, मिथ्योत्तर, कारणोत्तर, आणि प्राङ्न्यायोत्तर.** ( याविषयीं कात्यायनवचन ).

**कात्यायन**—**सत्योत्तर, मिथ्योत्तर, कारणोत्तर व पूर्वन्यायोत्तर** असें चार प्रकारचें उत्तर आहे.

३ **सत्योत्तराचें** उदाहरण—ह्या मनुष्याकडे माझे शंभर रुपये येणें आहेत अशी फिर्याद केली असतां मजकडे येणें आहेत खरे असें कबूल होणें.

**स्मृत्यन्तर**—वादीच्या फिर्यादीविषयीं कबूल होणें ह्याला सत्योत्तर ह्मटलें आहे.

४ **मिथ्योत्तराचें** उदाहरण—मी (ह्या मनुष्याचें) देणें लागत नाहीं.

**कात्यायन**—जर प्रतिवादी वादीच्या फिर्यादीचा अपन्हव करितो तर तें व्यवहारांत **मिथ्योत्तर** होय असें समजावें.

तें मिथ्योत्तर ( खालीं कात्यायनवचनांत सांगितल्याप्रमाणें ) चार प्रकारचें.

**कात्यायन**—१ ह्याची फिर्याद खोटी आहे; २ मला कांहींच माहीत नाहीं; ३ त्या वेळेस तेथें मी सन्निध नव्हतों; ४ त्या वेळीं माझा जन्महि नव्हता.

५ **कारणोत्तराचें**[1] उदाहरण—मी ह्याचें ( सोनें ) घेतलें होतें खरें परंतु तें परत दिलें असें ह्मणणें तें. अथवा मला ह्यानें दान दिलें असें म्हणणें.

**नारद**—वादीनें जो विषय लिहून दिला असेल त्याला प्रतिवादी कबूल करून कारण सांगतो तर तें **कारणोत्तर** ह्मटलें आहे.

६ **प्राङ्न्यायोत्तराचें**[2] उदाहरण—ह्या वादाविषयीं ह्या मनुष्यानें पूर्वीं मजवर फिर्याद केली होती, परंतु त्या वेळेस मी ह्याला व्यवहाररीतीनें पराजित केलें आहे, असें प्रतिवादीनें म्हणणें.

**कात्यायन**—व्यवहाररीतीनें पराजय केला असतां जर पुनः फिर्याद करितो तर ह्या वादांत ह्यास पूर्वीं मी पराजित केलें आहे असें जें उत्तर दिलें जातें तें **प्राङ्न्यायोत्तर** ह्मटलें आहे.

---

१ हें कारणोत्तर नुसतें नसतें. सत्योत्तरासहित किंवा मिथ्योत्तरासहित असतें. म्हणजे असें; वादीची फिर्याद कबूल करून योग्य कारणानें ती रद्द करणें, किंवा नाकबूल करून योग्य कारणानें रद्द करणें, किंवा नाकबूल करून तत्समर्थनार्थ कारण सांगणें. २ प्राङ्न्यायोत्तर मिथ्योत्तरास घेऊन असतें, एकटें राहत नाहीं.

### शाखा ११ वी.

ह्याप्रमाणें उत्तराचें लक्षण सांगितलें. उत्तराचे लक्षणांनीं विरहित असून जे उत्तरासारिखे भासतात ते उत्तराभास, हें अर्थसिद्ध आहे, तथापि ते स्मृत्यंतरीं (दुसऱ्या स्मृतींत) स्पष्टरीतीनें दाखविले आहेत, ते असेः—

उत्तराभासाचें स्वरूप.

**स्मृत्यंतर**–संदिग्ध, अप्रकृत, अत्यल्प, अतिभूरि, पक्षैकदेशव्यापि, व्यस्तपद, अव्यापि, निगूढार्थ, आकुल, व्याख्यागम्य, आणि असार असें उत्तर असेल तर तें स्वार्थसिद्धीविषयीं साधक होत नाहीं.

१ संदिग्ध–ह्यानें माझें सुवर्णशत[1] घेतलें अशी फिर्याद केली असतां उत्तर करितो कीं, खरें, परंतु सुवर्णशत घेतलें किंवा माषशत[2] घेतलें कोण जाणे.

२ अप्रकृत–शंभर सुवर्णाची फिर्याद केली असतां उत्तर शंभर पण घेतले आहेत.

३ अत्यल्प–शंभर सुवर्णाची फिर्याद असतां उत्तर, मी ह्याचे पांच सुवर्ण देणें आहेत.

४ अतिभूरि–सुवर्णशताची फिर्याद केली असतां उत्तर, दोनशें सुवर्ण देणें लागतों.

५ पक्षैकदेशव्यापि[3]–ह्याजकडे माझें सोनें, कापड इत्यादि येणें आहे, अशी फिर्याद केली असतां उत्तर, सोनें मात्र घेतलें, कापड घेतलें नाहीं.

६ व्यस्तपद[4]–ऋणादान इत्यादिकाची फिर्याद केली असतां दुसऱ्या रीतीनें उत्तर देणें. जसें; ह्यानें माझे शंभर रुपये घेतले आहेत अशी फिर्याद असतां उत्तर, ह्यानें मला मारिलें.

७ अव्यापि–देश, स्थान इत्यादि विशेषणांवांचून सांगणें. जसें; मध्यदेशांत काशी क्षेत्रीं पूर्व दिशेस माझें क्षेत्र आहे तें ह्यानें जबरीनें घेतलें आहे; अशी फिर्याद असतां उत्तर क्षेत्र अपहारिलें खरें.

८ निगूढार्थ–ह्यानें माझे शंभर सुवर्ण घेतले आहेत अशी फिर्याद केली असतां उत्तर काय? मी एकट्यानेंच घेतलें आहे? ह्मणजे अशा व्यंग्यार्थक भाषणानें प्राड्विवाक, सभ्य, किंवा वादी अथवा आणखी कोणी ह्यांनीं घेतलें असावें असा अर्थ निष्पन्न करणारें.

९ आकुल–ह्यानें माझें सुवर्णशत घेतलें आहे अशी फिर्याद असतां उत्तर, घेतलें खरें, परंतु मी त्याचें कांहीं लागत नाहीं; असें पूर्वापरविरुद्ध भाषण तें.

१० व्याख्यागम्य–दुर्बोध विभक्ति व समास यांहींकरून युक्त आणि अध्याहारसा-

---

१ उन्हाच्या कवडशामध्यें जें रज दृष्टिगोचर होतें त्याचें नांव त्रसरेणु, ते आठ त्रसरेणु म्हणजे १ लिक्षा, तीन लिक्षा म्हणजे एक राजसर्षप, तीन राजसर्षप म्हणजे एक गौर सर्षप, ते सहा सर्षप म्हणजे एक यव, तीन यव म्हणजे एक कृष्णल ( गुंज ), पांच कृष्णल म्हणजे एक माष, असे सोळा माष म्हणजे एक सुवर्ण. २ येथें माष म्हणजे वर सांगितलेल्या सुवर्णाचा सोळावा भाग. ३ पक्ष म्हणजे फिर्याद तिचा जो एक देश म्हणजे अंश त्यानें व्यापि म्हणजे त्याला अनुकूळ. म्हणजे अर्थ इतका कीं, सर्व फिर्यादींतल्या एका रकमेविषयीं मात्र कबूल होणें. ४ एका रीतीची फिर्याद असतां दुसऱ्याच रीतीनें उत्तर देणें तें.

पेक्ष, किंवा अन्यदेशभाषेनें दिलेलें तें. जसें; पित्यानें घेतलेले जे शंभर सुवर्ण त्याच्या फिर्यादींत घेतलेल्या शंभर वचनांहींकरून सुवर्णाच्या बापाला जाणत नाहीं, अशा तऱ्हेनें उत्तर सांगणें तें. ह्या वाक्याचा तात्पर्यार्थ असा आहे कीं, सुवर्णाचें शतक घेतलें, ह्मणजे शंभर सुवर्ण घेतले (ही गोष्ट) पित्याच्या वचनेंकडून मी जाणत नाहीं.

११ **असार**—म्हणजे न्यायविरुद्ध. जसें; ह्यानें माझे शंभर सुवर्ण व्याजीं घेतले पैकीं व्याजमात्र दिलें, मुद्दल दिलें नाहीं अशी फिर्याद असतां उत्तर, व्याज दिलें खरें, मुद्दल मी घेतलेंच नाहीं, असें न्यायविरुद्ध.

## शाखा १२ वी.

१ "उत्तर (लिहून घ्यावें) असा (१० व्या शाखेच्या १ ल्या अंकांत) एकवचनांत निर्देश केला आहे त्यावरूनच, अनेक प्रकारचीं उत्तरें मिश्रित करून दिलेलें उत्तर व्यर्थ आहे, असें सिद्ध झालें.

उत्तरांचा संकर.

**कात्यायन**—फिर्यादेच्या एकदेशीं **सत्योत्तर**, व एकदेशीं **कारणोत्तर**, आणि एकदेशीं **मिथ्योत्तर** असें असल्यास तें संकरामुळें अनुत्तर जाणावें. अनुत्तर होण्याचें कारणहि तोच सांगतो.

**कात्यायन**—एका वादांत दोन वादींचा पुरावा घेणें संभवत नाहीं, आणि एका वादांत उभयतांची (वादिप्रतिवादींची) अर्थसिद्धि होत नाहीं, व एकाकडून दोन क्रिया (म्हणजे दोन प्रकारचा पुरावा) घेतां येत नाहींत.

एकाच वादांत सदरहू पक्षकार ह्यांचा प्रमाणनिर्देश संभवत नाहीं.

२ मिथ्योत्तर, कारणोत्तर ह्या दोन प्रकारांचा एका फिर्यादींत संकर होईल तर वादी, व प्रतिवादी या उभयतांनींहि (आपापला) पुरावा दाखविला पाहिजे. ह्यास प्रमाण.

**नारद**—प्रतिवादीनें **मिथ्योत्तर** दिलें असतां **प्रमाण** (साक्षिलेखादि) दाखविणें वादीचें काम आहे, व **कारणोत्तर** दिलें असतां तें शाबीत करणें प्रतिवादीचें काम आहे.

ह्यास्तव एका फिर्यादींत वादिप्रतिवादींचा **प्रमाणोपन्यास** प्राप्त होईल, परंतु तो न्यायविरुद्ध आहे. जसें; ह्यानें माझे शंभर सुवर्ण व शंभर रुपये घेतले आहेत, अशी फिर्याद केली असतां **उत्तर**, (हें मिथ्या) सुवर्ण घेतलेंच नाहीं (असें प्रतिवादीनें मिथ्योत्तर दिल्यावर सुवर्ण घेतलें ह्याविषयीं **प्रमाण** दाखविणें हें वादीचें काम आहे.) व रुपये घेतले होते, पण परत दिले (अशा **कारणोत्तराविषयीं** प्रमाण दाखविणें हें प्रतिवादीचें काम आहे. ह्मणून एका वादांत वादी आणि प्रतिवादी या दोघांचा पुरावा घेणें विरुद्ध आहे.)

३ **कारणोत्तर** आणि **प्राङ्न्यायोत्तर** ह्यांचा संकर होईल तर दोन्ही उत्तरांचा पुरावा प्रतिवादीनेंच दाखविला पाहिजे. ह्यास प्रमाण.

---

१ म्हणजे फिर्यादींपैकीं एक अंश कबूल करणें, एका अंशांत कांहीं कारण दाखविणें, आणि एक अंश मिथ्या आहे असें सांगणें हें संकरोत्तर, तें यथायोग्य उत्तर होत नाहीं.

**व्यास**–**प्राङ्न्यायोत्तर** आणि **कारणोत्तर** ह्यांच्या संकरस्थळीं प्रतिवादीनेंच दोन्ही उत्तरांचा पुरावा करावा.

जसें; ह्यानें माझे शंभर सुवर्ण व शंभर रुपये घेतले आहेत अशी फिर्याद केली असतां प्रतिवादीनें **कारणोत्तर** दिलें कीं, शंभर सुवर्ण घेतले होते खरे पण परत दिले. हें प्रतिवादीनें साक्षी, पावती इत्यादिकेंकरून शाबीत करावें. आणि रुपयांविषयीं तर ह्यानें पूर्वींच फिर्याद केली होती तेव्हां न्यायरीतीनें मी ह्याला जिंकिलें आहे असें **प्राङ्न्यायोत्तर** दिलें तर तें जयपत्र ( निवाडापत्र ) किंवा तो पूर्वन्याय करणारे अधिकारी यांच्या कडून शाबीत करावें. असा दोहों उत्तरांचा विरोध समजावा.

तीन उत्तरांचा संकर.

४ जेथें तीन **उत्तरांचा** संकर असेल तेथेंहि ह्याप्रमाणेंच समजावें. जसें;–ह्यानें माझें सुवर्णशत व शंभर रुपये आणि कापड घेतलें आहे अशी फिर्याद केली असतां **उत्तर**, **सुवर्णशत** घेतलें आहे खरें, पण परत दिलें. (हें **कारणोत्तर**); रुपये घेतले नाहींत. ( हें **मिथ्योत्तर**), कापडाविषयीं तर पूर्वींच ह्यानें मजवर फिर्यादकेली होती त्या वेळेसच ह्याला मी जिंकिलें आहे. ( हें **प्राङ्न्यायोत्तर**.)

चार उत्तरांचा संकर.

५ ह्याप्रमाणें चार **उत्तरांच्या** ( **सत्योत्तर**, **मिथ्योत्तर**, **कारणोत्तर**, आणि **प्राङ्न्यायोत्तर** ह्यांच्या ) संकराविषयींहि समजावें. परंतु अशा प्रकारचीं संकर उत्तरें एक कालीं घडलीं तर तीं **अनुत्तरें** समजावीं. कारण, दरएक व्यवहाराचा पुरावा घेतल्यावांचून तो तो व्यवहार सिद्ध होत नाहीं. ( म्हणून तो तो पुरावा घेतला पाहिजे आणि तो तर एकदम घेतां येत नाहीं ).

६ अनुक्रमानें उत्तरें दिलीं असतां तीं उत्तरें होतात. परंतु तो अनुक्रम वादी, प्रतिवादी व सभासद ह्यांच्या इच्छेप्रमाणें समजावा.

दोहों उत्तरांचा संकर असतां ज्यांत मोठी रकम आहे त्याचा प्रथम निर्णय करावा.

७ ज्या स्थळीं दोन **उत्तरांचा** संकर असेल त्यांत **प्रभूतार्थविषय** जें उत्तर असेल त्याचा पुरावा घेऊन तो व्यवहार प्रथम पुरा करावा. नंतर **अल्पविषय** उत्तराचा पुरावा घेऊन व्यवहार चालवावा.

८ ज्या व्यवहारीं **सत्योत्तराचा** ( कबूलपणाचा ) आणि दुसऱ्या **उत्तराचा** संकर असेल तेथें दुसऱ्या जातीच्या उत्तराचा पुरावा घेऊन चौकशी करावी. कारण, **सत्योत्तर**स्थळीं पुरावा घेण्याचें प्रयोजन नाहीं. ह्यास प्रमाण.

हारीत–९ " **मिथ्योत्तर** व **कारणोत्तर** हीं एका व्यवहारांत असतील तर, अथवा **सत्योत्तर** आणि दुसरें **उत्तर** अशीं एका व्यवहारांत असतील तर पूर्वीं कोणतें **उत्तर** घेऊन व्यवहार पहावा, " अशी आकांक्षा घेऊन तिचें निवारणहि सांगतो. " जें ( **उत्तर** ) **प्रभूतार्थविषय** असेल, किंवा ज्यांत पुरावा घेऊन कार्यसिद्धि होत असेल तेंच त्या वादांत **असंकीर्ण** उत्तर समजावें. असें नसेल तें **संकीर्ण** उत्तर. " ह्मणून

१ संकीर्ण उत्तर म्हणजे ज्या उत्तरांत विषयाचें न्यूनाधिक्य नाहीं व ज्यांत पुरावा संदिग्ध आहे तें. तेथें इच्छेप्रमाणें अनुक्रम, म्हणजे वादिप्रतिवादी, सभासद ह्यांच्या इच्छेनें ठरेल तो अनुक्रम.

**संकीर्ण उत्तरस्थळीं** व्यवहारनिर्णयाविषयीं इच्छेप्रमाणें अनुक्रम घ्यावा असें तात्पर्य.

१० **प्रभूतार्थविषय** ह्मणजे असें,—ह्यानें सोनें, शंभर रुपये आणि कापड असें माझें देणें आहे; अशी फिर्याद केली असतां सोनें व रुपये घेतले नाहींत असें **मिथ्योत्तर** दिलें, आणि कापड घेतलें होतें तें परत दिलें, असें **कारणोत्तर** दिलें तर ह्या उत्तरांमध्यें **मिथ्योत्तर प्रभूतार्थविषय** आहे ह्मणून वादीकडील पुरावा घेऊन प्रथमतः चौकशी चालवावी. नंतर कापडाविषयींचा (**कारणोत्तराविषयींचा**) व्यवहार चालवावा. ह्याप्रमाणें **मिथ्योत्तर** आणि **प्राङ्न्यायोत्तर** ह्यांच्या संकरस्थळीं, आणि **कारणोत्तर** व **प्राङ्न्यायोत्तर** ह्यांच्या संकरस्थळीं ही योजना करावी.

११ त्याच ( १० व्या अंकांत सांगितलेल्या ) फिर्यादींत, सोनें व रुपये घेतले खरे, देईन. ( हें **सत्योत्तर** ); कापड तर घेतलेंच नाहीं. ( हें **मिथ्योत्तर** ); अथवा परत दिलें. ( हें **कारणोत्तर** ); किंवा कापडाच्या वादाविषयीं ह्याला मी पूर्वींच जिंकिलें आहे. ( हें **प्राङ्न्यायोत्तर** ) अशा प्रकारच्या उत्तरांच्या संकरस्थळीं **सत्योत्तर** जरी प्रभूतार्थविषय आहे, तरी त्याला प्रमाणाची ( पुराव्याची ) गरज नाहीं, ह्मणून मिथ्योत्तरादिकांचा पुरावा ( साक्षिलेख्यादि ) घेऊन चौकशी करावी.

१२ ज्या व्यवहारीं **मिथ्योत्तर** आणि **कारणोत्तर** हीं सर्व फिर्यादीस लागू आहेत.

सकारण मिथ्योत्तराविषयीं उदाहरण.

म्हणजे असें, गाईचें शिंग धरून कोणी एक ह्मणतो, ही गाय माझी, अमुक वेळेस नाहींशी झाली होती, ती आतां ह्याच्या घरीं पाहिली. प्रतिवादी ह्मणतो, ही गोष्ट खोटी ( हें **मिथ्योत्तर** व ह्याचें साधक **कारणोत्तर** कां ) ह्यानें सांगितलेल्या वेळेच्या पूर्वींच माझ्या घरीं होती किंवा माझ्या घरींच ही जन्मली. अशा स्थळीं हें **उत्तर** प्रतिज्ञेचें निराकरण करण्याविषयीं समर्थ आहे म्हणून ह्याला अनुत्तर ह्मणतां येत नाहीं, व मिथ्योत्तरहि ह्मणतां येत नाहीं. **कारण**, एथें प्रतिवादीनें **क्रियोपन्यास** केला आहे ह्मणून **कारणोत्तर**हि ह्मणतां येत नाहीं. कां कीं, **कारणोत्तरस्थळीं** प्रथमतः **सत्योत्तर** असलें पाहिजे, तसें एथें नाहीं. ह्यास्तव **अशा उत्तरास सकारण मिथ्योत्तर** ह्मणावें. अशा ठिकाणीं प्रतिवादीकडून पुरावा घ्यावा. **कारण, कारणोत्तरस्थळीं** प्रतिवादीकडून पुरावा असावा असें स्मृतिवचन आहे ह्मणून.

**शंका**– " मिथ्योत्तरस्थळीं वादीनें पुरावा करावा " ह्या स्मृतिवचनावरून (१२ व्या अंकांत ) वादीकडून पुरावा कां घेऊं नये असें ह्मणाल तर तसें नाहीं. कारण, तें स्मृतिवचन शुद्धमिथ्योत्तरविषयक आहे आणि येथलें ( १२ व्या अंकांतलें ) **शुद्धमिथ्योत्तर** नव्हे. बरें " **कारणोत्तरस्थळीं** प्रतिवादीनें प्रमाण (पुरावा) दाखवावें. " हेंहि वचन **शुद्धकारणोत्तर**विषयक कां ह्मणूं नये?

१४ **समाधान**– तुमची शंका नीट नाहीं; कारण, कोणतेंहि **कारणोत्तर** मिथ्योत्तरावांचून राहत नाहीं. ह्मणून **शुद्धकारणोत्तर** कोठेंच मिळणार नाहीं. जें प्रसिद्ध **कारणोत्तर** पूर्वी ( १० व्या शाखेच्या ५ व्या अंकांत) सांगितलें तेथेंहि वादीच्या फिर्यादीचा एकदेशीं सत्योत्तरानें स्वीकार केल्यानेंच अर्ध्या पक्षाला **मिथ्योत्तरत्व** येतें. ह्मणजे असें;–शंभर

रुपये घेतले खरे, ( हें **सत्योत्तर** ) परंतु आतां देणें नाहींत ( हें **मिथ्योत्तर** ) कारण, परत दिले ( हें **कारणोत्तर** ).

१९ प्रकृत उदाहरणीं ( १२ व्या अंकांतील गाईच्या वादाविषयीं ) वादीच्या फिर्यादींतून कोणताच अंश प्रतिवादी कबूल करीत नाहीं, इतकाच ( प्रसिद्ध **कारणोत्तराहून** ) विशेष आहे.

**हारीतानेंहि** हेंच स्पष्ट करून सांगितलें आहे कीं, **मिथ्योत्तर** आणि **कारणोत्तर** ह्यांच्या संकरस्थळीं **कारणोत्तर** घेऊन वाद चालवावा. ज्या वादांत **मिथ्योत्तर** आणि **प्राङ्न्यायोत्तर** हीं फिर्यादीच्या सर्वांशीं व्यापक आहेत. जसें, यानें माझे शंभर रुपये घेतले आहेत ( ते देववावे ) अशी फिर्याद केली असतां ( **उत्तर** ) ही गोष्ट मिथ्या आहे. ( हें **मिथ्योत्तर** ) ह्याचें साधक **प्राङ्न्यायोत्तर**, यानें पूर्वी मजवर या दाव्याविषयीं फिर्याद केली होती तेव्हां मी याला जिंकिलें आहे, अशा स्थळींहि प्रतिवादीकडूनच पुरावा झाला पाहिजे. ह्यास प्रमाण.—

**स्मृत्यंतर– प्राङ्न्यायोत्तर** आणि **कारणोत्तर** दिलें असतां त्याचा पुरावा प्रतिवादीनें करावा.

ह्या वचनांत **प्राङ्न्यायोत्तर** व **कारणोत्तर** असतां प्रतिवादीकडून पुरावा घ्यावा इतकें आहे.

परंतु **प्राङ्न्यायोत्तर** कधींहि **मिथ्योत्तरावांचून** नसतें यास्तव **मिथ्योत्तर** आणि **प्राङ्न्यायोत्तर** ह्यांच्या संकरस्थळीं प्रतिवादीकडूनच पुरावा घ्यावा असें ह्या वचनावरून जाणावें. जर असें न ह्मणतां **शुद्ध प्राङ्न्यायोत्तरासच** हें वचन लागू आहे असें मानावें तर **शुद्ध प्राङ्न्यायोत्तर** मुळींच नसतें म्हणून तें अनुत्तरच होईल.

**सत्योत्तरांत** वादीच्या फिर्यादीचा स्वीकार केल्यानेंच त्याच्या वादाचें निराकरण होतें म्हणून **सत्योत्तरहि** उत्तरांत मोजलें आहे.

१६ **कारणोत्तर** आणि **प्राङ्न्यायोत्तर** ह्यांचा जेथें संकर आहे. म्हणजे असें;—ह्यानें माझे शंभर रुपये घेतले आहेत असी फिर्याद केली असतां प्रतिवादी **उत्तर** देतो, घेतले खरे, पण परत दिले, व ह्या वादाविषयीं पूर्वींच मीं ह्याला न्यायानें जिंकिलें आहे. अशा वादांत प्रतिवादीच्या इच्छेप्रमाणें पुरावा होतो. यास्तव कोणत्याहि व्यवहारीं एका वादांत वादी आणि प्रतिवादी ह्या दोघांच्या तर्फेचा पुरावा घेण्याचा प्रसंग कदापि येणारा नाहीं असा निर्णय झाला.

कारणोत्तर व प्राङ्न्यायोत्तर ह्यांचा संकर.

---

१ नवव्या शाखेच्या दुसऱ्या अंकांत व दहाव्या शाखेच्या पहिल्या अंकांत जो उत्तरशब्दाचा अर्थ सांगितला आहे तो सत्योत्तरांत संभव नाहीं. म्हणून सत्योत्तर उत्तरच नाहीं, अशी शंका उपस्थित झाली तिचें निवारण सांगितलें.

## ततोऽर्थी लेखयेत्सद्यः प्रतिज्ञातार्थसाधनम् ॥ ७ ॥

एवमुत्तरे पत्रे निवेशिते साध्यसिद्धेः साधनायत्तत्वात्साधननिर्देशं कः कुर्यादित्यपेक्षित आह । तत उत्तरानंतरमर्थी साध्यवान् सद्य एवानन्तरमेव लेखयेत् । प्रतिज्ञातः साध्यः स चासावर्थश्चेति प्रतिज्ञातार्थः तस्य साधनं साध्यतेऽनेनेति साधनं प्रमाणम् । अत्र सद्यो लेखयेदिति वदतोत्तराभिधाने कालविलंबनमप्यङ्गीकृतमिति गम्यते । तच्चोत्तरत्र विवेचयिष्यते । अर्थी प्रतिज्ञातार्थसाधनं लेखयेदिति वदता यस्य साध्यमस्ति स प्रतिज्ञातार्थसाधनं लेखयेदित्युक्तं अतश्च प्राङ्न्यायोत्तरे प्राङ्न्यायस्यैव साध्यत्वात्प्रत्यर्थ्येवार्थी ज्ञात इति स एव साधनं लेखयेत् । कारणोत्तरेऽपि कारणस्यैव साध्यत्वात्कारणवाद्येवार्थीति स एव लेखयेत् । मिथ्योत्तरे तु पूर्ववाद्येवार्थी स एव साधनं निर्दिशेत् । तथार्थी लेखयेदिति वदता अर्थ्येव लेखयेन्नान्य इत्युक्तम् । अतश्च संप्रतिपत्त्युत्तरे साध्याभावेन भाषोत्तरवादिनोर्द्वयोरप्यर्थित्वाभावात्साधननिर्देश एव नास्तीति तावतैव व्यवहारः परिसमाप्यत इति गम्यते ।

एतदेव हारीतेन स्पष्टमुक्तम् । प्राङ्न्यायकारणोक्तौ तु प्रत्यर्थी निर्दिशेत्क्रियाम् । मिथ्योक्तौ पूर्ववादी तु प्रतिपत्तौ न सा भवेदिति ॥ ७ ॥

### शाखा १२ वी.

ह्याप्रमाणें प्रतिवादीचें उत्तर पत्रावर लिहून घेतल्यानंतर दाव्याची शाबिती पुराव्याच्या स्वाधीन आहे ह्मणून पुरावा कोणी दाखवावा हें ( अर्ध्या वचनानें ) सांगतो.

**मूलार्थ**– नंतर वादीनें आपल्या वादाचा पुरावा तत्काळ लिहून द्यावा.

**टीकार्थ**– १ प्रतिवादीचें उत्तर (जबाब) लिहून घेतल्यावर वादीनें आपल्या वादाचा जो ( साक्षिलेख्यादि ) पुरावा असेल तो तत्काळ लिहून द्यावा.

वादीकडील पुरावा.

येथें ( मूळवचनांत ) "तत्काळ लिहून द्यावा" असें सांगितल्यावरून प्रतिवादीला उत्तर लिहून देण्यास कदाचित् कालविलंब लागला तरी चालेल असें सुचविलें जातें. हें पुढें ( २ ऱ्या प्रकरणाच्या ३ ऱ्या शाखेच्या ९ व्या अंकांत ) स्पष्ट सांगितलें आहे.

२ वादीनें " आपल्या वादाचा (साक्षिलेख्यादि) पुरावा लिहून द्यावा." असें (मूळवचनांत ) सांगितल्यावरून वादी किंवा प्रतिवादी कोणीहि असो, ज्याला जें सिद्ध करावयाचें असेल तें त्यानें सिद्ध करण्यासाठीं **प्रमाण** लिहून द्यावें असें दर्शविलें.

वादीशब्देंकरून ज्याला जें साध्य करावयाचें आहे तो घ्यावा.

३ ह्यास्तव **प्राङ्न्यायोत्तर**स्थळीं प्रतिवादीनें आपलें **प्राङ्न्यायोत्तर** सिद्ध करण्यासाठीं तत्साधक ( निवाडापत्रक इत्यादिक ) प्रमाण दाखविलें पाहिजे.

प्राङ्न्यायोत्तरस्थळी प्रतिवादीचा पुरावा घ्यावा.

कारणोत्तरस्थळींहि प्रतिवादीकडून पुरावा घ्यावा.

४ तसेंच **कारणोत्तरस्थळीं**हि प्रतिवादीनेंच आपलें **कारणोत्तर** सिद्ध करण्याचा जो पुरावा असेल तो दाखविला पाहिजे.

मिथ्योत्तरस्थळीं वादीकडून पुरावा घ्यावा.

५ **मिथ्योत्तरस्थळीं** तर वादीनेंच पुरावा दाखविला पाहिजे.

६. "वादीनें लिहून द्यावा." असें ( मूळवचनांत ) सांगितल्यावरून, जो वादी त्यापासून पुरावा लिहून घ्यावा, दुसऱ्याकडून लिहून घेऊं नये असें सुचविलें.

७ ह्यास्तव **सत्योत्तरस्थळीं** सत्योत्तरानेंच व्यवहार सिद्ध झाल्यामुळें वादी आणि

सत्योत्तरस्थळीं पुराव्याची गरज नाहीं.

प्रतिवादी ह्या दोघांसही कांहींच सिद्ध कर्तव्य नाहीं, ह्मणून प्रमाणाची ( पुराव्याची ) गरज उभय पक्षींहि नाहीं. ह्यास्तव तितक्यानेंच व्यवहार समाप्त होतो असें सिद्ध झालें.

हारीतही हेंच स्पष्ट करून दाखवितो कीं, **प्राङ्न्यायोत्तरस्थळीं** आणि **कारणोत्तरस्थळीं** प्रतिवादीनें पुरावा दाखविला पाहिजे, व **मिथ्योत्तरस्थळीं** वादीनें पुरावा दाखवावा. **सत्योत्तरस्थळीं** पुरावा दाखविण्याची गरज नाहीं. ७

---

## तत्सिद्धौ सिद्धिमाप्नोति विपरीतमतोऽन्यथा ।

ततः किमित्यतआह । तस्य साधनस्य प्रमाणस्य वक्ष्यमाणलिखितसाक्ष्यादिलक्ष्यलक्षणस्य सिद्धौ निवृत्तौ सिद्धिं साध्यस्य जयलक्षणां प्राप्नोति । अतोस्मात्प्रकारादन्यथा प्रकारांतरे साधनासिद्धौ विपरीतं साध्यस्यासिद्धिं पराजयलक्षणामाप्नोतीति संबन्धः ।

### पुढें काय करावें तें सांगतो.

**मूलार्थ–** प्रमाणाची सिद्धि झाल्यास जय पावतो. नाहीं तर पराजय पावतो.

**टीकार्थ–** ८ नंतर पुढें ( ५ व्या आणि ६ व्या प्रकरणांत ) सांगितलेल्या साक्षिलेख्यादि प्रमाणांचा पुरावा झाल्यास व्यवहारांत जय पावतो. पुरावा न झाल्यास पराजय पावतो.

पुरावा झाल्यास जय, नाहीं तर पराजय.

## चतुष्पाद्व्यवहारोऽयं विवादेषूपदर्शितः ॥ ८ ॥

एवं व्यंवहाररूपमभिधायोपसंहरति । व्यवहारान्नृपः पश्येदित्युक्तो व्यवहारः सोऽयमित्थं चतुष्पाचतुरंशकल्पनया विवादेषु ऋणादानादिषूपदर्शितो वर्णितः । तत्र प्रत्यर्थिनोऽग्रतो लेख्यं इति भाषापादः प्रथमः । श्रुतार्थस्योत्तरं लेख्यमित्युत्तरपादो द्वितीयः । ततोर्थी लेखयेत्सद्य इति क्रियापादस्तृतीयः । तत्सिद्धौ सिद्धिमाप्नोतीति साध्यसिद्धपादश्चतुर्थः । यथोक्तम् । परस्परं मनुष्याणां स्वार्थविप्रतिप-

त्तिषु । वाक्यन्यायाद्व्यवस्थानं व्यवहार उदाहृतः । भाषोत्तरक्रियासाध्यसिद्धिभिः क्रमवृत्तिभिः । आक्षिप्तचतुरंशस्तु चतुष्पादभिधीयत इति । संप्रतिपत्त्युत्तरे तु साधनानिर्देशाद्भाषार्थस्यासाध्यत्वाच्च न साध्यसिद्धिलक्षणः पादोस्तीति द्विपात्त्वमेव उत्तराभिधानानन्तरं सभ्यानामर्थिप्रत्यर्थिनोः कस्य क्रिया स्यादिति परामर्शलक्षणस्य मत्याकलितस्य योगीश्वरेण व्यवहारपादत्वेनानभिधानात् व्यवहर्तुः संबन्धाभावाच्च न व्यवहारपादत्वमिति स्थितं ॥ इति व्यवहारमातृका ॥ ८ ॥

ह्याप्रमाणें ( आरंभापासून एथपर्यंत ) व्यवहारांचें स्वरूप सांगून (ह्या प्रकरणाचा) उपसंहार करितो.

**मूलार्थ**– असा हा विवादांविषयीं चतुष्पाद व्यवहार दाखविला आहे.

व्यवहाराचे चार अंश.

**टीकार्थ**– ९ ( ऋणादान इत्यादि ) " व्यवहार राजानें पाहावे " असें ( १ ल्या शाखेच्या दुसऱ्या अंकांत ) सांगितलें. हा व्यवहार **चतुष्पाद** ह्मटला आहे, ह्मणजे त्याचे चार **पाद** आहेत. ते असे;–फिर्याद, जबानी ( ७ व्या शाखेचा १ ला अंक ) हा **प्रथम पाद**. प्रतिवादीचें उत्तर लिहून घेणें ( १० व्या शाखेचा १ अंक ) हा **दुसरा पाद**. वादीनें पुरावा लिहून देणें ( १३ व्या शाखेचा १ अंक ) हा **तिसरा पाद**. जय किंवा पराजय ( १३ व्या शाखेचा ८ वा अंक ) हा **चौथा पाद**. ह्याप्रमाणें हा **चतुष्पाद व्यवहार ऋणादान** इत्यादि सर्व वादांविषयीं जाणावा.

**स्मृति**–" मनुष्य स्वार्थाविषयीं परस्पर विवाद करीत असतां न्यायेंकरून व वचनेंकरून यथार्थ निर्णय करणें तो व्यवहार ह्मटला आहे.

असा जो व्यवहार त्याचे चार अंश ह्मणजे फिर्याद, उत्तर, पुरावा आणि निर्णय असे चार पाद आहेत, ह्मणून हा चतुष्पाद ह्मटला आहे.

सत्योत्तरस्थळीं व्यवहाराचे दोन पाद.

१० **सत्योत्तरस्थळीं** व्यवहाराचे दोनच पाद संभवतात. कारण. तेथें प्रमाणनिर्देशाची (पुराव्याची) गरज नाहीं. आणि पुराव्याकडून वादाची सिद्धिहि नाहीं.

उत्तर दिल्यानंतर वादीप्रतिवादींतून कोणी पुरावा दाखवावा ह्याविषयीं सभासदांनीं विचार करण्याची गरज नाहीं. कारण, वादिप्रतिवादींतून कोणी प्रमाण (पुरावा) दाखवावें हें उत्तरावरूनच अवगत होतें, ह्मणून याज्ञवल्क्यानें परामर्शाची गणना व्यवहाराचे वादांत केली नाहीं. व त्यांत व्यवहार करणारांचा संबंधहि नाहीं. अतएव व्यवहाराचे अंशांत परामर्शाची गणना नको असें सिद्ध झालें.

# असाधारण व्यवहारमातृका.

## प्रकरण २ रें.

### अभियोगमनिस्तीर्य नैनं प्रत्यभियोजयेत् ॥

एवं सर्वव्यवहारोपयोगिनीं व्यवहारमातृकामभिधायाधुना क्वचिद्व्यवहारविशेषे कंचिद्विशेषं दर्शयितुमाह । अभियुज्यत इति अभियोगोऽपराधः तमभियोगमनिस्तीर्य अपरिहृत्य एनमभियोक्तारं न प्रत्यभियोजयेत् अपराधेन न संयोजयेत् । यद्यपि प्रत्यवस्कन्दनं प्रत्यभियोगरूपं तथापि स्वापराधपरिहारात्मकत्वात् नास्य प्रतिषेधविषयत्वम् । अतः स्वाभियोगानुपमर्दनरूपस्य प्रत्यभियोगस्यायं निषेधः ।

शाखा १ ली.

ह्याप्रमाणें सर्व व्यवहारांस उपयोगी अशी साधारण व्यवहारमातृका सांगून सांप्रत व्यवहारांचे विशेषनिर्णय दाखविणारी अशी असाधारण व्यवहारमातृका सांगतो.

मूलार्थ—प्रतिवादीनें फिर्यादींतून पार पडल्यावांचून वादीवर उलट फिर्याद करूं नये.

प्रतिवादीनें उलट फिर्याद करूं नये.

टीकार्थ—१ प्रथमतः वादीनें जी आपल्यावर फिर्याद केली असेल तिचें निराकरण केल्यावांचून प्रतिवादीनें उलट फिर्याद करूं नये.

२ जरी कारणोत्तर उलट फिर्यादरूपिच असेल, तरी एथें जो उलट फिर्यादीविषयीं निषेध सांगितला, तो आपल्या वरच्या फिर्यादीचें निराकरण करणारें असें उलट फिर्यादरूपि जें कारणोत्तर त्याविषयीं नव्हे, तर आपल्या वरील फिर्यादीचें निराकरण न करणारी जी केवल उलट फिर्याद तिजविषयीं हा निषेध आहे असें समजावें.

### अभियुक्तं च नान्येन नोक्तं विप्रकृतिं नयेत् ॥ ९ ॥

इदं प्रत्यर्थिनमधिकृत्योक्तम् । अथ अर्थिनं प्रत्याह । अभियुक्तं च नान्येनेति । अन्येनाभियुक्तमनिस्तीर्णाभियोगमन्योऽर्थी नाभियोजयेत् । किंच । उक्तमावेदनसमये यदुक्तं तद्विप्रकृतिं विरुद्धभावं न नयेत् न प्रापयेत् । एतदुक्तं भवति । यद्वस्तु येन रूपेणावेदनसमये निवेदितं तद्वस्तु तथैव भाषाकालेऽपि लेखनीयं नान्यथेति । ननु प्रत्यर्थिनोऽग्रतो लेख्यं यथावेदितमर्थिनेत्यत्रैवेदमुक्तं किमर्थं पुनरुच्यते नोक्तं विप्रकृ-

---

१ ह्यानें माझे शंभर रुपये घेतले आहेत अशी कोणी फिर्याद केली असतां, प्रतिवादी उत्तर देतो, रुपये घेतले होते खरे ( हें सत्योत्तर ), पण परत दिले ( हें कारणोत्तर ) असें जें पूर्वीं सांगितलें कारणोत्तर त्याविषयींहि वरचा निषेध लागू पडतो, वास्तव कारणोत्तरास उत्तरत्व येणार नाहीं, अशी उत्थाप्याकांक्षा घेऊन समाधान करितो. सुबोधिनी.

तिं नयेदिति । उच्यते । यथावेदितमर्थिनेत्यनेनावेदनसमये यद्वस्तु निवेदितं तदेव भाषासमयेऽपि तथैव लेखनीयं एकस्मिन्नपि पदे न वस्त्वन्तरमित्युक्तम् । यथानेन रूपकशतं वृद्ध्या गृहीतमित्यावेदनसमये प्रतिपाद्य प्रत्यर्थिसन्निधौ भाषासमये वस्त्रशतं वृद्ध्या गृहीतमिति न वक्तव्यम्। तथा सति पदान्तरागमनेऽपि वस्त्वन्तरगमनाद्धीनवादी दण्ड्यः स्यादिति । नोक्तं विप्रकृतिं नयेदित्यनेनैकवस्तुत्वेऽपि पदान्तरगमनं निषिद्धयते । यथा रूपकशतं वृद्ध्या गृहीत्वायं न प्रयच्छतीत्यावेदनकालेऽभिधाय भाषाकाले रूपकशतं बलादपहृतवानिति वदतीति । तत्र वस्त्वन्तरगमनं निषिद्धमिह तु पदान्तरगमनं निषिद्धयत इति न पौनरुक्त्यं ॥ एतदेव स्पष्टीकृतं नारदेन । पूर्वपादं परित्यज्य योऽन्यमालंबते पुनः। पदसंक्रमणाज्ज्ञेयो हीनवादी स वै नर इति । हीनवादी दण्ड्यो भवति । न प्रकृतादर्थाद्धीयते अतः प्रत्यर्थिनोऽर्थिनश्च प्रमादपरिहारार्थमेवायमभियोगमनिस्तीर्येत्याद्युपदेशो न प्रकृतार्थसत्यसिद्धिविषयः । अत एव वक्ष्यति । छलं निरस्य भूतेन व्यवहारान्नयेन्नृप इति । एतच्चार्थव्यवहारे द्रष्टव्यम् । मन्युकृते तु व्यवहारे प्रमादाभिधाने प्रकृतादपि व्यवहाराद्धीयत एव ॥ यथाह नारदः । सर्वेष्वर्थविवादेषु वाक्छलेनावसीदति । परस्त्रीभूम्यृणादाने शास्योऽप्यर्थान्न हीयत इति । अस्यार्थः । सर्वेष्वर्थविवादेषु न मन्युकृतेषु वाक्छले प्रमादाभिधानेऽपि नावसीदति न पराजीयते । न प्रकृतादर्थाद्धीयते इत्यर्थः । अत्रोदाहरणं परस्त्रीत्यादि । परस्त्रीभूम्यृणादाने प्रमादाभिधानेन दण्ड्योऽपि यथा प्रकृतादर्थान्न हीयते एवं सर्वेष्वर्थविवादेष्विति । अर्थविवादग्रहणान्मन्युकृतविवादेषु प्रमादाभिधाने प्रकृतादप्यर्थाद्धीयत इति गम्यते। यथाहमनेन शिरसि पादेन ताडित इत्यावेदनसमये अभिधाय भाषाकाले हस्तेन पादेन वा ताडित इति वदन्न केवलं दण्ड्यः पराजीयते च ॥ ९ ॥

वरचा प्रकार ( १ अंक ) प्रतिवादीविषयीं सांगितला. आतां वादीविषयीं सांगतो.

**मूलार्थ**—एकानें ज्याच्या वर फिर्याद केली आहे त्याच्या वर दुसऱ्यानें फिर्याद करूं नये, आणि पूर्वी जें ( फिर्यादींत ) निवेदन केलें असेल त्याला विरोध आणूं नये.

एका प्रतिवादीवर दुसऱ्या वादीनें फिर्याद करूं नये.

**टीकार्थ**—३ एकानें ज्यावर फिर्याद केली त्या फिर्यादींतून तो पार पडल्यावांचून दुसऱ्या वादीनें त्यावर फिर्याद करूं नये.

४ आणि वादीनें प्रथमतः ( फिर्यादींत ) जें निवेदन केलें असेल त्यास त्यानें विरोध आणूं नये. म्हणजे असें;—जी वस्तु ज्या प्रकारानें फिर्यादींत निवेदिली असेल तसीच जबानींत लिहून द्यावी; विपरीत लिहून देऊं नये.

९ शंका—वादीनें जितकें निवेदन केलें असेल तितकें प्रतिवादीच्या समक्ष लिहून द्यावें, असें (१ ल्या प्रकरणाच्या सातव्या शाखेच्या १ ल्या अंकांत) सांगितलेंच आहे. मग पुनः एथें सांगण्याचें प्रयोजन काय ?

एका फिर्यादींत अनेक वस्तूंचा निवेश नसावा.

६ **समाधान**—पहिल्या प्रकरणाच्या ७ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत फिर्यादींत जी वस्तु लिहून दिली असेल तीच वस्तु जबानींत लिहून द्यावी. ह्मणजे असें;—एका प्रकरणांत ( ऋणादानादिकांत )हि निरनिराळ्या वस्तु लिहून देऊं नयेत, असें सांगितलें आहे.

जसें; ह्यानें मजपासून १०० रुपये व्याजीं घेतले आहेत अशी फिर्याद करून प्रतिवादीच्या समक्ष जबानींत लिहून देतेसमयीं १०० पागोटीं व्याजीं घेतलीं आहेत असें लिहून देऊं नये. दिलें असतां जरी एका प्रकरणांत ( ऋणादिकांत ) दुसरें प्रकरण ( साहसादिक ) प्रविष्ट होत नाहीं; तथापि वस्तुभेद झाल्यामुळें तो **हीनवादी** ठरला सबब तो दंडास पात्र होतो.

एका फिर्यादींत दोन प्रकरणें नसावींत.

७ आणि येथें ( ४थ्या अंकांत ) तर "वादीनें प्रथमतः निवेदन केलें असेल त्यास विरोध आणूं नये." ह्या वचनावरून वस्तुभेद नसला तरी त्यांत प्रकरणभेदाचा निवेश नसावा, असें जाणावें. जसें;—ह्यानें माझे शंभर रुपये व्याजीं घेतले आहेत, ते हा देत नाहीं, अशी ऋणादान ( दिवाणी ) प्रकरणीं फिर्याद करून जबानींत लिहून देते वेळेस, ह्यानें मजपासून १०० रुपये जबरीनें घेतले आहेत असें साहस ( फौजदारी ) प्रकरणीं बोलतो, तर असें बोलूं नये.

तात्पर्य तेथें ( १ ल्या प्रकरणाच्या ७ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) फिर्यादींत व जबानींत वस्तुभेद करूं नये, असा निषेध सांगितला. आणि येथें ( चालत्या शाखेच्या ४ थ्या अंकांत ) **प्रकरणभेद** निषेधिला म्हणून **पुनरुक्तिदोष** येत नाहीं. हाच प्रकार नारदानें स्पष्ट केला आहे.

**नारद**— पूर्वीचा वाद सोडून जो ( मनुष्य ) पुनः दुसऱ्या वादाचा स्वीकार करितो, त्यानें भिन्नवादाचा आश्रय केल्यामुळें तो **हीनवादी** जाणावा.

८ **हीनवादी** ठरला यास्तव दंडास पात्र होतो, परंतु चालल्या वादापासून भ्रष्ट होत नाहीं. म्हणून प्रतिवादी व वादी ह्यांकडून गफलत होऊं नये, एतदर्थच हा ( १ ल्या व ३ ऱ्या व ४ थ्या अंकांत सांगितलेला ) उपदेश आहे; चालत्या वादाचा जय किंवा अपजय ह्याविषयीं सांगितला नाहीं. ह्याच कारणास्तव पुढें ( ६ व्या शाखेंतील १ ल्या अंकाचे वचनांत) सांगितलें आहे कीं, "**राजानें व्यवहारांत** कपट असेल तें काढून वास्तवार्थास अनुसरून वादाचा निर्णय करावा."

९ परंतु हा प्रकार ( ८ वा अंक ) धनव्यवहारीं ( दिवाणी कामांत ) जाणावा. क्रोधमूलक व्यवहारीं ( फौजदारी प्रकरणीं ) प्रमादानें बोलण्यांत विपर्यास पडला असतां चालत्या वादांतूनहि भ्रष्ट होतोच. ह्यास प्रमाण.

---

१ चालत्या शाखेचा ४ था अंक व १ ल्या प्रकरणाच्या ७ व्या शाखेचा १ ला अंक ह्या दोहोंचा अर्थ एकच भासतो म्हणून पुनरुक्तिदोष आला त्याचें निवारण केलें.

नारद– सर्वप्रकारच्या धनव्यवहारीं कदापि कृत्रिमानें भाषणविपर्यास घडेल तर त्या वादांत पराजय पावत नाहीं. जसें; परस्त्री, भूमि, ऋणादान ह्या व्यवहारांत प्रमादानें भाषणांत विपर्यास पडला असतां दंडास योग्य होतो, परंतु तो त्या वादापासून पराजित होत नाहीं.

ह्याप्रमाणेंच सर्व धनव्यवहारांविषयीं समजावें. ह्या वचनांत "धनव्यवहारीं" असें ह्मटलें आहे ह्मणून अर्थात् क्रोधनिमित्तक व्यवहारीं प्रमादानें भाषणविपर्यास घडला असतां तो दंडास पात्र होऊन चालत्या वादापासूनहि भ्रष्ट होतो, असें सूचित केलें.

जसें; ह्यानें माझ्या मस्तकावर लात मारिली असें फिर्यादींत (अर्जींत) लिहून देऊन जबानींत लिहून देते वेळेस हातानें पायांवर मारिलें असें बोलणारा केवळ दंडासच पात्र होतो असें नाहीं; तर तो त्या वादापासूनहि पराजित होतो. ९

## कुर्यात्प्रत्यभियोगं च कलहे साहसेषु च ॥

अभियोगमनिस्तीर्य नैनं प्रत्यभियोजयेदित्यस्यापवादमाह । कलहे वाग्दण्डपारुष्यात्मके साहसेषु विषशस्त्रादिनिमित्तप्राणव्यापादनादिषु । प्रत्यभियोगसंभवे स्वाभियोगमनिस्तीर्याप्यभियोक्तारं प्रत्यभियोजयेत् । नन्वत्रापि पूर्वपक्षानुपमर्दनरूपत्वेनानुत्तरत्वात्प्रत्यभियोगस्य प्रतिज्ञान्तरत्वे युगपद्व्यवहारासंभवः समानः । सत्यं । नात्रयुगपद्व्यवहाराय प्रत्यभियोगोपदेशः अपि तु न्यूनदण्डप्राप्तये अधिकदण्डनिवृत्तये वा । तथा हि । अनेनाहं ताडितः शप्तो वेत्यभियोगे पूर्वमहमनेन ताडितः शप्तो वेति प्रत्यभियोगे दण्डाल्पत्वम् । यथाह नारदः । पूर्वमाक्षारयेद्यस्तु नियतं स्यात्सदोषभाक् । पश्चाद्यः सोऽप्यसत्कारी पूर्वे तु विनयो गुरुरिति ॥ यदा पुनर्द्वयोर्युगपत्ताडनादिप्रवृत्तिस्तत्राधिकदण्डनिवृत्तिः । पारुष्ये साहसे वापि युगपत्संप्रवृत्तयोः । विशेषश्चेन्न लभ्येत विनयः स्यात्समस्तयोरिति । एवं युगपद्व्यवहारप्रवृत्त्यसंभवेपि कलहादौ प्रत्यभियोगोऽर्थवानृणादानादिषु तु निरर्थक एव ।

शाखा २ री.

वादीनें जी आपल्यावर फिर्याद केली असेल तिचें निराकरण केल्यावांचून प्रतिवादीनें वादीवर उलट फिर्याद करूं नये, असा जो पूर्वी (पहिल्या शाखेच्या १ ल्या अंकांत) निषेध सांगितला त्याचा अपवाद एथें सांगतो.

**मूलार्थ–** कलह आणि साहस ह्या वादांत प्रत्यभियोग (उलट फिर्याद) करावा.

**टीकार्थ–** १ कलह ह्मणजे वाक्पारुष्य; दंडपारुष्य; साहस म्हणजे विष, शस्त्र इत्यादिकांच्या योगें प्राणनाश करणें वगैरे; ह्या वादांत उलट फिर्याद संभवेल तर, आपल्यावरील फिर्यादीचें निराकरण करण्यापूर्वींहि वादीवर उलट फिर्याद करावी.

फौजदारीप्रकरणीं उलट फिर्याद केल्यास बाध नाहीं.

१ प्राणीति पाठान्तरम् ।

२ एथेंहि अशी शंका येते कीं, ही जी उलट फिर्याद सांगितली ती ( आपणावरील ) पहिल्या फिर्यादीचें निराकरण करणारी नव्हे; यास्तव तिला उत्तरत्व ह्मणतां येत नाहीं. निराळी फिर्याद म्हणावी तर एका वादांत दोहों वादींच्या फिर्यादी एकदम संभवत नाहींत. (ह्मणून ही उलट फिर्याद निरर्थक आहे. )

३ **समाधान**–खरें, पण एथें (१ल्या अंकांत) जो उलट फिर्याद करण्याचा प्रकार सांगितला तो, एकसमयावच्छेदेंकरून वाद चालविण्याविषयीं नाहीं. तर फिर्यादीपेक्षां कमी दंड आपणास असावा, अथवा अधिक तरी होऊं नये, एतदर्थ सांगितला आहे. जसें;–ह्यानें मला मारिलें, अथवा शिवीगाळ केली अशी फिर्याद केली असतां, प्रतिवादी जर अशी उलट फिर्याद करून शाबीत करील कीं, पूर्वीं ह्यानें मला मारिलें, अथवा शिवीगाळ केली तर प्रतिवादीस दंड कमी होईल. ह्यास प्रमाण.

**नारद**– जो प्रथम ( विनापराध) दुसऱ्यास शिवीगाळ ( किंवा मारामारी ) करितो तो निश्चयें अपराधी ठरतो, आणि जो त्याला ( शिवीगाळ, मारहाण करणारास ) उलट करितो तोहि अपराधी खरा, परंतु पहिल्यानें अपराध करणारा अधिक दंडास पात्र होतो.

एकदांच दोघे मारामारीस प्रवृत्त झाल्यास त्यांस दंड.

४ जर कदाचित् दोघे एकदम मारामारी इत्यादि करण्यास प्रवृत्त होतील तर कोणासहि अधिक दंड नाहीं.

**स्मृति**–वाक्पारुष्य, दंडपारुष्य, व साहस ह्या व्यवहारांत दोघे एकदम प्रवृत्त झाले आणि दोघांचे अपराध समान आहेत तर दोघांसहि शिक्षा सारखीच करावी.

५ ह्याप्रमाणें जरी एकदांच दोघांचा परस्पर विवाद संभवत नाहीं, तरी कलहादिकांत (फौजदारीप्रकरणीं) उलट फिर्याद लागू होते. ऋणादानादिकव्यवहारीं (दिवाणी प्रकरणीं) तर व्यर्थच होते.

## उभयोः प्रतिभूर्ग्राह्यः समर्थः कार्यनिर्णये ॥ १० ॥

**अर्थिप्रत्यर्थिनोर्विधिमुक्त्वा ससभ्यस्य सभापतेः कर्तव्यमाह। उभयोरर्थिप्रत्यर्थिनोः सर्वेषु विवादेषु निर्णयस्य कार्यं कार्यनिर्णयः। आहिताग्न्यादिषु पाठात्कार्यशब्दस्य पूर्वनिपातः। निर्णयस्य कार्यं च साधितधनदानं दण्डदानं च तस्मिन्समर्थः प्रतिभूः प्रतिभवति तत्कार्ये तद्वद्भवतीति प्रतिभूर्ग्राह्यः। ससभ्येन सभापतिना। तस्यासंभवेऽर्थिप्रत्यर्थिनो रक्षणे पुरुषा नियोक्तव्याः। तेभ्यश्च ताभ्यां प्रतिदिनं वेतनं देयम्। तथाह कात्यायनः। अथ चेत्प्रतिभूर्नास्ति कार्ययोग्यस्तु वादिनः। स रक्षितो दिनस्यांते दद्याद्भृत्याय वेतनमिति ॥ १० ॥**

### शाखा ३ री.

ह्याप्रमाणें वादिप्रतिवादींनीं ( कोर्टांत ) कोणत्या रीतीनें वर्त्तावें तें सांगून आतां न्यायाधीशानें सभासदांसहवर्तमान काय केलें पाहिजे तें सांगतो.

**मूलार्थ**– निर्णयाचे कार्याविषयीं समर्थ असा वादिप्रतिवादींपासून जामीन घ्यावा.

वादिप्रतिवादींपासून जामीन घेण्याचा प्रकार.

टीकार्थ– १ न्यायाधीशानें सर्व व्यवहारीं वादी व प्रतिवादी यांचा जामीन घ्यावा. तो ( जामीन ) शाबीत झालेली दाव्याची रकम व पराजयनिमित्त दंड ठरेल तो देण्यास समर्थ असावा.

२ तसा जामीन न मिळे तर वादिप्रतिवादींच्या संरक्षणाकरितां ( सरकारी ) शिपाई नेमावे, आणि त्या शिपायांस वादिप्रतिवादींकडून दररोज भत्ता देववावा. कात्यायन तसेंच सांगतो.

योग्य जामीन न मिळे तर त्याविषयींचा प्रकार.

कात्यायन– जर दोघांतून कोणास योग्य जामीन न मिळे तर शिपायांकडून त्याचें रक्षण करवून त्याकडून शिपायांस दररोज संध्याकाळीं भत्ता देववावा. १०

---

**निन्हवे भावितो दद्याद्धनं राज्ञे च तत्समम् ॥**
**मिथ्याभियोगी द्विगुणमभियोगाद्धनं वहेत् ॥ ११ ॥**

अर्थिप्रत्यर्थिनोर्निर्णयकार्ये ससभ्येन सभापतिना प्रतिभूर्ग्राह्य इत्युक्तम् । किं तन्निर्णयकार्यं यस्मिन्प्रतिभूर्गृह्यत इत्यपेक्षित आह । अर्थिना निवेदितस्याभियोगस्य प्रत्यर्थिनापन्हवे कृते यदार्थिना साक्ष्यादिभिर्भावितोऽङ्गीकारितः प्रत्यर्थी तदा दद्याद्धनं प्रकृतमर्थिने राज्ञे च तत्सममपलापदण्डं । अथार्थी भावयितुं न शक्नोति तदा स एव मिथ्याभियोगी जात इत्यभियोगादभियुक्तधनाद्द्विगुणं धनं दद्याद्राज्ञे। प्राङ्न्याये प्रत्यवस्कन्दने चेदमेव योजनीयम् । तत्रार्थ्येवापन्हववादी प्रत्यर्थिना भावितो राज्ञे प्रकृतधनसमं दण्डं दद्यात् ॥ अथ प्रत्यर्थी प्राङ्न्यायं कारणं वा भावयितुं न शक्नोति तदा स एव मिथ्याभियोगीति राज्ञे द्विगुणं धनं दद्यात् । अर्थिने च प्रकृतं धनं। संप्रतिपत्त्युत्तरे तु दण्डाभाव एव । एतच्च ऋणादानविषयमेव । पदान्तरेषु तत्र तत्र दण्डाभिधानादधनव्यवहारेष्वस्यासंभवाच्च न सर्वविषयत्वं। राज्ञाधमर्णिको दाप्य इत्यस्य ऋणादानविषयत्वेऽपि तत्रैव विशेषं वक्ष्यामः । एतदेव सर्वव्यवहारविषयत्वेनापि योजनीयम् । कथं अभियोगस्य निन्हवेऽभियुक्तेन कृते यद्यभियोक्त्रा साक्ष्यादिभिर्भावितोऽभियुक्तस्तदा तत्समं तत्र तत्र प्रतिपदोक्तमेव। चशब्दोऽवधारणे । धनं दण्डं दद्याद्राज्ञ इत्यनुवादः ॥ अथाभियोक्ता अभियोगं वक्तुं न शक्नोति तदा मिथ्याभियोगीति प्रतिपदोक्तं धनं दण्डं द्विगुणं दद्यादिति विधीयते। अत्रापि प्राङ्न्याये प्रत्यवस्कन्दने च पूर्ववदेव योजनीयम् ॥ ११ ॥

निर्णयकार्याविषयीं जामीन, वादी व प्रतिवादी यांपासून सभासद व न्यायाधीश यांनीं घ्यावा असें सांगितलें, तें निर्णयाचें कार्य कोणतें तें सांगतो.

मूलार्थ– निन्हव केला तर शाबीत केलेलें धन देववून तितकाच राजदंड घ्यावा. खोटी फिर्याद करणारापासून फिर्यादीचें दुप्पट धन घ्यावें.

टीकार्थ–३ वादीनें केलेल्या फिर्यादीचा, प्रतिवादी जर निन्हव करील, आणि वा-

वादीच्या अर्थाला प्रतिवादी निन्हव करितो तर त्यास दंड.

दीनें साक्षी, लेख वगैरे पुरावा दाखवून जर प्रतिवादीवर आपला दावा शाबीत केला तर न्यायाधीशानें वादीचें **विवादास्पदीभूत** द्रव्य देववावें. आणि निन्हव केला सबब (प्रतिवादीपासून) तितकाच राजदंड घ्यावा.

वादी खोटा फिर्यादी ठरल्यास दंड.

४ जर वादी आपण केलेली फिर्याद प्रतिवादीवर शाबीत करूं शकत नाहीं, तर वादीच खोटा फिर्यादी ठरला सबब त्यापासून न्यायाधीशानें **विवादास्पदीभूत** धनाच्या दुप्पट दंड घ्यावा.

५ ह्याप्रमाणें **प्राङ्न्यायोत्तरस्थळीं** व **कारणोत्तरस्थळींहि** योजना करावी. तो प्रकार असा कीं, **प्राङ्न्यायोत्तरस्थळीं** वादीच **निन्हववादी** आहे असें प्रतिवादीनें जयपत्रादिकेंकरून व **कारणोत्तरस्थळीं** साक्षी, लेख इत्यादिकांकडून शाबीत केलें असतां वादीपासूनच **विवादास्पदीभूत** द्रव्याइतका **निन्हवनिमित्त** दंड घ्यावा. जर प्रतिवादी आपलें **कारणोत्तर** अथवा **प्राङ्न्यायोत्तर** शाबीत करूं शकत नाहीं, तर प्रतिवादीच खोटा ठरला, सबब न्यायाधीशानें त्यापासून दुप्पट दंड घेऊन वादीचें **विवादास्पदीभूत** धन देववावें. **सत्योत्तरस्थळीं** तर वादीचा दावा कबूल केल्या कारणानें **निन्हव** नाहीं, ह्मणून शाबीत करण्याची गरज नाहीं, ह्यास्तव दंड नाहीं.

६ वर सांगितलेले प्रकार (३ रा, ४ था, ५ वा अंक) ऋणादानींच (देण्याघेण्याचे बाबतींच) समजावे. कारण, इतर व्यवहारीं त्या त्या प्रकरणीं निरनिराळे दंड सांगितलेच आहेत, आणि अधनव्यवहारीं (फौजदारीप्रकरणीं) तर वादाचें मूळ कारण द्रव्य नाहीं, ह्मणून मुळीं तत्सम धनदंडच संभवत नाहीं, यास्तव वरचे अंक सर्व व्यवहारांविषयीं नव्हत.

७ राजानें कर्जदाराकडून सावकाराचें कर्ज देवविलें असतां कर्जदारापासून शेंकडा १० रुपये दंड घ्यावा, असा पुढें (ऋणादानप्रकरणीं ५ व्या शाखेच्या ३ ऱ्या अंकांत) सांगितलेला प्रकारहि ऋणादानाविषयींच आहे खरा, परंतु विशेष नियम सांगावयाचा तो पुढें सांगूं.

८ हेच प्रकार सर्व व्यवहारांविषयीं योजावे. ते असे;—प्रतिवादीनें आपल्यावरील फिर्यादीचा **निन्हव** केल्यामुळें वादी जर साक्षी, लेख यांकडून प्रतिवादीवर आपला दावा शाबीत करील, तर प्रतिवादीनें त्या त्या स्थळीं, ह्मणजे त्या त्या प्रकरणीं सांगितलेला धनदंड राजाला अवश्य द्यावा, "हा पुढें त्या त्या प्रकरणीं सांगितलेल्या दंडाचा **अनुवाद** केला आहे असें समजावें," आणि जर वादी आपला दावा शाबीत करूं शकत नाहीं, तर वादी खोटा ठरला यास्तव त्यानें त्या त्या प्रकरणीं सांगितलेल्या धनदंडाच्या दुप्पट दंड द्यावा, "असा हा येथें **विधि** केला आहे असें समजावें." **प्राङ्न्यायोत्तर** व **कारणोत्तर** ह्या स्थळींहि ह्याप्रमाणेंच योजना करावी. ११

---

साहसस्तेयपारुष्यगोभिशापात्यये स्त्रियाम् ॥
विवादयेत्सद्य एव कालोऽन्यत्रेच्छया स्मृतः ॥ १२ ॥

ततोऽर्थी लेखयेत्सद्यः प्रतिज्ञातार्थसाधनमिति वदतोत्तरपादलेखने कालप्रतीक्षणं दर्शितं तत्रापवादमाह। साहसं विषशस्त्रादिनिमित्तं प्राणिव्यापादनादि। स्तेयं चौर्यं। पारुष्यं वाग्दण्डपारुष्यं वक्ष्यमाणलक्षणं। गौर्दोग्ध्री। अभिशापः पातकाभियोगः। अत्ययः प्राणधनातिपातस्तस्मिन्। द्वन्द्वैकवद्भावादेकवचनं। स्त्रियां कुलस्त्रियां दास्यां च। कुलस्त्रियां चारित्रविवादे दास्यां स्वत्वविवादे विवादयेदुत्तरं दापयेत्। सद्य एव न कालप्रतीक्षणं कुर्यात्। अन्यत्र विवादान्तरेषु काल उत्तरदानकालः इच्छयार्थिप्रत्यर्थिसभ्यसभापतीनां स्मृत उक्तः॥ १२ ॥

शाखा ५ वी.

नंतर वादीनें आपल्या वादाचा जो पुरावा असेल तो तत्काळ लिहून द्यावा असें पूर्वी (पहिल्या प्रकरणाच्या १३ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत) सांगितलें त्यावरून प्रतिवादीस उत्तर देण्यास कालविलंब लागला तरी हरकत नाहीं असें (त्याच अंकांत) जें सांगितलें त्याचा अपवाद एथें सांगतो.

मूलार्थ–साहस, चोरी, वाक्पारुष्य, दंडपारुष्य, गाय, अभिशाप, अनर्थ, स्त्रिया ह्या वादांत तत्काळ उत्तर घ्यावें. इतर स्थळीं इच्छेप्रमाणें अवकाश द्यावा.

कोणकोणते व्यवहारीं प्रतिवादीकडून उत्तर घेण्यास विलंब लावूं नये.

टीकार्थ–९ साहस ह्मणजे विष, शस्त्र इत्यादिकेंकरून प्राणाचा नाश इत्यादि करणें; चोरी; वाक्पारुष्य; दंडपारुष्य; दुभती गाय; अभिशाप; प्राण किंवा धन ह्यांचा नाश; तसेंच कुलस्त्रीवर व्यभिचाराचा आरोप व दासीविषयीं स्वत्वविवाद इतक्या विवादांत तत्काळ उत्तर घ्यावें; अवकाश करूं नये. इतर वादांत उत्तर देण्याचा अवधि वादी, प्रतिवादी, सभासद, आणि न्यायाधीश ह्यांच्या इच्छेप्रमाणें द्यावा. १२

---

देशाद्देशान्तरं याति सृक्किणी परिलेढि च ॥
ललाटं स्विद्यते चास्य मुखं वैवर्ण्यमेति च ॥ १३ ॥
परिशुष्यत्स्खलद्वाक्यो विरुद्धं बहु भाषते ॥
वाक्चक्षुः पूजयति नो तथोष्ठौ निर्भुजत्यपि ॥ १४ ॥
स्वभावाद्विकृतिं गच्छेन्मनोवाक्कायकर्मभिः ॥
अभियोगे च साक्ष्ये वा दुष्टः स परिकीर्तितः ॥ १५ ॥

दुष्टलक्षणमाह। मनोवाक्कायकर्मभिर्यः स्वभावादेव न भयादिनिमित्ताद्विकृतिं विकारं याति गच्छति। असावभियोगे साक्ष्ये वा दुष्टः परिकीर्तितः। तां विकृतिं वि-

भज्य दर्शयति। देशाद्देशान्तरं याति न क्वचिदवतिष्ठते। सृक्किणी ओष्ठपर्यंतौ परिलेढि जिह्वाग्रेण स्पर्शयति घटयतीति कर्मणो विकृतिः। अस्य ललाटं स्विद्यते स्वेदबिन्दूङ्कितं भवति। मुखं च वैवर्ण्यं विवर्णत्वं पाण्डुत्वं कृष्णत्वं वा एति गच्छतीति कायस्य विकृतिः। परिशुष्यत्स्खलद्वाक्यः परिशुष्यत्सगद्गदं स्खलद्व्यत्यस्तं वाक्यं यस्य स तथोक्तः। विरुद्धं पूर्वापरविरुद्धं। बहु भाषत इति वाचो विकृतिः। परोक्तां वाचं प्रतिवचनदानेन न प्रपूजयति। चक्षुर्वा प्रतिवीक्षणेन न पूजयतीति मनसो विकृतेर्लिङ्गं। तथा ओष्ठौ निर्भुजति वक्रयतीत्यपि कायस्य विकृतिः। एतच्च दोषसंभावनामात्रमुच्यते। न दोषनिश्चयाय। स्वाभाविकनैमित्तिकविकारयोर्विवेकस्य दुर्ज्ञेयत्वात्। अथ कश्चिन्निपुणमतिर्विवेकं प्रतिपद्येत तथापि न पराजयनिमित्तं कार्यं भवति। न हि मरिष्यतो लिङ्गदर्शनेन मृतकार्यं कुर्वन्ति। एवमस्य पराजयो भविष्यतीति लिङ्गादवगतेपि न पराजयनिमित्तकार्यप्रसङ्गः ॥ १३ ॥ १४ ॥ १५ ॥

### शाखा ४ थी.

### वादांत खोटा समजण्याचीं चिन्हें सांगतो.

**मूलार्थ**— जो एका ठिकाणीं ठरत नाहीं, व जो ओंठाचे कोंपरे चाटितो व ज्याचे कपाळावर घाम येतो, व ज्याचें तोंड वैवर्ण्य पावतें; ज्याच्या तोंडाला कोरड पडते, आणि जो अडखळत बोलतो, व जो विरुद्ध व फार बडबड करितो, जो प्रत्युत्तरानें व प्रतिवीक्षणानें सत्कार करीत नाहीं, तसेंच जो ओंठ वांकडे करितो असा जो मानसिक किंवा वाचिक किंवा कायिक विकार आपोआप पावेल, तो वादांत किंवा साक्षीविषयीं खोटा जाणावा.

वादांत खोटा समजण्याचीं चिन्हें.

**टीकार्थ**— १ न्यायसभेंत आल्यानंतर जो एका ठिकाणीं स्थिर राहत नाहीं, इकडे तिकडे फिरतो तो, व जिभेनें ओंठाचे प्रांतभाग चाटितो तो, "ही कर्मजन्य विकृति" व ज्याच्या कपाळावर घाम येतो, आणि तोंडावर पांढुरकी किंवा काळिमा येते तो, "ही कायिक विकृति," व जो सद्गदित, किंवा व्यत्यस्त व पूर्वापरविरुद्ध, पुष्कळ भाषण करितो तो, "ही वाचिक विकृति," व जो दुसऱ्याचे प्रश्नाचा प्रत्युत्तर देण्यानें सत्कार करीत नाहीं, किंवा दुसऱ्याचे दृष्टीचा प्रतिवीक्षणानें सत्कार करीत नाहीं तो, "ह्या मानसिक विकृतीच्या खुणा," तसेंच जो ओंठ वांकडे करितो तो, "ही शारीर विकृतीच होय," असा जो तो वादांत किंवा साक्षीविषयीं खोटा असें जाणावें. परंतु ह्या वर सांगितलेल्या विकृति भयादि कारणांमुळें नसतां स्वाभाविक असतील तर.

२ हे वर सांगितलेले विकार दोषीपणाचा वहमा मात्र दाखविणारे आहेत, केवळ ह्यांवरून दोषाचा निश्चयच होतो, असें नाहीं. कारण, हे विकार स्वाभाविक किंवा नैमित्तिक हें चौकशीनें समजावयाचें कठीण आहे. कदाचित् एखादा चतुर पुरुष समजेल, तरी पराजयनिमित्त कार्य होणार नाहीं. जसें; मरणाऱ्या मनुष्याचीं मरणचिन्हें (पूर्वी) दिसून

आलीं तरी त्याचें मृतकार्य (पूर्वी) करीत नाहींत, तसेंच ह्याचा पराजय होईल असें चिन्हांवरून अवगत झालें तरी पराजयनिमित्त (दंड वगैरे) कार्याचा प्रसंग पूर्वींच उत्पन्न होत नाहीं. १३ ॥ १४ ॥ १५ ॥

---

**संदिग्धार्थं स्वतन्त्रो यः साधयेद्यश्च निष्पतेत् ।**
**न चाहूतो वदेत्किंचिद्धीनो दण्ड्यश्च स स्मृतः ॥ १६ ॥**

किंच संदिग्धमर्थमधमर्णेनानङ्गीकृतमेव यः स्वतन्त्रः साधननिरपेक्षः साधयत्यासेधादिना स हीनो दण्ड्यश्च भवति । यश्च स्वयं संप्रतिपन्नं साधनेन वा साधितं याच्यमानो निष्पतेत्पलायेत । यश्चाभियुक्तो राज्ञा चाहूतः सदसि न किञ्चिद्वदति सोपि हीनो दण्ड्यश्च स्मृत इति संबध्यते । अभियोगेऽथ साक्ष्ये वा दुष्टः स परिकीर्तित इति प्रस्तुतत्वाद्धीनपरिज्ञानमात्रमेव माभूदिति दण्ड्यग्रहणं । दण्ड्यश्चापि शास्त्रोप्यर्थान्न हीयत इत्यर्थादहीनत्वदर्शनादत्र तन्माभूदिति हीनग्रहणम् । १६ ।

**मूलार्थ**— संदिग्ध अर्थाला जो बळेंच सिद्ध करितो व जो चुकावतो, आणि बोलावून आणिलें असतां कांहीं बोलत नाहीं, तो खोटा व दंडास पात्रहि सांगितला आहे.

पुरावा न दाखवितां दांडगाईनें वसूल करितो तर त्यास दंड.

**टीकार्थ**—३ कर्जदारानें नाकबूल केलेला अर्थ, साक्षी लेख (दस्तैवज) इत्यादि प्रमाणानें शाबीत न करितां द्वाही वगैरे देऊन जो बलात्कारानें घेऊं इच्छितो तो हीनवादी व दंडासहि योग्य होतो.

सावकार मागत असतां जो तोंड चुकावतो त्यास दंड.

४ कर्जदारानें स्वतां देण्यास कबूल केलेलें, अथवा सावकारानें साक्षी, लेख, इत्यादि पुरावा देऊन शाबीत केलेलें द्रव्य सावकार कर्जदाराजवळ मागत असतां कर्जदार तोंड चुकवील, तर तो व जो कोर्टांत बोलावून आणिलें असतां कांहींच बोलत नाहीं तोहि वादांत खोटा व दंडास पात्र होतो.

५ तो वादांत किंवा साक्षीविषयीं खोटा जाणावा असें (ह्या शाखेच्या पहिल्या अंकांत) सांगितलें आहे ह्मणून हा केवळ खोटा होतो इतकेंच समजूं नये, तर त्यास दंडहि असावा असें समजावें, ह्मणून एथें दंडाचा निवेश केला. परंतु दंडास योग्य होतो पण त्या वादांत पराजित होत नाहीं असें (ह्या प्रकरणाच्या पहिल्या शाखेच्या ८ व्या अंकांत) सांगितलें आहे, त्यावरून हा दंडास मात्र योग्य होतो असें समजूं नये तर येथें खोटा ठरतो असेंहि समजावें. १६

---

**साक्षिषूभयतः सत्सु साक्षिणः पूर्ववादिनः ।**
**पूर्वपक्षेऽधरीभूते भवन्त्युत्तरवादिनः ॥ १७ ॥**

अथ यत्र द्वावपि युगपद्धर्माधिकारिणं प्राप्तौ भाषावादिनौ। तद्यथा कश्चित्प्रतिग्रहेण क्षेत्रं लब्ध्वा कञ्चित्कालमुपभुज्य कार्यवशात्सकुटुम्बो देशान्तरं गतः। अन्योऽपि तदेव क्षेत्रं प्रतिग्रहेण लब्ध्वा कञ्चित्कालमुपभुज्य देशान्तरं गतः। ततो द्वावपि युगपदागत्य मदीयमिदं क्षेत्रं मदीयमिदं क्षेत्रमिति परस्परं विवदमानौ धर्माधिकारिणं प्राप्तौ तत्र कस्य क्रियेत्याकांक्षित आह। उभयतः उभयोरपि वादिनोः साक्षिषु संभवत्सु साक्षिणः पूर्ववादिनः पूर्वस्मिन्काले मया प्रतिगृहीतमुपभुक्तं चेति यो वदत्यसौ पूर्ववादी। न पुनर्यः पूर्वं निवेदयति तस्य साक्षिणः प्रष्टव्याः। यदा त्वन्य एवं वदति सत्यमनेन पूर्वं प्रतिगृहीतमुपभुक्तं च किंतु राज्ञेदमेव क्षेत्रमस्मादेव क्रयेण लब्ध्वा मह्यं दत्तमिति अनेन वा प्रतिग्रहेण लब्ध्वा मह्यं दत्तमिति तत्र पूर्वपक्षोऽसाध्यतयाधरीभूतस्तस्मिन पूर्वपक्षेऽधरीभूते उत्तरकालं प्रतिगृहीतमुपभुक्तं चेति वादिनः साक्षिणः प्रष्टव्या भवन्ति। इदमेव व्याख्यानं युक्ततरम्। मिथ्योत्तरे पूर्ववादिनः साक्षिणो भवन्ति। प्राङ्न्यायकारणोक्तौ पूर्वपक्षेऽधरीभूते उत्तरवादिनः साक्षिणो भवन्तीति व्याख्यानं न युक्तं। अस्यार्थस्य ततोऽर्थी लेखयेत्सद्यः प्रतिज्ञातार्थसाधनमित्यनेनैवोक्तत्वात्पुनरुक्तिप्रसङ्गात्। पूर्वव्याख्यानमेव स्पष्टीकृतं नारदेन। मिथ्याक्रिया पूर्ववादे कारणे प्रतिवादिनि। प्राङ्न्यायविधिसिद्धौ तु जयपत्रं क्रिया भवेदित्युक्त्वा द्वयोर्विवदतोरर्थे द्वयोः सत्सु च साक्षिषु। पूर्वपक्षो भवेद्यस्य भवेयुस्तस्य साक्षिण इति वदता एतस्य च सर्वव्यवहारविलक्षणत्वाद्भेदेनोपन्यासः ॥ १७ ॥

वादाविषयीं शेताचें उदाहरण.

६ ज्या वादांत दोघेहि फिर्यादी एकदम न्यायाधीशाकडे फिर्याद आले तो प्रकार असा;–कोणीएक पुरुषानें प्रतिग्रहादिकानें क्षेत्र ( स्थावर ) संपादन करून कांहीं दिवस त्या क्षेत्राचा उपभोग घेऊन कांहीं कामाकरितां सकुटुंब देशांतरीं गेला. दुसराहि तेंच क्षेत्र प्रतिग्रहादिकेंकरून संपादून कित्येक दिवस त्या क्षेत्राचा उपभोग घेऊन देशांतरीं गेला. त्यानंतर दोघेहि एकदाच येऊन "हें क्षेत्र माझें आहे" असा परस्पर वाद करीत करीत न्यायाधीशाकडे फिर्याद गेले असतां त्यांतून कोणाचा पुरावा (साक्षी, लेख, भोगवटा इत्यादि ) घ्यावा हें सांगतो.

**मूलार्थ–** ७ दोघांचेहि साक्षी असल्यास पूर्ववादीचे साक्षी घ्यावे. पूर्ववादीचा पक्ष शाबीत न होईल तर उत्तरवादीचे साक्षी घ्यावे.

कांहीं एका अर्थाविषयीं दोघे भांडत असतां दोघांचाहि पुरावा असल्यास निर्णय करण्याचा प्रकार.

**टीकार्थ –** ७ दोहों फिर्यादींचेहि साक्षी असतील तर पूर्ववादी म्हणजे जो अगोदर हें क्षेत्र मला मिळून मी ह्याचा उपभोग घेतला, असें बोलतो, त्याचे साक्षी घ्यावे. ज्यानें पूर्वी फिर्याद केली असेल त्याचे साक्षी अगोदर घेऊं नयेत. जर उत्तरवादी ह्मणजे जो असें ह्मणतो कीं, ह्यानें हें क्षेत्र पूर्वी घेतलें व उपभोगिलें खरें, परंतु हेंच क्षेत्र ह्याच मनुष्यापासून राजानें विकत घेऊन मला दान दिलें, अथवा दुसऱ्यानें दान

घेऊन मला दिलें, असें शाबीत करितो तर पूर्ववादीचा पक्ष रद्द झाला सबब उत्तरवादीच साक्षी घ्यावे.

८ हा (वर सांगितलेला)च अर्थ योग्य आहे. मिथ्योत्तरस्थळीं पूर्ववादीचे साक्षी घ्यावे. प्राङ्न्यायोत्तरस्थळीं व कारणोत्तरस्थळीं पूर्ववादीचा पक्ष रद्द झाला ह्यास्तव उत्तरवादीचे साक्षी घ्यावे असा अर्थ योग्य नाहीं; कारण असा अर्थ (पूर्वी १ ल्या प्रकरणाच्या १२ व्या शाखेच्या २ ऱ्या अंकांत) सांगितलाच आहे. ह्यास्तव पुनः सांगितल्यानें **पुनरुक्तिदोष** येतो.

**नारदानें**हि पहिलाच अर्थ स्पष्ट करून दाखविला आहे. तो असा;– "प्रतिवादीनें **मिथ्योत्तर** दिलें असेल तर **स्वार्थसाधक प्रमाणांचा** पुरावा दाखविणें हें वादीचें काम आहे. प्रतिवादीनें **कारणोत्तर** दिलें असतां प्रतिवादीनेंच तत्साधक प्रमाणांचा पुरावा दाखविला पाहिजे. तसेंच **प्राङ्न्यायोत्तरस्थळीं**हि प्रतिवादीनेंच जयपत्र वगैरे (पूर्वी झालेला निवाडा इत्यादि) दाखवून आपला वाद शाबीत केला पाहिजे." असें सांगून "एका अर्थाविषयीं दोघे भांडत आहेत आणि दोघांचेहि साक्षी असतील तर **पूर्ववादीचे** साक्षी पुराव्यास घ्यावे" असें सांगितलें. ह्याप्रमाणें नारदानें पृथक् वचन सांगितलें आहे तें, हा (६ व्या अंकांतला शेताविषयींचा) वाद सर्व व्यवहारांहून विलक्षण आहे ह्मणून निराळें सांगितलें आहे असें स्पष्ट दिसतें. १७

---

**सपणश्चेद्विवादः स्यात्तत्र हीनं तु दापयेत् ।**
**दण्डं च स्वपणं चैव धनिने धनमेव च ॥ १८ ॥**

अपिच यदि विवादो व्यवहारः सपणः । पणनं पणस्तेन सहवर्तत इति सपणः स्यात्तदा तत्र तस्मिन् सपणे व्यवहारे हीनं पराजितं पूर्वोक्तं दण्डं स्वकृतं च पणं राज्ञे अर्थिने च विवादास्पदीभूतं धनं दापयेद्राजा । यत्र पुनरेकः कोपावेशवशा- द्यद्यहमत्र पराजितो भवामि तदा पणशतं दास्यामीति प्रतिजानीते । अन्यस्तु न किंचित्प्रतिजानीते तत्रापि व्यवहारः प्रवर्तते । तस्मिंश्च प्रवृत्ते पणप्रतिज्ञावादी यदि हीयते तदा स एव सपणं दण्डं दाप्यः । अन्यस्तु पराजितो दण्डं दाप्यः न पणं स्वपणं चेति विशेषोपादानात् । यत्र त्वेकः शतमन्यस्तु पञ्चाशतं प्रतिजानीते तत्रापि पराजये स्वकृतमेव पणं दाप्यौ । सपणश्चेद्विवादः स्यादिति वदता पणरहितोऽपि विवादो दर्शितः ॥ १८ ॥

शाखा ५ वी.

मूलार्थ– जर प्रतिज्ञापूर्वक विवाद आहे, तर त्यांत पराजितापासून दंड आणि त्यानें केलेल्या पणाचें धन घेऊन वादीचें द्रव्य देववावें.

टीकार्थ– १ जर मी ह्या वादांत हरलों तर अमुक रुपये गुन्हेगारीबदल दंड देईन

प्रतिज्ञा करून विवाद करीत आहे तर त्या स्थळीं निर्णय करण्याचा प्रकार.

अशी प्रतिज्ञा करणारा (प्रतिवादी)(वादांत) पराजित झाला असतां त्यापासून राजानें पूर्वी (ह्या प्रकरणाच्या ३ ऱ्या शाखेच्या ३ ऱ्या अंकांत ) सांगितलेला दंड व प्रतिज्ञात द्रव्य घेऊन वादीचें विवादास्पदीभूत द्रव्य देववावें.

वादी प्रतिज्ञा करील तर त्याविषयीं.

२ प्रतिज्ञा करणारा वादी आहे व तो पराजित झाला तर त्यापासून ( ह्या प्रकरणाच्या ३ ऱ्या शाखेच्या ४ थ्या अंकांत सांगितल्याप्रमाणें ) दंड घेऊन प्रतिज्ञात द्रव्य घ्यावें.

जो प्रतिज्ञा करील त्यापासून मात्र प्रतिज्ञात द्रव्य घ्यावें.

३ ज्या व्यवहारीं वादिप्रतिवादींतून कोणीएक क्रोधाच्या आवेशानें प्रतिज्ञा करितो कीं, जर मी ह्या वादांत पराजय पावेन तर १०० पण ( द्रव्य ) देईन, आणि दुसरा कांहींच प्रतिज्ञा करीत नाहीं, तर असाहि व्यवहार चालतो, तर तसा व्यवहार झाला असतां त्यांत प्रतिज्ञा करणारा पराजित होईल तर त्यापासून वर सांगितल्याप्रमाणें पराजयनिमित्त दंड घेऊन प्रतिज्ञात द्रव्य घ्यावें. प्रतिज्ञा न करणारा पराजित होईल तर त्यापासून नुसता दंड मात्र घ्यावा, प्रतिज्ञात द्रव्य घेऊं नये; कारण, त्यानें प्रतिज्ञा केली नाहीं.

दोघे प्रतिज्ञा करितात, तर दोघांपासूनहि प्रतिज्ञात द्रव्य घ्यावें.

४ ज्या वादांत ( वादिप्रतिवादींतून ) कोणीएक १०० पणांची प्रतिज्ञा करितो आणि दुसरा ५० पणांची प्रतिज्ञा करितो त्या वादांतहि ( पराजितापासून पराजयनिमित्त दंड घेऊन ) प्रतिज्ञा करणाऱ्या दोघांपासून प्रतिज्ञात द्रव्य घ्यावें. "जर प्रतिज्ञापूर्वक विवाद आहे" असें वर सांगितलें यावरून प्रतिज्ञाविरहितहि वाद चालतो, असें दाखविलें. १८

---

**छलं निरस्य भूतेन व्यवहारान्नयेन्नृपः ।**
**भूतमप्यनुपन्यस्तं हीयते व्यवहारतः ॥ १९ ॥**

किंच छलं प्रमादाभिहितं निरस्य परित्यज्य भूतेन वस्तुतत्त्वानुसारेण व्यवहारान्नयेदन्तं नृपः। तस्माद्भूतमपि वस्तुतत्त्वमपि अनुपन्यस्तमनभिहितं हीयते हानिमुपगच्छति । व्यवहारतो व्यवहारेण साक्ष्यादिभिः तस्माद्भूतानुसरणं कर्तव्यं यथार्थिप्रत्यर्थिनौ सत्यमेव वदतस्तथा सत्सभ्येन सभापतिना यतितव्यं सामादिभिरुपायैः । तथा सति साक्ष्यादिनैरपेक्ष्येणैव निर्णयो भवति । अथ सर्वथापि भूतानुसरणं न शक्यते कर्तुं तथा सति साक्ष्यादिभिर्निर्णयः कार्य इत्यनुकल्पः । यथोक्तं । भूतच्छलानुसारित्वाद्द्विगतिः समुदाहृतः । भूतं तत्त्वार्थयुक्तं यत्प्रमादाभिहितं छलमिति । तत्र भूतानुसारी व्यवहारो मुख्यः छलानुसारी त्वनुकल्पः । साक्षिलेख्यादिभिर्व्यवहार-

निर्णये कदाचिद्वस्त्वनुसरणं भवति कदाचिन्न भवति । साक्ष्यादीनां व्यभिचारस्यापि संभवात् ॥ १९ ॥

शाखा ६ वी.

**मूलार्थ**–राजानें व्यवहारांतलें कपट काढून वास्तवार्थ पाहून निर्णय करावा. वास्तवार्थ असूनहि पूर्वी निवेदित केला नाहीं तर व्यवहारापासून पराजित होतो.

**टीकार्थ**– १ राजानें व्यवहारांत जें कृत्रिम (कपट) असेल तें काढून म्हणजे भूल, असमंजसपणा इत्यादि कारणेंकरून वादी अथवा प्रतिवादी यांच्या कल्पित भाषणावर विश्वास न ठेवितां जो वास्तविक प्रकार असेल त्यास अनुसरून व्यवहाराचा निर्णय करावा.

व्यवहारांत कृत्रिम असेल तें काढून निर्णय करावा.

२ वास्तविक अर्थ असूनहि तो साक्षी वगैरे पुराव्याच्या योगानें सिद्ध न करील तर तो खरा असतांहि रद्द होतो. ह्यास्तव जेणेंकरून वादी प्रतिवादी खरें बोलतील असा न्यायाधीशानें सभासदांसहवर्तमान सामदानादि उपायांकडून यत्न करावा. असें केलें असतां साक्षी लेख इत्यादि पुराव्यांची गरज न लागतां व्यवहाराचा निर्णय होतो. (आणि हाच मुख्य पक्ष) जर सर्वथा खरा प्रकार बराबर समजणें अशक्य होईल तर साक्षी, लेख वगैरे पुरावा घेऊन निर्णय करावा. परंतु हा गौणपक्ष आहे. (त्याविषयीं प्रमाण.)

वास्तविक अर्थ असून पूर्वी निवेदित करीत नाहीं तर तो पुढें रद्द पडतो.

**स्मृति**– व्यवहाराचा निर्णय करण्याचे पक्ष दोन आहेत. **भूतानुसारी** आणि **छलानुसारी. भूतानुसारी** म्हणजे खरा अर्थ अवगत करून घेऊन त्यावरून निर्णय करणें. **छलानुसारी** ह्मणजे प्रमादानें (चूकभुलीनें) भाषणविपर्यास घडल्यास साक्षी वगैरे पुराव्यावरून निर्णय करणें. त्यामध्यें वास्तविक अर्थास अनुसरून निर्णय करणें. हा मुख्य पक्ष. दुसरा पक्ष हा गौण पक्ष. कारण, साक्षी, लेख इत्यादि पुराव्यानें कधीं कधीं वास्तवार्थाप्रमाणें न्याय होतो; कदाचित् होतहि नाहीं, कारण, साक्षी, लेख इत्यादि पुराव्यांतहि खोटेपणा संभवतो. १९

---

**निन्हुते लिखितं नैकमेकदेशे विभावितः ।**
**दाप्यः सर्वं नृपेणार्थं न ग्राह्यस्त्वनिवेदितः ॥ २० ॥**

भूतमप्यनुपन्यस्तं हीयते व्यवहारत इत्यत्रोदाहरणमाह । नैकमनेकं सुवर्णं रजतवस्त्रादि लिखितमभियुक्तमर्थिना प्रत्यर्थी यदि सर्वमेव निन्हुते अपजानीते तदार्थिनैकदेशे हिरण्ये साक्ष्यादिभिः प्रत्यर्थी भावितोऽगीकारितः सर्वरजताद्यर्थं पूर्वलिखितं दाप्योऽर्थिने नृपेण । न ग्राह्यस्त्वनिवेदितः पूर्वं भाषाकाले अनिवेदितः पश्चादर्थिना पूर्वं मया विस्मृत इति निवेद्यमानो न ग्राह्यो न दापयितव्यो नृपेण । एतच्च न केवलं वाचनिकमेकदेशे प्रत्यर्थिनो मिथ्यावादित्वनिश्चयादेकदेशान्तरेपि मि-

थ्यावादित्वसंभवात् । अर्थिनश्चैकदेशे सत्यवादित्वनिश्चयादेकदेशान्तरेपि सत्यवादित्वसंभवात् । एवं तर्कापरनामसंभावनाप्रत्ययानुगृहीतादस्मादेव योगीश्वरवचनात्सर्वं दापनीयं नृपेणेति निर्णयः । एवं च तर्कवाक्यानुसारेण निर्णये क्रियमाणे वस्तुनोऽन्यथात्वेऽपि व्यवहारदर्शिनां न दोषः ।

तथा च गौतमो न्यायाधिगमे तर्कोभ्युपायस्तेनाभ्युपेत्य यथास्थानं गमयेदित्युक्का तस्माद्राजाचार्यावनिंद्याविन्युपसंहरति । न चैकदेशभावितोऽनुपादेयवचनः प्रत्यर्थीत्येतावदिह गम्यते । एकदेशविभावितो नृपेण सर्वं दाप्य इति वचनात् ।

यत्तु कात्यायनेनोक्तम् । अनेकार्थाभियोगोपि यावत्संसाधयेद्धनी । साक्षिभिस्तावदेवासौ लभते साधितं धनमिति तत्पुत्रादिदेयपित्राद्यृणविषयम् । तत्र हि बहूनर्थानभियुक्तः पुत्रादिर्न जानामीति प्रतिवदन्निन्हववादी न भवतीत्येकदेशविभावितोऽपि न क्वचिदसत्यवादीति निन्हुते लिखितं नैकमिति शास्त्रं तत्र न प्रवर्तते । निन्हवाभावादपेक्षिततर्काभावाच्च । अनेकार्थाभियोगेपीति कात्यायनवचनं सामान्यविषयम् विशेषशास्त्रस्य विषयं निन्हवोत्तरं परिहृत्याज्ञानोत्तरे प्रवर्तते । ननु ऋणादिषु विवादेषु स्थिरप्रायेषु निश्चितम् । ऊने वाप्यधिके वार्थे प्रोक्ते साध्यं न सिद्ध्यतीति वदता कात्यायनेनानेकार्थाभियोगे साक्षिभिरेकदेशे भावितेऽधिके वा भाविते साध्यं सर्वमेव न सिद्ध्यतीत्युक्तं । तथासत्येकदेशे भाविते अभावितैकदेशसिद्धिः कुतस्त्या । उच्यते । लिखितसर्वार्थसाधनतयोपन्यस्तैः साक्षिभिरेकदेशाभिधानेऽधिकाभिधाने वा कृत्स्नमेव साध्यं न सिद्ध्यतीति तस्यार्थः तत्रापि निश्चितं न सिद्ध्यतीति वचनात्पूर्ववत्संशय एवेति प्रमाणान्तरस्यावसरोऽस्त्येव छलं निरस्येति नियमात् । साहसादौ तु सकलसाध्यसाधनतयोद्दिष्टैः साक्षिभिरेकदेशेऽपि साधिते कृत्स्नसाध्यसिद्धिर्भवत्येव तावतैव साहसादेः सिद्धत्वात्कात्यायनवचनाच्च । साध्यार्थांशेपि गदिते साक्षिभिः सकलं भवेत् । स्त्रीसंगे साहसे चौर्ये यत्साध्यं परिकीर्तितमिति ॥ २० ॥

वास्तविक अर्थ असूनहि पूर्वी फिर्यादींत विदित केला नसेल तर तो रद्द होतो असें (ह्या प्रकरणाच्या ६ व्या शाखेच्या २ऱ्या अंकांत) जें सांगितलें त्याचें उदाहरण सांगतो.

**मूलार्थ**— वादीनें फिर्यादींत लिहून दिलेल्या रकमा प्रतिवादीनें नाकबूल केल्यावर वादी एकादी रकम जरी शाबीत करील तरी न्यायाधीशानें सर्व रकमा देववाव्या; परंतु पूर्वी ( फिर्यादींत ) लिहून दिल्या नसतील त्या देववूं नयेत.

**टीकार्थ**— ३ जसें;— ह्याजकडे सोनें, रुपें, कापड वगैरे माझें येणें आहे ( तें देववावें ) अशी फिर्याद वादीनें केली असतां प्रतिवादी सर्वच नाकबूल करील आणि वादी त्यांतून एकादी रकम साक्षी वगैरेकडून लागू करितो तर सोनें, रुपें वगैरे सर्व रकमा, ज्या पूर्वी फिर्यादींत लिहून दिल्या असतील त्या, राजानें ( न्यायाधीशानें ) वादीस देववाव्या. परंतु

अर्जींत लिहून न देतां कांहीं वेळानंतर पूर्वीं मी ही रकम अर्जींत लिहावयास विसरलों असें वादी म्हणेल तर ती रकम राजानें देववूं नये.

४ हा ( वर सांगितलेला ) न्यायाचा प्रकार केवळ शास्त्रप्राप्तच आहे असें नाहीं, तर युक्तिसिद्धहि आहे. कारण, प्रतिवादीच्या खोटेपणाचा एकदेशीं निश्चय झाल्यावर अन्यस्थळींहि त्याच्या खोटेपणाचा वहीम येतो. तसेंच वादीचाहि एकाद्या रकमेविषयीं खरेपणा निश्चित झाल्यावर अन्यस्थळींहि त्याच्या खरेपणाचा संभव येतो. ह्याप्रमाणें जिला तर्क म्हणतात अशी जी संभावनात्मक बुद्धि तिणें सहकृत अशा याज्ञवल्क्यवचनावरून असा निर्णय होतो कीं, एकादी रकम लागू केली असतां राजानें वादीच्या सर्व रकमा देववाव्या.

सारांश, तर्कास व वाक्यास अनुसरून व्यवहाराचा निर्णय केला असतां कदाचित् जरी वास्तविक अर्थ विपरीत ( खोटा ) झाला तरी त्याचा दोष न्याय करणारांकडे नाहीं.

गौतमहि न्यायाचे कामांत वास्तवार्थ समजण्याविषयीं तर्क हा व्यापक उपाय आहे, त्यानें निश्चय करून वादाचा खरा निर्णय करावा "असें सांगून" राजा आणि आचार्य हे दोषी होत नाहींत असा उपसंहार करितो.

५ वादीनें एकदेशीं दावा शाबीत केला असतां तितकेंच प्रतिवादीकडून देववून पुढें प्रतिवादी तकरार सांगेल तर ती ऐकूं नये, इतकेंच याज्ञवल्क्यस्मृतीचें तात्पर्य आहे असें समजूं नये; कारण, स्मृतींत स्पष्ट सांगितलें आहे कीं, वादीनें एकदेशीं दावा शाबीत केला असतां राजानें प्रतिवादीकडून सर्व देवविलें पाहिजे.

कात्यायन— वादीनें जरी अनेक वस्तूंची ( सोनें, रुपें, कापड वगैरेंची ) फिर्याद केली तरी साक्षी, लेख इत्यादि पुराव्याकडून वादी जितक्या वस्तूंची शाबिती करील तितक्याच त्याला मिळतील. ( सर्व मिळणार नाहींत.)

असें जें वचन आहे तें पुत्रादिकांनीं द्यावयास योग्य असें जें बापाचें कर्ज त्याविषयीं आहे. कारण, तशा ठिकाणीं पुत्रादिकावर अनेक वस्तूंची फिर्याद केली असतां पुत्रादिक म्हणेल कीं, ह्याविषयीं मला कांहींच माहीत नाहीं, तर तो खोटें बोलणारा होत नाहीं. म्हणून हें (ह्या शाखेच्या ३ ऱ्या अंकांतलें) उदाहरण येथें[१] लागू पडत नाहीं. वरचें कात्यायनवचन सामान्यशास्त्राविषयीं आहे ह्यास्तव तें विशेषशास्त्राचा ( तिसऱ्या अंकाचा ) विषय जें निन्हवोत्तर ( नाकबूलपणा ) त्यास लागू पडत नाहीं. तें, अज्ञानानें दिलेल्या उत्तराविषयीं लागू आहे असें समजावें.

कात्यायन— ६ शंका— स्थिरप्राये[२] असे जे ऋणादिक धनव्यवहार त्यांत सर्व

१ येथें म्हणजे कात्यायनवचनांत. २ स्थिरप्राय म्हणजे स्त्रीसंग्रहणादि व्यवहारस्थळीं केवळ मुद्रा दिसणें अशा शिथिल कारणावरून स्त्रीसंग्रहण, चोरी, वगैरे वादाची सिद्धि होते, म्हणून ते व्यवहार अस्थिर होतात. ऋणादान व्यवहारीं तर सबळ साधनानें व्यवहारसिद्धि होते, ह्यास्तव ते ( ऋणादानादि ) व्यवहार स्थिरप्राय म्हटले आहेत. ( सुबोधिनी).

साध्य अर्थाचा एकदेश प्रतिवादीवर वादीनें शाबीत केला किंवा साध्यांशापेक्षां अधिक अंश शाबीत केला तर साध्यसिद्धि खचीत होत नाहीं.

असें सांगणारा जो कात्यायन तो असें प्रतिपादन करितो कीं, अनेक वस्तूंची ( सोनें रुपें वगैरेची ) फिर्याद करून तिची साक्षींकडून एकदेशीं किंवा अधिक अंशीं शाबिती केली असतां सर्वच वाद बुडतो, तेव्हां फिर्यादींत लिहिलेल्या रकमांपैकीं एकादी रकम लागू केली असतां शाबीत न केलेल्या ज्या रकमा त्यांची सिद्धि कशी होईल बरें ?

दिवाणी प्रकरणीं एकादी रकम लागू झाली तर दावा रद्द होतो.

७ **समाधान**– वादीनें स्वतां अर्जींत लिहून दिलेल्या सर्व रकमा शाबीत होण्यासाठीं जे साक्षी दिले त्यांजकडून वादाची एकदेशीं शाबिती झाली किंवा अधिक अंशीं शाबिती झाली असतां वादीचा सर्वच दावा रद्द होतो, असा ह्याचा ( ६ व्या अंकाचा ) अर्थ. त्यांतहि निश्चयें सिद्ध होत नाहीं, अशा वचनतात्पर्यावरून पुनश्च पूर्वींप्रमाणें संशय आहेच म्हणून आणखी प्रमाणांची गरज आहे. कारण, "व्यवहाराच्या पोटीं कृत्रिम असेल तें काढून राजानें वास्तविक अर्थास अनुसरून निर्णय करावा" असा नियम ( पूर्वीं ह्या प्रकरणाच्या ६ व्या शाखेच्या मूळ वचनांत सांगितला ) आहे.

फौजदारींत एकादी रकम लागू झाली तरी तितक्यानेंच सर्व दावा लागू होतो.

८ साहसादि व्यवहारीं तर सकल साध्यार्थाची सिद्धि व्हावी, म्हणून वादी जे साक्षी देतो त्यांकडून दाव्याचा जरी एकादा अंश शाबीत झाला तरी तितक्यानेंच सर्व दावा शाबीत होतो.

कात्यायनवचनहि असेंच आहे कीं, स्त्रीसंग्रहण, साहस, चोरी ह्या विवादांत साक्षींकडून एकदेशीं दावा लागू केला असतां तितक्यानेंच वादीचा सर्व दावा लागू होतो. २०

## स्मृत्योर्विरोधे न्यायस्तु बलवान्व्यवहारतः ।

ननु निन्हुते लिखितं नैकमितीयं स्मृतिस्तथानेकार्थाभियोगेपीतीयमपिस्मृतिरेव तत्रानयोः स्मृत्योः परस्परविरोधे सतीतरेतरबाधनादप्रामाण्यं कस्मान्न भवति विषयव्यवस्था किमित्याश्रीयत इत्यत आह । यत्र स्मृत्योः परस्परतो विरोधस्तत्र विरोधपरिहाराय विषयव्यवस्थापनादावुत्सर्गापवादादिलक्षणो न्यायो बलवान्समर्थः । स च न्यायः कुतः प्रत्येतव्य इत्यत आह । व्यवहारत इति । व्यवहाराद्वृद्धव्यवहारादन्वयव्यतिरेकलक्षणादवगम्यते । अतश्च प्रकृतोदाहरणेपि विषयव्यवस्थैव युक्ता एवमन्यत्रापि विषयव्यवस्थाविकल्पादि यथासंभवं योज्यम् ।

---

१ उदाहरण; ह्यानें मजपासून सोनें रुपें, कापड घेतलें अशा फिर्याद केली असतां प्रतिवादीनें मी कांहींच घेतलें नाहीं असा नाकबूलपणाचा जाब दिल्यावर–वादी साक्षी, लेख इत्यादि पुराव्यांकडून साध्यार्थाचे एकदेशीं म्हणजे सोनें किंवा रुपये अथवा कापड ह्यांतून एकाद्या वस्तूविषयीं लागू करितो, अथवा फिर्यादीपेक्षां अधिक रकम ( धान्य ) लागू करितो तर निश्चयें त्याची फिर्याद रद्द होऊन वादी खोटा ठरतो.

"वादीनें लिहून दिलेल्या अनेक रकमा प्रतिवादीनें नाकबूल केल्यावर" इत्यादि अर्थाची (ह्या प्रकरणाच्या ६ व्या शाखेच्या ३ ऱ्या अंकांतील) याज्ञवल्क्यस्मृति आणि "वादीनें जरी अनेक वस्तूंची फिर्याद केली" ही (९ व्या अंकांतील) कात्यायनस्मृति ह्या दोहों स्मृतींचा परस्पर विरोध आल्यामुळें परस्परांचा बाध होतो, म्हणून अप्रामाण्य कां मानूं नये; विषयव्यवस्था कां करावी असी शंका उपस्थित झाली तिचें निराकरण (अर्ध्या वचनानें) सांगतो.

**मूलार्थ–** दोहों स्मृतींचा विरोध आला असतां व्यवहारापेक्षां न्याय प्रबळ.

**टीकार्थ–** ९ ज्या स्थलीं दोहों स्मृतींचा परस्पर विरोध येतो त्या स्थलीं विरोधपरिहारार्थ विषयव्यवस्थादिकांविषयीं सामान्यविशेषलक्षण जो **न्याय** तोच बलवत्तर होय. तो न्याय, अन्वयव्यतिरेकलक्षण जो **वृद्धव्यवहार** तेणेंकरून अवगत होतो. ह्यास्तव प्रकृत उदाहरणीं विषयव्यवस्थाच योग्य. ह्याप्रमाणें अन्यस्थळींहि विषयव्यवस्था व विकल्पादिक हीं यथासंभव योजावीं.

दोहों स्मृतींचा परस्पर विरोध प्राप्त झाला असतां व्यवस्था.

## अर्थशास्त्रात्तु बलवद्धर्मशास्त्रमिति स्थितिः ॥ २१ ॥

एवं सर्वत्र प्रसंगेऽपवादमाह । धर्मशास्त्रानुसारेणेत्यनेनैवौशनसाद्यर्थशास्त्रस्य निरस्तत्वात् धर्मशास्त्रान्तर्गतमेव राजनीतिलक्षणमर्थशास्त्रमिह विवक्षितं । अर्थशास्त्रधर्मशास्त्रस्मृत्योर्विरोधे अर्थशास्त्राद्धर्मशास्त्रं बलवदिति स्थितिमर्यादा । यद्यपि समानकर्तृकतया अर्थशास्त्रधर्मशास्त्रयोः स्वरूपगतो विशेषो नास्ति तथापि प्रमेयस्य धर्मस्य प्राधान्यादर्थस्य चाप्राधान्याद्धर्मशास्त्रं बलवदित्यभिप्रायः । धर्मस्य प्राधान्यं शास्त्रादौ दर्शितं तस्माद्धर्मशास्त्रार्थशास्त्रयोर्विरोधे अर्थशास्त्रस्य बाध एव न विषयव्यवस्था नापि विकल्पः । किमत्रोदाहरणम् । न तावत् । गुरुं वा बालवृद्धौ वा ब्राह्मणं वा बहुश्रुतम् । आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन् । नाततायिवधे दोषो हन्तुर्भवति कश्चन । प्रच्छन्नं वा प्रकाशं वा मन्युस्तं मन्युमृच्छति । तथा आततायिनमायान्तमपि वेदान्तगं रणे । जिघांसन्तं जिघांसीयान्न तत्र ब्रह्महा भवेदित्याद्यर्थशास्त्रम् ।

इयं विशुद्धिरुदिता प्रमाप्याकामतो द्विजम् । कामतो ब्राह्मणवधे निष्कृतिर्न विधीयत इत्यादि धर्मशास्त्रं तयोर्विरोधे धर्मशास्त्रं बलवदिति युक्तं । अनयोरेकविषयत्वासंभवेन विरोधाभावान्न बलाबलचिंतावतरति । तथाहि शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यत इत्युपक्रम्यात्मनश्च परित्राणे दक्षिणानां च संगरे । स्त्रीविप्राभ्युपपत्तौ च घ्नन्धर्मेण न दण्डभागित्यात्मरक्षणे दक्षिणादीनां यज्ञोपकरणानां च रक्षणे युद्धे च स्त्रीब्राह्मणहिंसायां चाततायिनमकूटशस्त्रेण घ्नन् न दण्डभागित्युक्त्वा त-

---

[१] अन्वय म्हणजे कार्यकारणांची नियमेंकरून एकत्र स्थिति, आणि व्यतिरेक म्हणजे जेथें कार्याचा अभाव तेथें कारणाचाहि नियमेंकरून अभाव राहतो, अशी जी उभयव्याप्ति तो.

स्यार्थवादार्थमिदमुच्यते । गुरुं वा बालवृद्धौ वेत्यादि गुर्वादीनत्यन्तावध्यानप्याततायिनो हन्यात्किमुतान्यानिति वाशब्दश्रवणादपि वेदांतगमित्यत्रापिशब्दश्रवणान्न गुर्वादीनां वध्यत्वप्रतीतिः । नाततायिवधे दोषोऽन्यत्र गोब्राह्मणादिति सुमंतुवचनाच्च । आचार्यं च प्रवक्तारं मातरं पितरं गुरुम् । न हिंस्याद्ब्राह्मणान् गाश्च सर्वांश्चैव तपस्विन इति मनुवचनाच्च । आचार्यादीनामाततायिनां हिंसाप्रतिषेधेनेदं वचनं सार्थवन्नान्यथा हिंसामात्रप्रतिषेधस्य सामान्यशास्त्रेणैव सिद्धत्वात् नाततायिवधे दोषो हन्तुर्भवति कश्चनेत्येतदपि ब्राह्मणादिव्यतिरिक्तविषयमेव । यतोऽग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः । क्षेत्रदारहरश्चैव षडेते आततायिनः । यथा । उद्यतासिर्विषाग्निश्च शापोद्यतकरस्तथा । आथर्वणेन हन्ता च पिशुनश्चापि राजनि । भार्यातिक्रमकारी च रन्ध्रान्वेषणतत्परः । एवमाद्यान्विजानीयात्सर्वानेवाततायिन इति सामान्येनाततायिनो दर्शिताः । अतश्च ब्राह्मणादयः आततायिनश्च आत्मादित्राणार्थं हिंसानभिसंधिना निवार्यमाणाः प्रमादाद्यदि विपद्येरन् तत्र लघुप्रायश्चित्तं राजदण्डाभावश्चेति निश्चयः । तस्मादन्यदिहोदाहरणं वक्तव्यं ।

उच्यते हिरण्यभूमिलाभेभ्यो मित्रलब्धिर्वरा यतः। अतो यतेत तत्प्राप्तावित्यर्थशास्त्रं धर्मशास्त्रानुसारेण क्रोधलोभविवर्जित इति धर्मशास्त्रं तयोः क्वचिद्विषये विरोधो भवति । यथा चतुष्पाद्व्यवहारे वर्तमाने एकस्य जयेऽवधार्यमाणे मित्रलब्धिर्भवति न धर्मशास्त्रमनुसृतं भवति । अन्यस्य जयेऽवधार्यमाणे धर्मशास्त्रमनुसृतं भवति मित्रलब्धिर्विपरीता तत्रार्थशास्त्राद्धर्मशास्त्रं बलवत् अत एव धर्मार्थसन्निपाते अर्थग्राहिण एतदेवेति प्रायश्चित्तस्य गुरुत्वं दर्शितमापस्तम्बेन । एतदेवेति द्वादशवार्षिकं प्रायश्चित्तं परामृश्यते ॥ २१ ॥

ह्याप्रमाणें सर्व ठिकाणीं विषयव्यवस्थाप्रसंग प्राप्त असतां अपवाद सांगतो.

मूलार्थ– अर्थशास्त्रापेक्षां धर्मशास्त्र बलवत्तर अशी शास्त्रमर्यादा आहे.

धर्मशास्त्र व अर्थशास्त्र ह्यांचा विरोध आला असतां अर्थशास्त्राचा बाध.

टीकार्थ– १० ( १ ल्या प्रकरणाच्या १ ल्या शाखेच्या ३ ऱ्या अंकांत ) " धर्मशास्त्रास अनुसरून राजानें व्यवहार पहावे " असें सांगितल्यावरूनच औशनसादिक अर्थशास्त्राचा निरास झाला. ह्यास्तव येथें अर्थशास्त्र म्हणजे धर्मशास्त्रांतर्गत जें राजनीतिलक्षण अर्थशास्त्र तें विवक्षित आहे असें समजावें. त्या अर्थशास्त्र व धर्मशास्त्र ह्यांच्या प्रतिपादक स्मृतींचा परस्पर विरोध आला असतां अर्थशास्त्रापेक्षां धर्मशास्त्र प्रबळ, अशी शास्त्रमर्यादा आहे. जरी अर्थशास्त्र व धर्मशास्त्र ह्यांचे कर्ते ( ऋषि ) एकच आहेत म्हणून स्वरूपतः अर्थशास्त्र व धर्मशास्त्र यांत कांहीं विशेष नाहीं तथापि प्रमेयरूप ( स्मृतिशास्त्रोक्त ) जो धर्म तो प्रधान ( मुख्य ) आहे, आणि अर्थ ( राजनीति वगैरे अर्थविचार ) अप्रधान ( गौण ) आहे, म्हणून अर्थशास्त्रापेक्षां धर्मशास्त्र बलवत्तर असा त्याचा अभिप्राय. सर्वांपेक्षां धर्म प्रधान असें याज्ञवल्क्य धर्मशास्त्राचे आरंभीं पहिल्या स्मृतीच्या टीकेंत स्पष्ट दर्शविलें आहे.

तस्मात् **धर्मशास्त्र** आणि **अर्थशास्त्र** ह्यांचा परस्पर विरोध आला असतां **अर्थशास्त्राचा** बाधच होतो, तेथें **विषयव्यवस्था** करूं नये. आणि **विकल्प** म्हणजे दोन पक्षहि समजूं नयेत, ह्याविषयीं उदाहरण कोणतें तें सांगतो.

अर्थशास्त्राचें उदाहरण.

**स्मृति**– ११ गुरु किंवा बाल किंवा वृद्ध अथवा साधारण ब्राह्मण अथवा बहुश्रुत ब्राह्मण असा जरी आहे आणि तो **आततायी** आला असतां विचार न करतां त्याला मारावेंच. प्रसिद्धपणें किंवा गुप्तपणें; आततायीचा वध झाला असतां मारणाराला कोणताही दोष लागत नाहीं. कारण, ह्याचा राग त्याच्या रागाला मारितो. ( हा त्याला मारितो असें नाहीं )

**स्मृति**– तसेंच रणांत आलेला **आततायी** जरी वेदपारग असला तरी त्याचा वध करावाच, वध केला असतां ब्रह्महत्येचा दोषी होत नाहीं, इत्यादिक ( स्मृतिवचन ) **अर्थशास्त्र** आहे.

धर्मशास्त्राचें उदाहरण.

**स्मृति**– १२ जर न कळतां ब्रह्महत्या घडली तर तीविषयीं **प्रायश्चित्त**द्वारा शुद्धि सांगितली आहे, परंतु जाणून ब्रह्महत्या केली तर तें पाप कोणत्याहि प्रायश्चित्तानें जात नाहीं; इत्यादिक **धर्मशास्त्र** आहे.

१३ असा **धर्मशास्त्र** व **अर्थशास्त्र** यांचा परस्पर विरोध आला असतां **धर्मशास्त्रच** प्रबळ हें युक्त जाणावें.

खरें परंतु हें ( वरच्या २ स्मृतींचें ) उदाहरण येथें संभवत नाहीं; कारण, हे (११ वा व १२ वा अंक) **एकार्थविषयक**[१] नाहींत, ह्यास्तव अशा ठिकाणीं दोहों स्मृतींचा परस्पर विरोधच येत नाहीं; याकरितां एथें ' अमुक वचन प्रबळ व अमुक निर्बळ ' हा विचार करण्यास अवसरच नाहीं.

ह्याविषयीं आणखी **उपपादन** करितो.

द्विजांनीं शस्त्र धारण करण्याचा समय.

**स्मृति**–१४ जेथें धर्माचा उपरोध होत आहे अशा स्थळीं द्विजांनीं शस्त्र धारण करावें, असा उपक्रम करून, आपल्या संरक्षणार्थ, यज्ञसामग्रीच्या रक्षणार्थ, तसेंच युद्धांत आणि स्त्री ब्राह्मण ह्यांच्या वधनिवारणासाठीं, आततायीला **अकूट** शस्त्रानें मारणारा दंडास पात्र होत नाहीं. "असें सांगून" त्याचा **अर्थवाद** दाखविण्यासाठीं हा (११ वा) अंक सांगितला. ( तो अर्थवाद असा कीं ) **गुरु**, **बाल** वगैरे हे जरी सर्वथा अवध्य आहेत तथापि ते **आततायी** आहेत तर त्यांचा वध करावाच, ह्यावरून इतरांचा वध करावा हें सांगावयास नको, असें **कैमुतिक न्यायें**करूनच सिद्ध होतें.

ह्यास्तव असा **अर्थवाद** सांगितल्यावरून **गुरु**, **बाल**, **बहुश्रुत** इत्यादिकांचा वध क-

---

१ एकार्थविषयक म्हणजे ज्याविषयीं एका स्मृतींत विधि सांगितला, त्याच अर्थाविषयीं अन्य स्मृतींत निषेध असतो अशीं जीं वचनें तीं एथें एकार्थविषयक नाहींत. म्हणजे असें ११ व्या अंकांतील स्मृति अर्थवादरूप आहे म्हणून तिला स्वार्थाविषयीं प्रामाण्य नाहीं.

रावा असें त्या (११ व्या अंकांतल्या) वचनाचें तात्पर्य नव्हे. कारण, त्या वचनांत 'वा' शब्द आहे व 'अपि' शब्द आहे त्यास वैयर्थ्यापत्ति येईल.

सुमंतुवचनहि असेंच आहे कीं, आततायीच्या वधाविषयीं दोष नाहीं, परंतु गाय, ब्राह्मण ह्यांच्या वधावांचून.

**मनुहि**–आचार्य, प्रवक्ता, माता, पिता, गुरु, ब्राह्मण, गाई, आणि सर्व जातीचे तपस्वी यांची हिंसा करूं नये.

असा आततायी होऊन आलेल्या आचार्यादिकांचे हिंसेचा निषेध केल्यावरून हें (वरचें) वचन सार्थक होतें. अन्यथा केवळ हिंसेचा निषेध सामान्य शास्त्रानेंच सिद्ध आहे. (मग एथें सांगण्यानें पुनरुक्तिदोष मात्र येतो.) आततायीचा वध केला असतां वधकर्ता दोषी होत नाहीं, असें जें (११ व्या अंकांतलें) वचन तेंहि ब्राह्मण, प्रवक्ता इत्यादिकांहून इतर जे आततायी त्यांविषयींच जाणावें. कारण,

आततायीचे प्रकार.

**स्मृति**– १५ आग लावणारा, विषप्रयोग करणारा, शस्त्रधारी, द्रव्यापहार करणारा, स्त्रीचें हरण करणारा, आणि क्षेत्राचें हरण करणारा, असे हे सहा **आततायी** आहेत.

**स्मृति**–तसेंच तरवार, विष, अग्नि ह्यांकडून घात करणारा; शाप देण्याविषयीं हात उगारणारा; मंत्रप्रयोगानें मारणारा; राजाजवळ चहाडी करणारा; भार्येचा अतिक्रम करणारा; आणि दुसऱ्याचें छिद्र पाहणारा इत्यादि सर्व आततायी जाणावे.

आततायीचा वध न करितां निवारण करावें.

१६ असे सामान्यतः आततायी दाखविले, ह्यास्तव आत्मसंरक्षणासाठीं ब्राह्मणादिक आततायीला मारूं नये, परंतु निवारण करावें; इतक्या हेतूनें निवारण करूं गेलें असतांहि प्रमादानें कदाचित् मारले जातील तर तेथें लघु प्रायश्चित्त[1] द्यावें, राजदंड नाहीं, असा निश्चय समजावा. तस्मात्[2] एथें (३ ऱ्या अंकावर) दुसरें उदाहरण सांगितलें पाहिजे तें सांगतो.

धर्मशास्त्र व अर्थशास्त्र ह्यांना विरोध.

**स्मृति**– १७ सुवर्ण, भूमि, ह्यांच्या लाभाहून मित्रलाभ श्रेष्ठ, ह्यास्तव मित्रलाभाविषयीं यत्न करावा. "हें **अर्थशास्त्र**" आणि राजानें धर्मशास्त्रास अनुसरून प्रीति, द्वेष ह्यांचा त्याग करून व्यवहार पहावा, हें **धर्मशास्त्र**. ह्यांचा क्वचित् व्यवहारीं विरोध येतो. तो असा;–चतुष्पाद व्यवहार[3] चालू झाल्यानंतर वादिप्रतिवादींतून कोणाएकाचा पक्ष धरिल्यानें मित्रप्राप्ति होते, परंतु धर्मशास्त्राप्रमाणें चौकशी होत नाहीं. आणि दुसऱ्या पक्षकाराचा पक्ष धरिल्यानें धर्मशास्त्राप्रमाणें वादाचा निर्णय होतो, परंतु मित्रलाभ होत नाहीं.

---

१ लघु प्रायश्चित्त म्हणजे कामतः ब्रह्महत्या करणारास जें द्वादशाब्द प्रायश्चित्त सांगितलें त्याचें अर्ध; म्हणजे सहा वर्षांचें प्रायश्चित्त.– (प्रायश्चित्तमयूख). २ ११ व्या व १२ व्या अंकाचें उदाहरण सांगितलें तें एकार्थविषयक नव्हे म्हणून तें लागू पडत नाहीं, अतएव दुसरें उदाहरण सांगतो. ३ हा चतुष्पाद व्यवहार पहिल्या प्रकरणाचे १३ व्या शाखेचे ९ व्या अंकांत सांगितला आहे.

तर अशा स्थळीं अर्थशास्त्राहून धर्मशास्त्र बलवत्तर समजावें, या कारणास्तवच धर्मशास्त्र व अर्थशास्त्र ह्या दोघांचा कोणत्या एका विषयांत परस्पर विरोध येईल तेव्हां अर्थशास्त्रास अनुसरून निर्णय करणारास मोठें द्वादशवार्षिक प्रायश्चित्त आपस्तंबानें सांगितलें आहे. २१

---

**प्रमाणं लिखितं भुक्तिः साक्षिणश्चेति कीर्तितं ।**
**एषामन्यतमाभावे दिव्यान्यतममुच्यते ॥ २२ ॥**

ततोऽर्थी लेखयेत्सद्यः प्रतिज्ञातार्थसाधनमित्युक्तम् किं तत्साधनमित्यपेक्षित आह । प्रमीयते परिच्छिद्यतेनेनेति प्रमाणं । तच्च द्विविधं मानुषं दैविकं चेति । तत्र मानवं त्रिविधं लिखितं भुक्तिः साक्षिणश्चेति कीर्तितं महर्षिभिः । तत्र लिखितं द्विविधं । शासनं चीरकं चेति । शासनमुक्तलक्षणं । चीरकं तु वक्ष्यमाणलक्षणं । भुक्तिरुपभोगः । साक्षिणो वक्ष्यमाणस्वरूपप्रकाराः । ननु लिखितस्य साक्षिणां च शब्दाभिव्यक्तिद्वारेण शाब्देऽन्तर्भावाद्युक्तं प्रामाण्यं । भुक्तस्तु कथं प्रामाण्यम् । उच्यते । भुक्तिरपि कैश्चिद्विशेषणैर्युक्ता स्वस्वहेतुभूतक्रयादिकमव्यभिचारादनुमापयन्त्यनुपपद्यमाना वा कल्पयन्तीत्यनुमानेनार्थापत्तौ चान्तर्भवतीति प्रमाणमेव । एषां लिखितादीनां त्रयाणामन्यतमस्याप्यभावे दिव्यानां वक्ष्यमाणस्वरूपभेदानामन्यतमं जातिदेशकालद्रव्याद्यपेक्षया प्रमाणमुच्यते । मानुषाभाव एव दिव्यस्य प्रामाण्यमस्मादेव वचनादवगम्यते दिव्यस्य स्वरूपप्रामाण्ययोरागमगम्यत्वात् अतश्च यत्र परस्परविवादेन युगपद्धर्माधिकारिणं प्राप्तयोरेको मानुषीं क्रियामपरस्तु दैवीमवलंबते तत्र मानुष्येव ग्राह्या ।

तथा च कात्यायनः । यद्येको मानुषीं ब्रूयादन्यो ब्रूयात्तु दैविकीं । मानुषीं तत्र गृह्णीयान्न तु दैवीं क्रियां नृप इति । यत्रापि प्रधानैकदेशसाधनं मानुषं संभवति तत्रापि न दैवमाश्रयणीयं । यथा रूपकशतमनया वृद्ध्या गृहीत्वायं न प्रयच्छतीत्यभियोगापन्हवे ग्रहणसाक्षिणः सन्ति नो संख्यायां वृद्धिविशेषे वा अतो दिव्येन भावयामीत्युक्ते तत्रैकदेशविभावितन्यायेनापि संख्यावृद्धिविशेषसिद्धेर्न दिव्यस्यावकाशः ।

उक्तं च कात्यायनेन । यद्येकदेशव्याप्तापि क्रिया विद्येत मानुषी । सा ग्राह्या न तु पूर्णापि दैविकी वदतां नृणामिति । यत्तु गूढसाहसिकानां तु प्राप्तं दिव्यैः परीक्षणमिति तदपि मानुषासंभवकृतनियमार्थं । यदपि नारदेनोक्तम् । अरण्ये निर्जने रात्रावन्तर्वेश्मनि साहसे । न्यासापन्हवने चैव दिव्या संभवति क्रियेति तदपि मानुषासंभव एव । तस्मान्मानुषाभाव एव दिव्येन निर्णय इत्यौत्सर्गिकमस्य चापवादो दृश्यते ।

प्रक्रांते साहसे वादे पारुष्ये दण्डवाचिके । बलोद्भूतेषु कार्येषु साक्षिणो दिव्यमेव चेति ।

तथा लेख्यादीनामपि क्वचिन्नियमो दृश्यते । यथा पूगश्रेणीगणादीनां या स्थितिः परिकीर्तिता । तस्यास्तु साधनं लेख्यं न दिव्यं न च साक्षिणः । तथा द्वारमार्गक्रि-

याभोगजलवाहादिषु क्रिया। भुक्तिरेव तु गुर्वी स्यान्न दिव्यं न च साक्षिणः॥ दत्तादत्तेथ भृत्यानां स्वामिना निर्णये सति। विक्रयादानसंबन्धे क्रीत्वा धनमनिच्छति। द्यूते समाह्वये चैव विवादे समुपस्थिते। साक्षिणः साधनं प्रोक्तं न दिव्यं न च लेख्यकमिति॥ २२॥

शाखा ७ वी.

( १ ल्या प्रकरणांतील १३ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत सांगितलें आहे कीं') नंतर "वादीनें आपल्या वादाचा पुरावा असेल तो तत्काल लिहून द्यावा." तो पुरावा कोणता तो एथें सांगतो.

**मूलार्थ**—लेख, भोगवटा आणि साक्षी असीं तीन **प्रमाणें** सांगितलीं आहेत; यांतून एखादें न मिळेल तर दिव्य **प्रमाणांतून** एखादें घ्यावें.

**टीकार्थ**– १ प्रमाण म्हणजे ज्यावरून यथार्थ निर्णय करितां येतो तें. तें दोन प्रकारचें; **मानुष** आणि दिव्य. त्यांत **मानुषप्रमाण** तीन प्रकारचें; लेख, भोग आणि साक्षी. त्यांत लेख दोन प्रकारचा; **शासन**, (सरकारी सनद) व **जानपद**. पैकीं **शासन** लेखाचें स्वरूप पूर्वींच (१ ल्या अध्यायांत राजधर्मप्रकरणाच्या १०, ११, १२ ह्या तीन वचनांहींकरून) सांगितलें आहे. जानपदाचें स्वरूप पुढें (६ व्या प्रकरणांत) सांगितलें आहे. भोग ह्मणजे (स्वसत्तापूर्वक) भोगवटा, साक्षींचें लक्षण पुढें (६ व्या प्रकरणांत) सांगितलें आहे.

प्रमाणाचें निरूपण.

२ **शंका**—लेख व साक्षी हे शब्दद्वारा प्रमाण होतात हें योग्यच आहे, परंतु भोगवटा कोणत्या रीतीनें **प्रमाण** होईल?

३ **समाधान**—भोगवटाहि कांहीं विशेषणांनीं विशिष्ट होत्साता स्वत्वाचें साधन जें प्रतिग्रह, क्रय इत्यादिक, तें सामानाधिकरण्येंकरून दाखवितो. ह्यास्तव भोगवट्याचा अंतर्भाव अनुमान किंवा अर्थापत्ति ह्यांत आहे, ह्मणून भोगवटाहि **प्रमाण** होतो.

लेख साक्षी यांचा शब्दप्रमाणांत अंतर्भाव.

---

१ आचार अ. १ शासन—सनद म्हणजे राजानें निबंध (कर, वाव, जकात वगैरे) किंवा भूमि किंवा जें कोणास दान अथवा अन्यप्रकारानें इनाम वगैरे दिलें असेल तें पुढें होणारे राजे ह्यांनीं अविच्छिन्न चालवावें एतदर्थ जो त्याजबद्दल लेख करून दिला जातो. तो असा कीं, राजानें आपल्या वंशाचे शौर्यौदार्यादिगुणपूर्वक आपल्या तीन पूर्वजांचीं नांवें व आपलें नांव व दिलेलें जें भूमि किंवा निबंध त्याचें परिमाण. म्हणजे असें, निबंध असल्यास अमुक बाबेस अमुक रुपये (शेंकडा साहोत्रा, दाहोत्रा वगैरे) किंवा अमुक उत्पन्नास अमुक उत्पन्न, भूमि असल्यास अमुक नदीचे दक्षिणेस व अमुक खुणेपासून अमुक विघे, पश्चिमेस व अमुक लांबीरुंदीचें क्षेत्र किंवा गांव, अमुक शकाचे अमुक सालीं, अमुक पर्वणीस, किंवा अमुक कामानिमित्त अमुकास दिलें असें असें पटावर किंवा ताम्रपटावर लिहून अमुकाचा पुत्र जो अमुक नांवाचा जो मी त्या मला हें मान्य आहे असें स्वहस्तानें लिहून वर आपल्या मुद्रेनें चिन्हित करून दिला जातो तें.—(सुबोधिनी.)

२ यथार्थ ज्ञान होण्यास जें साधन तें प्रमाण म्हटलें आहे. जसें—पांढरा, पिंवळा रंगयुक्त पदार्थाचें ज्ञान अथवा मधुर, आंबट इत्यादि रसाचें यथार्थ ज्ञान होण्यास नेत्र इंद्रिय इत्यादि साधन आहे ह्यास्तव तीं तीं

४ लेख, भोगवटा, आणि साक्षी ह्या तीन प्रमाणांतून एखादेंहि **प्रमाण** (पुरावा) न मिळे तर, ज्यांचें स्वरूप व लक्षण पुढें सांगितलें आहे, त्या दिव्यांतून एखादें दिव्य जात, देश, काल, द्रव्य इत्यादिकांच्या तारतम्यानें **प्रमाण** योजावें.

मानुषप्रमाण नच मिळेल तर दिव्य.

५ तस्मात् **मानुषप्रमाणा**च्या अभावीं **दिव्यप्रमाण** घ्यावें. असें ह्याच वचनावरून अवगत होतें. कारण, दिव्याचें स्वरूप व प्रामाण्य हीं शास्त्रगम्य आहेत, ह्यास्तव परस्पर विवाद करणारे दोघे एकदांच न्यायाधीशाकडे फिर्याद आले असतां, त्यांतून जरी एक **मानुषप्रमाण** दाखवितो, आणि दुसरा **दिव्यप्रमाण** करूं इच्छितो, तरी **मानुषप्रमाणच** घ्यावें.

**कात्यायन**–जर एक **मानुषप्रमाण** दाखवितो व दुसरा दिव्य करितो तर राजानें **मानुषप्रमाण** घ्यावें, दिव्य घेऊं नये.

६ जेथें फिर्यादीच्या रकमांपैकीं एकदेशींहि जरी **मानुषप्रमाण** संभवलें तरी तेथें **दिव्यप्रमाण** घेऊं नये. जसें; ह्यानें मजपासून १०० रुपये अमुक व्याजानें घेतले आहेत, ते हा परत देत नाहीं, अशी फिर्याद केली असतां प्रतिवादीनें फिर्यादींतील दावा नाकबूल केल्यावरून वादी ह्मणतो कीं, रुपये ह्यानें घेतले ह्याविषयीं साक्षी आहेत, परंतु अमुक घेतले, व अमुक व्याज कबूल केलें, ह्याविषयीं साक्षी नाहींत, ह्यास्तव तें मी दिव्य करून शाबीत करितों. तर मुदलाविषयीं साक्षिप्रमाणाचा पुरावा झाला, तितक्यानेंच संख्येची व व्याजाची शाबिती झाली असें समजावें; दिव्यप्रमाणाची गरज नाहीं.

वादाच्या एकदेशीं जरी मानुषप्रमाण मिळेल तरी दिव्यप्रमाण घेऊं नये.

**कात्यायनानें**हि असेंच सांगितलें आहे कीं, दाव्याच्या एकदेशीं जरी मानुषप्रमाण मिळेल तरी तेंच घ्यावें, दिव्यप्रमाण सर्वांशीं पुरावा करावयाजोगें असलें तरी तें घेऊं नये.

**स्मृति**–७ गुप्तरूपानें जे साहस करणारे त्यांची चौकशी **दिव्यप्रमाणानें** करावी, असें जें सांगितलें तेंहि **मानुषप्रमाणा**च्या अभावींच जाणावें.

---

नेत्र इत्यादि इंद्रियें प्रत्यक्ष ज्ञानाविषयीं प्रमाण होत. प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शाब्द, अर्थापत्ति, आणि अनुपलब्धि अशीं सहा प्रमाणें धर्ममीमांसा शास्त्रांत गणलीं आहेत. त्यांपैकीं लेख व साक्षी यांचा अंतर्भाव शाब्द प्रमाणांत जसा होतो, तद्वत् भोगवट्याचा अंतर्भाव अनुमानांत अथवा अर्थापत्तिप्रमाणांत होतो. एक पदार्थ पाहून त्यावरून दुसऱ्या अप्रत्यक्ष पदार्थाचा जो निश्चय होतो त्याला अनुमान म्हणतात. जसें, दूर पर्वतावर धूम पाहून तेथें अग्नि आहे असा निश्चय होतो तद्वत् बिनहरकत बहुत वर्षांपासून अविच्छिन्न चाललेला भोगवटा पाहून त्यावरून हें क्षेत्र ह्या मनुष्यानें क्रयादिसंपादित असावें. कारण, ह्याचा बिनहरकत चिरकाळ उपभोग आहे म्हणून; हें अनुमान. अथवा ह्या भूमीचा बिनहरकत व बहुकाळ हा उपभोग करीत आहे ह्यावरून ही भूमि ह्याची क्रयप्रतिग्रहादिसंपादित आहे. जर ही भूमि ह्याची क्रयप्रतिग्रहादिसंपादित नसती तर ह्याचा बिनहरकत बहुकाळ उपभोग घडला नसता ही अर्थापत्ति. एवंच ह्या दोहों प्रमाणांत भोगाचा अंतर्भाव आहे म्हणून भोगही प्रमाणच आहे.

१ कारण, दृष्टप्रमाण संभवत असतां अदृष्टप्रमाण घेणें अन्याय आहे, म्हणून दिव्याचें स्वरूप आणि प्रमाण हीं शास्त्रगम्य आहेत, ह्यास्तव जेथें दृष्टप्रमाण न मिळेल तेथें दिव्यप्रमाण योजावें.– सुबोधिनी.

**नारद**–अरण्यांत, निर्जनप्रदेशीं, रात्रीं, अंतर्गृहांत साहस करणारा; व ठेवीचा अपहार करणारा ह्यांविषयीं दिव्यप्रमाण घेऊनच वादाचा निर्णय करावा.

असें जें वचन तेंहि **मानुषप्रमाणाच्या** अभावींच समजावें. तस्मात् **सर्वथाच** जर **मानुषप्रमाण** नसेल तरच दिव्यप्रमाणेंकरून निर्णय करावा, हें सामान्यतः सिद्ध झालें.

परंतु ह्याचें बाधक वचन पाहण्यांत येतें, तें असें:–

**स्मृति**–८ साहस, वाक्पारुष्य, दंडपारुष्य आणि दुसरींहि बलात्कारानें केलेलीं कार्यें ह्यांविषयीं दिव्यप्रमाणच साक्षी.

तसाच लेख्यादिकांविषयींहि कांहीं व्यवहारीं नियम पाहण्यांत येतो, तो असा;–

**स्मृति**–९ **पूग, श्रेणी, गण** इत्यादिकांची जी स्थिति सांगितली आहे, तिजविषयीं **प्रमाण** लेखच, दिव्य नाहीं, व साक्षीहि नाहीं.

**स्मृति**– १० तसेंच द्वार, मार्ग, आंगण ( परुस ), पाणी जाण्याचा मार्ग (नळ मोरी ), इत्यादिक व्यवहारीं भोगवटाच बलवत्तर **प्रमाण** होय, दिव्य नाहीं व साक्षीहि नाहीं.

११ तसेंच *दत्तानपकर्म, दत्ताप्रदानिक, स्वामिपालविवाद, विक्रीयासंप्रदान, क्रीतानुशय, जुगार, पैज, हे वाद उपस्थित झाले असतां निर्णयाविषयीं साक्षीच **प्रमाण**, दिव्य व लेख हीं प्रमाण नाहींत. २२

---

## सर्वेष्वर्थविवादेषु बलवत्युत्तरा क्रिया ।

उभयत्र प्रमाणसद्भावे प्रमाणगतबलाबलविवेके चासति पूर्वापरयोः कार्ययोः कस्य बलीयस्त्वमित्यत आह। ऋणादिषु सर्वेष्वर्थविवादेषु उत्तरा क्रिया । क्रियत इति क्रिया कार्यं बलवती । उत्तरकार्ये साधिते तद्वादी विजयी भवति । पूर्वकार्ये सिद्धेपि तद्वादी पराजीयते । तद्यथा कश्चिद्ग्रहणेन धारणं साधयति कश्चित्प्रतिदानेनाधारणं तत्र ग्रहणप्रतिदानयोः प्रमाणसिद्धयोः प्रतिदानं बलवदिति प्रतिदानवादी जयति । तथा पूर्वं द्विकं शतं गृहीत्वा कालान्तरे त्रिकं शतमङ्गीकृतवान् तत्रोभयत्र प्रमाणसद्भावेपि त्रिशतग्रहणं बलवत् पश्चाद्भावित्वात्पूर्वबाधेनानुत्पत्तेः । उक्तं च । पूर्वाबाधेन नोत्पत्तिरुत्तरस्य हि सेत्स्यतीति ।

उभयपक्षींहि पुरावा असून त्यांतून सबळ कोणता व दुर्बळ कोणता ह्याचा विचार झाला नसतां दोहों पक्षांतून कोणता पक्ष सबळ तें सांगतो.

**मूलार्थ**– सर्व धनव्यवहारीं उत्तर पक्षाचें प्रमाण बलवत्तर.

**टीकार्थ**–१२ **ऋणादान** वगैरे सर्व धनव्यवहारीं उत्तरपक्ष म्हणजे दुसरा पक्ष शाबीत करणारा जय पावतो. पूर्व पक्ष (वादीचा पक्ष) शाबीत झाला तरी वादी पराजित होतो.

जसें;– सावकार ( कर्जदाऱ्याला कांहीं रुपये देऊन त्यापासून खत लिहून घेऊन

---

* ह्या अंकांवरून ती तीं प्रकरणें समजावीं.

त्यावरून ) रुपये दिलेले शाबीत करितो, आणि कर्जदारहि ( पावती दाखवून परत दिलेले शाबीत करितो, तर सावकाराजवळ खत व कर्जदाराजवळ पावती असा दोहों पक्षीं पुरावा असतांहि पावतीचा पुरावा बलवत्तर आहे, म्हणून पावती दाखविणारा जय पावतो.

( तसेंच कर्जदारानें सावकारापासून प्रथमतः) शेंकडा दुहोत्रा व्याजीं १०० ( रुपये ) घेऊन पुढें ( सावकाराच्या निकडीमुळें व आपल्या गरजेस्तव त्याच शेंकड्याला ) तिहोत्रा व्याज कबूल केलें; तर अशा स्थळीं उभयपक्षीं पुरावा असतांहि तिहोत्रा व्याजाची कबुलात ( उत्तरपक्ष ) च सबळ होय. कारण, हा नंतर केलेला व्यवहार आहे, व पूर्वींच्या वादाचा बाध केल्यावांचून उत्तरवादाची सिद्धि होत नाहीं असें आहे म्हणून.

स्मृत्यंतरींहि असेंच सांगितलें आहे कीं पूर्वपक्षाचा बाध केल्यावांचून उत्तरपक्षाची सिद्धि होत नाहीं.

## आधौ प्रतिग्रहे क्रीते पूर्वा तु बलवत्तरा ॥ २३ ॥

अस्यापवादमाह । आध्यादिषु त्रिषु पूर्वमेव कार्यं बलवत् । तद्यथा । एकमेव क्षेत्रमन्यस्याधिं कृत्वा किमपि गृहीत्वा पुनरन्यस्याप्याधाय किमपि गृह्णाति तत्र पूर्वस्यैव तद्भवति नोत्तरस्यैवं प्रतिग्रहे क्रये च ।

नन्वाहितस्य तदानीमस्वत्वात्पुनराधानमेव न संभवति । एवं दत्तस्य च क्रीतस्य दानक्रयौ नोपपद्येते तस्मादिदं वचनमनर्थकम् । उच्यते । अस्वत्वेपि मोहात्कश्चिल्लोभाद्वा पुनराधानादिकं करोति तत्र पूर्वं बलवदिति न्यायमूलमेवेदं वचनमित्यचोद्यम् ॥२३

शाखा ८ वी.

ह्याचा ( १२ व्या अंकाचा ) अपवाद सांगतो.

**मूलार्थ**– आधि, प्रतिग्रह आणि क्रीत ह्या व्यवहारीं पूर्वी झालेला व्यवहार बलवत्तर होय.

**टीकार्थ**–१ आधि (गहाण), प्रतिग्रह, खरेदी ह्या तीन व्यवहारीं पूर्वी झालेला व्यवहारच सबळ प्रमाण होतो. तो प्रकार असा;–एकच क्षेत्र प्रथमतः एका सावकाराकडे गाहाण ठेवून कांहीं द्रव्य घेऊन पुनः तेंच क्षेत्र दुसऱ्या सावकारापाशीं गाहाण ठेवून आणखी द्रव्य घेतो तर अशा व्यवहारीं प्रथमतः ज्यापाशीं गहाण टेविलें आहे त्याचेंच तें गहाण होतें, दुसऱ्या गाहाण ठेवणाराचें नाहीं. ह्याप्रमाणेंच प्रतिग्रह, खरेदी ह्यांविषयीं जाणावें.

२ **शंका**– एकापाशीं गाहाण टेविल्यानंतर तें सुटेपर्यंत त्याजवर ( मालकाचें) स्वत्वच नाहीं, ह्यास्तव त्याचें पुनः गाहाण ठेवणेंच संभवत नाहीं. ह्याप्रमाणेंच दिलेल्याचें पुनः दान व विकलेल्याचा पुनः विक्रय हीं संभवत नाहींत. तस्मात् हें ( १ ल्या अंकाचें ) वचन निरर्थक झालें.

३ **समाधान**– एकाजवळ गाहाण ठेविल्यावर जरी मालकाचें त्याजवर स्वत्व नाहीं तथापि अज्ञानानें किंवा लोभानें जर एखादा तेंच क्षेत्रादिक पुनः ( दुसऱ्याजवळ ) गाहाण

वगैरे ठेवितो. तर तशा स्थळीं पहिल्यानें गाहाण ठेवून घेणाराचा पुरावा बलवत्तर आहे, म्हणून न्यायमूलच हें वचन आहे, असें जाणावें. २३

---

पश्यतोऽब्रुवतो भूमेर्हानिर्विंशतिवार्षिकी।
परेण भुज्यमानाया धनस्य दशवार्षिकी॥ २४॥

भुक्तेः कैश्चिद्विशेषणैर्युक्तायाः प्रामाण्यं दर्शयिष्यन् कस्याश्चिद्भुक्तेः कार्यान्तरमाह। परेणासंबन्धेन भुज्यमानां भुवं धनं वा पश्यतः अब्रुवतः मदीयेयं भूः न त्वया भोक्तव्येति अप्रतिषेधयतः तस्या भूमेर्विंशतिवार्षिकी अप्रतिरवं विंशतिवर्षोपभोगनिमित्ता हानिर्भवति। धनस्य तु हस्त्यश्वादेर्दशवार्षिकी हानिः।

नन्वेतदनुपपन्नम्। न ह्यप्रतिषेधात्स्वत्वमपगच्छति। अप्रतिषिद्धस्य दानविक्रयादिवत् स्वत्वनिवृत्तिहेतुत्वस्य लोकशास्त्रयोरप्रसिद्धत्वात् नापि विंशतिवर्षोपभोगात् स्वत्वम्। उपभोगस्य स्वत्वेऽप्रमाणत्वात् प्रमाणस्य च प्रमेयं प्रत्यनुत्पादकत्वात्। रिक्थक्रयादिषु स्वत्वकारणहेतुषु अपाठाच्च। तथाहि। स्वामिरिक्थक्रयसंविभागपरिग्रहाधिगमेषु ब्राह्मणस्याधिकं लब्धं क्षत्रियस्य विनिर्जितम् निर्विष्टं वैश्यशूद्रयोरित्यष्टावेव स्वत्वकारणहेतून् गौतमः पठति न भोगम्। न चेदमेव वचनं विंशतिवर्षोपभोगस्य स्वत्वोत्पत्तिहेतुत्वं प्रतिपादयतीति युक्तम् स्वत्वस्य स्वत्वहेतूनां च लोकप्रसिद्धत्वेन शास्त्रैकसमधिगम्यत्वाभावात्। एतच्च विभागप्रकरणे निपुणतरमुपपादयिष्यते। गौतमवचनं तु नियमार्थं।

अपि च। अनागमं च यो भुङ्क्ते बहून्यब्दशतान्यपि। चौरदण्डेन तं पापं दण्डयेत्पृथिवीपतिरित्येतदनागमोपभोगस्य स्वत्वहेतुत्वे विरुध्यते न चानागमं तु यो भुङ्क्ते इत्येतत्परोक्षभोगविषयं। पश्यतो ब्रुवत इति प्रत्यक्षभोगविषयमिति युक्तं वक्तुं। अनागमं तु यो भुङ्क्ते इत्यविशेषाभिधानात्। नोपभोगे बलं कार्यमाहर्त्रा तत्सुतेन वा। पशुस्त्रीपुरुषादीनामिति धर्मो व्यवस्थित इति कात्यायनवचनाच्च। समक्षभोगे च हानिकरणाभावेन हानेरसंभवात् न चैतन्मन्तव्यम्। आधिप्रतिग्रहक्रयेषु पूर्वस्याः क्रियायाः प्राबल्यादपवादेन भूविषये विंशतिवर्षोपभोगयुक्तायाः धनविषये दशवर्षोपभोगयुक्तायाः उत्तरविषयक्रियायाः प्राबल्यमनेनोच्यत इति। यतस्तेषूत्तरैव क्रिया तत्त्वतो नोपपद्यते स्वमेव ह्याधेयं देयं विक्रेयं च भवति। न चाहितस्य दत्तस्य विक्रीतस्य वा स्वत्वमस्ति। अस्वत्वस्य दाने प्रतिग्रहे च दण्डः स्मर्यते। अदेयं यश्च गृह्णाति यश्चादेयं प्रयच्छति। उभौ तौ चौरवच्छास्यौ दाप्यौ चोत्तमसाहसमिति। तथाध्यादीनां त्रयाणामपवादत्वेऽस्य श्लोकस्याधिसीमादीनामुत्तरश्लोकेऽपवादो नोपपद्यते। त-

---

१ येथें न्याय म्हणजे एकाजवळ गहाण ठेवलेल्याचें, दिलेल्याचें, विकलेल्याचें पुनः गाहाण, दान, विक्रय करण्याविषयीं मालकाचें स्वत्व संभवत नाहीं अशी रीति आहे हाच न्याय. (सुबोधिनी).

स्माद्भूम्यादीनां हानिरनुपपन्नैव । नापि व्यवहारहानिः । यतः । उपेक्षां कुर्वतस्तस्य तूष्णींभूतस्य तिष्ठतः । काले विपन्ने पूर्वोक्ते व्यवहारो न सिध्यतीति नारदेनोपेक्षायां लिङ्गाभावकृता व्यवहारहानिरुक्ता न तु वस्त्वभावकृता । तथा मनुनापि । अजडश्चेदपौगण्डो विषये चास्य भुज्यते । भग्नं तद्व्यवहारेण भोक्ता तद्धनमर्हतीति व्यवहारतो भङ्गो दर्शितो न वस्तुतः । व्यवहारभङ्गश्चैवं भोक्ता किल वदति । अजडोयमपौगण्डो बालोयमस्य सन्निधौ विंशतिवर्षाण्यप्रतिरवं मया भुक्तं तत्र बहवः साक्षिणः सन्ति यद्यस्य स्वमन्यायेन मया भुज्यते तदायं किमियेतावन्तं कालमुदास्ते इति तत्र चायं निरुत्तरो भवतीति । एवं निरुत्तरस्यापि वास्तवो व्यवहारो भवत्येव छलं निरस्य भूतेन व्यवहारान्नयेन्नृप इति नियमात् ।

अथ मतं यद्यपि न वस्तुहानिर्नापि व्यवहारहानिस्तथापि पश्यतोऽप्रतिषेधतो व्यवहारहानिशङ्का भवतीति तन्निवृत्तये तूष्णीं न स्थातव्यमित्युपदिश्यत इति तन्न न स्मार्तकालाया भुक्तेर्हानिशङ्काकारणत्वाभावात् तूष्णीं न स्थातव्यमित्येतावता तन्मात्राभिधित्सायां विंशतिग्रहणमविवक्षितं स्यात् । अथोच्यते । विंशतिग्रहणमूर्ध्वं पत्रदोषोद्भावननिराकरणार्थम् ॥

यथाह कात्यायनः । शक्तस्य संनिधावर्थो यस्य लेख्येन भुज्यते । विंशतिवर्षाण्यतिक्रान्तं तत्पत्रं दोषवर्जितमिति । तदपि न आध्यादिष्वपि विंशतेरूर्ध्वं पत्रदोषोद्भावननिराकरणस्य समत्वेनापवादासंभवात् ।

यथाह कात्यायनः । अथ विंशतिवर्षाणि आधिर्भुक्तः सुनिश्चितः । तेन लेख्येन तत्सिद्धिर्लेख्यदोषविवर्जिता । तथा । सीमाविवादे निर्णीते सीमापत्रं विधीयते । तस्य दोषाः प्रवक्तव्या यावद्वर्षाणि विंशतिरिति । एतेन धनस्य दशवार्षिकीत्येतदपि प्रत्युक्तं ।

तस्मादस्य श्लोकस्यान्योऽर्थो वक्तव्यः । उच्यते । भूमेर्धनस्य च फलहानिरिह विवक्षिता न वस्तुहानिर्नापि व्यवहारहानिः । तथाहि । निराक्रोशं विंशतिवर्षोपभोगादूर्ध्वं यद्यपि स्वामी न्यायतः क्षेत्रं लभते तथापि फलानुसरणं न लभते । अप्रतिषेधलक्षणात् स्वापराधादस्माच्च वचनात् । परोक्षभोगे तु विंशतेरूर्ध्वमपि फलानुसरणं लभत एव । पश्यत इति वचनात् । प्रत्यक्षभोगे च साक्रोशे अब्रुवत इति वचनात् । विंशतेः प्राक् प्रत्यक्षे निराक्रोशे च लभते विंशतिग्रहणात् ।

ननु तदुत्पन्नस्यापि फलस्य स्वत्वात्तद्धानिरनुपपन्नैव । बाढं तस्य स्वरूपाविनाशेन तथैवावस्थाने यथा तदुत्पन्नपूगपनसवृक्षादीनां यत्पुनस्तदुत्पन्नमुपभोगान्नष्टं तत्र स्वरूपनाशादेव स्वत्वनाशः । अनागमं तु यो भुङ्क्ते बहून्यब्दशतान्यपि । चौरदण्डेन तं पापं दण्डयेत्पृथिवीपतिरित्यनेन वचनेन निष्क्रयरूपेण गणयित्वा चौरवत्तत्समद्रव्यदानं प्राप्तं हानिर्विंशतिवार्षिकीति अपोद्यते । राजदण्डः पुनरस्त्येव विंशतेरूर्ध्वमपि । अनागमोपभोगादपवादाभावाच्च । तस्मात्स्वाम्युपेक्षालक्षणस्वापराधाद-

स्माच्च वचनाद्विंशतेरूर्ध्वं फलं नष्टं न लभत इति स्थितम्। एतेन धनस्य दशवार्षिकीत्येतदपि व्याख्यातम् ॥ २४ ॥

## शाखा ९ वी.

कांहीं विशेषणांनीं विशिष्ट असा भोगवटा प्रमाण, असें सांगण्याचे पूर्वीं कांहीं प्रकारचा भोगवटा दुसऱ्या कार्यास उपयोगी होतो, तें सांगतो.

**मूलार्थ**— आपल्या समक्ष स्थावराचा तिऱ्हाईत उपभोग करीत असतां मालक प्रतिबंध करीत नाहीं, अशीं वीस वर्षें गत झालीं तर मालकाच्या स्थावराची हानि होते. ह्याप्रमाणेंच जंगमाविषयीं दहा वर्षें गत झाल्यास ( जंगमाचीहि ) हानि होते.

**टीकार्थ**— १ तिऱ्हाईत मनुष्य मालकाच्या समक्ष अविच्छिन्न वीस वर्षें स्थावरमिळकतीचा व दहा वर्षें हत्ती, घोडा वगैरे जंगम मिळकतीचा उपभोग करीत आहे आणि मालक " माझी ही स्थावर मिळकत तूं वहिवाटूं नको " असा निषेध करीत नाहीं, तर अविच्छिन्न वीस वर्षें उपभोगिल्यामुळें मालकाची स्थावर मिळकतीवरील सत्ता दूर होऊन उपभोगणाराची सत्ता होते आणि जंगम मिळकत तर दहा वर्षें उपभोगिल्यामुळें हानि पावते ( म्हणजे उपभोगिणाराची होते ).

स्थावराचा वीस वर्षें व जंगमाचा दहा वर्षें भोगवटा झाला असतां ती मालकाचीं नाहींशीं होतात.

२ **शंका**— उपभोगणारास ( द्वाही वगैरे देऊन ) निषेध न केल्यानें मालकाचें स्वत्व ( मालकी ) नाहींसें होतें असें सांगणें सयुक्तिक नाहीं. कारण, दान, विक्रय इत्यादिक जसें मालकाच्या स्वत्वनाशास कारण होतें असें लोकांत व शास्त्रांत प्रसिद्ध आहे, तसें निषेध न करणें हेंहि एक स्वत्वनाशाचें कारण आहे असें लोकांत व शास्त्रांत प्रसिद्ध नाहीं.

३ वीस वर्षें भोगवटा झाला असतां उपभोगणाराचें स्वत्व उत्पन्न होतें असें म्हणावें तर असेंहि म्हणणें योग्य नाहीं. कारण, उपभोग स्वत्वाचा ज्ञापक आहे, उत्पादक नाहीं, आणि जिंदगी, खरेदी, विभाग, इत्यादिक जीं स्वत्व उत्पन्न होण्याचीं साधनें गौतमानें सांगितलीं आहेत, त्यांतहि भोग सांगितला नाहीं.

**गौतम**—जिंदगी ( रिक्थ ), खरेदी, वांटा, परिग्रह, निधिप्राप्ति, व ब्राह्मणाला प्रतिग्रहप्राप्त, क्षत्रियाला विजयप्राप्त, वैश्यांस वाढी दिढी, आणि शूद्रांस सेवालब्ध.

सत्ता उत्पन्न होण्याचीं साधनें आठ आहेत.

अशीं आठच स्वत्वोत्पत्तीचीं साधनें गौतम सांगतो, त्यांत उपभोग सांगत नाहीं.

---

१ कांहीं विशेषणांनीं विशिष्ट म्हणजे बिनहरकत चिरकालिक वगैरे पुढें ह्या प्रकरणाच्या ११ व्या शाखेच्या ३ ऱ्या अंकांत सांगितलेल्या विशेषणांनीं युक्त.– सुबोधिनी.

२ हानि पावते म्हणजे मालकाची सत्ता जाऊन उपभोग करणाराची सत्ता होते, असा अर्थ घेऊन येथें विचार चालला आहे, परंतु मालकास उत्पन्न मिळणार नाहीं असें पुढें १४ व्या अंकांत सांगितलें आहे.

३ ह्या वचनाचा स्पष्ट प्रकार दायविभाग प्रकरणीं १ ल्या शाखेच्या १८ व्या अंकांत सांगितला आहे.

४ वीस वर्षांचा भोगवटा **स्वत्व** उत्पन्न करितो असें हेंच (१ ल्या अंकाचें मूळ) वचन प्रतिपादन करितें, असें कदाचित् मानावें तर तें मानणें योग्य नाहीं. कारण, **स्वत्व** व **स्वत्वाचीं** कारणें लोकसिद्ध आहेत; केवळ शास्त्रगम्य नाहींत. म्हणून तीं वचनें सांगायास नकोत. हें दायविभागप्रकरणीं (१ ल्या शाखेंत) विस्तारेंकरून सांगितलें आहे. तरें गौतमवचनांत कां सांगितलीं झणाल तर इतकीं स्वत्वकारणें आहेत असा नियम बांधण्यासाठीं मात्र सांगितलीं.

५ दुसरें असें कीं, जर **आगमविरहित** भोगवटा सत्ता उत्पन्न होण्याविषयीं कारण मानिला, तर खालीं सांगितल्या स्मृतीस विरोध येतो.

**स्मृति**– जो दुसऱ्याचा (स्थावर किंवा जंगम) माल **आगमावांचून** शेंकडों वर्षें वहिवाटितो, त्याला राजानें, चोराच्या दंडानें शिक्षा करावी.

६ जर हें (वरचें) वचन मालकाच्या परोक्ष उपभोगाविषयीं, आणि ह्या शाखेच्या १ ल्या अंकांतलें वचन समक्ष उपभोगाविषयीं मानावें, तर असेंहि मानणें योग्य नाहीं. कारण, वरच्या स्मृतींत "समक्ष उपभोग किंवा परोक्ष उपभोग" असा विशेष निर्देश केला नाहीं, "आगमावांचून" असें सामान्यत्वेंकरून सांगितलें आहे.

**कात्यायन**वचनही असेंच आहे कीं, पशु, स्त्री, पुरुष, इत्यादिकांच्या ग्राहकानें किंवा त्याच्या पुत्रानें बलात्कारेंकरून त्याचा (पशु वगैरेचा) उपभोग घेऊं नये, असा धर्म व्यवस्थित आहे.

जरी समक्ष उपभोग केला तरी तो मालकाची सत्ता नाहींशी करण्याविषयीं कारण होत नाहीं. म्हणून स्वत्वहानि संभवत नाहीं.

७ "आधि, प्रतिग्रह, क्रीत ह्या व्यवहारीं **पूर्वपक्ष** सबळ" असें (८ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत) सांगितलें, त्याचें बाधक हें (९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचें) वचन आहे. म्हणजे एक स्थावर किंवा जंगम मिळकत एकापाशीं गहाण गुंतवून (तीच) दुसऱ्यापाशीं गहाण गुंतविली तर दुसरा गहाणदार जो त्यानें त्या स्थावराचा वीस वर्षें व जंगम धनाचा दहा वर्षें उपभोग केल्यामुळें **उत्तरपक्ष** (उपभोगणारा) जय पावतो, असें हें (९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचें मूळ) वचन प्रतिपादन करितें, असें मानावें तर तसेंहि मानतां येत नाहीं. कारण, एकापाशीं गहाण वगैरे ठेवलेलें तेंच दुसऱ्यापाशीं गहाण वगैरे करणें हा वस्तुतः **उत्तरपक्षच** होत नाहीं, कारण, जें आपलें असेल तेंच गाहाण ठेवावें, विकावें अथवा दान करावें, आणि गाहाण ठेविलेल्यावर, विकलेल्यावर, किंवा दान केलेल्यावर पूर्व मालकाचें **स्वत्वच** नाहीं, आणि ज्यावर आपली सत्ता नाहीं त्याचें दान करणारास व घेणारासहि दंड सांगितला आहे.

**स्मृति**– जें द्यावयास योग्य नव्हे तें देणारा व जें **प्रतिग्रहास** योग्य नव्हे तें घेणारा त्या दोघांसहि चोराप्रमाणें शिक्षा करून **उत्तम साहस** दंड करावा.

---

१ म्हणजे जर स्वत्वच व स्वत्वाचीं साधनें लोकसिद्ध आहेत तीं वचनेंकरून सांगावयास नकोत, मग गौतमानें कां सांगितलीं म्हणाल तर.

दुसरें असें कीं, जर हें (९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचें) वचन आधि, **प्रतिग्रह** आणि **क्रीत** ह्या तिहींचें (८ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचें ) बाधक मानिलें, तर ह्याचें (९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचें ) हि जें बाधक पुढें ( १० व्या शाखेच्या १ ल्या व २ ल्या अंकांत ) सांगितलें आहे त्याची उपपत्ति होणार नाहीं.

८ तस्मात् मालकाची स्थावर मिळकत परक्यानें वीस वर्षें उपभोग केल्यामुळें व जंगम मिळकत दहा वर्षें उपभोग केल्यामुळें हानि पावते, असें जें ( ९ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितलें आहे, त्याची उपपत्ति होत नाहीं, व **व्यवहारहानिहि** होत नाहीं, कारण,

**नारद**– उपेक्षा करून उगीच राहतो ( म्हणजे निषेध करीत नाहीं ) अशीं जर वीस वर्षें स्थावराविषयीं व दहा वर्षें जंगमाविषयीं अतिक्रांत झालीं तर मालकाचा वाद लागू होत नाहीं.

अशी नारदानें, उपेक्षा करण्याविषयीं योग्य कारण नसतां उपेक्षा करणाराची **व्यवहार-हानि** मात्र सांगितली, **वस्तुहानि** सांगितली नाहीं.

**मनूनेंहि** हा सज्ञान व **प्राप्तव्यवहार** असतां ह्याच्या समक्ष ज्या भूमि वगैरेचा उपभोग परक्यानें केला आणि त्याचा निषेध हा करीत नाहीं तर त्याची **व्यवहारहानि** होऊन तें द्रव्य उपभोगणाराचें होतें.

अशी व्यवहारहानि दाखविली; परंतु वस्तुहानि दाखविली नाहीं.

९ **व्यवहारहानि** म्हणजे अशी;–उपभोगणारा म्हणतो कीं, हा सज्ञान व **प्राप्तव्यवहार** असा असतां ह्याच्या समक्ष अविच्छिन्न बिनहरकत वीस वर्षें मी उपभोग करीत आलों, आणि ह्याविषयीं पुष्कळ साक्षीहि आहेत. जर ह्याचें द्रव्य ( स्थावर जंगम ) अन्यायानें मी उपभोग करीत आलों, तर हा इतके दिवस कां उदासीन ( निषेध केल्यावांचून ) राहिला. तेव्हां एथें मालक निरुत्तर होतो अशी व्यवहारहानि होते. परंतु ह्याप्रमाणें निरुत्तर झाला तरी त्याचा वास्तविक व्यवहार चालू होतोच. कारण, "राजानें व्यवहारांतलें कपट काढून वास्तवार्थ पाहून निर्णय करावा " असा नियम ( ह्या प्रकरणाच्या ६ व्या शाखेच्या १ ल्या अंकाच्या मूळवचनांत ) सांगितला आहे.

१० जरी त्या उपभोग केलेल्या द्रव्यावरील मालकाची सत्ता नाहींशी होत नाहीं व **व्यवहारहानिहि** होत नाहीं, तथापि पाहत असून हरकत न करणारा जो त्याचे व्यवहारहानीची शंका होईलच, ती न व्हावी म्हणून " उगीच राहूं नये." एतदर्थ हें ( ९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचें ) वचन सांगितलें असें म्हणावें, तर असेंहि नव्हे. कारण, **स्वत्वोत्पत्तीच्या शंकेविषयीं** [1]**स्मार्तकालिक** उपभोग कारण होत नाहीं. ( कारण, साक्षी वगैरेचा संभव आहे म्हणून.)

---

१ स्मार्तकालिक उपभोग म्हणजे हा माझें क्षेत्रादिक, प्रतिग्रहादिक स्वत्व कारण नसतां धटाईनें उपभोगीत आहे, असा स्मरणयोग्यकालिक भोगवटा.–( सुबोधिनी )

११ ( समक्ष उपभोग करीत असतां ) उगीच राहूं नये, इतकेंच सांगण्याचें प्रयोजन म्हणावें तर, वचनांत "वीस वर्षांचा" व "दहा वर्षांचा" असा निर्देश केला आहे तो निरुपयोगी होईल.

१२ वचनांत वीस वर्षांचा निर्देश अशासाठीं केला कीं, उपभोगणारापाशीं जें गहाणखत वगैरे पत्र ( दस्तैवज ) असेल त्यावर विसा वर्षांनंतर मालक दोषोद्भावन करूं लागेल तर लागू पडणार नाहीं. याविषयीं प्रमाण सांगतो.

उपभोगणारापाशीं लेख असेल तो वीस वर्षांपुढें निर्दोष होतो.

**कात्यायन**– मालक प्रतिबंध करावयास समर्थ असतांहि त्याच्या समक्ष ज्या लेखाच्या आधारानें उपभोग केला जातो तें पत्र ( उपभोगासुद्धां ) वीस वर्षें अतिक्रांत झाल्यावर निर्दोष होतें.

असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण, ९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचें बाधक असें "गहाण सीमा वगैरे" प्रतिपादक वचन पुढें ( १० व्या शाखेच्या १ ल्या व २ ऱ्या अंकांत ) सांगितलें आहे, तेथेंहि "वीस वर्षें झाल्यानंतर मालक पत्रावर दोषोद्भावन करूं लागेल तर चालणार नाहीं, हा न्याय लागू पडेल, सबब तें बाधक वचन संभवणार नाहीं.

**कात्यायन**– १३ वीस वर्षें गहाण अविच्छिन्न भोगिलें असतां त्या गहाणाच्या दस्तैवजानेंच उपभोगणाराची सत्ता सिद्ध होते, वीस वर्षांनंतर तें गहाणपत्र निर्दोष होतें. तसेंच सीमाविवादाचा निर्णय केल्यानंतर जें सीमापत्र केलें जातें, त्याविषयीं तक्रार करणें असल्यास वीस वर्षेंपर्यंत करावी, पुढें करूं नये.

शिवेच्या निवाडपत्राविषयीं.

ह्याप्रमाणेंच जंगमाच्या हानीविषयीं दहा वर्षांचा अवधि ( ९ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितला आहे, त्याचाहि निरास झाला.

तस्मात् ह्या ( ९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाच्या ) वचनाचा दुसरा अर्थ सांगितला पाहिजे, तो सांगतो.

१४ येथें वीस वर्षांनंतर स्थावराची व दहा वर्षांनंतर जंगमाची हानि होते, म्हणजे त्याचें उत्पन्न मालकास मिळणार नाहीं. ( भोगणारा घेईल ) असा अर्थ समजावा.

स्थावराचें उत्पन्न वीस वर्षांपुढें व जंगमाचें उत्पन्न दहा वर्षांपुढें मिळणार नाहीं.

सत्ता नाहींशी होते, किंवा व्यवहारहानि होते, असें नाहीं. म्हणजे असें;– बिनहरकत व मालकाचे समक्ष वीस वर्षें उपभोग झाल्यानंतरहि जरी मालक न्यायेंकरून आपलें क्षेत्रादिक पावतो, तथापि त्याचें उत्पन्न त्यास मिळणार नाहीं. कारण, निषेध ( ह्याही

१ वचनांत म्हणजे ९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे मूळवचनांत. २ गाहाणपत्र, दानपत्र, खरीदपत्र इत्यादिक. ३ येथें म्हणजे ९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे मूळवचनांत.

वगैरे ) न करणें हा मालकाचाच अपराध आहे म्हणून आणि हेंच ( ९ व्या शाखेंतील १ ल्या अंकाचें ) वचनहि त्यास प्रमाण आहे.

मालकाच्या असमक्ष भोगवटा असल्यास वीस वर्षांनंतर उत्पन्न मिळतें.

१५ मालकाचे असमक्ष भोगवटा आहे तर वीस वर्षांनंतरहि मालकास उत्पन्न मिळतेंच. कारण, त्याच ( ९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे ) वचनांत " मालकाच्या समक्ष " असें म्हटलें आहे.

समक्ष उपभोग करीत असून मालक निषेध करीत आहे तर, वीस वर्षांनंतरहि मालकास उत्पन्न मिळेल. कारण, त्याच ( १ ल्या ) अंकांत " माझें हें स्थावर तूं वहिवाटूं नको, असा निषेध करीत नाहीं तर " असें सांगितलें आहे म्हणून.

वीस वर्षांच्या आंत तर समक्ष उपभोग व बिनहरकत उपभोग, असला तरी उत्पन्न मिळतेंच. कारण, त्याच ( ९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे ) वचनांत वीस वर्षांचा अवधि दाखविला आहे म्हणून.

१६ शंका– क्षेत्रादिक द्रव्यावर जसी मालकाची सत्ता आहे, तसी त्या क्षेत्रादिकाच्या उत्पन्नावरहि सत्ता आहेच, मग " उत्पन्न मिळणार नाहीं " असें सांगणें अगदींच संभवत नाहीं.

१७ समाधान– खरें, परंतु त्या उत्पन्नाचा नाश न होतां तसेंच राहील तर; जसें त्या क्षेत्रादिकापासून उत्पन्न झाले जे सुपारी, फणस ( आंबा ) वगैरे वृक्ष त्यांवर मालकाची सत्ता आहे, तसें त्या वृक्षादिकांपासून उत्पन्न झालेलें जें ( फलादिक ) त्यावर सत्ता नाहीं. कारण, तें उत्पन्न उपभोगानें नष्ट झाल्यामुळें उत्पन्नावरची सत्ताहि उपभोगाबरोबर नाश पावली, ह्यास्तव उत्पन्न मिळणार नाहीं.

**स्मृति**– जो शेंकडों वर्षें आगमावांचून उपभोग करितो, त्या दुष्टाला राजानें चोराप्रमाणें शिक्षा करावी.

ह्या वचनावरून उपभोग करणारानें जें उत्पन्न उपभोगिलें असेल त्याचें मोल ठरवून तितकें द्रव्य त्यापासून घेऊन मालकास द्यावें असें प्राप्त झालें, परंतु " वीस वर्षें उपभोग झाल्यामुळें हानि पावतें," अशा १ ल्या अंकाचे वचनानें ह्या स्मृतीचा बाध केला, म्हणून तसें होत नाहीं, राजदंड तर वीस वर्षांपुढेंहि आहेच; कारण, आगम नसतां उपभोग केला सबब, व ( राजदंड न घेण्याविषयीं ) बाधक वचनहि नाहीं, म्हणून.

१८ तस्मात् मालकानें उपेक्षा केली ह्या अपराधामुळें व ह्या (९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाच्या ) वचनावरूनहि विसां वर्षांपुढें स्थावराचें नष्ट झालेलें उत्पन्न मालकास मिळणार नाहीं, असें सिद्ध झालें.

ह्याप्रमाणेंच जंगमधनाविषयीं दहा वर्षांचा प्रकार जाणावा. २४

---

**आधिसीमोपनिक्षेपजडबालधनैर्विना ।**
**तथोपनिधिराजस्त्रीश्रोत्रियाणां धनैरपि ॥ २५ ॥**

अस्यापवादमाह। आधिश्च सीमा च उपनिक्षेपश्च आधिसीमोपनिक्षेपाः । जडश्च बालश्च जडबालौ तयोर्धने जडबालधने आधिसीमोपनिक्षेपाश्च जडबालधने च आधिसीमोपनिक्षेपजडबालधनानि तैर्विना । उपनिक्षेपो नाम रूपसंख्याप्रदर्शनेन रक्षणार्थं परस्य हस्ते निहितं द्रव्यं । यथाह नारदः । स्वं द्रव्यं यत्र विस्रंभान्निक्षिपत्यविशङ्कितः। निक्षेपोनाम तत्प्रोक्तं व्यवहारपदं बुधैरिति । उपनिधानमुपनिधिः । आध्यादिषु पश्यतोऽब्रुवतोपि भूमेर्विंशतेरूर्ध्वं धनस्य दशभ्यो वर्षेभ्य ऊर्ध्वमपि हानिर्न भवति । पुरुषापराधस्य तथाविधस्याभावात् । उपेक्षाकारणस्य तत्र तत्र संभवात् । तथाहि । आधेराधिस्त्वोपाधिक एव भोग इत्युपेक्षायामपि न पुरुषापराधः । सीम्नश्चिरकृततुषाङ्गारादिचिन्हैः सुसाध्यत्वादुपेक्षा संभवति । उपनिक्षेपोपनिध्योर्भुक्तेः प्रतिषिद्धत्वात् प्रतिषेधातिक्रमोपभोगे च सोदयफललाभादुपेक्षोपपत्तिः । जडबालयोर्जडत्वाद्बालत्वादुपेक्षा युक्तैव।राज्ञो बहुकार्यव्याकुलत्वात् स्त्रीणामज्ञानात् अप्रागल्भ्याच्च श्रोत्रियस्याध्ययनाध्यापनतदर्थविचारानुष्ठानव्याकुलत्वादुपेक्षा युक्तैव । तस्मादाध्यादिषु सर्वत्रोपेक्षाकारणसंभवात् । समस्तभोगे निराक्रोशे च न कदाचिदपि फलहानिः २५

### शाखा १० वी.

ह्याचें ( ९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाच्या वचनाचें ) बाधक वचन सांगतो.

**मूलार्थ**— गहाण, सीमा, ठेव, जडधन, आणि बालधन ह्यांवांचून; तसें उपनिधि, राजधन, स्त्रीधन, आणि श्रोत्रियाचें धन ह्यांवांचूनहि.

**टीकार्थ**— १ गहाण, सीमा, ठेव, अज्ञानधन, बालधन, तसेंच उपनिधि, राजधन, स्त्रीधन, आणि श्रोत्रियाचें धन, ह्यांवांचून; ठेव म्हणजे रूप व संख्या दाखवून जें संरक्षणार्थ दुसऱ्याजवळ ठेवलेलें द्रव्य ती. ह्यास प्रमाण.

गहाण, सीमा वगैरेचा उपभोग मालकाच्या समक्ष झाला तरी उत्पन्नाचें नुकसान होत नाही.

**नारद**— आपलें द्रव्य निःशंकपणें विश्वासानें एखाद्यापाशीं जें ठेविलें जातें तें ठेव ह्या नांवाचें व्यवहारप्रकरण पंडितांनीं सांगितलें आहे.

२ सदरहू गहाण वगैरेविषयीं मालक समक्ष असून निषेध करीत नाहीं, तरी स्थावराचें वीस वर्षांपुढें व धनाचें ( जंगमाचें ) दहा वर्षांपुढें देखील मालकास उत्पन्न मिळतें. कारण, उत्पन्न न मिळण्यासारिखा मालकाचा अपराध नाहीं, व त्या त्या द्रव्याविषयीं उपेक्षा करण्याचें निरनिराळें योग्य कारणहि आहे.

३ गहाणाचा तर गहाण ठेवल्यामुळेंच मालक उपभोग करितो, सबब उपेक्षेविषयीं मालकाचा अपराध नाहीं.

४ सीमा तर बहुत वर्षें टिकायाजोग्या कोंडों, कोळसे, वगैरे चिन्हांनीं दाखविणें सुसाध्यच आहे सबब उपेक्षा संभवते.

५ ठेव व निधि ह्यांचा उपभोगच निषिद्ध आहे, सबब त्या निषेधाचा अतिक्रम करून उपभोग घेईल, तर उपभोगणारापासून मालकास सव्याज उत्पन्न मिळेल, म्हणून उपेक्षा संभवते.

६ अज्ञानधन व बालधन ह्यांच्या उपेक्षेविषयीं तर अज्ञानपणा व बाळपणा हेंच कारण आहे, म्हणून उपेक्षा होणें सुयुक्तच आहे.

७ राजधनाविषयींहि राजा अनेक कार्यांत व्यग्र असतो, सबब उपेक्षा संभवते.

८ स्त्रीधनाविषयीं तर स्त्रियांचें अज्ञान व अप्रौढपणा हेंच उपेक्षेला कारण आहे.

९ श्रोत्रियाच्या धनाविषयीं श्रोत्रिय अध्ययन, अध्यापन व अर्थविचार, अनुष्ठान ह्यांत निमग्न असल्यामुळें उपेक्षा युक्तच आहे.

तस्मात् गहाण सीमा वगैरे ( १ ल्या अंकांत सांगितलेल्या ) सर्वांविषयीं उपेक्षेचीं कारणें योग्य आहेत, म्हणून मालकासमक्ष बिनहरकत उपभोग झाला तरी कधींहि उत्पन्नाची हानि होत नाहीं. २५

---

## आध्यादीनां विहर्तारं धनिने दापयेद्धनम् ।
## दण्डं च तत्समं राज्ञे शक्त्यपेक्षमथापि वा ॥ २६ ॥

आध्यादिषु दण्डविशेषप्रतिपादनार्थमाह । आध्यादीनां श्रोत्रियद्रव्यपर्यन्तानां चिरकालोपभोगबलेनापहर्तारं विवादास्पदीभूतं धनं स्वामिने दापयेदित्यनुवादः । दण्डं च तत्समं विवादास्पदीभूतद्रव्यसमं राज्ञे दापयेदिति विधिः। यद्यपि गृहक्षेत्रादिषु तत्समो दण्डो न संभवति तथापि मर्यादायाः प्रभेदे च सीमातिक्रमणे तथैसादिवक्ष्यमाणो दण्डो द्रष्टव्यः। अथ तत्समदण्डेनापहर्तुर्दमनं न भवति बहुधनत्वेन । तदा शक्त्यपेक्षं धनं दापयेत् । यावता तस्य दर्पोपशमो भवति तावद्दापयेत् । दण्डो दमनादित्याहुस्तेनादान्तान् दमयेदिति दण्डग्रहणस्य दमनार्थत्वात् । यस्य तु तत्सममपि द्रव्यं नास्ति सोपि यावता पीड्यते तावद्दाप्यः । यस्य पुनः किमपि धनं नास्ति असौ धिग्दण्डादिना दमनीयः। तथाच मनुः । धिग्दण्डं प्रथमं कुर्याद्वाग्दण्डं तदनन्तरम् तृतीयं धनदण्डं तु वधदण्डमतः परम् । वधदण्डोपि शारीरो ब्राह्मणव्यतिरिक्तानां दशधा दर्शितः। तथाह मनुः। दश स्थानानि दण्डस्य मनुः स्वायंभुवोऽब्रवीत् । त्रिषु वर्णेषु यानि स्युरक्षतो ब्राह्मणो व्रजेत्।उपस्थमुदरं जिव्हा हस्तौ पादौ च पंचमम् । चक्षुर्नासा च कर्णौ च धनं देहस्तथैव चेति। एतेषां यन्निमित्तापराधस्तत्रैवोपस्थादौ

---

१ शेत इत्यादिकांचे सीमेखालीं कोंडा, कोळसे, अस्थि वगैरे पदार्थ पुरून ठेवावे असें पुढें सीमाविवादप्रकरणीं सांगितलें आहे. हे पदार्थ पुढें कधींहि काढून सीमेविषयीं पुरावा देतां येतो.

निग्रहः कार्य इति द्रष्टव्यम् । कर्म वा कारयितव्यो बन्धनागारं वा प्रवेशयितव्यः । यथोक्तं कात्यायनेन। धनदानासहं बुध्वा स्वाधीनं कर्म कारयेत् । अशक्तौ बन्धनागारं प्रवेश्यो ब्राह्मणादृत इति । ब्राह्मणस्य पुनर्द्रव्याभावे कर्मवियोगादीनि प्रयोज्यानि। यथाह गौतमः। कर्मवियोगविख्यापननिर्वासनाङ्ककरणादीन्यप्रवृत्ताविति ॥ नारदेनापि । वधः सर्वस्वहरणं पुरान्निर्वासनाङ्कने । तदङ्गच्छेद इत्युक्तो दण्ड उत्तमसाहसः अविशेषेण सर्वेषामेष दण्डविधिः स्मृत इत्युक्तोक्तम् । वधादृते ब्राह्मणस्य न वधं ब्राह्मणोऽर्हतीति । शिरसो मुण्डने दण्डस्तस्य निर्वासनं पुरात्।ललाटे चाभिशस्ताङ्कः प्रयाणं गर्दभेन चेति । अङ्कने च व्यवस्था दर्शिता । गुरुतल्पे भगः कार्यः सुरापाने सुराध्वजः । स्तेये तु श्वपदं कार्यं ब्रह्महण्यशिराः पुमानिति । यत्तु चक्षुर्निरोधो ब्राह्मणस्येत्यापस्तंबवचनं। ब्राह्मणस्य पुरान्निर्वासनसमये वस्त्रादिना चक्षुर्निरोधः कर्तव्य इति तस्यार्थो न चक्षुरुद्धरणम् । अक्षतो ब्राह्मणो व्रजेत् न शारीरो ब्राह्मणे दण्ड इत्यादिमनुगौतमवचनविरोधात् इत्यलं प्रसङ्गेन ॥ २६ ॥

गहाण, सीमा वगैरेचा अपहार करणारा ह्याविषयीं दंड सांगतो.

**मूलार्थ**— गहाण वगैरेचा अपहार करणाऱ्यापासून मालकाचें द्रव्य परत देववून राजानें तितकाच दंड घ्यावा, किंवा शक्त्यनुसार घ्यावा.

**टीकार्थ**— १० गहाण, सीमा, ठेव, अज्ञानधन, बालधन, निधि, राजधन, स्त्रीधन, आणि श्रोत्रियधन हीं बहुत वर्षें उपभोग केल्याच्या बळानें उपभोगणारा जर अपहार करितो, तर त्यापासून मालकाचें विवादास्पदीभूत द्रव्य देववावें. "हा विचार तर पूर्ववचनांत सांगितला असून पुनः एथें स्पष्ट प्रतिपत्त्यर्थ "अनुवाद केला," व तितकाच म्हणजे विवादास्पदीभूत द्रव्याइतकाच राजानें दंड घ्यावा, "हा विधि सांगितला."

गहाण सीमा वगैरेचा अपहार करणारास दंड.

११ जरी घरें, शेत इत्यादिकस्थळीं विवादास्पदीभूत द्रव्याइतका राजदंड संभवत नाहीं, तथापि " मर्यादेचा भेद केला असतां प्रथमसाहस दंड, सीमेचा अतिक्रम केला असतां उत्तमसाहस दंड आणि क्षेत्राचें हरण केलें असतां मध्यमसाहस दंड असा पुढें (८ व्या प्रकरणीं ५ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत) सांगितलेला दंड येथें योजावा.

१२ जर विवादास्पदीभूत द्रव्याइतका दंड केल्यानें, अपहार करणारा धनिक असल्यामुळें ह्याचा दर्प शमन होत नाहीं, तर त्याच्या शक्तीप्रमाणें धनदंड करावा. सारांश, जितक्या दंडानें अपहार करणाऱ्याचा दर्पशम होईल तितका दंड करावा; कारण, गौतमानें " दंड म्हणजे दमन करणें, त्या दंडानें उद्धटांस शिक्षा करावी." असा दंडशब्द दमनवाचक केला आहे.

इतक्यानें दर्पशमन होत नाहीं तर अधिक दंड करावा.

१३ ज्याला त्या (विवादास्पदीभूत) द्रव्याइतकाहि दंड देण्याची शक्ति नाहीं, त्यालाहि जितका दंड केल्यानें पीडा होईल तितका करावा.

तितकें द्रव्य देण्याची शक्ति नसल्यास पीडा होईल तितका दंड.

१४ ज्यापाशीं कोणतेंच धन नाहीं त्याला धिग्दंड इत्यादिकरून शिक्षा करावी. ह्यास प्रमाण.

धनदंड देण्याची शक्ति नसल्यास धिग्दंड वगैरे दंडाचे प्र०.

**मनु**— प्रथमतः धिग्[1]दंड करावा, दुसरा वाग्[2]दंड करावा, तिसरा धनदंड करावा, ह्याहून पुढें वधदंड करावा.

१५ वधदंडहि ब्राह्मणावांचून इतरांस नऊ प्रकारचा सांगितला आहे, ह्यालाच **शारीर** दंड म्हटलें आहे.

**मनु**— उपस्थ, उदर, जिव्हा, हस्त, पाद, नेत्र, नाक, कान, देह (वध) आणि धनदंड अशीं स्वायंभू मनूनें दंडाचीं दहा स्थानें सांगितलीं आहेत. परंतु तीं तीन (क्षत्रिय, वैश्य, शूद्र) वर्णांविषयीं मात्र. ब्राह्मणास तर शारीरदंड न करितां गांवाबाहेर घालवून द्यावें.

१६ ह्या इतक्या अवयवांतून ज्या ज्या अवयवाकडून अपराध घडला असेल त्या अवयवासच पीडा करावी. अथवा त्या अपराध्यापासून मजुरी घ्यावी. किंवा त्यास बंदीखान्यांत पाठवावें. ह्यास प्रमाण.

मजूरी घ्यावी किंवा बंदीखान्यांत पाठवावें.

**कात्यायन**— धनदंड देण्यास शक्ति नसल्यास आपल्या स्वाधीन ठेवून मजूरी करवावी. मजुरी करण्यास सामर्थ्य नसेल तर बंदिखान्यांत पाठवावें; परंतु ब्राह्मणावांचून.

१७ ब्राह्मणास जर धनदंड देण्याचें सामर्थ्य नाहीं, तर त्याला त्याचें काम करूं देऊं नये वगैरे (खालीं गौतमवचनांत सांगितलेल्या) शिक्षा योजाव्या.

ब्राह्मणास धनदंड देण्याची शक्ति नसल्यास कोणती शिक्षा.

**गौतम**— ब्राह्मण जर अन्यायवर्ती झाला, तर त्याचा जो व्यवसाय असेल तो त्याला करूं देऊं नये. त्याच्या अपराधाची (जाहीरनामा, दंवडी वगैरेंकडून) प्रसिद्धि करावी, डाग द्यावा, अथवा हांकून द्यावा.

**नारदहि**— "वध, सर्वस्वहरण, गांवांतून हांकलून देणें, डाग देणें, व ज्या अवयवानें अपराध केला असेल तो तोडणें, असा **उत्तमसाहस** दंडाचा विधि सामान्यतः

---

१ धिग्दंड म्हणजे धिक्कार करणें. २ वाग्दंड म्हणजे शब्दांनीं निर्भर्त्सना करणें.

ब्राह्मण वधदंडास योग्य नाहीं म्हणून त्यास दुसरे दंड करावे.

सर्वांस समान सांगितला आहे, असें सांगून "ब्राह्मणाला वधावांचून दंड करावा. कारण, ब्राह्मण वधदंडास योग्य नाहीं, त्याला **शिरोमुंडन**, गांवांतून हांकलून देणें, कपाळीं डाग देणें, गाढवावर बसवून फिरविणें ( धिंड काढणें ) हे दंड करावे.

१८ डाग देण्याविषयीं व्यवस्था सांगितली आहे. ती अशी;—

**मनु**— **गुरुतल्पगमन** अपराधाविषयीं[1] **भगाकार** डाग द्यावा; मद्यप्राशनाच्या अपराधाविषयीं **सुराध्वजाकार** डाग द्यावा; स्तेयाविषयीं[2] श्वपदाकारानें डागावें; ब्रह्महत्या करणाऱ्यास **कबंधाकार** डाग द्यावा.

**आपस्तंब**—ब्राह्मणाचा चक्षुर्निरोध करावा,

असें जें वचन आहे त्याचा अर्थ ब्राह्मणाला गांवांतून बाहेर घालविते वेळेस वस्त्रादिकेंकरून त्याचे डोळे बांधावे; असा करावा. केवळ डोळे काढावे असा अर्थ करूं नये. अन्यथा "ब्राह्मणास क्षत न करितां घालवावें व ब्राह्मणाला शारीरदंड नाहीं" इत्यादिक जीं मनुगौतमवचनें आहेत त्यांस विरोध येईल. २६

---

## आगमोऽभ्यधिको भोगाद्विना पूर्वक्रमागतात् ।

स्वत्वाव्यभिचारित्वेन भोगस्य स्वत्वे प्रामाण्यमुक्तम् भोगमात्रस्य स्वत्वव्यभिचारित्वात् कीदृशो भोगः प्रमाणमित्यत आह । स्वत्वहेतुः प्रतिग्रहक्रयादिरागमः । स भोगादप्यधिको बलीयान् स्वत्वबोधने भोगस्यागमसापेक्षत्वात् । यथाह नारदः। आगमेन विशुद्धेन भोगो याति प्रमाणताम् । अविशुद्धागमो भोगः प्रामाण्यं नैव गच्छतीति । न च भोगमात्रात्स्वत्वावगमः परकीयस्याप्यपहारादिनोपभोगप्रसङ्गात् । अत एव भोगं केवलतो यस्तु कीर्तयेन्नागमं क्वचित् । भोगच्छलापदेशेन विज्ञेयः स तु तस्कर इति स्मर्यते । अतश्च सागमो दीर्घकालो निरन्तरो निराक्रोशः प्रत्यर्थिप्रत्यक्षश्चेति पञ्चविशेषणयुक्तो भोगः प्रमाणमित्युक्तं भवति । तथा च स्मर्यते । सागमो दीर्घकालश्चाविच्छेदोपरवोज्झितः । प्रत्यर्थिसंनिधानोपि परिभोगोपि पञ्चधेति । क्वचिच्चागमनिरपेक्षस्यापि भोगस्य प्रामाण्यमित्याह । विना पूर्वक्रमागतादिति । पूर्वेषां पित्रादीनां त्रयाणां क्रमः पूर्वक्रमः तेनागतो यो भोगस्तस्माद्विना आगमोभ्यधिक इति संबन्धः स पुनरागमादभ्यधिकः आगमनिरपेक्षः प्रमाणमित्यर्थः। तत्राप्यागमज्ञाननिरपेक्षो न सत्तानिरपेक्षः।सत्ता तु तेनैवावगम्यत इति बोद्धव्यम् । विना पूर्वक्रमागतादित्येतच्चास्मार्तकालप्रदर्शनार्थम् । आगमोऽभ्यधिको भोगादिति च स्मार्तकालविषयम् । अतश्च स्मरणयोग्ये काले योग्यानुपलब्ध्या आगमाभावनिश्चयसंभवादागम-

---

१ एथें सामान्यतः डाग द्यावा असें सांगितलें, परंतु अन्यवचनावरून कपाळीं डाग द्यावा असें सिद्ध आहे. २ स्तेय म्हणजे येथें सुवर्णाची चोरी असा अर्थ घ्यावा.

ज्ञानसापेक्षस्यैव भोगस्य प्रामाण्यम् । अस्मार्ते तु काले योग्यानुपलब्ध्यभावेनागमाभावनिश्चयासंभवादागमज्ञाननिरपेक्ष एव संततो भोगः प्रमाणं । एतदेव स्पष्टीकृतं कात्यायनेन । स्मार्तकाले क्रिया भूमेः सागमा भुक्तिरिष्यते । अस्मार्तेऽनुगमाभावात्क्रमात्त्रिपुरुषागतेति । स्मार्तश्च कालो वर्षशतपर्यन्तः शतायुर्वै पुरुष इति श्रुतेः । अनुगमाभावादिति योग्यानुपलब्ध्यभावेनागमाभावनिश्चयाभावादिति अतश्च वर्षशताधिको भोगः संततोऽप्रतिरवः प्रत्यर्थिप्रत्यक्षश्चागमाभावे वा निश्चिते अव्यभिचारादाक्षिप्तागमः स्वत्वं गमयति । अस्मार्तेपि कालेऽनागमस्मृतिपरंपरायां सत्यां न भोगः प्रमाणमत एवानागमं तु यो भुङ्क्ते बहून्यब्दशतान्यपि चौरदण्डेन तं पापं दण्डयेत्पृथिवीपतिरित्युक्तं । न चानागमं तु यो भुङ्क्ते इत्येकवचननिर्देशाद्बहून्यब्दशतान्यपीति । अपिशब्दप्रयोगात् प्रथमस्य पुरुषस्य निरागमे चिरकालोपभोगेपि दण्डविधानमिति मन्तव्यम् । द्वितीये तृतीये वा पुरुषे निरागमस्य भोगस्य प्रामाण्यप्रसङ्गान्न चैतदिष्यते। आदौ तु कारणं दानं मध्ये भुक्तिस्तु सागमेति नारदस्मरणात् । तस्मात्सर्वत्र निरागमोपभोगे अनागमं तु यो भुङ्क्ते इत्येतत् द्रष्टव्यम् । यदप्यन्यायेनापि यद्भुक्तं पित्रा पूर्वतरैस्त्रिभिः । न तच्छक्यमपाहर्तुं क्रमात्त्रिपुरुषागतमिति । तदपि पित्रा सह पूर्वतरैस्त्रिभिरिति योज्यम् । तत्रापि क्रमात् त्रिपुरुषागतमित्यस्मार्तकालोपलक्षणम् त्रिपुरुषविवक्षायामेकवर्षाभ्यन्तरेपि पुरुषत्रयातिक्रमसंभवात् द्वितीये वर्षे निरागमस्य भोगस्य प्रामाण्यप्रसंगः । तथा सति स्मार्ते काले क्रिया भूमेः सागमा भुक्तिरिष्यत इति स्मृतिविरोधः । अन्यायेनापि यद्भुक्तमित्येतच्चान्यायेनापि भुक्तमपहर्तुं न शक्यम् किंपुनरन्यायानिश्चय इति व्याख्येयमपिशब्दश्रवणात् यच्चोक्तं हारीतेन यद्विनागममसन्तं भुक्तं पूर्वैस्त्रिभिर्भवेत् । न तच्छक्यमपाहर्तुं क्रमात्त्रिपुरुषागतमिति । तत्राप्यसन्तमागमं विनेति । असन्तमुपलभ्यमानमागमं विनेति व्याख्येयम् । न पुनरागमस्वरूपं विनेति । आगमस्वरूपाभावे भोगशतेनापि न स्वत्वं भवतीत्युक्तम् । क्रमात्त्रिपुरुषागतमित्येतदुक्तार्थं । ननु स्मरणयोग्ये काले भोगस्यागमसापेक्षस्य प्रामाण्यमनुपपन्नम् । तथाहि । यद्यागमः प्रमाणान्तरेणावगतस्तदा तेनैव स्वत्वावगमान्न भोगस्य स्वत्वे आगमे वा प्रामाण्यं । अथ प्रमाणान्तरेणागमो नावगतः कथं तद्विशिष्टो भोगः प्रमाणं । उच्यते । प्रमाणान्तरेणावगतागमसहित एव निरन्तरो भोगः कालान्तरे स्वत्वं गमयति । अवगतोप्यागमो भोगरहितो न कालान्तरे स्वत्वं गमयितुमलम् मध्ये दानविक्रयादिना स्वत्वागमसंभवादिति सर्वमनवद्यम् ॥

## शाखा ११ वी.

भोग स्वत्वसमानाधिकरण आहे म्हणून स्वत्वाविषयीं प्रमाण असें (१०व्या शाखेंत) सांगितलें, परंतु नुसता (म्हणजे पुढें ३ऱ्या अंकांत सांगितलेल्या विशेषणावांचून) भोगवटा क्वचित्स्थळीं स्वत्वावांचूनहि घडतो, ह्मणून कसा भोगवटा असल्यास तो प्रमाण होतो, हें सांगतो.

**मूलार्थ**— भोगापेक्षां **आगम** बलवत्तर **प्रमाण**, परंतु तो भोगवटा **पूर्वक्रमागत** नसेल तर.

**टीकार्थ**— १ **आगम** सत्ता उत्पन्न होण्याचें जें **प्रतिग्रह**, खरेदी वगैरे साधन तो भोगवट्याहूनहि सबळ **प्रमाण** होतो. कारण, सत्ता समजण्याविषयीं भोगवटा आगमसहित असला तरच कारण होतो; नुसता भोगवटा होत नाहीं.

भोगवटा आगमसहित असला तर प्रमाण.

**नारद**— ज्या भोगवट्याचा **आगम** चालीप्रमाणें आहे, तोच भोगवटा **प्रमाण** होतो. ज्याचा आगम चालीप्रमाणें नाहीं, तो भोगवटा प्रमाणच होत नाहीं.

२ नुसत्या भोगवट्यावरून सत्तेचा निश्चय करवत नाहीं. कारण, परकीय द्रव्याचा उपभोग अपहारादिकेंकरूनहि संभवतो.

आगमावांचून नुसता भोगवटा प्रमाण नाहीं.

**स्मृति**—जो केवळ आपला भोगवटा मात्र शाबीत करितो, परंतु **आगम** दाखवीत नाहीं तो ( उपभोग करणारा ) भोगवट्याच्या मिषानें त्या द्रव्याचा चोर समजावा.

३ ह्यास्तव आगमसहित, चिरकालिक, अविच्छिन्न, बिनहरकत, आणि प्रतिवादीच्या समक्ष, असा पांचा विशेषणांनीं युक्त **भोगवटा प्रमाण** होतो, असें सिद्ध झालें. ह्यास प्रमाण.

भोगवटा कसा असल्यास प्रमाण होतो.

**स्मृत्यंतर**—आगमसहित, चिरकालिक, अविच्छिन्न, बिनहरकत, आणि प्रतिवादीच्या समक्ष, असा पांच प्रकारचा भोगवटा सांगितला आहे.

क्वचित् स्थळीं **आगमनिरपेक्ष** भोगवटाहि **प्रमाण** होतो असें सांगतो.

४ पिता इत्यादि तीन पिढ्यांपासून अनुक्रमानें चालत आलेला जो भोगवटा त्यावांचून आगम सबळ. पूर्वक्रमागत भोगवटा तर **आगमापेक्षांहि** अधिक. ह्मणजे **आगमनिरपेक्ष प्रमाण** होतो. तात्पर्य कीं, तीन पिढ्यांचा उपभोग असला तर तो आगमापेक्षें सबळ **प्रमाण** होतो, तेथें **आगम** पुराव्याला घेण्याची गरज नाहीं. तो ( आगम ) हरवला किंवा जळाला तरी चालेल. परंतु **आगम** पूर्वीं होता असें पाहिजे. **आगम** पूर्वीं होता हें तीन पिढ्यांच्या उपभोगावरूनच सिद्ध होतें.

तीन पिढ्यांचा भोगवटा आगमज्ञानावांचून प्रमाण होतो.

५ " पिता इत्यादि तीन पिढ्यांपासून क्रमानें चालत आलेला भोगवटा " हा प्रकार ( ४ था अंक ) **अस्मार्तकाल** भोगवट्याविषयीं जाणावा. आणि **आगम** भोगाहूनहि सबळ **प्रमाण** होतो हा प्रकार ( १ ला अंक ) **स्मार्तकाल** भोगवट्याविषयीं जाणावा.

शंभर वर्षांचे आंत आगमसहित भोगवटा प्रमाण होतो, पुढें होत नाहीं.

ह्यास्तव स्मरण योग्यकाळीं **योग्य प्रमितीची अनुपलब्धि** आहे, ह्मणून हा भोगवटा **आगमावांचून** आहे, असा निश्चय होतो अतएव स्मरणयोग्यकाळीं **आगमसापेक्षच**

भोगवटा **प्रमाण** होतो. ह्मणजे शंभर वर्षांचे आंतला भोगवटा आहे तर **आगम** समजण्याची गरज लागते, कारण, **स्मार्तकालीं** नुसता भोगवटा **प्रमाण** मानिला तर बलात्कारानें झालेलाहि भोगवटा **प्रमाण** होऊं लागेल.

६ **अस्मार्तकालीं** तर **अभावग्राहकप्रमाण**[1] नसल्यामुळें ह्या भोगवट्याचें मूळ साधन जो **आगम** तो नाहींच असा निश्चय करवत नाहीं. ह्मणून सतत आलेला भोगवटा **आगमावांचूनहि प्रमाण** होतो.

**कात्यायनही** हेंच स्पष्ट करून सांगतो. **स्मार्तकालीं** स्थावराविषयीं **आगमसहित** भोगवटा **प्रमाण**. आणि **अस्मार्तकालीं** तर हा आगमावांचून उपभोग करीत आहे, असा निश्चय करवत नाहीं, ह्मणून तीन पिढ्या अविच्छिन्न चालत आलेला भोगवटाच **प्रमाण**.

७ **स्मार्तकाल** शंभर वर्षेंपर्यंत जाणावा. कारण, " पुरुषाचा आयुर्दाय शंभर वर्षें " असें वेदांत आहे. ह्मणून शंभर वर्षांहून अधिक काळ चालत आलेला, निरंतर, बिनहरकत, प्रतिवादीच्या समक्ष, आणि **आगमाच्या** अभावाविषयीं निश्चय होत नाहीं, असा भोगवटा **स्वत्वाविषयीं प्रमाण** होतो.

८ परंतु **अस्मार्तकालींहि** जर **अनागमस्मृतिपरंपरा**[2] आहे, तर सतत चाललेला भोगवटाहि **प्रमाण** होऊं शकत नाहीं.

**मनुहि** सांगतो कीं, " जो आगमावांचून शेंकडों वर्षेंहि ( दुसऱ्याचें स्थावरादिक ) उपभोगितो त्या दुष्ट पाप्याला राजानें चोराच्या दंडानें शिक्षा करावी."

**शंका**–ह्या ( **मनु** ) वचनांत " जो **आगमावांचून** भोगितो " असा एकवचनाचा निर्देश केल्यावरून, " शेंकडों वर्षेंहि " असा **अप्यर्थबोधक**[3] हिशब्दाचा निर्देश केल्यावरून, **पहिल्या पुरुषानें आगमावांचून चिरकाल उपभोग केला असला तरी त्याला दंड करावा ह्मणून स्मृतींत सांगितलें, असें कां मानूं नये ?**

**समाधान**–असें मानिलें असतां दुसऱ्या व तिसऱ्या पिढीचा भोगवटा **आगमविरहित** असला तरी **प्रमाण** होऊं लागेल, आणि " पहिल्या पुरुषानें ( संपादकानें ) **आगम**

---

१ अभावग्राहकप्रमाण म्हणजे आगमाचा अभाव दाखविणारें जें प्रमाण तें, म्हणजे ह्याचा भोगवटा आगमावांचून आहे असें दाखविणारें. २ अनागमस्मृतिपरंपरा, म्हणजे हा बहुत वर्षें आगमावांचून उपभोग करीत आहे असें आम्हीं वाडवडीलांपासून ऐकत आलों, असा जनसंवाद.

३ अप्यर्थबोधक असा " हि " शब्द म्हणजे संस्कृतांत जो " अपि " शब्द आहे त्याचा वाचक मराठींत ' हि ' शब्द आहे. जसें, तो खोटें बोलतो आणि रामाहि खोटें बोलतो. ज्या शब्दापुढें अपि शब्द असतो त्याच्या मूळच्या अर्थावर तात्पर्य नसतें अशी संस्कृतांत परिभाषा आहे म्हणून " बहून्यब्दशतान्यपि " ( शेंकडों वर्षेंहि ) असें जें मूळस्मृतींत आहे त्याचा अर्थ ' शंभर वर्षें ' असा समजूं नये, ' कित्येक वर्षें ' असा अर्थ समजावा. असें म्हटलें म्हणजे एका पुरुषानें कित्येक वर्षें भोगवटा केल्यास हें मनुवचन एकाच पुरुषाला लागू पडेल.

शाबीत करावा, दुसऱ्या पुरुषानें **आगमसहित** भोगवटा दाखवावा " असें जें नारदवचन आहे त्यास विरोध येईल.

९ तस्मात् सर्वत्र ( १ ल्या, २ ऱ्या, ३ ऱ्या पिढीविषयीं ) **आगमावांचून** उपभोग असल्यास वरचें ( मनु ) वचन योजावें.

**स्मृति**–पित्यासुद्धां तीन पिढ्यांनीं अन्यायानेंहि जरी उपभोगिलें आहे, तरी तें सतत तिहीं पिढ्यांनीं उपभोगिलें यास्तव फिरूं शकत नाहीं.

असें जें वचन आहे त्यांत पित्यासुद्धां तीन पिढ्या, ह्मणजे पित्याची पिढी चौथी, आणि वरच्या तीन पिढ्या अशी योजना करावी. आणि " सतत तीन पुरुषांपासून चालत आलेला " असें त्या वचनांत आहे, तेंहि **अस्मार्तकाल** उपभोगाचें उपलक्षण जाणावें. अन्यथा कदाचित् एका वर्षांतहि तीन पुरुषांचा अतिक्रम संभवतो, यास्तव दुसऱ्या वर्षींच **आगमविरहित** भोगवटा **प्रमाण** होऊं लागेल, आणि असें झालें असतां " **स्मार्तकालीं** स्थावराविषयीं **आगमसहित** भोगवटा **प्रमाण**, " असें जें ( ६ व्या अंकांतील कात्यायनाचें ) वचन आहे त्यास विरोध येईल.

१० वरच्या ( ९ व्या अंकांतील ) स्मृतींत " अन्यायानेंहि जरी उपभोगिलें " असें आहे, त्याचा अर्थ असा कीं, अन्यायानें उपभोगिलें असतांहि तें परावृत्त होत नाहीं, मग ज्या भोगवट्याविषयीं अन्यायाचा निश्चय नाहीं, तो भोगवटा परावृत्त होत नाहीं हें सांगायासच नको, असा त्याचा अर्थ जाणावा. कारण, **अप्यर्थबोधक** " हि " शब्द आहे ह्मणून.

**हारीत**–आगम नसतां तिघां पूर्वजांनीं जें **अत्यंत** उपभोगिलें आहे, तें परत घेण्याविषयीं शक्य नाहीं; कारण, तो भोगवटा अविच्छिन्न तीन पिढ्यांचा आहे ह्मणून.

असें जें वचन आहे त्यांतही " अत्यंत **आगम** नसतां " ह्मणजे **आगम** अत्यंत उपलभ्यमान नसतां, असा अर्थ समजावा. केवळ आगमाचा अभाव असें समजूं नये. कारण, जर आगमाचा अगदी अभाव आहे तर शेकडों उपभोग झाले तरी स्वत्व उत्पन्न होणार नाहीं. " तीन पिढ्यांचा अविच्छिन्न भोगवटा असतां " इत्यादिक जें तें उक्तार्थ आहे.

११ **शंका**–स्मरणयोग्यकालीं आगमसहित भोगवटा **प्रमाण** असें जें (९ व्या अंकांत ) सांगितलें त्याची उपपत्ति होत नाहीं, ती अशी;–जर **आगम** ( भोगवट्याखेरीज ) दुसऱ्या प्रमाणावरून कळला, तर तेणेंकरूनच स्वत्व ( सत्ता ) ज्ञान होतें, तें झालें असतां स्वत्वाविषयीं किंवा आगमाविषयीं भोगवटा **प्रमाण** मानायास नको. जर अन्य प्रमाणेंकरून **आगम** न समजला तर आगमविशिष्ट भोग तरी **प्रमाण** कसा होईल ?

१२ **समाधान**–दुसऱ्या प्रमाणेंकरून ज्ञात झालेला असा जो आगम तद्विशिष्ट व अविच्छिन्न भोगवटा कालांतरीं स्वत्व दाखविण्यास उपयोगी पडेल, परंतु दुसऱ्या प्रमाणेंकरून अवगत झालेला असाहि आगम असून तो भोगरहित आहे तर कालांतरीं स्वसत्तेचें साधन होऊं शकणार नाहीं. कारण, मध्यंतरीं दान, विक्रय इत्यादिकेंकरून स्वसत्तेची हानि संभवते. ह्याप्रमाणें सर्व निर्दोष जाणावें.

**आगमेऽपि बलं नैव भुक्तिः स्तोकापि यत्र नो ॥ २७ ॥**

आगमसापेक्षो भोगः प्रमाणमित्युक्तं । आगमस्तर्हि भोगनिरपेक्ष एव प्रमाणमित्यत आह । यस्मिन्नागमे स्वल्पापि भुक्तिर्नो नास्ति तस्मिन्नागमे बलं संपूर्णं नैवास्ति । अयमभिसंधिः स्वस्वत्वनिवृत्तिः परस्वत्वापादनं च दानं । परस्वत्वापादनं च परो यदि स्वीकरोति तदा संपद्यते नान्यथा । स्वीकारश्च त्रिविधः मानसो वाचिकः कायिकश्चेति । तत्र मानसो ममेदमिति संकल्परूपः । वाचिकस्तु ममेदमित्याद्यभिव्याहारोल्लेखी सविकल्पकः प्रत्ययः । कायिकस्तु पुनरुपादानाभिमर्शनादिरूपोऽनेकविधः । तत्र च नियमः स्मर्यते । दद्यात्कृष्णाजिनं पुच्छे गां पुच्छे करिणं करे। केसरेषु तथैवाश्वं दासीं शिरसि दापयेदिति । आश्वलायनोऽप्याह । अनुमन्त्रयेत्प्राण्यभिमृशेदप्राणिकन्यां चेति । तत्र हिरण्यवस्त्रादावुदकदानानन्तरमेवोपादानादिसंभवात् । त्रिविधोपि स्वीकारः संपद्यते । क्षेत्रादौ पुनः फलोपभोगव्यतिरेकेण कायिकस्वीकारासंभवात् । स्वल्पेनाप्युपभोगेन भवितव्यम् । अन्यथा दानक्रयादेः संपूर्णता न भवतीति फलोपभोगलक्षणकायिकस्वीकारविकल आगमो दुर्बलो भवति। तत्सहितादागमाभावात् । एतच्च द्वयोः पूर्वापरकालापरिज्ञाने । पूर्वापरकालपरिज्ञाने तु त्रिगुणोपि पूर्वकालागम एव बलीयानिति ।

अथवा लिखितं साक्षिणो भुक्तिः प्रमाणं त्रिविधमित्युक्तं । एतेषां समवाये कुत्र कस्य वा प्राबल्यमित्यत्रेदमुपतिष्ठते ।

आगमोऽभ्यधिको भोगाद्विना पूर्वक्रमागतात् । आगमेऽपि बलं नैव भुक्तिः स्तोकापि यत्र नो इति । अयमर्थः । आद्ये पुरुषे साक्षिभिर्भावित आगमो भोगादप्यधिको बलवान् । पूर्वक्रमागताद्भोगाद्विना । स पुनः पूर्वक्रमागतो भोगश्चतुर्थपुरुषे लिखितेन भावितादागमाद्बलवान् । मध्यमे तु भोगरहितादागमात्स्तोकभोगसहितोऽप्यागमो बलवानिति ॥

एतदेव नारदेन स्पष्टीकृतम् । आदौ तु कारणं दानं मध्ये भुक्तिस्तु सागमा । कारणं भुक्तिरेवैका संतता या चिरन्तनीति ॥ २७ ॥

## शाखा १२ वी.

आगमसहित भोगवटा **प्रमाण** होतो असें सांगितलें. आतां **आगमहि** भोगविशिष्ट असल्यास **प्रमाण** होतो ह्याविषयीं सांगतो.

**मूलार्थ**—ज्या आगमाचा अल्प देखील भोगवटा नाहीं, तो आगमहि दुर्बलच.

**टीकार्थ**—१ ज्या आगमाविषयीं स्वल्प देखील भोगवटा नाहीं तो आगमहि संपूर्ण **प्रमाण** होऊं शकत नाहीं.

भोगवटा नसेल तर आगमहि दुर्बल.

अभिप्राय हा कीं, दान ह्मणजे आपलें **स्वत्व** घालवून दुसऱ्याचें **स्वत्व** उत्पन्न कर-

दानाचें लक्षण.

णें, तें दुसऱ्याचें स्वत्व जर दुसरा स्वीकार करितो, तर उत्पन्न होतें; अन्यथा होत नाहीं.

२ तो स्वीकार तीन प्रकारचा. मानसिक, वाचिक, आणि कायिक. मानसिक स्वीकार म्हणजे 'हें माझें' असा संकल्परूप. वाचिक स्वीकार म्हणजे 'हें माझें' असा वाणीनें उच्चार करणें. कायिक स्वीकार तर ग्रहण, स्पर्शन इत्यादि अनेक प्रकारचा.

स्वीकाराचे प्रकार.

अशा तीन प्रकारच्या स्वीकाराविषयीं नियम सांगतो.

**स्मृति**–३ कृष्णाजिन पुच्छाचे ठायीं स्पर्श करून द्यावें, गाय पुच्छाचे ठायीं स्पर्श करून द्यावी. हस्ती शुंडादंडाचे ठायीं स्पर्श करून द्यावा. तसेंच अश्वदान अयाळ धरून करावें, आणि दासीदान तिच्या मस्तकीं स्पर्श करून करावें.

दान करण्याविषयीं नियम.

आश्वलायनहि सांगतो. प्रतिग्राह्य पदार्थ जर प्राणी (मनुष्य) आहे तर, प्रतिग्रह करणारानें म्हणावें कीं, तूं माझा आहेस. प्रतिग्राह्य द्रव्यानेंहि म्हणावें कीं, मी तुमचा आहें. जर प्रतिग्राह्य पदार्थ अप्राणी (मनुष्यभिन्न गाय इत्यादिक) किंवा कन्या आहे, तर, प्रतिग्रह करणारानें अभिमर्शन करावें.

४ त्यांत हिरण्य वस्त्र इत्यादिकांविषयीं हस्तावर उदक दिल्यानंतरच ग्रहण इत्यादिकाचा संभव आहे, यास्तव तीन प्रकारचा (कायिक, वाचिक, मानसिक) स्वीकार संभवतो.

५ स्थावराविषयीं तर उत्पन्न भोगिल्यावांचून कायिकस्वीकार संभवत नाहीं, म्हणून अल्प तरी (स्थावराचा) उपभोग झाला पाहिजे. नाहीं तर दान विक्रय इत्यादिकाची पूर्णता होत नाहीं. यास्तव भोगसहित आगमापेक्षां भोगरहित (ज्याचें उत्पन्न अगदी भोगिलें नाहीं असा) आगम अगदी दुर्बळ होतो.

स्थावराचा उपभोग झाल्यावांचून तें आपलेंसें होत नाहीं.

६ परंतु हा (५ व्या अंकांतला) प्रकार दोघांस पूर्वापर कालाची माहिती नसल्यास जाणावा. पूर्वापर कालाची माहिती असेल तर पूर्वकालिक आगम भोगरहित असला तरी तोच सबळ प्रमाण होतो.

## शाखा १२ वी.

### अथवा दुसरा[1] कल्प.

लेख, साक्षी, आणि भोगवटा असें तीन प्रकारचें प्रमाण (ह्या प्रकरणाच्या ७ व्या शाखेच्या मूळ वचनांत) सांगितलें. हीं तीनहि मिळत असल्यास कोणत्या स्थळीं कोणतें प्रमाण सबळ हें सांगतो.

**याज्ञवल्क्य**– भोगवटच्यापेक्षां आगम सबळ प्रमाण, परंतु तो भोगवटा परंपरागत नसेल तर. ज्या आगमाचा स्वल्प देखील भोगवटा नाहीं तो आगमहि दुर्बळ.

---

१. दुसरा कल्प म्हणजे ११ व्या शाखेच्या १ ल्या व २ ऱ्या वगैरे अंकाच्या याज्ञवल्क्यवचनाचा दुसऱ्या प्रकारचा अर्थ सांगतो.

१ वरील ( याज्ञवल्क्य ) वचनाचा अर्थ—पहिल्या पुरुषानें साक्षींकडून शाबीत केलेला **आगम** भोगवटयापेक्षां सबळ प्रमाण होतो, परंतु तो भोगवटा जर तीन पिढ्या चालत आलेला नसल तर. भोगवटा तीन पिढ्यांचा आहे असें चौथ्या पिढीनें शाबीत केलें तर असा भोगवटा लेखाकडून शाबीत केलेल्या आगमापेक्षांहि सबळ प्रमाण होतो. मधल्या ( २ऱ्या व ३ ऱ्या ) पिढीविषयीं केवळ ( भोगवट्याविरहित ) आगमापेक्षां स्वल्प **भोगसहित आगम** असला तरी **प्रमाण** होतो.

लेख भोगवटा साक्षी अशीं तीन प्रमाणांतून कोणतें प्रमाण कोणत्या व्यवहारीं सबळ.

नारदहि हेंच स्पष्ट करून दाखवितो.

**नारद**— पहिल्या पुरुषाची ( संपादकाची ) सत्ता समजण्याविषयीं **आगम प्रमाण**, दुसऱ्या पुरुषाच्या सत्तेविषयीं **आगमसहित भोगवटा प्रमाण** आणि पुढें अविच्छिन्न बहुत वर्षे चालत आलेला भोगवटाच प्रमाण होतो. २७

---

## आगमस्तु कृतो येन सोऽभियुक्तस्तमुद्धरेत् ।
## न तत्सुतस्तत्सुतो वा भुक्तिस्तत्र गरीयसी ॥ २८ ॥

पश्यतो ब्रुवत इत्यत्र विंशतिवर्षोपभोगादूर्ध्वं भूमेर्धनस्यापि दशवर्षोपभोगादूर्ध्वं फलानुसरणं न भवतीत्युक्तम् । तत्र फलानुसरणवद्दण्डानुसरणमपि न भविष्यतीत्याशङ्क्य पुरुषव्यवस्थया प्रामाण्यव्यवस्थया च दण्डव्यवस्थां दर्शयितुमाह । येन पुरुषेण भूम्यादेरागमः स्वीकारः कृतः स पुरुषः कुतस्ते क्षेत्रादिकमित्यभियुक्तस्तमागमं प्रतिग्रहादेरिति लिखितादिभिरुद्धरेत् भावयेत् । अनेन चाद्यस्य पुरुषस्यागममनुद्धरतो दण्ड इत्युक्तं भवति । तत्सुतो द्वितीयोभियुक्तो नागममुद्धरेत् । किंतु अविच्छिन्नाप्रतिरवसमक्षभोगम् अनेन चागममनुद्धरतो द्वितीयस्य न दण्डोऽपितु विशिष्टं भोगमनुद्धरतो दण्ड इति प्रतिपादितम् । तत्सुतस्तृतीयो नागमं नापि विशिष्टं भोगमुद्धरेदपि तु क्रमागतं भोगमात्रम् । अनेनापि तृतीयस्य क्रमायातभोगानुद्धरणे दण्डो नागमानुद्धरणे न विशिष्टभोगानुद्धरणे चेत्यभिहितं । तत्र तयोर्द्वितीयतृतीययोर्भुक्तिरेव गरीयसी । तत्रापि द्वितीये गुरुस्तृतीये गरीयसीति विवेक्तव्यं । त्रिष्वप्यागमानुद्धरणेऽर्थहानिः समानैव दण्डे तु विशेष इति तात्पर्यार्थः। उक्तं च हारीतेन । आगमस्तु कृतो येन स दण्ड्यस्तमनुद्धरन् । न तत्सुतस्तत्सुतो वा भोग्यहानिस्तयोरपीति ॥ २८ ॥

वीस वर्षें वहिवाट झाल्यानंतर स्थावराचें उत्पन्न, व दहा वर्षें भोगवटा झाल्यावर जंगम धनाचें उत्पन्न (भोगणारा) घेईल; मालकास मिळणार नाहीं, असें (९ व्या शाखेच्या १४ व्या अंकांत ) सांगितलें, तेथें जर मालकास उत्पन्न मिळणार नाहीं, तर उपभोगणारास दंडहि होणार नाहीं, असें प्राप्त झालें असतां उपभोगणारा व आगमसंपादक पुरुष ह्यांच्या अनुक्रमानें व प्रमाणव्यवस्थेनें दंडव्यवस्था सांगतो.

**मूलार्थ**– ज्यानें आगम संपादिला त्यावर फिर्याद केली असतां त्यानें आगमाची शाबिती करावी, पुत्रानें किंवा नातवानें करूं नये. कारण, तेथें भोगवटाच सबळ.

**टीकार्थ**– २ ज्या पुरुषानें भूमि इत्यादिकाचा आगम संपादिला, त्यास "हें क्षेत्रादिक तूं कसें संपादिलें" असें विचारिलें असतां त्यानें तो आगम प्रतिग्रहादिक, लेख्यादि प्रमाणांनीं शाबीत करावा.

आगमाच्या शाबितीविषयीं.

येणेंकरून पहिला (आगमसंपादक) पुरुष जर आगम शाबीत करून देत नाहीं, तर त्याला दंड करावा असें सिद्ध झालें.

आगम शाबीत करीत नाहीं तर दंड.

३ दुसऱ्या पुरुषास (आगमसंपादकाच्या पुत्रास) विचारलें असतां तो, आगम शाबीत न करो, परंतु त्यानें अविच्छिन्न, बिनहरकत, प्रतिवादीच्या समक्ष असा भोगवटा मात्र शाबीत केला पाहिजे.

दुसऱ्या पुरुषानें अविच्छिन्न भोगवटा शाबीत करावा.

येणेंकरून दुसरा पुरुष जर आगम शाबीत करीत नाहीं, तर तो दंडास पात्र होत नाहीं, पण अविच्छिन्न, बिनहरकत असा भोगवटा शाबीत करीत नाहीं तर त्याला दंड करावा, असें प्रतिपादित झालें.

भोगवटा दाखवीत नाहीं तर दंड.

४ तिसरा पुरुष (नातू) केवळ आगम व आगमसहित भोगवटा शाबीत न करो, परंतु त्यानें परंपरागत भोगवटा मात्र शाबीत केला पाहिजे.

तिसऱ्या पिढीनें भोगवटा शाबीत करावा, न केल्यास दंड.

येणेंकरून तिसऱ्या पुरुषानें (नातवानें) परंपरागत भोगवटा शाबीत न केला तर दंड. आगम शाबीत करीत नाहीं, किंवा आगमसहित भोगवटा शाबीत करीत नाहीं तर दंड नाहीं. कारण, दुसऱ्या व तिसऱ्या पुरुषाविषयीं भोगवटाच सबळ. त्यांत दुसऱ्या पिढीविषयीं बळकट, तिसऱ्या पिढीविषयीं तर विशेष बळकट असें जाणावें.

५ परंतु आगम शाबीत न केल्याबद्दल तिघांहि पुरुषांला उत्पन्नाचें नुकसान सारखेंच होतें, दंडाविषयीं मात्र वर २ऱ्या अंकांत सांगितल्याप्रमाणें तरतमभाव जाणावा. म्हणजे प्रथम पुरुषानें आगम न दाखविल्यास दंड होतो. २ ऱ्या व ३ ऱ्या पुरुषानें आगम न दाखविल्याबद्दल दंड होत नाहीं, इतका विशेष समजावा. (ह्यास प्रमाण).

तिघां पुरुषांनीं आगम शाबीत न केला तर उत्पन्न मिळत नाहीं.

**हारीत**– ज्यानें आगम संपादिला तो जर आगम शाबीत करीत नाहीं तर तो दंडास पात्र होतो. त्याचा पुत्र किंवा नातू दंडास पात्र नाहीं. परंतु उत्पन्नाचें नुकसान त्याचेंहि होतें. २८

---

**योभियुक्तः परेतः स्यात्तस्य रिक्थी तमुद्धरेत्।**
**न तत्र कारणं भुक्तिरागमेन विना कृता ॥ २९ ॥**

अस्मार्तकालोपभोगस्यागमज्ञाननिरपेक्षस्य प्रामाण्यमुक्तं विना पूर्वक्रमागतादिस-

त्र तस्यापवादमाह। यदा पुनराहर्त्रादिरभियुक्तोऽकृतव्यवहारनिर्णय एव परेतः परलोकं गतो भवेत्तदा तस्य रिक्थी पुत्रादिस्तमागममुद्धरेत् यस्मात्तत्र तस्मिन्व्यवहारे भुक्तिरागमरहिता साक्ष्यादिभिः साधितापि न प्रमाणं। पूर्वाभियोगेन भोगस्य सापवादत्वात्। नारदेनाप्युक्तम्। नवारूढविवादस्य प्रेतस्य व्यवहारिणः। पुत्रेण सोऽर्थः संशोध्यो न तं भोगो निवर्तयेदिति ॥ २९ ॥

अस्मार्तकालिक उपभोग तर आगम समजल्यावांचूनहि प्रमाण होतो असें (११व्या शाखेच्या ४ थ्या अंकांत) सांगितलें, त्याचें बाधक (वचन) येथें सांगतो.

**मूलार्थ**— ज्याजवर फिर्याद, तो मृत होईल तर त्याचे वारसानें आगमाची शाबिती करावी. कारण, आगमावांचून केलेला भोगवटा तेथें प्रमाण होणार नाहीं.

आगमसंपादक वादाचा निर्णय झाल्यापूर्वी मृत होईल तर त्याच्या वारसानें आगमाची शाबिती करावी.

**टीकार्थ**— ६ जर आगमसंपादकादिकावर कोणी फिर्याद केली, आणि तो (संपादक) वादाचा निर्णय होण्यापूर्वींच मृत होईल, तर जो त्याचा वारीस (पुत्रादिक) असेल त्यानें त्या आगमाची शाबिती करावी. अशा व्यवहारीं भोगवटा, साक्षी वगैरे पुराव्यानें शाबीत केला तरी जर तो (भोगवटा) आगमविरहित असेल तर प्रमाण होऊं शकणार नाहीं. कारण, पूर्वी केलेल्या फिर्यादीनें त्या भोगवट्याला हरकत केली आहे ह्मणून.

नारदहि सांगतो—वाद सांगणारा, वादाचा निर्णय होण्यापूर्वीं मृत होईल तर त्याच्या पुत्रानें तो वाद (आगम दाखवून) शाबीत करावा. त्याची शाबिती भोगवट्याकडून होऊं शकणार नाहीं. २९

---

**नृपेणाधिकृताः पूगाः श्रेणयोऽथ कुलानि च।**
**पूर्वं पूर्वं गुरु ज्ञेयं व्यवहारविधौ नृणाम् ॥ ३० ॥**

अनिर्णीतव्यवहारे व्यवहर्तरि प्रेते व्यवहारो न निवर्तते इति स्थितम्। निर्णीतेऽपि व्यवहारे स्थिते च व्यवहर्तरि वा व्यवहारः क्वचित्पुनः प्रवर्तते क्वचिन्न प्रवर्तत इति व्यवस्थासिद्धये व्यवहारदर्शिनां बलाबलमाह। नृपेण राज्ञा अधिकृताः व्यवहारदर्शने नियुक्ताः राज्ञा सभासदः कार्या इत्यादिनोक्ताः। पूगाः समूहाः भिन्नजातीनां भिन्नवृत्तीनां एकस्थाननिवासिनां यथा ग्रामनगरादयः। श्रेणयो नानाजातीनामेकजातीनामप्येकजातीयकर्मोपजीविनां संघाताः यथा हेडाबुकादीनां तांबूलिककुविन्दचर्मकारादीनां च। कुलानि ज्ञातिसंबन्धिबन्धूनां समूहाः। एतेषां नृपाधिकृतादीनां चतुर्णां पूर्वं पूर्वं यद्यत्पूर्वं पठितं तत्तद्गुरुबलवज्ज्ञेयं वेदितव्यम्। नृणां व्यवहर्तॄणां व्यवहारविधौ व्यवहारदर्शनकार्ये। एतदुक्तं भवति। नृपाधिकृतैर्निर्णीते व्यवहारे पराजितस्य यद्यप्यसंतोषः कुदृष्टिबुद्ध्या भवति तथापि न पूगादिषु पुनर्व्यवहारो

भवति। एवं पूगनिर्णीतेपि न श्रेण्यादिगमनम्। तथा श्रेणीनिर्णीते कुलगमनं न भवति। कुलनिर्णीते तु श्रेण्यादिगमनं भवति। श्रेणिनिर्णीते पूगादिगमनम्। पूगनिर्णीते नृपाधिकृतगमनं भवतीति। नारदेन पुनर्नृपाधिकृतैर्निर्णीतेपि व्यवहारे नृपगमनं भवतीत्युक्तम्। कुलानि श्रेणयश्चैव गणाश्चाधिकृता नृपः। प्रतिष्ठा व्यवहाराणां गुर्वेषामुत्तरोत्तरमिति। तत्र च नृपगमने सोत्तरसभ्येन राज्ञा पूर्वैः सभ्यैः सह सपणव्यवहारे निर्णीयमाने यद्यसौ कुदृष्टवादी पराजितस्तदासौ दण्ड्यः। अथासौ जयति तदाधिकृताः सभ्या दण्ड्याः॥ ३०॥

## शाखा १४ वी.

वाद सांगणारा वादाचा निर्णय झाल्यापूर्वीच मरण पावला असतां वाद कुंठित होत नाहीं, असें सिद्ध झालें. आतां व्यवहारनिर्णयहि झाला व वाद सांगणाराहि जीवंत आहे तर व्यवहार पुनः कोठें प्रवृत्त होतो, आणि कोठें प्रवृत्त होत नाहीं, त्याची नीट व्यवस्था दाखविण्यासाठीं न्यायकर्त्यांचें बलाबल सांगतो.

**मूलार्थ**— राजानें नेमलेले सभासद, पूग, श्रेणी आणि कुलें हे व्यवहार पाहण्याविषयीं व्युत्क्रमानें उत्तरोत्तर वरचढ जाणावे.

**टीकार्थ**— १ राजानें व्यवहार पाहण्याविषयीं नेमलेले सभासद ( १ ल्या प्रकरणाच्या २ ऱ्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितले आहेत ते.

**पूग**[१] म्हणजे निरनिराळ्या जातीचे व निरनिराळा व्यापार करणारे असून एका ठिकाणीं राहणारे. जसे गांवकरी, नगरनिवासी इत्यादिक.

**श्रेणी**[२] ह्मणजे नानाजातीचे, किंवा एका जातीचे असून एका व्यापारानें उपजीविका करणारे ह्यांची मंडळी. जसे हेडाबूक[३], तांबोळी, साळी, चांभार इत्यादिकांचे मेहेतरे.

**कुलें** ह्मणजे ज्ञाति, संबंधी, बांधव यांचे समुदाय.

२ हे ( वर सांगितलेले ) सभासद वगैरे चार प्रकारचे, मनुष्यांच्या व्यवहाराचा निवाडा करण्याविषयीं चौथ्यापेक्षां तिसरा, त्यापेक्षां दुसरा, असे, सभासदपर्यंत वरचढ जाणावे. म्हणजे असें:—सभासदांनीं निर्णय केला असतां पराजितास जरी स्वपराजय झाल्यामुळें ह्यांनीं योग्य चौकशी केली नाहीं, अशा बुद्धीनें असंतोष झाला तथापि पूगादिकांकडे त्याची चौकशी जाणार नाहीं. ह्याप्रमाणेंच पूगानें निर्णीत केलेला व्यवहार श्रेणीकडे चौकशीसाठीं जाणार नाहीं. तसाच श्रेणीनें निर्णीत केलेला व्यवहार कुलाकडे जाऊं शकणार नाहीं.

वरिष्ठ न्यायाधीशानें निवडलेला न्याय कनिष्ठ न्यायाधीशाकडे जाऊं शकत नाहीं.

---

१ पूग म्हणजे प्रायः पाटील, कुळकर्णी, देशमुख, जमीदार वगैरे असावे. २ श्रेणी म्हणजे व्यापारी मंडळीचे मुख्य जे शेटे, महाजन, मेहेतरे वगैरे. ३ हेडाबूक म्हणजे एका देशाहून दुसरे देशांत जाऊन किंवा पाटवून व्यापार करणारे. हा शब्द गुजराथेंत प्रसिद्ध आहे. (सौदागर, हेडे, कारवान वगैरे)—सुबोधिनी.

२ कुलानें निर्णीत केलेल्या व्यवहाराची चौकशी श्रेणीकडे होईल. श्रेणीनें निर्णीत केलेल्या व्यवहाराची चौकशी पुनः पूगाकडे होईल, आणि पूगानें निर्णीत केलेल्या व्यवहाराची चौकशी सभासदांकडे होईल.

कनिष्ठ न्यायकर्त्यानें केलेला निवाडा वरिष्ठ न्यायकर्त्याकडे जातो.

नारद तर, सभासदांनीं निर्णीत केलेलाहि व्यवहार पुनः चौकशीसाठीं राजाकडे जातो, असें सांगतो.

नारद–कुल, श्रेणी, पूग, सभासद, आणि राजा हे व्यवहारनिर्णयाविषयीं ( एकापेक्षां दुसरा, त्यापेक्षां तिसरा, असे राजापर्यंत ) चढत्या पायरीचे जाणावे.

तो व्यवहार राजाकडे गेल्यानंतर राजानें दुसरे सभासद घेऊन व पूर्वींच्या सभासदांसहवर्तमान प्रतिज्ञापूर्वक व्यवहारनिर्णय करावा. त्यांत जर कुदृष्ट[१] वादी पराजय पावला तर त्याला दंड करावा, जर त्यानें वाद जिंकिला, तर पूर्वींच्या नियुक्तांस ( सभासदांस ) दंड करावा. ३०

---

**बलोपाधिविनिर्वृत्तान् व्यवहारान्निवर्तयेत् ।**
**स्त्रीनक्तमन्तरागारबहिःशत्रुकृतांस्तथा ॥ ३१ ॥**

दुर्बलैर्व्यवहारदर्शिभिर्दृष्टो व्यवहारः परावर्तते प्रबलदृष्टस्तु न निवर्तत इत्युक्तम्। इदानीं प्रबलदृष्टोऽपि व्यवहारः कश्चिन्निवर्तत इत्याह । बलेन बलात्कारेण उपाधिना भयेन विनिर्वृत्तान्निष्पन्नान्व्यवहारान्निवर्तयेत् । तथा स्त्रीभिर्नक्तं रात्रावस्त्रीभिरपि । अन्तरागारे गृहाभ्यन्तरे बहिर्ग्रामादिभ्यः शत्रुभिश्च कृतान्व्यवहारान्निवर्तयेदिति संबन्धः ॥ ३१ ॥

### शाखा १५ बी.

कनिष्ठ न्यायकर्त्यानीं निर्णीत केलेला व्यवहार उलटतो (म्हणजे वरिष्ठ न्यायकर्त्याकडे जातो ), वरिष्ठ न्यायकर्त्यानें निर्णीत केलेला व्यवहार उलटत नाहीं ( म्हणजे कनिष्ठाकडे चौकशीस जात नाहीं ), असें वर सांगितलें. आतां वरिष्ठानें निर्णीत केलेलाहि कांहीं प्रकारचा व्यवहार उलटतो, असें सांगतो.

मूलार्थ–बलात्कारानें, भयानें निर्णीत केलेले, तसेच स्त्रियांनीं, रात्रीं, अंतर्गृहांत, गांवाबाहेर, आणि शत्रूंनीं केलेलेहि, वाद उलटवावे.

टीकार्थ–१ बलात्कारानें, व भयानें निर्णीत केलेले वाद; तसेच स्त्रियांनीं केलेले वाद; व पुरुषांनीं रात्रीं, अंतर्गृहांत व गांवाबाहेर ( रानांत ) केलेले; शत्रूंनीं निर्णीत केलेले वाद उलटवावे. ३१

जबरी वगैरेंकडून झालेले वाद उलटतात.

---

[१] कुदृष्ट वादी म्हणजे माझ्या वादाचा निर्णय यथान्याय झाला नाहीं असें बोलणारा जो वादी किंवा प्रतिवादी तो.

**मत्तोन्मत्तार्तव्यसनिबालभीतादियोजितः ।**
**असंबन्धकृतश्चैव व्यवहारो न सिद्ध्यति ॥ ३२ ॥**

अपिच मत्तो मदनीयद्रव्येण । उन्मत्त उन्मादेन पंचविधेन वातपित्तश्लेष्मसंनिपात-ग्रहसंभवेनोपसृष्टः । आर्तो व्याध्यादिना । व्यसनमिष्टवियोगोऽनिष्टप्राप्तिः तज्जनितं दुःखं तद्वान् व्यसनी । बालो व्यवहारायोग्यः । भीतोऽरातिभ्यः आदिग्रहणात्पुरराष्ट्रादिविरुद्धः । पुरराष्ट्रविरुद्धश्च यश्च राज्ञा विसर्जितः । अनादेयो भवेद्वादो धर्मविद्भिरुदाहृत इति मनुस्मरणात् । एतैर्योजितः कृतो व्यवहारो न सिद्ध्यति । अनियुक्तासंबद्धकृतोऽपि व्यवहारो न सिद्ध्यतीति संबन्धः । यत्तु स्मरणम् । गुरोः शिष्ये पितुः पुत्रे दंपत्योः स्वामिभृत्ययोः । विरोधेऽपि मिथस्तेषां व्यवहारो न सिद्ध्यतीति । तदपि गुरुशिष्यादीनामात्यन्तिकव्यवहारप्रतिषेधपरं न भवति । तेषामपि कथंचिद्व्यवहारस्येष्टत्वात् । तथाहि । शिष्यशिष्टिरवधेनाशक्तौ रज्जुवेणुविदलाभ्यां तनुभ्यामन्येन घ्नन् राज्ञा शास्य इति गौतमस्मरणात् । नोत्तमाङ्गे कथंचनेति मनुस्मरणाच्च । यदि गुरुः कोपावेशवशान्महता दण्डेनोत्तमाङ्गे ताडयति तदा स्मृतिव्यपेतेन मार्गेणाधर्षितः शिष्यो यदि राज्ञे निवेदयति तदा भवत्येव व्यवहारपदम् । तथा भूर्या पितामहोपात्तेत्यादिवचनात्पितामहोपात्ते भूम्यादौ पितापुत्रयोः स्वाम्ये समाने यदि पिता विक्रयादिना पितामहोपात्तं भूम्यादि नाशयति तदा पुत्रो यदि धर्माधिकारिणं प्रवेशयति तदा पितापुत्रयोरपि भवत्येव व्यवहारः । तथा दुर्भिक्षे व्याधिकार्ये च व्याधौ संप्रतिरोधके । गृहीतं स्त्रीधनं भर्ता नाकामो दातुमर्हतीति स्मरणात् । दुर्भिक्षादिव्यतिरेकेण यदि स्त्रीधनं भर्ता व्ययीकृत्य विद्यमानधनोऽपि याच्यमानो न ददाति तदा दंपत्योरपीष्यते एव व्यवहारः । तथा भक्तदासस्य स्वामिना सह व्यवहारान् वक्ष्यति गर्भदासस्यापि गर्भदासादीनधिकृत्य । यश्चैषां स्वामिनं कश्चिन्मोचयेत्प्राणसंशयात् । दासत्वात्स विमुच्येत पुत्रभागं लभेत चेति नारदोक्तत्वात् । तदमोचने पुत्रभागादाने च स्वामिना सह व्यवहारः केन वार्यते । तस्मात् दृष्टादृष्टयोः श्रेयस्करो न भवति गुर्वादिभिर्व्यवहार इति प्रथमं शिष्यादयो निवारणीयाः राज्ञा सत्सभ्येनेति गुरोः शिष्य इत्यादेः श्लोकस्य तात्पर्यार्थः । अत्यन्तनिर्बन्धे तु शिष्यादीनामप्युक्तरीत्या प्रवर्तनीयो व्यवहारः । यदपि । एकस्य बहुभिः सार्द्धं स्त्रीणां प्रेष्यजनस्य च । अनादेयो भवेद्वादो धर्मविद्भिरुदाहृत इति नारदवचनम् । तत्रैकस्यापि । गणद्रव्यं हरेद्यस्तु संविदं लङ्घयेच्च यः । तथा एकं घ्नन्तं बहूनां चेत्यादिस्मरणादेकार्थे बहुभिः सार्द्धं व्यवहार इष्यत एवेति भिन्नार्थैर्बहुभिरेकस्य युगपद्व्यवहारो न भवतीति द्रष्टव्यम् । स्त्रीणामित्यपि गोपशौण्डिकादिस्त्रीणां स्वातन्त्र्याद्व्यवहारो भवत्येवेति । तदन्यासां कुलस्त्रीणां पतिषु जीवत्सु तत्पारतन्त्र्यादनादेयो व्यवहार इति व्याख्येयं । प्रेष्यजनस्य चेति एतदपि प्रेष्यजनस्य स्वामिपारतन्त्र्यात् स्वार्थव्यवहारेऽपि स्वाम्यनुज्ञयैव व्यवहारो नान्यथेति योजनीयम् ॥ ३२ ॥

**मूलार्थ**–मत्त, उन्मत्त, आर्त, व्यसनी, बाल, भीत इत्यादिकांनीं केलेला व तिन्हाइतानें निर्णीत केलेलाहि वाद सिद्ध होत नाहीं.

**टीकार्थ**–**मत्त** म्हणजे मादक द्रव्य ( भांग दारू वगैरे) पिऊन मस्त झालेला; **उन्मत्त** म्हणजे वात, कफ, पित्त, सन्निपात, ग्रहावेश ह्यांकडून पीडित झालेला ( वेडा वगैरे ); **आर्त** ह्मणजे व्याधिग्रस्त; **व्यसनी** ह्मणजे इष्टवियोगानें किंवा अनिष्टप्राप्तीनें जो दुःखित तो; **बाल** (व्यवहारायोग्य); व **भीत** ह्मणजे शत्रूंपासून भय पावलेला; ह्यांनीं केलेला वाद उलटतो, इत्यादिक म्हणजे आणखी जे पुराशीं विरुद्ध व राष्ट्राशीं विरुद्ध **व्यवहार** तेहि घेऊं नयेत. ( ह्यास प्रमाण ).

**मनु**–जो विवाद नगराशीं विरुद्ध, व राष्ट्राशीं विरुद्ध, व जो राजानें टाकलेला तो घेऊं नये, असें धर्मज्ञांनीं सांगितलें आहे.

आणि जो ज्या व्यवहारीं नेमलेला नाहीं, व ज्याचा त्या वादाशीं संबंध नाहीं, अशानें केलेला व्यवहारहि सिद्धि पावत नाहीं.

**स्मृति**–२ गुरु शिष्य, पिता पुत्र, स्त्री पुरुष, धनी चाकर, ह्यांचा परस्पर विवाद झाला असतां तो राजानें मनास आणूं नये.

असें जें वचन आहे तेंहि गुरु शिष्य इत्यादिकांचा अगदींच व्यवहार मनास आणूं नये अशाविषयीं नव्हे, कारण, ह्यांचाहि व्यवहार प्रसंगविशेषीं मनास आणावा असें उक्त आहे.

तेंच उपपादन करून सांगतो.

**गौतम**–३ गुरूनें शिष्यास शिक्षा करणें तर शिष्य अशक्त असल्यास न मारितां ( वाग्दंडानें ) करावी, ( शक्त असल्यास ) बारीक दोरीनें, किंवा कांबटीनें करावी. ह्यावांचून आणखी कशानें ताडन केलें असतां राजानें गुरूला शिक्षा करावी.

**मनु**–( गुरूनें शिष्याला मारणें तर ) उत्तमांगावर ( मस्तकावर ) कधीं मारूं नये.

गुरुशिष्यांचा वाद कसा असतां मनास आणावा.

असें आहे म्हणून जर गुरु क्रोधाच्या आवेशानें मोठ्या दंडेंकरून उत्तमांगावर ताडन करितो आणि शिष्यहि धर्मशास्त्रविरुद्ध वर्तणुकीनें पीडित झाल्यामुळें राजाकडे फिर्याद जातो, तर ती फिर्याद घेण्यास योग्य आहे.

पितापुत्रांचा वाद कोणत्या बाबतींत असल्यास मनास आणावा.

४ तसेंच पुढें ( दायविभागप्रकरणांत ११ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे वचनांत ) सांगितलें आहे कीं, पितामहानें संपादिलेल्या भूमि इत्यादि स्थावरजंगमधनाविषयीं पितापुत्रांची सत्ता समान आहे, ह्यास्तव जर पिता, त्या पितामहसंपादित भूम्यादि धनाचा विक्रय इत्यादिकेंकरून नाश करितो आणि पुत्र त्याबद्दल न्यायाधीशाकडे फिर्याद जातो, तर पितापुत्रांचाहि व्यवहार होतो.

५ तसेंच ( दायविभागप्रकरणांत ३३ व्या शाखेच्या ६ व्या अंकांत सांगितलें आहे

कोणत्या बाबतींत स्त्रीपुरुषांचा वाद राजानें मनास आणावा.

कीं, ) ( जवळ द्रव्य नसल्यामुळें ) " दुष्काळांत व धर्मकृत्यासाठीं व व्याधि दूर होण्यासाठीं, आणि बंदांतून सुटण्यासाठीं नवऱ्यानें घेतलेलें स्त्रीधन जर त्याची परत देण्याची इच्छा नाहीं तर स्त्रीला परत मिळणार नाहीं." अशा वचनावरून दुष्काळ इत्यादि योग्य कारणावांचून नवरा स्त्रीधन घेऊन खर्चितो आणि त्याचे जवळ धन असतां व ती मागत असतांहि जर तो देत नाहीं, तर अशा प्रकरणीं स्त्रीपुरुषांचाहि व्यवहार ग्राह्य होतो.

धनीसेवकांच्या वादाविषयीं.

६ तसेंच भक्तदासाचेहि धन्याबरोबर वाद पुढें (अभ्युपेत्याशुश्रूषा प्रकरणीं ६ व्या व ७ व्या अंकांत) सांगितले आहेत, आणि गर्भदासाचाहि वाद गर्भदास इत्यादिकांस उद्देश करून सांगितला आहे. तो असा;—

**नारद**—ह्या दासांमधून[१] जो दास धन्याला प्राणसंकटापासून मुक्त करितो, तो दासपणापासून सूट पावून पुत्राबरोबर विभागाचा अधिकारी होतो.

असें नारदानें सांगितलें आहे यास्तव जर धनी त्याला दासत्वापासून मुक्त करीत नाहीं व पुत्राबरोबर विभाग देत नाहीं तर त्याचा धन्याबरोबर विवाद कोण निवारण करूं शकेल ?

गुरुशिष्य, पितापुत्र, स्त्रीपुरुष ह्यांचा वाद इहपरलोकीं निंद्य यास्तव राजानें प्रथमतः त्यांचें निवारण करावें.

७ तस्मात् गुरुशिष्यांचा, पितापुत्रांचा, स्त्रीपुरुषांचा, आणि धनीचाकरांचा परस्पर वाद इहलोकीं व परलोकींहि श्रेयस्कर नव्हे, म्हणून सभासदांसह राजानें प्रथमतः शिष्य, पुत्र, स्त्री, चाकर, यांचें निवारण करावें, असें गुरु शिष्य इत्यादिक वचनाचा (२ ऱ्या अंकाच्या स्मृतीचा ) तात्पर्यार्थ आहे. जर विवाद करण्याविषयीं शिष्यादिकांचा फारच दुराग्रह असेल तर मागें ( ३ ऱ्या, ४ थ्या, ५ व्या, आणि ६ व्या अंकांत ) सांगितल्याप्रमाणें व्यवहार चालू करावा.

एकाचा बहुतांशीं वाद एका अर्थाविषयीं असल्यास घ्यावा.

**नारद**—८ एकाचा बहुतांशीं वाद, स्त्रियांचा वाद, चाकरांचा वाद, राजानें मनास आणूं नये असें धर्मज्ञांनीं सांगितलें आहे.

ह्या वचनांत " एकाचा बहुतांशीं वाद " असें जें म्हटलें आहे त्याचा अर्थ असा कीं, " जो गणद्रव्य हरण करितो तो, व जो केलेल्या संकेताचें उल्लंघन करितो " तसेंच " बहुत मिळून एकाला मारणारांस " इत्यादि वचनावरून एका अर्थाविषयीं एकाचा बहुतांबरोबर वाद होतो, परंतु विवादाचीं कारणें जर निरनिराळीं आहेत, तर एकाचा बहुतांबरोबर एकसमयावच्छेदेंकरून व्यवहार चालू होत नाहीं.

९ तसेंच वरच्या नारदवचनांत " स्त्रियांचा वाद," असें म्हटलें आहे त्याचाहि

---

१ ह्या दासांमधून म्हणजे पुढें अभ्युपेत्याशुश्रूषा प्रकरणीं १ ल्या शाखेच्या तिसऱ्या अंकांत सांगितलेल्या १५ दासांमधून कोणी दास.

राजानें कोणकोणत्या स्त्रियांचा वाद राजानें मनास आणावा.

अर्थ असाच कीं, गौळी, कलाल इत्यादिकांच्या स्त्रियांस स्वातंत्र्य आहे, म्हणून त्यांचा विवाद घेण्यास योग्य होतो, त्यांहून अन्य कुलस्त्रिया नवरा जीवंत असतां नवऱ्याच्या स्वाधीन असतात यास्तव त्यांचा विवाद अग्राह्य होतो.

१० तसेंच ( सदर्हू नारदवचनांत ) "चाकरांचा वाद" असें म्हटलें आहे त्याचाहि

धनीचाकरांचा खासगीचा वाद देखील धन्याच्या आज्ञेवांचून चालवूं नये.

अर्थ असा कीं, चाकरांस धन्याच्या पारतंत्र्यामुळें स्वतांच्या वादाविषयींहि धन्याची आज्ञा घेतली पाहिजे. नाहीं तर त्यांचा वाद चालणार नाहीं. ३१

---

**प्रनष्टाधिगतं देयं नृपेण धनिने धनम्।**
**विभावयेन्नचेल्लिङ्गैस्तत्समं दण्डमर्हति॥ ३३॥**

परावर्त्यं व्यवहारमुक्त्वा इदानीं परावर्त्यं द्रव्यमाह। प्रनष्टं हिरण्यादि शौल्किकस्थानपालादिभिरधिगतं राज्ञे समर्पितं यत्तद्राज्ञा धनिने दातव्यम्। यदि धनी रूपसंख्यादिभिर्लिङ्गैर्भावयति। यदि न भावयति तदा तत्समं दण्ड्यः। असत्यवादित्वात्। अधिगमस्य स्वत्वनिमित्तत्वात् स्वत्वे प्राप्ते तत्परावृत्तिरनेनोक्ता। अत्र च कालावधिं वक्ष्यति। शौल्किकैः स्थानपालैर्वा नष्टापहृतमाहृतम्। अर्वाक्संवत्सरात्स्वामी हरेत परतो नृप इति। मनुना पुनः संवत्सरत्रयमवधित्वेन निर्दिष्टम्। प्रनष्टस्वामिकं रिक्थं राजा त्र्यब्दं निधापयेत्। अर्वाक् त्र्यब्दाद्धरेत्स्वामी परतो नृपतिर्हरेदिति। तत्र वर्षत्रयपर्यन्तमवश्यं रक्षणीयम्। तत्र यदि संवत्सरादर्वाक् स्वाम्यागच्छेत्तदा कृत्स्नमेव दद्यात्। यदा पुनः संवत्सरादूर्ध्वमागच्छति तदा किंचिद्भागं रक्षणमूल्यं गृहीत्वा शेषं स्वामिने दद्यात्। यथाह। आददीताथ षड्भागं प्रनष्टाधिगतान्नृपः। दशमं द्वादशं वापि सतां धर्ममनुस्मरन्निति। तत्र प्रथमे वर्षे कृत्स्नमेव दद्यात् द्वितीये द्वादशं भागं तृतीये दशमं चतुर्थादिषु षष्ठं भागं गृहीत्वा शेषं दद्यात्। राजभागस्य चतुर्थोऽशोऽधिगन्त्रे दातव्यः। स्वाम्यनागमे तु कृत्स्नस्य धनस्य चतुर्थमंशमधिगन्त्रे दत्त्वा शेषं राजा गृह्णीयात्। तथाह गौतमः। प्रनष्टस्वामिकमधिगम्य संवत्सरं राज्ञा रक्ष्यमूर्ध्वमधिगन्तुश्चतुर्थोऽशो राज्ञः शेषमित्यत्र संवत्सरमित्येकवचनमविवक्षितम्। राजा त्र्यब्दं निधापयेदिति स्मरणात्। हरेत परतो नृप इत्येतदपि स्वामिन्यनागते त्र्यब्दादूर्ध्वं व्ययीकरणाभ्यनुज्ञा ततः परमागते तु स्वामिनि व्ययीभूतेऽपि द्रव्ये राजा स्वांशमवतार्य तत्समं दद्यात्। एतच्च हिरण्यादिविषयम्। गवादिविषये वक्ष्यति पणानेकशफे दद्यादित्यादिना॥ ३३॥

शाखा १६ वी.

कोणकोणते व्यवहार उलटतात तें सांगून आतां कोणतें द्रव्य परत व्हावयाजोगें तें सांगतो.

**मूलार्थ**— हरवलेलें द्रव्य सांपडलें तर तें राजानें मालकास द्यावें, परंतु मालक आपलें-सें खुणांनीं शाबीत करील तर, अन्यथा तितक्याच दंडास (मालक) पात्र होतो.

**टीकार्थ**—१ जर हरवलेलें सोनें इत्यादि द्रव्य, जकातदार, पाहारेकरी इत्यादिकांस सांपडलें आणि तें त्यांनीं सरकारांत दिलें तर, तें सरकारानें मालकास परत द्यावें. परंतु जर मालक तें द्रव्य रूप, संख्या इत्यादिक खुणा पटवून आपलेंसें शाबीत करील तर, आणि जर तो शाबीत करूं शकत नाहीं, तर मिथ्या बोलला सबब हरवलेल्या द्रव्याइतकाच त्यापासून दंड घ्यावा.

हरवलेलें द्रव्य सांपडलें असतां मालकास परत द्यावें.

२ द्रव्यावर मालकाची सत्ता उत्पन्न होण्याचीं जीं साधनें सांगितलीं आहेत, त्यांत **अधिगम**हि आहे, म्हणून सरकारास जें द्रव्य सांपडलें, त्यावर सरकाराची सत्ता झाली असतांहि ह्याच ( १ ल्या अंकाचे ) वचनानें मालकास परत द्यावें असें सांगितलें.

३ हरवलेलें धन सांपडलें असतां त्या धनाविषयीं मालकाची वाट राजानें कोठपर्यंत पाहावी, त्याविषयीं मुदत पुढें ( अस्वामिविक्रय प्रकरणाच्या ३ ऱ्या शाखेच्या २ ऱ्या अंकांत ) सांगितली आहे, ती अशी;—

**याज्ञवल्क्य**— हरवलेलें व चोरीस गेलेलें द्रव्य जकातदार, किंवा पाहारेकरी ह्यांनीं सरकारांत दिल्यानंतर एका वर्षांत मालक हजर झाल्यास त्यास द्यावें.

मनूनें तर तीन वर्षें वाट पाहावी असें सांगितलें आहे, तें असें.—

**मनु**— हरवलेलें द्रव्य सांपडलें असतां तें राजानें तीन वर्षेंपर्यंत रक्षण करून ठेवावें. तीन वर्षांचे आंत जर मालक हजर होईल तर त्याला द्यावें, पुढें राजानें घ्यावें.

४ तीन वर्षेंपर्यंत अवश्य रक्षण करावें, त्यांत पहिल्या वर्षाचे आंत मालक हजर होईल तर त्यास सर्वच द्यावें. आणि जर एका वर्षानंतर मालक हजर होईल तर रक्षण-निमित्त त्या द्रव्याचा सहावा हिसा घेऊन बाकी द्रव्य मालकास द्यावें.

**मनु**— ५ हरवलेलें द्रव्य सांपडलें असतां त्यांतून राजानें सद्धर्मास अनुसरून सहावा, दहावा, किंवा बारावा अंश घ्यावा.

असें जें वचन त्यांत पहिल्या वर्षीं मालकास सर्व ( द्रव्य ) द्यावें, दुसऱ्या वर्षीं बारा-वा अंश ( रक्षणानिमित्त ) घेऊन बाकी मालकास द्यावें. तिसऱ्या वर्षीं दहावा अंश, आणि चौथ्या इत्यादि वर्षीं सहावा भाग घेऊन बाकी द्यावें.

६ राजानें अधिगंत्याला आपल्या भागांतून चतुर्थांश द्यावा. जर त्या द्रव्याचा मालक आला नाहीं तर सर्व द्रव्याचा चतुर्थांश अधिगंत्याला देऊन बाकी राजानें घ्यावें. गौतमहि तसेंच सांगतो.

हरवलेलें द्रव्य ज्यानें सरकारास दिलें त्याचाच चतुर्थांश द्यावा.

**गौतम**— हरवलेलें द्रव्य सांपडलें असतां राजानें एक वर्षपर्यंत रक्षण करून ठेवावें. नंतर अधिगंत्याला चतुर्थांश देऊन बाकी राजानें घ्यावें.

ह्या वचनांत "एक वर्ष" असें एक वचन सांगितलें तें अविवक्षित. कारण, राजानें तीन वर्षे रक्षण करून ठेवावें असें ( ३ ऱ्या अंकांतील मनु ) वचनांत सांगितलें आहे.

ह्याच ( ३ ऱ्या अंकांतील मनु ) वचनांत "पुढें राजानें घ्यावें" असें सांगितलें आहे तेंहि मालक हजर न होईल तर, तीन वर्षांनंतर राजानें खर्च करावें, अशा आज्ञेविषयीं जाणावें. पुढें मालक हजर झाला असतां व द्रव्यहि खर्चिलें असतां राजानें आपला अंश वजा करून हरवलेल्या द्रव्याइतकें द्रव्य ( सरकारांतून ) मालकाचें द्यावें.

हा ( १ ल्या अंकापासून एथपर्यंत सांगितलेला ) प्रकार सुवर्ण इत्यादि द्रव्याविषयीं समजावा. गाय, महिषी इत्यादि हरवलेलें सांपडलें असतां त्याविषयीं तर ( पुढें अस्वामिविक्रय प्रकरणीं ३ ऱ्या शाखेच्या ४ थ्या अंकाचे वचनांत ) एकशफ पशूबद्दल चार पण द्यावे इत्यादि सांगितलें आहे. ३३

---

**राजा लब्ध्वा निधिं दद्याद्द्विजेभ्योऽर्द्धं द्विजः पुनः ।**
**विद्वानशेषमादद्यात्स सर्वस्य प्रभुर्यतः ॥ ३४ ॥**
**इतरेण निधौ लब्धे राजा षष्ठांशमाहरेत् ।**
**अनिवेदितविज्ञातो दाप्यस्तं दण्डमेव च ॥ ३५ ॥**

रथ्याशुल्कशालादिनिपतितस्य सुवर्णादेर्नष्टस्याधिगमे विधिमुक्त्वा अधुना भूमौ चिरनिखातस्य सुवर्णादेर्निधिशब्दवाच्यस्याधिगमे विधिमाह। उक्तलक्षणं निधिं राजा लब्ध्वा अर्द्धं ब्राह्मणेभ्यो दत्त्वा शेषं कोशे निवेशयेत्। ब्राह्मणस्तु विद्वान् श्रुताध्ययनसंपन्नः सदाचारो यदि निधिं लभेत तदा सर्वमेव गृह्णीयात् यस्मादसौ सर्वस्य जगतः प्रभुः। इतरेण तु राजविद्वद्ब्राह्मणव्यतिरिक्तेन अविद्वद्ब्राह्मणक्षत्रियादिना निधौ लब्धे राजा शष्ठांशमधिगन्त्रे दत्त्वा शेषं निधिं स्वयमेवाहरेत् । यथाह वसिष्ठः। अप्रज्ञायमानं वित्तं योऽधिगच्छेद्राजा तद्धरेत् षष्ठमंशमधिगन्त्रे दद्यादिति । गौतमोऽपि । निध्यधिगमो राजधनं भवति। न ब्राह्मणस्याभिरूपस्य अब्राह्मणोप्याख्याता षष्ठमंशं लभेतेत्येके इति । अनिवेदित इति कर्तरि निष्ठा । अनिवेदितश्चासौ विज्ञातश्च राज्ञेप्यनिवेदितविज्ञातः यः कश्चिन्निधिं लब्ध्वा राज्ञे न निवेदितवान् विज्ञातश्च राज्ञा स सर्वं निधिं दाप्यो दण्डश्च शक्त्यपेक्षया। अथ निधेरपि स्वाम्यागत्य रूपकसंख्यादिभिः स्वत्वं भावयति तदा तस्मै राजा निधिं दत्त्वा षष्ठं द्वादशं वांशं स्वयमाहरेत् । यथाह मनुः । ममायमिति यो ब्रूयान्निधिं सत्येन मानवः । तस्याददीत षड्भागं राजा द्वादशमेव वेति । अंशविकल्पस्तु वर्णकालाद्यपेक्षया वेदितव्यः ॥ ३४ ॥ ३५ ॥

शाखा १७ वी.

रस्त्यांत किंवा जकातीचा नाका वगैरे ठिकाणीं पडलेलें सोनें वगैरे द्रव्य हरवलेलें

सांपडलें असतां त्याचा विधि सांगितला. आतां भूमींत बहुत दिवस पुरलेलें सोनें वगैरे जें निधिरूप द्रव्य तें सांपडलें असतां त्याचा विधि सांगतो.

**मूलार्थ**— **राजाला निधि** सांपडला तर त्यानें अर्धा ब्राह्मणांस द्यावा. विद्वान् ब्राह्मणास सांपडल्यास त्यानेंच सर्व घ्यावा. कारण, हा सर्वांचा प्रभु होय. इतरास ह्मणजे राजा, विद्वान्ब्राह्मण एतद्व्यतिरिक्त अविद्वान् ब्राह्मण, क्षत्रियादिक यास निधि सांपडला असतां राजानें सहावा भाग त्यास द्यावा. सांपडलेला **निधि** जर त्यानें सरकारांत विदित केला नाहीं, आणि परभारें (सरकारास) समजलें तर त्यापासून निधि घेऊन दंडहि घ्यावा.

**टीकार्थ**—१ उक्तलक्षण **निधि राजाला** सांपडला असतां त्यानें त्यांतून अर्धा ब्राह्मणांस देऊन बाकी आपल्या जामदारखान्यांत ठेवावा.

राजाला सांपडलेल्या ठेव्याविषयीं.

२ ब्राह्मणास जर **निधि** सांपडला आणि तो ब्राह्मण वेदशास्त्रसंपन्न असेल तर त्यानेंच तो सर्व घ्यावा; कारण, वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण सर्वांचा प्रभु ( नियंता ) होय.

विद्वान् ब्राह्मणास सांपडलेल्या ठेव्याविषयीं.

३ जर **राजा** आणि विद्वान् ब्राह्मण ह्यांवांचून इतरास म्हणजे अविद्वान् ब्राह्मणास व क्षत्रियादिकास **निधि** सांपडला असतां त्याचा षष्ठांश अधिगंत्याला देऊन शेष **निधि** राजानें घ्यावा.

राजा, विद्वान् ब्राह्मण ह्यांवांचून इतरास ठेवा सांपडल्यास त्याविषयीं.

**वसिष्ठ**— अप्रज्ञायमानवित्त ( ठेवारूप धन ) ज्याला सांपडलें आहे त्यापासून तें धन राजानें घेऊन त्यांतून त्याला सहावा अंश द्यावा.

**गौतम**—सांपडलेला ठेवा राजानें घ्यावा, परंतु विद्वान् ब्राह्मणास सांपडला असेल तर घेऊं नये. ब्राह्मणाखेरीज दुसऱ्यास सांपडेल तर त्याला सहावा अंश मात्र मिळेल ( बाकी राजा घेईल ) असें कोणी आचार्य म्हणतात.

४ कोणास **निधि** सांपडला असतां त्यानें स्वतां राजाला न जाहीर करितां परभारें कळेल तर राजानें त्यापासून सर्व निधि घेऊन शक्त्यनुसार दंडहि घ्यावा.

निधि सांपडल्यावर सरकारांत जाहीर न केल्यास दंड.

५ जर सांपडलेल्या **निधीचा** मालक हजर होऊन रूप संख्या वगैरेकडून तो आपलासा शाबीत करील तर **राजानें** त्याला त्याचा **निधि** देऊन त्यांतून सहावा किंवा बारावा अंश घ्यावा.

मालक हजर होऊन शाबीत करितो तर आपला ठेवा पावतो.

**मनु**— हा **निधि** माझा आहे, असें खरेपणानें मालक शाबीत करील तर त्यापासून राजानें सहावा किंवा बारावा अंश घ्यावा ( आणि निधि मालकास द्यावा).

" सहावा किंवा बारावा अंश " असा जो वर ( मनुवचनांत ) विकल्प सांगितला तो ब्राह्मणादिक वर्ण व (दुर्भिक्षसुभिक्षादि) काल इत्यादिकांच्या तारतम्यानें योजावा. ३४।३५

**देयं चौरहृतं द्रव्यं राज्ञा जानपदाय तु ।**
**अददद्धि समाप्नोति किल्बिषं यस्य तस्य तत् ॥ ३६ ॥**

चौरहृतं प्रत्याह । चौरैर्हृतं द्रव्यं चौरेभ्यो विजित्य जानपदाय स्वदेशनिवासिने यस्य तत् द्रव्यं तस्मै राज्ञा दातव्यम् । हि यस्मात् अददत् अप्रयच्छत् यस्य तदपहृतं द्रव्यं तस्य किल्बिषमाप्नोति । तस्य चौरस्य च । यथाह मनुः । दातव्यं सर्ववर्णेभ्यो राज्ञा चौरहृतं धनम् । राजा तदुपयुञ्जानश्चौरस्याप्नोति किल्बिषमिति । यदि चौरहस्तादादाय स्वयमुपभुङ्क्ते तदा चौरस्य किल्बिषमाप्नोति । अथ चौरहृतमुपेक्ष्यते तदा जानपदस्य किल्बिषम् । अथ चौरहृताहरणाय यतमानोऽपि न शक्नुयादाहर्तुं तदा तावद्धनं स्वकोशाद्दद्यात् । यथाह गौतमः । चौरहृतमवजित्य यथास्थानं गमयेत् कोशाद्वा दद्यादिति । कृष्णद्वैपायनोऽपि । प्रत्याहर्तुं न शक्तस्तु धनं चौरहृतं यदि । स्वकोशात्तद्धि देयं स्यादशक्तेन महीक्षितेति ॥ ३६ ॥

### शाखा १८ वी.

चोरीस गेलेल्या द्रव्याविषयीं सांगतो.

**मूलार्थ**— चोरीस गेलेलें द्रव्य, राजानें स्वदेशीयास द्यावें. कारण, न देणारा राजा मालकाचें व चोराचेंहि पाप घेतो.

**टीकार्थ**—१ चोरीस गेलेलें द्रव्य राजानें चोरांपासून घेऊन आपल्या देशांत राहणाऱ्यांतून ज्याचें तें द्रव्य चोरीस गेलें असेल त्याला[1] द्यावें. कारण, न देणारास राजा, ज्याचें द्रव्य चोरीस गेलें असेल त्याचें पाप व चोराचेंहि पाप भोगितो. ह्यास प्रमाण मनु सांगतो.

चोरीस गेलेलें द्रव्य ज्याचें त्यास न दिल्यास राजा पापी होतो.

**मनु**— चोरीस गेलेलें द्रव्य कोणत्याहि वर्णाचें ( ब्राह्मणादिकांचें ) असो, ज्याचें त्याला द्यावें. तें न देतां राजा स्वतां उपभोगितो तर तो चोराचें पाप भोगितो.

२ जर चोरापासून घेऊन आपणच उपभोगितो तर तो चोराचें पाप भोगितो, आणि जर चोरीस गेलेलें द्रव्य हस्तगत होण्याविषयीं उपेक्षा करितो तर मालकाच्या पापाचा विभागी होतो.

३ जर चोरीस गेलेलें द्रव्य हस्तगत करण्याविषयीं प्रयत्न करीत असतांहि तें हस्तगत होऊं शकत नाहीं, तर राजानें आपल्या जामदारखान्यांतून तितकें द्यावें.

चोरीस गेलेलें द्रव्य हस्तगत करूं शकत नाहीं तर जामदारखान्यांतून देववावें.

**गौतम**— चोरांनीं हरण केलेलें द्रव्य त्यांकडून घेऊन ज्याचें त्याला द्यावें. अथवा ( असें न होईल तर ) आपल्या जामदारखान्यांतून द्यावें.

---

१ ज्याचें द्रव्य गेलें असेल त्यास.

कृष्णद्वैपायनहि ( सांगतो ). चोरांनीं हरण केलेलें द्रव्य जर, राजाच्यानें हस्तगत करवत नाहीं, तर तें त्यानें आपल्या जामदारखान्यांतून द्यावें. ३६

---

## ऋणादान प्रकरण २ रें.

साधारणासाधारणरूपां व्यवहारमातृकामभिधायाधुनाष्टादशानां व्यवहारपदानामाद्यमृणादानपदं दर्शयति। अशीतिभागो वृद्धिः स्यादित्यादिना मोच्य आधिस्तदुत्पन्ने प्रविष्टे द्विगुणे धन इत्येवमन्तेन। तच्च ऋणादानं सप्तविधं। ईदृशमृणं देयं ईदृशमदेयं अनेनाधिकारिणा देयं अस्मिन् समये देयं अनेन प्रकारेण देयमित्यधमर्णे पञ्चविधम्। उत्तमर्णे दानविधिरादानविधिश्चेति द्विविधमिति। एतच्च नारदेन स्पष्टीकृतम्। ऋणं देयमदेयं च येन यत्र यथा च यत्। दानग्रहणधर्माश्च ऋणादानमिति स्मृतमिति। तत्र प्रथममुत्तमर्णस्य दानविधिमाह। तत्पूर्वकत्वादितरेषां।

**अशीतिभागो वृद्धिः स्यान्मासि मासि सबन्धके।**
**वर्णक्रमाच्छतं द्वित्रिचतुःपञ्चकमन्यथा॥ ३७॥**

मासि मासि प्रतिमासं बन्धकं विश्वासार्थं यदाधीयते आधिरिति यावत्। बन्धकेन सह वर्तत इति सबन्धकः प्रयोगस्तस्मिन् सबन्धके प्रयोगे प्रयुक्तस्य द्रव्यस्य अशीतिभागो वृद्धिर्धर्म्या भवति। अन्यथा बन्धकरहिते प्रयोगे वर्णानां ब्राह्मणादीनां क्रमेण द्वित्रिचतुःपञ्चकं शतं धर्म्यं भवति। ब्राह्मणेऽधमर्णे द्विकं शतं क्षत्रिये त्रिकं वैश्ये चतुष्कं शूद्रे पञ्चकं मासिमासीत्येवं द्वौ वा त्रयो वा चत्वारो वा पञ्च वा द्वित्रिचतुःपञ्चाः अस्मिन् शते वृद्धिर्दीयते इति द्वित्रिचतुःपञ्चकं शतम्। तदस्मिन् वृद्ध्या यत् लाभशुल्कोपदादीयत इति। संख्याया अतिशदन्तायाः कन्। तदन्तविधिश्चात्र द्रष्टव्यः। वृद्धेर्वृद्धिश्चक्रवृद्धिः प्रतिमासं तु कालिका। इच्छाकृता कारिता स्यात्कायिका कायकर्मणा। इयं च वृद्धिर्मासि मासि गृह्यते इति कालिका। इयमेव वृद्धिर्दिवसगणनया विभज्य प्रतिदिवसं गृह्यमाणा कायिका भवति। तथा च नारदेन। कायिका कालिका चैव कारिता च तथा परा। चक्रवृद्धिश्च शास्त्रेषु तस्य वृद्धिश्चतुर्विधेत्युक्तोक्तम्। कायाविरोधिनी शश्वत्पणपादादिकायिका। प्रतिमासं स्रवन्ती या वृद्धिः सा कालिका मता। वृद्धिः सा कारिता नामाधमर्णेन स्वयंकृता। वृद्धेरपि पुनर्वृद्धिश्चक्रवृद्धिरुदाहृतेति॥ ३७॥

शाखा १ ली.

ह्याप्रमाणें साधारण व असाधारण व्यवहारमातृका सांगून आतां व्यवहारप्रकरणांतलें पहिलें जें ऋणादान ( दिवाणी ) प्रकरण त्याचें निरूपण करितो; "ऐंशीवा हिसा व्याज घ्यावें" एथून आरंभ करून "गहाण मालाचें उत्पन्न मूळकर्जाच्या दामदुपटी इतकें सावकारास पोंचलें तर त्यानें तें गहाण कर्जदारास परत द्यावें" एथपर्यंत.

१ **ऋणादान** ( दिवाणी ) व्यवहाराचे प्रकार सात आहेत. द्यावयास योग्य असें कर्ज कोणतें, व द्यावयास अयोग्य कर्ज कोणतें, व देण्याचा अधिकारी कोण, व कोणत्या समयीं द्यावें, आणि कसें द्यावें असे कर्जदाराविषयीं पांच प्रकार; देणें व परत घेणें असे दोन प्रकार सावकाराविषयीं आहेत. नारद हेंच स्पष्ट करून सांगतो.

कर्ज देण्याचे याचे प्रकार सात आहेत.

**नारद**— द्यावयास योग्य कर्ज कोणतें, द्यावयास अयोग्य कर्ज कोणतें, देण्याचा अधिकारी कोण, कोणत्या समयीं द्यावें, आणि कसें द्यावें, असे कर्जदाराविषयीं पांच प्रकार, देणें आणि परत घेणें असे सावकाराविषयीं दोन प्रकार असें ( सात प्रकारचें ) **ऋणादान** सांगितलें आहे.

ह्यांत प्रथमतः सावकारानें कर्जदाराला कर्ज देण्याचा प्रकार सांगतो, कारण, तन्मूलक इतर (६) प्रकार आहेत.

**मूलार्थ**— गहाणसहित जें कर्ज त्याला दर महिना ऐंशीवा हिसा व्याज. गहाणरहित कर्जाला वर्णाच्या अनुक्रमानें शेंकडा दोन, तीन, चार, पांच रुपये असें व्याज आहे.

**टीकार्थ**—२ सावकारानें गहाण ठेवून कर्जदाराला कर्ज दिलें असेल तर दरमहा, दिलेल्या रुपयांचा ऐंशीवा हिसा व्याज घ्यावें, हें यथाशास्त्र आहे.

गहाण घेऊन कर्ज दिलें असल्यास ऐंशीवा हिसा व्याज.

३ गहाणावांचून कर्ज दिलें आहे तर ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र ह्या अनुक्रमानें दरमहिन्यास शेंकडा दोन, तीन, चार पांच रुपये व्याज घ्यावें. म्हणजे असें;— ब्राह्मण कर्जदार असल्यास त्यापासून दुहोत्रा, क्षत्रियापासून तिहोत्रा, वैश्यापासून चौहोत्रा, आणि शूद्रापासून पांचोत्रा व्याज घ्यावें.

गहाणाशिवाय दिलेल्या कर्जाचें व्याज.

४ असें दरमहिना जें व्याज घेतलें जातें त्याला ( शास्त्रांत ) **कालिक** व्याज म्हटलें आहे. हेंच व्याज ( तीस ) दिवसांच्या हिशेबानें विभागून दररोज घेतलें असतां ह्याला **कायिक** व्याज म्हटलें आहे. नारदहि तसेंच सांगतो.

**नारद**— कायिक[१], कालिक[२], कारित[३], आणि चक्रवृद्धि[४] असें शास्त्रांत चार प्रकारचें व्याज सांगितलें आहे.

व्याजाचे प्रकार.

असें सांगून त्याचें स्वरूपहि तो (नारद)च सांगतो. **कायिक** म्हणजे दरमहा जी व्याजाची कबुलात असेल तिच्या हिशेबानें दररोज जें पण किंवा त्याचा चतुर्थांश वगैरे घेतलें जातें तें व्याज. **कालिक** म्हणजे दरमहिन्यास दिलें जातें जें व्याज तें. **कारित** म्हणजे कर्जदारानें स्वसंतोषानें जें व्याज कबूल केलें तें. **चक्रवृद्धि** म्हणजे व्याजालाहि पुनः व्याज घेतलें जातें तें. ३७

## कान्तारगास्तु दशकं सामुद्रा विंशकं शतम् ।

गृहीतृविशेषेण प्रकारान्तरमाह । कान्तारमरण्यं तत्र गच्छन्तीति कान्तारगाः ये वृद्धया धनं गृहीत्वाधिकलाभार्थमतिगहनं प्राणधनविनाशशङ्कास्थानं प्रविशन्ति ते दशकं शतं दद्युर्ये च समुद्रगास्ते विंशकं शतं मासि मासीत्येव । एतदुक्तं भवति कान्तारगेभ्यो दशकं शतं सामुद्रेभ्यश्च विंशकं शतं उत्तमर्ण आदद्यात् मूल्यनाशस्यापि शङ्कितत्वादिति ॥

शाखा २ री.

कर्ज घेणाराविषयीं आणखी व्याजाचे विशेष प्रकार सांगतो.

**मूलार्थ**– दुर्गम अरण्यांत जाणारांनीं शेंकडा दहा आणि समुद्रांत जाणारांनीं शेंकडा वीस व्याज द्यावें.

**टीकार्थ**–१ जे व्याजीं द्रव्य काढून अधिक नफा मिळावा एतदर्थ व्यापार करावयास जेथें द्रव्याचा, किंबहुना प्राणाचाहि नाश होईल अशा शंकास्पद अरण्यांत जातात, त्यांनीं दरमहिना शेंकडा दहा व्याज द्यावें.

अरण्यांत व्यापारासाठीं जाणारांपासून दाहोत्रा व्याज.

२ जे समुद्रांत व्यापार करावयास जातात, त्यांनीं शेंकडा दरमहिना वीस व्याज द्यावें. म्हणजे असें;–अरण्यांत जाणाऱ्यांपासून शेंकडा दहा रुपये, आणि समुद्रांत जाणाऱ्यांपासून शेंकडा वीस रुपये व्याज सावकारानें घ्यावें, कारण, कदाचित् दोनहि ठिकाणीं मुद्दलहि बुडेल असी शंका आहे म्हणून.

व्यापारासाठीं समुद्रांत जाणारांपासून वीस व्याज.

## दद्युर्वा स्वकृतां वृद्धिं सर्वे सर्वासु जातिषु ॥ ३८ ॥

इदानीं कारितां वृद्धिमाह। सर्वे वा ब्राह्मणादयोऽधमर्णाः अबन्धके सबन्धके वा स्वकृतां स्वाभ्युपगतां वृद्धिं सर्वासु जातिषु दद्युः । क्वचिदकृतापि वृद्धिर्भवति । यथाह नारदः । न वृद्धिः प्रीतिदत्तानां स्यादनाकारिता क्वचित् । अनाकारितमप्यूर्ध्वं वत्सरार्द्धाद्विवर्द्धत इति । यस्तु याचितकं गृहीत्वा देशान्तरं गतस्तं प्रति कात्यायनेनोक्तं । यो याचितकमादाय तमदत्त्वा दिशं व्रजेत् । ऊर्ध्वं संवत्सरात्तस्य तद्धनं वृद्धिमाप्नुयादिति । यश्च याचितकमादाय याचितोऽप्यदत्त्वा देशान्तरं व्रजति तं प्रति तेनैवोक्तं । कृतोद्धारमदत्त्वा यो याचितस्तु दिशं व्रजेत् । ऊर्ध्वं मासत्रयात्तस्य तद्धनं वृद्धिमाप्नुयादिति । यः पुनः स्वदेशे स्थित एव याचितो याचितकं न ददाति तं याचितकालादारभ्य वृद्धिं दापयेद्राजा । यथाह । स्वदेशेऽपि स्थितो यस्तु न दद्याद्याचितः क्वचित् । तं ततोऽकारितां वृद्धिमनिच्छन्तं च दापयेदिति । अनाकारितवृद्धेरपवादो नारदेनोक्तः । पण्यमूल्यं भृतिर्न्यासो दण्डो यश्च प्रकल्पितः । वृथादानाक्षिकपणा वर्द्धन्ते नाविवक्षिता इति । अविवक्षिता अनाकारिता इति ॥ ३८ ॥

आतां **कारित** व्याजाचा प्रकार सांगतो.

**मूलार्थ** - अथवा सर्वांनीं सर्व जातींत स्वतां करार केलेलें व्याज द्यावें.

**टीकार्थ**–३ ब्राह्मणादिक सर्व कर्जदारांनीं कोणत्याहि जातीच्या सावकारापासून गहाण ठेवून किंवा गहाणावांचून कर्ज घेतलें असेल त्याविषयीं जशी व्याजाची कबुलात केली असेल तसें द्यावें. कचिद्व्यवहारीं व्याजाचा करार नसला तथापि व्याज लागू होतें. ह्यास प्रमाण सांगतो.

करार केलेलें व्याज द्यावें.

**नारद**–४ जें सावकारानें कर्जदाराला संतोषानें उसनें दिलें तें **प्रीतिदत्त**, त्याचें व्याज सहा महिनेपर्यंत मिळणार नाहीं, पुढें ( सावकाराची इच्छा असल्यास ) व्याज मिळेल.

उसनें घेतलेल्यास सहा महिन्यांपुढें व्याज.

जो **याचितक** ( तसलमात ) घेऊन देशांतरास जातो त्यापासून कधींपासून व्याज घ्यावें तें कात्यायन सांगतो.

**कात्यायन**–५ कोणीएक **याचितक** घेऊन तें न देतां देशांतरास जाईल तर एका वर्षापुढें **याचितकाचें** व्याज चालू होतें.

याचितक द्रव्याचे व्याजाविषयीं.

मालक **याचितक** मागत असतां तें दिल्यावांचून जो देशांतरीं जातो त्यापासून व्याज घेण्याचा प्रकार कात्यायन सांगतो.

**कात्यायन**–६ **याचितक** मालकानें मागितलें असतां तें न देतां कोणी देशांतरास जाईल तर तीन महिन्यांनंतर **याचितकाचें** व्याज चालू होईल.

७ जो स्वदेशीं असून मालक मागत असतांहि **याचितक** देत नाहीं त्यापासून **राजानें** मागितलेल्या दिवसापासून त्याचें **अकारित** व्याज देववावें. ह्यास प्रमाण.

**स्मृति**– जो स्वदेशीं असून मालक मागत असतांहि **याचितक** देत नाहीं त्यापासून ( राजानें ) मागितलेल्या दिवसापासून त्याचें **अकारित** व्याज देववावें.

**अकारित** व्याजाचें बाधक वचन नारद सांगतो.

**नारद**–८ विकत दिलेल्या जिनसाचें मोल, भृति, ठेव, व जो ठरविलेला धनदंड तो, **वृथादान**, जुगार, पैज, ह्यांचें व्याज कबुलात नसेल तर चालू होत नाहीं. ३८

इतक्या द्रव्यास कबुलातावांचून व्याज नाहीं.

---

१ हें मी स्वसंतोषानें तुला कर्ज दिलें आहे, ह्याचा तूं व्यापार वगैरे कर असें सुबोधिनींत प्रीतिदत्ताचें स्वरूप सांगितलें आहे तें व लोकांत उसनें घेतात तेंहि प्रीतिदत्तच असावें. २ अकारित म्हणजे चालत्या शाखेच्या ४ थ्या अंकांत सांगितलेलें.

**सन्ततिस्तु पशुस्त्रीणां**

अधुना द्रव्यविशेषेण वृद्धिविशेषमाह। सन्ततिरेव वृद्धिः पशूनां स्त्रीणां पोषणासमर्थस्य तत्पुष्टिसन्ततिकामस्य प्रयोगः संभवति। ग्रहणं च क्षीरपरिचर्यार्थिनः।

शाखा ३ री.

आतां द्रव्याच्या भेदेंकरून व्याजाचा आणखी भेद सांगतो.

मूलार्थ– पशु, दासी, ह्यांची तर संततिच व्याज.

टीकार्थ–१ पशु, दासी ह्यांची संततिच व्याज. पशूंच्या व दासींच्या पोषणाविषयीं सामर्थ्य नाहीं, आणि त्यांचें पोषण होऊन आपणास संतति पाहिजे असें असल्यास त्यानें पशु, दासी व्याजीं द्याव्या हें संभवतें, आणि ज्याला त्यांचें दूध व चाकरी घेण्याची इच्छा आहे त्यानें वर सांगितल्याप्रमाणें व्याजानें ठेवून घेण्याचा संभव आहे.

पशु, दासी ह्यांची संततिच व्याज.

**रसस्याष्टगुणा परा।**
**वस्त्रधान्यहिरण्यानां चतुस्त्रिद्विगुणा परा॥ ३९॥**

अधुना प्रयुक्तस्य द्रव्यस्य वृद्धिग्रहणमन्तरेणापि चिरकालावस्थितस्य कस्य द्रव्यस्य कियती परा वृद्धिरित्यपेक्षित आह॥ रसस्य तैलघृतादेर्वृद्धिग्रहणमन्तरेण चिरकालावस्थितस्य स्वकृतया वृद्ध्या वर्द्धमानस्याष्टगुणा वृद्धिः परा नातःपरं वर्द्धते। तथा वस्त्रधान्यहिरण्यानां यथासङ्ख्यं चतुर्गुणा त्रिगुणा द्विगुणा च वृद्धिः परा। वसिष्ठेन तु रसस्य त्रैगुण्यमुक्तम्। द्विगुणं हिरण्यं त्रिगुणं धान्यं। धान्येनैव रसा व्याख्याताः। पुष्पमूलफलानि च। तुलाधृतं त्रितयमष्टगुणमिति। मनुना तु धान्यस्य पुष्पमूलफलादीनां च पञ्चगुणत्वमुक्तम्। धान्ये शदे लवे वाह्ये नातिक्रामति पञ्चतामिति। शदः क्षेत्रफलं पुष्पमूलफलादि। लवो मेषोर्णा चमरीकेशादिः। वाह्यो बलीवर्दतुरगादिः। धान्यशदलववाह्यविषया वृद्धिः पञ्चगुणत्वं नातिक्रामतीति। तत्राधमर्णयोग्यतावशेन दुर्भिक्षादिकालवशेन च व्यवस्था द्रष्टव्या। एतच्च सकृत्प्रयोगे सकृदाहरणे च वेदितव्यं। पुरुषान्तरसंक्रमणेन प्रयोगान्तरकरणे तस्मिन्नेव वा पुरुषे अनेकशः प्रयोगान्तरकरणे सुवर्णादिकं द्वैगुण्यमतिक्रम्य पूर्ववद्वर्द्धते। सकृत्प्रयोगेऽपि प्रतिदिनं प्रतिमासं प्रतिसंवत्सरं वा वृद्ध्याहरणेऽधमर्णे देयस्य द्वैगुण्यसंभवात्पूर्वाहृतवृद्ध्या सह द्वैगुण्यमतिक्रम्य वर्द्धत एव॥ यथाह मनुः। कुसीदवृद्धिर्द्वैगुण्यं नात्येति सकृदाहितेति। सकृदाहृतेत्यपि पाठोऽस्ति। उपचयार्थं प्रयुक्तं द्रव्यं कुसीदं तस्य वृद्धिः कुसीदवृद्धिः द्वैगुण्यं नात्येति नातिक्रामति। यदि सकृदाहिता सकृत्प्रयुक्ता पुरुषान्तरसंक्रमणादिना प्रयोगान्तरकरणे द्वैगुण्यमत्येति। सकृदाहृतेति पाठे तु शनैःशनैः प्रतिदिनं प्रतिमासं प्रतिसंवत्सरं वाधमर्णादाहृता द्वैगुण्यं नात्येतीति व्याख्येयम्। तथा गौतमेनाप्युक्तम्। चिरस्थाने द्वैगुण्यं प्रयोगस्येति। प्रयोगस्येत्येकवचननिर्देशा-

**त्प्रयोगान्तरकरणे द्वैगुण्यातिक्रमोऽभिप्रेतः। चिरस्थान इति निर्देशात् शनैः शनैर्वृद्धिग्रहणे द्वैगुण्यातिक्रमो दर्शितः ॥ ३९ ॥**

आतां व्याजीं दिलेलें द्रव्य व्याज न घेतां बहुत वर्षें राहिलें असतां कोणत्या द्रव्याचें पराकाष्ठा किती व्याज होतें तें सांगतो.

**मूलार्थ**— रसाचें पराकाष्ठा आठपट व्याज, कापडाचें चौपट, धान्याचें तिप्पट, आणि सुवर्णादि नाण्याचें पराकाष्ठा दुप्पट व्याज घ्यावें.

**टीकार्थ**—२ तेल तूप वगैरे रस करार केलेल्या वाढीनें कर्जदारास दिले आणि वाढ न देतां बहुत वर्षें तसेच ते रस कर्जदाराकडे राहिले तर ते पराकाष्ठा आठपट वाढतात, ह्यापेक्षां अधिक वाढत नाहींत.

तेल तूप वगैरे रसांची पराकाष्ठा आठपट वाढ.

३ तशीच वस्त्राची पराकाष्ठा चौपट वाढ, धान्याची तिप्पट वाढ, आणि सुवर्ण इत्यादि नाण्याची पराकाष्ठा दाम दुप्पट वाढ घ्यावी; अधिक घेऊं नये.

वस्त्राची चौपट.

वसिष्ठ तर रसाची वाढ पराकाष्ठा तिप्पट सांगतो.

**वसिष्ठ**— सुवर्णादि नाणें दुप्पट; धान्य आणि रस तिप्पट; व पुष्प, मूल, फल आणि वजनी जिन्नस ह्यांची पराकाष्ठा आठपट वाढ होते.

सुवर्ण इत्यादि.

**मनु** तर धान्य, पुष्पें, मूळें आणि फळें ह्यांची पराकाष्ठा पांचपट वाढ सांगतो.

**मनु**—धान्य, शद, लव, वाह्य, ह्यांची पराकाष्ठा पांचपट वाढ, ह्यापेक्षां अधिक नाहीं.

**धान्य** म्हणजे गहूं, तांदूळ इत्यादि. शद म्हणजे बागाइतांत झालेलीं फुलें, मूळें फळफळावळ इत्यादिक. लव म्हणजे मेंढ्यांची लोंकर व चमरीचे केश वगैरेपासून निर्मित केलेले धाबळी, शालजोडी, कांबळें वगैरे. वाह्य म्हणजे वाहण्यास योग्य बैल, घोडा वगैरे जनावरें. इतक्यांची वाढ पांचपटीपेक्षां अधिक होत नाहीं.

ह्याप्रमाणें याज्ञवल्क्य, वसिष्ठ, मनु ह्यांनीं बहुतकाळ राहिलेलें सोनें इत्यादिक नाणें, धान्य, इत्यादिकांच्या व्याजाविषयीं न्यूनाधिक प्रकार सांगितले, त्यांत कर्जदाराची शक्ति व दुष्काळ इत्यादि यांचें तारतम्य पाहून व्यवस्था करावी.

४ हे दामदुपटीचे वगैरे प्रकार, एकवार कर्ज दिलें आहे आणि एकवार परत घेणें आहे तर त्याजविषयीं जाणावे.

५ ज्याच्याकडे कर्ज येणें त्यास सावकारानें सांगितलें कीं, तुझ्याकडे जें कर्ज येणें आहे तें अमुक मनुष्यास दे, असें सांगितल्यावरून कर्जदारानें दिलें; अथवा पहिल्या सावकारापाशींच त्या द्रव्याची वारंवार देवघेव केली, तर तें पूर्वीं घेतलेल्या व्याजासुद्धां दामदुप्पट वगैरे वाढीपेक्षां अधिक वाढतेंच.

६ एकवार रुपये दिले असले तरी जर दररोज, दरमहिना किंवा दर वर्षास कर्जदा-

रापासून केवळ व्याज मात्र पोंचत आहे तर कर्जाची दामदुप्पट होऊन पूर्वी घेतल्या व्याजासुद्धां अधिक वाढतेंच. ह्यास प्रमाण सांगतो.

**मनु**—एकवार दिलेले रुपये दामदुपटीपेक्षां अधिक वाढत नाहींत.

ह्या मनुवचनांत "सकृदात्हता" असाहि पाठ आहे त्या पक्षीं 'एकवार घेतलेले' असा अर्थ.

वाढीकरितां जें (कर्जदारास) द्रव्य द्यावें तें **कुसीद** (कर्ज) म्हटलें आहे. त्या कर्जाची वाढ दामदुपटीपर्यंत होते, त्याहून अधिक होत नाहीं, परंतु तें कर्ज एकवार दिलेलें असेल तर. कदाचित् कर्जदार वगैरेची बदल झाल्या कारणानें त्या कर्जाचा निराळा व्यवहार होईल तर दामदुपटीपेक्षांहि तें अधिक वाढेल. 'एकवार घेतलेले' असा पाठ आहे त्याचा अर्थ असा होतो कीं, थोडथोडें दररोज, दरमहिना, अथवा दरवर्षी कर्जदारापासून व्याज पोंचत असेल तर तें कर्ज दुप्पटीपेक्षांहि अधिक वाढेल, या रीतीनें त्या (मनु)-वचनाची व्याख्या करावी.

**गौतमहि** सांगतो कीं, एकवार दिलेलें कर्ज तें त्याजकडे बिनवसूल बहुत दिवस राहिलें तथापि तें दुप्पटीपेक्षां अधिक वाढणार नाहीं.

'प्रयोगस्य' असा एकवचनांत निर्देश केला आहे यावरून त्या कर्जाची (पांचव्या व सहाव्या अंकांत सांगितल्याप्रमाणें) वारंवार देव घेव होईल तर तें व्याजासुद्धां दुपटीपेक्षांहि अधिक वाढेल. 'चिरस्थाने' असा निर्देश केला यावरून बहुत दिवस थोडथोडें व्याज पावत असेल तर दुप्पटीपेक्षांहि अधिक वाढतें, असें समजावें. ३९

(ह्याप्रमाणें सावकारानें कर्जदाराला कर्ज देण्याचे व त्यापासून व्याज घेण्याचे प्रकार सांगितले.)

---

**प्रपन्नं साधयन्नर्थं न वाच्यो नृपतेर्भवेत् ।**
**साध्यमानो नृपं गच्छन् दण्ड्यो दाप्यश्च तद्धनम् ॥ ४० ॥**

ऋणप्रयोगधर्मा उक्ताः सांप्रतं प्रयुक्तस्य धनस्य ग्रहणधर्मा उच्यन्ते । प्रपन्नमभ्युपगतमधमर्णेन धनं साक्ष्यादिभिर्भावितं वा साधयन्प्रत्याहरन् धर्मादिभिरुपायैरुत्तमर्णो नृपतेर्न वाच्यो निवारणीयो न भवति । धर्मादयश्चोपाया मनुना दर्शिताः ॥ धर्मेण व्यवहारेण छलेनाचरितेन च । प्रयुक्तं साधयेदर्थं पञ्चमेन बलेन चेति । धर्मेण प्रीतियुक्तेन सत्यवचनेन ।व्यवहारेण साक्षिलेख्याद्युपायेन । छलेन उत्सवादिव्याजेन भूषणादिग्रहणेन । अचरितेन अभोजनेन । पञ्चमेनोपायेन बलेन निगडबन्धनादिना उपचयार्थं प्रयुक्तं द्रव्यमेतैरुपायैरात्मसात्कुर्यादिति । प्रपन्नं साधयन्नर्थं न वाच्य इति वदन् अप्रतिपन्नं साधयन् राज्ञा निवारणीय इति दर्शयति । एतदेव स्पष्टीकृतं कात्यायनेन ॥ पीडयेद्यो धनी कश्चिदृणिकं न्यायवादिनम् । तस्मादर्थात्स हीयेत तत्समं चाप्नुयाद्दममिति । यस्तु धर्मादिभिरुपायैः प्रपन्नमर्थं साध्य-

**मानो याच्यमानो नृपं गच्छेद्राजानमभिगम्य साधयन्तमभियुङ्क्ते स दण्ड्यो भवति शक्त्यनुसारेण। धनिने तद्धनं दाप्यश्च। राज्ञा दापने च प्रकारा दर्शिताः। राजा तु स्वामिने विप्रं सान्त्वेनैव प्रदापयेत्। देशाचारेण चान्यांस्तु दुष्टान् संपीड्य दापयेत्। रिक्थिनं सुहृदं वापि छलेनैव प्रदापयेदिति। साध्यमानो नृपं गच्छेदित्येतत् स्मृत्याचारव्यपेतेनेत्यस्य प्रत्युदाहरणं च बोद्धव्यम् ॥ ४० ॥**

शाखा ४ थी.

कर्ज देण्याचे प्रकार सांगितले, आतां व्याजीं दिलेलें द्रव्य कोणत्या रीतीनें घ्यावें तें सांगतो.

**मूलार्थ**— कर्जदारानें कबूल केलेलें कर्ज सावकार वसूल करितो, तर राजानें निवारण करूं नये. सावकार आपलें कर्ज मागत असतां कर्जदार फिर्याद करील तर त्यास दंड करून सावकाराचें धन देववावें.

**टीकार्थ**—१ कर्जदारानें कबूल केलेलें किंवा सावकारानें साक्षी, लेख इत्यादि पुराव्याकडून शाबीत केलेलें कर्ज **धर्मादिक** उपाय करून सावकार वसूल करितो तर राजानें त्याचें निवारण करूं नये.

धर्मादिक उपाय मनु दाखवितो.

**मनु**—२ धर्म, व्यवहार, छल, अचरित, आणि बल, ह्या पांच उपायांकडून सावकारानें आपलें द्रव्य वसूल करून घ्यावें.

कर्ज वसूल करण्याचे उपाय.

धर्म म्हणजे प्रीतियुक्त व सत्य असें भाषण; व्यवहार म्हणजे साक्षी, लेख वगैरे पुरावा; छल म्हणजे लग्नकार्य इत्यादिकांच्या निमित्तानें त्यापासून दागिना वगैरे मागून आणणें; **अचरित** म्हणजे उपास करणें, धरणें घेणें; बल म्हणजे पायांत बिडी घालणें, बंदिशाळेंत ( तुरुंगांत ) पाठविणें इत्यादिक; ह्या पांच उपायांकडून, सावकारानें आपलें व्याजीं दिलेलें द्रव्य कर्जदारापासून वसूल करून घ्यावें.

३ कर्जदारानें कबूल केलेलें कर्ज द्रव्य सावकार ( उगवून ) घेत असतां राजानें निवारण करूं नये, असें ( मूळांत ) सांगितल्यावरून, नाकबूल केलेलें कर्ज जर ( बळेंच ) सावकार साध्य करितो तर त्याचें राजानें निवारण करावें असें दाखवितो. **कात्यायनहि** हेंच स्पष्ट करून दाखवितो.

कर्ज नसतां बळेंच लागू करून वसूल करूं इच्छितो तर दंड.

**कात्यायन**— कर्जदार यथान्याय बोलत असतां जो कोणी सावकार त्याला पीडा करितो, तर राजानें त्यापासून **विवादास्पदीभूत** द्रव्याइतका दंड घेऊन त्याचा वाद रद्द करावा.

४ ( २ ऱ्या अंकांत सांगितलेल्या ) **धर्मादिक** उपायांनीं सावकार कर्जदाराकडील आपलें कर्ज मागत असतां जर कर्जदार राजाकडे जाऊन फिर्याद करितो, तर राजानें त्याला शक्त्यनुसार दंड करून सावकाराचें द्रव्य देववावें.

सावकार सोईनें मागत असतां कर्जदार फिर्याद करितो तर दंड.

कर्ज देवविण्याचे प्रकार.

**स्मृति**—५ जर कर्जदार ब्राह्मण आहे तर त्याकडून राजानें सावकाराचें कर्ज सामोपचारानें देववावें. अन्य जातीच्या कर्जदाराकडून देशरिवाजाप्रमाणें देववावें. आणि जे दुष्ट असतील त्यांस पीडा होई असी शिक्षा करून सावकाराचें कर्ज देववावें. दायाद किंवा मित्र असल्यास त्याजकडून छलानेंच देववावें.

ह्या शाखेचा ४ था अंक हा १ ल्या प्रकरणाच्या ४ थ्या शाखेच्या १ ल्या अंकाचें **प्रत्युदाहरण** आहे असें समजावें. ४०

---

**गृहीतानुक्रमाद्दाप्यो धनिनामधमर्णिकः ।**
**दत्त्वा तु ब्राह्मणायैव नृपतेस्तदनन्तरम् ॥ ४१ ॥**

बहुषूत्तमर्णिकेषु युगपत्प्राप्तेष्वेकोऽधमर्णिकः केन क्रमेण दाप्यो राज्ञेत्यपेक्षित आह । समानजातीयेषु धनिषु येनैव क्रमेण धनं गृहीतं तेनैव क्रमेणाधमर्णिको राज्ञा दाप्यः । भिन्नजातीयेषु तु ब्राह्मणादिक्रमेण ॥ ४१ ॥

शाखा ५ वी.

एका कर्जदाराजवळ अनेक सावकार एककालीं आपापलें कर्ज मागत असल्यास राजानें तें कोणत्या अनुक्रमानें देववावें तें सांगतो.

**मूलार्थ**— कर्ज घेतलेल्या अनुक्रमानें कर्जदाराकडून सावकारांस देववावें. भिन्न जातीचे सावकार आहेत तर प्रथमतः ब्राह्मणाचें, नंतर क्षत्रियाचें देववावें.

**टीकार्थ**— १ सगळे सावकार एकजातीचे आहेत, तर ज्या अनुक्रमानें कर्ज घेतलें असेल त्याच अनुक्रमानें कर्जदाराकडून कर्ज, राजानें सावकारांस देववावें.

कर्जदार व सावकार एक जातीचे असल्यास घेतलेल्या अनुक्रमाने देववावें.

२ आणि सावकार भिन्न भिन्न जातीचे असल्यास प्रथमतः ब्राह्मणाचें, नंतर क्षत्रियाचें असें जातीच्या अनुक्रमानें देववावें. ४१

भिन्नजातीचे असल्यास जातीच्या अनुक्रमानें देववावें.

---

**राज्ञाधमर्णिको दाप्यः साधिताद्दशकं शतम् ।**
**पञ्चकं च शतं दाप्यः प्राप्तार्थो ह्युत्तमर्णिकः ॥ ४२ ॥**

यदा पुनरुत्तमर्णो दुर्बलः प्रतिपन्नमर्थं धर्मादिभिरुपायैः साधयितुमशक्नुवन्राज्ञा साधितार्थो भवति तदाऽधमर्णस्य दण्डमुत्तमर्णस्य च भृतिदानमाह । अधमर्णिको

राज्ञा प्रतिपन्नार्थात्साधिताद्दशकं शतं दाप्यः । प्रतिपन्नस्य साधितार्थस्य दशममंशं राजाधमर्णिकाद्दण्डरूपेण गृह्णीयादित्यर्थः । उत्तमर्णस्तु प्राप्तार्थः पंचकं शतं भृतिरूपेण दाप्यः । साधितार्थस्य विंशतितमं भागमुत्तमर्णाद्राजा भृत्यर्थं गृह्णीयादित्यर्थः। अप्रतिपन्नार्थसाधने तु दण्डविभागो दर्शितो निन्हवे भावितो दद्यादित्यादिना ॥४२॥

जर सावकार दुर्बळ असल्यामुळें कर्जदाराकडील कबूल केलेलें कर्ज ( ह्या प्रकरणाच्या ४ थ्या शाखेच्या २ ऱ्या अंकांत सांगितलेल्या ) धर्मादिक उपायांनीं वसूल करावयास असमर्थ आहे, आणि तें कर्ज राजानें त्यास देवविलें तर कर्जदारापासून दंड आणि सावकारापासून भृति घेण्याचा प्रकार सांगतो.

मूलार्थ— कबूल केलेलें कर्ज देवविल्याबद्दल राजानें कर्जदारापासून शेंकडा दहा घ्यावे, आणि ऐवज पावलेल्या सावकारापासून शेंकडा पांच घ्यावे.

टीकार्थ—३ ( सावकार दुर्बळ असल्यामुळें धर्मादिक उपायांनीं कर्जदाराकडील आपलें द्रव्य घेण्याविषयीं असमर्थ सबब ) राजानें, बिनतकारी कर्ज कर्जदाराकडून देवविलें तर, शेंकडा दशक ह्मणजे कर्जाचा दहावा भाग कर्जदारापासून राजानें दंड घ्यावा, आणि सावकाराचें द्रव्य देवविलें सबब त्यापासून शेंकडा पांच ह्मणजे द्रव्याचा विसावा अंश भृति ( दस्तुरी ) घ्यावी.

४ सावकार आपलें कर्ज मागूं लागला असतां कर्जदार नाकबूल करील, आणि सावकार साक्षिलेख्यादि पुराव्याकडून तें लागू करितो तर राजानें २ ऱ्या प्रकरणाच्या ३ ऱ्या शाखेंतील ३ ऱ्या अंकाप्रमाणें राजदंड घेऊन सावकाराचें द्रव्य देववावें. ४२

कर्जदार तक्रार करील तर सावकाराचें द्रव्य देववून दंड करावा.

---

## हीनजातिं परिक्षीणमृणार्थं कर्म कारयेत् ।
## ब्राह्मणस्तु परिक्षीणः शनैर्दाप्यो यथोदयम् ॥ ४३ ॥

सधनमधमर्णिकं प्रत्युक्तं अधुना निर्धनमधमर्णिकं प्रत्याह । ब्राह्मणादिरुत्तमर्णो हीनजातिं क्षत्रियादिजातिं परिक्षीणं निर्धनमृणार्थं ऋणनिवृत्त्यर्थं कर्म स्वकर्म स्वजात्यनुरूपं कारयेत् तत्कुटुंबाविरोधेन। ब्राह्मणः पुनः परिक्षीणो निर्धनः शनैः शनैः यथोदयं यथासंभवमृणं दाप्यः । अत्र च हीनजातिग्रहणं समजातेरप्युपलक्षणम् । अतश्च समानजातिमपि परिक्षीणं यथोचितं कर्म कारयेत् । ब्राह्मणग्रहणं च श्रेष्ठजातेरुपलक्षणं अतश्च क्षत्रियादिरपि परिक्षीणो वैश्यादेः शनैःशनैर्दाप्यो यथोदयम् । एतदेव मनुना स्पष्टीकृतम् । कर्मणापि समं कुर्याद्धनिकेनाधमर्णिकः । समोऽपकृष्टजातिश्च दद्याच्छ्रेयांस्तु तच्छनैरिति । उत्तमर्णेन समं निवृत्तोत्तमर्णाधमर्णव्यपदेशमात्मानमधमर्णः कर्मणा कुर्यादित्यर्थः ॥ ४३ ॥

सधन कर्जदारापासून कर्ज देवविण्याचा प्रकार सांगितला. आतां निर्धन कर्जदाराकडून कसें देववावें तें सांगतो.

**मूलार्थ**– कर्जदार निकृष्ट जातीचा असून तो निर्धन असेल तर त्यास ऋणमुक्त करण्यासाठीं त्यापासून काम घ्यावें. कर्जदार ब्राह्मण असून तो निर्धन असल्यास लाभानुसार त्यापासून सोईसोईनें फेड करून घ्यावी.

**टीकार्थ**–५ जर सावकारापेक्षां कर्जदार नीच जातीचा आहे आणि तो निर्धन आहे तर त्याच्या जातीस उचित असें त्याकडून काम घेऊन सावकारानें त्याला ऋणमुक्त करावें. परंतु जेणेंकरून त्याच्या कुटुंबपोषणास प्रतिबंध होईल असें काम घेऊं नये.

नादार कुळाकडून कर्ज देवविण्याचा प्रकार.

६ जर ब्राह्मण कर्जदार निर्धन असेल तर त्याला जसजसी द्रव्यप्राप्ति होईल तसतसें सोईसोईनें त्याकडून देववावें.

७ एथें ( मूळांत ) "निकृष्ट जातीचा" असें ह्मटलें आहे तेणेंकरून समान जातीचें हि ग्रहण होतें. ह्यास्तव समान जातीचा कर्जदार निर्धन झाल्यास त्यास ऋणमुक्त करण्यासाठीं त्याकडून यथायोग्य काम करवावें. तसेंच "ब्राह्मण" असें मूळांत सांगितलें आहे तेणेंकरून उत्कृष्ट जातीचाहि संग्रह होतो, ह्यास्तव क्षत्रियादि जातीपासून वैश्यादि जातीनें जसजसी द्रव्यप्राप्ति होईल तसतसी सोईसोईनें कर्जाची फेड करून घ्यावी असें (सूचित) होतें.

मनुहि हेंच स्पष्ट करून दाखवितो.

**मनु**– स्वजातीचा अथवा निकृष्ट जातीचा कर्जदार असेल तर त्यानें काम करून आपणास ऋणमुक्त करावें; उत्कृष्ट जातीच्या कर्जदारानें सोईसोईनें द्यावें.

सावकारानें कर्जदारापासून आपलें कर्ज घेण्याच्या ऐवजीं त्यापासून काम घ्यावें, तेणेंकरून कर्जफेड होते, म्हणजे आपण सावकार, आणि दुसरा कर्जदार हीं नामें दूर करून कर्जदारास आपल्यासारखा ऋणरहित करावें असा ( मनुस्मृतीचा ) अर्थ. ४३

---

**दीयमानं न गृण्हाति प्रयुक्तं यः स्वकं धनम् ।**
**मध्यस्थस्थापितं चेत्स्याद्वर्द्धते न ततः परम् ॥ ४४ ॥**

**किंच उपचयार्थं प्रयुक्तं धनं अधमर्णेन दीयमानमुत्तमर्णो वृद्धिलोभाद्यदि न गृह्णाति तदाधमर्णेन मध्यस्थहस्ते स्थापितं यदि स्यात्तदा ततः स्थापनादूर्ध्वं न वर्द्धते। अथ स्थापितमपि याच्यमानो न ददाति ततः पूर्ववद्वर्द्धत एव ॥ ४४ ॥**

**मूलार्थ**– व्याजीं दिलेलें आपलें द्रव्य, कर्जदार परत देत असतां जो सावकार घेत नाहीं तर तें मध्यस्थापाशीं ठेवावें, ह्मणजे त्या दिवसापासून व्याज बंद होतें.

**टीकार्थ**–८ व्याजीं दिलेलें द्रव्य, कर्जदार देत असतां सावकार व्याजाच्या लोभास्तव जर तें घेत नाहीं तर तें कर्जदारानें मध्यस्थाजवळ ठेवावें. ह्मणजे ठेविलेल्या मितीपासून त्याचें व्याज बंद होतें.

कर्जदार सावकाराचें द्रव्य परत देत असतां तो घेत नाहीं तर व्याज बंद होतें.

१ मध्यस्थाजवळ ठेविल्यानंतर सावकार मागत असतां जर कर्जदार देणार नाहीं, तर तेव्हांपासून पुनः पूर्वीप्रमाणें व्याज चालू होतेंच. ४४

---

**अविभक्तैः कुटुंबार्थे यदृणं तु कृतं भवेत् ।**
**दद्युस्तद्रिक्थिनः प्रेते प्रोषिते वा कुटुंबिनि ॥ ४५ ॥**

इदानीं देयमृणं यदा येन च देयं तदाह । अविभक्तैर्बहुभिः कुटुंबार्थमेकैकेन वा यदृणं कृतं तदृणं कुटुंबी दद्यात् । तस्मिन्प्रेते प्रोषिते वा तद्रिक्थिनः सर्वे दद्युः॥४५॥

शाखा ६ वी.

आतां अवश्य दिलें पाहिजे असें ऋण कोणतें व तें कोणाचें कोणीं व कधीं द्यावें तें सांगतो.

मूलार्थ– अविभक्तांनीं कुटुंबासाठीं जें कर्ज केलें असेल तें, कुटुंबी मृत किंवा परागंदा झाला असतां वारसांनीं द्यावें.

टीकार्थ–१ बहुतांनीं मिळून किंवा प्रत्येकानें अविभक्त असतां कुटुंबपोषणार्थ जें कर्ज केलें असेल तें कुटुंबी ( मुख्यपुरुष ) ह्यानें द्यावें. तो मृत झाला किंवा देशांतरीं गेला तर त्याचे जे वारीसदार असतील त्यांनीं द्यावें. ४५

जें कर्ज अवश्य दिलें पाहिजे तें देण्याविषयीं अधिकारी.

---

**न योषित्पतिपुत्राभ्यां न पुत्रेण कृतं पिता ।**
**दद्यादृते कुटुम्बार्थान्न पतिः स्त्रीकृतं तथा ॥ ४६ ॥**

येन देयमित्यत्र प्रत्युदाहरणमाह । पत्या कृतमृणं योषिद्भार्या नैव दद्यात् । पुत्रेण कृतं योषिन्माता न दद्यात् । तथा पुत्रेण कृतं पिता न दद्यात् । तथा भार्याकृतं पतिर्न दद्यात् । कुटुम्बार्थादृत इति सर्वविशेषणम् । अतश्च कुटुम्बार्थं येन केनापि कृतं तत् कुटम्बिना देयम् । तदभावे तद्दायहरैर्देयमित्युक्तमेव ॥ ४६ ॥

आणखी कोणी द्यावें, ह्याविषयीं प्रत्युदाहरण सांगतो.

मूलार्थ– नवऱ्याचें कर्ज स्त्रीनें, तसेंच पुत्राचें कर्ज आईनें व बापानें देऊं नये. आणि बायकोचें कर्ज नवऱ्यानें देऊं नये; परंतु तें कर्ज कुटुंबपोषणाशिवाय असेल तर.

टीकार्थ–२ नवऱ्यानें केलेलें कर्ज बायकोनें देऊं नये, पुत्रानें केलेलें कर्ज आईनें व बापानें देऊं नये. तसेंच बायकोचें कर्ज नवऱ्यानें देऊं नये. परंतु तें कुटुंबपोषणार्थ नसल्यास, कुटुंबपोषणार्थ कोणीहि केलें असलें तरी तें कुटुंबीनें द्यावें. त्याच्या अभावीं जिंदगी घेणारांनीं द्यावें. ४६

कुटुंबपोषणार्थ कोणीहि केलेलें कर्ज मुख्य पुरुषानें द्यावें.

---

**सुराकामद्यूतकृतं दण्डशुल्कावशिष्टकम् ।**
**वृथादानं तथैवेह पुत्रो दद्यान्न पैतृकम् ॥ ४७ ॥**

पुत्रपौत्रैर्ऋणं देयमिति वक्ष्यति तस्य पुरस्तादपवादमाह । सुरापानेन यत्कृतमृणं कामकृतं स्त्रीव्यसननिर्वृत्तं द्यूते पराजयनिर्वृत्तं दण्डशुल्कयोरवशिष्टं वृथादानं धूर्तबन्दिमल्लादिभ्यो यत्प्रतिज्ञातं । धूर्ते बन्दिनि मल्ले च कुवैद्ये कितवे शठे । चाटचारणचौरेषु दत्तं भवति निष्फलमिति स्मरणात् । एतदृणं पित्रा कृतं पुत्रादिः शौंडिकादिभ्यो न दद्यात् । यत्र दण्डशुल्कावशिष्टकमित्यवशिष्टग्रहणात्सर्वं दातव्यमिति न मन्तव्यम् । दण्डं वा दण्डशेषं वा शुल्कं तच्छेषमेव वा । न दातव्यं तु पुत्रेण यच्च न व्यावहारिकमित्यौशनसस्मरणात् । गौतमेनाप्युक्तं । मद्यशुल्कद्यूतकामदण्डान् पुत्रानध्यावहेयुरिति । न पुत्रस्योपरि भवन्तीत्यर्थः । अनेनादेयमृणमुक्तम् ॥ ४७ ॥

बापाचें कर्ज पुत्रानें, किंवा पात्रानें द्यावें, असें पुढें ( ह्या प्रकरणाच्या ७ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे वचनांत ) सांगितलें आहे त्याचें अपवादवचन एथें सांगतो.

**मूलार्थ**— मद्य, स्त्री, जुगार, दंड व शुल्क[1] ह्यांची बाकी, तसेंच वृथादान असें पित्याचें कर्ज पुत्रानें देऊं नये.

**टीकार्थ**—३ मद्यप्राशननिमित्त केलेलें; स्त्रीव्यसननिमित्त केलेलें; जुगारसंबंधी; दंड व शुल्क ह्यांची बाकी; तसेंच वृथादान ह्मणजे धूर्त, भाट, जेठी इत्यादिकांस देऊं केलेलें; असें जें पित्याचें कर्ज असेल तें पुत्रादिकानें, कलाल इत्यादिकांस देऊं नये.

व्यसनानिमित्त बापानें केलेलें कर्ज पुत्रानें देऊं नये.

**स्मृति**— धूर्त, भाट, जेठी, कपटी, वैद्य, नट, चोर ह्यांस दिलेलें निष्फळ होतें. (ह्मणून असल्यांस देणें हें वृथादान समजावें )

४ वरच्या अंकांत दंड व शुल्क ह्यांची बाकी देऊं नये असें सांगितल्यावरून ( बाकी मात्र देऊं नये), भर रकम असल्यास द्यावी, असें समजूं नये. ( ह्यास प्रमाण )

**उशना**— दंड, किंवा त्याची बाकी, तसेंच शुल्क अथवा त्याची बाकी व जें व्यवहारसंबंधी नसेल तें पुत्रानें देऊं नये.

**गौतमहि** सांगतो. मद्य, शुल्क, जुगार, आणि दंड, ह्यांविषयींचें कर्ज देणें पुत्रांच्या माथ्यावर नाहीं ( ह्मणजे पुत्रांनीं द्यावें असें नाहीं.) येणेंकरून ( ३ ऱ्या अंकेंकरून ) कोणतें कर्ज देऊं नये तें सांगितलें. ४७

---

**गोपशौण्डिकशैलूषरजकव्याधयोषिताम् ।**
**ऋणं दद्यात्पतिस्तासां यस्माद्वृत्तिस्तदाश्रया ॥ ४८ ॥**

न पतिः स्त्रीकृतं तथेत्यस्यापवादमाह । गोपो गोपालः शौण्डिकः सुराकारः

---

१ शुल्क म्हणजे जकात, कर, धारा वगैरे समजावें.

शैलूषो नटः रजको वस्त्राणां रञ्जकः व्याधो मृगयुः एतेषां योषिद्भिर्यदृणं कृतं तत्पतिभिर्देयं यस्मात्तेषां वृत्तिर्जीवनं तदाश्रया योषिदधीना। यस्माद्वृत्तिस्तदाश्रयेति हेतुव्यपदेशादन्येपि ये योषिदधीनजीवनास्तेऽपि योषित्कृतमृणं दद्युरिति गम्यते ४८

२ ऱ्या अंकांत "स्त्रियेचें कर्ज नवऱ्यानें देऊं नये" असें जें सांगितलें त्याचें बाधकवचन सांगतो.

**मूळार्थ**– गोप, शौंडिक, शैलूष, रजक, आणि व्याध ह्यांच्या स्त्रियांचें कर्ज नवऱ्यांनीं द्यावें. कारण, त्यांची उपजीविका त्यांचे स्त्रियांचे स्वाधीन असते.

**टीकार्थ**–५ गोप ह्मणजे गौळी, शौंड ह्मणजे कलाल, शैलूष म्हणजे नट, रजक म्हणजे रंगारी, आणि व्याध म्हणजे पारधी, ह्यांच्या स्त्रियांनीं केलेलें कर्ज नवऱ्यांनीं द्यावें. कारण, त्यांची उपजीविका ह्यांच्या स्त्रियांचे आधीन असते. ह्यावरून आणखीहि ज्यांची उपजीविका स्त्रियांच्या स्वाधीन आहे, त्यांच्या स्त्रियांनींहि केलेलें कर्ज त्यांच्या नवऱ्यांनीं द्यावें असें सिद्ध होतें. ४८

गौळी कलाल इत्यादिकांच्या स्त्रियांनीं केलेलें कर्ज नवऱ्यांनीं द्यावें.

**प्रतिपन्नं स्त्रिया देयं पत्या वा सह यत्कृतम्।**
**स्वयं कृतं वा यदृणं नान्यत्स्त्री दातुमर्हति॥ ४९॥**

पतिकृतं भार्या न दद्यादित्यस्यापवादमाह। मुमूर्षुणा प्रवत्स्यता वा पत्या नियुक्तया ऋणदाने यत्प्रतिपन्नं तत्पतिकृतमृणं देयं। यच्च पत्या सह भार्यया ऋणं कृतं तदपि भर्त्रभावे भार्यया अपुत्रया देयम्। यच्च स्वयमेव कृतं ऋणं तदपि देयम्। ननु प्रतिपन्नादि त्रयं स्त्रिया देयमिति न वक्तव्यं संदेहाभावात्। उच्यते। भार्या पुत्रश्च दासश्च त्रय एवाधनाः स्मृताः। यत्ते समधिगच्छन्ति यस्यैते तस्य तद्धनमिति वचनान्निर्द्धनत्वेन प्रतिपन्नादिष्वदानाशङ्कायामिदमुच्यते। प्रतिपन्नं स्त्रिया देयमित्यादि। न चानेन वचनेन स्त्र्यादीनां निर्द्धनत्वमभिधीयते पारतन्त्र्यमात्रप्रतिपादनपरत्वात्। एतच्च विभागप्रकरणे स्पष्टीकरिष्यते। नान्यत्स्त्री दातुमर्हतीत्येतत्तर्हि न वक्तव्यम्। विधानेनैवान्यत्र प्रतिषेधसिद्धेः। उच्यते। प्रतिपन्नं स्त्रिया देयं पत्या वा सह यत्कृतमित्येतयोरपवादार्थमुच्यते। अन्यत्सुराकामादिवचनोपात्तं प्रतिपन्नमपि पत्या सह कृतमपि न देयमिति॥ ४९॥

(२ ऱ्या अंकांत सांगितलें कीं,) "नवऱ्याचें कर्ज स्त्रीनें देऊं नये" त्याचा अपवाद सांगतो.

**मूळार्थ**– स्त्रीनें कबूल केलेलें, किंवा नवऱ्याबरोबर केलेलें, अथवा स्वतां केलेलें कर्ज स्त्रीनें फेडावें, ह्यांहून इतर कर्ज स्त्रीनें देऊं नये.

**टीकार्थ**–६ नवरा आसन्नमरण झाला असतां, किंवा देशांतरीं जाण्यास सिद्ध झाला

स्त्रीनें दिलें पाहिजे असें नवऱ्याचें कर्ज कोणतें.

असतां त्याच्या आज्ञेवरून कबूल केलेलें त्याचें कर्ज स्त्रीनें द्यावें. आणि जें कर्ज नवऱ्यासहवर्तमान केलें आहे, तेंहि नवऱ्याच्या अभावीं पुत्र ( पौत्र ) नसल्यास स्त्रीनें द्यावें, व जें कर्ज स्वतां केलें असेल तेंहि तिनेंच द्यावें, ह्याशिवाय इतर कर्ज देण्यास स्त्री अधिकारी नाहीं.

शंका—७ सदरहू तीन प्रकारचें ( नवऱ्यानें कबूल केलेलें, नवऱ्याबरोबर केलेलें, अथवा स्वतां केलेलें ) कर्ज स्त्रीनें द्यावें, असें सांगावयास नको. कारण, हें सिद्धच आहे, ह्मणून ह्याविषयीं संदेहच नाहीं.

**मनु—८ समाधान**—भार्या, पुत्र, दास, ह्या तिघांस आपल्यापाशीं द्रव्य ठेवण्यास अधिकार नाहीं; कारण, ह्यांस जें मिळेल तें ज्यापाशीं हे आहेत त्याचें द्रव्य होय.

अशा वचनावरून भार्याहि निर्धन आहे, म्हणून वर सांगितलेलें तीन प्रकारचें कर्ज स्त्री देणार नाहीं, अशी शंका प्राप्त होईल यास्तव तच्छंकानिरसनार्थ "स्त्रीनें कबूल केलेलें" इत्यादि वचन, म्हणजे सहावा अंक सांगितला. परंतु भार्या, पुत्र, दास ह्या तिघांच्या स्वाधीन द्रव्य नाहीं, असें जें वचन सांगितलें, त्याचें तात्पर्य निर्धनत्वाविषयीं नाहीं. केवळ परस्वाधीनपणाविषयीं मात्र आहे; ह्याविषयीं दायविभागप्रकरणीं स्पष्ट प्रतिपादन केलें आहे.

९ **शंका**— (६ व्या अंकाचे वचनांत ) "ह्याहून इतर कर्ज स्त्रीनें देऊं नये," असें जें सांगितलें तेंहि सांगण्याचें प्रयोजन नाहीं, कारण, तीन प्रकारचें कर्ज स्त्रीनें द्यावें, असा विधि सांगितल्यानेंच, ह्याशिवाय अन्य कर्ज देऊं नये, हा निषेध सिद्ध होतो.

१० **समाधान**— (६ व्या अंकांत शेवटीं ) "ह्याशिवाय इतर कर्ज" ह्मणजे ६ व्या शाखेच्या ३ ऱ्या अंकांत सांगितलेलें जें नवऱ्याचें कर्ज तें त्याच्या आज्ञेवरून कबूल केलेलें, अथवा त्याबरोबर केलेलें जरी आहे, तरी स्त्रीनें देऊं नये, असा अपवाद करण्यासाठीं सांगितलें. ४९

**पितरि प्रोषिते प्रेते व्यसनाभिप्लुतेऽपि वा।**
**पुत्रपौत्रैर्ऋणं देयं निन्हवे साक्षिभावितम् ॥ ५० ॥**

पुनरपि यदृणं दातव्यं येन च दातव्यं यत्र च काले दातव्यं तत्रितयमाह। पिता यदि दातव्यमृणमदत्त्वा प्रेतो दूरदेशं गतोऽचिकित्सनीयव्याध्याद्यभिभूतो वा तदा तत्कृतमृणमाख्यापने पुत्रेण पौत्रेण वा पितृधनाभावेऽपि पुत्रत्वेन पौत्रत्वेन च। तत्र क्रमोऽप्ययमेव पित्रभावे पुत्रः पुत्राभावे पौत्र इति। पुत्रेण पौत्रेण वा निन्हवे कृते अर्थिना साक्ष्यादिभिर्भावितमृणं देयं पुत्रपौत्रैरित्यन्वयः। अत्र पितरि प्रोषित इत्येतावदुक्तम्। कालविशेषस्तु नारदेनोक्तो द्रष्टव्यः॥ नार्वाक्संवत्सराद्विंशात्पितरि प्रोषिते सुतः। ऋणं दद्यात्पितृव्ये वा ज्येष्ठे भ्रातर्यथापि वेति। प्रेतेऽप्यप्राप्तव्यवहारकालो न दद्यात्। प्राप्तव्यवहारकालस्तु दद्यात्। सच कालस्तेनैव

दर्शितः। गर्भस्थैः सदृशो ज्ञेय आष्टमाद्वत्सराच्छिशुः। बाल आषोडशाद्वर्षात्पौगण्डश्चेति शब्द्यते। परतो व्यवहारज्ञः स्वतन्त्रः पितराद्दृत इति। यद्यपि पितृमरणादूर्ध्वं बालोऽपि स्वतन्त्रो जातस्तथापि नर्णभाग्भवति। यथाह अप्राप्तव्यवहारश्चेत्स्वतन्त्रोपि हि नर्णभाक्। स्वातन्त्र्यं हि स्मृतं ज्येष्ठे ज्यैष्ठ्यं गुणवयःकृतमिति। तथा आसेधाह्वाननिषेधश्च दृश्यते। अप्राप्तव्यवहारश्च दूतो दानोन्मुखो व्रती। विषमस्थाश्च नासेध्या न चैतानाह्वयेन्नृप इति। तस्मात्॥ अतः पुत्रेण जातेन स्वार्थमुत्सृज्य यत्नतः। ऋणात्पिता मोचनीयो यथा न नरकं व्रजेदिति। पुत्रेण व्यवहारज्ञतया जातेन निष्पन्नेनेति व्याख्येयम्। श्राद्धे तु बालस्याप्यधिकारः। न ब्रह्माभिव्याहरेदन्यत्र स्वधानिनयनादिति गौतमस्मरणात्। पुत्रपौत्रैरिति बहुवचननिर्देशाद्बहवः पुत्रा यदि विभक्ताः स्वांशानुरूपेण ऋणं दद्युः। अविभक्ताश्चेत्संभूयसमुत्थानेन गुणप्रधानभावेन वर्तमानानां प्रधानभूत एव वा दद्यादिति गम्यते। यथाह नारदः। अत ऊर्ध्वं पितुः पुत्रा ऋणं दद्युर्यथांशतः। अविभक्ता विभक्ता वा यस्तावद्वहते धुरमिति। अत्र च पुत्रपौत्रैर्ऋणं देयमिस्यविशेषेणोक्तं तथापि पुत्रेण यथा पिता सवृद्धिकं ददाति तथैव ऋणं देयम्। पौत्रेण तु समं मूलमेव दातव्यं न वृद्धिरिति विशेषोऽवगन्तव्यः। ऋणमात्मीयवत्पित्र्यं देयं पुत्रैर्विभावितम्। पैतामहं समं देयमदेयं तत्सुतस्य त्विति बृहस्पतिवचनात्। अत्र विभावितमित्यविशेषोपादानात्साक्षिविभावितमित्यत्र साक्षिग्रहणं प्रमाणोपलक्षणम्। समं यावद्गृहीतं तावदेव देयं न वृद्धिः। तत्सुतस्य प्रपौत्रस्यादेयमगृहीतधनस्य। एतच्चोत्तरश्लोके स्पष्टयिष्यते ॥५०॥

## शाखा ७ वी.

आणखी ऋण अवश्य दिलें पाहिजे कोणतें, व कोणीं द्यावें, आणि कधीं द्यावें, हे तीन प्रकार सांगतो.

*मूलार्थ*— पिता परागंदा, मृत, किंवा अचिकित्सनीयरोगग्रस्त झाला असतां व निन्हव केल्यामुळें साक्षीकडून शाबीत केलेलें कर्ज पुत्रांनीं व पौत्रांनीं द्यावें.

*टीकार्थ*— १ अवश्य देय ऋण न देतां पिता परागंदा झाला, किंवा मरण पावला, अथवा ज्याची चिकित्सा होत नाहीं अशा रोगानें ग्रस्त झाला तर त्याचें कर्ज पुत्रांनीं अथवा पौत्रांनीं, पित्याचें धन नसतांहि पुत्रत्वामुळें व पौत्रत्वामुळें अवश्य द्यावें. तें देण्याचा क्रमहि असाच. पित्याच्या अभावीं पुत्रानें, पुत्राच्या अभावीं पौत्रानें द्यावें. परंतु जर पुत्रानें किंवा पौत्रानें निन्हव केला, तर तें सावकारानें साक्षी इत्यादि पुराव्याकडून शाबीत केल्यास पुत्रांनीं किंवा पौत्रांनीं द्यावें.

पित्यानें आपलें कर्ज फेडलें नाहीं तर पुत्रांनीं किंवा पौत्रांनीं फेडावें.

२ एथें ( १ ल्या अंकांत ) पिता परागंदा वगैरे झाल्यास पुत्रांनीं द्यावें, इतकेंच सांगितलें, परंतु कधीं द्यावें ह्याविषयीं कालनियम ( मुदतीचा नियम ) तर नारदानें सांगितलेला घ्यावा.

**नारद**– बाप, चुलता, किंवा ज्येष्ठ भ्राता परागंदा झाल्यास वीस वर्षांचें वय झाल्यानंतर त्याचें कर्ज पुत्रानें फेडावें.

बाप परागंदा झाल्यास वीस वर्षांचें वय झाल्यानंतर पुत्रादिकांनीं कर्ज फेडावें.

३ बाप मरण पावल्यावरहि पुत्र जर **अप्राप्तव्यवहार** आहे तर तो कर्ज देण्यास अधिकारी नाहीं, **प्राप्तव्यवहार** असेल तर त्यानें द्यावें.

तो कालहि तोच ( नारद ) दाखवितो.

**नारद**–४ आठ वर्षेंपर्यंत शिशु, म्हणजे गर्भस्थांसारिखा जाणावा; नंतर सोळा वर्षेंपर्यंत बाल, त्यालाच पौगण्ड असें ह्मटलें आहे; नंतर ( सोळा वर्षांचे वयापुढें ) पुत्र; व्यवहार जाणणारा व स्वतंत्र होतो, परंतु आईबाप नसतील तर.

अप्राप्तव्यवहार पुत्राविषयीं.

५ जरी आईबाप मृत झाल्यानंतर बाल असतांहि स्वतंत्र वागूं लागला तरी कर्ज देण्यास तो अधिकारी होत नाहीं.

**स्मृति**– जरी **अप्राप्तव्यवहार** असून स्वतंत्र वागूं लागला तरी तो कर्ज देण्यास अधिकारी होत नाहीं. कारण, स्वातंत्र्य ज्येष्ठपणावर आहे, व तें ज्येष्ठपण गुण आणि वय ह्यांवांचून येत नाहीं.

**आसेध**–६ ( द्वाही ) देण्याविषयीं व सरकारांत बोलावून आणण्याविषयीं ज्यांचा निषेध सांगितला आहे त्यांत **अप्राप्तव्यवहाराचीहि** गणना केली आहे.

सरकारांत बोलावून आणावयाच्या निषेधाविषयीं.

**स्मृति**– **अप्राप्तव्यवहार**, दूत, दानकर्म करावयास तत्पर, व्रतस्थ, आणि संकटांत पडलेला ह्यांस द्वाही देऊं नये, व राजानें सरकारांत बोलावूं नये.

**स्मृति**– ह्यास्तव पुत्र व्यवहार जाणणारा झाला ह्मणजे त्यानें आपला स्वार्थ सोडून महाप्रयत्न करूनहि बापाला ऋणमुक्त करावें, कीं जेणेंकरून तो नरकाप्रत न जाई.

ह्या वचनाची, उत्पन्न झालेला असून व्यवहार जाणणारा, योग्यवयस्क अशा पुत्रानें बापाला ऋणमुक्त करावें, असी व्याख्या करावी. श्राद्धकर्माविषयीं तर बालासहि अधिकार आहे.

**गौतम**– **बालास** श्रुति ह्मणण्यास अधिकार नाहीं, परंतु श्राद्धकर्माविषयीं ती ह्मणण्याचा अधिकार आहे.

७ ( १ ल्या अंकांत ) " पुत्रांनीं व पौत्रांनीं " असा बहुवचनप्रयोग दाखविल्यावरून बहुत पुत्र असून जर ते विभक्त असतील तर त्यांनीं आपापल्या विभागाप्रमाणें बापाचें कर्ज फेडावें. एकत्र असतील तर सर्वांनीं मिळून फेडावें आणि एक मुख्य असून दुसरे बंधु त्याच्या आज्ञेनें वागणारे असे असतील तर जो प्रमुख असेल त्यानेंच समाईक द्रव्यांतून फेडावें. नारद तसेंच सांगतो.

पुत्र विभक्त असल्यास आपापल्या अंशांतून व अविभक्त असल्यास समाईक द्रव्यांतून बापाचें कर्ज फेडावें.

नारद– पिता मरण पावल्यानंतर विभक्त पुत्रांनीं आपापल्या हिशाप्रमाणें कर्ज फेडावें. अविभक्त असल्यास त्यांत जो कुटुंबनिर्वाह करीत असेल त्यानें द्यावें.

८ एथें ( १ ल्या अंकांत ) पुत्रांनीं व पौत्रांनीं बापाचें कर्ज फेडावें असें जरी सामान्यतः सांगितलें, तथापि जसें बाप सव्याज देतो तसेंच पुत्रांनीं द्यावें. पौत्रांनीं तर मुद्दल मात्र द्यावें, व्याज देऊं नये, इतका विशेष समजावा. ह्यास प्रमाण.

बृहस्पति– शाबीत केलेलें पित्याचें कर्ज पुत्रांनीं स्वतां केलेल्या कर्जाप्रमाणेंच द्यावें, पितामहाचें कर्ज पौत्रांनीं सम द्यावें, आणि प्रपौत्रानें अगदींच देऊं नये.

ह्या ( बृहस्पति ) वचनांत "शाबीत केलेलें" असें सामान्यतः सांगितलें आहे, आणि १ ल्या अंकाच्या मूळ वचनांत 'साक्षीकडून शाबीत केलेलें' असें ह्मटलें आहे ह्यास्तव तें एथें सर्व पुराव्याचें उपलक्षण होय असें समजावें. 'सम द्यावें' ह्मणजे जितकें घेतलें असेल तितकेंच द्यावें, व्याज देऊं नये.

एथें, जर प्रपौत्राला प्रपितामहाचें धन मिळालें नसेल तर त्यानें देऊं नये, असें समजावें, जर प्रपितामहाचें धन मिळालें असेल तर द्यावें. हें पुढल्या वचनांत ( ८ व्या शाखेच्या १४ व्या अंकांत ) स्पष्ट सांगितलें आहे. ५०

## रिक्थग्राह ऋणं दाप्यो योषिद्ग्राहस्तथैव च ।
## पुत्रोऽनन्याश्रितद्रव्यः पुत्रहीनस्य रिक्थिनः ॥ ५१ ॥

ऋणापाकरणे ऋणी तत्पुत्रः पौत्र इति त्रयः कर्तारो दर्शितास्तेषां च समवाये क्रमोऽपि दर्शितः । इदानीं कर्त्रन्तरसमवाये च क्रममाह । अन्यदीयं द्रव्यमन्यस्य क्रयादिव्यतिरेकेण यत्स्वीयं भवति तद्रिक्थं । विभागद्वारेण रिक्थं गृह्णातीति रिक्थग्राहः स ऋणं दाप्यः । एतदुक्तं भवति । यो यदीयं द्रव्यं रिक्थरूपेण गृह्णाति स तत्कृतमृणं दाप्यो न चौरादिरिति । योषितं भार्यां गृह्णातीति योषिद्ग्राहः स तथैव ऋणं दाप्यः । यो यदीयां योषितं गृह्णाति स तत्कृतमृणं दाप्यः । योषितोऽविभाज्यद्रव्यत्वेन रिक्थव्यपदेशानर्हत्वाद्भेदेन निर्देशः । पुत्रश्चानन्याश्रितद्रव्यः ऋणं दाप्यः । अन्यमाश्रितमन्याश्रितं अन्याश्रितं मातृपितृसंबन्धिद्रव्यं यस्यासावन्याश्रितद्रव्यः न अन्याश्रितद्रव्यः अनन्याश्रितद्रव्यः पुत्रहीनस्य रिक्थिन ऋणं दाप्य इति संबन्धः । एतेषां समवाये क्रमश्च पाठक्रम एव । रिक्थग्राह ऋणं दाप्यस्तदभावे योषिद्ग्राहस्तदभावे पुत्र इति । नन्वेतेषां समवाय एव नोपपद्यते । न भ्रातरो न पितरः पुत्रा रिक्थहराः पितुरिति पुत्रे सत्यन्यस्य रिक्थग्रहणासंभवात् । योषिद्ग्राहोऽपि नोपपद्यते । न द्वितीयश्च साध्वीनां क्वचिद्भर्त्तोपदिश्यत इति स्मरणात् । तदृणं पुत्रो दाप्य इत्यप्ययुक्तं पुत्रपौत्रैर्ऋणं देयमित्युक्तत्वात् । अनन्याश्रितद्रव्य इति विशेषणमप्यनर्थकं पुत्रे सति द्रव्यस्यान्याश्रयणासंभवात् । संभवे च रिक्थग्राहीत्यनेनैव गतार्थत्वात् । पुत्रहीनस्य रिक्थिन इत्येतदपि न वक्तव्यं । पुत्रे सत्यपि रिक्थग्राही ऋणं दाप्य

इति स्थितं । असति पुत्रे रिक्थग्राही सुतरां दाप्य इति सिद्धमेवेति । अत्रोच्यते । पुत्रे सत्यप्यन्यो रिक्थग्राही संभवति । क्लीबान्धबधिरादीनां पुत्रेऽत्वेपि रिक्थग्राहाभावात् । तथाच क्लीबादीननुक्रम्य भर्तव्यास्तु निरंशका इति वक्ष्यति । तथा सवर्णापुत्रोप्यन्यायवृत्तिर्न लभेतैकेषामिति गौतमस्मरणात् । अतश्च क्लीबादिषु पुत्रेषु सत्सु अन्यायवृत्तेच सवर्णापुत्रे सति रिक्थग्राही पितृव्यतत्पुत्रादिः । योषिद्ग्राहो यद्यपि शास्त्रविरोधेन न संभवति तथाप्यतिक्रान्तनिषेधः पूर्वपतिकृतर्णापाकरणाधिकारी भवत्येव । योषिद्ग्राहो यश्चतसृणां स्वैरिणीनामन्तिमां गृह्णाति यश्च पुनर्भुवां तिसृणां प्रथमाम् । यथाह नारदः । परपूर्वाः स्त्रियस्त्वन्याः सप्त प्रोक्ता यथाक्रमम् । पुनर्भूस्त्रिविधा तासां स्वैरिणी तु चतुर्विधा ॥ कन्यैवाक्षतयोनिर्या पाणिग्रहणदूषिता । पुनर्भूः प्रथमा नाम पुनः संस्कारकर्मणा ॥ देशधर्मानवेक्ष्य स्त्री गुरुभिर्या प्रदीयते । उत्पन्नसाहसान्यस्मै सा द्वितीया प्रकीर्तिता ॥ उत्पन्नसाहसा उत्पन्नव्यभिचारा । असत्सु देवरेषु स्त्री बान्धवैर्या प्रदीयते । सवर्णाय सपिंडाय सा तृतीया प्रकीर्तिता ॥ स्त्रीप्रसूताऽप्रसूता वा पत्यावेव तु जीवति । कामात्समाश्रयेदन्यं प्रथमा स्वैरिणी तु सा ॥ कौमारं पतिमुत्सृज्य या त्वन्यं पुरुषं श्रिता । पुनः पत्युर्गृहं यायात्सा द्वितीया प्रकीर्तिता ॥ मृते भर्तरि तु प्राप्तान्देवरादीनपास्य या । उपगच्छेत्परं कामात्सा तृतीया प्रकीर्तिता ॥ प्राप्ता देशाद्धनक्रीता क्षुत्पिपासातुरा च या । तवाहमित्युपगता सा चतुर्थी प्रकीर्तिता ॥ अन्तिमा स्वैरिणीनां या प्रथमा च पुनर्भुवाम् । ऋणं तयोः पतिकृतं दद्याद्यस्तमुपाश्रित इति । तदन्योपि योषिद्ग्राह ऋणापाकरणेऽधिकारी तेनैव दर्शितः । या तु सप्रधनैव स्त्री सापत्या वान्यमाश्रयेत् । सोऽस्या दद्यादृणं भर्तुरुत्सृजेद्वा तथैव तां ॥ प्रकृष्टेन धनेन सह वर्तते इति सप्रधना बहुधनेति यावत् । तथा अधनस्य ह्यपुत्रस्य मृतस्योपैति यः स्त्रियम् । ऋणं वोढुः स भजते सैव चास्य धनं स्मृतमिति पुत्रस्य पुनर्वचनं क्रमार्थं । अनन्याश्रितद्रव्य इति बहुषु पुत्रेषु रिक्थाभावे अंशग्रहणयोग्यस्यैव ऋणापाकरणेऽधिकारो नायोग्यस्यान्धादेरित्येवमर्थम् । पुत्रहीनस्य रिक्थिन इत्येतदपि पुत्रपौत्रहीनस्य प्रपौत्रादयो यदि रिक्थं गृह्णंति तदा ऋणं दाप्याः नान्यथेत्येवमर्थं । पुत्रपौत्रौ च रिक्थग्रहणाभावेऽपि दाप्यावित्युक्तं । यथाह नारदः । क्रमादव्याहतं प्राप्तं पुत्रैर्यन्नर्णमुद्धृतम् । दद्युः पैतामहं पौत्रास्तच्चतुर्थान्निवर्तत इति सर्वं निरवद्यम् । यद्वा । योषिद्ग्राहाभावे पुत्रो दाप्य इत्युक्तम् । पुत्राभावे योषिद्ग्राहो दाप्य इत्युच्यते । पुत्रहीनस्य रिक्थिन इति रिक्थशब्देन योषिदेवोच्यते । सैव चास्य धनं स्मृतमिति स्मरणात् । यो यस्य हरते दारान् स तस्य हरते धनमिति च । ननु योषिद्ग्राहाभावे पुत्र ऋणं दाप्यः पुत्राभावे योषिद्ग्राह इति परस्परविरुद्धम् । उभयसद्भावे न कश्चिद्दाप्य इति नैष दोषः । अन्तिमस्वैरिणीग्राहिणः प्रथमपुनर्भूग्राहिणः सप्रधनस्त्रीहारिणश्चाभावे पुत्रो दाप्यः पुत्राभावे तु निर्धननिरपत्ययोषिद्ग्राही दाप्य इति । एतदेवोक्तं नारदेन । धनस्त्रीहारिपुत्राणामृणभाग्यो धनं हरेत् । पुत्रोसतोः स्त्रीधनिनोः स्त्रीहारी धनिपुत्रयोरिति । धनस्त्रीहारिपुत्राणां समवाये यो धनं

हरेत्स ऋणभाक् । पुत्रोऽसतोः स्त्रीधनिनोः स्त्री च धनं च स्त्रीधने ते विद्येते ययोस्तौ स्त्रीधनिनौ तयोः स्त्रीधनिनोरसतोः पुत्र एव ऋणभाक् भवति । धनिपुत्रयोरसतोः स्त्रीहार्येवर्णभाक् । स्त्रीहार्यभावे पुत्र ऋणभाक् । पुत्राभावे स्त्रीहारीति विरोधप्रतिभासपरिहारः पूर्ववत् । पुत्रहीनस्य रिक्थिन इत्यस्यान्या व्याख्या । एते धनस्त्रीहारिपुत्रा ऋणं कस्य दाप्या इति विवक्षायां उत्तमर्णस्य दाप्यास्तदभावे तत्पुत्रादेः तत्पुत्राद्यभावे कस्य दाप्या इत्यपेक्षायामिदमुपतिष्ठते । पुत्रहीनस्य रिक्थिन इति पुत्राद्यन्वयहीनस्योत्तमर्णस्य यो रिक्थी रिक्थग्रहणयोग्यः सपिंडादिस्तस्य रिक्थिनो दाप्याः । तथा च नारदेन । ब्राह्मणस्य तु यद्देयं सान्वयस्य च नास्ति चेत् । निर्वपेत्तत्सकुल्येपु तदभावे स्वबन्धुष्वित्यभिहितम् । यदा तु न सकुल्याः स्युर्न च संबन्धिबान्धवाः । तदा दद्याद्द्विजेभ्यस्तु तेष्वसत्स्वप्सु निक्षिपेदिति ॥ ५१ ॥

## शाखा ८ वी.

ह्याप्रमाणें कर्ज देण्याविषयीं कर्जदार, त्याचा पुत्र, पौत्र असे तीन अधिकारी सांगून ते तिघेहि एकत्र हजर असल्यास कोणत्या अनुक्रमानें द्यावें हेंहि सांगितलें. आतां कर्ज देण्याविषयीं आणखी अधिकारी कोणते व ते एकत्र हजर असल्यास त्यांनीं कोणत्या अनुक्रमानें द्यावें तें सांगतो.

**मूलार्थ**– **रिक्थग्राह**, **योषिद्ग्राह**, आणि **अनन्याश्रितद्रव्य** असा पुत्र, हे मृताचें कर्ज देण्यास अधिकारी आहेत, आणि निपुत्रिकाचें कर्ज देण्यास रिक्थी अधिकारी आहे.

**टीकार्थ**–१ रिक्थ ( जिंदगी ) ह्मणजे एकाचें द्रव्य विक्री इत्यादि व्यापारावांचून जें दुसऱ्यास मिळतें तें; त्याला विभागद्वारा घेणारा तो **रिक्थग्राह**, त्यानें कर्ज द्यावें ह्मणजे असें–जो ज्याचें द्रव्य रिक्थरूपेंकरून घेतो त्यानें त्याचें कर्ज फेडावें; चोर इत्यादिकांनीं फेडूं नये.

२ योषित् ह्मणजे स्त्री तिचें जो ग्रहण करितो तो **योषिद्ग्राह**. ह्मणजे जो दुसऱ्याची स्त्री घेतो तो. त्यानें त्याचें ( तिच्या पहिल्या नवऱ्याचें ) कर्ज फेडावें.

**रिक्थग्राहाहून योषिद्ग्राह** निराळा सांगण्याचें कारण हें कीं, स्त्रीचा विभाग संभवत नाहीं; स्त्री हें द्रव्य खरें, परंतु रिक्थरूप द्रव्य नव्हे. कारण, जें द्रव्य विभागास योग्य आहे, त्याविषयींच **रिक्थ** शब्दाची प्रवृत्ति आहे.

३ पुत्र असून जर **अनन्याश्रितद्रव्य** आहे, ह्मणजे ज्याच्या आईबापांचें द्रव्य त्या पुत्रावांचून दुसऱ्याच्या स्वाधीन नाहीं असा पुत्र, त्यानें त्याचें कर्ज फेडावें.

तिघे (**रिक्थग्राह**, **योषिद्ग्राह**, आणि **अनन्याश्रितद्रव्य** पुत्र हे ) हजर असतील तर देण्याचा क्रमहि मूळांत सांगितल्याप्रमाणेंच. ह्मणजे, प्रथमतः **रिक्थग्राहानें** कर्ज फेडावें. त्याच्या अभावीं **योषिद्ग्राहानें**, त्याच्या अभावीं ( अनन्याश्रितद्रव्य ) पुत्रानें द्यावें.

४ **शंका**–ह्या तिघांचा समवाय[१] संभवत नाहीं. कारण,

---

१. समवाय म्हणजे रिक्थग्राहादिक तिघे एकत्र हजर असणें तो.

**स्मृति**– पित्याचें रिक्थ घेण्याविषयीं पुत्रच अधिकारी, भाऊ नाहींत, व आईबापहि नाहींत.

अशा वचनावरून पुत्र असतां अन्यास रिक्थ घेण्याचा अधिकार नाहीं.

५ **योषिद्ग्राह** तर अगदींच संभवत नाहीं. कारण,

**मनु**– स्त्रियांनीं दुसरा नवरा करावा अशी कोठें शास्त्राज्ञा नाहीं.

६ पुत्रानें द्यावें असें जें सांगितलें, तेंहि अयुक्तच. कारण, पूर्वीं (७ व्या शाखेच्या १ल्या अंकाचे वचनांत) सांगितलेंच आहे कीं, पुत्रांनीं किंवा पौत्रांनीं कर्ज द्यावें (ह्यास्तव पुनः एथें सांगितल्यानें पुनरुक्तिदोष मात्र येतो).

७ तसेंच, **अनन्याश्रितद्रव्य** असें जें पुत्राचें विशेषण आहे तेंहि निरर्थक. कारण, (४ थ्या अंकांत सांगितलेंच आहे कीं,) पुत्र असतां रिक्थ घेण्याविषयीं अन्यास अधिकार नाहीं. अधिकार असल्यास **रिक्थग्राहानें** कर्ज द्यावें असें पूर्वीं (१ ल्या अंकांत) सांगितलेंच आहे.

८ निपुत्रिकाचें कर्ज, **रिक्थी** (त्याचें द्रव्य घेणारा) यानें द्यावें, असें जें (मूळांत) सांगितलें हेंहि सांगूं नये. कारण, पुत्र असतांहि रिक्थग्राहानें कर्ज फेडावें असें सांगितलेंच आहे. अर्थात् पुत्र नसल्यास विशेषेंकरून **रिक्थग्राहानें** द्यावें, हें सिद्धच आहे.

९ **समाधान**– पुत्र असतांहि दुसरा **रिक्थग्राही** संभवतो. कारण, नपुंसक, आंधळा, बधिर, इत्यादि प्रकारचा पुत्र आहे, तर तो **रिक्थ** घेण्यास अधिकारी होत नाहीं, ह्यास्तवच तशा प्रकारच्या पुत्रास दायविभाग न देतां त्याचें पोषण मात्र करावें, असें पुढें (दायविभागप्रकरणीं ३० व्या शाखेच्या १ ल्या अंकांत) सांगितलें आहे.

**गौतम**– सवर्णापुत्र असूनहि जर तो दुर्वृत्त असेल, तर अंशाचा विभागी होत नाहीं.

ह्यास्तव नपुंसकादिक पुत्र असतां व सवर्णापुत्र असूनहि जर तो दुर्वृत्त आहे, तर चुलता किंवा त्याचा[१] पुत्र **रिक्थग्राह** होतो.

१० **योषिद्ग्राहहि** संभवतो. (तो असा)–**योषिद्ग्राह** जरी शास्त्रनिषिद्ध आहे, तथापि शास्त्रीय निषेधाचें उल्लंघन करून जो दुसऱ्याची स्त्री वरतो तो त्याचें (पहिल्या नवऱ्याचें) कर्ज देण्याविषयीं अधिकारी होतो.

**योषिद्ग्राह** म्हणजे जो (पुढें सांगितलेल्या) चार **स्वैरिणींतून** शेवटलीचा अंगीकार करितो, आणि तीन **पुनर्भू** ह्यांतून पहिलीचा अंगीकार करितो तो. ह्यास प्रमाण.

**नारद**–**परपूर्वा**[२] अशा सात स्त्रिया सांगितल्या आहेत, त्यांमध्यें **पुनर्भू** तीन प्रकारची, आणि **स्वैरिणी** चार प्रकारची.

ज्या कन्येचा विवाह मात्र झाला परंतु नवऱ्याशीं संग झाला नाहीं, आणि पुनः दुसऱ्याशीं विवाह केला जातो ती पहिली **पुनर्भू** होय.

पुनर्भूचे प्रकार.

---

१ त्याचा म्हणजे चुलत्याचा किंवा नपुंसकादिकांचा संभवेल. २ परपूर्वा म्हणजे जिचा लग्नाचा नवरा आहे किंवा होता आणि दुसऱ्या पुरुषाचा आश्रय करिते ती.

जिचा[३] प्रथमतः एकाशीं विवाह झाला आणि पुढें ती व्यभिचारिणी असें प्रसिद्धीस आल्यामुळें वडिलांनीं देशधर्माकडे पाहून पुनः दुसऱ्याला विवाहविधिपूर्वक दिली जाते ती दुसरी **पुनर्भू** होय.

विवाह[३] झाल्यानंतर बाल्यावस्थेमध्येंच लग्नाचा नवरा मृत झाला आणि तिला दीरहि नाहींत, ह्मणून तिच्या बांधवांनीं **सवर्ण सपिंड** अशा दुसऱ्या पुरुषास पुनर्विवाहपूर्वक जी स्त्री दिली जाते ती तिसरी **पुनर्भू** होय.

**सापत्य** किंवा **निरपत्य** जी स्त्री नवरा जिवंत असतां स्वेच्छेनें परपुरुषासीं संगत होते ती पहिली **स्वैरिणी**.

स्वैरिणीचे प्रकार.

कुंवारपणींचा[२] नवरा टाकून जी परपुरुषाचा आश्रय करिते, आणि पुनः नवऱ्याचे घरीं येते ती दुसरी **स्वैरिणी**.

नवरा मृत झाल्यानंतर प्राप्त झालेल्या दिरादिकांचा त्याग करून जी स्वेच्छेनें परपुरुषाशीं संगत होते ती तिसरी **स्वैरिणी**.

दुष्काळ[४] पडल्यामुळें देशांतराहून प्राप्त झालेली अथवा द्रव्य देऊन विकत घेतलेली किंवा खावयास न मिळे सबब आतुर होऊन 'मी तुझी आहें' असें बोलून प्राप्त झालेली ती चौथी स्वैरिणी.

जो मनुष्य चार **स्वैरिणींतून** शेवटलीचा व तीन **पुनर्भूंतून** पहिलीचा अंगीकार करितो त्यानें तिच्या पहिल्या नवऱ्याचें कर्ज द्यावें.

तसाच दुसऱ्या प्रकारचाहि **योषिद्ग्राह** पहिल्या नवऱ्याचें कर्ज देण्याविषयीं अधिकारी आहे, असें नारद सांगतो.

**नारद**—११ जी बहुधनसंपन्न किंवा **सापत्य** स्त्री ज्याचा अंगीकार करिते त्यानें तिच्या पहिल्या नवऱ्याचें कर्ज फेडावें. किंवा तिचा (धन व अपत्य ह्यांसुद्धां) त्याग करावा.

योषिद्ग्राहानें पहिल्या नवऱ्याचें कर्ज फेडावें.

**स्मृति**— तसेंच अधन व अपुत्र असा पुरुष मरण पावला असतां त्याची स्त्री जो घेतो तो, तिच्या नवऱ्याचें कर्ज फेडण्याविषयीं अधिकारी होतो; कारण, स्त्री हेंच त्याचें (पहिल्या नवऱ्याचें) धन होय.

१२ तसेंच "पुत्रानें द्यावें" असें जें पुनः सांगितलें तें ह्यासाठीं कीं, **रिक्थग्राहाच्या** अभावीं **योषिद्ग्राहानें** द्यावें. त्याच्या अभावीं पुत्रानें द्यावें, अशा अनुक्रमासाठीं सांगितलें आहे.

१३ तसेंच (ह्या शाखेच्या ३ ऱ्या अंकांत) "अनन्याश्रितद्रव्य" असें जें पुत्राचें विशेषण आहे तें ह्यासाठीं कीं, बहुत पुत्र असतां त्यास बापाचें द्रव्य नसल्यामुळें न मिळालें तरी, जो **रिक्थ** घेण्यास अधिकारी आहे तोच पुत्र कर्ज देण्याचा अधिकारी होईल. आंधळा, बहिरा इत्यादिक पुत्र होणार नाहीं.

बहुत पुत्र असून जो बापाची जिंदगी घेण्यास योग्य तोच कर्ज फेडण्याविषयीं अधिकारी.

१४ तसेंच ( ह्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) "निपुत्रिकाचें कर्ज रिक्थी यानें फेडावें" असें जें सांगितलें तें ह्यासाठीं कीं, ज्याला पुत्र व पौत्र नाहींत, परंतु प्रपौत्र इत्यादि आहेत आणि त्यांस जर प्रपितामहाचें रिक्थ मिळालें असेल तरच ते कर्ज फेडण्याविषयीं अधिकारी होतील, अन्यथा होणार नाहींत. पुत्र पौत्र यांस तर रिक्थ न मिळालें तरी ते कर्ज फेडण्यास अधिकारी आहेत, असें पूर्वी ( ७ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितलेंच आहे. ह्यास प्रमाण.

पुत्र, पौत्र हे जिंदगी न मिळाली तरी बापाचें कर्ज फेडण्याविषयीं अधिकारी आहेत.

**नारद**– पिता मरण पावल्यानंतर त्याचें कर्ज पुत्रांनीं द्यावें, पुत्राच्या मागें पौत्रांनीं द्यावें, प्रपौत्रांनीं देऊं नये.

ह्याप्रमाणें ( चालत्या शाखेच्या १ ल्या अंकाचे वचनावर शंका प्राप्त झाली तिचें समाधान होऊन ) सर्व निर्दोष झालें असें जाणावें.

## शाखा ९ वी.

### अथवा ( मूळ वचनाचा ) दुसरा प्रकार.

१ **योषिद्ग्राहाच्या** अभावीं पुत्रानें द्यावें असें सांगितलें, आतां पुत्राच्या अभावीं योषिद्ग्राहानें द्यावें, असें सांगतो. तें असें कीं, " **पुत्रहीनस्य रिक्थिनः** " असें जें याज्ञवल्क्यवचन आहे तेथें **रिक्थशब्दें**करून स्त्रीच घ्यावी. कारण, मागें ( ११ व्या अंकांत ) सांगितलें कीं, स्त्री हेंच त्याचें धन होय. आणि दुसरेंहि वचन असें आहे कीं, "जो ज्याची स्त्री घेतो तो त्याचें धन घेतो."

**शंका**– योषिद्ग्राहाच्या अभावीं पुत्रानें द्यावें, आणि पुत्राच्या अभावीं **योषिद्ग्राहानें** द्यावें, हें परस्परांशीं विरुद्ध आहे. कारण, जर दोघे आहेत तर कोणींच देऊं नये असें प्राप्त होईल.

२ **समाधान**– शेवटली **स्वैरिणी** व पहिली **पुनर्भू** ह्यांचा अंगीकार करणारा (१० व्या अंकांत सांगितलेला) आणि बहुधनसंपन्न स्त्रीचें ग्रहण करणारा ( ११ व्या अंकांत सांगितलेला ) ह्या दोघांच्या अभावीं पुत्रानें कर्ज फेडावें. आणि पुत्राच्या अभावीं निर्धन निरपत्यस्त्रीग्राही ह्यानें कर्ज फेडावें. नारदानेंहि असेंच सांगितलें आहे.

योषिद्ग्राहांनीं कर्ज फेडावें.

**नारद**– **रिक्थग्राह**, **योषिद्ग्राह**, आणि पुत्र ह्या तिघांतून जो रिक्थग्राह असेल त्यानेंच कर्ज फेडावें. **योषिद्ग्राह** व **रिक्थग्राह** ह्यांच्या अभावीं पुत्रानें कर्ज फेडावें. **रिक्थग्राह**, पुत्र ह्यांच्या अभावीं **योषिद्ग्राहानें** ( निर्धननिरपत्यस्त्रीग्राही यानें ) कर्ज द्यावें.

ह्याप्रमाणें पूर्वोक्त विरोधाचा परिहार जाणावा.

( ८ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे वचनांत) निपुत्रिकाचें कर्ज (रिक्थीनें[१]) द्यावें, असें जें सांगितलें आहे त्याचा दुसरा अर्थ.

---

१. रिक्थ घेण्यास जो अधिकारी योग्य त्यानें.

रिक्थग्राह,योषितग्राह आणि पुत्र ह्यांनीं कोणास कर्जाचा वसूल द्यावा.

३ रिक्थग्राह, योषिद्ग्राह, आणि पुत्र ह्यांनीं कोणास कर्ज द्यावें अशा आकांक्षेवरून सावकारास द्यावें, तो नसल्यास त्याच्या पुत्रादिकांस द्यावें, परंतु पुत्रादिक नसल्यास कोणाला द्यावें ? अशी आकांक्षा प्राप्त झाली असतां त्या सावकाराच्या पुत्रादिक वंशाच्या अभावीं रिक्थ घेण्यास अधिकारी जो सपिंडादिक वारीस असेल त्याला द्यावें.

नारद– ब्राह्मण सावकाराचें जें कर्ज द्यावयाचें असेल तें तो ( सावकार ) नसल्यास त्याच्या पुत्रादिकांस द्यावें. पुत्रादिकहि नसतील तर कुळांतील जो कोणी असेल त्याला द्यावें. त्याच्या अभावीं बांधवांस[1] द्यावें. " असें सांगून पुढें सांगितलें कीं," जर कुलांतील कोणी नाहींत, व संबंधी, बांधवहि नाहींत तर तें ब्राह्मणसावकाराचें कर्ज द्विजांस ( ब्राह्मणांस ) द्यावें, तेहि नसल्यास उदकांत टाकावें. ५१

---

भ्रातॄणामथ दंपत्योः पितुः पुत्रस्य चैव हि ।
प्रातिभाव्यमृणं साक्ष्यमविभक्ते न तु स्मृतम् ॥ ५२ ॥

अधुना पुरुषविशेषे ऋणग्रहणप्रतिषेधनप्रसंगादन्यदपि प्रतिषेधति । प्रतिभुवो भावः प्रातिभाव्यं भ्रातॄणां दंपत्योः पितापुत्रयोश्चाविभक्ते द्रव्ये द्रव्यविभागात्प्राक्प्रातिभाव्यमृणं साक्ष्यं च न स्मृतं मन्वादिभिः । अपि तु प्रतिषिद्धं साधारणधनत्वात् । प्रातिभाव्यसाक्षित्वयोः पक्षे द्रव्यव्ययावसानत्वात् ऋणस्य चावश्यप्रतिदेयत्वात् एतच्च परस्परानुमतिव्यतिरेकेण । परस्परानुमत्या त्वविभक्तानामपि प्रातिभाव्यादि भवत्येव । विभागादूर्ध्वं तु परस्परानुमतिव्यतिरेकेणापि भवति ॥

ननु दंपत्योर्विभागात्प्राक्प्रातिभाव्यादिप्रतिषेधो न युज्यते तयोर्विभागाभावेन विशेषणानर्थक्यात् । विभागाभावश्चापस्तंबेन दर्शितः । जायापत्योर्न विभागो विद्यत इति ॥

सत्यम् । श्रौतस्मार्ताग्निसाध्येषु कर्मसु तत्फलेषु च विभागाभावो न पुनः सर्वकर्मसु द्रव्येषु च । तथा हि । जायापत्योर्न विभागो विद्यते इत्युक्त्वा किमिति न विद्यते इत्यपेक्षायां हेतुमुक्तवान् । पाणिग्रहणाद्धि सहत्वं कर्मसु तथा पुण्यफलेषु चेति । हि यस्मात्पाणिग्रहणादारभ्य कर्मसु सहत्वं श्रूयते । जायापती अग्निमादधीयातामिति । तस्मादाधाने सहाधिकारादाधानसिद्धाग्निसाध्येषु कर्मसु सहाधिकारः तथा कर्म स्मार्तं विवाहाग्नावित्यादिस्मरणाद्विवाहसिद्धाग्निसाध्येष्वपि कर्मसु सहाधिकार एव अतश्चोभयविधाग्निनिरपेक्षेषु कर्मसु पूर्तेषु जायापत्योः पृथगेवाधिकारः संपद्यते । तथा पुण्यानां फलेषु स्वर्गादिषु जायापत्योः सहत्वं श्रूयते । दिविज्योति-

---

[1] बांधव म्हणजे तीन प्रकारचे बंधु. ह्याचा विशद प्रकार. दायविभाग प्रकरणीं सांगितला आहे.

रजरमारभेतामित्यादि । येषु पुण्यकर्मसु सहाधिकारस्तेषां फलेषु सहत्वमिति बोद्धव्यम् । न पुनः पूर्तानां भर्त्रनुज्ञयानुष्ठितानां फलेष्वपि ॥

ननु द्रव्यस्वामित्वेऽपि सहत्वमुक्तम् । द्रव्यपरिग्रहेषु च न हि भर्तुर्विप्रवासे नैमित्तिके दाने स्तेयमुपदिशन्तीति । सत्यं ॥

द्रव्यस्वामित्वं पत्न्यादर्शितमनेन न पुनर्विभागाभावः यस्माद्द्रव्यपरिग्रहेषु चेत्युक्त्वा तत्र कारणमुक्तम् भर्तुर्विप्रवासे नैमित्तिकेऽवश्यकर्तव्ये दानेऽतिथिभोजनभिक्षाप्रदानादौ हि यस्मान्नस्तेयमुपदिशन्ति मन्वादयस्तस्माद्भार्यायामपि द्रव्यस्वामित्वमस्ति अन्यथा स्तेयं स्यादिति । तस्माद्भर्त्तुरिच्छया भार्याया अपि द्रव्यविभागो भवत्येव न स्वेच्छया । यथा वक्ष्यति । यदि कुर्यात्समानंशान्पत्न्यः कार्याः समांशिका इति ॥ ५२ ॥

### शाखा १० वी.

सांप्रत कोणत्या पुरुषानें कर्ज घेऊं नये, असें सांगतांना प्रसंगसंगतीनें त्या पुरुषास दुसऱ्याहि व्यवहाराचा निषेध सांगतो.

**मूलार्थ**— भाऊ भाऊ, स्त्री पुरुष, पिता पुत्र हे **अविभक्त** असतां ह्यांनीं जामीनकी, कर्ज, साक्ष, हे व्यवहार करूं नयेत असें सांगितलें आहे.

भाऊ वगैरे अविभक्त असतां जामीनकी इत्यादि व्यवहार करूं नयेत.

**टीकार्थ**—१ भाऊ भाऊ, नवरा बायको, पिता पुत्र, हे **अविभक्त** असतां ह्यांनीं जामीनकी, कर्ज आणि साक्ष असे तीन व्यवहार परस्परांच्या अनुमतीवांचून करूं नयेत, असें मन्वादिक ऋषींनीं सांगितलें आहे. कारण, साक्ष, व जामीनकी ह्यांबद्दल कदाचित् समाईक द्रव्यांतून खर्च करावा लागेल, आणि कर्जहि असल्यास अवश्य द्यावें लागेल. परस्परांची अनुमति असेल तर **अविभक्त** असतांहि जामीनकी, कर्ज, साक्ष हे व्यवहार होऊं शकतात आणि विभाग झाल्यानंतर परस्परांच्या अनुमतीवांचूनहि होऊं शकतात.

२ **शंका**—स्त्रीपुरुषांचा विभाग झाल्यापूर्वीं जो जामीनकी इत्यादिक व्यवहाराचा निषेध सांगितला तो योग्य नाहीं. कारण, स्त्रीपुरुषांचा विभागच होत नाहीं. म्हणून विभागाचे पूर्वीं जामीनकी इत्यादिक होत नाहीं असें जें विशेषण तें स्त्रीपुरुषांविषयीं व्यर्थ होतें.

स्त्रीपुरुषांचा विभाग होत नाहीं हें आपस्तंब दाखवितो.

**आपस्तंब**— स्त्रीपुरुष यांचा विभाग होत नाहीं.

३ **समाधान**— खरें परंतु श्रौतस्मार्ताग्निसाध्य जीं कर्में व तज्जनित फलें ह्यांविषयीं

१ ज्या पदार्थावर ज्या गुणाचा योग व अयोग हे दोन पाहाण्यांत येतात त्या पदार्थाचें तें विशेषण सार्थक होतें. जसें, पुरुष ज्ञानी व अज्ञानी असा दोन प्रकारचा असतो. म्हणून ज्ञानी पुरुषाचें मला अगत्य आहे असें विशेषण सार्थक होतें. परंतु शीतळ अग्नि आण, उष्ण अग्नि आण हें म्हणणें योग्य नाहीं. कारण अग्नीवर शीतलत्वयोग कदापि राहत नाहीं व उष्णत्वाचा अयोगहि संभवत नाहीं, म्हणून तें दोनहि प्रकारचें विशेषण व्यर्थ होतें.

मात्र विभाग नाहीं, असा त्याचा अर्थ, सर्व कर्माविषयीं किंवा द्रव्याविषयीं विभाग होत नाहीं असें नव्हे.

४ तेंच स्पष्ट करून सांगतो. "स्त्रीपुरुषांचा विभाग होत नाहीं," असें स्वमत सांगून, कां होत नाहीं, ह्याचें कारणहि तोच सांगतो. "जेव्हां स्त्रीचें पाणिग्रहण झालें तेव्हांच तिला विवाहाग्निसाध्य कर्माविषयीं, तसेंच पुण्य व तज्जनित फलें ह्यांविषयींहि" पतीसहवर्तमान अधिकार 'जायापती अग्निं धारण करोत' इत्यादि श्रुतिवचनेंकरून आहे. तस्मात् आधानाविषयीं जायापतींस सहाधिकार आहे ह्मणून आधानसिद्ध अग्नीकडून जीं साध्य कर्में त्यांविषयींहि सहाधिकार आहे.

**स्मृति**– तसेंच गृहस्थानें स्मार्त कर्म विवाहाग्नीवर प्रत्यहीं करावें, असें (स्मृतिवचनांत) सांगितलें, ह्यावरून श्रौतस्मार्ताग्निसाध्य कर्मावांचून इतर कर्माविषयीं व पूर्तकर्मांविषयीं स्त्रीपुरुषांस पार्थक्येंकरून अधिकार आहे असें सिद्ध होतें.

तसेंच यागादिक पुण्यकर्मांचीं फलें जीं स्वर्गादिक ह्यांविषयींहि "दिविज्योतिरजरमारभेतामित्यादि" श्रुतिवचनेंकरून स्त्रीपुरुषांस सहाधिकार आहे.

ज्या पुण्यकर्माविषयीं स्त्रीपुरुषांस सहाधिकार आहे त्यांच्या फलाविषयींहि सहाधिकार आहे असें जाणावें, परंतु पूर्त कर्में पतीची आज्ञा घेऊन केलेलीं जरी आहेत, तरी त्यांच्या फलाविषयीं सहाधिकार नाहीं.

५ **शंका**– द्रव्याच्या स्वामित्वाविषयींहि स्त्रीला आपस्तंबानें पतीसहवर्तमान अधिकार सांगितला आहे, कारण, पति प्रवासांत असेल तर नैमित्तिक दानहि स्त्रीनें केलें असतां तें स्तेय होत नाहीं, असें सांगितलें आहे.

६ **समाधान**– येणेंकरून स्त्रीची द्रव्यावर सत्ता आहे असें दाखविलें परंतु तिला, विभाग नाहीं असें नाहीं. कारण, द्रव्यग्रहणाविषयीं स्त्रीचें स्वामित्व आहे, असें सांगून त्याचें कारणहि सांगितलें आहे. तें असें;– भर्त्याच्या प्रवासाबद्दल किंवा नैमित्तिक (अवश्यकर्तव्य) दान, अतिथिभोजन, भिक्षाप्रदान इत्यादि स्त्रीनें केलें असतां तें स्तेय होत नाहीं, असें मन्वादिक ऋषींनीं सांगितलें आहे. ह्यास्तव स्त्रीलाहि धनाविषयीं स्वामित्व आहे. अन्यथा तिनें केलेलें (दान, अतिथिभोजन, पूर्त इत्यादिक) तें स्तेय (चोरी) होईल.

तस्मात् स्त्रीलाहि पतीच्या इच्छेनें द्रव्यविभाग आहे असें होतें, स्वेच्छेनें मात्र होत नाहीं. ह्याविषयीं पुढें (दायविभागप्रकरणीं ४ थ्या शाखेच्या १ ल्या अंकांत) सांगितलें आहे कीं, जर पुत्रांस समविभाग देतो, तर स्त्रियांसहि तसेच विभाग द्यावे. ५२

---

**दर्शने प्रत्यये दाने प्रातिभाव्यं विधीयते ।**
**आद्यौ तु वितथे दाप्यावितरस्य सुता अपि ॥ ५३ ॥**

१ विहिरी, तलाव इत्यादि धर्मकृत्य पूर्तकर्म ह्मटलें आहे.

अधुना प्रातिभाव्यं निरूपयितुमाह । प्रातिभाव्यं नाम विश्वासार्थं पुरुषान्तरेण सह समयः । तच्च विषयभेदात्त्रिधा भिद्यते । यथा । दर्शने दर्शनापेक्षायां एनं दर्शयिष्यामीति । प्रत्यये विश्वासे मत्प्रत्ययेनास्य धनं प्रयच्छ नायं त्वां वञ्चयिष्यते । यतोऽमुकस्य पुत्रोऽयं उर्वराप्रायभूरस्य ग्रामवरो वास्तीति । दाने यद्ययं न ददाति तदानीमहमेव दास्यामीति प्रातिभाव्यं विधीयत इति प्रत्येकं संबन्धः। आद्यौ तु दर्शनप्रत्ययप्रतिभुवौ वितथे अन्यथाभावे अदर्शने विश्वासव्यभिचारे च दाप्यौ राज्ञा प्रस्तुतं धनमुत्तमर्णस्य । इतरस्य दानप्रतिभुवः सुता अपि दाप्याः । वितथ इत्येव शाठ्येन निर्धनत्वेन वाऽधमर्णे प्रतिकुर्वति । इतरस्य सुता अपीति वदता पूर्वयोः सुता न दाप्या इत्युक्तम् । सुता इति वदता न पौत्रा दाप्या इति दर्शितम् ॥ ५३ ॥

## शाखा ११ वी.

आतां जामीनकीचें निरूपण करितो.

मूलार्थ— दर्शनप्रतिभू ( हजरजामीन प्रत्ययप्रतिभू विश्वासजामीन ), आणि दानप्रतिभू (मालजामीन) अशी जामीनकी सांगितली आहे. पैकीं पहिले दोघे विपरीत वर्तले असतां त्यांकडून मालकाचें धन देववावें. मालजामीनाच्या पुत्रांकडूनहि देववावें.

टीकार्थ—१ प्रातिभाव्य ह्मणजे जामीनकी, ह्मणजे ज्याशीं कर्ज देणें घेणें वगैरे व्यवहार करावयाचा आहे, त्याचा विश्वास पटावा एतदर्थ दुसऱ्या पुरुषाशीं करार करणें.

जामीनकी.

२ विषयभेदेंकरून जामीन तीन प्रकारचा, हजरजामीन, विश्वासजामीन, आणि मालजामीन. हजरजामीन ह्मणजे गरज लागेल त्या वेळीं मी ह्याला हजर करीन. विश्वासजामीन ह्मणजे माझ्या विश्वासावर तूं ह्याला धन दे, हा तुजशीं प्रतारणा करणार नाहीं. कारण, हा अमुकाचा पुत्र, व सर्व धान्य पिकावयाजोगी अशी ह्याची जमीन किंवा गांव आहे. मालजामीन म्हणजे जर हा देणार नाहीं तर मीच तुझें धन देईन.

जामीनाचे प्रकार.

३ हजरजामीन ( असामीस ) हजर न करील किंवा विश्वासजामीनाचा विश्वास खोटा पडेल तर त्या दोघां जामिनांकडून सावकाराचें विवादास्पदीभूत धन राजानें देववावें.

४ आणि कर्जदार दंडेली करील किंवा निर्धन होईल तर तिसरा जो मालजामीन त्याच्या पुत्रांकडूनहि सावकाराचें धन देववावें.

मालजामिनाच्या पुत्रांकडूनहि सावकाराचें धन देववावें.

" मालजामिनाच्या पुत्रांकडूनहि " धन देववावें, असें सांगितल्यावरून हजरजामीन व विश्वासजामीन ह्यांच्या पुत्रांकडून देववूं नये, व मालजामिनाच्या पौत्रांकडून देववूं नये असें अर्थसिद्ध होतें. ५३

दर्शनप्रतिभूर्यत्र मृतः प्रात्ययिकोऽपि वा ।
न तत्पुत्रा ऋणं दद्युर्दद्युर्दानाय यः स्थितः ॥ ५४ ॥

एतदेव स्पष्टीकर्तुमाह । यदा दर्शनप्रतिभूः प्रात्ययिको वा प्रतिभूर्दिवंगतः तदा तयोः पुत्राः प्रातिभाव्यायातं पैतृकमृणं न दद्युः । यस्तु दानाय स्थितः प्रतिभूर्दिवंगतस्तस्य पुत्रा दद्युर्न पौत्राः । ते च मूल्यमेव दद्युर्न वृद्धिम् ॥

ऋणं पैतामहं पौत्राः प्रातिभाव्यागतं सुतः । समं दद्यात्तत्सुतौ तु न दाप्याविति निश्चय इति व्यासवचनात् । प्रातिभाव्यव्यतिरिक्तं पैतामहमृणं पौत्रः समं यावद्गृहीतं तावदेव दद्यान्न वृद्धिं । तथा तत्सुतोऽपि प्रातिभाव्यागतं पित्र्यमृणं सममेव दद्यात् तयोः पुत्रपौत्रयोः सुतौ पौत्रप्रपौत्रौ च प्रातिभाव्यायातं अप्रातिभाव्यं च ऋणं यथाक्रममगृहीतधनौ न दाप्याविति । यदपि स्मरणं । खादको वित्तहीनः स्याल्लग्नको वित्तवान्यदि । मूलं तस्य भवेद्देयं न वृद्धिं दातुमर्हतीति । तदपि लग्नकः प्रतिभूः खादकोऽधमर्णः । लग्नको यदि वित्तवान्मृतस्तदा तस्य पुत्रेण मूल्यमेव दातव्यं न वृद्धिरिति व्याख्येयं । यत्र दर्शनप्रतिभूः प्रत्ययप्रतिभूर्वा बन्धकं पर्याप्तं गृहीत्वा प्रतिभूर्जातस्तत्र तत्पुत्रा अपि तस्मादेव बन्धकात् प्रातिभाव्यायातमृणं दद्युरेव । यथाह कात्यायनः । गृहीत्वा बन्धकं यत्र दर्शनेऽस्य स्थितो भवेत् । विना पित्रा धनात्तस्माद्दाप्यः स्यात्तदृणं सुत इति । दर्शनग्रहणं प्रत्ययस्योपलक्षणं विना पित्रा पितरि प्रेते दूरदेशं गते वेति ॥ ५४ ॥

हेंच अणखी स्पष्ट करून सांगतो.

मूलार्थ– हजर जामीन, किंवा विश्वासजामीन मरण पावला तर त्याच्या पुत्रांनीं जामिनकीचें कर्ज देऊं नये; मालजामिनाच्या पुत्रांनीं द्यावें.

टीकार्थ–९ हजरजामीन, किंवा विश्वासजामीन मरण पावला असतां त्याच्या पुत्रांनीं पित्याचे जामिनकीचें कर्ज देऊं नये. मालजामीन मरण पावला असतां त्याच्या पुत्रांनीं मुद्दल मात्र द्यावें, व्याज देऊं नये. पौत्रांनीं तर अगदींच देऊं नये. ह्यास प्रमाण.

हजरजामीन, विश्वासजामीन मृत असतां त्यांचे पुत्रांकडे जामीनकीचा संबंध नाहीं, मालजामिनाचे पुत्रांकडून देववावें.

व्यास– पितामहाचें कर्ज पौत्रानें व जामिनकीबद्दल पित्याचें कर्ज पुत्रानें मुद्दल मात्र द्यावें. पितामहाचें कर्ज प्रपौत्रानें व पितामहाचें जामिनकीबद्दलचें कर्ज पौत्रानें अगदींच देऊं नये; असा निश्चय आहे.

वरील ( व्यास ) वचनाचा भावार्थ असा आहे कीं, जामिनकीव्यतिरिक्त पितामहाचें कर्ज पौत्रानें मुद्दल मात्र द्यावें, व्याज देऊं नये. तसेंच, जामिनकीबद्दलचें पित्याचें कर्ज पुत्रानें मुद्दल मात्र द्यावें. जामिनकीव्यतिरिक्त प्रपितामहाचें कर्ज प्रपौत्रानें, आणि जामिनकीबद्दलचें कर्ज पौत्रानें अगदींच देऊं नये.

परंतु मालजामिनानें कर्जदारापासून तारण घेतलें नसेल तर व प्रपौत्राला वारसाच्या संबंधानें प्रपितामहाचें धन मिळालें नसेल तर त्यानें देऊं नये असा निर्णय समजावा.

**स्मृति**– जर कर्जदार निर्धन आहे आणि मालजामीन सधन आहे तर त्यानें मुद्दल मात्र द्यावें, व्याज देऊं नये.

अशी जी स्मृति आहे तिचीहि व्याख्या अशीच कीं, मालजामीन सधन असतां, ह्मणजे सधन असतां मरण पावला तर त्याच्या पुत्रानें मुद्दल मात्र द्यावें, व्याज देऊं नये.

तारण घेऊन जामीन राहिले असल्यास पुत्रांनींहि जामिनकीचें कर्ज द्यावें.

६ जर हजरजामीन व विश्वासजामीन हे जामिनकीपुरतें तारण घेऊन जामीन झाले असतील तर त्यांच्या पुत्रांनीं त्याच तारणानें जामीनकीचें कर्ज फेडावेंच.

**कात्यायन**– तारण घेऊन हजरजामीन किंवा विश्वासजामीन झाला आणि पुढें तो मरण पावला किंवा दूरदेशीं गेला, तर त्याच्या पुत्रानें त्या तारणांतून जामिनकीचें कर्ज फेडावें. ५४

---

**बहवः स्युर्यदि स्वांशैर्दद्युः प्रतिभुवो धनम् ।**
**एकच्छायाश्रितेष्वेषु धनिकस्य यथारुचि ॥ ५५ ॥**

**यस्मिन्ननेकप्रतिभूसंभवस्तत्र कथं दातव्यमित्याह । यद्येकस्मिन्प्रयोगे द्वौ बहवो वा प्रतिभुवः स्युस्तदर्णं संविभज्य स्वांशेन दद्युः। एकच्छायाश्रितेषु प्रतिभूषु एकस्याधमर्णस्य छाया सादृश्यं तामाश्रिताः एकच्छायाश्रिताः अधमर्णो यथा कृत्स्नद्रव्यदानाय स्थितस्तथा दाने प्रतिभुवोपि प्रत्येकं कृत्स्नदानाय स्थिताः। एवं दर्शने प्रत्यये च तथैकच्छायाश्रितेषु प्रतिभूषु सत्सु धनिकस्योत्तमर्णस्य यथारुचि यथाकामं अतश्च धनिको वित्ताद्यपेक्षायां स्वार्थं यः प्रार्थयते स एव कृत्स्नं दद्यान्नांशतः । तेष्वेकच्छायाश्रितेषु यदि कश्चिद्देशान्तरं गतस्तत्पुत्रश्च संनिहितस्तदा धनिकेच्छया सर्वं दाप्यः । मृते तु कस्मिंश्चित्तत्सुतः स्वपित्र्यंशमवृद्धिकं दाप्यः। यथाह कात्यायनः । एकच्छायां प्रविष्टानां दाप्यो यस्तत्र दृश्यते । प्रोषिते तत्सुतः सर्वं पित्र्यंशं तु मृते सममिति ॥ ५५ ॥**

ज्या व्यवहारीं अनेक जामीन आहेत तेथें कर्ज कसें देववावें तें सांगतो.

**मूलार्थ**– जर बहुत जामीन आहेत तर त्यांनीं आपापल्या अंशाचें कर्ज फेडावें. जर **एकच्छायाश्रित** जामीन आहेत तर सावकार इच्छेप्रमाणें घेऊं शकेल.

**टीकार्थ**–७ जर एका व्यवहारीं दोन किंवा बहुत जामीन आहेत तर त्यांनीं तें कर्ज यथांश विभागून आपापला अंश द्यावा.

एका व्यवहारीं अनेक जामीन असल्यास आपापल्या हिशाचें द्यावें.

जर, एकच्छायाश्रित जामीन ह्मणजे बहुत जामीन राहून कर्जदाराप्रमाणेंच प्रत्येक जामीनानें सर्व कर्ज फेडण्याचा करार केला आहे तर सावकाराच्या इच्छेप्रमाणें, सावकार त्यांतून ज्यापाशीं आपलें द्रव्य मागेल त्यानेंच सर्व द्यावें. अशा स्थळीं यथाविभागकल्पना नाहीं. जर वर सांगितलेल्या जामिनांतून कोणी देशांतरीं गेला आणि त्याचा पुत्र जवळ आहे, ह्यास्तव सावकार आपलें द्रव्य त्यापाशीं मागूं लागेल तर त्यानेंच सर्व व्याजासुद्धां द्रव्य द्यावें. आणि जर त्यांतून कोणी मरण पावेल तर त्याच्या पुत्रानें मुद्दल मात्र द्यावें.

**कात्यायन**– एकच्छायाश्रितांतून जो हजर असेल त्यापासून सावकारानें आपलें कर्ज घ्यावें. जर त्यांतून कोणी परागंदा झाला तर त्याच्या पुत्रापासून सव्याज घ्यावें. आणि मरण पावेल तर त्याच्या पुत्रापासून मुद्दल मात्र घ्यावें. (ह्याप्रमाणें हजरजामीन, विश्वासजामीन ह्यांविषयीं जाणावें.) ९९

---

## प्रतिभूर्दापितो यत्तु प्रकाशं धनिनो धनम् ।
## द्विगुणं प्रतिदातव्यमृणिकैस्तस्य तद्भवेत् ॥ ५६ ॥

प्रातिभाव्ये ऋणदानविधिमुक्त्वा प्रतिभूदत्तस्य प्रतिक्रियाविधिमाह । यद्द्रव्यं प्रतिभूस्तत्पुत्रो वा धनिकेनोपपीडितः प्रकाशं सर्वजनसमक्षं राज्ञा धनिनो दापितो न पुनर्द्वैगुण्यलोभेन स्वयमुपेत्य दत्तं । यथाह नारदः । यं चार्थं प्रतिभूर्दद्याद्धनिकेनोपपीडितः । ऋणिकस्तं प्रतिभुवे द्विगुणं प्रतिदापयेदिति । ऋणिकैरधमर्णैस्तस्य प्रतिभुवस्तद्द्विगुणं प्रतिदातव्यं स्यात् तच्च कालविशेषमनपेक्ष्य सद्य एव द्विगुणं दातव्यं । वचनारंभसामर्थ्यात् । एतच्च हिरण्यविषयं । ननु इदं प्रतिभूवचनं द्वैगुण्यमात्रं प्रतिपादयति । तच्च पूर्वोक्तकालकलाक्रमाबाधनाप्युपपद्यते । यथा जातेष्टिविधानं शुचित्वाबाधेन । अपि च सद्यः सवृद्धिकदानपक्षे पशुस्त्रीणां सद्यः सन्ततसभावान्मूल्यदानमेव प्राप्नोतीति तदसत् । वस्त्रदानहिरण्यानां चतुस्त्रिद्विगुणा परेत्यनेनैव कालकलाक्रमेण द्वैगुण्यादिसिद्धेः द्वैगुण्यमात्रविधाने इदं वचनमनर्थकं स्यात् । पशुस्त्रीणां तु कालक्रमपक्षेपि सन्तत्यभावे स्वरूपदानमेव । यदा प्रतिभूरपि द्रव्यदानानन्तरं कियतापि कालेनाधमर्णेन संघटते तदा सन्ततिरेव संभवत्येव । यद्वा पूर्वसिद्धसन्तत्या सह पशुस्त्रियो दास्यतीति न किंचिदेतत् । अथ प्रातिभाव्यं प्रीतिकृतं च प्रतिभुवा दत्तं प्रीतिदत्तमेव । न च प्रीतिदत्तस्य याचनात्प्राग्वृद्धिरस्ति । यथाह । प्रीतिदत्तं तु यत्किंचिद्वर्द्धते न त्वयाचितम् । याच्यमानमदत्तं चेद्वर्द्धते पञ्चकं शतमिति । अतश्चास्य प्रीतिदत्तस्यायाचितस्यापि दानदिवसादारभ्य यावद्द्विगुणं कालक्रमेण वृद्धिरित्यनेन वचनेनोच्यते इति तदप्यसत् । अस्यार्थस्यास्माद्वचनादप्रतीतेर्द्विगुणं प्रतिदातव्यमित्येतावदिह प्रतीयते । तस्मात्कालक्रममनपेक्ष्यैव द्विगुणं प्रतिदातव्यं वचनारंभसामर्थ्यादिति सुष्ठूक्तं ॥ ५६ ॥

## शाखा १२ वी.

जामिनकीचें कर्ज देण्याचा प्रकार सांगून आतां जामिनानें दिलेलें कर्ज त्याला परत मिळण्याचा प्रकार सांगतो.

**मूलार्थ**– सावकारांचें जें द्रव्य जामिनाकडून प्रसिद्ध देवविलें असेल तें कर्जदाराकडून जामिनाला दुप्पट देववावें.

**टीकार्थ**–१ जें कर्ज सावकाराची तसदी लागल्यामुळें जामिनाकडून किंवा त्याच्या पुत्राकडून सर्वांसमक्ष राजानें देवविलें असेल तें जामिनाला कर्जदाराकडून मुदतीची गरज न धरितां तत्काळ दुप्पट देववावें. परंतु दुपटीच्या लोभानें जर जामीन आपण होऊन सावकारास देईल तर दुप्पट मिळणार नाहीं.

सावकारास जामिनानें दिलेलें द्रव्य कर्जदाराकडून जामिनाला दुप्पट देववावें.

**नारद**– जामीन सावकाराची तसदी लागल्यामुळें कर्जदाराबद्दल जें द्रव्य सावकारास देतो तें कर्जदाराकडून जामिनास दुप्पट देववावें.

हा जो वर दुप्पट देण्याचा प्रकार सांगितला तो तें द्रव्य फार दिवस राहिल्यामुळें दुप्पट द्यावें असें नाहीं, तर तात्कालिक असतांहि दुप्पट देणें प्राप्त आहे; कारण, वचनाची सार्थकता अन्य रीतीनें होत नाहीं. हा दुप्पट देण्याचा प्रकार द्रव्या (सुवर्णादिका)-विषयीं समजावा.

२ **शंका**–वर सांगितलेलें (याज्ञवल्क्य व नारद ह्यांचें) वचन दुप्पट द्रव्य देववावें इतकेंच प्रतिपादन करितें, परंतु त्या दुप्पट देण्याच्या प्रकाराची उपपत्ति पूर्वी ( ३ ऱ्या शाखेंत) सांगितलेल्या मुदतीचा बाध न करितांही होते, जसें:– पुत्र जन्मला असतां ( पुत्रजन्मनिमित्त व पुत्रगतपवित्रत्वरूप फलकामनोद्देशेंकरून ) जातेष्टि करावी असें सांगितलें आहे, ती वृद्ध्याशौच गत झाल्यानंतर ( शिष्ट लोक ) करितात. वृद्ध्याशौच न फिटतां तत्काळ करीत नाहींत.

आणखी तत्काळ सव्याज द्यावें, ह्या पक्षीं पशु, स्त्रिया ह्यांस तत्काळ संततीचा संभव नाहीं ह्मणून केवळ मुद्दलच द्यावें असें प्राप्त होईल.

३ **समाधान**–ही शंका योग्य नाहीं, कारण, “ मुदत टळून फार दिवस झाले तर वस्त्र चौपट, धान्य तिप्पट, आणि नाणें दुप्पट घ्यावें ” असें ( ३ ऱ्या शाखेंत ) सांगितल्यावरून दुप्पट घेण्याचा प्रकार सिद्ध असतां पुनः येथें “ दुप्पट देववावें ” असें ( चालत्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगणें निरर्थक होईल. पशु व स्त्रिया ह्या चिरकाळ राहिल्या असतांही संतति नाहीं तर पशु व स्त्रिया घ्याव्या असें प्राप्तच आहे.

जर जामिनकीचें कर्ज दिल्यानंतर कितीएक दिवसांनीं जामिनाला कर्जदार भेटतो तर त्या वेळेस पशु स्त्रिया ह्यांची संततिही संभवतेच ती घ्यावी, अथवा पूर्वीं झालेल्या संततीसुद्धां त्या पशु स्त्रिया घ्याव्या, असेंही संभवतें; त्या पक्षीं ही शंका युक्त नव्हे.

४ दुसरें असें कीं, जामिनकी प्रीतीनें केली जाते सबब जामिनानें जें दिलें तें स्नेहाच्या पोटीं दिलें गेलें, ह्यास्तव प्रीतिदत्ताचें मागितल्यापूर्वीं व्याज चालू होत नाहीं.

स्मृति– जें कांहीं प्रीतिदत्त आहे, त्याचें मागितल्यावांचून व्याज चालू होत नाहीं. आणि मागत असतां दिलें नाहीं तर शेंकडा पांचप्रमाणें व्याज चालू होतें.

ह्या वचनेंकरून प्रीतिदत्ताला मागितल्याशिवाय व्याज नाहीं. जामिनकीचें द्रव्यही प्रीतिदत्तच होय असें असतांही, व न मागितलें तरी, दिलेल्या दिवसापासून कालक्रमानें दुप्पट होईपर्यंत वाढतेंच. असें ह्या ( चालत्या शाखेच्या १ ल्या अंकांतील ) वचनानें सांगितलें.

५ परंतु असेंही ह्मणणें नीट नाहीं. वर सांगितलेल्या अर्थाची ह्या ( चालत्या शाखेच्या १ ल्या अंकांतल्या ) वचनेंकरून अगदीं प्रतीति होत नाहीं. कर्जदारानें जामिनाला दुप्पट द्यावें इतकें मात्र येथें ( ह्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) अवगत होतें.

६ तस्मात् मुदतीची गरज न धरितांच दुप्पट द्यावें, असें समजावें; कारण, एतदर्थच हें ( १ ल्या अंकाचें ) वचन आहे. ह्यास्तव पूर्वीं सांगितलेला अर्थ बराबर आहे. ५६

---

सन्ततिः स्त्रीपशुष्वेव धान्यं त्रिगुणमेव च ।
वस्त्रं चतुर्गुणं प्रोक्तं रसश्चाष्टगुणस्तथा ॥ ५७ ॥

प्रतिभूदत्तस्य सर्वत्र द्वैगुण्ये प्राप्तेऽपवादमाह । हिरण्यद्वैगुण्यवत्कालानादरेणैव स्त्रीपश्वादयः प्रतिपादितवृद्ध्या दाप्याः । श्लोकस्तु व्याख्यात एव । यस्य द्रव्यस्य यावती वृद्धिः परा काष्ठोक्ता तद्द्रव्यं प्रतिभूदत्तं खादकेन तया वृद्ध्या सह कालविशेषमनपेक्ष्य सद्यो दातव्यमिति तात्पर्यार्थः । यदा तु दर्शनप्रतिभूः संप्रतिपन्ने कालेऽधमर्णं दर्शयितुमसमर्थः तदा तद्गवेषणाय तस्य पक्षत्रयं दातव्यम् । तत्र यदि तं दर्शयति तदा मोक्तव्योऽन्यथा प्रस्तुतं धनं दाप्यः ॥ नष्टास्यान्वेषणार्थं तु दाप्यं पक्षत्रयं परम् । यद्यसौ दर्शयेत्तत्र मोक्तव्यः प्रतिभूर्भवेत् ॥ काले व्यतीते प्रतिभूर्यदि तं नैव दर्शयेत् । निबन्धं दापयेतत्तु प्रेते चैष विधिः स्मृत इति कात्यायनवचनात् । लग्नकविशेषनिषेधश्च तेनैवोक्तः । न स्वामी न च वै शत्रुः स्वामिनाधिकृतस्तथा । निरुद्धो दण्डितश्चैव संदिग्धश्चैव न क्वचित् । नैव रिक्थी न मित्रं च न चैवात्यन्तवासिनः । राजकार्यनियुक्तश्च ये च प्रव्रजिता नराः । न शक्तो धनिने दातुं दण्डं राज्ञे च तत्समम् । जीवन्वापि पिता यस्य तथैवेच्छाप्रवर्तकः । नाविज्ञातो गृहीतव्यः प्रतिभूः स्वक्रियां प्रतीति । संदिग्धोऽभिशस्तः । अत्यन्तवासिनो नैष्ठिकब्रह्मचारिणः ॥ इति प्रतिभूविधिः ॥ धनप्रयोगे विश्वासहेतू द्वौ प्रतिभूराधिश्च । यथाह नारदः । विस्रम्भहेतू द्वावत्र प्रतिभूराधिरेव चेति ॥ तत्र प्रतिभूर्निरूपितः इदानीमाधिर्निरूप्यते आधिनाम गृहीतस्य द्रव्यस्योपरि विश्वासार्थमधमर्णेनोत्तमर्णेऽधिक्रियते आधीयत इत्याधिः सच द्विविधः कृतकालोऽकृतकालश्च पुनश्चैकैकशो द्विविधः गोप्यो भोग्यश्च॥ यथाह नारदः । अधिक्रियत इत्याधिः स विज्ञेयो द्विलक्षणः । कृतकालोऽपनेयश्च यावद्देयोद्यतस्तथा । स पुनर्द्विविधः प्रोक्तो गोप्यो भोग्यस्तथैव चेति । कृते काले

आधानकाल एवामुष्मिन्काले दीपोत्सवादौ मयायमाधिर्मोक्तव्योऽन्यथा तवैवाधिर्भविष्यतीति एवं निरूपिते काले अपनेयः आत्मसमीपं नेतव्यो मोचनीय इत्यर्थः। देयं दानं देयमनतिक्रम्य यावद्देयमुद्यतो नियतः स्थापित इत्यर्थः। यावद्देयमुद्यतो यावद्देयोद्यतः गृहीतधनप्रसर्पणावधिरनिरूपितकाल इत्यर्थः। गोप्यो रक्षणीयः॥५७॥

जामिनानें दिलेलें (द्रव्य) कर्जदाराकडून दुप्पट देववावें असें सर्व द्रव्याविषयीं प्राप्त झालें म्हणून आतां त्याचें बाधक वचन सांगतो.

**मूलार्थ**— स्त्री, पशु ह्यांची संततिच व्याज; धान्य तिप्पट; वस्त्र चौपट; आणि रस आठपट देववावा.

**टीकार्थ**— ७ जसें जामिनानें दिलेलें नाणें ( रुपये वगैरे ) मुदतीची गरज न ठेवितां तत्काळ कर्जदाराकडून जामिनाला दुप्पट देववावें, तसेंच स्त्रिया, पशु इत्यादिक हीं पूर्वीं ( ह्मणजे ३ ऱ्या शाखेच्या २ ऱ्या व ३ ऱ्या अंकांत ) सांगितलेल्या व्याजासुद्धां द्यावीं.

वचनाचा अर्थहि पूर्वींच ( ३ ऱ्या शाखेच्या १ ल्या, २ ऱ्या, व ३ ऱ्या अंकांत ) सांगितला आहे.

जामिनानें दिलेलें कर्जदाराकडून सावकारास तत्काल सव्याज देववावें.

८ सारांश, वरतीं सांगितलेल्या द्रव्यांतून जें कोणतें द्रव्य जामिनानें सावकारास दिलें असेल त्याचें जें पराकाष्ठा व्याज सांगितलें आहे त्या व्याजासुद्धां तें द्रव्य कर्जदाराकडून जामिनास मुदतीची गरज न ठेवितां तत्काळ देववावें.

कर्जदाराचा शोध लावण्यासाठीं हजीर जामिनाला अवकाश द्यावा.

९ जर हजरजामीन कबूल केलेल्या मुदतींत कर्जदाराला हजर करूं शकत नाहीं, तर कर्जदाराचा शोध लावण्यासाठीं हजरजामिनास दीड महिन्याची मुदत द्यावी, त्या मुदतींत जर त्यानें कर्जदाराला हजर केलें तर त्याला जामिनकीपासून सोडावें, नाहीं तर त्याकडून कर्जदाराबद्दल सावकाराचें धन देववावें.

**कात्यायन**— नाहींसा झालेल्या कर्जदाराचा शोध लावण्यासाठीं जामिनास दीड महिन्याचा अवकाश द्यावा. जर त्यानें त्या मुदतींत कर्जदारास हजर केलें तर जामीन सोडून द्यावा. मुदतीच्या आंत हजर न करील तर त्याकडून **विवादास्पदीभूत** द्रव्य देववावें. व कर्जदार मरण पावला असतांहि हाच प्रकार जाणावा.

जामिनकीविषयीं कोण कोण घेऊं नयेत तेंहि कात्यायनच सांगतो.

जामिनकीविषयीं वर्ज कोणते ते.

**कात्यायन**—१० धनी, शत्रु, धन्यानें हरएक कामांत नेमलेला, बंदिखान्यांत पडलेला, दंड झालेला, ज्यावर दोषाचा संशय आलेला आहे तो, वारीस, मित्र, नैष्ठिक ब्रह्मचारी, व राजकार्यनियुक्त, संन्यासी आणि जो **विवादास्पदीभूत** द्रव्य व तितका राजदंड देण्यास समर्थ नाहीं तो, व जीवत्पितृक, स्वेच्छाचारी, आणि जो कोणास ठाऊक नाहीं तो, हे स्वार्थसाधनाविषयीं जामीन घेऊं नयेत.

---

## गहाणाविषयीं.

### शाखा १३ वी.

दिलेलें कर्ज परत येण्याविषयीं विश्वासकारणें दोन आहेत. जामीन आणि **गहाण.** पैकीं जामिनाचें निरूपण केलें. आतां गहाणाचें निरूपण करितो.

**नारद**— कर्ज देण्याविषयीं विश्वासकारणें दोन आहेत. जामीन आणि गहाण.

गहाण म्हणजे काय.

१ आधि ( गहाण ) म्हणजे कर्जदारानें घेतलेलें द्रव्य त्याकडून परत येण्याचा विश्वास सावकाराला येण्यासाठीं कर्जदार सावकाराच्या स्वाधीन जो माल करितो तो.

गहाण चार प्रकारचें.

२ तो आधि दोन प्रकारचा; कृतकाल (मुदतीचा) आणि अकृतकाल (बिनमुदतीचा). हाही प्रत्येक आणखी दोन प्रकारचा; गोप्य आणि भोग्य.

**नारद**— अधीन म्हणजे विश्वास पटण्यासाठीं जो माल स्वाधीन किंवा ताब्यांत केला जातो तो. तो दोन प्रकारचा, **कृतकालोपनेय व यावद्देयोद्यत**; तो प्रत्येक आणखी दोन प्रकारचा; **गोप्य** आणि **भोग्य. कृतकालोपनेय** ह्मणजे गहाण ठेवितेवेळेसच अमुक वेळेस ह्मणजे दिवाळी वगैरे उत्साहकाळीं मी हें गहाण सोडवीन, न सोडवीन तर हें गहाण तुझेंच होईल असा करार केलेल्या मुदतीस सोडविलें जातें तें.

**यावद्देयोद्यत** ह्मणजे घेतलेलें द्रव्य परत देईन तेव्हां आपलें गहाण सोडवीन, अमुकच वेळीं सोडवीन अशी ज्यास मुदत केली नाहीं असें जें गहाण तें.

**गोप्य** ह्मणजे जतन करावयाजोगें जें गहाण तें ( याचा उपभोग घेऊं नये ). **भोग्य** ह्मणजे उपभोग घ्यावयाजोगें जें गहाण तें. ५७

---

**आधिः प्रणश्येद्द्विगुणे धने यदि न मोक्ष्यते।**
**काले कालकृतो नश्येत्फलभोग्यो न नश्यति ॥ ५८ ॥**

एवं चतुर्विधस्याधेर्विशेषमाह। प्रयुक्ते धने स्वकृतया वृद्ध्या कालक्रमेण द्विगुणीभूते यद्याधिरधमर्णेन द्रव्यदानेन न मोक्ष्यते तदा नश्यति अधमर्णस्य धनं प्रयोक्तुः स्वं भवति। कालकृतः कृतकालः आहिताग्न्यादिषु पाठात्कालशब्दस्य पूर्वनिपातः स तु काले निरूपिते प्राप्ते नश्येत् द्वैगुण्यात् प्रागूर्ध्वं वा। फलभोग्यः फलं भोग्यं यस्यासौ फलभोग्यः क्षेत्रारामादिः स कदाचिदपि न नश्यति। कृतकालस्य गोप्यस्य भोग्यस्य च तत्कालातिक्रमे नाश उक्तः। काले कालकृतो नश्येदिति। अकृतकालस्य भोग्यस्य नाशाभाव उक्तः फलभोग्यो न नश्यतीति पारिशेष्यादाधिः प्रणश्येदित्येतदकृतकालगोप्याधिविषयमवतिष्ठते द्वैगुण्यातिक्रमेण निरूपितकालातिक्रमेण च विनाशे चतुर्दशदिवसप्रतीक्षणं कर्तव्यं बृहस्पतिवचनात्। हिरण्ये द्विगुणीभूते पूर्णे का-

ले कृतावधेः। बन्धकस्य धनी स्वामी द्विःसप्ताहं प्रतीक्ष्य च। तदन्तरा धनं दत्त्वा ऋणी बन्धमवाप्नुयादिति॥ नन्वाधिः प्रणश्येदित्यनुपपन्नं। अधमर्णस्य स्वत्वनिवृत्तिहेतोर्दानविक्रयादेरभावात्। धनिनश्च स्वत्वहेतोः प्रतिग्रहक्रयादेरभावात् मनुवचनविरोधाच्च। न चाधेः कालसंरोधान्निसर्गोऽस्ति न विक्रय इति। कालेन संरोधः कालसंरोधश्चिरकालमवस्थानं तस्मात्कालसंरोधाच्चिरकालावस्थानादाधेर्न निसर्गोऽस्ति नान्यत्राधीकरणमस्ति। न च विक्रयः। एवमाधीकरणविक्रयप्रतिषेधाद्धनिनः स्वत्वाभावोऽवगम्यत इति। उच्यते। आधीकरणमेव लोके सोपाधिकः स्वत्वनिवृत्तिहेतुः आधिस्वीकारश्च सोपाधिकः। स्वत्वापत्तिहेतुः प्रसिद्धः तत्र धनद्वैगुण्ये निरूपितकाले प्राप्ते च द्रव्यदानस्यात्यन्तनिवृत्तेरनेन वचनेनाधमर्णस्यात्यन्तिकी स्वत्वनिवृत्तिः उत्तमर्णस्य चात्यन्तिकं स्वत्वं भवति। न च मनुवचनविरोधः यतो न त्वेवाधौ सोपकारे कौसीदीं वृद्धिमाप्नुयादिति भोग्याधिं प्रस्तुत्येदमुच्यते। न चाधेः कालसंरोधान्निसर्गोऽस्ति न विक्रय इति। भोग्यस्याधेश्चिरकालावस्थानेऽप्याधीकरणविक्रयनिषेधेन धनिनः स्वत्वं न भवति। इहाप्युक्तं। फलभोग्यो न नश्यतीति गोप्याधौ तु पृथगारब्धं मनुना। न भोक्तव्यो बलादाधिर्भुञ्जानो वृद्धिमुत्सृजेदिति। इहापि वक्ष्यते। गोप्याधिभोगे नो वृद्धिरिति। आधिः प्रणश्येद्द्विगुण इति तु गोप्याधिं प्रत्युच्यते इति सर्वमविरुद्धम्॥ ५८॥

असें जें चार प्रकारचें गहाण त्याविषयीं विशेष सांगतो.

**मूलार्थ**— धन व्याजासुद्धां दुप्पट झालें असतां गहाण सोडविलें नाहीं तर डुलतें. मुदत करून ठेविलेलें गहाण मुदत टळली असतां डुलतें. भोग्यगहाण कधीं डुलत नाहीं.

**टीकार्थ**— ३ व्याजीं दिलेलें द्रव्य आपण करार केलेल्या व्याजानें कालेंकरून दुप्पट झालें असतांहि जर कर्जदार द्रव्य देऊन आपलें गहाण सोडवीत नाहीं तर तें डुलतें.

दाम दुप्पट झाली असतां गहाण डुलतें.

४ **कृतकाल** गहाण दाम दुप्पट होण्यापूर्वीं किंवा पुढेंही असो, करार केलेली मुदत टळली ह्मणजे डुलतें.

मुदतीचा करार केलेलें गहाण मुदत टळली ह्मणजे डुलतें.

५ ज्या गहाणाचें उत्पन्न भोगिलें जातें तें गहाण (बागाईत जिराईत वगैरे) कधींही डुलत नाहीं.

भोग्य गहाण कधीं डुलत नाहीं.

६ **कृतकाल** गहाण, गोप्य असो किंवा भोग्य असो त्याची मुदत टळली म्हणजे तें डुलतें असें ४ थ्या अंकांत सांगितलें, आणि अकृतकाल असें भोग्य गहाण कधीं डुलत नाहीं असें ५ व्या अंकांत सांगितलें. अर्थात् ३ रा अंक **अकृतकाल गोप्य गहाणाविषयीं जाणावा.**

७ दाम दुप्पट झाल्यावर, व कराराची मुदत टळल्यावर जरी गहाण डुलतें, तरी सावकारानें आणखी चौदा दिवस वाट पाहावी.

मुदत टळल्यावर गहाण डुलतें तरी सावकारानें चौदा दिवस वाट पहावी.

बृहस्पति– दामदुपटीची मुदत टळल्यावर व कराराची मुदत टळल्यावर सावकारानें दोन सप्तकं प्रतीक्षा करावी; त्यामध्यें जर कर्जदार द्रव्य देईल तर तो आपलें गहाण परत पावेल.

८ शंका– वर (३ ऱ्या व ४ थ्या अंकांत) गहाण डुलण्याचा प्रकार सांगितला, त्याची उपपत्ति होत नाहीं. कारण, गहाणावरील कर्जदाराची सत्ता जाण्याचें हेतुभूत जें दान विक्रय इत्यादिक तें घडलें नाहीं, व सावकाराचें सत्ता उत्पन्न होण्याचें कारणभूत जें प्रतिग्रह क्रय इत्यादिक तेंहि सावकाराकडून घडलें नाहीं, आणि ( खालीं सांगितलेल्या ) मनुवचनासही विरोध येतो.

मनु– गहाण बहुकाळ राहिल्यामुळें तें दुसऱ्या ठिकाणीं गहाण ठेवावयास योग्य होत नाहीं व त्याचा विक्रयहि होत नाहीं.

असा दुसऱ्या ठिकाणीं गहाण ठेवण्याचा व विकण्याचा निषेध सांगितल्यावरून त्यावर सावकाराची सत्ता नाहीं असें अवगत होतें.

समाधान– गहाण ठेवणें हेंच लोकांत सोपाधिक स्वत्वनिवृत्तीचें कारण आहे. आणि गहाण ठेवणें हें सोपाधिक स्वत्वोत्पत्तीचें कारण प्रसिद्ध आहे. त्यांत दामदुप्पट झाली व कराराची मुदत टळली ह्मणून ( कर्जदारानें सावकाराचें ) द्रव्य देणें कुंठित झालें. यास्तव ( गहाण डुलण्याविषयींचें ) ह्या याज्ञवल्क्यवचनेंकरून त्या गहाणावरील कर्जदाराची अगदींच सत्ता जाऊन सावकाराची सत्ता उत्पन्न होते, मनुवचनासहि विरोध येत नाहीं. कारण, “ भोग्य गहाणाविषयीं तर रुपयांला व्याज नाहीं ” असा भोग्य गहाणाविषयीं उपक्रम करून भोग्य गहाण बहुत वर्षें राहिलें तरी त्याचें दुसऱ्या सावकारापाशीं गहाण ठेवणें किंवा विक्रय होत नाहीं; असा निषेध ( ८ व्या अंकांत ) सांगितल्यानें त्या सावकाराची त्यावर सत्ता नाहीं असें सिद्ध झालें. तसें एथें ( ९ व्या अंकांत )हि सांगितलें आहे कीं, “ ज्या गहाणाचें उत्पन्न भोगिलें जातें तें गहाण कधीं डुलत नाहीं.”

गोप्य गहाणाविषयीं तर मनु निराळ्या प्रकारें सांगतो.

मनु–गोप्य गहाण बलात्कारानें भोगूं नये, भोगिलें असतां व्याज मिळणार नाहीं.

एथेंहि पुढें ( १० व्या अंकाचे वचनांत ) सांगितलें आहे कीं, “ गोप्य गहाण भोगिलें असतां व्याज मिळणार नाहीं.” तस्मात् ३ रा अंक तर गोप्य गहाणाच्या उद्देशानें सांगितला आहे असें समजून सर्व निर्दोष आहे असें जाणावें. ५८

---

**गोप्याधिभोगे नो वृद्धिः सोपकारेऽथ हापिते ।**
**नष्टो देयो विनष्टश्च दैवराजकृतादृते ॥ ५९ ॥**

किंच गोप्याधेस्ताम्रकटाहादेरुपभोगेन न वृद्धिर्भवति अल्पेऽप्युपभोगे महत्यपि वृद्धिर्हातव्या । समयातिक्रमात् । तथा सोपकारे उपकारे उपकारकारिणि बलीवर्दताम्रकटाहादौ भोग्याधौ सवृद्धिके हापिते हानिं व्यवहाराक्षमत्वं गमिते नो वृद्धिरिति संबन्धः । नष्टो विकृतिं गतः ताम्रकटाहादिश्छिद्रभेदनादिना पूर्ववत्कृत्वा देयः । तत्र गोप्याधिर्नष्टश्चेत्पूर्ववत्कृत्वा देयः । उपभुक्तोऽपि चेद्वृद्धिरपि हातव्या भोग्याधिर्यदि नष्टस्तदा पूर्ववत्कृत्वा देयः । वृद्धिसद्भावे वृद्धिर्हातव्या । विनष्टः आत्यन्तिकं नाशं प्राप्तः सोपि देयो मूल्यादिद्वारेण तद्दाने सवृद्धिकं मूल्यं लभते । यदा न ददाति तदा मूलनाशः । विनष्टे मूलनाशः स्याद्दैवराजकृताद्दृते इति नारदवचनात् । दैवराजकृताद्दृते दैवमग्न्युदकदेशोपप्लवादि । देवकृताद्विनाशाद्विना । तथा स्वापराधरहिताद्राजकृतात् दैवराजकृते तु विनाशे सवृद्धिकं मूल्यं दातव्यम् । अधमर्णेनाध्यन्तरं वा यथाह । स्रोतसापहृते क्षेत्रे राज्ञा चैवापहारिते । आधिरन्योऽथ कर्तव्यो देयं वा धनिने धनमिति । तत्र स्रोतसापहृते इति दैवकृतोपलक्षणम् ॥ ५९ ॥

**मूलार्थ**— गोप्य गहाण उपभोगिलें असतां व्याज नाहीं, आणि उपकारक ( भोग्य ) गहाण निरुपयोगी केलें असतांहि व्याज मिळणार नाहीं, व गहाण राजिकदैविक उपद्रवावांचून जायां झालें, किंवा गहाळलें गेलें तर भरून द्यावें.

**टीकार्थ**— १० गोप्य गहाण ह्मणजे तांब्याची कढई, भांडीं, वगैरे गहाण, तें उपभोगिलें असतां व्याज मिळणार नाहीं. जरी उपभोग अल्प झाला आणि व्याज पुष्कळ झालें तरी व्याज बुडतें. कारण, त्यानें कराराचें उल्लंघन केलें म्हणून. तसेंच बैल, कढई वगैरे भोग्य गहाण निरुपयोगी केलें असतां व्याज मिळणार नाहीं.

गोप्य गहाण, उपभोगिलें असतां व्याज मिळणार नाहीं.

११ त्यांत कढई वगैरे गोप्य गहाणाची फूट तूट झाल्यास सावकारानें तें पूर्वींप्रमाणें करून द्यावें, आणि तें वापरलें असतां व्याज न घेतां पूर्वींप्रमाणें करून द्यावें.

गोप्य गहाणाची फूट तूट झाल्यास तें नीट करून द्यावें.

१२ भोग्य गहाण ( कढई, बैल वगैरे ) जर जायां झालें तर जशाचें तसें करून द्यावें. आणि व्याजाची कबुलात असल्यास व्याज मात्र घेऊं नये.

भोग्य गहाण जायां झाल्यास पहिल्याप्रमाणें करून द्यावें.

१३ जर गहाण ( सावकारापासून ) हरवलें, किंवा अगदींच नाश पावलें, तर तसेंच दुसरें घेऊन द्यावें. किंवा मोल द्यावें. मोल दिलें असतां सावकारानें आपले सव्याज मुद्दल रुपये घ्यावे. आणि जर तें हरवलेलें वगैरे गहाण सावकार भरून देत नाहीं तर त्यास मुद्दलही ( रुपये ) मिळणार नाहींत.

गहाण सावकारापासून हरवलें किंवा नाश पावलें तर तसेंच दुसरें गहाण द्यावें.

**नारद**—सावकारापासून गहाण नष्ट झालें असतां सावकारास मुद्दल देखील मिळणार नाहीं, परंतु तें गहाण, दैविक किंवा राजिक ह्या उपद्रवावांचून नष्ट झालें असल्यास.

दैविक उपद्रव ह्मणजे अग्नि, उदक, देश ह्यांपासून जो झालेला उपद्रव तो. तसा राजिक ह्मणजे आपल्या अन्यायावांचून आकस्मिक झालेला जो राजसंबंधी उपद्रव तो. ह्यांकडून गहाण मालाचा नाश झाला असतां कर्जदारानें सव्याज मुद्दल द्यावें, किंवा दुसरें गहाण ठेवावें.

राजिक दैविक उपद्रवामुळें गहाणाचें नुकसान झाल्यास तें मालकाचें नुकसान.

**स्मृति**— नदीला पूर येऊन क्षेत्र वाहावलें किंवा राजानें हरण केलें ( त्याबरोबर गहाणाहि नाश पावलें ) तर सावकारास दुसरें गहाण द्यावें किंवा त्याचें द्रव्य द्यावें.

ह्या वरच्या स्मृतिवचनांत "नदीला पूर येऊन क्षेत्र वाहावलें" असें जें ह्मटलें तें साधारण रीत्या सर्व दैविक उपद्रवाचें उपलक्षण जाणावें. ५९

---

**आधेः स्वीकरणात्सिद्धीरक्ष्यमाणोऽप्यसारताम् ।**
**यातश्चेदन्य आधेयो धनभाग्वा धनी भवेत् ॥ ६० ॥**

अपि च आधेर्भोग्यस्य गोप्यस्य च स्वीकरणादुपभोगादाधिग्रहणसिद्धिर्न साक्षिलेख्यमात्रेण नाप्युद्देशमात्रेण । यथाह नारदः । आधिस्तु द्विविधः प्रोक्तो जङ्गमः स्थावरस्तथा । सिद्धिरस्योभयस्यापि भोगो यद्यस्ति नान्यथेति । अस्य च फलं आधौ प्रतिग्रहे क्रीते पूर्वा तु बलवत्तरेति । स्वीकारान्त क्रियापूर्वा बलवती स्वीकाररहिता तु पूर्वापि न बलवतीति । स चाधिः प्रयत्नेन रक्ष्यमाणोऽपि कालवशेन यद्यसारतामविकृत एव सवृद्धिकमूल्यद्रव्यापर्याप्ततां गतस्तदाधिरन्यः कर्तव्यो धनिने धनं वा देयम् । रक्ष्यमाणोऽप्यसारतामिति वदताधिः प्रयत्नेन रक्षणीयो धनिनेति ज्ञापितम् ॥ ६० ॥

**मूलार्थ**— जें गहाण ठेविलें त्याचा स्वीकार (उपभोग) झाल्यास त्याची सिद्धि (पूर्णता) होते व तें गहाण जतन करून ठेविलें असतांहि निःसार होईल तर सावकाराला दुसरें गहाण द्यावें किंवा द्रव्य द्यावें.

**टीकार्थ**— १४ गोप्य किंवा भोग्य गहाणाची सिद्धि, त्या गहाणाचा स्वीकार ह्मणजे उपभोग यापासून होते; केवळ साक्षीलेखाकडून होत नाहीं व केवळ सांगण्यावरूनही सिद्धि होत नाहीं.

**नारद**— जंगम आणि स्थावर असें दोन प्रकारचें गहाण सांगितलें आहे, त्या दोहों प्रकारच्या गहाणाची सिद्धि उपभोगानें होते, अन्यथा होत नाहीं.

• उपभोगद्वारा गहाणाच्या सिद्धीचें फळ ( काय तें दाखवितो )

१५ गहाण, प्रतिग्रह, आणि क्रय ह्या व्यवहारीं पूर्व पक्षाचें (वादीचें) प्रमाण (पुरावा) बलवत्तर असें ( पूर्वी दुसऱ्या प्रकरणाच्या ८ व्या शाखेच्या मूळ वचनांत) सांगितलें आहे. ह्मणजे पूर्वपक्ष जर भोगवट्यासहित आहे तरच तो सबळ प्रमाण होतो, पूर्वपक्ष असूनहि तो भोगवट्याविरहित असेल तर सबळ प्रमाण होऊं शकत नाहीं.

गहाण, प्रतिग्रह, क्रय ह्या व्यवहारीं झालेला व्यवहार सबळ परंतु भोगवटा पाहिजे.

१६ तें गहाण जतन करीत असतांहि फार दिवस ठेविल्यामुळें जर जीर्ण, ह्मणजे सव्याज मुद्दल फिटावयापुरता ऐवज त्यांत नाहीं असें झालें तर कर्जदारानें दुसरें गहाण द्यावें अथवा सावकाराचा पैका द्यावा.

गहाण सावकारानें जतन केलें असतां जीर्ण झाल्यास मालकानें दुसरें गहाण द्यावें.

असें सांगितल्यावरून सावकारानें गहाण काळजीनें जतन ठेवावें असें सुचविलें. ६०

## चरित्रबन्धककृतं सवृद्ध्या दापयेद्धनम् ।
## सत्यङ्कारकृतं द्रव्यं द्विगुणं प्रतिदापयेत् ॥ ६१ ॥

आधिः प्रणश्येद्द्विगुणे इत्यस्यापवादमाह । चरित्रं शोभनाचरितं चरित्रेण बन्धकं चरित्रबन्धकं तेन यद्द्रव्यमात्मसात्कृतं पराधीनं वा कृतं । एतदुक्तं भवति । धनिनः स्वच्छाशयत्वेन बहुमूल्यमपि द्रव्यमाधीकृत्याधमर्णेनाल्पमेव द्रव्यमात्मसात्कृतं । यदि वाधमर्णस्य स्वच्छाशयत्वेनाल्पमूल्यमाधिं गृहीत्वा बहुद्रव्यमेव धनिनाधमर्णाधीनं कृतमिति । तद्धनं नृपो वृद्ध्या सह दापयेत् । अयमाशयः । एवंरूपं बन्धकं द्विगुणीभूतेऽपि द्रव्ये न नश्यति किं तु द्रव्यमेव द्विगुणं दातव्यमिति। तथा सत्यङ्कारकृतं करणं कारः । भावे घञ् । सत्यस्य कारः सत्यङ्कारः कारेसत्यागदस्येतिमुम् । सत्यङ्कारेण कृतं सत्यङ्कारकृतम् । अयमभिसन्धिः यदा बन्धकार्पणसमय एवेत्थं परिभाषितं द्विगुणीभूतेऽपि द्रव्ये मया द्विगुणं द्रव्यमेव दातव्यं नाधिनाश इति तदा तद्द्विगुणं दापयेदिति अन्योर्थः। चरित्रमेव बन्धकं चरित्रबन्धकं चरित्रशब्देन गङ्गास्नानाग्निहोत्रादिजनितमपूर्वमुच्यते यत्र तदेवाधीकृत्य यद्द्रव्यमात्मसात्कृतं तदा तत्र तदेव द्विगुणीभूतं दातव्यं नाधिनाश इति । आधिप्रसङ्गादन्यदुच्यते । सत्यङ्कारकृतमिति । क्रयविक्रयादिव्यवस्थानिर्वाहाय यदङ्गुलीयकादि परहस्ते कृतं तद्व्यवस्थातिक्रमे द्विगुणं दातव्यम् । तत्रापि येनाङ्गुलीयकाद्यर्पितं स एव चेद्व्यवस्थातिवर्ती तेन तदेव दातव्यम् । इतरश्चेद्व्यवस्थातिवर्ती तदा तदेवाङ्गुलीयकादि द्विगुणं प्रतिदापयेदिति ॥ ६१ ॥

### शाखा १४ वी.

दामदुप्पट झाली असतां गहाण सोडविलें नाहीं तर तें गहाण बुडतें असें ( १३ व्या शाखेच्या ३ ऱ्या अंकाचे मूळ वचनांत ) जें सांगितलें त्याचा अपवाद सांगतो.

मूलार्थ– चरित्रच गहाण ठेविलें आहे तर सव्याज रुपयेच देववावे आणि सत्यंकार[1] केलेलें द्रव्यही दुप्पट देववावें.

टीकार्थ– १ चरित्रच गहाण ह्मणजे सावकाराच्या पतीवर, कुळानें थोडकें द्रव्य घेऊन

१ सत्यंकार शब्दाचा एक अर्थ, खालीं २ ऱ्या अंकांत पहावा, व दुसरा अर्थ ४ थ्या अंकांत पहावा.

कर्जापेक्षां कमजास्त किमतीचें गहाण दामदुप्पट झाली तरी डुलत नाहीं.

फार किमतीचें गहाण ठेविलें तें, अथवा कुळाच्या पतीवर सावकारानें अधिक द्रव्य देऊन थोडक्या किमतीचें गहाण ठेविलें तें त्या गहाणाचें द्रव्य राजानें सव्याज देववावें. ह्मणजे आशय असा कीं, सदरहू गहाण दामदुप्पट झाली तरी डुलत नाहीं, दामदुप्पटच द्यावी.

२ तसेंच गहाण ठेवते वेळेसच करार केला कीं, दामदुप्पट झाली तरी दामदुप्पटच देईन, पण गहाण डुलणार नाहीं, तर ती दामदुप्पटच देववावी.

अथवा ( मूळांतील ) चरित्रपदाचा दुसरा अर्थ.

३ चरित्र म्हणजे गंगास्नान, अग्निहोत्र इत्यादिकांपासून झालेलें पुण्य, तें पुण्यच ज्या व्यवहारीं गहाण ठेवून कांहीं द्रव्य घेतलें, तर तें द्रव्य दामदुप्पट देववावें, गहाण डुलणार नाहीं.

पुण्यच गहाण ठेविलें तर तें डुलत नाहीं.

गहाणाच्या प्रसंगसंगतीनें दुसरेंहि सांगतो.

४ कोणी एकानें माल खचित केला आणि त्याच्या इसाराबद्दल आंगठी वगैरे दिली. नंतर जर इसार देणारा लबाडीस आला तर त्याचा इसार बुडतो, आणि जर इसार घेणारा लबाडीस आला तर त्यानें इसाराची दुप्पट द्यावी. ६१

---

**उपस्थितस्य मोक्तव्य आधिस्तेनोऽन्यथा भवेत् ।**
**प्रयोजकेऽसति धनं कुले न्यस्याधिमाप्नुयात् ॥ ६२ ॥**

**किंच। धनदानेनाधिमोक्षणायोपस्थितस्याधिर्मोक्तव्यो धनिना न वृद्धिलोभेन स्थापयितव्यः अन्यथा अमोक्षणे स्तेनः चौरवद्दण्ड्यो भवति । असन्निहिते पुनः प्रयोक्तरि कुले तदाप्तहस्ते सवृद्धिकं धनं निधायाधमर्णकः स्वीयं बन्धकं गृह्णीयात् ॥६२॥**

**मूलार्थ–** कर्जदार गहाण सोडवूं इच्छितो तर तें सावकारानें मोकळें करून द्यावें, अन्यथा तो चोर ठरेल. सावकार सन्निध नसल्यास त्याचे आप्तापाशीं सव्याज पैका देऊन गहाण परत घ्यावें.

**टीकार्थ–** ५ कर्जदार द्रव्य देऊन गहाण सोडविण्यास सिद्ध झाल्यावर सावकारानें गहाण मोकळें करावें, व्याजाच्या लोभानें ठेवूं नये. मोकळें न केल्यास चोराप्रमाणें तो दंडास योग्य होतो.

कर्जदार ऐवज देऊन गहाण सोडवीत असतां सावकार देत नाहीं तर दंड.

६ कर्जदार गहाण सोडवायास तयार असतां सावकार सन्निध नसेल तर सावकाराचे जे आप्त असतील त्यांजपाशीं सव्याज मुद्दल देऊन कर्जदारानें आपलें गहाण सोडवावें. ६२

---

**अथ प्रयोक्ताप्यसन्निहितस्तदाप्ताश्च धनस्य ग्रहीतारो न सन्ति यदि वा असंनिहिते प्रयोक्तर्याधिविक्रयेण धनदित्साधमर्णस्य तत्र किं कर्तव्यमित्यपेक्षित आह ।**

**तत्कालकृतमूल्यो वा तत्र तिष्ठेदवृद्धिकः ।**

**तस्मिन्काले यत्तस्याधेर्मूल्यं तत्परिकल्प्य तत्रैव धनिनि तमाधिं वृद्धिरहितं स्थापयेन्न तत ऊर्ध्वं विवर्द्धते यावद्धनी धनं गृहीत्वा तमाधिं मुञ्चति यावद्वा तन्मूल्यद्रव्यमृणिने प्रवेशयति ।**

आतां सावकार व त्याचे आप्तही सन्निध नसतील अथवा सावकार सन्निध आहे, पण कर्जदार तेंच गहाण विकून सावकाराचें द्रव्य देऊं इच्छितो तर कसें करावें ह्याविषयीं सांगतो.

**मूलार्थ–** अथवा त्याच वेळेस गहाणाची किंमत ठरवून सावकारापाशीं ठेविलें असतां व्याज बंद होतें.

**टीकार्थ–** ७ त्याच वेळेस त्या गहाणाची किंमत ठरवून त्या सावकारापाशींच व्याज खुंटवून ठेवावें, त्यास पुढें व्याज नाहीं. ह्मणजे जोंपर्यंत सावकार आपली रकम पावून गहाण परत देईल अथवा जोंपर्यंत ऐवज फिटून राहिलेली किंमत कर्जदाराला मिळेल तोंपर्यंत.

कर्जदार गहाण विकून सावकाराचा ऐवज देण्यास इच्छितो तर त्याविषयीं.

**यदा तु द्विगुणीभूतेऽपि धने द्विगुणं धनमेव ग्रहीतव्यम् ।न त्वाधिनाश इति विचारितमृणग्रहणकाल एव तदा द्विगुणीभूते द्रव्ये असन्निहिते चाधमर्णे धनिना किं कर्तव्यमित्यत आह ।**

**विना धारणिकाद्वापि विक्रीणीत ससाक्षिकम् ॥ ६३ ॥**

**धारणिकादधमर्णाद्विना अधमर्णे असन्निहिते साक्षिभिस्तदाप्तैश्च सह तमाधिं विक्रीय तद्धनं गृह्णीयाद्धनी वा शब्दो व्यवस्थितविकल्पार्थः। यदृणग्रहणकाले द्विगुणीभूतेऽपि धने धनमेव गृहीतव्यम् न त्वाधिनाश इति न विचारितम् । तदा आधिः प्रणश्येद्द्विगुण इत्याधिनाशः । विचारिते त्वयं पक्ष इति ॥ ६३ ॥**

जरी दामदुप्पट झाली तरी दामदुप्पटच घ्यावी, गहाण डुलणार नाहीं असा कर्ज घेतेवेळेसच करार ठरला आहे आणि पुढें दामदुप्पट झाली असतांहि कर्जदार सन्निध नाहीं तर सावकारानें काय करावें तें सांगतो.

**मूलार्थ–** कर्जदार सन्निध नसल्यासहि गहाण साक्षींच्या समक्ष विकावें.

**टीकार्थ–** ८ दामदुप्पट झाली आणि कर्जदार सन्निध नाहीं, तर सावकारानें कर्जदाराच्या आप्तांसमक्ष व ससाक्ष तें गहाण विकून आपला ऐवज फेडून घ्यावा. दामदुप्पट झाली असतां दामदुप्पट घ्यावी, गहाण डुलणार नाहीं, असा जर कर्ज घेतेवेळेस करार केलेला नसेल तर पूर्वी ( १३ व्या शाखेच्या ३ ऱ्या अंकांत ) सांगितल्याप्रमाणें गहाण डुलतें. आणि कदाचित् तसा करार केला असल्यास वरच्या वचनाप्रमाणें न्याय करावा. ६३

**यदा तु द्विगुणीभूतमृणमाधौ तदा खलु ।**
**मोच्य आधिस्तदुत्पन्ने प्रविष्टे द्विगुणे धने ॥ ६४ ॥**

भोग्याधौ विशेषमाह । यदा प्रयुक्तं धनं स्वकृतया वृद्ध्या द्विगुणीभूतं तदाधौ कृते तदुत्पन्ने आध्युत्पन्ने द्रव्ये द्विगुणे धनिनः प्रविष्टे धनिनाधिर्मोक्तव्यः । यदि वादावेवाधौ दत्ते द्विगुणीभूते द्रव्ये त्वयाधिर्मोक्तव्य इति परिभाषया कारणान्तरेण वा भोगाभावेन यदा द्विगुणीभूतमृणं तदाधौ भोगार्थं धनिनि प्रविष्टे तदुत्पन्ने द्रव्ये द्विगुणे सत्याधिर्मोक्तव्यः । अधिकोपभोगे तदपि देयम् । सर्वथा सवृद्धिकमूल्यापाकरणार्थाध्युपभोगविषयमिदं वचनम् । तमेनं क्षयाधिमाचक्षते लौकिकाः यत्र तु वृद्ध्यर्थ एवाध्युपभोग इति परिभाषा । तत्र द्वैगुण्यातिक्रमेऽपि यावन्मूल्यदानं तावदुपभुङ्क्त एवाधिं । एतदेव स्पष्टीकृतं बृहस्पतिना । ऋणी बन्धमवाप्नुयात् । फलभोग्यं पूर्णकालं दत्त्वा द्रव्यं तु सामकम् । यदि प्रकर्षितं तत्स्यात्तदा न धनभाग्धनी । ऋणी च न लभेद्बन्धं परस्परमतं विनेति । अस्यार्थः । फलं भोग्यं यस्यासौ फलभोग्यः बन्धक आधिः स च द्विविधः सवृद्धिकमूल्यापाकरणार्थो वृद्धिमात्रार्थापाकरणार्थश्च तत्र च सवृद्धिमूल्यापाकरणार्थं बन्धं पूर्णकालं पूर्णः कालो यस्यासौ पूर्णकालस्तमाप्नुयादृणी । यदा सवृद्धिकं मूल्यं फलद्वारेण धनिनः प्रविष्टं तदा बन्धमाप्नुयादित्यर्थः । वृद्धिमात्रापाकरणार्थं तु बन्धकं सामकं दत्वाप्नुयादृणी । समं मूल्यं सममेव सामकम् ।

अस्यापवादमाह । यदि प्रकर्षितं तत्स्यात्परस्परमतं विना । तद्बन्धकं प्रकर्षितमतिशयितं वृद्धेरप्यधिकफलं यदि स्यात्तदा न धनभाग्धनी । सामकं न लभते धनी मूल्यमदत्वैवर्णी बन्धमाप्नुयादिति यावत् । अथ त्वप्रकर्षितं तद्बन्धकं वृद्ध्येप्यपर्याप्तम् तदा सामकं दत्वापि धनं न लभेताधमर्णः वृद्धिशेषमदत्वैव लभेतेत्यर्थः । पुनरुभयत्रापवादमाह । उत्तमाधमर्णयोः परस्परानुमत्यभावे यदि प्रकर्षितमित्याद्युक्तं परस्परानुमतौ तूत्कृष्टमपि बन्धकं यावन्मूल्यदानं तावदुपभुङ्क्ते धनी निकृष्टमपि मूल्यमात्रदानेनैवाधमर्णो लभत इति ॥ ६४ ॥ इति ऋणादानप्रकरणम् ॥

भोग्य गहाणाविषयीं विशेष सांगतो.

**मूलार्थ–** कर्जाची दामदुप्पट झाल्यावर जर कर्जदारानें सावकारापाशीं भोग्य गहाण ठेविलें आणि त्या गहाणमालाचें उत्पन्न मूळ कर्जाच्या दामदुप्पटीइतकें सावकारास पोंचलें तर त्यानें तें गहाण कर्जदारास परत द्यावें.

**टीकार्थ–** ९ कर्ज घेतलेलें धन करार केलेल्या व्याजानें दामदुप्पट झाल्यावर जर कर्जदारानें सावकाराकडे भोग्य गहाण लावून दिलें तर त्या गहाणाचें उत्पन्न कर्जाचे दामदुप्पटीइतकें सावकारानें घेतल्यावर त्यानें तें गहाण कर्जदारास परत द्यावें.

१० अथवा कर्ज घेतांनाच कर्जदारानें गहाण माल लावून देऊन करार केला कीं, ह्या गहाणाचें उत्पन्न कर्जाच्या दामदुप्पटीइतकें उपभोगिल्यावर गहाण परत द्यावें, परंतु कांहीं कारणानें सावकारास दामदुप्पट होईपर्यंत त्या गहाणमालाचा उपभोग न होतां

पुढें झाला तर त्यानें त्या गहाणमालाचें, कर्जाचे दामदुप्पटीइतकें उत्पन्न भोगिल्यावर तो गहाण माल त्यानें कर्जदारास परत द्यावा. जर दामदुप्पटीपेक्षां अधिक उत्पन्न सावकारानें उपभोगिलें तर तेंही परत द्यावें.

तात्पर्य कीं सव्याज मुद्दल फिटण्यासाठींच गहाणाचा जो उपभोग त्याविषयीं हें सर्व वचन आहे असें समजावें. ह्या गहाणाला संस्कृतांत क्षयाधि ह्मणतात.

११ ज्या व्यवहारीं व्याज फिटण्यासाठींच गहाणाचा उपभोग करावा असा करार आहे तेथें दामदुप्पटीपेक्षां अधिक व्याज झालें तरी मुद्दल फिटेपर्यंत सावकारानें गहाणाचा उपभोग घ्यावा.

हेंच बृहस्पति स्पष्ट करून सांगतो.

बृहस्पति–ज्याचें उत्पन्न भोगलें जातें तें भोग्य गहाण. तें दोन प्रकारचें, एक सव्याज मुद्दल फिटण्यासाठीं, दुसरें केवळ व्याज फिटण्यासाठीं. त्यापैकी सव्याज मुद्दल फिटण्याच्या करारचें जें गहाण आहे तें सव्याज मुद्दल फिटलें ह्मणजे कर्जदारानें परत घ्यावें, आणि जें गहाण केवळ व्याज फिटण्याच्या करारचें आहे तें कर्जदारानें मुद्दल मात्र देऊन परत घ्यावें.

गहाणाचा उपभोग दोन प्रकारचा-एक सव्याज मुद्दल फिटण्यापुरता व एक केवळ व्याज मात्र फिटण्यापुरता.

ह्याचें बाधक तोच ( बृहस्पति ) सांगतो.

१२ भोग्य गहाणाचें उत्पन्न जर सावकाराला व्याजापेक्षांहि अधिक मिळेल, तर त्याला मुद्दल मिळणार नाहीं. अर्थात् मुद्दल न देतां कर्जदार आपलें गहाण घेईल.

व्याजापुरताच गहाणाच्या उपभोगाचा करार असल्यास त्याविषयीं.

१३ आणि जर नुसतें व्याज फिटण्यापुरतें देखील तें (फलभोग्य) गहाण नाहीं, तर मुद्दल देऊनहि गहाण परत मिळणार नाहीं. अर्थात् बाकी राहिलेलें व्याज दिलें पाहिजे.

पुनः दोहोंचा ( १२ व्या व १३ व्या अंकांचा ) अपवाद सांगतो.

सदर्हु (१२ व्या व १३ व्या अंकांतले) जे प्रकार सांगितले ते सावकार व कर्जदार ह्या उभयतांची परस्परांची संमति नसल्यास. जर परस्परांची अनुमति आहे तर अधिक उत्पन्नाचेंहि गहाण, कर्जदार मुद्दल देईपर्यंत सावकार वहिवाटील. आणि कमी उत्पन्नाचें गहाण असलें तरी नुसतें मुद्दल दिल्यानेंच कर्जदारास तें परत मिळेल, व्याज द्यावें लागणार नाहीं. ६४

---

## उपनिधि प्रकरण ४ थें.

**वासनस्थमनाख्याय हस्तेऽन्यस्य यदर्प्यते ।**
**द्रव्यं तदौपनिधिकं प्रतिदेयं तथैव तत् ॥ ६५ ॥**

उपनिधिं प्रस्याह ॥ निक्षेपद्रव्यस्याधारभूतं द्रव्यान्तरं वासनं करण्डादि तत्स्थं वासनस्थं यद्द्रव्यं रूपसङ्ख्यादिविशेषमनाख्याय अकथयित्वा मुद्रितमन्यस्य हस्ते

रक्षणार्थं विस्रम्भादर्प्यते स्थाप्यते तद्द्रव्यमौपनिधिकमुच्यते । यथाह नारदः । असङ्ख्यातमविज्ञातं समुद्रं यन्निधीयते । तज्जानीयादुपनिधिं निक्षेपं गणितं विदुरिति ॥ प्रतिदेयं तथैव तत् यस्मिन् स्थापितं तेन यथैव पूर्वमुद्रादिचिन्हितमर्पितं तथैव स्थापकाय प्रतिदेयं प्रत्यर्पणीयम् ॥ ६५ ॥

शाखा १ ली.

उपनिधीविषयीं निर्णय सांगतो.

**मूलार्थ**–जें द्रव्य पात्रांत गुप्त ठेवून तें काय आहे हें न सांगतां दुसऱ्याजवळ ठेवितात तो उपनिधि, तो जशाचा तसाच परत द्यावा.

**टीकार्थ**–१ उपनिधि ह्मणजे रूप, संख्या इत्यादिक न सांगतां करंडा ( डबा ) वगैरे पात्रांत घालून त्यावर आपली मोहोर करून विश्वासानें दुसऱ्यापाशीं संरक्षणार्थ जें द्रव्य ठेवितात तो. ह्यास प्रमाण.

उपनिधीचें स्वरूप.

**नारद**–मोजल्यावांचून व अमुक द्रव्य असें न सांगतां आपली मोहोर करून जें द्रव्य दुसऱ्याचे जवळ ठेवितात तो उपनिधि, आणि जें द्रव्य मोजून व दाखवून ठेवितात तो निक्षेप ( ठेव ) म्हणतात.

२ जें द्रव्य ज्यापाशीं ( आपली ) मोहोर करून ठेविलें आहे त्यानें तें जशाचें तसेंच मालकास परत द्यावें. ६५

उपनिधि जशाचा तसाच परत द्यावा.

---

## न दाप्योऽपहृतं तं तु राजदैविकतस्करैः ।

प्रतिदेयमित्यस्यापवादमाह । तमुपनिधिं राज्ञा दैवेनोदकादिना तस्करैर्वापहृतं नष्टं न दाप्योऽसौ । यस्मिन्नुपहितं धनिन एव तत् द्रव्यं नष्टं यदि जिह्मकारितं न भवति । यथाह नारदः ॥ ग्रहीतुः सह याऽर्थेन नष्टो नष्टः सदायिनः। दैवराजकृते तद्वद्वेत्तज्जिह्मकारितमिति ।

कोणत्या प्रकारानें नाश पावलेलें परत देऊं नये त्याचा (अर्ध्या वचनानें) अपवाद सांगतो.

**मूलार्थ**–उपनिधि राजिक, दैविक किंवा चोर ह्यांकडून नाश पावेल तर तो देऊं नये.

**टीकार्थ**–३ उपनिधि राजिक किंवा दैविक उपद्रवानें किंवा चोरांकडून जर नाश पावला आहे, तर तो ठेवणारास परत मिळणार नाहीं. तें नुकसान मालकाचें, परंतु तो ज्यापाशीं विश्वासानें ठेविला त्याच्या लबाडीशिवाय वास्तविक सदरहू उपद्रवांनीं नाश पावला असल्यास. ( ह्यास प्रमाण सांगतो. )

राजिक दैविक उपद्रवानें नुकसान झालेला उपनिधि मालकास परत मिळणार नाहीं.

**नारद**– जर दैविक किंवा राजिक उपद्रवानें रक्षकाच्या द्रव्याबरोबर तो उपनिधि नष्ट झाला तर तें नुकसान मालकाचें, परंतु तें रक्षकाच्या कपटानें झालें नसेल तर.

## भ्रेषश्चेन्मार्गिते दत्ते दाप्यो दण्डं च तत्समम् ॥ ६६ ॥

अस्यापवादः। स्वामिना मार्गिते याचिते यदि न ददाति तदा तदुत्तरकालं यद्यपि राजादिभिर्भ्रेषो नाशः संजातस्तथापि तद्द्रव्यं मूल्यकल्पनया धनिने ग्रहीता दाप्यो राज्ञे च तत्समं दण्डम् ॥ ६६ ॥

ह्याचें बाधक वचन सांगतो.

मूलार्थ–मालक उपनिधि मागत असतां दिला नाहीं, आणि पुढें तो नष्ट झाला तर तो भरून देववून तितकाच दंड घ्यावा.

टीकार्थ–४ मालकानें आपलें द्रव्य मागितलें असतां रक्षकानें दिलें नाहीं, आणि पुढें राजिक दैविक वगैरे उपद्रवानें जरीं तें नाश पावलें तरीं त्या द्रव्याची किंमत ठरवून रक्षकापासून राजानें मालकाचें देववून तितकाच त्यापासून दंड घ्यावा. ६६

मालक मागत असतां रक्षकानें दिलें नाहीं आणि पुढें राजिक दैविक उपद्रवानें नष्ट झाल्यास रक्षकाचें नुकसान, व तितकाच दंड.

## आजीवन् स्वेच्छया दण्ड्यो दाप्यस्तं चापि सोदयम्।

भोक्तारं प्रति दण्डमाह। यः स्वेच्छया स्वाम्यननुज्ञयोपनिहितं द्रव्यमाजीवत्युपभुङ्क्ते व्यवहरति वा प्रयोगादिना लाभार्थमसावुपभोगानुसारेण लाभानुसारेण च दण्ड्यस्तं चोपनिधिं सोदयमुपभोगे सवृद्धिकं व्यवहारे सलाभं धनिने दाप्यः। वृद्धिप्रमाणं च कात्यायनेनोक्तम्। निक्षेपं वृद्धिशेषं च क्रयं विक्रयमेव च। याच्यमानो न चेद्दद्याद्वर्धते पंचकं शतमिति ।एतच्च भक्षिते द्रष्टव्यम्। उपेक्षाज्ञाननष्टे तु तेनैव विशेषो दर्शितः। भक्षितं सोदयं दाप्यः समं दाप्य उपेक्षितं। किंचिन्न्यूनं प्रदाप्यः स्यात् द्रव्यमज्ञाननाशितमिति। किंचिन्न्यूनमिति चतुर्थांशहीनं।

उपनिधीचा उपभोग करणारास दंड सांगतो.

मूलार्थ–जो स्वेच्छेनेंच उपनिधि वहिवाटतो, त्याला दंड करून तो उत्पन्नासुद्धां मालकास परत देववावा.

टीकार्थ–५ जो ( मनुष्य ) मालकाच्या आज्ञेवांचून उपनिधीचा उपभोग करितो, किंवा लाभाकरितां व्यापार करितो त्याला उपभोगानुसार किंवा लाभानुसार दंड करून तो उपनिधि भोगिला असल्यास सव्याज व व्यापार केला असल्यास नफ्यासुद्धां मालकाचा देववावा.

रक्षकानें मालकाच्या आज्ञेवांचून उपनिधीचा उपभोग किंवा व्यापार केल्यास नफ्यासुद्धां देववून दंड करावा.

उपभोगिला असल्यास किती व्याज द्यावें तें कात्यायन सांगतो.

कात्यायन–६ ठेव, व्याजाची बाकी, खरेदीचा पैसा, आणि विक्रीचा पैसा हे मागत असतांहि न दिल्यास शेकडा पांचप्रमाणें व्याज वाढतें.

रक्षकानें उपभोगिला असल्यास शेकडा पांचप्रमाणें व्याज द्यावें.

हे जे वर प्रकार सांगितले ते उपनिधीचा अपहार केल्यास जाणावे. उपेक्षेनें किंवा अज्ञानानें नाश पावला असल्यास त्याविषयीं कात्यायनच विशेष सांगतो.

**कात्यायन**—७ उपनिधीचा अपहार केला असल्यास तो सव्याज देववावा. हयगईमुळें नाश पावला असल्यास मुद्दल मात्र देववावें. आणि अज्ञानामुळें नाश पावला असल्यास चतुर्थांश कमी करून देववावा.

हयगईनें नाश पावल्यास मुद्दल मात्र. अज्ञानपणामुळें नाश पावल्यास चतुर्थांश कमी करून देववावा.

**याचितान्वाहितन्यासनिक्षेपादिष्वयं विधिः ॥ ६७ ॥**

**उपनिधेर्धर्मान् याचितादिष्वतिदिशति । विवाहाद्युत्सवेषु वस्त्रालङ्कारादि याचित्वा नीतं याचितं यदेकस्य हस्ते निहितं द्रव्यं तेनाप्यनुपश्चादन्यहस्ते स्वामिने देहीति निहितं तदन्वाहितं । न्यासो नाम गृहस्वामिने दर्शयित्वा तत्परोक्षमेव गृहजनहस्ते प्रक्षेपो गृहस्वामिने समर्पणीयमिति । समक्षं तु समर्पणं निक्षेपः । आदिशब्देन सुवर्णकारादिहस्ते कटकादिनिर्माणाय न्यस्तस्य सुवर्णादेः । प्रतिन्यासस्य च परस्परप्रयोजनापेक्षायां त्वयेदं मदीयं रक्षणीयं मयेदं त्वदीयं रक्ष्यते इति न्यस्तस्य ग्रहणम् । यथाह नारदः । एष एव विधिर्दृष्टो याचितान्वाहितादिषु । शिल्पिषूपनिधौ न्यासे प्रतिन्यासे तथैव चेति । एतेषु याचितादिष्वयं विधिः । उपनिधेर्यः प्रतिदानादिर्विधिः स एव वेदितव्यः ॥ ६७ ॥ इतिनिक्षेपप्रकरणम् ॥**

हे जे वर उपनिधीविषयीं प्रकार सांगितले त्यांचा याचितादिकांविषयीं अतिदेश[1] सांगतो.

**मूलार्थ**—याचित, अन्वाहित, न्यास, निक्षेप इत्यादिकांविषयीं हाच विधि जाणावा.

**टीकार्थ**—८ **याचित** ह्मणजे विवाहादिक उत्साहकार्यांत जें वस्त्र, अलंकारादिक मागून नेलें तें. **अन्वाहित** ह्मणजे जें द्रव्य एकाच्या हातीं दिलें असतां, त्यानेंहि हें मालकास दे असें सांगून दुसऱ्याच्या स्वाधीन केलें तें. **न्यास** ह्मणजे घरधन्यास न दाखवितां त्याच्या परोक्ष घरांतील मनुष्यांच्या हवालीं करून हें मालकास द्या, असें सांगून दिलें जें द्रव्य तो. **निक्षेप** म्हणजे रूप, संख्या वगैरे दाखवून खुद्द मालकाच्या स्वाधीन केलें जातें जें द्रव्य तो.

मूळ वचनांत आदिशब्द आहे त्यावरून कडीं तोडे वगैरे दागिने करण्यासाठीं सोनार इत्यादिकांकडे दिलेलें सोनें रुपें वगैरे समजावें. अथवा तुझा हा जिन्नस मी संभाळितों आणि माझा तूं संभाळ असा कांहीं कारणानें संकेत करून जें परस्परांकडे परस्पर ठेवितात तें समजावें.

**नारद**—हा (निक्षेपाविषयीं सांगितलेला) च प्रकार **याचित**, **अन्वाहित**, **न्यास**, **उपनिधि**, व **प्रतिन्यास** इत्यादिकांविषयीं जाणावा.

हीं जीं याचित इत्यादि वर सांगितलीं त्यांविषयींहि हेच उपनिधीचे परत देणें वगैरे प्रकार जाणावे. ६७

---

१ अतिदेश म्हणजे एका स्थळीं जो सांगितलेला विधि, निर्णय, किंवा अर्थ तोच अन्यस्थळीं योजणें तो.

# साक्षिप्रकरण ५ वें.

प्रमाणं लिखितं भुक्तिः साक्षिणश्चेति कीर्तितमित्युक्तं तत्र भुक्तिर्निरूपिता। सांप्रतं साक्षिस्वरूपं निरूप्यते। साक्षी च साक्षाद्दर्शनाच्छ्रवणाच्च भवति। यथाह मनुः। समक्ष दर्शनात्साक्ष्यं श्रवणाच्चैव सिद्ध्यतीति। स च द्विविधः कृतोऽकृतश्चेति। साक्षित्वेन निरूपितः कृतः अनिरूपितोऽकृतः तत्र कृतः पञ्चविधोऽकृतश्च षड्विध इत्येकादशविधः। यथाह नारदः। एकादशविधः साक्षी शास्त्रे दृष्टो मनीषिभिः। कृतः पञ्चविधो ज्ञेयः षड्विधोऽकृत उच्यत इति। तेषां च भेदस्तेनैव दर्शितः। लिखितः स्मारितश्चैव यदृच्छाभिज्ञ एव च। गूढश्चोत्तरसाक्षी च साक्षी पञ्चविधः स्मृत इति। लिखितादीनां च स्वरूपं कात्यायनेनोक्तं। अर्थिना स्वयमानीतो यो लेख्ये संनिवेश्यते। स साक्षी लिखितो नाम स्मारितः पत्रकादृत इति। स्मारितः पत्रकादृत इत्यस्य विवरणं तेनैव कृतम्। यस्तु कार्यप्रसिद्ध्यर्थं दृष्ट्वा कार्यं पुनः पुनः। स्मार्यते ह्यर्थिना साक्षी स स्मारित इहोच्यत इति। यस्तु यदृच्छयागतः साक्षी क्रियते स यदृच्छाभिज्ञः। अनयोः पत्रानारूढत्वेऽपि भेदस्तेनैव दर्शितः। प्रयोजनार्थमानीतः प्रसङ्गादागतश्च यः। द्वौ साक्षिणौ त्वलिखितौ पूर्वपक्षस्य साधकाविति। तथा अर्थिना स्वार्थसिद्ध्यर्थं प्रत्यर्थिवचनं स्फुटम्। यः श्रावितः स्थितो गूढो गूढसाक्षी स उच्यते इति। तथा साक्षिणामपि यः साक्ष्यमुपर्युपरि भाषते। श्रवणाच्छ्रावणाद्वापि स साक्ष्युत्तरसंज्ञित इति॥ षड्विधस्याप्याकृतस्य भेदो नारदेन दर्शितः। ग्रामश्च प्राड्विवाकश्च राजा च व्यवहारिणाम्। कार्येष्वधिकृतो यः स्यादर्थिना प्रहितश्च यः। कुल्याः कुलविवादेषु विज्ञेयास्तेऽपि साक्षिण इति। प्राड्विवाकग्रहणं लेखकसभ्योपलक्षणार्थं। लेखकः प्राड्विवाकश्च सभ्याश्चैवानुपूर्वशः। नृपे पश्यति तत्कार्यं साक्षिणः समुदाहृता इति।

## शाखा १ ली.

लेख, भोगवटा आणि साक्षी असें प्रमाण (२ ऱ्या प्रकरणाच्या ७ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत) सांगितलें, त्यापैकीं भोगाचें निरूपण (२ ऱ्या प्रकरणाच्या ९ व्या शाखेंत) केलें, आतां साक्षीचें स्वरूप सांगतो.

१ साक्षी प्रत्यक्ष पाहिल्यानें किंवा ऐकिल्यानेंहि होतो.

साक्षीचें स्वरूप.

**मनु**–समक्ष पाहिल्यानें व ऐकिल्यानें साक्षिप्रमाण सिद्ध होतें.

२ साक्षी दोन प्रकारचा. कृत साक्षी आणि अकृत साक्षी. कृत साक्षी म्हणजे साक्षी ह्मणून ठेविलेला जो तो. व अकृत साक्षी ह्मणजे साक्षी ह्मणून ठेविलेला नव्हे तो. कृत साक्षी पांच प्रकारचा आणि अकृत साक्षी सहा प्रकारचा. एकूण साक्षीचे प्रकार ११ आहेत.

**नारद**– अकरा प्रकारचा साक्षी ऋषींनीं शास्त्रांत सांगितला आहे, त्यांत कृत साक्षी पांच प्रकारचा आणि अकृत साक्षी सहा प्रकारचा.

त्या साक्षींचा भेदहि तोच ( नारद ) सांगतो.

**नारद**– ३ लिखित, स्मारित, यदृच्छागत, गूढसाक्षी, उत्तरसाक्षी, असा पांच प्रकारचा कृतसाक्षी.

कृत साक्षी पांच प्रकारचा.

लिखितादिकांचें स्वरूप कात्यायन सांगतो.

**कात्यायन**– लिखित साक्षी ह्मणजे वादीनें स्वतां आणिला असतां जो पत्रकावर आपली साक्ष लिहून देतो तो; आणि स्मारित ह्मणजे ज्याची पत्रावर साक्ष नाहीं तो.

स्मारित साक्षीचें लक्षणहि तोच स्पष्ट करून दाखवितो.

**कात्यायन**– स्मारित साक्षी ह्मणजे वादीनें आपल्या वादाची सिद्धि होण्याकरितां वारंवार आपला वाद पाहून ज्या साक्षीला ऐकवून स्मरण दिलें जातें तो.

**यदृच्छागत** ह्मणजे जो प्रसंगीं सहज आला असतां साक्षीस ठेविला जातो तो.

स्मारित आणि यदृच्छागत ह्या दोहोंची साक्ष लिहिलेली नसली तथापि त्यांचा भेदहि तो ( कात्यायन )च सांगतो.

**कात्यायन**– कार्यसिद्ध्यर्थ बोलावून आणलेला, व जो प्रसंगानें आलेला, असे दोघेहि साक्षी साक्ष लिहून दिल्यावांचूनहि वादीच्या पक्षाचे साधक होतात.

**स्मृति–गूढसाक्षी** ह्मणजे वादी स्वकार्यसिद्ध्यर्थ साक्षीला दडवून ठेवून प्रतिवादीचें बोलणें ज्याकडून स्पष्ट ऐकवितो तो.

**स्मृति–पडसाक्षी** ह्मणजे जो साक्षीचें बोलणें ऐकिल्यामुळें अथवा ऐकविल्यामुळें साक्षी ठेविला जातो तो.

नारद सहा प्रकारच्या अकृत साक्षींचा भेद दाखवितो.

**नारद**– ४ गांव, प्राड्विवाक, राजा, व व्यवहार करण्याविषयीं नियुक्त, आणि जो वादीनें पाठविलेला, तसें कुळगतांच्या विवादाविषयीं कुळांतला, हेहि साक्षी जाणावे.

अकृत साक्षी सहा प्रकारचा.

येथें प्राड्विवाकग्रहण केलें तें कारकून सभासद ह्यांचे संग्रहार्थ ( कारण ),

**स्मृति**– राजा व्यवहार पहात असतां तेथें कारकून, प्राड्विवाक, सभासद, हेहि अनुक्रमानें साक्षी सांगितले आहेत.

---

**तपस्विनो दानशीलाः कुलीनाः सत्यवादिनः ।**
**धर्मप्रधाना ऋजवः पुत्रवन्तो धनान्विताः ॥ ६८ ॥**
**त्र्यवराः साक्षिणो ज्ञेयाः श्रौतस्मार्तक्रियापराः ।**
**यथाजाति यथावर्णं सर्वे सर्वेषु वा स्मृताः ॥ ६९ ॥**

तेऽपि साक्षिणः कीदृशाः कियन्तश्च भवन्तीत्यत आह । तपस्विनस्तपःशीलाः। दान-

शीला दाननिरताः। कुलीना महाकुलप्रसूताः। सत्यवादिनः सत्यवादनशीलाः। धर्मप्रधानाः नार्थकामप्रधानाः। ऋजवोऽकुटिलाः। पुत्रवन्तो विद्यमानपुत्राः। धनान्विता बहुसुवर्णादिधनयुक्ताः। श्रौतस्मार्तक्रियापराः नित्यनैमित्तिकानुष्ठानरताः। एवंभूताः पुरुषाः त्र्यवराः साक्षिणो भवन्ति। त्रयः अवराः अन्यूना येषां ते त्र्यवराः त्रिभ्योऽर्वाङ्न भवन्ति परतस्तु यथाकामं भवन्तीत्यर्थः। जातिमनतिक्रम्य यथाजाति। जातयो मूर्द्धावसिक्तादयः अनुलोमजाः प्रतिलोमजाश्च। तत्र मूर्द्धावसिक्तानां मूर्द्धावसिक्ताः साक्षिणो भवन्ति। एवमंबष्ठादिष्वपि द्रष्टव्यम्। वर्णमनतिक्रम्य यथावर्णं। वर्णा ब्राह्मणादयः। तत्र ब्राह्मणानां ब्राह्मणा एवोक्तलक्षणा उक्तसंख्याकाः साक्षिणो भवन्ति। एवं क्षत्रियादिष्वपि द्रष्टव्यम्। यथा स्त्रीणां साक्ष्यं स्त्रिय एव कुर्युः। यथाह मनुः। स्त्रीणां साक्ष्यं स्त्रियः कुर्युरिति। सजातिसवर्णासंभवे सर्वे मूर्द्धावसिक्तादयो ब्राह्मणादयश्च सर्वेषु मूर्द्धावसिक्तादिषु ब्राह्मणादिषु च यथासंभवं साक्षिणो भवन्ति। उक्तलक्षणानां साक्षिणामसंभवे प्रतिषेधरहितानामन्येषामपि साक्षित्वप्रतिपादनार्थमसाक्षिणो वक्तव्याः। ते च पञ्चविधा नारदेन दर्शिताः। असाक्ष्यपि हि शास्त्रेषु दृष्टः पञ्चविधो बुधैः। वचनाद्दोषतो भेदात्स्वयमुक्तेर्मृतान्तर इति। के पुनर्वचनादसाक्षिण इत्यत आह। श्रोत्रियास्तापसा वृद्धा ये च प्रव्रजितादयः। असाक्षिणस्ते वचनान्नात्र हेतुरुदाहृत इति। तापसा वानप्रस्थाः आदिशब्देन पित्रा विवदमानादीनां ग्रहणम्। यथाह शंखः। पित्रा विवदमानगुरुकुलवासिपरिव्राजकवानप्रस्था निर्ग्रंथाश्चासाक्षिण इति। दोषादसाक्षिणो दर्शिताः। स्तेनाः साहसिकाश्चण्डाः कितवा वञ्चकास्तथा। असाक्षिणस्ते दुष्टत्वात्तेषु सत्यं न विद्यत इति। चण्डाः कोपनाः। कितवा द्यूतकृतः। भेदादसाक्षिणां च स्वरूपं तेनैव दर्शितम्। साक्षिणां लिखितानां च निर्दिष्टानां च वादिनां। तेषामेकोऽन्यथावादी भेदात्सर्वे न साक्षिण इति। तथा स्वयमुक्तिस्वरूपं चोक्तम्। स्वयमुक्तिरनिर्दिष्टः स्वयमेवेत्य यो वदेत्। सूचीत्युक्तः स शास्त्रेषु न स साक्षित्वमर्हतीति। मृतान्तरस्यापि लक्षणमुक्तम्। योऽर्थः श्रावयितव्यः स्यात्तस्मिन्नसति चार्थिनि। क्व तद्वदतु साक्षित्वमित्यसाक्षी मृतान्तर इति। येनार्थिना प्रत्यर्थिना वा साक्षिणां योऽर्थः श्रावयितव्यो भवेत् यूयमत्रार्थे साक्षिण इति तस्मिन्नर्थिनि प्रत्यर्थिनि वा असति मृतेऽर्थे चानिवेदिते साक्षित्वं कस्मिन्नर्थे कस्य वा कृते साक्ष्यं वदत्विति मृतान्तरः साक्षी न भवति। यत्र तु मुमूर्षुणा सुस्थेन वा पित्रा पुत्रादयः श्राविता अस्मिन्नर्थेऽमी साक्षिण इति। तत्र मृतान्तरोऽपि साक्षी। यथाह नारदः। मृतान्तरोऽर्थिनि प्रेते मुमूर्षुश्राविताहृते। तथा। श्रावितोऽनातुरेणापि यस्त्वर्थो धर्मसंहितः। मृतेऽपि तत्र साक्षी स्यात् षट्सु चान्वाहितादिष्विति ॥ ६८ ॥ ६९ ॥

शाखा २ री.

साक्षी कसे व किती असावे तें सांगतो.

मूलार्थ–तपस्वी, दानशील, कुलीन, सत्यवादी, धर्मप्रधान, सरळबुद्धि, पुत्रवंत, ध-

नाढ्य, आणि श्रौतस्मार्तकर्मतत्पर, असे आपापल्या वर्णाचे व जातीचे, अथवा सर्व जातींत सर्व प्रकारचे साक्षी घ्यावे. ते किमानपक्ष तीन असावे.

साक्षी श्रुतवृत्तसंपन्न असावे व ते किमानपक्ष तीन असावे.

**टीकार्थ**—१ तपस्वी, दानशील, कुलीन, सत्य बोलणारे, धर्मरूप पुरुषार्थ जो त्याचे ठायीं तत्पर, अर्थकामतत्पर नव्हत, सरळबुद्धि, पुत्रवंत व सधन आणि नित्यनैमित्तिक कर्माविषयीं तत्पर, एवंगुणविशिष्ट किमानपक्ष तीन साक्षी असावे. तिहींपेक्षां कमी नसावे; तिहींपुढें पाहिजेत तितके होतात.

२ **मूर्धावसिक्त** इत्यादिक **अनुलोम** जातींत व **प्रतिलोम** जातींत ज्या जातीचा त्या जातींत साक्षी असावा. ब्राह्मणादि वर्णांत ज्या वर्णाचा त्या वर्णांत साक्षी असावा; ह्मणजे ब्राह्मणाचे ब्राह्मण वर सांगितल्या गुणांचे साक्षी असावे. ह्याप्रमाणें क्षत्रियादिकांविषयींहि जाणावें. तसेंच स्त्रियांची साक्ष स्त्रियांनीं द्यावी.

**मनु**— स्त्रियांची साक्ष स्त्रियाच देवोत.

जर आपले सजातीय व आपल्या वर्णाचे साक्षी न मिळतील तर ज्या जातीचे व ज्या वर्णाचे मिळतील ते घ्यावे.

१ ल्या अंकांत सांगितल्याप्रमाणें साक्षी न मिळतील तर खालीं ( ३ ऱ्या व ४ थ्या अंकांत ) जे साक्षीविषयीं निषेधिले आहेत त्यांवांचून इतर साक्षी घ्यावे. ह्मणून निषिद्ध साक्षी कोणते ते नारद पांच प्रकारचे दाखवितो.

**नारद**—३ वर्ज साक्षीहि शास्त्रांत पांच प्रकारचा सांगितला आहे. **वचननिषिद्ध**, **दोषनिषिद्ध**, **भेदनिषिद्ध**, **स्वयमुक्ति**, आणि **मृतांतर**.

साक्षीविषयीं वर्ज.

वचननिषिद्ध साक्षी कोणते ते सांगतो.

**नारद**— श्रोत्रिय, वानप्रस्थ, वृद्ध, संन्यासी इत्यादिकांचा **वाचनिकनिषेध** सांगितल्यामुळें ते साक्षी होऊं शकत नाहींत. निषेधाविषयीं कारण सांगितलें नाहीं.

वचनानें निषेधलेले साक्षी.

( ह्या वचनांतल्या ) इत्यादिक शब्देंकरून बापाबरोबर कलह करणारे वगैरे घ्यावे.

**शंका**—बापाशीं कलह करणारा, गुरुगृहीं राहणारा, वानप्रस्थ, संन्यासी, पाखंडी, हे साक्षी होत नाहींत.

दोषनिषिद्ध साक्षीचेंहि स्वरूप सांगतो.

**स्मृति**— चोर, साहसी, तामसी, जुगारी, ठक, हे दुष्टत्वामुळें साक्षीविषयीं निषिद्ध आहेत; कारण, त्यांचे ठायीं सत्य नसतें.

दोषामुळें निषिद्ध साक्षी.

भेदनिषिद्ध साक्षीचें स्वरूपहि तोच सांगतो.

**नारद**— ज्यांनीं पत्रावर साक्ष घातली आहे ते, किंवा माझे अमुक साक्षी आहेत असे जे वादीनें दाखवून दिले आहेत ते, त्यांमध्यें एखादा विपरीत साक्ष देतो तर ते सर्वही भेदामुळें साक्षी होत नाहींत.

भेदामुळें निषिद्ध साक्षी.

नसें स्वयमुक्ति साक्षीचें स्वरूप सांगितलें आहे.

**स्मृति**— जो साक्षीविषयीं निर्दिष्ट नसतां स्वतांच येऊन साक्ष देतो तो साक्षी घेऊं नये. त्याला शास्त्रांत सूची ( चहाड ) म्हटलें आहे.

स्वयमुक्तिसाक्षी.

**मृतांतरसाक्षीचेंहि लक्षण सांगतो.**

**स्मृति**— वादीनें किंवा प्रतिवादीनें साक्षीस ह्या अर्थाविषयीं तुम्ही साक्ष आहां असें ऐकविलें पाहिजे, तें न ऐकवितां तो वादी किंवा प्रतिवादी मरण पावला, तर त्या साक्षीनीं कोणत्या अर्थाविषयीं व कोणासाठीं साक्ष द्यावी? ह्मणून मृतांतरसाक्षी होत नाहीं.

मृतांतरसाक्षी.

४ परंतु पिता आसन्नमरण झाला असतां किंवा स्वस्थ असतां जर त्यानें पुत्रादिकांस श्रुत केलें आहे कीं, ह्या अर्थाविषयीं अमुक साक्षी आहेत, तर तेथें **मृतांतरहि** साक्षी होतो.

**नारद**— वादी मरण पावला असतां मृतांतरसाक्षी होत नाहीं, परंतु वादी मरणोन्मुख असतां त्यानें साक्षीविषयीं पुत्रादिकांस मजकूर ऐकविला नसेल तर.

**स्मृति**— तसेंच वादी किंवा प्रतिवादी स्वस्थ असतां त्यानें यथान्याय बाका पुत्रादिकांस श्रुत केला, आणि पुढें तो ( वादी किंवा प्रतिवादी ) मरण पावला असतांहि अन्वाहित वगैरे सहा व्यवहारीं[१] ( मृतांतर ) साक्षी होतो ॥ ६८ ॥ ६९ ॥

**स्त्रीबालवृद्धकितवमत्तोन्मत्ताभिशस्तकाः ।**
**रङ्गावतारिपाखण्डिकूटकृद्विकलेंद्रियाः ॥ ७० ॥**
**पतिताप्तार्थसंबन्धिसहायरिपुतस्कराः ।**
**साहसी दृष्टदोषश्च निर्धूताद्यास्त्वसाक्षिणः ॥ ७१ ॥**

तानेतानसाक्षिणो दर्शयति । स्त्री प्रसिद्धा बालोऽप्राप्तव्यवहारः । वृद्धोऽशीतिकावरः । वृद्धग्रहणं वचननिषिद्धानामन्येषामपि श्रोत्रियादीनामुपलक्षणार्थं । कितवोऽक्षदेवी । मत्तः पानादिना । उन्मत्तो ग्रहाविष्टः । अभिशस्तोऽभियुक्तो ब्रह्महत्यादिना । रङ्गावतारी चारणः । पाखण्डिनो निर्ग्रन्थप्रभृतयः । कूटकृत्कपटलेख्यादिकारी । विकलेन्द्रियः श्रोत्रादिरहितः । पतितो ब्रह्महादिः । आप्तः सुहृत् । अर्थसंबन्धी विप्रतिपद्यमानार्थसंबन्धी । सहाय एककार्यः । रिपुः शत्रुः । तस्करः स्तेनः । साहसी स्वबलावष्टंभकारी । दृष्टदोषो दृष्टवितथवचनः । निर्धूतो बन्धुभिस्त्यक्तः । आद्यशब्दादन्येषामपि स्मृत्यन्तरोक्तानां दोषाद्साक्षिणां भेदादसाक्षिणां स्वयमुक्तेर्मृतान्तरस्य च ग्रहणम् । एते स्त्रीबालादयः साक्षिणो न भवन्ति ॥ ७० ॥ ७१ ॥

१. हे सहा व्यवहार उपनिधिप्रकरणा ८ व्या अंकात पहावे.

आणखी निषिद्ध साक्षी सांगतो.

**मूलार्थ**– स्त्री, बाल, वृद्ध, कितव ( जुगारी ), मत्त, उन्मत्त, अभिशस्त, रंगावतारी, पाखंडी, कूटकृत, विकलेंद्रिय, पतित, आप्त, अर्थसंबंधी, सहाय, शत्रु, चोर, साहसी, दृष्टदोष, निर्धूत, इत्यादिक साक्षीविषयीं वर्ज्य जाणावे.

**टीकार्थ**– ५ स्त्री, बाल म्हणजे अप्राप्तव्यवहार, वृद्ध म्हणजे ऐंशी वर्षांहून अधिक वयाचा, ( मूळांतील ) वृद्धशब्देंकरून वचननिषिद्ध जे श्रोत्रियादिक ते घ्यावे. कितव म्हणजे जुगारी, मत्त म्हणजे दारू वगैरे पिऊन मग्न झालेला; उन्मत्त म्हणजे भूत पिशाच इत्यादिकांच्या उपद्रवानें वेडा झालेला; अभिशस्त म्हणजे ब्रह्महत्यादि पातकांचा आरोपी; रंगावतारी म्हणजे चारण ( नट ); पाखंडी म्हणजे नास्तिक ( निर्ग्रंथि, बौद्ध इत्यादि ); कूटकृत् म्हणजे खोटे दस्तैवज करणारा; विकलेंद्रिय म्हणजे बहिरा, अंध इत्यादि; पतित म्हणजे ब्रह्महत्यादि महापातकी; आप्त म्हणजे सुहृत् ( मित्र ); अर्थसंबंधी म्हणजे चालू वादाच्या अर्थाचा संबंधी; सहाय म्हणजे एककार्य; शत्रु; चोर; साहसी म्हणजे जुलमी, दरवडेखोर; दृष्टदोष म्हणजे ज्याचा अप्रमाणिकपणा दिसून आला तो; निर्धूत म्हणजे बांधवांनीं टाकलेला; इत्यादिक म्हणजे आणखी जे स्मृत्यंतरीं सांगितलेले दोषनिषिद्ध, भेदनिषिद्ध, स्वयमुक्ति आणि मृतांतर हे जाणावे. हे स्त्री, बाल इत्यादिक सर्व निषिद्ध साक्षी होत. ७० ॥ ७१ ॥

साक्षीविषयीं वर्ज्य.

## उभयानुमतः साक्षी भवत्येकोऽपि धर्मवित् ।

त्र्यवराः साक्षिणो ज्ञेया इत्यस्यापवादमाह । ज्ञानपूर्वकं नित्यनैमित्तिकधर्मानुष्ठायी धर्मवित् स एकोऽप्युभयानुमतश्चेत्साक्षी भवति । अपिशब्दबलाद्द्वावपि । यद्यपि श्रौतस्मार्तक्रियापरा इति त्र्यवराणामपि धर्मवित्त्वं समानं तथापि तेषामुभयानुमत्यभावेऽपि साक्षित्वं भवत्येकस्य द्वयोर्वोभयानुमत्यैव साक्षित्वं भवतीत्यर्थवत् त्र्यवरग्रहणम् ।

( पहिल्या अंकांत ) कमींत कमी तीन साक्षी असावे असें सांगितलें त्याचा अपवाद ( अर्ध्या वचनानें ) सांगतो.

**मूलार्थ**– धर्मज्ञ असा मनुष्य उभयतांस मान्य असल्यास एकहि साक्षी होतो.

**टीकार्थ**– ६ नित्यनैमित्तिक धर्माचें ज्ञानपूर्वक आचरण करणारा असा धर्मज्ञ पुरुष एकहि साक्षी होतो. परंतु तो वादिप्रतिवादींस अनुमत असला पाहिजे. मूळांत अपिशब्द आहे तेणेंकरून दोघेहि होतात. तिहींपेक्षां अधिक साक्षी असले तरी ते नित्यनैमित्तिक धर्माचें आचरण करणार असले पाहिजेत. परंतु ते वादिप्रतिवादींच्या अनुमतीवांचूनहि साक्षी होतात. एक किंवा दोन साक्षी तर वादिप्रतिवा-

श्रुतवृत्तसंपन्न व सत्यवादी असा असल्यास उभयतांच्या अनुमतानें एकहि साक्षी पुरे होतो.

दोंची संमति असेल तरच होतात, अन्यथा नाहीं, यास्तव कमींत कमी तीन साक्षी असावे असें मूळांत सांगितलें तें सार्थक आहे.

( १ ल्या अंकांत ) तपस्वी, दानशील इत्यादिक साक्षी घ्यावे असें सांगितलें त्याचा अपवाद ( अर्ध्या वचनानें ) सांगतो.

## सर्वः साक्षी संग्रहणे चौर्यपारुष्यसाहसे ॥ ७२ ॥

तपस्विनो दानशीला इत्यस्यापवादमाह । संग्रहणादीनि वक्ष्यमाणलक्षणानि । तेषु सर्वे वचननिषिद्धास्तपःप्रभृतिगुणरहिताश्च साक्षिणो भवन्ति । दोषादसाक्षिणो भेदादसाक्षिणः स्वयमुक्तेश्चात्रापि साक्षिणो न भवन्ति। सत्याभावादिति हेतोरत्रापि विद्यमानत्वात् । मनुष्यमारणं चौर्यं परदाराभिमर्शनम् । पारुष्यमुभयं चेति साहसं स्याच्चतुर्विधमिति वचनाद्यद्यपि स्त्रीसंग्रहणचौर्यपारुष्याणां साहसत्वं तथापि तेषां स्वबलावष्टंभेन जनसमक्षं क्रियमाणानां साहसत्वम् । रहसि क्रियमाणानां तु संग्रहणादिशब्दवाच्यत्वमिति तेषां साहसात्पृथगुपादानम् ॥ ७२ ॥

मूलार्थ— स्त्रीसंग्रहण, चोरी, पारुष्य, आणि साहस ह्या वादांत सर्व प्रकारचा साक्षी घ्यावा.

टीकार्थ— ७ स्त्रीसंग्रहण, चोरी, वाक्पारुष्य, दंडपारुष्य, आणि साहस ह्या वादांत ( ३ ऱ्या अंकांतील नारदवचनांतील ) वचननिषिद्ध साक्षी आणि ( चालत्या शाखेच्या १ ल्या अंकांत सांगितलेले ) गुणविरहित साक्षी असले तरी ते घ्यावे, परंतु दोषनिषिद्ध व भेदनिषिद्ध आणि स्वयमुक्ति हे घेऊं नयेत, कारण, त्यांचेठायीं सत्यपणा नाहीं, हा हेतु एथेंहि संभवतो.

स्मृति— ८ मनुष्यवध, चोरी, स्त्रीसंग्रहण, वाक्पारुष्य, दंडपारुष्य, असें चार प्रकारचें साहस सांगितलें आहे.

ह्या वचनावरून जरी स्त्रीसंग्रहण, चोरी, पारुष्य ह्यांचा साहसांतच अंतर्भाव आहे, तथापि तीं ( स्त्रीसंग्रहण, चोरी, पारुष्य हीं ) दांडगाईनें, बलात्कारानें, लोकांच्या समक्ष, असीं केलीं असतां साहस ह्मटलीं जातात, आणि तींच गुप्तरूपें केलीं तर स्त्रीसंग्रहण, चोरी, पारुष्य, अशा निरनिराळ्या संज्ञा पावतात. ह्मणून त्यांचा साहसाहून पृथक् निर्देश केला आहे. ७२

---

## साक्षिणः श्रावयेद्वादिप्रतिवादिसमीपगान् ।

साक्षिश्रावणमाह । अर्थिप्रत्यर्थिसन्निधौ साक्षिणः समवेतान् ॥ नासमवेताः पृष्टाः प्रब्रूयुरिति गौतमवचनात् । वक्ष्यमाणं श्रावयेत् । तत्रापि कात्यायनेन विशेषो दर्शितः ॥ सभान्तः साक्षिणः सर्वानर्थिप्रत्यर्थिसन्निधौ । प्राड्विवाको नियुञ्जीत विधिनानेन सान्त्वयन् ॥ देवब्राह्मणसान्निध्ये साक्ष्यं पृच्छेदृतं द्विजान् । उद-

मुखान्प्राङ्मुखान्वा पूर्वाह्णे वै शुचिः शुचीन् ॥ आहूय साक्षिणः पृच्छेन्नियम्य शपथैर्भृशम् । समस्तान् विदिताचारान् विज्ञातार्थान्पृथक्पृथगिति ॥ तथा ब्राह्मणादिषु श्रावणे मनुना नियमो दर्शितः । सत्येन शापयेद्विप्रं क्षत्रियं वाहनायुधैः । गोबीजकाञ्चनैर्वैश्यं शूद्रं सर्वैस्तु पातकैरिति । ब्राह्मणमन्यथा ब्रुवतः सत्यं ते नश्यतीति शापयेत् । क्षत्रियं वाहनायुधानि तव विफलानीति । गोबीजकाञ्चनादीनि तव विफलानि भविष्यन्तीति वैश्यं । शूद्रमन्यथा ब्रुवतस्तव सर्वाणि पातकानि भविष्यन्तीति शापयेत् । अत्र चापवादस्तेनैव दर्शितः । गोरक्षकान् वाणिजकांस्तथा कारुकुशीलवान प्रेष्यान्वार्धुषिकांश्चैव विप्रान् शूद्रवदाचरेदिति । विप्रग्रहणं क्षत्रियवैश्ययोरुपलक्षणार्थम् । कुशीलवा गायकाः । प्रतिवादिना साक्षिदूषणे दत्ते प्रत्यक्षयोग्यदूषणेषु बाल्यादिषु तथैव निर्णयः । अयोग्येषु तु तद्वचनाल्लोकतश्च निर्णयो न साक्ष्यन्तरेणेति नानवस्था । यदि साक्षिदोषमुद्भाव्य साधयितुं न शक्नोति प्रतिवादी तदासौ दोषानुसारेण दण्ड्यः । अथ साधयति तदा न साक्षिणः । यथाह । अभावयन दमं दाप्या दूषणं साक्षिणां स्फुटम् । भाविते साक्षिणो वर्ज्याः साक्षिधर्मनिराकृता इति । उद्दिष्टेषु च सर्वेषु साक्षिषु दुष्टेष्वर्थी यदा क्रियान्तरनिरपेक्षस्तदा पराजितो भवति ॥ जितः स विनयं दाप्यः शास्त्रदृष्टेन कर्मणा । यदि वादी निराकांक्षः साक्षिसत्ये व्यवस्थित इति स्मरणात् । साकांक्षश्चेत्क्रियान्तरमवलंबेतेत्यभिप्रायः ।

### शाखा ३ री.

सार्क्षीची साक्ष घेण्यापूर्वी त्यांस काय ऐकविलें पाहिजे तें सांगतो.

**मूलार्थ**— वादिप्रतिवादीच्या समक्ष साक्षीस ( वाका ) ऐकवावा.

**टीकार्थ**— १ एकत्र जमा झालेल्या साक्षीस वादिप्रतिवादींच्या समक्ष ( खालीं सांगितलेला) वाका ऐकवावा. कारण,

साक्ष घेण्याचे पूर्वी त्यास

शपथ देण्याचा प्रकार.

**गौतम**— सर्व साक्षी एकत्र जमल्याशिवाय त्यांस प्रश्न केला असतां त्यांनीं उत्तर देऊं नये.

ह्याविषयी कात्यायन विशेष सांगतो.

**कात्यायन**— न्यायसभेंत वादिप्रतिवादींच्या समक्ष सर्व साक्षीस प्राड्विवाकानें शुचिर्भूत होऊन सांत्वन करून देवब्राह्मणाच्या सन्निध द्विजांस खरी साक्ष पुसावी, आणि त्यांस उत्तराभिमुख किंवा पूर्वाभिमुख करून पूर्वाह्णीं साक्ष घ्यावी. एकत्र मिळालेले, सदाचार संपन्न व ज्यांस चालत्या वादाचा वाका माहीत आहे अशा साक्षीस बोलावून शपथ देऊन निरनिराळें पुसावें.

ब्राह्मणादि साक्षीस शपथ देण्याविषयीं मनु विशेष नियम सांगतो.

**मनु**— ब्राह्मणाला सत्याची शपथ द्यावी; क्षत्रियाला वाहनें आयुधें ह्यांची शपथ द्यावी; वैश्याला गाई, धान्य, सोनें, ह्यांची शपथ द्यावी; आणि शूद्राला तर सर्व पातकांनीं शापित करावें.

**अर्थ**—जर खोटी साक्ष देशील तर तुझें सत्य नाश पावेल, अशी ब्राह्मणाला शपथ द्यावी; तुझीं वाहनें व शस्त्रें निष्फळ होतील, अशी क्षत्रियाला; व तुझीं गाई, धान्यें, कांचनें हीं निष्फळ होतील, अशी वैश्याला; आणि शूद्राला तूं खोटी साक्ष देशील तर सर्व पातकें तुझ्या शिरीं पडतील, अशी शपथ द्यावी.

ह्याचें बाधकही तोच ( मनु ) दाखवितो.

**मनु**— २ गुरें राखणारे, व वाणीपणा करणारे, व शिल्पी, व गायक, जासूद, व प्रतिषिद्ध अशा वादींनें उपजीविका करणारे, असे जे विप्र ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ) त्यांस शूद्राप्रमाणें मानावें ( म्हणजे ह्यांस शूद्राप्रमाणें शपथ द्यावी.)

निंद्य वृत्तीनें उपजीवन करणारे ब्राह्मणादिकांस शूद्रांसारिखें मानावें.

३ प्रतिवादीनें साक्षीवर दूषणें दिलीं असतां तीं जर प्रत्यक्ष योग्य बाल्यादिक दूषणें ( म्हणजे २ ऱ्या शाखेच्या ३ ऱ्या व ४ थ्या व ५ व्या अंकांत सांगितल्याप्रमाणें ) आहेत, तर तसाच निर्णय करावा. जर दिलेलीं दूषणें योग्य नाहींत, तर त्या साक्षींचे वचनावरून व लौकिक रीतीवरून निर्णय करावा, आणखी साक्षी घेऊं नयेत. कारण, अनवस्थारूप[1] दोष येईल.

प्रतिवादीनें साक्षीवर तकरार घेतलेली योग्य नसल्यास त्याप्रमाणें निर्णय करावा.

४ जर प्रतिवादी साक्षींवर दोषोद्भावन करून तो दोष स्पष्ट शाबीत करूं शकत नाहीं, तर त्याला तारतम्यानें दंड करावा. जर त्यांवर दोष शाबीत करितो, तर ते साक्षी होत नाहींत.

साक्षींवर घेतलेली तकरार योग्य असल्यास ते रद्द करावे.

**स्मृति**—जर प्रतिवादी साक्षींवर दोष शाबीत करूं शकत नाहीं, तर त्याला दंड करावा; शाबीत करितो, तर ते साक्षीच्या कामांतून रहित करावे.

५ वादीनें दिलेले सर्व साक्षी दोषी ठरले असतां वादी दुसरें कांहीं साधन दाखवूं शकत नाहीं, तर तो पराजित होतो.

साक्षी रद्द झाल्यावर आणखी पुरावा दाखवीत नाहीं तर पराजित.

**स्मृति**—जर वादी दुसरें प्रमाणाची आकांक्षा न धरितां केवळ साक्षीच्या सत्यावर विश्वास ठेवितो, आणि जर तो शास्त्रमार्गानें पराजय पावला, तर त्याला दंड करावा. जर दुसरें ( लेख वगैरे ) प्रमाणाची आकांक्षा धरितो, तर तें त्यानें दाखवावें, असा अभिप्राय.

## ये पातककृतां लोका महापातकिनां तथा ॥ ७३ ॥

१ अनवस्था म्हणजे अधिकरणाच्या किंवा आश्रयाच्या परंपरासंबंधानें कांहींएक पदार्थाची विश्रांति न होणें. जसें पहिल्या साक्षींवर दोषोद्भावन झाल्यामुळें दुसरे साक्षी, त्यांवर दोषारोप झाल्यामुळें तिसरे, ह्याप्रमाणें परंपरा चालली असतां शेवट होणार नाहीं.

**अग्निदानां च ये लोका ये च स्त्रीबालघातिनाम् ।**
**स तान्सर्वानवाप्नोति यः साक्ष्यमनृतं वदेत् ॥ ७४ ॥**
**सुकृतं यत्त्वया किञ्चिज्जन्मान्तरशतैः कृतं ।**
**तत्सर्वं तस्य जानीहि यं पराजयसे वृथा ॥ ७५ ॥**

कथं श्रावयेदित्यत आह । पातकोपपातकमहापातककारिणामग्निदानां स्त्रीबालघातिनां च ये लोकास्तान् सर्वानसावाप्नोति यः साक्ष्यमनृतं वदेदिति । यथा जन्मान्तरशतैर्यत्सुकृतं कृतं तत्सर्वं तस्य भवति । यस्ते अनृतवदनेन पराजितो भवतीति श्रावयेदिति संबन्धः । एतच्च शूद्रविषयं द्रष्टव्यं । शूद्रं सर्वैस्तु पातकैरिति शूद्रे सर्वपातकश्रावणस्य विहितत्वात् । गोरक्षकादि द्विजातिविषयं च । गोरक्षकान् वाणिजकानित्युक्तत्वात् । अन्यानेकजन्मार्जितसुकृतसंक्रमणस्य महापातकादिफलप्राप्तेश्चानृतमात्रेणानुपपत्तेः । साक्षिसंत्रासार्थमिदमुच्यते । यथाह नारदः । पुराणैर्धर्मवचनैः सत्यमाहात्म्यकीर्तनैः । अनृतस्यापवादैश्च भृशमुत्त्रासयेदिमानिति ॥ ७३ ॥ ७४ ॥ ७५ ॥

### शाखा ४ थी.

साक्षींस शपथ कशी द्यावी तें सांगतों.

**मूलार्थ**— पातकी, महापातकी, आग लावणारे, व स्त्री बालक ह्यांचा घात करणारे ह्यांस जे लोक नरकादि प्राप्त होतात त्या सर्वांतें, जो खोटी साक्ष देईल तो पावतो आणि जें त्वां जन्मशतांनीं केलेलें पुण्य तें सर्व, ज्याचा तूं अन्यायानें पराजय करितोस त्याला मिळेल असें जाण.

**टीकार्थ**— १ जो खोटी साक्ष देतो त्याला पातक, उपपातक[1], महापातक[2] करणारे, आग लावणारे, व स्त्री बाल यांची हत्या करणारे, ह्यांचे जे नरकादि लोक ते सर्व प्राप्त होतात. तसेंच जें पुण्य तूं शेंकडों जन्म घेऊन केलें आहे, तें सर्व ज्याचा तूं खोटी साक्ष देण्यानें पराजय करितोस त्याजकडे जातें, असें सांगावें.

खोटी साक्ष देण्याविषयीं साक्षीस त्रास आणण्याचा प्रकार.

२ परंतु हें सांगणें शूद्राविषयीं जाणावें; कारण, "शूद्राला तर सर्व पातकांनीं शापित करावें" असें ( तिसऱ्या शाखेच्या पहिल्या अंकांतील मनुवचनांत ) सांगितलें आहे. व ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य, हे जर त्याच शाखेच्या २ऱ्या अंकांत, सांगितल्याप्रमाणें आहेत, तर त्यांविषयींही जाणावें.

३ हा वर (१ ल्या अंकांत ) सांगितलेला प्रकार साक्षींस ( खोटी साक्ष देण्याविषयीं )

१ उपपातकें म्हणजे गोवध, व्रात्यपणा ( योग्यकालीं उपनयन न करणें ), स्तेय, ब्रह्मस्व न फेडणें, वगैरे पुष्कळ सांगितलीं आहेत. २ महापातकें म्हणजे ब्रह्महत्या, मद्यप्राशन, सोनें चोरणें, गुरुपत्नीशीं संग करणें, आणि ह्या चोहोंतून कोणतेंहा एक करणाऱ्याचा सहवास, हीं महापातकें म्हटलीं आहेत. ह्यांखेरीज दुसरीं जीं पातकें तीं सामान्य पातकें.

भय उत्पन्न व्हावें म्हणून सांगितला आहे असें समजलें पाहिजे. कारण, केवळ आपलें अनेक जन्मार्जित पुण्य पराजिताकडे जातें व खोटें बोलणारास महापातकादि फल प्राप्त होतें, असें ह्मणण्याची उपपत्ति अन्यथा होत नाहीं.

नारद– पुराण ह्मणजे प्राचीन असीं धर्माचीं प्रतिपादक वचनें, सत्याचा महिमा सांगणें, आणि अनृत भाषणाचें दोषोद्भावन करणें, ह्यांकडून साक्षींस अत्यंत भय उत्पन्न करावें. ॥७३॥७४॥७५॥

---

**अब्रुवन्हि नरः साक्ष्यमृणं सदशबन्धकम् ।**
**राज्ञा सर्वं प्रदाप्यः स्यात् षट्चत्वारिंशकेऽहनि ॥ ७६ ॥**

यदा तु श्राविताः साक्षिणः कथञ्चिन्न ब्रूयुस्तदा किं कर्तव्यमित्यत आह ॥ यः साक्ष्यमङ्गीकृत्य श्रावितः सन् कथञ्चिन्न वदति स राज्ञा सर्वं सवृद्धिकमृणं धनिने दाप्यः । सदशबन्धकं दशमांशसहितं दशमांशश्च राज्ञो भवति । राज्ञाधमर्णिको दाप्यः साधिताद्दशकं शतमित्युक्तत्वात् । एतच्च षट्चत्वारिंशकेऽहनि प्राप्ते वेदितव्यम् । ततोऽर्वाग्वदन्न दाप्यः इदं च व्याध्याद्युपप्लवरहितस्य । यथाह मनुः । त्रिपक्षादब्रुवन् साक्ष्यमृणादिषु नरोऽगदः । तदृणं प्राप्नुयात्सर्वं दशबन्धं च सर्वश इति । अगद इति राजदैवोपप्लवविरहोपलक्षणम् ॥ ७६ ॥

सदरहू प्रकार साक्षींस ऐकविल्यानंतरहि ते साक्ष न देतील तर पुढें काय करावें तें सांगतो.

**मूलार्थ**– जो मनुष्य साक्ष देत नाहीं त्यापासून राजानें शेचाळिसावे दिवशीं सावकाराचें सर्व कर्ज देववून त्यापासून दशमांश दंड घ्यावा.

**टीकार्थ**– ४ जो साक्ष पतकरून व शपथेचा मजकूर ऐकून घेऊन समयीं साक्ष देत नाहीं त्यापासून राजानें सावकाराचें सव्याज कर्ज देववावें. आणि दशमांश दंड घ्यावा. कारण, "राजानें (कर्जदाराकडून) देवविलेल्या द्रव्याबद्दल शेंकडा दशक घ्यावें." असें ( ३ऱ्या प्रकरणांतील ५व्या शाखेच्या तिसऱ्या अंकाचे वचनांत ) सांगितलें आहे.

(जो साक्ष देत नाहीं त्यापासून सावकाराचें कर्ज देववून दंड घ्यावा.)

हा प्रकार शेचाळिसावे दिवशीं जाणावा, त्याचे आंत साक्ष देईल तर ( कांहींच ) देववूं नये, परंतु ही मुदत ज्याला व्याधि वगैरे उपद्रव नाहीं त्याविषयीं.

**मनु**– मनुष्य निरोगी असून ऋणादि व्यवहारीं दिढा महिन्यांतहि साक्ष देत नाहीं तर त्यापासून सर्व सव्याज कर्ज व दशमांश (दंड) घ्यावा.

ह्या वचनांतील निरोगी शब्देंकरून राजिक दैविक उपद्रवरहितांचाहि संग्रह करावा.७६

---

**न ददाति हि यः साक्ष्यं जानन्नपि नराधमः ।**
**स कूटसाक्षिणां पापैस्तुल्यो दण्डेन चैव हि ॥ ७७ ॥**

यस्तु जानन्नपि साक्ष्यमेव नाङ्गीकरोति दौरात्म्यात्तं प्रत्याह ॥ यः पुनर्नराधमो विप्रतिपन्नमर्थं विशेषतो जानन्नपि साक्ष्यं न ददाति नाङ्गीकरोति स कूटसाक्षिणां तुल्यः पापैः कृत्वा दण्डेन च । कूटसाक्षिणां च दण्डं वक्ष्यति । कूटसाक्षिणश्च दण्डयित्वा पुनर्व्यवहारः प्रवर्तनीयः । कृतोऽपि वा कौटसाक्ष्ये विदिते निवर्तनीयः ॥ यथाह मनुः ॥ यस्मिन् यस्मिन् विवादे तु कौटसाक्ष्यं कृतं भवेत् । तत्तत्कार्यं निवर्तेत कृतं चाप्यकृतं भवेदिति ॥ ७७ ॥

माहीत असतां जो दुष्टपणामुळें साक्षच पतकरीत नाहीं त्याविषयीं सांगतो.

**मूलार्थ**– माहीत असूनहि जो दुष्ट मनुष्य साक्ष देत नाहीं तो निश्चयें पापानें व दंडानेंहि कूटसाक्षीसमान जाणावा.

साक्षीदारांस वाका चांगला ठाऊक असूनहीं दुशमनकीमुळें नाकबूल जातो तर तो कूट साक्षी.

**टीकार्थ**– ५ जो दुष्ट मनुष्य विवादसंबंधी वाका सर्व ठाऊक असतांहि साक्ष देत नाहीं तो खोटी साक्ष देणारासमान दोषी व दंड्य होतो. कूट साक्षींस दंड पुढें ( ६ व्या शाखेच्या १ल्या अंकांत) सांगितला आहे. कूट साक्षींस दंड करून पुनः वादाची चौकशी चालवावी. निर्णय झाल्यानंतरहि जर खोटी साक्ष उघडकीस आली, तर तो वाद उलटावा. ( व्यास प्रमाण )

**मनु**– ज्या ज्या वादांत खोटी साक्ष दिली असेल तो तो वाद निर्णीत केला असला तरी निर्णीत न केल्यासारखा आहे म्हणून तो उलटावा. ७७

**द्वैधे बहूनां वचनं समेषु गुणिनां तथा ।**
**गुणिद्वैधे तु वचनं ग्राह्यं ये गुणवत्तमाः ॥ ७८ ॥**

साक्षिविप्रतिपत्तौ कथं निर्णय इत्यत आह ॥ साक्षिणां द्वैधे विप्रतिपत्तौ बहूनां वचनं ग्राह्यम् । समेषु समसंख्येषु द्वैधे ये गुणिनस्तेषां वचनं प्रमाणं । यदा पुनर्गुणिनां विप्रतिपत्तिस्तदा ये गुणवत्तमाः श्रुताध्ययनतदर्थानुष्ठानधनपुत्रादिगुणसंपन्नास्तेषां वचनं ग्राह्यं । यत्र तु गुणिनः कतिपये इतरे च बहवस्तत्रापि गुणिनामेव वचनं ग्राह्यं । उभयानुमतः साक्षी भवत्येकोपि धर्मविदिति गुणातिशयस्य मुख्यत्वात् । यत्तु भेदादसाक्षिण इत्युक्तं तत्सर्वसाम्येनागृह्यमाणविशेषविषयम् ॥ ७८ ॥

साक्षीमध्यें द्वैध प्राप्त झालें तर कसा निर्णय करावा तें सांगतो.

**मूलार्थ**– द्वैध पडलें असतां बहुतांचें वचन घ्यावें, समसंख्याकांचें द्वैध पडलें तर गुणवानांचें, तसेंच गुणवानांचें द्वैध पडलें तर विशेष गुणवान असतील त्यांची साक्ष घ्यावी.

**टीकार्थ**– ६ साक्षींचें द्वैध असतां बहुतांची साक्ष असेल ती प्रमाण मानावी, समसं-

साक्षीदारांचें द्वैध पडल्यास त्यांत बहुसंमत जी साक्ष ती घ्यावी.

ल्यांक साक्षींचें द्वैध पडलें तर त्यांत जे **गुणी** असतील त्यांची साक्ष प्रमाण, गुणवानांची विप्रतिपत्ति पडली तर जे **विशेष गुणी** ह्मणजे वेदशास्त्र, आचार, धन, पुत्र, इत्यादि गुणांनीं संपन्न असतील त्यांची साक्ष घ्यावी.

कांहीं गुणवान् आणि दुसरे बहुत आहेत तर गुणवानांची साक्ष प्रमाण.

७ जर कितीएक **गुणी** आणि दुसरे बहुत अशा साक्षींचें द्वैध प्राप्त झालें तर गुणवानांचीच साक्ष प्रमाण घ्यावी. कारण, "धर्मज्ञ असा मनुष्य उभयतांस मान्य असल्यास एकही साक्षी पुरे होतो" असें पूर्वीं ( २ ऱ्या शाखेच्या ६ व्या अंकाचे वचनांत ) गुणाधिक्याविषयीं मुख्यत्व सांगितलें आहे.

८ जे ( २ ऱ्या शाखेच्या ३ ऱ्या अंकांतील नारदवचनांत) **भेदनिषिद्ध** साक्षी सांगितले आहेत, ते सर्व संख्येनें व गुणेंकरून समान असल्यामुळें त्यांमध्यें जर विशेष समजण्यांत येत नाहीं तर ते भेदनिषिद्ध साक्षी होतात. जर विशेष समजला तर ते भेदनिषिद्ध होत नाहींत. तात्पर्य कीं असल्या साक्षींची साक्ष घेण्यास चिंता नाहीं. ७८

---

**यस्योचुः साक्षिणः सत्यां प्रतिज्ञां स जयी भवेत् ।**
**अन्यथा वादिनो यस्य ध्रुवस्तस्य पराजयः ॥ ७९ ॥**

साक्षिभिश्च कथमुक्ते जयः कथं वा पराजय इत्यत आह ॥ यस्य वादिनः प्रतिज्ञां द्रव्यजातिसंख्यादिविशिष्टां साक्षिणः सत्यां वदन्ति सत्यमेवं जानीमो वयमिति स जयी भवति । यस्य पुनर्वादिनः प्रतिज्ञामन्यथा वैपरीत्येन मिथ्यैतदिति वदन्ति तस्य पराजयो ध्रुवो निश्चितः । यत्र तु प्रतिज्ञातार्थस्य विस्मरणादिना भावाभावौ साक्षिणो न प्रतिपादयन्ति तत्र प्रमाणान्तरेण निर्णयः कार्यः । न च राज्ञा साक्षिणः पुनः पुनः प्रष्टव्याः स्वभावोक्तमेव वचनं ग्राह्यं ॥ यथाह । स्वभावोक्तं वचस्तेषां ग्राह्यं यद्दोषवर्जितम् । उक्ते तु साक्षिणा राज्ञा न प्रष्टव्याः पुनःपुनरिति ॥७९॥

शाखा ५ वी.

साक्षींनीं कशी साक्ष दिली असतां जय होतो व कशी दिली असतां पराजय होतो तें सांगतो.

**मूलार्थ**– ह्याचा वाद खरा आहे असें साक्षी सांगतील तो जय पावेल, ज्याची साक्ष विपरीत देतील त्याचा पराजय निश्चित होईल.

**टीकार्थ**–१ ज्या वादीच्या वादाविषयीं साक्षी साक्ष देतील कीं, द्रव्य, जाति, संख्या, इत्यादिविशिष्ट वाद ह्याचा खरा आहे असें आम्हांस माहित आहे तो जय पावतो.

ज्याचा वाद खरा असें साक्षी सांगतील तो जय पावेल.

---

१ येथें गुणी म्हणजे २ ऱ्या शाखेच्या १ ल्या अंकांत सांगितल्याप्रमाणें असावे.

२ ज्या वादीच्या वादाविषयीं साक्षी सांगतील कीं, याचा वाद खोटा आहे, त्याचा पराजय निश्चित होतो.

३ जेथें साक्षी विस्मृतीमुळें वादाविषयीं सत्य किंवा मिथ्या सांगत नाहींत, तेथें दुसऱ्या प्रमाणानें ( लेख भोग वगैरेनीं ) निर्णय करावा. परंतु राजानें त्यांस वारंवार पुसूं नये, जें स्वाभाविक बोलतील तेंच घ्यावें.

साक्षीदारांकडून विस्मृतीमुळें खरें खोटें सांगवत नाहीं तर त्याविषयींचा प्रकार.

स्मृति— राजानें त्यांचें जें निर्दोष स्वाभाविक भाषण असेल तेंच घ्यावें, साक्षी एकवार बोलले असतां त्यांस वारंवार पुसूं नये. ७९

---

## उक्तेऽपि साक्षिभिः साक्ष्ये यद्यन्ये गुणवत्तमाः ।
## द्विगुणा वान्यथा ब्रूयुः कूटाः स्युः पूर्वसाक्षिणः ॥ ८० ॥

अन्यथा वादिनो यस्य ध्रुवस्तस्य पराजय इत्यस्यापवादमाह ॥ पूर्वोक्तलक्षणैः साक्षिभिः साक्ष्ये स्वाभिप्राये प्रतिज्ञातार्थवैपरीत्येनाभिहिते यद्यन्ये पूर्वेभ्यो गुणवत्तमाः द्विगुणा वा अन्यथा प्रतिज्ञातार्थानुगुण्येन साक्ष्यं ब्रूयुस्तदा पूर्वे साक्षिणः कूटा मिथ्यावादिनो भवेयुः । नन्वेतदनुपपन्नम् । अर्थिप्रत्यर्थिसभ्यसभापतिभिः परीक्षितैः प्रमाणभूतैः साक्षिभिर्निगदिते प्रमाणान्तरान्वेषणेऽनवस्थादोषप्रसङ्गात् ॥ निर्णिक्ते व्यवहारे तु प्रमाणमफलं भवेत् । लिखितं साक्षिणो वापि पूर्वमावेदितं न चेत् । यथा पक्वेषु धान्येषु निष्फलाः प्रावृषो गुणाः । निर्णिक्तव्यवहाराणां प्रमाणमफलं तथेति नारदवचनाच्च । उच्यते । यदार्थी प्रतिज्ञातार्थस्यान्तरात्मसाक्षिकत्वेनानाविष्कृतदोषाणामपि साक्षिणां वचनमर्थविसंवादित्वेनाप्रमाणंमन्यमानः साक्षिष्वपि दोषं कल्पयति तदा प्रमाणान्तरान्वेषणं केन वार्यते। उक्तं च । यस्य च दुष्टं करणं यत्र च मिथ्येति प्रत्ययः स एवासमीचीन इति । यथा चक्षुरादिकरणदोषानध्यवसायेऽप्यर्थविसंवादात्तज्जनितस्य ज्ञानस्य प्रामाण्येन करणदोषकल्पना । तथहापि साक्षिपरीक्षातिरेकेण वाक्यपरीक्षोपदेशाच्च साक्षिभिर्भाषितं वाक्यं सहसभ्यैः परीक्षयेदिति । कात्यायनेनाप्युक्तं । यदा शुद्धा क्रिया न्यायात्तदा तद्वाक्यशोधनं । शुद्धाच्च वाक्याद्यः शुद्धः स शुद्धोऽर्थ इति स्थितिरिति । क्रिया साक्षिलक्षणा नार्थिसंबन्धिनो नाप्ता इति न्यायाद्यदा शुद्धा तदा तद्वाक्यशोधनं साक्षिवाक्यशोधनं कर्तव्यम् । वाक्यशुद्धिश्च सत्यार्थप्रतिपादनेन । सत्येन शुद्ध्यते वाक्यमिति स्मरणात् । एवं शुद्धायाः क्रियायाः शुद्धवाक्याच्च यः शुद्धोऽवगतोर्थः स शुद्धस्तथाभूत इति स्थितिरीदृशी मर्यादा न्यायविदाम् । कारणदोषबाधकप्रत्ययाभावे सत्यावितथ एवार्थ इत्यर्थः । ननु स्वयमर्थिना प्रमाणीकृताः साक्षिणोऽतिक्रम्य कथं क्रियान्तरं प्रमाणीक्रियते नैष दोषः । यतः क्रियां बलवतीं मुक्त्वा दुर्बलां योऽवलंबते । स जयेऽवधृते सभ्यैः पुनस्तां नाप्नुयात्क्रियामिति कात्यायनेन जयावधारणोत्तरकालं

क्रियान्तरपरिग्रहनिषेधाज्जयावधारणात्प्राक्क्रियान्तरपरिग्रहो दर्शितः । नारदेनापि । निर्णिक्ते व्यवहारे तु प्रमाणमफलं भवेदिति वदता जयावधारणोत्तरकालमेव प्रमाणान्तरं निषिद्धं न प्रागपि । तस्मादुक्तेऽपि साक्षिभिः साक्ष्ये अपरितुष्यता क्रियान्तरमङ्गीकर्तव्यमिति स्थितम् । एवं स्थिते यद्यभिहितवचनेभ्यः साक्षिभ्यो गुणवत्तमाः द्विगुणा वा पूर्वनिर्दिष्टा असन्निहिताः साक्षिणः सन्ति तदा त एव प्रमाणीकर्तव्याः ॥ स्वभावेनैव यद्ब्रूयुस्तद्ग्राह्यं व्यावहारिकमितरस्य सर्वव्यवहारशेषत्वात् ॥ निर्णिक्ते व्यवहारेषु प्रमाणमफलं भवेत् । लिखितं साक्षिणो वापि पूर्वमावेदितं नचेदिति नारदवचनाच्च पूर्वनिर्दिष्टानामसंभवे त्वनिर्दिष्टा अपि तथाविधा एव साक्षिणो ग्राह्या न दिव्यं ॥ संभवे साक्षिणां प्राज्ञो वर्जयेद्दैविकीं क्रियामिति स्मरणात् । तेषामसंभवे दिव्यं प्रमाणं कर्तव्यम् । अतः परमपरितुष्यताप्यर्थिना न प्रमाणान्तरमन्वेषणीयम् । मनुवचनादिति परिसमापनीयो व्यवहारः । यत्र तु प्रत्यर्थिनः स्वप्रत्ययविसंवादित्वेन साक्षिवचनस्याप्रामाण्यं मन्यमानस्य साक्षिषु दोषारोपणेनापरितोषस्तत्र प्रत्यर्थिनः क्रियोपन्यासावसराभावात्सप्ताहावधिकदैविकराजिकव्यसनोद्भवेन साक्षिपरीक्षणं कर्तव्यं । तत्र च दोषावधारणे साक्षिणो विवादास्पदीभूतमृणं दाप्याः । सारानुसारेण दण्डनीयाश्च । अथ दोषानवधारणं तदा प्रत्यर्थिना तावता संतोष्टव्यम् । यथाह मनुः । यस्य दृश्येत सप्ताहादुक्तवाक्यस्य साक्षिणः । रोगोऽग्निर्ज्ञातिमरणमृणं दाप्यो दमं च स इति एतच्च यस्योचुः साक्षिणः सत्यां प्रतिज्ञां स जयी भवेदित्यस्यापरितुष्यत्प्रत्यर्थिविषयेऽपवादो द्रष्टव्यः । केचिदुक्तेऽपि साक्षिभिः साक्ष्ये इत्येतद्वचनमर्थिना निर्दिष्टेषु साक्षिष्वर्थ्यनुकूलमभिहितवत्सु यदि प्रत्यर्थी गुणवत्तमान् द्विगुणान्वान्यान् साक्षिणः पूर्वोक्तविपरीतं संवादयति तदा पूर्ववादिनः साक्षिणः कूटा इति व्याचक्षते । तदसत् । प्रत्यर्थिनः क्रियानुपपत्तेः । तथा हि । अर्थीनाम साध्यस्यार्थस्य निर्देष्टा तत्प्रतिपक्षतदभाववादी प्रत्यर्थी तत्राभावस्य भावसिद्धिसापेक्षसिद्धित्वाद्भावस्य वा भावनिरपेक्षसिद्धित्वाद्भावस्यैव साध्यत्वं युक्तं । अभावस्वरूपेण साक्ष्यादिप्रमेयत्वाभावात् । अतश्चार्थिन एव क्रिया युक्ता अपि चोत्तरानुसारेण सर्वत्रैव क्रिया नियता स्मर्यते ॥ प्राङ्न्यायकारणोक्तौ तु प्रत्यर्थी निर्दिशेत्क्रियाम् । मिथ्योक्तौ पूर्ववादी तु प्रतिपत्तौ न सा भवेदिति । न चैकस्मिन्व्यवहारे द्वयोः क्रिया ॥ न चैकस्मिन्विवादे तु क्रिया स्याद्वादिनोर्द्वयोरिति स्मरणात् । तस्मात्प्रतिवादिनः साक्षिणो गुणवत्तमा द्विगुणा वान्यथा ब्रूयुरित्यनुपपन्नं । अथ मतम् । यत्र द्वावपि भावप्रतिज्ञावादिनौ मदीयमिदं दायादप्राप्तं मदीयमिदं दायादप्राप्तमिति प्रतिज्ञावादिनोः पूर्वापरकालविभागानाकलितमेव वदतस्तत्र द्वयोः साक्षिषु सत्सु कस्य साक्षिणो ग्राह्या इत्याकांक्षायां द्वयोर्विवदतोरर्थे द्वयोः सत्सु च साक्षिषु । पूर्वपक्षो भवेद्यस्य भवेयुस्तस्य साक्षिण इति वचनेन यः पूर्वं निवेदयति तस्य साक्षिणो ग्राह्या इति स्थिते तस्यापवाद माह । उक्तेऽपि साक्षिभिः साक्ष्ये इति अतश्च पूर्वोत्तरयोर्वादिनोः समसंख्येषु समगुणेषु साक्षिषु सत्सु पूर्ववादिन एव साक्षिणः प्रष्टव्याः । यदा तु उत्तर-

वादिनः साक्षिणो गुणवत्तमा द्विगुणा वा तदा प्रतिवादिनः साक्षिणः प्रष्टव्याः। एवं च नाभावस्य साध्यता उभयोरपि भाववादित्वाच्चतुर्विधोत्तरविलक्षणत्वाच्च प्रकृतोदाहरणेन क्रियाव्यवस्था । एकस्मिन्व्यवहारे यथैकस्यार्थिनः क्रियाद्वयं परमते तथा वादिप्रतिवादिनोः क्रियाद्वयेऽप्यविरोध इति तदप्याचार्यो नानुमन्यते । उक्तेपि साक्षिभिः साक्ष्ये इत्यपिशब्दादर्थात्प्रकरणाद्वार्थस्यानवगमादित्यलं प्रसङ्गेन ॥८०॥

ज्या वादीच्या वादाविषयीं साक्षी सांगतील कीं, ह्याचा वाद खोटा आहे, त्याचा पराजय होतो असें जें पूर्वी ( दुसऱ्या अंकांत ) सांगितलें त्याचा अपवाद सांगतो.

**मूलार्थ–** साक्षींनीं साक्ष दिली असतांहि जर दुसरे विशेष गुणवान किंवा दुपट ( साक्षी ) विपरीत बोलतील तर पहिले साक्षी खोटे जाणावे.

**टीकार्थ–** ४ पूर्वी सांगितलेल्या लक्षणयुक्त साक्षींनीं वादीच्या अर्थाविषयीं प्रतिकूळ साक्ष दिली असतां जर पहिल्यापेक्षां विशेष गुणवान किंवा दुपट संख्येचे साक्षी वादीच्या तर्फेनें अनुकूळ साक्ष देतील तर पहिले साक्षी खोटे ठरतील.

पहिल्या साक्षींपेक्षां दुसरे दुपट साक्षी पूर्वविपरीत साक्ष देतील तर पहिले खोटे.

५ **शंका–** वर सांगितल्याची उपपत्ति ( विचार ) घटत नाहीं; कारण, वादी, प्रतिवादी, सभासद, न्यायाधीश, ह्यांनीं परीक्षा करून प्रमाण केलेले अशा साक्षींनीं साक्ष दिली असतां दुसरें प्रमाण ( दुसरे साक्षी ) शोधिलें तर अनवस्थारूप दोष येईल.

**नारद–** लेख किंवा साक्षी ह्यांतून कोणताहि एक पुरावा जर पूर्वी निवेदित केला नाहीं आणि व्यवहारनिर्णय झाल्यानंतर तो दाखविला, तर तो व्यर्थ होतो. जसें धान्यें पक्क झाल्यानंतर पर्जन्यवृष्टि अनुपयोगी, तसाच व्यवहार निर्णीत झाल्यानंतर पुरावा दाखविणें हेंहि अनुपयोगी जाणावें.

६ **समाधान–** जेव्हां वादी आपल्या वादाच्या खरेपणामुळें हा माझा वाद निःसंशय खराच आहे अशी आपल्या मनाची पक्की खात्री असल्यामुळें आणि साक्षी खरी साक्ष देतील असें वाटत होतें तरी त्यांची साक्ष आपल्या वादाविषयीं प्रतिकूळ असल्यामुळें ती अप्रमाण मानून साक्षींवरहि दोषकल्पना करितो, तेव्हां दुसरा पुरावा घेण्याविषयीं कोण निवारण करूं शकेल, आणि असें सांगितलें आहे कीं, " ज्याचें मुख्य साधन सदोष व ज्यावर खोटेपणाचा ग्रह होतो तो वादच अयोग्य जाणावा. जसें रूपविषयाचें प्रत्यक्ष होण्याविषयीं मुख्य कारण जें नेत्रेंद्रिय त्यावर दोषाचा निश्चय नसतांहि भ्रमाच्या योगानें शुक्तिरजतासारखें पदार्थाचें विपरीत प्रत्यक्ष झाल्यामुळें तज्जनित ज्ञान अप्रमाण मानून त्या ज्ञानाचें कारण जें नेत्रेंद्रिय त्याविषयीं दोषकल्पना होते, तद्वत् एथेंहि जाणावें.

**स्मृति–** न्यायाधीशानें सभासदांसहवर्तमान साक्षींच्या भाषणाची परीक्षा करावी.

---

१ पूर्वी म्हणजे २ ऱ्या शास्त्राच्या १ ल्या अंकांत. २ ज्या इंद्रियानें ज्याचें प्रत्यक्ष होतें तो त्या इंद्रियाचा विषय म्हटला आहे. श्रोत्रेंद्रियानें शब्दाचें प्रत्यक्ष होतें. रसनेंद्रियानें रसाचें प्रत्यक्ष होतें. चक्षुरिंद्रियानें रूपाचें प्रत्यक्ष होतें, हें चाक्षुष प्रत्यक्ष.

असें साक्षींची परीक्षा केल्यावांचूनहि त्यांच्या भाषणाची परीक्षा करण्याविषयीं सांगितलें आहे.

**कात्यायनहि** सांगतो– जेव्हां हे साक्षी योग्य आहेत असें न्यायेंकरून सिद्ध झालें म्हणजे त्यांच्या भाषणाची परीक्षा करावी. असे परीक्षा केलेले जे साक्षी त्यांचे भाषणानें शुद्ध झालेला जो अर्थ (व्यवहार) तोच शुद्ध निर्णीत झाला, असें समजावें.

**मनु**– ज्यांशीं प्रकृत धनसंबंध आहे ते व आप्त असे साक्षी घेऊं नयेत.

असा न्याय आहे ह्मणून त्याप्रमाणें साक्षी योग्य असें सिद्ध झालें म्हणजे त्यांच्या भाषणाची परीक्षा करावी, ती भाषणपरीक्षा सत्यार्थप्रतिपादनेंकरून होते, कारण,

**स्मृति**– सत्यार्थकथनानें वाक्यशुद्धि होते, ( असें स्मृतिवचन आहे ह्मणून )

ह्याप्रमाणें योग्य साक्षीरूप प्रमाण व त्या साक्षींचें यथार्थ भाषण ह्यापासून खरा अर्थ अवगत झाला तोच तथ्य, अशी न्याय करणाराची मर्यादा आहे. सारांश हा कीं, ज्या साक्षी वगैरे पुराव्यांत दोष नसतां व दुसराहि कांहीं बाध नसतां जो त्यापासून वास्तव अर्थ निष्पन्न होतो तोच निर्णायक. ( असा कात्यायनवचनाचा भावार्थ आहे ).

७ **शंका**– वादीनें स्वतां प्रमाण दाखविलेल्या साक्षींस टाकून दुसरें साक्षिप्रमाण कशासाठीं घ्यावें ?

८ **समाधान**– हा कांहीं दोष ह्मणण्यासारखा नाहीं; कारण,

**कात्यायन**– वादीनें सबळ प्रमाण पुराव्यास न देतां दुर्बळ प्रमाण पुराव्यास दिलें आणि त्यावरून सभासदांनीं वादाचा निर्णय केला, नंतर तो वादी दुसरें प्रमाण दाखवील तर तें लागू होणार नाहीं.

असा कात्यायनानें वादाचा निर्णय झाल्यानंतर दुसरें प्रमाण घेण्याचा निषेध सांगितल्यावरून अर्थात् निर्णय होण्यापूर्वीं दुसरा पुरावा घ्यावा असें दर्शविलें.

**नारदहि**– वादाचा निर्णय झाल्यानंतर पुरावा दाखविणें व्यर्थ आहे.

असें नारदानेंहि निर्णय झाल्यानंतरच आणखी प्रमाण दाखविणें निषेधिलें आहे, पूर्वीं नाहीं.

वादीकडील पहिले साक्षीची साक्ष प्रतिकूळ पडल्यास दुसरे साक्षी घ्यावे.

९ तस्मात् पहिल्या साक्षींनीं वादीच्या अर्थाविषयीं साक्ष दिली असतां वादीचा संतोष न होई तर त्यानें दुसरे साक्षी द्यावे. ह्यावरून ज्यांची साक्ष घेतली त्यापेक्षां विशेष गुणी किंवा (संख्येनें) दुप्पट असे पूर्वीं सांगितलेले साक्षी सन्निध नसले तरी तेच पुराव्यास घ्यावे असें झालें.

**स्मृति**– साक्षी जें स्वाभाविक बोलतील तेंच व्यवहारनिर्णयाविषयीं घ्यावें, हें सर्व व्यवहारीं समानच आहे ह्मणून.

**नारदहि**– लेख किंवा साक्षिप्रमाण जर पूर्वीं निवेदित केलें नाहीं आणि व्यवहारनिर्णय झाल्यानंतर दाखविलें तर तें व्यर्थ होतें. पूर्वीं निर्दिष्ट केलेले साक्षी मिळत नाहींत तर दुसरेहि त्यांसारखे साक्षीच घ्यावे, पण दिव्य करूं नये.

**स्मृति**– साक्षी मिळत असतां राजानें दिव्य प्रमाण घेऊं नये.

असें आहे ह्मणून त्याच्या असंभवीं दिव्यप्रमाण करावें. इतउत्तर वादीचा संतोष न

होई तरी दुसरें प्रमाण शोधूं नये. कारण, ह्याविषयीं वचन नाहीं, ह्मणून तितक्यानेंच व्यवहार पुरा करावा.

वादीकडील साक्षी पटल्यानंतर प्रतिवादीनें सात दिवस वाट पहावी.

१० साक्षींनीं आपणास प्रतिकूळ साक्ष दिल्यानें ती अप्रमाण मानणारा प्रतिवादी असंतुष्ट होऊन हे साक्षी खोटे असा त्यांवर दोषारोप करितो, तरी प्रतिवादीला प्रमाण दाखविण्यास अवसरच नाहीं, ह्मणून त्यानें सात दिवसांची मुदत करावी. त्यांत जर ते साक्षी राजिक दैविक उपद्रव होऊन दोषी ठरले, तर त्यांपासून विवादास्पदीभूत कर्ज देववून तारतम्यानें त्यांस दंड करावा. जर दोषनिश्चय होत नाहीं, तर प्रतिवादीनें तितक्यानेंच संतुष्ट व्हावें.

**मनु**— ज्या साक्ष देणारास सात दिवसांमध्यें रोग, अग्नि ह्यांचा उपद्रव होईल किंवा स्वजातींतून कोणी (आकस्मिक) मरेल त्यापासून वादीचें कर्ज देववून त्यास दंड करावा.

हा ( वर सांगितलेला ) प्रकार ह्या शाखेच्या १ ल्या अंकाचा बाध करणारा समजावा.

११ कोणी ( टीकाकार ) ९ व्या शाखेच्या ४ थ्या अंकांतील वचनाचा असा अर्थ करितात, कीं वादीनें दाखविलेले साक्षींनीं वादीच्या तर्फेनें साक्ष दिली असतां, प्रतिवादी जर त्यापेक्षां दुसरे गुणी किंवा त्यापेक्षां (संख्येनें) दुप्पट साक्षींकडून आपल्या तर्फेची साक्ष देववितो, तर पहिले वादीचे साक्षी खोटे समजावे.

१२ परंतु असा अर्थ करणें नीट नाहीं; कारण, प्रतिवादीकडून प्रमाण घेणें हें सयुक्त नाहीं. तें असें,—वादी म्हणजे स्वार्थाविषयीं वाद सांगणारा आणि तद्विरुद्ध बोलणारा तो प्रतिवादी, म्हणजे नाहीं ह्मणणारा ( अभाव सांगणारा ); त्यांत अभावाची सिद्धि भावसिद्धि झाल्यावांचून होत नाहीं. परंतु भावसिद्धीला अभावाच्या सिद्धीची गरज नाहीं, म्हणून भावालाच साध्यत्व हें सयुक्त. कारण, अभावाची स्वरूपतः साक्षी वगैरेकडून सिद्धि संभवत नाहीं, अतएव वादीनें प्रमाण ( साक्षी लेख भोगवटा ) दाखवावें हें सयुक्त.

आणखी प्रतिवादीकडील उत्तरास अनुसरूनच सर्व व्यवहारीं प्रमाणनिर्देश नियमित होतो अशी स्मृति आहे.

**स्मृति**— प्राङ्न्यायोत्तरस्थळीं व कारणोत्तरस्थळीं प्रतिवादीनें प्रमाणांचा पुरावा केला पाहिजे. आणि मिथ्योत्तरस्थळीं तर वादीनेंच प्रमाण दाखविलें पाहिजे. सत्योत्तरस्थळीं प्रमाणाची गरजच नाहीं.

एका व्यवहारांत वादी प्रतिवादी ह्या उभयतांचा प्रमाणनिर्देश होत नाहीं.

**स्मृति**— एका व्यवहारांत वादी प्रतिवादी ह्या उभयतांचा प्रमाण निर्देश होत नाहीं.

**स्मृति**— एका व्यवहारांत दोहीं वादींकडून पुरावा संभवत नाहीं. तस्मात् प्रतिवादी जर वादीच्या साक्षीपेक्षां गुणी किंवा दुप्पट साक्षींकडून आपल्या तर्फेची साक्ष देववितो,

[1] भाव म्हणजे ह्याजकडे माझें अमुक येणें आहे अशी सत्तारूप क्रिया, आणि अभाव म्हणजे मी घेतलें नाहींतें असें नाहीं म्हणणें.

तर वादीचे साक्षी खोटे ठरतात; असा ( ह्या शाखेच्या ४ थ्या अंकांतील वचनाचा ) अर्थ केला त्याची उपपत्ति होत नाहीं.

१३ आणखी असें कोणाचें मत आहे कीं, ज्या व्यवहारीं दोघेही फिर्यादीच आहेत; म्हणजे माझें हें धन दायलब्ध आहे असें म्हणणारे आहेत; परंतु पहिल्यानें एकाला मिळालें, आणि मग दुसऱ्यास, असा पूर्वापर कालज्ञानावांचून विवाद करीत आहेत, व दोघांचेहि साक्षी आहेत, तर कोणाचे साक्षी घ्यावे, अशी आशंका असतां सांगतो.

**नारद**— एका अर्थाविषयीं दोघे भांडत आहेत, आणि दोघांचेही साक्षी आहेत, तर **पूर्ववादीचे साक्षी प्रमाण** घ्यावे.

अशा वचनेंकरून जो पूर्वी फिर्याद करितो त्याचे साक्षी घ्यावे, असें सिद्ध झालें असतां त्याचें बाधक हें (ह्या शाखेच्या ४ थ्या अंकांतील) वचन आहे ह्यास्तव **पूर्ववादी** व **उत्तरवादी** अशा दोघां वादींचेहि साक्षी गुणानें व संख्येनें समान आहेत तर **पूर्ववादीचे** साक्षी प्रमाण घ्यावे. जर उत्तर वादीचे साक्षी ( पूर्ववादीच्या साक्षीपेक्षां ) विशेष गुणी किंवा दुप्पट आहेत, तर उत्तरवादीचेच साक्षी घ्यावे.

उभयतांचेही साक्षी संख्या व गुण ह्यांकडून समान असल्यास कोणतें सबळ प्रमाण.

येथें अभावाला साध्य दशा नाहीं; कारण दोघेही फिर्यादीच झाले, सबब हें उत्तर चोहीं[1] प्रकारच्या उत्तरांपेक्षां विलक्षण आहे, म्हणून प्रकृत उदाहरणीं ( वरच्या नारदवचनांत ) साक्षीविषयीं व्यवस्था सांगितली ती नीट नाहीं.

१४ जसें दुसऱ्याच्या मतीं एका व्यवहारीं एका वादीचीं दोन प्रमाणें ( पहिल्या साक्षीपेक्षां गुणवंत व दुप्पट साक्षी ) होतात; तसें वादी प्रतिवादी ह्या दोघांचेहि आपापल्या तर्फेचे निरनिराळे साक्षी प्रमाण घेतले असतां विरोध येत नाहीं, असें जें मत आहे तेंहि आचार्यांस अनुमत नाहीं. कारण, ह्या शाखेच्या ४ थ्या अंकांतील वचनांत अपिशब्द आहे व अर्थापासून किंवा प्रकरणापासूनहि सदरहू अर्थाची ( १३ व्या अंकाची ) प्रतीति होत नाहीं म्हणून हा विचार पुरे. ८०

---

**पृथक्पृथग्दण्डनीयाः कूटकृत्साक्षिणस्तथा ।**
**विवादाद्विगुणं दण्डं विवास्यो ब्राह्मणः स्मृतः ॥ ८१ ॥**

कूटसाक्षिणो दर्शितास्तेषां दण्डमाह। यो धनदानादिना कूटान्साक्षिणः करोतीति स कूटकृत् साक्षिणश्च ये तथा कूटास्ते विवादाद्विवादपराजयात्पराजये यो दण्डस्तत्र तत्रोक्तः तं दण्डं द्विगुणं पृथक्पृथगेकैकशो दण्डनीयाः । ब्राह्मणस्तु विवास्यो राष्ट्रान्निर्वास्यो न दण्डनीयः । एतच्च लोभादिकारणविशेषापरिज्ञाने अनभ्यासे च द्रष्टव्यम् । लोभादिकारणविशेषपरिज्ञाने अभ्यासे च मनुनोक्तम् । लोभात्सहस्रं दण्ड्यः स्या-

१ चोहीं प्रकारचे म्हणजे १ ल्या प्रकरणांतील १० व्या शाखेच्या २ ऱ्या अंकांत सांगितलेलें.

न्मोहात्पूर्वं तु साहसम् । भयादौ मध्यमो दण्डो मैत्र्यात्पूर्वं चतुर्गुणम् । कामाद्दश-गुणं पूर्वं क्रोधात्तु त्रिगुणं परम् । अज्ञानाद्द्वेशते पूर्णे बालिश्याच्छतमेव त्विति । तत्र लोभोऽर्थलिप्सा । मोहो विपर्ययज्ञानं । भयं संत्रासः । मैत्री स्नेहातिशयः । कामः स्त्र्यभिव्यति-रेकाभिलापः । क्रोधोऽमर्षः । अज्ञानमस्फुटज्ञानम् । बालिश्यं ज्ञानानुत्पादः । सहस्रादिषु ताम्रिकाः पणा गृह्यन्ते । तथा कौटसाक्ष्यं तु कुर्वाणांस्त्रीन्वर्णान्धार्मिको नृपः । प्रवासये-द्दण्डयित्वा ब्राह्मणं तु विवासयेदिति । एतच्चाभ्यासविषयं । कुर्वाणानिति वर्तमानका-लनिर्देशात् । त्रीन्वर्णान् क्षत्रियादीन् पूर्वोक्तं दण्डयित्वा प्रवासयेत् मारयेत् । अर्थशास्त्रे प्रवासशब्दस्य मारणे प्रयोगात् । अस्य चार्थशास्त्रस्वरूपत्वात् । तत्रापि प्रवासनमो-ष्ठच्छेदनं जिव्हाच्छेदनं प्राणवियोजनं च कौटसाक्ष्यविषयानुसारेण द्रष्टव्यम् । ब्राह्मणं तु दण्डयित्वा विवासयेत् स्वराष्ट्रान्निष्कासयेत् । यद्वा विवासयेत् । वाससो विगतो विवासाः विवाससं करोति णिचि कृतेणाविष्ठवत्प्रातिपदिकस्येति टिलोपे रूपम् । नग्नीकुर्यादित्यर्थः । अथवा वसत्यस्मिन्निति वासो गृहं विवासयेत् भग्नगृहं कुर्यादिति । ब्राह्मणस्यापि लोभादिकारणविशेषापरिज्ञाने अनभ्यासे च तत्र त-त्रोक्तो दण्ड एव । अभ्यासे त्वर्थदण्डो विवासनं च तत्रापि जातिद्रव्यानुबन्धाद्य-पेक्षया विवासनं नग्नीकरणं गृहभङ्गो देशान्निर्वासनं चेति व्यवस्था द्रष्टव्या । लोभादि कारणविशेषापरिज्ञाने अनभ्यासे चाल्पविषये कौटसाक्ष्ये ब्राह्मणस्यापि क्षत्रियादि-वदर्थदण्ड एव । महाविषये तु देशान्निर्वासनमेव । अत्राप्यभ्यासे सर्वेषामेव मनूक्तं द्रष्टव्यम् । न च ब्राह्मणस्यार्थदण्डो नास्तीति मन्तव्यम् । अर्थदण्डाभावे शारीरद-ण्डे च निषिद्धे स्वल्पेऽप्यपराधे नग्नीकरणगृहभङ्गाङ्ककरणविप्रवासनं दण्डाभावो वा प्रसज्येत । चतुर्णामपि वर्णानां प्रायश्चित्तमकुर्वताम् । शारीरं धनसंयुक्तं दण्डं धर्म्यं प्रकल्पयेदिति स्मरणाच्च । तथा सहस्रं ब्राह्मणो दण्ड्यो गुप्तां विप्रां बलाद्व्रजन्निति स्मरणात् । यत्तु शङ्खवचनं । त्रयाणां वर्णानां धनापहारवधबन्धनक्रियाविवास-नाङ्ककरणं ब्राह्मणस्येति । तत्र धनापहारः सर्वस्वापहारो विवक्षितो वधसाहचर्यात् । शारीरस्त्ववरोधादिर्जीवितान्तः प्रकीर्तितः । काकिण्यादिस्त्वर्थदण्डः सर्वस्वान्त-स्तथैव चेति । वधसर्वस्वहरणयोः सहपाठात् । यदप्युक्तं । राष्ट्रादेनं बहिः कुर्यात्स-मग्रधनमक्षतमिति तत्प्रथमकृतसाहसविषयम् न सर्वविषयम् । शारीरस्तु ब्राह्मणस्य न कदाचिद्भवति । न जातु ब्राह्मणं हन्यात्सर्वपापेष्वपि स्थितमिति सामान्येन मनु-स्मरणात् । तथा । न ब्राह्मणवधाद्भूयानधर्मो विद्यते भुवि । तस्मादस्य वधं राजा मनसापि न चिन्तयेदिति ॥ ८१ ॥

शाखा ६ वी.

( ९ व्या शाखेच्या ४ थ्या अंकांत ) खोटे साक्षी सांगितले आहेत त्यांस दंड सांगतो.

मूलार्थ— खोटे साक्षी करणारा व खोटी साक्ष देणारे यांस वादाच्या दुप्पट प्रत्येकास दंड करावा, ब्राह्मण तर हद्दपार करावा.

**टीकार्थ**— १ जो मनुष्य लांच वगैरे देऊन खोटे साक्षी करितो, व जो लांच वगैरे घेऊन खोटी साक्ष देतो तो, ह्या प्रत्येकापासून त्या त्या वादांत जो जो पराजयनिमित्त दंड सांगितला आहे त्याच्या दुप्पट दंड घ्यावा. तो ( खोटी साक्ष देवविणारा किंवा देणारा ) ब्राह्मण असेल तर त्यापासून दंड घेऊं नये, हद्दपार करावा.

खोटी साक्ष देणारास व देवविणारास वादाच्या दुप्पट दंड करावा.

२ परंतु हा ( वर सांगितलेला ) दंडप्रकार लालूच वगैरे निरनिराळें कारण माहीत नसल्यास व एकवार घडलें असल्यास योजावा. लालूच वगैरे निरनिराळें कारण समजण्यांत आलें व वारंवार असा प्रकार घडण्यांत आला तर ( खालीं ) मनूनें सांगितलेले दंड योजावे.

खोटी साक्ष देण्याविषयीं लालूच वगैरे निरनिराळ्या कारणामुळें दंड.

**मनु**— लोभामुळें ( खोटी साक्ष देवविणारास किंवा देणारास ) सहस्र दंड करावा; मोहानें खोटी साक्ष देणारास **प्रथम साहस** दंड; भयानें खोटी साक्ष देणारास दोन **मध्यम साहस** दंड; स्नेहभावानें खोटी साक्ष देणारास **प्रथम साहसाच्या** चौपट दंड करावा; कामातुरपणामुळें खोटी साक्ष देणारास **प्रथम साहसाच्या** दसपट दंड; आणि क्रोधानें असें करणारास **उत्तम साहसाच्या** तिप्पट दंड; अज्ञानामुळें खोटी साक्ष देणारास २०० दंड, मूर्खपणामुळें असें घडल्यास शंभर दंड करावा.

वरच्या मनुवचनांत सहस्र वगैरे जी दंडसंख्या सांगितली तेथें तांब्याचे पण समजावे.

**मनु**— ३ तीन वर्ण जर खोटी साक्ष देतात ( किंवा देववितात ) तर धार्मिक राजानें दंड करून मारावें, आणि ब्राह्मणास तर दंड करून **विवास** करावें.

खोटी साक्ष देणारास जातिपरत्वें दंड.

हा प्रकार वारंवार असें घडल्यास त्याविषयीं जाणावा. कारण, "देतात" असा रीतिवर्तमान काळीं निर्देश केला आहे ह्मणून. तीन वर्ण म्हणजे क्षत्रिय, वैश्य, शूद्र ह्यांस पूर्वी ( १ ल्या अंकांत ) सांगितलेला दंड करून मारावें असें वर सांगितलें, तें मारणें ह्मणजे ओंठ कापणें, जीभ कापणें, वध करणें ह्या शिक्षा खोट्या साक्षीच्या अपराधतारतम्यानें योजाव्या. ब्राह्मणास धनदंड करून हद्दपार करावें, किंवा **विवास** ह्मणजे नागवें करावें, अथवा विवास म्हणजे गृहविच्छिन्न करावें.

लांच वगैरे कारण समजण्यांत न आल्यास व एक वार अपराध घडल्यास ब्राह्मणासहि त्या त्या स्थळीं सांगितलेला धनदंड करावा, वारंवार घडल्यास धनदंड करून जात, द्रव्य, अपराध ह्यांच्या तारतम्यानें नग्न करणें, घर मोडणें, हद्दपार करणें, ह्या शिक्षा योजाव्या.

लांच वगैरे कारण समजण्यांत न आलें व अपराध एकवार घडला आहे व तो अपराध थोडक्या अर्थाविषयीं आहे तर ब्राह्मणासहि क्षत्रियादिकांप्रमाणें धनदंडच करावा. महान् अर्थाविषयीं अपराध असेल तर ( धनदंड ) करून हद्दपार करणें हीच शिक्षा करावी.

एथेंहि वारंवार ( खोटी साक्ष देणें किंवा देवविणें ) घडलें असल्यास सर्वांस वरच्या मनुवचनांत सांगितल्याप्रमाणेंच दंड योजावे.

४ ब्राह्मणास धनदंड नाहीं असें समजूं नये; कारण, ब्राह्मणास शारीर दंड तर पूर्वीच ( २ ऱ्या प्रकरणांतील १० व्या शाखेच्या १५ व्या अंकांत ) निषेधिला आहे, ह्मणून शारीर दंड न केला व धनदंडहि न केला तर स्वल्प अपराधाविषयीं देखील नग्न करणें, गृहविच्छिन्न करणें, डाग देणें, हद्दपार करणें, ह्याच शिक्षा कराव्या लागतील, किंवा अगदीच दंड करूं नये असें प्राप्त होईल, व (खालीं सांगितलेल्या ) मनुवचनासहि विरोध येईल.

**मनु**—चारी वर्ण प्रायश्चित्त न करितील तर त्यांस धनदंडासुद्धां यथाशास्त्र शारीर दंड योजावा. "तसेंच संरक्षित ब्राह्मणीशीं बलात्कारानें संग करणाऱ्या ब्राह्मणास सहस्र (पण) दंड करावा."

**शंख**— तीन वर्णांस ( क्षत्रिय, वैश्य, शूद्र ह्यांस ) धनापहार, वध, बंधन ( कैद ) ह्या शिक्षा आणि ब्राह्मणास नग्न करणें, गृहविच्छिन्न करणें, देशांतून हाकून देणें, डाग देणें ह्या शिक्षा.

असें जें वचन आहे त्यांत धनापहार म्हणजे सर्वस्वहरण समजावें; कारण, वधाबरोबर धनापहार पठित आहे.

**स्मृति**— बंधनापासून वधपर्यंत जितकी शिक्षा तो सर्व शारीर दंड म्हटला आहे. आणि काकिणीपासून सर्वस्वहरणापर्यंत सगळे धनदंड म्हटले आहेत.

असा वधदंडाबरोबर सर्वस्वहरण दंड पठित आहे.

**मनु**— ५ ब्राह्मणाच्या शरीरास क्षत न होतां व धनाची हानि न होतां त्याला देशांतून बाहेर करावें.

असें जें सांगितलें आहे तेंहि प्रथमसाहस अपराधाविषयीं आहे. सर्वापराधांविषयीं नव्हे. ब्राह्मणाला शारीरदंड तर कधीं करूं नये.

**मनु**— जरी ब्राह्मण सर्व प्रकारचीं पापें आचरीत असला तरी त्याला कधींहि मारूं नये; तसेंच ब्राह्मणवधाहून दुसरा मोठा अधर्म ह्या भूलोकीं कोणता नाहीं, ह्यास्तव राजानें ब्राह्मणवधाविषयीं मनांत कल्पना देखील आणूं नये. ८१

---

## यः साक्ष्यं श्रावितोऽन्येभ्यो निन्हुते तत्तमोवृतः ।
## स दाप्योऽष्टगुणं दण्डं ब्राह्मणं तु विवासयेत् ॥ ८२ ॥

अपि च-यस्तु साक्षित्वमङ्गीकृत्यान्यैः साक्षिभिः सह साक्ष्यं श्रावितः सोऽन्नगदनकाले तमोवृतो रागाद्याक्रान्तचित्तस्तत्साक्ष्यमन्येभ्यः साक्षिभ्यो निन्हुते नाहमत्र साक्षी भवामीति स विवादपराजये यो दण्डस्तं दण्डमष्टगुणं दाप्यः । ब्राह्मणं पुनरष्टगुणद्रव्यदण्डदानासमर्थं विवासयेत् । विवासनं च नग्नीकरणगृहभङ्गदेशनिर्वासनलक्षणं विषयानुसारेण द्रष्टव्यम् । इतरेषां त्वष्टगुणद्रव्यदण्डासंभवे स्वजात्युचितक-

मकरणनिगडबन्धनकारागृहप्रवेशादि द्रष्टव्यम्। एतच्च पूर्वश्लोकेऽप्यनुसर्तव्यम्। यदा सर्वे साक्ष्यं निन्हुवते तदा सर्वे समानदोषाः। यदा तु साक्ष्यमुक्त्वा पुनरन्यथा वदन्ति तदानुबन्धाद्यपेक्षया दण्ड्याः। यथाह कात्यायनः। उक्त्वान्यथा ब्रुवाणाश्च दण्ड्याः स्युर्वाक्छलान्विताः इति। न चान्येनोक्ताः साक्षिणोऽन्येन रहस्यनुसर्तव्याः। यथाह नारदः। न परेण समुद्दिष्टमुपेयात्साक्षिणं रहः। भेदयेन्नैव चान्येन हीयेतैवं समाचरन्निति ॥ ८२ ॥

**मूलार्थ**– साक्षीचा मजकूर दुसऱ्यांबरोबर ऐकविला असतांहि जो तमोगुणाक्रांत होऊन त्या साक्षीविषयीं नाकबूल जातो, त्यापासून आठपट दंड घ्यावा, ब्राह्मणाला तर विवास करावें.

**टीकार्थ**– ६ जो मनुष्य साक्षित्व पतकरून दुसऱ्या साक्षींबरोबर साक्षित्वाचा मजकूर ऐकविला असतांहि तमोगुणादिकानें ( रागलोभादिकानें ) व्याप्त होऊन त्या साक्षीस " मी ह्याविषयीं साक्षी नव्हतों " असा नाकबूल होतो, त्यापासून ज्या ज्या विवादीं पराजयनिमित्त जो दंड सांगितला असेल त्याच्या आठपट दंड घ्यावा.

साक्ष पतकरून मी साक्षी नाहीं असें म्हणणारास आठपट दंड.

७ ब्राह्मण आठपट दंड देण्यास असमर्थ असेल तर विवास करावा. म्हणजे नग्न करणें, गृहविच्छिन्न करणें, देशांतून हांकलून देणें, ह्या शिक्षा अपराधतारतम्यानें योजाव्या. इतरांस ( क्षत्रियादिकांस ) आठपट दंड देण्याचें सामर्थ्य नसेल तर त्या त्या जातीस जें योग्य काम तें घेणें, बेडी घालणें, कारागृहांत ठेवणें, इत्यादि शिक्षा ( अपराध ) तारतम्यानें योजाव्या.

ब्राह्मणास आठपट दंड देण्यास सामर्थ्य नसेल तर त्यास हद्दपार करावें.

हा वरचा ( ७ व्या अंकांतील ) दंडप्रकार ६ व्या शाखेंतील १ ल्या व २ ऱ्या अंकस्थळींहि योजावा.

८ जर कदापि सर्व ( साक्ष पुरविण्याविषयीं ) नाकबूल करितात तर सर्वहि समान अपराधी ठरले, ह्यास्तव त्या प्रत्येकापासून ६ व्या व ७ व्या अंकांप्रमाणें दंड घ्यावा.

सर्व साक्षी नाकबूल जातात तर सर्वांस समान दंड.

९ जर साक्ष देऊन पुनः विपरीत बोलतील तर ( त्यांला ) अपराधतारतम्येंकरून दंड करावा. ह्यास प्रमाण.

साक्ष देऊन पुनः विपरीत साक्ष देणारास दंड.

**कात्यायन**–साक्ष देऊन विपरीत बोलतात तर ते वाग्दोषी ठरले ह्यास्तव दंड्य होतात.

१० एकानें दिलेले साक्षी दुसऱ्यानें एकांतीं जाऊन फितवूं नयेत. ह्यास प्रमाण.

एकांतीं साक्ष घेऊं नये, व साक्षी फितूरहि करूं नये.

**नारद**– एकानें दिलेले साक्षी यांजकडे एकांतीं जाऊं नये व दुसऱ्याचे हातून त्यांत फूट पाडूं नये; कारण, असें करणारा दोषी ( अपराधी ) ठरतो. ८२

## वर्णिनां हि वधो यत्र तत्र साक्ष्यनृतं वदेत् ।

साक्षिणामवचनमसत्यवचनं च सर्वत्र प्रतिषिद्धं तदपवादार्थमाह । यत्र वर्णिनां शूद्रविट्क्षत्रविप्राणां सत्यवचनेन वधः संभाव्यते तत्र साक्ष्यनृतं वदेत् सत्यं न वदेत् । अनेन च सत्यवचनप्रतिषेधेन साक्षिणः पूर्वप्रतिषिद्धमसत्यवचनमवचनं चाभ्यनुज्ञायते । यत्र शङ्काभियोगादौ सत्यवचने वर्णिनोऽवधोऽनृतवचनेन कस्यापि वधस्तत्रानृतवचनमभ्यनुज्ञायते । यत्र तु सत्यवचनेऽर्थिप्रत्यर्थिनोरन्यतरस्य वधोऽसत्यवचने चान्यतरस्य वधस्तत्र तूष्णींभावाभ्यनुज्ञा राजा यद्यनुमन्यते । अथ राजा कथमप्यकथनेन मुञ्चति तदा भेदादसाक्षित्वं कर्तव्यम् । तस्याप्यसंभवे सत्यमेव वेदितव्यम् । असत्यवचनेन वर्णिवधदोषोऽसत्यवचनदोषश्च । सत्यवचने तु वर्णिवधदोष एव । तत्र च यथाशास्त्रं प्रायश्चित्तं कर्तव्यम् ॥

### शाखा ७ वी.

साक्षींनीं अगदींच साक्ष न देणें व खोटी साक्ष देणें सर्व व्यवहारीं निषेधिलें आहे त्याचा अपवाद अर्ध्या वचनेंकरून सांगतो.

**मूलार्थ**— जेथें वर्णीचा वध होत आहे तेथें साक्षीनें अनृत बोलावें.

**टीकार्थ**— १ जेथें खरी साक्ष दिल्यानें वर्णीचा म्हणजे शूद्र, वैश्य, क्षत्रिय, ब्राह्मण ह्यांचा वध घडतो, तशा स्थळीं साक्षीनें खोटें बोलावें, खरें बोलूं नये, असा सत्यभाषणाचा निषेध सांगितल्यावरून पूर्वी (५व्या शाखेच्या ४ थ्या अंकांत) निषेधलेली खोटी साक्ष आणि (४ थ्या शाखेच्या ४ थ्या अंकांत) निषेधिलेलें अगदींच साक्ष न देणें ह्या दोहोंविषयींहि अभ्यनुज्ञा सांगितली.

खरी साक्ष दिल्यानें चातुर्वर्ण्यांचा वध होत आहे तर खोटी साक्ष द्यावी.

२ जेथें शंकाभियोग इत्यादि स्थळीं खरी साक्ष दिल्यानें वर्णीचा वध घडतो आणि खोटी साक्ष दिल्यानें कोणाचाहि वध घडत नाहीं, तेथें खोटी साक्ष देण्याविषयीं शास्त्राज्ञा आहे.

३ ज्या व्यवहारीं खरें बोलण्यानेंहि वादिप्रतिवादींतून एकाचा वध घडतो, व खोटें बोलण्यानेंहि दोघांतून एकाचा वध घडतो, तेथें उगेंच रहावें, परंतु जर राजा तें मान्य करील तर. मौन धरिलें परंतु जर राजा साक्ष घेतल्यावांचून सोडीत नाहीं, तर साक्षींत भेद पाडून भेदनिषिद्ध साक्षींचे कोटींत प्रविष्ट व्हावें, म्हणजे असाक्षीप्रमाणें बोलावें. तसेंहि न होईल तर खरेंच बोलावें. कारण, खोटी साक्ष दिल्यानें वर्णीच्या वधाचा दोष व अनृत भाषणाचा दोष घडतो. आणि सत्य भाषण केलें तर केवळ वधदोषच घडतो, तर त्याविषयीं प्रायश्चित्त करावें.

खोटी साक्ष दिल्यानें एकाचा आणि खरी साक्ष दिल्यानें दुसऱ्याचा वध घडतो तशा स्थळीं उगेंच रहावें.

---

१ शंकाभियोग म्हणजे दुर्व्यसनी (जुगारी, व्यभिचारी, दारूबाज) ह्यांच्या संगतीमुळें (ह्याच्या हातून असें कर्म घडलें असेल अशा शंकेनें) अपराधी धरणें तो व्यवहार.

**तत्पावनाय निर्वाप्यश्चरुः सारस्वतो द्विजैः ॥ ८३ ॥**

तर्ह्यसत्यवचने तूष्णींभावे च शास्त्राभ्यनुज्ञया प्रत्यवायाभाव इत्यत आह । तत्पावनाय अनृतवचनावचननिमित्तप्रत्यवायपरिहाराय सारस्वतश्चरुर्द्विजैरेकैकशो निर्वाप्यः कर्तव्यः । सरस्वती देवता अस्येति सारस्वतः । अनवस्रावितान्तरूष्मपक्वौदने चरुशब्दः प्रसिद्धः । इहायमभिसन्धिः । साक्षिणामनृतवचनमवचनं च यन्निषिद्धं तदिहाभ्यनुज्ञानम् । यत्तु नानृतं वदेदब्रुवन्विब्रुवन्वापि नरो भवति किल्बिषीति च सामान्येनानृतवचनमवचनं च निषिद्धम् । तदतिक्रमनिमित्तमिदं प्रायश्चित्तं न च मन्तव्यम् । साक्षिणामनृतवचनावचनाभ्यनुज्ञानेऽपि साधारणानृतवचनावचनप्रतिषेधातिक्रमनिमित्तप्रत्यवायस्य तादवस्थ्यादवचनाभ्यनुज्ञावचनमनर्थकमिति । यतः साक्षिणामसत्यवचनावचनप्रतिषेधातिक्रमयोर्भूयान्प्रत्यवायः साधारणानृतवचनावचनयोरल्पीयानित्यर्थवदभ्यनुज्ञावचनम् । यद्यपि भूयसः प्रत्यवायस्य निवृत्त्या आनुषङ्गिकस्याल्पीयसः प्रत्यवायस्य निवृत्तिरन्यत्र तथापीहाभ्यनुज्ञावचनात्प्रायश्चित्तविधानाच्च भूयसो निवृत्त्याल्पीयानप्यानुषङ्गिकोऽपि प्रत्यवायो न निवर्तत इति गम्यते । एतदेवान्यत्र प्रश्नेषु वर्णिवधाशङ्कायां पान्थादीनामनृतवचनावचनाभ्यनुज्ञानं वेदितव्यम् न च तत्र प्रायश्चित्तमस्ति प्रतिषेधान्तराभावात् निमित्तान्तरेण कालान्तरेऽर्थतत्त्वावगमेपि साक्षिणामन्येषां च दण्डाभावोऽस्मादेव वचनादवगम्यत इति ॥ इति साक्षिप्रकरणम् ॥ ८३ ॥

खोटी साक्ष देणें किंवा अगदींच न बोलणें ह्याविषयीं शास्त्राज्ञा आहे, म्हणून प्रत्यवाय ( दोष ) नाहीं ह्याविषयीं अशा वचनेंकरून सांगतो.

मूलार्थ— त्याचे प्रायश्चित्तार्थ द्विजांनीं सरस्वतीदेवताक चरुहोम करावा.

टीकार्थ— ४ खोटी साक्ष देणें व मौन धरणें एतन्निमित्त जो दोष त्याचे परिहारार्थ प्रत्येक द्विजांनीं (म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ह्यांनीं) सारस्वत चरूचा होम करावा. सरस्वती आहे देवता ज्याची तो सारस्वत चरु.

खोटें बोललें असतां प्रायश्चित्त.

५ कढ बाहेर उतूं न जातां आंतल्याआंत वाफेनें शिजलेल्या भाताविषयीं चरुशब्दाची प्रसिद्धि आहे.

खोटी साक्ष देणें व अगदींच साक्ष न देणें जें निषेधिलें तें करण्याविषयीं येथें आज्ञा सांगितली. " अनृत बोलूं नये " आणि " न बोलणारा व विरुद्ध बोलणारा मनुष्य पातकी ठरतो," असा जो सामान्यतः अनृत भाषण व अगदींच न बोलणें, ह्यांचा निषेध सांगितला त्याच्या उल्लंघनानिमित्त हें प्रायश्चित्त.

६ खोटी साक्ष देणें व साक्ष न देणें ह्याविषयीं अभ्यनुज्ञा असली तरी जो सामान्यतः अनृत भाषण व मौन ह्यांचा निषेध सांगितला आहे त्याच्या उल्लंघनानिमित्त दोष वर सांगितला आहे, तो तसाच राहिला, सबब, खोटी साक्ष देणें व साक्ष न देणें ह्याविषयींचें

जें ( ४ थ्या अंकाचें ) वचन तें निरर्थक असें मानूं नये. कारण, खोटी साक्ष देणें व अगदीं साक्ष न देणें ह्यापासून मोठा दोष लागतो, आणि सामान्यतः अनृत भाषण व मौन ह्यांपासून फार थोडा दोष लागतो. म्हणून वरचें ( ४ थ्या अंकाचें ) अभ्यनुज्ञावचन सार्थ आहे. जरी मोठ्या दोषाच्या परिहारानें आनुषंगिक अल्प दोषाची निवृत्ति अन्यत्र स्थळीं होती, तथापि येथें खोट्या साक्षीविषयीं अभ्यनुज्ञावचन सांगून प्रायश्चित्तहि सांगितलें, त्यावरून मोठ्या दोषाचा परिहार झाला तथापि स्वल्प आनुषंगिक दोषाचा परिहार होत नाहीं असें अवगत होतें.

मनुष्याचा प्राण वांचविण्यासाठीं खोटें बोलावें.

७ ह्याप्रमाणेंच अन्यत्र स्थळींहि वधाच्या उद्देशानें वाटसरू वगैरेस कोणीं प्रश्न केला असतां अनृतभाषणाविषयीं आज्ञा जाणावी. तशा स्थळीं अनृत भाषण केलें असतां प्रायश्चित्त नाहीं. कारण, निराळा निषेध सांगितला नाहीं. वधनिवारणार्थ अनृत भाषण केलें आणि दुसऱ्या कारणावरून कालांतरेंकरून तें समजण्यांत आलें असतां साक्षीस किंवा दुसऱ्या अनृत भाषण करणारास दंड नाहीं असें ( ४ थ्या अंकाचे ) वचनावरून अवगत होतें. ८३

---

## लेख्यप्रकरण ६ वें.

भुक्तिसाक्षिणौ निरूपितौ सांप्रतं लेख्यं निरूप्यते । तत्र लेख्यं द्विविधं शासनं जानपदं चेति । शासनं निरूपितं जानपदमभिधीयते । तच्च द्विविधम् । स्वहस्तकृतमन्यकृतं चेति । तत्र स्वहस्तकृतमसाक्षिकं अन्यकृतं ससाक्षिकम् । अनयोश्च देशाचारानुसारेण प्रामाण्यम् ॥ यथाह नारदः । लेख्यं तु द्विविधं ज्ञेयं स्वहस्तान्यकृतं तथा । असाक्षिमत्साक्षिमच्च सिद्धिर्देशस्थितेस्तयोरिति । तत्रान्यकृतमाह ॥

**यः कश्चिदर्थो निष्णातः स्वरुच्या तु परस्परम् ।**
**लेख्यं तु साक्षिमत्कार्यं तस्मिन्धनिकपूर्वकम् ॥ ८४ ॥**

धनिकाधमर्णयोर्योऽर्थो हिरण्यादिः परस्परं स्वरुच्या इयता कालेनैतावद्देयमियती प्रतिमासं वृद्धिरिति निष्णातो व्यवस्थितः तस्मिन्नर्थे कालान्तरे विप्रतिपत्तौ वस्तुतत्त्वनिर्णयार्थं लेख्यं । साक्षिमदुक्तलक्षणसाक्षियुक्तं । धनिकपूर्वकं धनिकः पूर्वो यस्मिंस्तद्धनिकपूर्वकं । धनिकनामलेखनपूर्वकमितियावत् कार्यं कर्तव्यं । उक्तलक्षणाः साक्षिणो वा कर्तव्याः । कर्त्रा तु यत्कृतं कार्यं सिद्ध्यर्थं तस्य साक्षिणः । प्रवर्तते विवादेषु स्वकृतं वाथ लेख्यकमिति स्मरणात् ॥ ८४ ॥

शाखा १ ली.

भोग व साक्षी ह्यांचें निरूपण केलें, आतां लेखाचें निरूपण करितो. लेख दोन

---

१ कोणी हत्यारबंद रानांत वगैरे ठिकाणीं कोणास मारावयास धांवत असता मध्ये वाटसरास विचारितो कीं, फलाणा कोणत्या वाटेनें गेला, तूं पाहिलास ?

प्रकारचा. शासन आणि जानपद. त्यांत शासनाचें निरूपण पूर्वीच ( १ ल्या अध्यायांत राजकर्मप्रकरणाच्या १०, ११, १२ ह्या तीन वचनांहींकरून ) सांगितलें आहे. आतां जानपदाचें स्वरूप सांगतो.

१ जानपदलेख दोन प्रकारचा. स्वहस्तानें लिहिलेला, आणि दुसऱ्याकडून लिहविलेला, त्यांत स्वहस्तानें लिहिलेला लेख साक्षिविरहित आणि दुसऱ्याकडून लिहविलेला लेख ससाक्ष, हा दोहों प्रकारचा लेख देशाचे वहिवाटीप्रमाणें प्रमाण होतो.

**नारद**— स्वहस्तानें लिहिलेला साक्षिविरहित, आणि दुसऱ्याकडून लिहविलेला ससाक्ष, असा दोन प्रकारचा लेख. ह्याचें **प्रमाण** देशचालीप्रमाणें.

दुसऱ्याकडून लिहविलेला लेख सांगतो.

**मूलार्थ**— जो कांहीं अर्थ परस्परांच्या अनुमतानें व्यवस्थित झाला त्याविषयीं ससाक्ष लेख करावा. त्यांत सावकाराचें नांव पूर्वी असावें.

**टीकार्थ**— २ ज्या सुवर्णादिक द्रव्याविषयीं सावकार व कर्जदार ह्यांच्या परस्पर संतोषानें करार झाला कीं, अमुक मुदतीस इतकें द्रव्य द्यावें, व त्याला दरमाहा अमुक व्याज द्यावें; त्या द्रव्याविषयीं कालांतरीं विवाद पडला असतां वास्तवनिर्णय होण्याविषयीं पूर्वीं (९ व्या प्रकरणांतील २ ऱ्या शाखेच्या १ ल्या व २ ऱ्या अंकांत ) सांगितलेल्या साक्षीनिशीं लेख करावा, आणि त्यांत सावकाराचें नांव प्रथमतः लिहावें.

दुसऱ्याकडून लिहिलेला लेख ससाक्ष असावा.

३ अथवा पूर्वीं ( साक्षिप्रकरणांतील २ ऱ्या शाखेच्या १ ल्या व २ ऱ्या अंकांत ) सांगितलेले साक्षीच ठेवावे.

**स्मृति**— व्यवहार करणारानें जो व्यवहार केला त्याची सिद्धि ( शाबिती ) व्हावी एतदर्थ व्यवहारीं साक्षी ठेवावे, अथवा स्वदस्तुर लेख करावा. ८४

---

**समामासतदर्धाहर्नामजातिस्वगोत्रकैः ।**
**सब्रह्मचारिकात्मीयपितृनामादिचिन्हितम् ॥ ८५ ॥**

अपि च । समा संवत्सरः । मासश्चैत्रादिः । तदर्धं पक्षः शुक्लः कृष्णो वा । अहस्तिथिः प्रतिपदादिः। नाम धनिकाधमर्णयोः । जातिर्ब्राह्मणादिः स्वगोत्रं वासिष्ठादिगोत्रं। एतैः समादिभिश्चिन्हितम् । तथा सब्रह्मचारिकं बह्वृचादिशाखाप्रयुक्तं । गुणनाम बह्वृचः कठ इति । आत्मीयपितृनाम धनिकर्णिकपितृनाम । आदिशब्दात् द्रव्यजातिसंख्यावारादेर्ग्रहणम् । एतैश्च चिन्हितं लेख्यं कार्यमिति गतेन संबन्धः ॥ ८५ ॥

**मूलार्थ**— समा, मास, तदर्ध, अह, नाम, जाति, स्वगोत्र, सब्रह्मचारिक, आत्मीय पितृनाम इत्यादि लेखांत असावें.

---

१ पूर्वीच म्हणजे पृष्ठ ५५ यावरची आचाराध्यायांतील शासन यावरील टीप पाहा.

टीकार्थ– ४ समा म्हणजे संवत्सर; मास म्हणजे चैत्रादिक; तदर्ध म्हणजे शुक्ल कृष्णादि पक्ष; अह म्हणजे प्रतिपदादि तिथि; नाम म्हणजे सावकार व कर्जदार यांचीं नांवें; जाति म्हणजे ब्राह्मण शूद्र इत्यादि; स्वगोत्र ह्मणजे वासिष्ठ काश्यप इत्यादि; सब्रह्मचारिक ह्मणजे ऋग्वेद शाखेचा किंवा कठ शाखेचा इत्यादि गुणनाम. आत्मीय पितृनामक ह्मणजे सावकार व कर्जदार यांच्या पित्यांचीं नांवें; आदिशब्देंकरून द्रव्य. जाति, संख्या, वार इत्यादि समजावें; इतक्या लक्षणांनीं युक्त असा लेख करावा. ८५

लेखांत काय काय असावें तो प्रकार.

## समाप्तेऽर्थे ऋणी नाम स्वहस्तेन निवेशयेत् ।
## मतं मेऽमुकपुत्रस्य यदत्रोपरि लेखितम् ॥ ८६ ॥

किंच । धनिकाधमर्णयोर्योऽर्थः स्वरुच्या व्यवस्थितस्तस्मिन्नर्थे समाप्ते लिखिते ऋणी अधमर्णो नामात्मीयं स्वहस्तेनास्मिँल्लेख्ये यदुपरि लेखितं तन्ममामुकपुत्रस्य मतमभिप्रेतमिति निवेशयेत्पत्रे लिखेत् ॥ ८६ ॥

मूलार्थ– लेखांतील सर्व मजकूर संपल्यावर कर्जदारानें स्वहस्तेंकरून असें लिहावें कीं, जें वर लिहिलें तें अमुकाच्या पुत्राला मला हें मान्य आहे.

टीकार्थ– ५ सावकार व कर्जदार यांच्या परस्पर संतोषानें व्यवस्थित जो लेखांतला मजकूर तो पुरा झाल्यानंतर कर्जदारानें स्वहस्तेंकरून आपलें नांव लिहावें, कीं जें यांत वर लिहिलें आहे तें अमुकाचा पुत्र जो मी त्या मला मान्य आहे. ८६

कर्जदारानें खालीं आपली मान्यता लिहावी.

## साक्षिणश्च स्वहस्तेन पितृनामकपूर्वकम् ।
## अत्राहममुकः साक्षी लिखेयुरिति ते समाः ॥ ८७ ॥

तथा तस्मिँल्लेख्ये ये साक्षिणो लिखितास्तेऽप्यात्मीयपितृनामलेखनपूर्वकमस्मिन्नर्थेऽयममुको देवदत्तः साक्षीति स्वहस्तेनैकैकशो लिखेयुः । तेच समाः संख्यातो गुणतश्च कर्तव्याः । यद्यधमर्णः साक्षी वा लिपिज्ञो न भवति तदाधमर्णोऽन्येन साक्षी च साक्ष्यन्तरेण सर्वसाक्षिसन्निधौ स्वमतं लेखयेत् । यथाह नारदः । अलिपिज्ञ ऋणी यः स्यात्स्वमतं तु स लेखयेत् । साक्षी वा साक्षिणान्येन सर्वसाक्षिसमीपत इति ॥ ८७ ॥

मूलार्थ– साक्षींनींहि ह्याविषयीं मी अमुकाचा पुत्र, व मी अमुक, असें स्वहस्तानें लिहावें, आणि ते साक्षी सम असावे.

टीकार्थ– ६ लेखाविषयीं जे साक्षी असतील त्यांनींहि मी अमुकाचा पुत्र ह्या अर्थावि-

साक्षींनींही स्वहस्तानें साक्ष लिहून द्यावी.

षयीं मी साक्षी आहें, असें प्रत्येक साक्षीनें स्वहस्तेंकरून लिहून द्यावें, आणि ते साक्षी गुणी व संख्येनें सम असावे.

कर्जदार व साक्षी यांस लिहितां येत नसल्यास दुसऱ्याकडून सही करवावी.

७ जर कर्जदारास किंवा साक्षीस लिहितां येत नाहीं तर कर्जदारानें दुसऱ्याकडून व साक्षीनेंहि दुसऱ्या साक्षीकडून सर्व साक्षींच्या समक्ष स्वाभिप्राय लिहून द्यावा.

नारद— कर्जदार किंवा साक्षी ह्यांस लिहितां येत नसल्यास कर्जदारानें दुसऱ्याकडून व साक्षीनें दुसऱ्या साक्षींकडून सर्व साक्षींच्या समक्ष आपला मजकूर लिहिवावा. ८७

---

**उभयाभ्यर्थितेनैतन्मया ह्यमुकसूनुना ।**
**लिखितं ह्यमुकेनेति लेखकोऽन्ते ततो लिखेत् ॥ ८८ ॥**

किंच । ततो लेखको धनिकाधमर्णिकाभ्यामुभाभ्यां प्रार्थितेन मयामुकेन देवदत्तेन विष्णुमित्रसूनुना एतल्लेख्यं लिखितमिसन्ते लिखेत् ॥ ८८ ॥

मूलार्थ– उभयतांनीं सांगितल्यावरून अमुकाचे पुत्रानें व अमुकानें मी हें लिहिलें असें लेखकानेंहि शेवटीं लिहावें.

टीकार्थ– ८ नंतर लेखकानेंहि सावकार व कर्जदार ह्या उभयतांच्या सांगितल्यावरून अमुकाच्या पुत्रानें मी हा लेख लिहून दिला. असें शेवटीं लिहून द्यावें. ८८

---

**विना तु साक्षिभिर्लेख्यं स्वहस्तलिखितं तु यत् ।**
**तत्प्रमाणं स्मृतं लेख्यं बलोपधिकृतादृते ॥ ८९ ॥**

सांप्रतं स्वकृतं लेख्यमाह । यल्लेख्यं स्वहस्तेन लिखितमधमर्णेन तत्साक्षिभिर्विनापि प्रमाणं स्मृतं मन्वादिभिः । बलोपधिकृतादृते बलेन बलात्कारेण उपधिना छललोभक्रोधभयमदादिलक्षणेन यत्कृतं तस्माद्विना । नारदोऽप्याह ॥ मत्ताभियुक्तस्त्रीबालबलात्कारकृतं च यत् । तदप्रमाणं लिखितं भयोपधिकृतं तथेति । तच्चैतत्स्वहस्तकृतं परहस्तकृतं च यल्लेख्यं देशाचारानुसारेण सबन्धकव्यवहारेऽबन्धकव्यवहारे च युक्तमर्थक्रमापरिलोपेन लिप्यक्षरापरिलोपेन च लेख्यमित्येतावन्न पुनः साधुशब्दैरेव प्रातिस्विकदेशभाषयापि लेखनीयम् । यथाह नारदः ॥ देशाचाराविरुद्धं यद्व्यक्ताधिविधिलक्षणम् । तत्प्रमाणं स्मृतं लेख्यमविलुप्तक्रमाक्षरमिति ॥ विधानं विधिः आधेर्विधिराधीकरणं तस्य लक्षणं गोप्याधिभोग्याधिकालकृतमित्यादि तद्व्यक्तं विस्पष्टं यस्मिंस्तद्व्यक्ताधिविधिलक्षणं । अविलुप्तक्रमाक्षरं । अर्थानां क्रमः क्रमश्चाक्षराणि च क्रमाक्षराणि अविलुप्तानि क्रमाक्षराणि यस्मिंस्तदविलुप्तक्रमाक्षरं तदेवंभूतं लेख्यं प्रमाणं । राजशासनवन्न साधुशब्दनियमोऽत्रेत्यभिप्रायः ॥ ८९ ॥

### शाखा २ री.

आतां स्वहस्तानें लिहिलेल्या लेखाचें निरूपण करितो.

**मूलार्थ**– स्वदस्तूरचा लेख तर साक्षींवांचूनहि प्रमाण होतो. पण जबरी किंवा धमकी ह्यांवांचून असल्यास.

**टीकार्थ**– १ कर्जदारानें स्वहस्तेंकरून लिहिलेला लेख साक्षिविरहित असला तरी प्रमाण होतो, परंतु जर तो बलात्कारानें व लोभ, क्रोध इत्यादिकेंकरून लिहिलेल्यावांचून असेल तर, असें मन्वादिक ऋषींनीं सांगितलें आहे.

कर्जदाराचा स्वदस्तुर लेख साक्षीविरहित प्रमाण होतो.

नारदही सांगतो–मत्त, ब्रह्महत्यादि पापें करणारा, स्त्री आणि बाल, ह्यांनीं केलेला व बलात्कारानें केलेला लेख प्रमाण होत नाहीं. तसाच भय, ठकबाजी ह्यांकडून केलेलाहि प्रमाण होत नाहीं.

ह्याप्रमाणें स्वहस्तेंकरून लिहिलेला किंवा दुसऱ्याकडून लिहविलेला लेख देशचालीप्रमाणें गहाणाच्या व्यवहारीं व गहाणाखेरीज व्यवहारींहि अर्थसंगतीचा लोप न होतां व अक्षरांचा लोप न होतां लिहिलेला असावा; केवळ चांगले शब्दच त्यांत असले पाहिजेत असें नाहीं, आणि तो त्या त्या देशभाषेंत लिहावा.

नारद सांगतो–देशाचारास अविरुद्ध आणि ज्यामध्यें गोप्य गहाण, भोग्य गहाण, कृतकाल गहाण वगैरे प्रकार स्पष्ट लिहिला आहे व ज्यामध्यें अर्थसंगति, अक्षरें ह्यांचा लोप नाहीं असा जो लेख तो प्रमाण होतो.

सारांश राजशासनाप्रमाणें त्या लेखांत चांगलेच शब्द असावे असा नियम नाहीं. ८९

---

## ऋणं लेख्यकृतं देयं पुरुषैस्त्रिभिरेव तु ।

लेख्यप्रसंगेन लेख्यारूढमप्यृणं त्रिभिरेव देयमित्याह ॥ यथा साक्ष्यादिकृतमृणं त्रिभिरेव देयं तथा लेख्यकृतमप्याहर्तृतत्पुत्रतत्पुत्रैस्त्रिभिरेव देयं न चतुर्थादिभिरिति नियम्यते । ननु पुत्रपौत्रैर्ऋणं देयमित्यविशेषेण ऋणमात्रं त्रिभिरेव देयमिति नियतमेव । बाढं । अस्यैवोत्सर्गस्य पत्रारूढर्णविषये स्मृत्यन्तरप्रभवामपवादशङ्कामपनेतुमिदं वचनमारब्धं । तथा हि । यत्र लक्षणमभिधाय कात्यायनेनाभिहितम् ॥ एवं कालमतिक्रान्तं पितॄणां दाप्यते ऋणमिति ॥ इत्थं पत्रारूढमृणमतिक्रान्तकालमपि पितॄणां संबन्धि दाप्यते । अत्र पितॄणामिति बहुवचननिर्देशात्कालमतिक्रान्तमिति वचनाच्च चतुर्थादिर्दाप्य इति प्रतीयते । तथा हारीतेनापि ॥ लेख्यं यस्य भवेद्धस्ते लाभं तस्य विनिर्दिशेदिति । अत्रापि यस्य हस्ते लेख्यमस्ति तस्यर्णलाभ इति सामान्येन चतुर्थादिभ्योऽप्यृणलाभोऽस्तीति प्रतीयते । अतश्चैतदाशङ्कानिवृत्त्यर्थमेतद्वचनमित्युक्तम् । वचनद्वयं च योगीश्वरवचनानुसारेण योजनीयम् ॥

लेखाच्या प्रसंगेंकरून, लेख देऊन घेतलेलेंहि कर्ज तीन पुरुषांनींच द्यावें, असें सांगतो.

**मूलार्थ**– लेख देऊन घेतलेलें कर्जहि तीन पुरुषांनींच द्यावें.

**टीकार्थ**– २ जसेंससाक्ष घेतलेलें कर्ज तीन पुरुषांनीं ( घेणारा, त्याचा पुत्र, व पौत्र ह्यांनीं ) द्यावें, तसेंच लेख देऊन घेतलेलें कर्जहि घेणारा, त्याचा पुत्र व पौत्र ह्या तिघांनींच द्यावें; चवथ्यानें (प्रपौत्रानें) देऊं नये असें नियमित केलें.

लेख देऊन घेतलेलें कर्ज तीन पुरुषांनीं द्यावें.

३ **शंका**–" पुत्रांनीं व पौत्रांनीं कर्ज द्यावें " असें सामान्यतः, सर्व प्रकारचें कर्ज तिघांनीं फेडावें, असें ( ऋणादान प्रकरणीं ७ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे वचनांत ) सांगितलें आहेच. मग तेंच पुनः एथें सांगण्याचें प्रयोजन काय ?

४ **समाधान**– खरें, परंतु हेंच ( ऋणादानप्रकरणीं ७ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचें ) सामान्य वचन, लेख देऊन घेतलेल्या कर्जाविषयीं मानिलें असतां अन्यस्मृतींत जीं अपवादक वचनें आहेत तीं एथें प्राप्त होऊं लागतील, अशी शंका उपस्थित न व्हावी एतदर्थ हें ( तिसऱ्या अंकाचें ) वचन सांगितलें.

कात्यायन लेखाचें लक्षण सांगून हाच प्रकार स्पष्ट करून सांगतो.

**कात्यायन**– ह्याप्रमाणें पितरांनीं ( वडिलांनीं ) काढिलेलें कर्ज, बहुत दिवसांचें असलें तरी तें फेडावें.

खत लिहून देऊन घेतलेलें कर्ज मुदत टळल्यावरहि फेडावें.

ह्याप्रमाणें खत लिहून देऊन काढलेलें कर्ज बहुत दिवसांचें असेल तथापि तें वडिलांचें असेल तर तेंहि द्यावें.

येथें 'वडिलांचें' असा बहुवचन निर्देश केल्यावरून व " बहुत दिवसांचें " असें ह्मटल्यावरून चौथ्या वगैरेहि पुरुषानें द्यावें, असें प्राप्त होतें. तसेंच हारीतहि सांगतो.

**हारीत**– ज्यापाशीं खत असेल त्याला धन मिळेल.

ह्या वचनांतहि ज्यापाशीं खत असेल तो, कर्जाचा वसूल घेईल, असें सामान्यतः सांगितल्यावरून चौथा पुरुष ( प्रपौत्र ) इत्यादिकांपासूनहि कर्जाचा वसूल घ्यावा असें प्राप्त होतें.

ह्यास्तव ( वरच्या वचनावरून चौथा पुरुष ( प्रपौत्र ) इत्यादिकाला कर्ज देण्याचा अधिकार आहे ) अशी शंका प्राप्त झाली, तिच्या निराकरणार्थ हें मूळवचन सांगितलें, तें सयुक्त आहे. आतां कात्यायन व हारीत यांच्या वर लिहिलेल्या वचनांची अर्थयोजना योगीश्वर ( याज्ञवल्क्य ) वचनाप्रमाणें करावी.

## आधिस्तु भुज्यते तावद्यावत्तन्न प्रदीयते ॥ ९० ॥

अस्यापवादमाह । सबन्धकेऽपि पत्रारूढे ऋणे त्रिभिरेव देयमिति नियमादृणापाकरणानधिकारेणापहरणेऽप्यनधिकारप्राप्ताविदमुच्यते । यावच्चतुर्थेन पञ्चमेन वा ऋणं न दीयते तावदेवाधिर्भुज्यते इति वदता सबन्धकर्णापाकरणे चतुर्थादेरप्यधि-

कारो दर्शितः ॥ नन्वेतदप्युक्तमेव फलभोग्यो न नश्यतीति । सत्यम् । तदप्येतस्मिन्न-सत्यपवादवचने पुरुषत्रयविषयमेव स्यादिति सर्वमनवद्यम् ॥ ९० ॥

ह्याचा ( २ ऱ्या अंकाचा ) अपवाद अर्ध्या वचनानें सांगतो.

**मूलार्थ**– जोंपर्यंत गहाणाचें कर्ज परत दिल्हें जात नाहीं, तोंपर्यंत गहाणाचा उपभोग करावा.

**टीकार्थ**– ५ गहाणखत देऊन घेतलेलें कर्ज तिघांनींच ( घेणारा, पुत्र, पौत्र ह्यांनीं ) द्यावें, असा नियम केल्यावरून, जसा चौथ्या पुरुषास ( प्रपौत्रास ) कर्ज फेडण्याविषयीं अधिकार नाहीं, तसा गहाण सोडविण्याविषयींहि अधिकार नाहीं, असें प्राप्त होईल त्याचा बाध करण्यासाठीं हें सांगितलें कीं, जोंपर्यंत चौथ्या किंवा पांचव्या पुरुषानें गहाणाचें कर्ज फेडिलें नाहीं तोंपर्यंतच सावकारानें गहाण भोगावें, असें सांगणाऱ्या याज्ञवल्क्यानें, गहाण ठेवून घेतलेलें कर्ज फेडण्याविषयीं चौथ्या इत्यादि पुरुषासहि अधिकार दाखविला.

गहाणखताविषयीं.

६ **शंका**– परंतु असें सांगणेंहि योग्य नाहीं, कारण, "ज्या गहाणाचें उत्पन्न भोगलें जातें तें गहाण कदापि डुबत नाहीं," असें ऋणादानप्रकरणीं १३ व्या शाखेच्या पांचव्या अंकांत सांगितलें आहे.

७ **समाधान**– खरें, परंतु तें ( गहाण डुबण्याविषयींचें वचन )हि सदरहू ( ९ व्या अंकांतील ) बाधक वचन नसल्यास तीन पिढ्यांविषयींच होऊं शकेल, ह्याप्रमाणें सर्व निर्दोष जाणावें. ९०

---

## देशान्तरस्थे दुर्लेख्ये नष्टोन्मृष्टे हृते तथा ।
## भिन्ने दग्धेऽथवा छिन्ने लेख्यमन्यत्तु कारयेत् ॥ ९१ ॥

प्रासङ्गिकं परिसमाप्य प्रकृतमेवानुसरति । व्यवहाराक्षमे पत्रे पत्रान्तरं कुर्यादिति विधीयते । व्यवहाराक्षमत्वं चात्यन्तव्यवहितदेशान्तरस्थे पत्रे दुर्लेख्ये दुष्टानि संदिह्यमानानि अवाचकानि वा लेख्यानि लिप्यक्षराणि पदानि वा यस्मिंस्तत् दुर्लेख्यं तस्मिन्दुर्लेख्ये नष्टे कालवशेनोन्मृष्टे मषीदौर्बल्यादिना मृदितलिप्यक्षरे हृते तस्करादिभिर्भिन्ने विदलिते दग्धे प्रज्वलिते छिन्ने द्विधाभूते सति अग्निना द्विर्भवति एतच्चार्थिप्रत्यर्थिनोः परस्परानुमतौ सत्यां । विमतौ तु व्यवहारप्राप्तौ देशान्तरस्थपत्रानयनाय दुर्गाध्वापेक्षया कालो दातव्यः । दुर्गदेशावस्थिते नष्टे वा पत्रे साक्षिभिरेव व्यवहारनिर्णयः कार्यः ॥ यथाह नारदः । लेख्ये देशान्तरन्यस्ते शीर्णे दुर्लिखिते हृते । सतस्तत्कालकरणमसतो द्रष्टृदर्शनमिति ॥ सतो विद्यमानस्य पत्रस्य देशान्तरस्थस्यानयनाय कालकरणं कालावधिर्दातव्यः । असतः पुनरविद्यमानस्य पूर्वं ये द्रष्टारः साक्षिणस्तैर्दर्शनं व्यवहारे परिसमापनं कार्यम् । यदा तु साक्षिणो न सन्ति तदा दिव्येन निर्णयः कार्यः । अलेख्यसाक्षिके दैवीं व्यवहारे विनिर्दि-

शेदिति स्मरणात् । एतच्च जानपदं व्यवस्थापत्रम् । राजकीयमपि व्यवस्थापत्रमीदृशमेव भवति इयांस्तु विशेषः । राज्ञः स्वहस्तसंयुक्तं स्वमुद्राचिन्हितं तथा । राजकीयं स्मृतं लेख्यं सर्वेष्वर्थेषु साक्षिमदिति ॥ तथान्यदपि राजकीयं जयपत्रकं वृद्धवसिष्ठेनोक्तम् ॥ यथोपन्यस्तसाध्यार्थसंयुक्तं सोत्तरक्रियम् । सावधारणकं चैव जयपत्रकमिष्यते ॥ प्राड्विवाकादिहस्ताङ्कं मुद्रितं राजमुद्रया । सिद्धेऽर्थे वादिने दद्याज्जयिने जयपत्रकमिति । तथा सभासदोपि दत्तं मेऽमुकपुत्रस्येति स्वहस्तं दद्युः ॥ सभासदश्च ये तत्र स्मृतिशास्त्रविदः स्थिताः । यथा लेख्यविधौ तद्वत्स्वहस्तं दद्युरेव ते इति मनुस्मरणात् । सभासदां च परस्परानुमतिव्यतिरेकेण न व्यवहारो निःशल्यो भवति॥ यथाह नारदः ॥ यत्र सभ्यो जनः सर्वः साध्वेतदिति मन्यते । स निःशल्यो विवादः स्यात्सशल्यस्त्वन्यथा भवेदिति ॥ एतच्चतुष्पाद्व्यवहार एव ॥ साधयेत्साध्यमर्थं यच्चतुष्पादान्वितं च यत् । राजमुद्राङ्कितं चैव जयपत्रकमिष्यत इति स्मरणात् ॥ यत्र तु हीनता यथा । अन्यवादी क्रियाद्वेषी नोपस्थाता निरुत्तरः । आहूतप्रपलायी च हीनः पञ्चविधः स्मृत इति ॥ तत्र न जयपत्रकमस्ति अपि तु हीनपत्रकमेव तच्च कालान्तरे दण्डप्राप्त्यर्थं जयपत्रं तु प्राङ्न्यायविधिसिद्ध्यर्थमिति विशेषः ॥ ९१ ॥

प्रासंगिक विचार पुरा करून चालल्या प्रकरणाविषयीं सांगतो.

**मूलार्थ**– लेख देशांतरीं असला, किंवा वाचावयाजोगा नाहीं असा पुसटलेला, गहाळला, चोरीस गेला, फाटला, जळाला, तुकडे झालेला, असा असेल तर दुसरा लेख करून द्यावा.

**टीकार्थ**– १ जर लेख वादाच्या निर्णयाविषयीं अक्षम ( अनुपयोगी ) झाला तर तो पुनः दुसरा करावा असी ( शास्त्राची ) आज्ञा आहे, अक्षम म्हणजे, दूर देशीं राहिला, किंवा ज्याचीं अक्षरें किंवा शब्द वाचावयाजोगे नाहींत असा खराब, हरवला, पुसटला, अथवा चोरीस गेला, फाटला, जळाला, किंवा दोन तुकडे झाले, असा झाल्यास दुसरा लेख करून द्यावा.

लेख निर्णयाविषयीं अनुपयोगी वगैरे झाला तर दुसरा लेख करावा.

२ परंतु हा प्रकार जर वादिप्रतिवादी या उभयतांस मान्य असेल तर, मान्य नसेल तर त्या वादाच्या निर्णयासाठीं तो देशांतरींचा लेख आणावयाकरितां मार्ग किती दूर आहे याचें तारतम्य पाहून तितकी मुदत द्यावी. जर जाण्यास अशक्य अशा दूर देशीं राहिला अथवा हरवला तर साक्षींकडूनच वादाचा निर्णय करावा. ह्यास प्रमाण.

देशांतरीं दस्तैवज असल्यास आणवावा.

**नारद**– लेख देशांतरीं राहिला, किंवा जर्जर झाला, अथवा अक्षरें पुसटलीं, अगर चोरीस गेला, परंतु विद्यमान आहे तर आणावयाकरितां मुदत द्यावी, आणि गहाळला असल्यास साक्षींकडून निर्णय करावा.

साक्षीच्या अभावीं **दिव्य प्रमाणानें** निर्णय करावा. कारण,

**स्मृति**– ज्या व्यवहारीं लेख नाहीं व साक्षीहि नाहींत तेथें **दिव्य प्रमाण** द्यावें.

असें जानपदव्यवस्थापत्र सांगितलें, राजकीय (शासन ) लेखाचीहि व्यवस्था असीच, परंतु थोडा विशेष आहे तो सांगतो.

**स्मृति**– ३ राजाच्या स्वहस्तलेखानें युक्त व राजाच्या शिक्कामोर्तबानें चिन्हित व ससाक्ष असें राजकीय निवाडपत्र सर्व व्यवहारीं सांगितलें आहे.

सरकारी पत्र लिहिण्याचा प्रकार.

तसेंच दुसरेंहि सरकारी जयपत्र वृद्धवसिष्ठ सांगतो.

**वसिष्ठ**– वादीनें (फिर्यादींत) लिहिलेलें वादाचें स्वरूप, प्रतिवादीनें दिलेलें उत्तर, व उभयतांनीं दिलेला पुरावा, आणि त्यावरून जो निर्णय केला असेल तो, एतद्विशिष्ट जें तें जयपत्र ह्मटलें आहे. आणि प्राड्विवाकाच्या स्वहस्तलेखानें व राजाच्या शिक्कामोर्तबानें चिन्हित, असें तें जयपत्र वादनिर्णय झाल्यावर वाद जिंकणारास द्यावें.

तसेंच सभासदांनींहि अमुकाचा पुत्र जो मी त्या मला हें ( जयपत्र–निवाडापत्र ) मान्य आहे असें स्वतां लिहून द्यावें. कारण,

**मनु**– त्या व्यवहारीं स्मृतिशास्त्र जाणणारे जे सभासद समक्ष असतील त्यांनींहि लिहिण्याचे संप्रदायानुरूप स्वतां लिहिलेलें संमतिपत्र द्यावें.

सभासदांतहि जर परस्परांची संमति नाहीं, तर व्यवहार निर्विवाद होत नाहीं.

**नारद**– ज्या व्यवहारीं हा निर्णय यथान्याय झाला असी सभासदांची संमति होते तो व्यवहार निर्विवाद जाणावा. संमति नसल्यास तो ( व्यवहार ) निर्विवाद झाला असें समजूं नये.

हें वर सांगितलेलें जयपत्र ( पूर्वीं साधारण व्यवहारमातृका प्रकरणाच्या आठव्या अंकाच्या वचनांत सांगितलेल्या ) चतुष्पादव्यवहारींच जाणावें; कारण,

**स्मृति**– जें दाव्याचे स्वरूपाची शाबिती दाखविणारें असून चतुष्पादव्यवहारसहित असेल आणि ज्याच्यावर राजाचें शिक्कामोर्तब केलें आहे तें जयपत्र, असें ह्मटलें आहे.

**स्मृति**– ४ सांगतो एक प्रकार, आणि लिहून देतो एक प्रकार, पुरावा दाखवीतच नाहीं, दाखविला असतां विसंगत दाखवितो, एका ठिकाणीं ठरत नाहीं, विचारिलें असतां उत्तर देत नाहीं, बोलाविलें असतां येत नाहीं, असा पांच प्रकारचा खोटा वादी सांगितला आहे.

ज्या व्यवहारीं असा खोटा वादी ठरला त्या खोट्या वादीस जयपत्र मिळणार नाहीं. पराजयपत्र मिळेल. तें पराजयपत्र जर कालांतरीं तो पुनः वाद सांगूं लागेल तर त्याला दंड होण्यासाठीं आणि वर ( ३ ऱ्या अंकांत ) सांगितलेलें जयपत्र तर प्राङ्न्यायोत्तराचा पुरावा होण्यासाठीं, इतका विशेष. ९१

---

**सन्दिग्धलेख्यशुद्धिः स्यात्स्वहस्तलिखितादिभिः ।**
**युक्तिप्राप्तिक्रियाचिन्हसंबन्धागमहेतुभिः ॥ ९२ ॥**

लेख्यसन्देहे निर्णयनिमित्तान्याह ॥ शुद्धमशुद्धं वेति सन्दिग्धस्य लेख्यस्य शुद्धिः स्वहस्तलिखितादिभिः स्यात् । स्वहस्तेन लिखितं यल्लेख्यान्तरं तेन शुद्धिः यदि सदृशान्यक्षराणि भवन्ति तदा शुद्धिः स्यादित्यर्थः। आदिशब्दात्साक्षिलेखकस्वहस्तलिखितान्तरसंवादाच्छुद्धिरिति । युक्त्या प्राप्तियुक्तिप्राप्तिः। देशकालपुरुषाणां द्रव्येण सह संबन्धः प्राप्तिः। अस्मिन्देशेऽस्मिन्कालेऽस्य पुरुषस्येदं द्रव्यं घटत इति युक्तिः । क्रिया तत्साक्ष्युपन्यासः। चिन्हमसाधारणं श्रीकारादि। संबन्धः अर्थिप्रत्यर्थिनोः पूर्वमपि परस्परविश्वासेन दानग्रहणादिसंबन्धः । आगमोऽस्यैतावतोऽर्थस्य संभावितः प्राप्त्युपायः। एत एव हेतवः एभिर्हेतुभिः सन्दिग्धलेख्यशुद्धिः स्यादित्यन्वयः। यदा तु लेख्यसन्देहे निर्णयो न जायते तदा साक्षिभिर्निर्णयः कार्यः । यथाह कात्यायनः ॥ दूषिते पत्रके वादी तदारूढांस्तु निर्दिशेदिति साक्षिसंभवविषयमिदं वचनं । साक्ष्यसंभवविषयं तु हारीतवचनं । न मयैतत्कृतं पत्रं कूटमेतेन कारितं । अधरीकृत्य तत्पत्रमर्थं दिव्येन निर्णय इति ॥ ९२ ॥

## शाखा ४ थी.

लेखाविषयीं संशय प्राप्त झाला असतां निर्णय करण्याचे उपाय सांगतो.

**मूलार्थ–** संशयित लेखाचा निर्णय स्वदस्तूरचा लेख इत्यादिक, आणि युक्ति, प्राप्ति, **निशाणी, प्रमाण,** संबंध, आगम या हेतूंकडून करावा.

**टीकार्थ–** १ लेख खरा किंवा खोटा असा संशय झाल्यास दुसरे त्याचे स्वदस्तूरचे लेख ताडून पहावे, व त्यासारखींच त्यावरील अक्षरें असल्यास तो खरा.

लेख खरा किंवा खोटा याचा निर्णय करण्याचे उपाय.

मूळांतील "इत्यादिक" शब्देंकरून आणखीहि त्या लेखावरील साक्षी व लेखलिहिणारा ह्यांचे दुसरे स्वदस्तूरचे लेख व मूळच्या लेखावरील त्यांचे दस्तूरचे लेख ह्यांवरुन संशयित लेखाची परीक्षा करावी, आणि देश, काल, पुरुष यांचा त्या द्रव्याशीं संबंध, ह्मणजे त्या देशीं व त्या वेळेस या पुरुषाचेंच हें द्रव्य असेल अशी युक्ति, **प्रमाणांचा** पुरावा, अथवा निशाणी ह्मणजे श्रीकारादि चिन्ह, वादी प्रतिवादी ह्या उभयतांच्या परस्पर विश्वासानें देण्याघेण्याचा, पूर्वीचा झालेला व्यवहारसंबंध, व कर्ज घेणाराची योग्यता इतक्या कारणांवरूनच संशयित लेखाचा निर्णय करावा.

२ जर लेखाच्या संशयामुळें निर्णय होऊं शकत नाहीं तर साक्षींकडून निर्णय करावा.

**कात्यायन–** लेख दूषित ( संशयित ) असेल तर वादीनें त्या लेखावरील साक्षी हजर करावे.

वरील ( कात्यायन ) वचन साक्षींचा संभव असतां जाणावें.

---

१ निशाणीचे प्रकार दोन आहेत. ते असे.–जें ज्याचें उपजीविकेचें साधन असतें तें लिहिणें, म्हणजे असें, शेतकऱ्यानें नांगराची, शिपायानें हत्याराची, सोनारानें हातोड्याची, वगैरे निशाणी करावी. दुसरा प्रकार असा कीं, जें ज्याचें आराध्य दैवत असेल त्याचें नांव लिहिणें, गजानन, श्रीकार, व्यंकटेश, सांब इत्यादि.

हारीत– हा लेख मी लिहिला नाहीं, यानें खोटा करविला आहे, असें वादी शाबीत करील तर तो लेख रद्द करून दिव्य प्रमाणानें निर्णय करावा.

असें जें हारीतानें दिव्यप्रमाण सांगितलें तें साक्षी नसल्यास जाणावें. ९२

---

**लेख्यस्य पृष्ठेऽभिलिखेद्दत्वा दत्वर्णिको धनम् ।**
**धनी वोपगतं दद्यात्स्वहस्तपरिचिन्हितम् ॥ ९३ ॥**

एवं शोधिते पत्रे ऋणे च दातव्ये प्राप्ते यदा कृत्स्नमेव दातुमृणमसमर्थस्तदा किं कर्तव्यमित्यत आह ॥ यदाधमर्णिकः सकलमृणं दातुमसमर्थस्तदा शक्त्यनुसारेण दत्वा पूर्वकृतस्य लेख्यस्य पृष्ठेऽभिलिखेत् एतावन्मया दत्तमिति । उत्तमर्णो वा उपगतं प्राप्तं धनं तस्यैव लेख्यस्य पृष्ठे दद्यादभिलिखेत् एतावन्मया लब्धमिति । कथं स्वहस्तपरिचिन्हितं स्वहस्तलिखिताक्षरचिन्हितम् । यद्वोपगतं प्रवेशपत्रं स्वहस्तलिखितचिन्हितमधमर्णायोत्तमर्णो दद्यात् ॥ ९३ ॥

ह्याप्रमाणें लेखाचा निर्णय होऊन कर्ज द्यावें असा निवाडा झाला असतां कर्जदारास एकदम सगळी रकम देण्याचें सामर्थ्य नसल्यास कसें द्यावें तें सांगतो.

मूलार्थ–कर्जदारानें द्रव्य परत देऊन लेखाचे पाठीवर लिहून द्यावें, किंवा सावकारानेंच द्रव्य पावलेलें लेखाचे पाठीवर लिहावें, अथवा स्वदस्तूरची निराळी पावती द्यावी.

टीकार्थ– ३ जर कर्जदार एकदम सगळी रकम देण्यास असमर्थ आहे तर, जितकी रकम द्यावयाची आहे ती देऊन "मी इतकी रकम दिली" असें लेखाचे पाठीवर लिहून द्यावें, अथवा "इतकी मला पावती झाली" असें सावकारानें त्याच रोख्याचे पाठीवर स्वदस्तूर लिहावें, किंवा स्वदस्तूरची निराळी पावती द्यावी. ९३

भर रकम देण्यास असमर्थ असल्यास हप्तेबंदीनें वसूल घ्यावा.

---

**दत्वर्णं पाटयेल्लेख्यं शुद्ध्यै वान्यत्तु कारयेत् ।**

ऋणे तु कृत्स्ने दत्ते लेख्यं किं कर्तव्यमित्यत आह ॥ क्रमेण सकृदेव वा कृत्स्नमृणं दत्वा पूर्वकृतं लेख्यं पाटयेत् । यदा तु दुर्गदेशावस्थितं लेख्यं नष्टं वा तदा शुद्ध्यै अधमर्णत्वनिवृत्त्यर्थमन्यल्लेख्यं कारयेदुत्तमर्णं अधमर्णः । पूर्वोक्तक्रमेणोत्तमर्णो विशुद्धिपत्रमधमर्णाय दद्यादित्यर्थः ।

सगळें कर्ज फिटल्यावर लेख काय करावा तें सांगतो.

मूलार्थ– सर्व कर्ज फिटल्यावर लेख फाडावा, अथवा शुद्ध्यर्थ पावती द्यावी.

टीकार्थ– ४ कर्जदारानें हप्तेबंदीनें किंवा एकदम भररकम सावकारास दिल्यानंतर

कर्जाची रकम फिटल्यावर पावती लिहून द्यावी.

पूर्वीचें खतपत्र फाडून टाकावें. जर खतपत्र दुर्घट ठिकाणीं पडलें, अथवा गहाळलें तर ऋणमुक्तीसाठीं कर्जदारानें भरपाईची पावती लिहून घ्यावी. ह्मणजे पूर्वोक्तक्रमाप्रमाणें सावकारानें वसूल आलेल्या रुपयांची पावती कर्जदारास द्यावी इतका भावार्थ.

**साक्षिमञ्च भवेद्यद्वा तद्दातव्यंससाक्षिकम् ॥ ९४ ॥**

**ससाक्षिके ऋणे कृत्स्ने दातव्ये किं कर्तव्यमित्यत आह । यत्तु ससाक्षिकमृणं तत्पूर्वसाक्षिसमक्षमेव दद्यात् ॥ इति लेख्यप्रकरणं ॥ ९४ ॥**

ससाक्ष जें कर्ज घेतलें तें फिटल्यानंतर काय करावें तें सांगतो.

**मूलार्थ**— जें ससाक्ष कर्ज घेतलें असेल तें साक्षींच्या समक्ष द्यावें.

**टीकार्थ**—९ जें ससाक्ष कर्ज घेतलें असेल तें त्या साक्षींच्या समक्षच द्यावें. ९४

ससाक्ष कर्ज साक्षींच्या समक्ष द्यावें.

---

## दिव्यप्रकरण ७ वें.

लिखितसाक्षिभुक्तिलक्षणं त्रिविधं मानुषं प्रमाणमुक्तम् । अथावसरप्राप्तं दिव्यं प्रमाणमभिधास्यन् तुलाग्न्याप इत्यादिभिरार्यैः पञ्चभिः श्लोकैर्दिव्यमातृकां कथयति । तत्र तावद्दिव्यान्युपदिशति ॥

**तुलाऽग्न्यापो विषं कोशो दिव्यानीह विशुद्धये ।**

**तुलादीनि कोशान्तानि पञ्च दिव्यानीह धर्मशास्त्रे विशुद्धये संदिग्धस्यार्थस्य संदिग्धनिवृत्तये दातव्यानीति ।**

शाखा १ ली.

लेख, साक्षी आणि भोगवटा असें तीन प्रकारचें मानुषप्रमाण (पुरावा) सांगितलें. आतां प्रसंगप्राप्त दिव्यप्रमाण सांगण्यासाठीं तुला, अग्नि, आप इत्यादि पांच वचनांनीं दिव्य मातृका सांगतो, त्यांतून प्रथमतः दिव्यनामें अनुक्रमेंकरून सांगतो.

**मूलार्थ**— तुला, अग्नि, जल, विष, कोष, हीं दिव्यें येथें शुद्धीसाठीं होत.

**टीकार्थ**— १ तुला, अग्नि, जल, विष, कोष, अशीं हीं पांच दिव्यें यां धर्मशास्त्रांत शुद्धीसाठीं ह्मणजे संदिग्ध व्यवहारांतला संदेह दूर होण्यासाठीं करवावीं.

पांच प्रकारचें दिव्य.

अन्यत्रान्यान्यपि तण्डुलादीनि दिव्यानि सन्ति । घटोऽग्निरुदकं चैव विषं कोशस्तथैव च । तण्डुलाश्चैव दिव्यानि सप्तमस्तप्तमाषक इति पितामहस्मरणात् । अतः कथमेतावन्त्येवेत्यत आह ॥

## महाभियोगेष्वेतानि

एतानि महाभियोगेष्वेव नान्यत्रेति नियम्यते न पुनरिमान्येव दिव्यानीति। महत्त्वावधिं च वक्ष्यति। नन्वल्पाभियोगेऽपि कोश इष्यते। कोशमल्पेऽपि दापयेदिति स्मरणात्। सत्यं। कोशस्य तुलादिषु पाठो न महाभियोगेष्वेवेति नियमार्थः। किं तु सावष्टंभाभियोगेऽपि प्राप्त्यर्थः। अन्यथा शङ्काभियोग एव स्यात्। अवष्टंभाभियुक्तानां धटादीनि विनिर्दिशेत्। तण्डुलाश्चैव कोशश्च शङ्कास्वेव न संशय इति स्मरणात् ॥

तंडुल वगैरे दुसरींही दिव्यें ग्रंथांतरीं आहेत. कारण, तुला, अग्नि, उदक,
विष, कोष, तंडुल, आणि सातवा तप्तमाष. अशीं सात दिव्यें
पितामहानें सांगितलीं असतां इतकींच (पांचच) कसीं ? असी
शंका प्राप्त होईल यास्तव तृतीय चरणेंकरून सांगतो.

मूलार्थ–महापराधांच्या निर्णयांविषयीं हीं दिव्यें होत.

टीकार्थ–३ हीं पूर्वोक्त पांच दिव्यें महापराधांच्या निर्णयाविषयीं आहेत, हलक्या अपराधांविषयीं नव्हत असा एथें ( याज्ञवल्क्यानें ) नियम दर्शित केला आहे. यास्तव पांचच दिव्यें आहेत असा सिद्धांत समजूं नये. महापराधाचा अवधि पुढें सांगेल.

शंका– अल्प अपराधाच्या निर्णयाविषयींहि कोशदिव्य सांगितलें आहेच. कारण,

स्मृति– अल्प अपराधाच्या निर्णयाविषयींहि कोशदिव्य करवावें. ( असें वचन आहे ह्मणून )

समाधान– खरें, परंतु मूळवचनांत तुला वगैरे जीं दिव्यें सांगितलीं त्यांत कोशदिव्याची जी गणना केली ती 'महापराधाच्या निर्णयाविषयींच कोशदिव्य करवावें,' असा नियम दर्शित करण्यासाठीं नव्हे, तर सावष्टंभ[१] अपराधाच्या निर्णयाविषयींहि हें कोशदिव्य करवावें, असा नियम सांगण्यासाठीं आहे. जर तसा नियम सांगण्यासाठीं नसेल तर शंकित[२] अपराधाच्या निर्णयाविषयींच कोशदिव्य संभवतें. कारण,

स्मृति– सावष्टंभ अपराध्यांकडून तुला वगैरे दिव्य करवावें, आणि शंकितापराध्यांकडून तंडुलदिव्य, अथवा कोशदिव्य करवावें, असें सांगितलें आहे.

महाभियोगेषु शङ्कितेषु सावष्टंभेषु चाविशेषेण प्राप्तावपवादमाह ॥

## शीर्षकस्थेऽभियोक्तरि ॥ ९५ ॥

एतानि तुलादीन्यभियोक्तरि शीर्षकस्थेऽभियुक्तस्य भवन्ति । शीर्षकं शिरः। व्यवहारस्य चतुर्थः पादो जयपराजयलक्षणस्तेन च दण्डो लक्ष्यते। तत्र तिष्ठतीति शीर्षकस्थः तत्प्रयुक्तदण्डभागित्यर्थः ॥ ९५ ॥

---

१ पराजयनिमित्त राजदंडाचें जोखीम स्वतांवर घेऊन "खरोखर हा अपराधी आहे, मी जाणतों," असी जी अपराधाविषयीं कोणी प्रतिज्ञा करून सांगतो तो सावष्टंभापराध. २ वहमी अपराध.

शंकितापराध अथवा सावष्टंभापराध अशा मोठ्या अपराधांविषयीं सामान्य रीतीनें तुला वगैरे दिव्य करण्याविषयीं प्राप्त झालें त्याचा अपवाद चतुर्थ चरणेंकरून सांगतो.

मूलार्थ– पराजयनिमित्त दंडाचें जोखीम ग्रहण करणारा असा वादी ( किंवा प्रतिवादी ) असतां

टीकार्थ– ४ पराजयनिमित्त दंडाचें जोखीम स्वतांवर घेणारा असा वादी ( किंवा प्रतिवादी ) असेल तरच त्याकडून हीं पूर्वीं ( १ ल्या अंकांत ) सांगितलेलीं तुलादिक पांच दिव्यें करवावीं. ९५

---

## रुच्या वान्यतरः कुर्यादितरो वर्तयेच्छिरः ।

ततोर्थी लेखयेत्सद्यः प्रतिज्ञातार्थसाधनमिति भावप्रतिज्ञावादिन एव क्रियाव्यवस्था दर्शिता तदपवादार्थमाह । रुच्याभियोक्त्रभियुक्तयोः परस्परसंप्रतिपत्त्यान्यतरोऽभियुक्तोऽभियोक्ता वा दिव्यं कुर्यादितरोऽभियुक्तः अभियोक्ता वा शिरः शारीरमर्थदण्डं वा वर्तयेदङ्गीकुर्यात् । अयमभिसन्धिः न मानुषप्रमाणवद्दिव्यं प्रमाणं भावैकगोचरं । अपि तु भावाभावविशेषेण गोचरयति । अतश्च मिथ्योत्तरे प्रत्यवस्कन्दने प्राङ्न्याये वार्थिप्रत्यर्थिनोरन्यतरेच्छया दिव्यं भवतीति ।

"नंतर वादीनें आपल्या वादाचा पुरावा तत्काळ लिहून द्यावा" असें (साधारण व्यवहारमातृकाप्रकरणीं १२ व्या शाखेच्या मूळवचनांत) सांगितल्यावरून भावप्रतिज्ञा वादीचाच पुरावा घ्यावा असी व्यवस्था प्रदर्शित केली त्याचा अपवाद अर्ध्या वचनेंकरून सांगतो.

मूलार्थ–अथवा वादिप्रतिवादींपैकीं इच्छेप्रमाणें एकानें करावें, दुसऱ्यानें दंड द्यावा.

टीकार्थ–५ वादिप्रतिवादींपैकीं इच्छेप्रमाणें ह्मणजे जशी ज्याची मर्जी असेल तदनुरूप, अर्थात् वादी आणि प्रतिवादी ह्यांनीं परस्परांच्या संमतीनें दोघांपैकीं एकानें दिव्य करावें, आणि दुसऱ्यानें, पराजयनिमित्त जो राजदंड ( शारीर अथवा द्रव्यरूप ) ठरेल तो पत्करावा.

६ अभिप्राय हा कीं, मानुष प्रमाणासारखें दिव्यप्रमाण एका भावपदार्थाचीच शाबिती करणारें आहे असें नाहीं, तर भाव (कबूलपणा), व अभाव ( नाकबूलपणा ) ह्या दोहोंची शाबिती करणारें आहे. ह्यास्तव मिथ्योत्तर, कारणोत्तर, किंवा प्राङ्न्यायोत्तर जें वादांत प्राप्त असेल तन्निर्णयाकरितां वादी अथवा प्रतिवादी ह्या दोहोंपैकीं ज्याची इच्छा असेल त्यानें दिव्य करावें.

## विनापि शीर्षकात्कुर्यान्नृपद्रोहेऽथ पातके ॥ ९६ ॥

अल्पाभियोगे महाभियोगे शङ्कासावष्टंभयोरप्यविशेषेण कोशो भवतीत्युक्तं तुलादीनि विषांतानि तु महाभियोगेष्वेव सावष्टंभेष्वेवेति च नियमो दर्शितः ॥

तत्रावष्टंभाभियोगेष्वेवेत्यस्यापवादमाह ॥ राजद्रोहाभिशङ्कायां ब्रह्महत्यादिपातकाभिशङ्कायां च शिरःस्थायिना विनापि तुलादीनि कुर्यात् । महाचौर्याभिशङ्कायां च । यथाह । राजभिः शङ्कितानां च निर्दिष्टानां च दस्युभिः । आत्मशुद्धिपराणां च दिव्यं देयं शिरोविनेति । तण्डुलाः पुनरल्पचौर्यशङ्कायामेव । चौर्ये तु तण्डुला देया नान्यत्रेति विनिश्चय इति पितामहवचनात् । तप्तमाषस्तु महाचौर्याभिशङ्कायामेव । चौर्यशङ्काभियुक्तानां तप्तमाषो विधीयत इति स्मरणात् । अन्ये पुनः शपथा अल्पार्थविषयाः । सत्यवाहनशस्त्राणि गोबीजकनकानि च । स्पृशेच्छिरांसि पुत्राणां दाराणां सुहृदां तथा । अभियोगेषु सर्वेषु कोशपानमथापि वा । इत्येते शपथाः प्रोक्ता मनुना स्वल्पकारण इति नारदादिस्मरणात् । यद्यपि मानुषप्रमाणानिर्णेयस्य निर्णायकं यत्तद्दिव्यमिति लोकप्रसिद्ध्या शपथानामपि दिव्यत्वं तथापि कालान्तरनिर्णयनिमित्तत्वेन समनन्तरनिर्णयनिमित्तेभ्यो धटादिभ्यो दिव्येभ्यो भेदत्वव्यपदेशो ब्राह्मणपरिव्राजकवत् । कोशस्य तु शपथत्वेऽपि धटादिषु पाठो महाभियोगविषयत्वेनावष्टंभाभियोगविषयत्वेन च धटादिसाम्यान्न तु समनन्तरनिर्णयनिमित्तत्वेन । तण्डुलानां तप्तमाषस्य च समनन्तरनिर्णयनिमित्तत्वेऽप्यल्पविषयत्वेन शङ्काविषयत्वेन च धटादिवैलक्षण्यात्तेष्वपाठ इति सन्तोष्टव्यम् । एतानि च दिव्यानि शपथाश्च यथासंभवमृणादिषु विवादेषु प्रयोक्तव्यानि । यत्तु पितामहवचनम् । स्थावरेषु विवादेषु दिव्यानि परिवर्जयेदिति तदपि लिखितसामन्तादिसद्भावे दिव्यानि परिवर्जयेदिति व्याख्येयम् । ननु विवादान्तरेष्वपि प्रमाणान्तरसंभवे दिव्यानामनवकाश एव । सत्यम् । ऋणादिषु विवादेषु उक्तलक्षणसाक्ष्युपन्यासे अर्थिना कृतेऽपि प्रत्यर्थी यदि दण्डाभ्युपगमावष्टंभेन दिव्यमवलंबते तदा दिव्यमपि भवति । साक्षिणामाशयदोषसंभवाद्दिव्यस्य च निर्दोषत्वेन वस्तुतत्त्वविषयत्वात्तल्लक्षणत्वाच्च धर्मस्य ॥ यथाह नारदः ॥ तत्र सत्ये स्थितो धर्मो व्यवहारस्तु साक्षिणि । दैवसाध्ये पौरुषेयीं न लेख्यं वा प्रयोजयेदिति । स्थावरेषु विवादेषु प्रत्यर्थिना दण्डावष्टंभेन दिव्यावलंबने कृतेऽपि सामन्तादिदृष्टप्रमाणसद्भावे न दिव्यं ग्राह्यमिति विकल्पनिराकरणार्थं स्थावरेषु विवादेष्वित्यादिपितामहवचनं नात्यन्तिकदिव्यनिराकरणार्थं । लिखितसामन्ताद्यभावे स्थावरविवादेष्वनिर्णयप्रसंगात् ॥९८॥

शंकितापराध व सावष्टंभ अपराध हे दोनहि प्रकार ज्यांत आहेत असा अल्प अपराध, आणि मोठा अपराध यांविषयीं साधारण रीतीनें कोशदिव्य करावें असें सांगितलें, व तुलादिक बाकी चार दिव्यें तर महापराधाविषयीं सांगितलीं, तथापि तीं सावष्टंभ अपराध असेल तरच करवावीं, असा नियम दाखविला, व आतां सावष्टंभ अपराध असेल तरच करवावें असा जो नियम त्याचा अपवाद अर्ध्या वचनानें सांगतो.

मूलार्थ– राजद्रोह व महापातक ह्यांविषयीं शिरस्थायीवांचूनहि करावें.

टीकार्थ–७ राजद्रोह अथवा ब्रह्महत्यादि महापातकें केल्याचा आरोपी यानें, दुसरा

कोणी पराजयनिमित्त राजदंडाचें जोखीम आपणावर घेण्यास तयार नसेल तथापि त्यानें ( दिव्य ) करावें, व मोठी चोरी केल्याचा आरोपी यानेंहि करावें. ह्यास प्रमाण सांगतो.

स्मृति— राजांस जे आरोपी वाटतील त्यांनीं, व चोरांनीं ज्यांचीं नांवें सांगितलीं असतील त्यांनीं "मी अमुक ह्या अपराधाविषयीं शुद्ध आहें" अशी शाबिती करून आपल्यावरील आरोप दूर करण्याविषयीं, कोणी शिरस्थायी नसेल तथापि दिव्य करावें.

तंडुलदिव्य तर हलक्या चोरीच्या वहम्याविषयींच करवावें; कारण,

पितामह— हलक्या चोरीच्या वहम्याविषयींच तंडुलदिव्य करवावें, इतर अपराधाविषयीं नाहीं, असा निश्चय जाणावा.

तप्तमाषदिव्य तर मोठ्या चोरीच्या वहम्याविषयींच करवावें.

स्मृति— ज्यांच्यावर चोरीचा वहमा असेल त्यांजकडून तप्तमाषदिव्य करवावें.

८ दुसरे आणखी कित्येक शपथ ( शपथा ) आहेत, परंतु ते लहान व्यवहारांच्या निर्णयाविषयीं सांगितले आहेतः

नारद— सत्य, वाहन, शस्त्र, गाय, धान्यबीज, सुवर्ण, देव व आईबाप इत्यादिक वडील यांचे पाय, दत्तदानें, आणि सुकृतें यांच्या शपथा; पुत्र, स्त्री, मित्र यांच्या शिरोभागास स्पर्श करणें, ह्या शपथा सर्व व्यवहारांविषयीं अल्पकारणीं योजाव्या, असी मनूची उक्ति आहे.

९ ज्या व्यवहाराचा निर्णय मानुषप्रमाणेंकरून होऊं शकत नाहीं, त्या व्यवहाराचा निर्णय करणारें जें प्रमाण तें दिव्य होय, अशी लोकप्रसिद्धि आहे, तस्मात् शपथ हेंहि एक प्रकारचें दिव्य आहे खरें, तथापि कितीएक मुदतीनंतर निर्णय दाखविणारी शपथ आहे आणि तत्काळ निर्णय दाखविणारीं तुलादि दिव्यें आहेत, असा दोहोंचा भेद प्रदर्शित केला. जसा ब्राह्मण आणि संन्यासी हे वस्तुतः एक होत, तथापि ब्राह्मण व संन्यासी यांमध्यें भेद आहे.

१० कोशदिव्य तर शपथरूपी आहे खरें, तथापि तें मोठ्या अपराधाविषयीं आणि अवष्टंभ अपराधाविषयीं उक्त आहे. ह्यास्तव तुला वगैरे दिव्यांची कोशदिव्याशीं साम्यता असल्यामुळें त्या ( तुला वगैरे ) दिव्यांत कोशदिव्याची गणना केली आहे, तें कोशदिव्य तत्काल निर्णायक आहे अशा अभिप्रायेंकरून त्यांत गणना केली आहे असें नाहीं.

११ तंडुल, आणि तप्तमाष हीं दोन्हीं दिव्यें तत्काल निर्णय करणारीं आहेत, परंतु तीं अल्प कारणाविषयीं, व शंकितापराधाविषयीं कर्तव्य होत, ह्यास्तव तुला वगैरे दिव्यांची साम्यता त्यांला नसल्यामुळें त्यांत त्यांची गणना केली नाहीं, अशा रीतीनें समाधान जाणावें.

हीं ( पूर्वोक्त दिव्यें) आणि शपथा ह्यांची योजना यथासंभव ऋणादिव्यवहारीं करावी. ( भूमि इत्यादि स्थावरव्यवहारीं करूं नये ) ह्यास प्रमाणवचन.

पितामह— स्थावरव्यवहारांविषयीं दिव्य प्रमाण वर्ज करावें.

असें जें वचन त्याची व्याख्या असी करावी कीं लेखपत्र, अथवा सामंत इत्यादिकांची साक्ष इत्यादि मानुषप्रमाणांचा संभव असेल तेव्हां दिव्य वर्ज्य करावें.

१२ स्थावरव्यतिरिक्त इतर ( ऋणादि ) व्यवहारीं सुद्धां इतर प्रमाण मिळत असेल तेथपर्यंत दिव्य प्रमाण घेऊं नयेच, तथापि ऋणादिव्यवहारीं वादीनें पूर्वोक्त लक्षणयुक्त साक्षी पुरावा दिल्यानंतरहि जर कदाचित् प्रतिवादी पराजयनिमित्त राजदंड पत्करून दिव्य करण्याविषयीं वादीस सांगेल तर दिव्यहि संभवतें. कारण, साक्षींच्या अभिप्रायामध्यें दोषाचा संभव आहे, आणि दिव्य प्रमाण तर निर्दोष असल्यामुळें वादांतील सत्यपणा दाखविणारें आहे व सत्य हेंच धर्माचें लक्षण आहे. ह्यास प्रमाण.

नारद– सत्याचे आधारावर धर्म राहतो, आणि न्याय करण्याचें काम तर साक्षींच्या आधारावर आहे, परंतु दिव्य प्रमाणेंकरून जो व्यवहार शाबीत होणारा त्याविषयीं साक्षींचा अथवा लेखाचा पुरावा घेऊं नये.

१३ स्थावराच्या वादांत तर प्रतिवादी पराजयनिमित्त राजदंड पत्करून जरी वादीस दिव्य करण्याविषयीं सांगेल तथापि सामंत, साक्षी वगैरे मानुष प्रमाण मिळत असेल तर दिव्य प्रमाणाचा पुरावा घेऊं नये. अशा रीतीनें विकल्पाचा निषेध करण्यासाठीं "स्थावर व्यवहारांविषयीं दिव्य प्रमाण वर्ज करावें" असें पितामहस्मृतिवचन आहे, तें सर्वथा दिव्य प्रमाण घेऊंच नये असा निषेध करीत नाहीं; कारण ( निषेध मानिला असतां ) ज्या वादांत लेखपत्र, सामंत, साक्षी इत्यादि पुरावा मिळत नसेल तशा स्थावरवादाचा निर्णयच न होण्याचा प्रसंग येईल. ९६

---

**सचैलं स्नातमाहूय सूर्योदय उपोषितम् ।**
**कारयेत्सर्वदिव्यानि नृपब्राह्मणसन्निधौ ॥ ९७ ॥**

किंच पूर्वेद्युरुपोषितमुदिते सूर्ये सचैलं स्नातं दिव्यग्राहिणमाहूय नृपस्य सभ्यानां च ब्राह्मणानां सन्निधौ सर्वाणि दिव्यानि कारयेत्प्राड्विवाकः । त्रिरात्रोपोषिताय स्युरेकरात्रोषिताय वा। नित्यं दिव्यानि देयानि शुचये चार्द्रवाससे इत्युपवासविकल्पः पितामहेनोक्तो बलवदबलवन्महाकार्याल्पकार्यविषयत्वेन व्यवस्थितो द्रष्टव्यः। उपवासनियमश्च कारयितुः प्राड्विवाकस्यापि । दिव्येषु सर्वकार्याणि प्राड्विवाकः समाचरेत् । अध्वरेषु यथाध्वर्युः सोपवासो नृपाज्ञयेति पितामहवचनात् । अत्र च यद्यपि सूर्योदय इत्यविशेषेणोक्तं तथापि शिष्टसमाचाराद्वारानुवारं दिव्यानि देयानि । तत्रापि पूर्वाह्णेऽग्निपरीक्षा स्यात्पूर्वाह्णे च धटो भवेत् । मध्यान्हे तु जलं देयं धर्मतत्त्वमभीप्सता । दिवसस्य तु पूर्वाह्णे कोशसिद्धिर्विधीयते । रात्रौ तु पश्चिमे यामे विषं देयं सुशीतलं इति पितामहोक्तो विशेषो द्रष्टव्यः । अनुक्तकालविशेषाणां तण्डुलतप्तमाषप्रभृतीनां पूर्वाह्ण एव प्रदानम् । पूर्वाह्णे सर्वदिव्यानां प्रदानं परिकी

र्तितमिति सामान्येन नारदस्मरणात्। अहनि त्रिधा विभक्ते पूर्वो भागः पूर्वाह्णो मध्यो मध्यान्हः उत्तरोऽपराह्णः। तथापरोऽपि कालविशेषो विधिप्रतिषेधमुखेन दर्शितः। विधिमुखस्तावत्। अग्नेः शिशिरहेमन्तौ वर्षाश्चैव प्रकीर्तिताः। शरद्ग्रीष्मेषु सलिलं हेमन्ते शिशिरे विषम्। चैत्रो मार्गशिराश्चैव वैशाखश्च तथैव च। एते साधारणा मासा दिव्यानामविरोधिनः। कोशस्तु सर्वदा देयस्तुला स्यात्सार्वकालिकीति। कोशग्रहणं सर्वशपथानामुपलक्षणम्। तण्डुलानां पुनर्विशेषानभिधानात्सार्वकालिकत्वम्। प्रतिषेधमुखोऽपि। न शीते तोयसिद्धिः स्यान्नोष्णकालेऽग्निशोधनम्। न प्रावृषि विषं दद्यात्प्रवाते न तुलां तथा। नापराह्णे न सन्ध्यायां न मध्यान्हे कदाचनेति। न शीते तोयशुद्धिः स्यादित्यत्र शीतशब्देन हेमन्तशिशिरवर्षाणां ग्रहणम्। नोष्णकालेऽग्निशोधनमित्यत्रोष्णकालशब्देन ग्रीष्मशरदोर्विधानलब्धस्यापि पुनर्निषेध आदरार्थः। प्रयोजनं तु वक्ष्यते ॥ ९७ ॥

मूलार्थ– उपोषित, सूर्योदयकालीं सचैल स्नान केलेला अशातें बोलावून राजा, ब्राह्मण यांच्या समक्ष सर्व दिव्यें करवावीं.

टीकार्थ–१४ पूर्व दिवसीं उपोषित आणि दुसऱ्या दिवसीं सूर्योदयकालीं सचैल स्नान केलेला असा दिव्यकर्ता याला बोलावून राजा, सभासद आणि ब्राह्मण यांच्या सन्निध सर्व दिव्यें न्यायाधीशानें करवावीं.

दिव्य करण्याचे नियम.

पितामह– तीन दिवस उपोषित, अथवा एक दिवस उपोषित, ओलें वस्त्र परिधान केलेला, नित्य शुचिर्भूत अशा मनुष्याकडून दिव्यें करवावीं.

असें जें पितामहवचन त्यांत ( तीन दिवस अथवा एक दिवस उपोषित असा ) जो उपोषणाचा विकल्प सांगितला आहे त्याची व्यवस्था शक्त, अशक्त किंवा महाकार्य, अल्पकार्य यांच्या तारतम्येंकरून समजावी.

उपवास करण्याचा नियम दिव्य करविणारा न्यायाधीश यानेंहि अवश्य पाळला पाहिजे. कारण,

पितामह– जसा यज्ञांत अध्वर्यु उपोषित, तद्वत् न्यायाधीशानें उपोषित राहून राजाच्या आज्ञेनें दिव्यसंबंधी सर्व कार्यें करावीं.

१५ चालत्या मूळ वचनांत "सूर्योदयकालीं" असें जरी सामान्यतः सांगितलें आहे, तथापि शिष्टाचारास्तव रविवारीं दिव्यें करवावीं, त्यांमध्येंहि विशेष ( सांगतो ).

पितामह– अग्निदिव्य पूर्वाह्णकालीं, तुलादिव्य पूर्वाह्णकालींच ( करावें ). खरा न्याय व्हावा असें इच्छिणाऱ्यानें उदकदिव्य माध्यान्हकालीं करवावें. कोशदिव्य दिवसाच्या पूर्वभागांत करवावें. रात्रीच्या शेवटच्या प्रहरीं शीतलसमयीं विष दिव्य करवावें. असा पितामहानें सांगितलेला विशेष काल जाणावा.

१६ ज्यांचा विशेष काल सांगितला नाहीं, अशीं तंडुल, तप्त माष वगैरे दिव्यें सामान्येंकरून पूर्वाह्णकालींच करवावीं. ह्यास प्रमाणवचन.

नारद— सर्व प्रकारचीं दिव्यें पूर्वाह्णकालींच करवावीं. दिवसाचे तीन भाग करून त्यांपैकीं प्रथम भाग तो पूर्वाह्ण, दुसरा भाग मध्यान्ह, आणि तिसरा भाग अपराह्ण. याप्रमाणें कालविभाग जाणावा.

तसाच आणखीहि विशेष काल विधिप्रतिषेधवचनद्वारा सांगितला आहे, तो असा;—

विधिवचन.

स्मृति— शिशिरऋतु, हेमंतऋतु, आणि वर्षाऋतु या कालीं अग्निदिव्य करवावें. ग्रीष्मऋतु व शरद्दतु या कालीं उदक दिव्य (करवावें). चैत्र, मार्गशीर्ष, वैशाख हे मास सर्व प्रकारच्या दिव्यांविषयीं अविरोधी व साधारण होत. कोशदिव्य तर सर्व कालीं करवावें. तसेंच, तुलादिव्यहि सर्वकालीं करवावें.

१७ एथें (वरील स्मृतिवचनांत) 'कोशदिव्य' असें जें ह्मटलें तें सर्व प्रकारच्या शपथांचें उपलक्षण समजावें. तंडुलदिव्याविषयीं विशेष कालविचार सांगितला नाहीं, ह्यास्तव तें सर्व कालीं करवावें. प्रतिषेधवचन असें;——

स्मृति— शीतकालीं उदकदिव्य करूं नये, उष्णकालीं अग्निदिव्य करूं नये, वर्षाकालीं विषदिव्य करवूं नये, आणि ज्या कालीं वारा बहुत वहात असेल अशा समयीं तुलादिव्य करवूं नये, तसेंच अपराह्ण, माध्यान्ह, आणि सायं ह्या कालींहि तुलादिव्य करूं नये.

१८ एथें (वरच्या स्मृतिवचनांत) 'शीतकालीं' असें जें म्हटलें तेणेंकरून हेमंत, शिशिर व वर्षा हे ऋतु समजावे. 'उष्णकालीं' असें जें ह्मटलें तेणेंकरून ग्रीष्मऋतु, व शरद्दतु समजावे. विधिवचनावरूनच स्पष्ट निषेध प्राप्त झाला असतां पुनश्च वचनेंकरून निषेध केला तो आदरार्थ समजावा. ९७

---

## तुला स्त्रीबालवृद्धान्धपङ्गुब्राह्मणरोगिणाम् ।
## अग्निर्जलं वा शूद्रस्य यवाः सप्त विषस्य वा ॥ ९८ ॥

अधिकारिव्यवस्थामाह ॥ स्त्री स्त्रीमात्रं जातिवयोवस्थाविशेषानादरेण । बाल आषोडशाद्वर्षाज्जातिविशेषानादरेण । वृद्धोऽशीतिकावरः । अन्धो नेत्रविकलः । पङ्गुः पादविकलः । ब्राह्मणो जातिमात्रम् । रोगी व्याधितः । एतेषां शोधनार्थं तुलैवेति नियम्यते । अग्निः फालस्तप्तमाषश्च क्षत्रियस्य । जलमेव वैश्यस्य । वा शब्दोऽवधारणे । विषस्य यवा उक्तपरिमाणाः सप्तैव शूद्रस्य शोधनार्थं भवन्ति । ब्राह्मणस्य तुलाविधानात् शूद्रस्य यवाः सप्त विषस्यैवेति विषविधानादग्निर्जलं वेति क्षत्रियवैश्यविषयं युक्तं । एतदेव स्पष्टीकृतं पितामहेन । ब्राह्मणस्य धटो देयः क्षत्रियस्य हुताशनः । वैश्यस्य सलिलं प्रोक्तं विषं शूद्रस्य दापयेदिति । यत्तु स्त्र्यादीनां

दिव्याभावस्मरणं । सव्रतानां भृशार्तानां व्याधितानां तपस्विनाम् । स्त्रीणां च न भवेद्दिव्यं यदि धर्मस्त्वपेक्षित इति तद्वच्या वान्यतरः कुर्यादिति विकल्पनिवृत्त्यर्थं । एतदुक्तं भवति । अवष्टंभाभियोगेषु स्त्र्यादीनामभियोक्तृत्वेऽभियोज्यानामेव दिव्यमेतेषामभियोज्यत्वेऽप्यभियोक्तृणामेव दिव्यम् । परस्पराभियोगे तु विकल्प एव । तत्रापि तुलैवेत्यनेन वचनेन नियम्यते । तथा महापातकादिशङ्काभियोगे स्त्र्यादीनां तुलैवेति । एतच्च वचनं सर्वदिव्यसाधारणेषु मार्गशिरश्चैत्रवैशाखेषु स्त्र्यादीनां सर्वदिव्यसमवधाने नियामकतयार्थवत् न च सार्वकालं स्त्रीणां तुलैवेति । स्त्रीणां च न विषं प्रोक्तं न चापि सलिलं स्मृतम् । धटकोशादिभिस्तासामन्तस्तत्त्वं विचारयेदिति विषसलिलव्यतिरिक्तधटकोशाग्न्यादिभिः शुद्धिविधानात् । एवं बालादिष्वपि योजनीयम् । तथा ब्राह्मणादीनामपि न सार्वकालिकस्तुलादिनियमः । सर्वेषामेव वर्णानां कोशशुद्धिर्विधीयते । सर्वाण्येतानि सर्वेषां ब्राह्मणस्य विषं विनेति पितामहवचनात् । तस्मात्साधारणे काले बहुदिव्यसमवधाने तुलादिनियमार्थमेवेदं वचनम्। कालान्तरे तु तत्तत्कालविहितं सर्वेषां । तथाहि । वर्षास्वग्निरेव सर्वेषां । हेमन्त शिशिरयोस्तु क्षत्रियादित्रयाणामग्निविषयोर्विकल्पः । ब्राह्मणस्य त्वग्निरेव न कदाचिद्विषं । ब्राह्मणस्य विषं विनेति प्रतिषेधात् । ग्रीष्मशरदोस्तु सलिलमेव । येषां तु व्याधिविशेषेणाग्न्यादिनिषेधः कुष्ठिनां वर्जयेदग्निं सलिलं श्वासकासिनाम् । पित्तश्लेष्मवतां नित्यं विषं तु परिवर्जयेदिति तेषामग्न्यादिकालेऽपि साधारणं तुलैव दिव्यं भवति । तथा । तोयमग्निर्विषं चैव दातव्यं बलिनां नृणामिति वचनाद्दुर्बलानामपि सर्वथा विधिप्रतिषेधाहतुकालानतिक्रमेण जातिवयोवस्थानाश्रितानि दिव्यानि देयानि ॥ ९८ ॥

## शाखा २ री.

कोणतें दिव्य करण्याविषयीं कोण अधिकारी याची व्यवस्था सांगतो.

मूलार्थ— स्त्री. बाल, वृद्ध, अंध, पंगु, ब्राह्मण आणि रोगी, यांला तुलादिव्य, अग्नि व उदक यांनें दिव्य; आणि शूद्राविषयीं विषाचे सात यव.

टीकार्थ— १ स्त्री म्हणजे सर्व जातिमात्र स्त्रिया; जाति, वयोवस्था इत्यादि विशेष विचार करूं नये. बाल म्हणजे षोडश वर्षपर्यंत वयाचा; याविषयींहि जातिविशेषाचा विचार करूं नये. वृद्ध म्हणजे ऐशी वर्षांहून अधिक वयस्क; अंध म्हणजे नेत्रविकल; पंगु म्हणजे पादविकल; ब्राह्मण म्हणजे ब्राह्मणजातिमात्र; रोगी म्हणजे व्याधिग्रस्त; यांच्या शुद्धीसाठीं तुलादिव्यच करवावें, असा नियम करितो.

कोणतें दिव्य कोणीं करावें याविषयीं अधिकारी.

२ अग्निदिव्य व तप्तमाषदिव्य क्षत्रियाकडून करवावें, वैश्याकडून उदक दिव्यच करवावें, पूर्वी ( आचाराध्यायीं राजधर्मप्रकरणाच्या ५४ अंकाच्या वचनांत ) सांगितलेल्या परिमाणाचे असे. विषाचे सातच यव शूद्राचे शुद्धीविषयीं जाणावे.

३ ब्राह्मणाकडून तुलादिव्य, आणि शूद्राकडून विषाचे सात यवांचें दिव्य करवावें, असें सांगितलें. यावरून अग्निदिव्य क्षत्रियाविषयीं, व उदकदिव्य वैश्याविषयीं विहित, असें व्याख्यान करणें हें योग्य आहे.

पितामह हेंच स्पष्ट करून सांगतो.

**पितामह**– ब्राह्मणाकडून तुलादिव्य, क्षत्रियाकडून अग्निदिव्य, वैश्याकडून उदकदिव्य, आणि शूद्राकडून विषदिव्य करवावें.

**स्मृति**– व्रती, अतिपीडित, रोगी, तपस्वी आणि स्त्रिया यांजकडून धार्मिक मनुष्यानें दिव्य करवूं नये.

४ असें जें, स्त्री इत्यादिकांकडून दिव्य करण्याविषयीं निषेध करणारें वरील वचन तें, "अथवा वादिप्रतिवादीपैकीं इच्छेप्रमाणें एकानें (दिव्य) करवावें" असें पूर्वीं ( ह्या प्रकरणाच्या १ ल्या शाखेच्या ९ व्या अंकाचे मूळ वचनांत ) सांगितलेल्या वचनेंकरून ( चालत्या प्रकरणीं ) पूर्वीं जो विकल्प सांगितला त्याच्या निवृत्तीसाठीं आहे.*

५ सांगण्याचें तात्पर्य हें कीं, **सावष्टंभ** अपराधाच्या कामीं स्त्री इत्यादिक वादी असेल तथापि प्रतिवादीकडूनच दिव्य करवावें. कदाचित स्त्री इत्यादि प्रतिवादी असेल तथापि वादीकडूनच दिव्य करवावें. स्त्री इत्यादिक, परस्परांवर अपराधाचा आरोप ठेवून फिर्यादी होतील, तेव्हां तर दोघांपैकीं हर कोणा एकाकडून दिव्य करवावें, असा विकल्प आहेच; त्याविषयींहि तुलादिव्यच करवावें, असा नियम ह्या ( चालत्या मूळ ) वचनाकडून केला आहे. आणि महापातक वगैरे अपराधाचा आरोप असतां स्त्री इत्यादिकांकडून तुलादिव्यच करवावें असा नियम केला आहे.

६ सर्व प्रकारच्या दिव्याविषयीं सर्व साधारण असे जे मार्गशीर्ष, चैत्र आणि वैशाख मास त्यांमध्यें स्त्री इत्यादिक सर्वांकडून सर्व प्रकारचें दिव्य करवावें असें जें प्राप्त झालें, त्यामध्यें जलदिव्याचा नियम करून हें ( चालू मूळ ) वचन सार्थक होतें; सदा सार्वकाळ स्त्रियांकडून तुलादिव्यच करवावें, असा नियम प्रदर्शित करण्यासाटीं नव्हे.

**स्मृति**– स्त्रियांनीं विषदिव्य करूं नये, तसेंच उदकदिव्यहि करूं नये. तुला, कोश इत्यादि दिव्यांकडून त्यांच्या मनांतील वास्तवार्थाचा निर्णय करावा.

असें वचन आहे ह्यास्तव विष आणि कोश ह्या दोहोंवांचून इतर जीं तुला, कोश, अग्नि इत्यादि दिव्यें त्यांहींकरून शुद्धि करण्याविषयीं सांगितलें आहे. ह्याप्रमाणें बाल इत्यादिकांविषयींहि असीच योजना करावी.

७ ब्राह्मण इत्यादिकांकडून सदा सर्वकाल तुलादिव्यच करवावें, असा नियम नाहीं. कारण,

**पितामह**– सर्व वर्णांच्या लोकांनीं कोशदिव्य करावें. हीं सर्व प्रकारचीं दिव्यें सर्व लोकांस उक्त होत, परंतु ब्राह्मणास विषदिव्यावांचून इतर उक्त होत.

८ तस्मात् साधारणकालीं अनेक प्रकारचें दिव्य ( करण्याविषयीं ) प्राप्त झालें त्यां-

पैकीं तुला इत्यादि दिव्यच करावें, असा नियम प्रदर्शित करण्यासाठींच हें ( चालू मूळ ) वचन आहे. विशेष कालीं तर तत्कालविहित दिव्य सर्वांनीं करावें. तें असें— वर्षाकालीं सर्व लोकांनीं अग्निदिव्यच करावें, हेमंत व शिशिर ह्या दोन ऋतूंमध्यें क्षत्रियादिक तीन वर्णांनीं अग्निदिव्य किंवा विषदिव्य करावें, असा विकल्प जाणावा. ब्राह्मणानें तर अग्निदिव्यच करावें, विषदिव्य कदापि करूं नये. कारण, ब्राह्मणास विषदिव्यावांचून असा निषेध आहे. ग्रीष्म व शरद् ह्या ऋतूंमध्यें उदकदिव्यच करावें.

**स्मृति**– कुष्ठरोगी यांस अग्निदिव्य वर्ज्य; दमा खोकला हे रोग ज्यांला आहेत त्यांस उदकदिव्य वर्ज्य; पित्त व श्लेष्मा हे रोग ज्यांला आहेत त्यांस विषदिव्य वर्ज्य करावें.

९ असें जें वचन तेणेंकरून, ते पूर्वोक्त व्याधि असल्या कारणामुळें ज्यांला अग्नि इत्यादिक दिव्यांचा निषेध सांगितला त्यांनीं, अग्नि इत्यादिक दिव्य करण्याचे जे जे विशेषकाल त्या कालींहि सामान्यतः सांगितलेलें तुलादिव्यच करावें.

**स्मृति**– बलिष्ठ मनुष्यांकडून उदकदिव्य, किंवा विषदिव्य अथवा अग्निदिव्य करवावें. असें वचन आहे यास्तव निर्बळ मनुष्यासहि सर्वथा दिव्य करविण्याविषयीं विधि व निषेध प्राप्त होतो, ह्यास्तव पूर्वोक्त कालानुसार जाति, वय, अवस्था यांच्या तारतम्यानें जें दिव्य योग्य असेल तें करवावें. ९८

---

## नासहस्राद्धरेत्फालं न विषं न तुलां तथा ।

महाभियोगेष्वेतानीत्युक्तं तत्राभियोगस्य यदपेक्ष्यं महत्त्वं तदिदानीमाह । पणसहस्रादर्वाक् फालं विषं तुलां वा न कारयेत् । मध्यवर्ति जलमपि । यथोक्तम् । तुलादीनि विषान्तानि गुरुष्वर्थेषु दापयेदिति । अत्र कोशस्याग्रहणम् । कोशमल्पेऽपि दापयेदित्यल्पाभियोगेऽपि तस्य स्मरणात् । एतानि चत्वारि दिव्यानि पणसहस्रादूर्ध्वमेव भवन्तीति । नार्वागित्यर्थः । नन्वर्वागप्यग्न्यादीनि पितामहेन दर्शितानि । सहस्रे तु धटं दद्यात्सहस्रार्द्धे तथायसम् । अर्धस्यार्द्धे तु सलिलं तस्यार्द्धे तु विषं स्मृतमिति सत्यम् । तत्रेत्थं व्यवस्था । यद्द्रव्यापहारे पातित्यं भवति तद्विषयं पितामहवचनमितरद्रव्यविषयं योगीश्वरवचनमिति । एतच्च वचनद्वयं स्तेयसाहसविषयम् । अपन्हवे तु विशेषो दर्शितः कात्यायनेन ॥ दत्तस्यापन्हवो यत्र प्रमाणं तत्र कल्पयेत् । स्तेयसाहसयोर्दिव्यं स्वल्पेऽप्यर्थे प्रदापयेत् ॥ सर्वद्रव्यप्रमाणं तु ज्ञात्वा हेम प्रकल्पयेत् । हेमप्रमाणयुक्तं तु तदा दिव्यं नियोजयेत् ॥ ज्ञात्वा संख्यां सुवर्णानां शतनाशे विषं स्मृतम् । अशीतेस्तु विनाशे वै दद्यादेव हुताशनम् ॥ षष्ट्या नाशे जलं देयं चत्वारिंशति वै धटम् । विंशद्दशविनाशे तु कोशपानं विधीयते ॥ पञ्चाधिकस्य वा नाशे ततोर्द्धार्द्धस्य तण्डुलाः ॥ ततोऽर्द्धार्द्धविनाशे हि स्पृशेत्पुत्रादिमस्तकान ॥ ततोऽर्द्धार्द्धविनाशे तु लौकिक्यश्च क्रियाः स्मृताः । एवं विचारयन्राजा धर्मार्थाभ्यां न हीयत इति । ज्ञात्वा संख्यां सुवर्णानामित्यत्र सुवर्णशब्दः षो-

डश माषाः सुवर्ण इत्युक्तपरिमाणवचनः। नाशशब्दश्चात्रापन्हववचनः । नासहस्राद्धरेत्फालमित्यत्र तु ताम्रिकपणसहस्रं बोद्धव्यम् ॥

## शाखा ३ री.

"महापराधांविषयीं हीं दिव्यें होत" असें पूर्वी ( ह्या प्रकरणाच्या १ ल्या अंकाचे मूळवचनांत ) सांगितलें. आतां अपराधाचें महत्त्व जेणेंकरून समजेल असें अर्ध्या वचनेंकरून सांगतो.

**मूलार्थ**— हजार पणांपर्यंत फाल, विष, अथवा तुला दिव्य करवूं नये.

**टीकार्थ**— १ हजार पणांहून कमी पण ज्यांत संभवतात असा वाद असेल तर त्याविषयीं फालदिव्य (अग्निदिव्य) किंवा विषदिव्य, अथवा तुलादिव्य करवूं नये. तसेंच यांमध्यें सांगितलेलें उदकदिव्यहि ( करवूं नये). ह्यास प्रमाण.

हजार पणांपर्यंत फालादिकांचा निषेध.

**स्मृति**— तुलादिक व विषांत दिव्यें महा अपराधाचे कामीं करवावीं.

ह्या ( वरील ) स्मृतिवचनांत कोशदिव्याचें ग्रहण केलें नाहीं; कारण,

**स्मृति**— कोशदिव्य अल्प अपराधाच्या कामींहि योजावें असें सांगितलें आहे.

२ सारांश, हीं ( वरील वचनांत सांगितलेलीं ) चार दिव्यें, सहस्र पणांपेक्षां अधिक पण ज्यांत आहेत अशा वादाच्या कामींच संभवतात, सहस्रांहून कमी पण ज्यांत आहेत अशा वादांत संभवत नाहींत.

**शंका**— सहस्र पणांहून कमी अशा वादाविषयींहि अग्नि वगैरे दिव्यें पितामहानें सांगितलीं आहेत. ह्यास प्रमाण.

**पितामह**— सहस्र पण वादाच्या कामीं तुलादिव्य, पांचशें पण वादाच्या कामीं अग्निदिव्य, अडीचशें पण वादाच्या कामीं उदकदिव्य, आणि सवाशें पण वादाच्या कामीं विषदिव्य सांगितलें आहे.

**समाधान**— तसें सांगितलें आहे खरें, परंतु त्याविषयीं असी व्यवस्था कीं, ज्या द्रव्याची चोरी केल्यानें चोर पतित होतो त्या द्रव्याविषयीं पितामहवचन, आणि इतर द्रव्याविषयीं याज्ञवल्क्यवचन, याप्रमाणें हीं दोनहि वचनें चोरी, साहस ह्या अपराधांविषयीं जाणावीं.

नाकबूलपणाच्या वादाविषयीं विशेष विचार कात्यायन सांगतो.

**कात्यायन**— दिलेले द्रव्याचा नाकबूलपणा ज्या वादांत ( कर्जदार ) करीत असेल त्या वादाचे निर्णयाविषयीं तशा प्रकारचा एकादा पुरावा योजून, चोरी व साहस यांविषयीं सांगितलेलें दिव्य अल्प द्रव्याचे वादाविषयींहि करवावें.

सर्व जातीच्या पदार्थांची किम्मत करून त्या किमतीच्या द्रव्यावरून सुवर्णाच्या किमतीचें परिमाण समजावें, नंतर सुवर्णाच्या संख्येप्रमाणें दिव्य करवावें. सुवर्णाची संख्या समजून घेऊन दिव्य करवावें तें असें:—शंभर सुवर्णाच्या नाशाविषयीं विषदिव्य सांगितलें

आहे, ऐशी सुवर्णांच्या नाशाविषयीं अग्निदिव्य करवावें. साठ सुवर्णांच्या नाशाविषयीं उदकदिव्य, आणि चाळीस सुवर्णांच्या नाशाविषयीं तुलादिव्य करवावें. वीस किंवा दहा सुवर्णांच्या नाशाविषयीं कोशदिव्य सांगितलें आहे, आणि पांचांहून अधिक सुवर्णांच्या नाशाविषयींहि ( कोशदिव्य ) सांगितलें आहे. त्यांहून अर्द्ध्या ( अडीच ) सुवर्णांच्या नाशाविषयीं आणि त्यांहूनहि अर्ध्या ( सवा ) सुवर्णाच्या नाशाविषयीं पुत्र इत्यादिकांच्या मस्तकाला स्पर्श करून शपथ करावी, आणि त्याहूनहि अर्ध्या सुवर्णाच्या नाशाविषयीं लौकिकी क्रिया करण्याविषयीं सांगितल्या आहेत. अशा रीतीनें राजा न्यायाचा विचार करील तर तो धर्म व अर्थ यांची हानि पावणार नाहीं. एथें एक सुवर्ण ह्मणजे (पांच रतिभारांचा एक मासा असे) सोळा मासे भार सुवर्ण जाणावा. तसेंच "नाश" ह्मणजे नाकबूलपणा असा अर्थ समजावा. "हजारपणापर्यंत" असें जें मूळवचनांत ह्मटलें तेथें तांब्याचे हजार पण समजावे.

नृपार्थेष्वभिशापे च वहेयुः शुचयः सदा ॥ ९९ ॥

ननु नृपद्रोहे पातके चैतानि दिव्यान्युक्तानि । तत्कथं नासहस्राद्धरेत्फालमित्यत्राह ॥ नृपद्रोहेषु महापातकाभियोगे च सदा द्रव्यसंख्यामनपेक्ष्यैवैतानि दिव्यानि कुर्युरुपवासादिना शुचयः सन्तः । तथा देशविशेषोऽपि नारदेनोक्तः ॥ सभाराजकुलद्वारे देवायतनचत्वरे । निधेयो निश्चलः पूज्यो धूपमाल्यानुलेपनैरिति । निधेयो धटः । व्यवस्था च कात्यायनेनोक्ता ॥ इन्द्रस्थानेऽभिशस्तानां महापातकिनां नृणाम् । नृपद्रोहे प्रवृत्तानां राजद्वारे प्रयोजयेत् ॥ प्रातिलोम्यप्रसूतानां दिव्यं देयं चतुष्पथे । अतोऽन्येषु सभामध्ये दिव्यं देयं विदुर्बुधाः॥ अस्पृश्याधमदासानां म्लेच्छानां पापकारिणाम् । प्रातिलोम्यप्रसूतानां निश्चयो न तु राजनि । तत्प्रसिद्धानि दिव्यानि संशये तेषु निर्दिशेदिति ॥ इति दिव्यमातृका ॥ ९९ ॥

राजद्रोह आणि महापातक ह्या अपराधांचे निर्णयाविषयीं हीं दिव्यें करण्याविषयीं पूर्वीं सांगितलें आहे, ह्यास्तव सहस्र पणांपर्यंत अग्नि, विष, आणि तुळा हीं दिव्यें करूं नयेत असें ( पूर्वीं अर्ध्या मूळ वचनांत ) सांगितलें त्याची उपपत्ति कसी होईल? असी शंका प्राप्त झाली तिचें समाधान अर्ध्या वचनेंकरून सांगतो.

मूलार्थ– राजद्रोह, अभिशाप ह्या वादाविषयीं, सदा सार्वकाल शुद्ध होऊन ( दिव्यें ) करावीं.

टीकार्थ– १ राजद्रोहाच्या शंकेविषयीं आणि महापातकाच्या आरोपाविषयीं सदा सार्वकाल म्हणजे द्रव्यसंख्येची अपेक्षा न धरितां, उपवास इत्यादिक करून शुद्ध होऊन हीं दिव्यें करावीं.

दिव्य कोणत्या स्थलीं करावें याविषयीं विशेष विचार नारद सांगतो.

नारद– सभेमध्यें किंवा राजद्वारासन्निध, अथवा देवालयाजवळ, किंवा चवाठ्यावर तुळा उभी करावी, आणि गंधपुष्पादिक उपचारांनीं तिची पूजा करावी.

याची व्यवस्था कात्यायन सांगतो.

कात्यायन– महापातकाचे आरोपी, महापातकी यांजकडून देवस्थानासन्निध (दिव्य करावें), राजद्रोहाविषयीं प्रवृत्त होणारे यांजकडून राजद्वाराजवळ, वर्णसंकर जातीच्या लोकांकडून चवाठ्यावर दिव्य करवावें. यांहून इतर वादांच्या निर्णयाविषयीं न्यायसभेमध्यें दिव्य करावें, असें पंडित सांगतात. अस्पृश्य (अंत्यज), अधम, दास, म्लेच्छ, ह्या जातींचे अपराधी व प्रतिलोम जातीचे अपराधी यांच्या वादाचा निर्णय न्यायसभेंत करूं नये, तर तशा प्रकारच्या नीच जातींच्या अपराध्यांचा निर्णय होण्याकरितां त्यांस यथायोग्य प्रसिद्ध दिव्य करण्याविषयीं आज्ञा करावी. ९९

याप्रमाणें दिव्याची मांडणी जाणावी.

---

एवं सर्वदिव्योपयोगिनीं दिव्यमातृकामभिधायेदानीं धटादिदिव्यानां प्रयोगमाह॥

तुलाधारणविद्भिरभियुक्तस्तुलाश्रितः ।
प्रतिमानसमीभूतो रेखां कृत्वावतारितः ॥ १०० ॥
त्वं तुले सत्यधामासि पुरा देवैर्विनिर्मिता ।
तत्सत्यं वद कल्याणि संशयान्मां विमोचय ॥ १०१ ॥
यद्यस्मि पापकृन्मातस्ततो मां त्वमधो नय ।
शुद्धश्चेद्गमयोर्ध्वं मां तुलामित्यभिमन्त्रयेत् ॥ १०२ ॥

तुलाया धारणं तोलनं ये विदन्ति सुवर्णकारप्रभृतयः तैः प्रतिमानेन मृदादिना समीभूतः समीकृतस्तुलामाश्रितोऽधिरूढोऽभियुक्तोऽभियोक्ता वा दिव्यकारी लेखां कृत्वा येन सन्निवेशेन प्रतिमानसमीकरणदशायां शिक्यतलेऽवस्थितस्तस्मिन् पाण्डुलेख्येनाङ्कयित्वावतारितस्तुलामभिमन्त्रयेत् ॥ प्रार्थयेतानेन मन्त्रेण। हे तुले त्वं सत्यस्य स्थानमसि । पुरा आदिसृष्टौ देवैर्हिरण्यगर्भप्रभृतिभिर्विनिर्मितोत्पादिता । तत्तस्मात्सत्यं संदिग्धस्यार्थस्य स्वरूपं वद दर्शय कल्याणि शोभने अस्मात्संशयान्मां विमोचय। हे मातः यद्यहं पापकृदसत्यवाद्यस्मि ततो मां त्वमधो नय ।अथ शुद्धः सत्यवाद्यस्मि ततो मामूर्ध्वं गमयेति । प्राड्विवाकस्य तुलाभिमन्त्रणमन्त्रः स्मृत्यन्तरोक्तः अयं तु दिव्यकारिणः । जयपराजयलक्षणं तु मन्त्रलिङ्गादेवावगम्यते इति न पृथगुक्तम् । धटनिर्माणं पुनरारोहाणाद्यर्थसिद्धमेव । पितामहनारदादिभिः स्पष्टीकृतम् । तद्यथा । छित्वा तु यज्ञियं वृक्षं यूपवन्मन्त्रपूर्वकम् । प्रणम्य लोकपालेभ्यस्तुला कार्या मनीषिभिः॥ मन्त्रः सौम्यो वानस्पत्यच्छेदने जप्य एव च । चतुरस्रा तुला कार्या दृढा ऋज्वी तथैव च । कटकानि च देयानि त्रिषु स्थानेषु चार्थवत् । चतुर्हस्ता

तुला कार्या पादौ चोपरितत्समौ। प्रान्तरं तु तयोर्हस्तौ भवेदध्यर्धमेव वा। हस्तद्वयनिधेयं तु पादयोरुभयोरपि। तोरणे च तथा कार्ये पार्श्वयोरुभयोरपि। धटादुच्चतरे स्यातां नित्यं दशभिरङ्गुलैः। अवलंबौ च कर्तव्यौ तोरणाभ्यामधोमुखौ। मृन्मयौ सूत्रसंबद्धौ धटमस्तकचुम्बिनौ॥ प्राङ्मुखो निश्चलः कार्यः शुचौ देशे धटस्तथा। शिक्यद्वयं समासज्य पार्श्वयोरुभयोरपि। प्राङ्मुखान्कल्पयेद्दर्भान् शिक्ययोरुभयोरपि। पश्चिमे तोलयेत्कर्तृनन्यस्मिन्मृत्तिकां शुभाम्। पिटकं पूरयेत्तस्मिन्निष्टकाग्रावपांसुभिः। अत्र च मृतिकेष्टकाग्रावपांसूनां विकल्पः। परीक्षका नियोक्तव्यास्तुलामानविशारदाः। वणिजो हेमकाराश्च कांस्यकारास्तथैव च। कार्यः परीक्षकैर्नित्यमवलंबसमो धटः॥ उदकं च प्रदातव्यं धटस्योपरि पण्डितैः। यस्मिन्न प्लवते तोयं स विज्ञेयः समो धटः॥ तोलयित्वा नरं पूर्वं पश्चात्तमवतार्य तु। धटं तु कारयेन्नित्यं पताकाध्वजशोभितम्॥ तत आवाहयेद्देवान् विधिनानेन मन्त्रवित्। वादित्रतूर्यघोषैश्च गन्धमाल्यानुलेपनैः॥ प्राङ्मुखः प्राञ्जलिर्भूत्वा प्राड्विवाकस्ततो वदेत्। एह्येहि भगवन्धर्म ह्यस्मिन दिव्ये समाविश॥ सहितो लोकपालैश्च वस्वादिसमरुद्गणैः। आवाह्य तु धटे धर्मं पश्चादङ्गानि विन्यसेत्॥ इन्द्रं पूर्वे तु संस्थाप्य प्रेतेशं दक्षिणे तथा। वरुणं पश्चिमे भागे कुबेरं चोत्तरे तथा। अग्न्यादिलोकपालांश्च कोणभागेषु विन्यसेत्। इन्द्रः पीतो यमः श्यामो वरुणः स्फटिकप्रभः। कुबेरस्तु सुवर्णाभो वन्हिश्चापि सुवर्णभः। तथैव निर्ऋतिः श्यामो वायुर्धूम्रः प्रशस्यते। ईशानस्तु भवेद्रक्त एवं ध्यायेत्क्रमादिमान्। इन्द्रस्य दक्षिणे पार्श्वे वसूनाराधयेद्बुधः। धरो ध्रुवस्तथा सोम आपश्चैवानिलोऽनलः। प्रत्यूषश्च प्रभातश्च वसवोऽष्टौ प्रकीर्तिताः। देवेशेशानयोर्मध्ये आदित्यानां तथा गणम्। धातार्यमा च मित्रश्च वरुणोंऽशुर्भगस्तथा॥ इन्द्रो विवस्वान्पूषा च पर्जन्यो दशमः स्मृतः। ततस्त्वष्टा ततो विष्णुरजघन्यो जघन्यजः। इत्येते द्वादशादित्या नामभिः परिकीर्तिताः। अग्नेः पश्चिमभागे तु रुद्राणामयनं विदुः॥ वीरभद्रश्च शंभुश्च गिरिशश्च महायशाः। अजैकपादहिर्बुध्न्यः पिनाकी चापराजितः। भुवनाधीश्वरश्चैव कपाली च विशांपतिः॥ स्थाणुर्भवश्च भगवान् रुद्रास्त्वेकादश स्मृताः॥ प्रेतेशरक्षोमध्ये तु मातृस्थानं प्रकल्पयेत्। ब्राह्मी माहेश्वरी चैव कौमारी वैष्णवी तथा। वाराही चैव माहेंद्री चामुण्डा गणसंयुता। निर्ऋतेरुत्तरे भागे गणेशायतनं विदुः। वरुणस्योत्तरे भागे मरुतां स्थानमुच्यते। गगनः स्पर्शनो वायुरनिलो मारुतस्तथा॥ प्राणः प्राणेशजीवौ च मरुतोऽष्टौ प्रकीर्तिताः॥ धटस्योत्तरभागे तु दुर्गामावाहयेद्बुधः। एतासां देवतानां तु स्वनाम्ना पूजनं विदुः। भूषावसानं धर्माय दत्वा चार्घादिकं क्रमात्॥ अर्घादिपश्चादङ्गानां भूषान्तमुपकल्पयेत्॥ गन्धादिकां नैवेद्यान्तां परिचर्यां प्रकल्पयेदिति॥ अत्र च तुलां पताकाध्वजालङ्कृतां विधाय तस्यामेह्येहीति मन्त्रेण धर्ममावाह्य धर्मायार्घं कल्पयामि नम इत्यादिना प्रयोगेणार्घ्यपाद्याचमनीयमधुपर्काचमनीयस्नानवस्त्रयज्ञोपवीताचमनीयमुकुटकटकादिभूषान्तं दत्वा इन्द्रादीनां दुर्गान्तानां प्रणवाद्यैः स्वनामभिश्चतुर्थ्यन्तैर्नमोन्तैर-

र्घादि भूषान्तं पदार्थानुसमयेन दत्त्वा धर्माय गन्धपुष्पधूपदीपनैवेद्यानि दत्त्वा इन्द्रादीन गन्धादीनि पूर्ववद्दद्यात् । गन्धपुष्पाणि च घटपूजायां रक्तानि कार्याणि ॥ यथाह नारदः ॥ रक्तैर्गन्धैश्च माल्यैश्च दध्यपूपाक्षतादिभिः । अर्चयेत्तु घटं पूर्वं ततः शिष्टांस्तु पूजयेदिति । इन्द्रादीनां तु विशेषानभिधानाद्यथालाभं रक्तैरन्यैर्वा पूजनमिति पूजाक्रमः । एतच्च सर्वं प्राड्विवाकः कुर्यात् ॥ यथोक्तम् ॥ प्राड्विवाकस्ततो विप्रो वेदवेदाङ्गपारगः । श्रुतवृत्तोपसंपन्नः शान्तचित्तो विमत्सरः । सत्यसन्धः शुचिर्दक्षः सर्वप्राणिहिते रतः । उपोषितः शुद्धवासाः कृतदन्तानुधावनः । सर्वासां देवतानां च पूजां कुर्याद्यथाविधि । तथा । ऋत्विग्भिश्चतुर्भिश्चतसृषु दिक्षु लौकिकाग्नौ होमः कार्यः । यथाह ॥ चतुर्दिक्षु तथा होमः कर्तव्यो वेदपारगैः । आज्येन हविषा चैव समिद्भिर्होमसाधनैः । सावित्र्या प्रणवेनाथ स्वाहान्तेनैव होमयेत् । प्रणवादिकां गायत्रीमुच्चार्य पुनः स्वाहाकारान्तं प्रणवमुच्चार्य समिदाज्यचरून्प्रत्येकमष्टोत्तरशतं जुहुयादित्यर्थः ॥ एवं हवनान्तां देवपूजां विधायानन्तरमभियुक्तमर्थं वक्ष्यमाणमन्त्रसहितं पत्रे लिखित्वा तत्पत्रं शोध्यशिरोगतं कुर्यात् । यथाह ॥ यथार्थमभियुक्तः स्याल्लिखित्वा तं तु पत्रके । मन्त्रेणानेन सहितं तत्कार्यं तु शिरोगतम् । मन्त्रश्चायम् ॥ आदित्यचन्द्रावनिलोऽनलश्च द्यौर्भूमिरापो हृदयं यमश्च । अहश्च रात्रिश्च उभे च सन्ध्ये धर्मश्च जानाति नरस्य वृत्तमिति । एतच्च धर्मावाहनादि शिरसिपत्रारोपणान्तमनुष्ठानकाण्डं सर्वदिव्यसाधारणम् ॥ यथोक्तम् ॥ इमं मन्त्रविधिं कृत्स्नं सर्वदिव्येषु योजयेत् । आवाहनं च देवानां तथैव परिकल्पयेदिति ॥ अनन्तरं प्राड्विवाको घटमामन्त्रयेत । घटमामन्त्रयेच्चैव विधिनानेन शास्त्रविदिति स्मरणात् । मन्त्राश्च दर्शिताः॥ त्वं घट ब्रह्मणा सृष्टः परीक्षार्थं दुरात्मनाम् । धकाराद्धर्ममूर्तिस्त्वं टकारात्कुटिलं नरम्॥ धृतो भावयसे यस्माद्धटस्तेनाभिधीयसे । त्वं वेत्सि सर्वजन्तूनां पापानि सुकृतानि च । त्वमेव देव जानीषे न विदुर्यानि मानवाः । व्यवहाराभिशस्तोऽयं मानुषः शुद्धिमिच्छति ॥ तदेनं संशयादस्माद्धर्मतस्त्रातुमर्हसीति । शोध्यस्तु त्वं तुलेत्यादिना पूर्वोक्तेन मन्त्रेण तुलामामन्त्रयेत् । अनन्तरं प्राड्विवाकः शिरोगतपत्रकं शोध्यं यथा स्थानं निवेश्य च घटमारोपयति । पुनरारोपयेत्तस्मिन् स्थितावस्थितपत्रकमिति स्मरणात् । आरोपितं च विनाडीपञ्चकं यावत्तथैवावस्थापयेत् । तत्कालपरीक्षां च ज्योतिःशास्त्राभिज्ञः कुर्यात् । ज्योतिर्विद्ब्राह्मणः श्रेष्ठः कुर्यात्कालपरीक्षणम् । विनाड्यः पञ्च विज्ञेयाः परीक्षाकालकोविदैरिति स्मरणात् । दशगुर्वक्षरोच्चारणकालः प्राणः । षट्प्राणा विनाडी । उक्तं च । दशगुरुवर्णः प्राणः षट् प्राणाः स्याद्विनाडिका तासां । षष्ट्या घटी घटीनां षष्ट्याहोरात्र उक्तश्च । खाग्निभिर्दिनैर्मास इति । तस्मिंश्च काले शुद्ध्यशुद्धिपरीक्षणार्थं शुचयः पुरुषा राज्ञा नियोक्तव्याः । ते च शुद्ध्यशुद्धी कथयन्ति । यथोक्तं पितामहेन । साक्षिणां ब्राह्मणाः श्रेष्ठा यथादृष्टार्थवादिनः । ज्ञानिनः शुचयोऽलुब्धा नियोक्तव्या नृपेण तु । शंसन्ति साक्षिणः श्रेष्ठाः

शुद्धयशुद्धी नृपे तदेति । शुद्धयशुद्धिनिर्णयकारणं चोक्तं । तुलितो यदि वर्द्धेत स शुद्धः स्यान्न संशयः । समो वा हीयमानो वा न स शुद्धो भवेन्नर इति । यत्तु पितामहवचनम् । अल्पदोषः समो ज्ञेयो बहुदोषस्तु हीयत इति । तत्र यद्यभियुक्तस्यार्थस्याल्पत्वं बहुत्वं च न दिव्येनावधारयितुं शक्यते तथापि सकृदमतिपूर्वत्वेनाल्पत्वमसकृन्मतिपूर्वत्वेन च महत्त्वमिति दण्डप्रायश्चित्ताल्पत्वमहत्त्वमवधार्यते यदा चानुपलक्ष्यमाणदृष्टकारण एव कक्षादीनां छेदो भङ्गो वा भवति तदाप्यशुद्धिरेव । कक्षच्छेदे तुलाभङ्गे धटकर्कटयोस्तथा । रज्जुच्छेदेऽक्षभङ्गे वा तथैवाशुद्धिमादिशेदिति स्मरणात् । कक्षं शिक्यतलम् कर्कटौ तुलान्तयोः शिक्याधारावीषद्वक्रावायसकीलकौ कर्कटशृङ्गसन्निभौ । अक्षः पादस्तंभयोरुपरि निविष्टस्तुलाधारपट्टः । यदा तु दृश्यमानकारणक एषां भङ्गस्तदा पुनरारोपयेत् । शिक्यादिच्छेदभङ्गेषु पुनरारोपयेन्नरमिति स्मरणात् । ततश्च । ऋत्विक्पुरोहिताचार्यान्दक्षिणाभिश्च तोषयेत् । एवं कारयिता राजा भुक्त्वा भोगान्मनोरमान् । महतीं कीर्तिमाप्नोति ब्रह्मभूयाय कल्पते । यदा तूक्तलक्षणं धटं तथैव स्थापयितुमिच्छति तदा वायसाद्युपघातनिरासार्थं कपाटादिसहितां शालां कुर्यात् । विशालामुन्नतां शुभ्रां धटशालां तु कारयेत् । यत्रस्था नोहपन्येत श्वभिश्चाण्डालवायसैः । तत्रैव लोकपालादीन् सर्वान् दिक्षु निवेशयेत् । त्रिसन्ध्यं पूजयेच्चैतान् गन्धमाल्यानुलेपनैः ॥ कपाटबीजसंयुक्तां परिचारकरक्षिताम् । मृत्पानीयाग्निसंयुक्तामशून्यां कारयेन्नृप इति स्मरणात् ॥ बीजानि यवव्रीह्यादीनाम् ॥ इति धटविधिः ॥ १०० ॥ १०१ ॥ १०२ ॥

## शाखा ४ थी.

याप्रमाणें सर्व प्रकारच्या दिव्य करण्याच्या कामाविषयीं उपयुक्त असी दिव्यमातृका सांगून आतां तुला इत्यादिक दिव्यांचे प्रयोग सांगतो.

मूलार्थ— तुलाधारण जाणणारे यांनीं दिव्य करणारास तुलेंत बसवून प्रतिमानेंकरून समान करून रेषा करून त्या तुलेची "त्वं तुले सत्यधामासि" इत्यादि मंत्रांहींकरून प्रार्थना करावी.

टीकार्थ— १ तुला धारण ह्मणजे तोलण्याचें काम जाणणारे सोनार इत्यादिक यांनीं दिव्य करणाऱ्या मनुष्यास ह्मणजे वादी अथवा प्रतिवादी यास मृत्तिकादिक वजनानें बरोबर समान तोलून ताजव्याच्या पारड्यांत, जसी बैठक तोलण्याच्या समयीं बसलेला असेल त्याप्रमाणें त्या जागेवर खडू इत्यादिकानें रेषा करून खालीं उतरवावें. त्यानंतर दिव्य करणाऱ्या मनुष्यानें "त्वं तुले सत्यधामासि" इत्यादि "गमयोर्ध्वमाम्" इत्यंत दोन मंत्रांनीं तुलेची प्रार्थना करावी. मंत्रार्थ असा आहे कीं, हे तुले, तूं सत्याचें स्थान आहेस. प्रथमतः सृष्टीच्या समयीं ब्रह्माप्रभृति देवांनीं तुला उत्पन्न केली आहे, ह्यास्तव सत्याचें स्वरूप ( ह्मणजे संदिग्ध अर्थाचा खरेपणा ) दाखीव, आणि हे कल्याणि ( शोभने ), ह्या संशयापासून मला सोडीव. हे मातः,

तुलादिव्याचा प्रयोग.

जर मी पापी ( ह्मणजे असत्य भाषण करणारा ) आहें, तर मला अधोगतीप्रत (नरक प्रत ) ने. आणि जर मी शुद्ध ह्मणजे सत्यवादी असेन तर मला ऊर्ध्वगतीप्रत ने, अ: अर्थ आहे.

२ न्यायाधीशानें तुलेची प्रार्थना करण्याचा मंत्र अन्य स्मृतींत सांगितला आहे. हे मं तर दिव्य करणाराचे होत. जय किंवा पराजय याचें लक्षण तर मंत्राच्या अर्थावरून अव गत होतें, ह्मणून पृथक् सांगितलें नाहीं.

३ तुला करण्याचा प्रकार व दिव्य करणारास पुनः तुलेंत बसविणें इत्यादिक अर्थ सिद्धच आहे, तथापि तें पितामह, नारद इत्यादि स्मृतिकारांनीं स्पष्ट करून सांगितलें आहे. तें असें—

तुला करण्याचा प्रकार.

**पितामह**— यज्ञिय ( यज्ञयोग्य ) वृक्ष, यज्ञाच्या यूपस्तंभाकरितां जसा ( मंत्रपाठपूर्वक ) आणिला जातो त्याप्रमाणें मंत्र ह्मणून तोडून आणावा, नंतर इंद्रादि लोकपालांला नमस्कार करून पंडितांकडून त्या वृक्षाची तुला करवावी. वृक्ष तोडण्याच्या समयीं सोमदेवताक मंत्राचा जप करावा. चौरस दृढ सरळ असा तुलादंड करून त्याच्यावर तीन स्थानीं उपयोगार्थ तीन कडीं जडवावीं. हा तुलादंड चार हात लांबीचा करावा.

४ भूमीवर चार हात उंच असे दोन पादस्तंभ उभे करावे. त्या दोन स्तंभांच्या मध्यभागीं दोन अथवा दीड हातांचें अंतर राखावें. ते पादस्तंभ भूमींत दोन हात रोंवावे आणि दोहों बाजूंस तोरणस्तंभ तुलेपेक्षां दहा अंगुलें उंच रहातील असे रोंवावे त्या तोरणस्तंभांच्या खालीं, मृत्तिकेचे दोन ओळंबे तुलादंडाच्या उंचीपर्यंत उंच असे करावे.

५ तुलेचें मुख पूर्व दिशेस करून ती शुद्ध भूमीवर स्थापन करावी. दोहों बाजूंस दोन पारडीं बांधून त्यांत पूर्वाग्रदर्भ पसरून पश्चिम दिशेच्या पारड्यांत दिव्य करणाऱ्या मनुष्याला बसवून तोलावा. ( पूर्वदिशेकडच्या ) दुसऱ्या पारड्यांत शुद्ध मृत्तिका किंवा इटा, दगड अथवा रेती घालावी.

६ तोलण्याच्या कामांत कुशल असे वाणी, सोनार किंवा कांस्यकार परीक्षक नेमावे. त्या परीक्षक लोकांनीं ओळंब्याच्या बरोबर तुलादंड स्थिर राहे असा करून त्याच्यावर थोडें उदक घालावें. तें उदक एका बाजूनें वाहून न जाईल तर तुलेची दांडी समान बरोबर आहे असें समजावें. या रीतीनें एकवेळ तोलल्यानंतर दिव्य करणाराला खालीं उतरवून ध्वजपताकांनीं तुला सुशोभित करावी.

७ त्यानंतर मंत्रज्ञ ब्राह्मणानें यथाविधि देवतांचें आवाहन करावें. नंतर मांगलिक वाद्यांचे शब्दांसहवर्तमान, गंध पुष्प इत्यादि पूजासामग्री सिद्ध करून पूर्वाभिमुख न्यायाधीशानें हात जोडून “ एह्येहि भगवन् धर्म ” इत्यादि मंत्र आवाहनार्थ पठण करावा. मंत्राचा अर्थ.—हे भगवन्, हे धर्म, तूं ह्या दिव्य कर्मामध्यें लोकपाल, अष्टौ वसु, द्वादशादित्य, मरुद्गण ह्यांसहवर्तमान ये. अशा अर्थाच्या मंत्रेंकरून धर्माचें आवाहन केल्यानंतर अंगदेव-

१ एक दक्षिण दिशेस आणि दुसरा उत्तर दिशेस या रीतीनें उभे करावे.

नांचें स्थापन करावें. तें असें—पूर्वेस इंद्र, दक्षिणेस यम, पश्चिमेस वरुण आणि उत्तरेस कुबेर यांचें स्थापन करून विदिशांचे ठिकाणीं अग्न्यादि देवतांचें स्थापन करावें. इंद्राचा पीतवर्ण, यमाचा श्यामवर्ण, वरुणाचा स्फटिकवर्ण, कुबेराचा सुवर्णवर्ण, अग्नीचा सुवर्णवर्ण, निर्ऋतीचा श्यामवर्ण, वायूचा धूम्रवर्ण, ईशानाचा रक्तवर्ण ह्या अनुक्रमेंकरून त्या त्या देवतांचें ध्यान करावें. इंद्राच्या दक्षिण पार्श्वभागीं अष्टौ वसूंचें आवाहन. त्यांचीं नांवें—१ धर, २ ध्रुव, ३ सोम, ४ आप, ५ अनिल, ६ अनल, ७ प्रत्यूष, ८ प्रभात हे आठ वसु जाणावे. इंद्र आणि ईशान यांच्या मध्यें द्वादशादित्यांची स्थापना करावी. १ धाता, २ अर्यमा, ३ मित्र, ४ वरुण, ५ अंशु, ६ भग, ७ इंद्र, ८ विवस्वान्, ९ पूषा, १० पर्जन्य, ११ त्वष्टा, १२ विष्णु हे द्वादशादित्य जाणावे. अग्नीच्या पश्चिमप्रदेशीं एकादश रुद्र स्थापावे. त्यांचीं नांवें.—१ वीरभद्र, २ शंभु, ३ गिरिश, ४ अजैकपात्, ५ अहिर्बुध्न्य, ६ पिनाकी, ७ अपराजित, ८ भुवनाधीश्वर, ९ कपाली, १० स्थाणु आणि ११ भव हे एकादश रुद्र होत. यम आणि निर्ऋति यांच्या मध्यभागीं सप्तमातृकांचें आवाहन करावें. त्यांचीं नांवें. १ ब्राह्मी, २ माहेश्वरी, ३ कौमारी, ४ वैष्णवी, ५ वाराही, ६ इंद्राणी, ७ चामुंडा ह्या सप्तमातृका होत. निर्ऋतीच्या उत्तरप्रदेशीं गणपतीचें स्थान, वरुणाच्या उत्तरप्रदेशीं मरुद्गणांचें स्थान, १ गगनस्पर्शन, २ वायु, ३ अनिल, ४ मारुत, ५ प्राण, ६ प्राणेश, ७ जीव हे सात मरुद्गण जाणावे. तुळेच्या उत्तर प्रदेशीं दुर्गा देवीचें आवाहन करावें. ह्या पूर्वोक्त देवतांचें नाममंत्रांनीं आवाहन व पूजन करून धर्मदेवतेला अर्घ्यापासून अलंकारपर्यंत उपचार समर्पण करून अंगदेवतांसहि अनुक्रमेंकरून उपचार समर्पण करावे. नंतर गंधापासून नैवेद्यपर्यंत पूजन करावें.

८ येथें संक्षेपेंकरून सारांश हा कीं तुळेला ध्वजपताकांनीं सुशोभित करून वर सांगितलेला "एह्येहि भगवन् धर्म" इत्यादि मंत्रानें धर्माचें आवाहन करून "धर्माय अर्घ्यं प्रकल्पयामि नमः" इत्यादि नमोमंत्रेंकरून अर्घ्य, पाद्य, आचमनीय, मधुपर्क, आचमनीय, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, आचमनीय, मुकुट, कटक इत्यादि अलंकारपर्यंत उपचार समर्पण करून इंद्रादि दुर्गादेवीपर्यंत देवतांला प्रणवादिनमःशब्दांत नाममंत्रानें अर्घ्यापासून अलंकारपर्यंत उपचार समर्पण केल्यानंतर धर्मदेवतेला गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य समर्पण करून इंद्रादि देवतांचीहि त्याप्रमाणें पूजा करावी. तुळेच्या पूजेविषयीं गंधपुष्पें आरक्तवर्ण असावीं. ह्यास प्रमाण.

नारद— आरक्तवर्ण गंधपुष्प, अक्षता व दहीं, अपूप वगैरे पदार्थांनीं प्रथमतः तुळेची पूजा करून नंतर ब्राह्मणाची पूजा करावी.

इंद्रादि देवतांचे पूजनाविषयीं विशेष विचार सांगितला नाहीं यास्तव यथासंभव, आरक्त अथवा अन्यवर्णांच्या गंधपुष्पादि उपचारांनीं पूजा करावी; असा पूजा अनुक्रम जाणावा.

हा वर सांगितलेला पूजाप्रकार न्यायाधीशानें करावा. कारण,

**स्मृति**— वेद वेदांगें जाणणारा, विद्याव्रतयुक्त, शांतचित्त, मत्सररहित, सत्यवादी, पवित्र, चतुर, प्राणिमात्रांचें हित करणारा, उपोषित, शुद्धवस्त्रधारी आणि दंतधावन वगैरे नित्यकर्म केलेला अशा ब्राह्मण न्यायाधीशानें यथाविधि सर्व देवतांची पूजा करावी.

आणि चार ऋत्विजांनीं चार दिशांचे ठायीं लौकिकाग्नीवर होम करावा. ह्यास प्रमाण सांगतो.

**स्मृति**— वेदपारंगत ब्राह्मणांनीं चार दिशांचे ठायीं समिधा, चरु आणि आज्य यांचा होम प्रणवादि स्वाहाशब्दांत गायत्रीमंत्रानें करावा.

प्रणवाचा व गायत्री मंत्राचा उच्चार करून शेवटीं प्रणव व स्वाहा शब्द यांचा उच्चार करून समिधा, घृत व चरु या प्रत्येक द्रव्याचा अष्टोतर शत होम करावा.

याप्रमाणें हवनांत देवपूजा करून नंतर पुढें सांगितलेला मंत्र एका पत्रावर लिहून "आदित्यचंद्रावनिलोनलश्च" इत्यादि मंत्रेंकरून तें पत्र ( दिव्य करणाराच्या) मस्तकावर स्थापित करावें.

**स्मृति**— वादीचा अथवा प्रतिवादीचा जो वाक्य असेल तो व मंत्र पत्रावर लिहून तें पत्र मस्तकावर बांधावें.

**आदित्यचन्द्रावनिलोनलश्च द्यौर्भूमिरापो हृदयं यमश्च ।**
**अहश्च रात्रिश्च उभे च सन्ध्ये धर्मश्च जानाति नरस्य वृत्तमिति ॥**

**मंत्रार्थ**— आदित्य, चंद्र, वायु, अग्नि, आकाश, पृथ्वी, आप, हृदय, यम, दिवस, रात्रि, दोन संध्यासमय आणि धर्म हे, मनुष्याचें वृत्त ( वर्तन ) जाणतात.

धर्माच्या आवाहनापासून आरंभ करून मस्तकावर पत्र बांधणें एथपर्यंत, हें सर्व कर्मकांड सर्व दिव्यांविषयीं साधारण जाणावें; कारण,

**स्मृति**— धर्मादि देवतांचें आवाहन, पूजा इत्यादि हा सर्व मंत्रविधि सर्व दिव्यांविषयीं योजावा.

त्यानंतर न्यायाधीशानें तुलेची प्रार्थना करावी. कारण,

**स्मृति**— मंत्र जाणणारा यानें या विधीकरून तुलेची प्रार्थना करावी.

प्रार्थनेचे मंत्र दाखवितो.

**त्वं धट ब्रह्मणा सृष्टः परीक्षार्थं दुरात्मनां ॥**
**धकाराद्धर्ममूर्तिस्त्वं टकारात्कुटिलं नरमिसादि ॥** मंत्र ४ ॥

**मंत्रार्थ**— हे धट ( तुले ), दुष्ट ( मिथ्यावादी ) लोकांच्या परीक्षेसाठीं ब्रह्मदेवानें तुला उत्पन्न केला आहे. ( तुझ्या नांवांतील ) धकाराकडून तूं धर्ममूर्ति आणि टकाराकडून कुटिल पुरुषाप्रत जाणून दाखवून देणारा आहेस, यास्तव धट असें तुला ह्मणतात. तूं सर्व मनुष्यांचें पाप पुण्य जाणतोस. मनुष्यांला ज्या गोष्टींचें ज्ञान नाहीं त्या सर्व तूंच जाणतोस. ह्या मनुष्यावर अपराधाचा संशय आहे, ह्याला धर्मन्यायेंकरून संशयापासून रक्षण करण्याविषयीं तूं योग्य आहेस.

दिव्य करणारानें तर "त्वं तुले सत्यधामासि" इत्यादि ( मूळ वचनांत सांगितलेल्या ) मंत्रेंकरून तुलेची प्रार्थना करावी.

त्यानंतर न्यायाधीशानें दिव्य करणारे मनुष्याचे मस्तकीं पत्र बांधून पूर्वी ज्या ठिकाणीं जशा बैठकीनें बसलेला असेल त्याप्रमाणेंच पुनः तुलेवर चढवून बसवावा. कारण, ह्यास प्रमाण.

**स्मृति**– मस्तकीं पत्र बांधलेला अशा दिव्य करणारास पुनः तुलेवर चढवावें.

पांच विनाडीपर्यंत त्याला तसेंच त्या तुलेंत बसवावें. विनाडीचें परिमाण ज्योतिष्याकडून करवावें. कारण,

**स्मृति**– ज्योतिःशास्त्रज्ञ श्रेष्ठ अशा ब्राह्मणानें पांच विनाडींपर्यंत कालपरीक्षा करावी. असें परीक्षाकालवेत्ते ह्मणतात.

दहा गुरु अक्षरें उच्चारणपरिमित काल तो प्राण, सहा प्राण म्हणजे एक विनाडी होते.

**स्मृति**– दहा गुरु वर्णोच्चारणपरिमित काल तो प्राण, सहा प्राण म्ह० एक विनाडिका, साठ विनाडी ह्मणजे एक घटिका, साठ घटिकांचें एक अहोरात्र, तीस अहोरात्रांचा एक मास.

त्या समयीं शुद्धि व अशुद्धि यांची परिक्षा करण्याकरितां राजानें शुचिर्भूत, ज्ञाते असे पुरुष नेमावे. नंतर त्यांनीं यथार्थ अनुभवाप्रमाणें शुद्धि, अथवा अशुद्धि राजाला सांगावी. कारण,

**पितामह**– यथार्थदृष्टवादी, ज्ञानी, पवित्र, लोभरहित, असे श्रेष्ठ ब्राह्मण राजानें नेमावे, ते श्रेष्ठ साक्षी शुद्धि किंवा अशुद्धि राजाला सांगतात.

शुद्धि आणि अशुद्धि याचे निर्णयाचें कारणहि ( स्मृतींत ) सांगितलें आहे.

**स्मृति**– तोलल्यानंतर जर वाढेल तर तो शुद्ध समजावा, यांत संशय नाहीं, आणि जर कदाचित् समान, किंवा कमी होईल तर अशुद्ध समजावा.

**स्मृति**– समान झालेला अल्पदोषी, आणि कमी झालेला तो बहुदोषी समजावा.

असें जें पितामहवचन आहे त्याचें तात्पर्य हें कीं, अपराध्याचे आंगीं दोष (अपराध) लहान आहे किंवा मोठा आहे ह्याचा निश्चय जरी दिव्येंकरून होणें अशक्य आहे, तथापि एकवार किंवा अजाणतां केलेला अपराध लहान, आणि वारंवार अथवा जाणून बुजून केलेला अपराध तो मोठा, असें समजून दंड व प्रायश्चित्त यांच्या अल्पत्वमहत्त्वाचा निर्णय करण्यास शक्य आहे.

आणि ज्या कालीं दृष्टोत्पत्तींत न येणारें अशा कारणेंकरून ( तुलेचें ) शिंकें वगैरे तुटेल किंवा मोडेल तेव्हांहि अशुद्धि समजावी. ह्यास प्रमाण.

**स्मृति**– शिंकें तुटेल, तुला मोडेल, किंवा आंकडे मोडतील, दोरी तुटेल, तेव्हांहि तसीच अशुद्धि समजावी.

आंकडे म्हणजे तुलादंडाच्या दोहों बाजूंस शिंकीं अडकविण्याकरितां जे वांकडे शृंगाकार खिळे असतात ते.

ज्या काळीं दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या कारणानें (तुळेचें) शिंकें वगैरे तुटेल, किंवा तुला इत्यादि मोडेल तर पुनः (तुळेवर दिव्यकर्त्यास) चढवावें. ह्यास प्रमाण.

स्मृति— शिंकें वगैरे तुटेल अथवा तुला मोडेल तर त्या मनुष्यास पुनः चढवावें.

हा पूर्वोक्त सर्व विधि झाल्यानंतर (कर्तव्य सांगतो.)

स्मृति— ऋत्विक्, पुरोहित, आचार्य इत्यादिकांस दक्षिणा देऊन संतुष्ट करावें. याप्रमाणें करविणारा राजा उत्तम मनोरम भोग भोगून व मोठी कीर्ति पावून अंतीं मोक्षसुख पावतो.

ही पूर्वोक्तलक्षणयुक्त तुला तसीच रक्षण करून ठेवण्याविषयीं राजाची इच्छा असेल तर कावळे इत्यादिकांचा उपद्रव न व्हावा ह्मणून दरवाजा इत्यादिकांनें युक्त अशी बंदोबस्ताची तुलाशाळा बांधावी. ह्यास प्रमाण,

स्मृति— विशाल, उंच, शुभ्रवर्ण असी तुलाशाळा बांधावी, कीं ज्या शाळेंतील तुळेला कुत्रे, कावळे, चांडाल यांचा स्पर्श होणार नाहीं. त्याच शाळेंत पूर्वोक्त लोकपालादि सर्व देवतांची दिशांचे ठायीं स्थापना करावी, आणि ह्या देवतांची गंधपुष्पादिक उपचारांनीं नित्य त्रिकाळ पूजा करावी. दरवाजे, यव, व्रीहि इत्यादि धान्यबीजें हीं त्या शाळेंत नित्य राखून चाकरांकडून त्या तुलाशाळेचें संरक्षण करवावें, आणि तींत उदक, मृत्तिका व अग्नि नित्य रहातील असी ती राजानें करवावी. तुलाविधि समाप्त झाला.

---

**करौ विमृदितव्रीहेर्लक्षयित्वा ततो न्यसेत् ।**
**सप्ताश्वत्थस्य पत्राणि तावत्सूत्राणि वेष्टयेत् ॥ १०२ ॥**

इदानीं क्रमप्राप्तमग्निविधिमाह ॥ दिव्यमातृकोक्तसाधारणधर्मेषु सत्सु तुलाविधानोक्तधर्मावाहनादिशिरःपत्रारोपणान्ते च विद्यन्ते सत्स्वयमग्निविधौ विशेषः । विमृदितव्रीहेर्विमृदिता विघर्षिता व्रीहयः कराभ्यां येनासौ विमृदितव्रीहिस्तस्य करौ लक्षयित्वा तिलकालकव्रणकिणादिस्थानेष्वलक्तकरसादिनाङ्कयित्वा ॥ यथाह नारदः ॥ हस्तक्षतेषु सर्वेषु कुर्याद्धंसपदानि ति । अनन्तरं सप्ताश्वत्थस्य पर्णानि हस्तयोरञ्जलीकृतयोर्न्यसेत् ॥ पत्रैरञ्जलिमापूर्य आश्वत्थैः सप्तभिः समैरिति स्मरणात् । तानि च हस्तसहितानि सूत्रेण तावद्वेष्टयेत् । यावन्त्यश्वत्थपर्णानि सप्तकृत्वो वेष्टयेदित्यर्थः । सूत्राणि च सप्त शुक्लानि भवन्ति । वेष्टयीत सितैर्हस्तौ सप्तभिः सूत्रतन्तुभिरिति नारदवचनात् । तथा सप्त शमीपत्राणि सप्तैव दूर्वापर्णानि चाक्षतांश्च दध्यक्तानक्षतांश्चाश्वत्थपत्राणामुपरि विन्यसेत् । सप्त पिप्पलपत्राणि शमीपत्राण्यथाक्षतान् । दूर्वायाः सप्त पत्राणि दध्यक्तांश्चाक्षतान्न्यसेदिति स्मरणात् । कुसुमानि च विन्यसेत् । सप्त पिप्पलपत्राणि अक्षतान्सुमनो दधि । हस्तयोर्निक्षिपेत्तत्र सूत्रेणावेष्टनं तथेति पितामहवचनात् । सुमनसः पुष्पाणि । यदपि स्मरणम् । अयस्तप्तं

तु पाणिभ्यामर्कपत्रैस्तु सप्तभिः । अन्तर्हितं रहःशुद्धमदग्धः सप्तमे पद इति तदप्य-श्वत्थपत्राभावे अर्कपत्रविषयं वेदितव्यम् । अश्वत्थपत्राणां पितामहप्रशंसावचनेन मुख्यत्वावगमात् ॥ पिप्पलाज्जायते वन्हिः पिप्पलो वृक्षराट् स्मृतः । अतस्तस्य तु पत्राणि हस्तयोर्विन्यसेद्बुध इति ॥ १०३ ॥

## शाखा ५ वी.

आतां अनुक्रमानें प्राप्त झालेलें अग्निदिव्य सांगतो.

**मूलार्थ**– ज्यानें आपल्या हस्तांनीं व्रीहींचें मर्दन केलें आहे, अशा त्या दिव्य कर्त्याचे हात पाहून त्या हातांवर चिन्ह करावें. नंतर अश्वत्थाचीं सात पानें हातावर ठेवून सूत्राचे सात फेरे देऊन बांधावें.

**टीकार्थ**– १ दिव्य मातृकांत पूर्वीं सांगितलेला सर्वसाधारण विधि झाल्यानंतर तुलाविधींत सांगितलेलें धर्मादि देवतांचे आवाहनापासून आरंभ करून मस्तकीं पत्र बांधणें एथपर्यंत कर्म करून, अग्निदिव्यसंबंधी विशेष विधि करावा. तो असा.—

अग्निदिव्याचा विधि.

२ ज्यानें आपल्या हातावर व्रीहींचें मर्दन केलें आहे, अशा त्या दिव्य करणारे मनुष्याचे हात पाहून मर्दनजन्य घट्टयांवर अळिता वगैरे रंगांनीं चिन्ह करावें. ह्यास प्रमाण नारद सांगतो.

**नारद**– ( व्रीहींच्या मर्दनापासून ) हाताला झालेलीं जीं क्षतें त्यांवर हंस पक्ष्याचे पायाचे आकाराचीं चिन्हें करावीं.

त्यानंतर हातांचा अंजलि करून त्या अंजलीवर पिंपळाचीं सात पानें ठेवून, त्या पानांसहित अंजलीस सुताचे सात फेरे द्यावे. पांढरे रंगाचें सूत असावें.

**नारद**– श्वेत वर्ण सुताच्या सात तंतूंनीं वेष्टन करावें.

तसेंच सात शमीपत्रें, सात दूर्वा, आणि दधियुक्त अक्षता, पुष्पें हीं त्या अश्वत्थपत्रांवर ठेवावीं. ह्यास प्रमाणवचन.

**पितामह**– सात शमीपत्रें, सात दूर्वा, दधियुक्त अक्षता, हीं ( अंजलिकृत ) हस्तांवर ठेवून सात वेळ सूत्रवेष्टन करावें.

**स्मृति**– रुईचीं सात पानें हातावर ठेवून त्या पानांवर तप्त लोखंड ठेवून सात पावलें चालावें, जर तो न पोळेल तर शुद्ध.

असें जें पितामहवचनांत सांगितलें तें अश्वत्थपत्रांच्या अभावीं रुईचीं पानें ग्रहण करणें असतां जाणावें. कारण, अश्वत्थपत्रें हीं ( खालीं लिहिलेल्या ) पितामहप्रशंसावचनावरून ( दिव्य कर्माविषयीं ) मुख्य आहेत असें सिद्ध होतें.

**पितामह**– अश्वत्थापासून अग्नि उत्पन्न होतो, ह्यास्तव सर्व वृक्षांचा राजा अश्वत्थ म्हटला आहे, ह्यासाठीं ज्ञात्या पुरुषानें अश्वत्थाचीं पानें हातावर ठेवावीं. १०३

त्वमग्ने सर्वभूतानामन्तश्चरसि पावक ।
साक्षिवत्पुण्यपापेभ्यो ब्रूहि सत्यं कवे मम ॥ १०४ ॥

कर्तुरग्न्यभिमन्त्रणमाह । अग्ने त्वं सर्वभूतानां जरायुजाण्डजस्वेदजोद्भिज्जानामन्तः शरीराभ्यन्तरे चरसि उपयुक्तान्नपानादीनां पाचकत्वेन वर्त्तसे । पावक शुद्धिहेतो । कवे क्रान्तदर्शिन् । साक्षिवत्पुण्यपापेभ्यः सत्यं ब्रूहि । पुण्यपापेभ्य इति ल्यब्लोपे पञ्चमी । पुण्यपापान्यवेक्ष्य सत्यं ब्रूहि दर्शयेत्यर्थः । अयःपिण्डे त्रिभिस्तापैः संतप्ते सन्दंशेन पुरत आनीते कर्ता पश्चिममण्डले प्राङ्मुखस्तिष्ठन् अनेन मन्त्रेणाग्निं अभिमन्त्रयेत् ॥ यथाह नारदः ॥ अग्निवर्णमयःपिण्डं सस्फुलिङ्गं सुरञ्जितम् । तापे तृतीये संताप्य ब्रूयात्सत्यपुरस्कृतमिति । अस्यार्थः । लोहशुद्ध्यर्थं सुतप्तं लोहपिण्डमुदके निक्षिप्य पुनः संताप्योदके निक्षिप्य तृतीये तापे संताप्य सन्दंशेन गृहीत्वा पुरत आनीते सत्यपुरस्कृतं सत्यशब्दयुक्तं त्वमग्ने सर्वभूतानामित्यादिमन्त्रं कर्ता ब्रूयादिति। प्राड्विवाकस्तु मण्डलभूभागाद्दक्षिणप्रदेशे लौकिकमग्निमुपसमाधाय अग्नये पावकाय स्वाहेति आज्येनाष्टोत्तरशतवारं जुहुयात् । शान्त्यर्थं जुहुयादग्नौ घृतमष्टोत्तरं शतमिति स्मरणात् ॥ हुत्वा च तस्मिन्नग्नावयःपिण्डं प्रक्षिप्य तस्मिंस्ताप्यमाने धर्मावाहनादिहवनान्तं पूर्वोक्तविधिं विधाय तृतीये तापे वर्तमाने अयःपिण्डमग्निमेभिर्मन्त्रैरभिमन्त्रयेत् । त्वमग्ने वेदाश्चत्वारस्त्वं च यज्ञेषु हूयसे । त्वं मुखं सर्वदेवानां त्वं मुखं ब्रह्मवादिनाम् । जठरस्थो हि भूतानां ततो वेत्सि शुभाशुभम् । पापं पुनासि वै यस्मात्तस्मात्पावक उच्यसे । पापेषु दर्शयात्मानमर्चिष्मान् भव पावक । अथवा शुद्धभावेषु शीतो भव हुताशन ॥ त्वमग्ने सर्वदेवानामन्तश्चरसि साक्षिवत् । त्वमेव देव जानीषे न विदुर्यानि मानवाः । व्यवहाराभिशस्तोऽयं मानुषः शुद्धिमिच्छति । तदेनं संशयादस्माद्धर्मतस्त्रातुमर्हसीति ॥ १०४ ॥

दिव्यकर्त्यानें अग्नीची प्रार्थना करणें त्याचा मंत्र सांगतो-

मूलार्थ– हे अग्ने, तूं सर्व भूतांचे अंतःशरीरीं वास करितोस, हे कवे, हे पावका, तूं साक्षीप्रमाणें, पाप पुण्य पाहून सत्य प्रकार जो असेल तोच दाखवावा.

टीकार्थ–१ हे अग्ने, तूं जरायुज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज्ज अशा सर्व भूतांच्या अंतःशरीरांत राहतोस, म्हणजे प्राण्यांनीं भक्षण केलेल्या अन्नपानादि सर्व पदार्थांचें पचन करणारा असा राहतोस. हे पावक, हे कवे, तूं साक्षीप्रमाणें ( माझीं ) पुण्य व पापें पाहून सत्य असेल तेंच दाखवावें.

अग्नीची प्रार्थना.

तीन ताव देऊन तापविलेला असा लोखंडाचा गोळा सांडसानें धरून समोर आणल्यानंतर दिव्य करणारा यानें पश्चिम दिशेस मंडलावर पूर्वाभिमुख उभें राहून वर (मूळांत) सांगितलेल्या मंत्रेंकरून अग्नीची प्रार्थना करावी. ह्यास प्रमाण,

नारद– अग्निवर्णाप्रमाणें लाल तापविलेला, व त्यांतून थिणग्या उडतात असा लो-

खंडाचा गोळा, तीन वेळ तापविल्यानंतर सत्य शब्दानें युक्त असा मंत्र पठण करावा.

**वचनाचा अर्थ**— लोखंड शुद्ध होण्याकरितां तापविलेला लोखंडाचा गोळा उदकांत टाकावा, पुनः तोच गोळा तापवून उदकांत टाकून, पुनः तापवून सांडसानें धरून समोर आणिल्यानंतर सत्यशब्दानें युक्त असा "त्वमग्ने सर्वभूतानां" इत्यादि मंत्र दिव्य करणारानें पठण करावा.

४ न्यायाधीशानें मंडलभूमीच्या दक्षिण प्रदेशीं लौकिकाग्नि स्थापन करून "अग्नये पावकाय स्वाहा" ह्या मंत्रेंकरून घृताच्या अष्टोत्तरशत आहुतींनीं होम करावा.

**स्मृति**— शांतिप्राप्त्यर्थ, अग्नींत १०८ आहुतींनीं घृताचा होम करावा.

होम झाल्यानंतर त्या अग्नींत तो लोखंडाचा गोळा टाकावा, तो तापत असतां त्या समयीं धर्मादि देवतांचे आवाहनापासून होमापर्यंत पूर्वोक्त विधि करावा. नंतर तो गोळा तिसऱ्यानें तापवावयाचा तेव्हां त्या गोळ्यांतील अग्नीची "त्वमग्ने वेदाश्चत्वार" इत्यादि (वर टीकेंत सांगितलेल्या ९) मंत्रांहींकरून प्रार्थना करावी.

**मंत्रार्थ**— हे अग्ने, चार वेद हे तूंच आहेस, यज्ञयागांत तुलाच हवन करितात. तूं सर्व देवतांचें व ब्रह्मवादींचें मुख आहेस, आणि सर्व प्राणिमात्राचे उदरांत तूं राहतोस ह्मणून पापपुण्यज्ञाता आहेस. पाप्यांला पवित्र करतोस म्हणून तुला पावक ह्मटलें आहे. हे तेजस्वी पावका, तूं आपलें स्वरूप पाप्यांला दाखीव, आणि हे हुताशन, जे मनुष्य शुद्ध आहेत त्यांस शीतळ हो. हे अग्ने, तूं सर्व प्राणिमात्राचे शरीरांत साक्षीप्रमाणें संचार करितोस, व मनुष्यांस जीं अज्ञात तीं सर्व तूं जाणतोस. व्यवहारसंबंधी कामांत ह्या मनुष्याविषयीं संशय आल्यावरून हा शुद्धीची इच्छा करीत आहे, यास्तव धर्मन्यायाप्रमाणें ह्या संशयापासून ह्याचें रक्षण करण्याविषयीं तूं योग्य आहेस. १०४

---

**तस्येत्युक्तवतो लौहं पञ्चाशत्पलिकं समम् ।**
**अग्निवर्णं न्यसेत्पिण्डं हस्तयोरुभयोरपि ॥ १०५ ॥**

अपि च तस्य कर्तुरित्युक्तवतस्त्वमग्ने सर्वभूतानामित्याद्यभिमन्त्रणं कृतवतो लौहं लोहविकारं पिण्डं पञ्चाशत्पलिकं पञ्चाशत्पलसम्मितं सममस्त्ररहितम् । सर्वतश्च समं वृत्तं श्लक्ष्णं च तथाष्टाङ्गुलायामं। अस्रहीनं समं कृत्वा अष्टाङ्गुलमयोमयम् । पिण्डं तु तापयेदग्नौ पञ्चाशत्पलिकं सममिति पितामहस्मरणात् । अग्निवर्णमग्निसदृशमुभयोर्हस्तयोरश्वत्थपत्रदधिदूर्वाद्यन्तरितयोर्न्यसेत् निक्षिपेत्प्राड्विवाकः ॥ १०५ ॥

**मूलार्थ**— पूर्वोक्त रीतीनें अग्नीची प्रार्थना करणाऱ्या पुरुषाचे दोनहि हातांवर पन्नास पळें वजनाचा, वर्तुळ, अग्निवर्ण, असा लोहमय पिंड ठेवावा.

**टीकार्थ**— ९ "त्वमग्ने सर्वभूतानामित्यादि" मंत्रेंकरून पूर्वोक्त रीतीनें अग्नीची प्रा-

दिव्य करणाराचे हातांवर लोहपिंड ठेवावा.

र्थना करणाऱ्या पुरुषाचे दोनहि हात अश्वत्थपत्रें, दधि, दूर्वा इत्यादिकांनीं आच्छादित करून त्या हातांवर पंनास पळें वजनाचा, वर्तुळाकार, अग्निवर्ण (अतितप्त लाल) अष्टांगुलपरिमित, असा लोखंडाचा गोळा न्यायाधीशानें ठेववावा.

पितामह– अस्त्रहीन (कोणरहित–वर्तुळ), सम, अष्टांगुलपरिमित, पन्नास पळें वजनाचा, असा लोखंडाचा गोळा अग्नीवर तापवावा (आणि हस्तांवर ठेवावा). १०५

---

## स तमादाय सप्तैव मण्डलानि शनैर्व्रजेत् ।

ततः किंकुर्यादित्यत आह । स पुरुषस्तप्तं लोहपिण्डं अञ्जलिना गृहीत्वा सप्तमण्डलानि शनैर्व्रजेत् । एवकारेण मण्डलेष्वेव पदन्यासं मण्डलानतिक्रमणं च दर्शयति ॥ यथाह पितामहः ॥ न मण्डलमतिक्रामेन्नाप्यर्वाक् स्थापयेत्पदमिति ॥

तदनंतर काय करावें तें सांगतो.

मूलार्थ– दिव्य करणारा यानें तो गोळा घेऊन सात मंडलें हळू हळू चालावें.

टीकार्थ–६ दिव्य करणारानें तो तप्त गोळा अंजलीनें धरून सात मंडलेंच हळू हळू चालावें, "मंडलेंच" असें सांगितलें, त्यावरून मंडलांच्या आंतच चालावें. मंडलांच्या बाहेर पाय ठेवूं नये. ह्यास प्रमाण.

पितामह– मंडलाचें उल्लंघन करूं नये, (मंडलाच्या) खालीं पाय ठेवूं नये.

## षोडशाङ्गुलकं ज्ञेयं मण्डलं तावदन्तरम् ॥ १०६ ॥

सप्तैव मण्डलानि शनैर्व्रजेदित्युक्तं तत्रैकैकं मण्डलं किंप्रमाणं मण्डलयोरन्तरं च कियत्प्रमाणकमित्यतआह ॥ षोडश अङ्गुलानि यस्य तत् षोडशाङ्गुलकं । षोडशाङ्गुलप्रमाणं मण्डलं बोद्धव्यम् । मण्डलयोरन्तरं मध्यं च तावदेव । षोडशाङ्गुलकमेव सप्त मण्डलानि व्रजेदिति वदता प्रथममवस्थानमण्डलमेकमुक्तं अतश्चाष्टमण्डलानि षोडशाङ्गुलकानि मण्डलान्तराणि तु सप्त तावत्प्रमाणानि ॥ एतदेव नारदेन परिसंख्यायोक्तम् ॥ द्वात्रिंशदङ्गुलं प्राहुर्मण्डलान्मण्डलान्तरम् । अष्टाभिर्मण्डलैरेवमङ्गुलानां शतद्वयम् । चत्वारिंशत्समधिकं भूमेरङ्गुलमानत इति । अयमर्थः । अवस्थानमण्डलात्षोडशाङ्गुलान्मण्डलान्तरमन्यन्मण्डलम् । द्वितीयाद्येकमेकं द्वात्रिंशदङ्गुलं सान्तरालं तदेवमवस्थानमण्डलं षोडशांगुलं । गन्तव्यानि च सप्त मण्डलानि सान्तरालानि द्वात्रिंशदङ्गुलान्येवमष्टाभिर्मण्डलैश्चत्वारिंशदधिकं शतद्वयं भूमेरङ्गुल-

---

१ ऐशीं रती म्हणजे एक कर्ष, चार कर्ष म्हणजे एक पल; म्हणजे सवातीन तोळे, दोन वाल, दोन रती यांचें एक पल जाणावें.

मानतोऽङ्गुलमानमिति । सार्वविभक्तिकस्तसिः । अस्मिंस्तु पक्षेऽवस्थानमण्डलं षोडशाङ्गुलं विधाय द्वात्रिंशदङ्गुलप्रमाणानां सप्तानां सान्तरालमण्डलभूतानां भूभागानामेकं भूभागं द्विधा विभज्यान्तरालभूभागान् षोडशाङ्गुलप्रमाणान् विहाय मण्डलभूभागेषु षोडशाङ्गुलप्रमाणेषु गन्तृपदप्रमाणानि सप्त मण्डलानि कार्याणि । यथा तेनैवोक्तम्॥ मण्डलस्य प्रमाणं तु कुर्यात्तत्पदसंमितमिति । यत्तु पितामहेनोक्तम् । कारयेन्मण्डलान्यष्टौ पुरस्तान्नवमं तथा । आग्नेयं मण्डलं चाद्यं द्वितीयं वारुणं स्मृतम् ॥ तृतीयं वायुदैवत्यं चतुर्थं यमदैवतम् । पञ्चमं त्विन्द्रदैवत्यं षष्ठं कौबेरमुच्यते । सप्तमं सोमदैवत्यं सावित्रं त्वष्टमं तथा । नवमं सर्वदैवत्यमिति दिव्यविदो विदुः । द्वात्रिंशदङ्गुलं प्राहुर्मण्डलान्मण्डलान्तरम् । अष्टाभिर्मण्डलैरेवमङ्गुलानां शतद्वयम् । षट्पञ्चाशत्समधिकं भूमेस्तु परिकल्पना ॥ कर्तुः पदसमं कार्यं मण्डलं तु प्रमाणतः । मण्डले मण्डले देयाः कुशाः शास्त्रप्रचोदिता इति तन्नवमं सर्वदैवसमपरिमिताङ्गुलप्रमाणं मण्डलं विहायाष्टाभिर्मण्डलैरष्टाभिश्चान्तरालैः प्रत्येकं षोडशाङ्गुलप्रमाणैरङ्गुलानां षट्पञ्चाशदधिकं शतद्वयं संपद्यते । तत्रापि गन्तव्यानि सप्तैव मण्डलानि । यतः प्रथमे तिष्ठति नवमे क्षिपतीति न विरुद्ध्यते । अङ्गुलप्रमाणं च । तिर्यग्यवोदराण्यष्टावूर्ध्वा वा व्रीहयस्त्रयः । प्रमाणमङ्गुलस्योक्तं वितस्तिर्द्वादशाङ्गुलः । हस्तो वितस्तिद्वितयं दण्डो हस्तचतुष्टयम् । तत्सहस्रद्वयं क्रोशो योजनं तच्चतुष्टयमिति बोद्धव्यम् ॥ १०६॥

सात मंडलेंच हळू हळू चालावें असें वरच्या अर्ध्या वचनेंकरून सांगितलें, त्याविषयीं एकेक मंडल किती परिमाणाचें व दोहों मंडलांमध्यें अंतर किती असावें तें अर्ध्या वचनानें सांगतो.

मूलार्थ– मंडल सोळा अंगुळांचें जाणावें, आणि अंतरहि तितकेंच.

टीकार्थ–७ सोळा अंगुळ परिमाण एक मंडल जाणावें, आणि दोन मंडलांचे मध्यें अंतर (अवकाश)हि तितकेंच, ह्मणजे सोळा अंगुळेंच ठेवावें.

मंडलाचें परिमाण.

सात मंडलें चालावें असें (चालत्या मूळ वचनाच्या पूर्वार्द्धांत) सांगितलें, यावरून प्रथम उभें रहाण्यासाठीं एक अवस्थानमंडल करावें (असें सिद्ध होतें) यास्तव सोळा सोळा अंगुळांचीं आठ मंडलें, आणि त्यांच्या मधील अंतराचे सात भागहि तितक्याच परिमाणाचे समजावे.

नारदहि ह्याच प्रकारें संख्या सांगतो.

**नारद**– सोळा अंगुळांचें एक मंडल आणि मंडलाचें अंतरहि सोळा अंगुळें, मिळून तीस अंगुळें, याप्रमाणें आठ मंडलें आणि सात मध्यावकाश यांचीं सर्व मिळून अंगुळें २४० भूमिप्रमाण होतें.

याचा भावार्थ असाः—सोळा अंगुळांचें पहिलें एक अवस्थानमंडल करावें, त्याच्या

पुढील अंतराल प्रदेशासहित दुसरीं सात मंडलें बत्तीस बत्तीस अंगुळपरिमाणाचीं करावीं. असीं आठ मंडळें मिळून भूमीचें प्रमाण २४० अंगुळें होय. ह्या पक्षीं अवस्थानमंडळ सोळा अंगुळांचें करून अंतराळप्रदेशासहित बत्तीस बत्तीस अंगुळपरिमाण अशा मंडलांच्या प्रत्येक भूभागाचे दोन दोन भाग करून सोळा अंगुळें परिमाण अंतराळभूमीचे भाग सोडून सोळा अंगुळें परिमाण एक मंडल असीं सात मंडलें, दिव्य करणाऱ्या मनुष्याचे पावलाचे परिमाणाचीं करावीं.

तो ( नारद )च सांगतो.

**नारद**— दिव्य करणाऱ्या मनुष्याचें जितकें पाऊल तत्परिमाणाचें मंडल करावें.

**पितामह**— आठ मंडलें करवावीं, आणि त्यांच्या पुढें नववें मंडल करवावें. त्यांपैकीं, प्रथम मंडल अग्नीचें, दुसरें मंडल वरुणाचें, तिसरें मंडल वायूचें, चौथें यमाचें, पांचवें इंद्राचें, सहावें कुबेराचें, सातवें सोमाचें, आठवें सूर्याचें, आणि नववें सर्व देवतांचें असें वेदवेत्ते सांगतात. एक मंडलाहून दुसरें मंडल अंतरालसहित बत्तीस अंगुळांचें, असीं आठ मंडलें ह्मणजे २५६ अंगुळें भूपरिमाण होतें. दिव्यकर्त्याचे पावलाएवढें मंडल करावें. प्रत्येक मंडलाचे ठायीं शास्त्रोक्त दर्भ टाकावे.

असें जें पितामहानें सांगितलें आहे, त्यामध्यें सर्व देवतांचें नवम मंडल किती परिमाणाचें करावें तें सांगितलें नाहीं, ह्यास्तव त्या नवम मंडलावांचून इतर आठ मंडलांहींकरून भूपरिमाण २५६ अंगुळें होतें[1].

८ जरी नऊ मंडलें सांगितलीं तथापि चालण्याचीं मंडलें सातच होत. कारण कीं, प्रथम मंडल उभें रहाण्याकरितां, आणि नववें मंडल लोहपिंड टाकण्याकरितां आहे यास्तव विरोध नाहीं.

अंगुलपरिमाण ( सांगतो. )

**स्मृति**— तिर्कस ( आडव्या ) आठ यवांनीं व्यापित जो प्रदेश तें अंगुळ, अथवा तीन उभे व्रीहि ह्मणजे एक अंगुळ, बारा अंगुळांची एक वीत, दोन वितींचा एक हात, चार हस्त म्हणजे एक दंड, दोन हजार दंड ह्मणजे एक क्रोश, चार क्रोश ह्मणजे एक योजन, याप्रमाणें परिमाण समजावें. १०६

---

## मुक्ताग्निं मृदितव्रीहिरदग्धः शुद्धिमाप्नुयात्।

सप्त मण्डलानि गत्वा किं कर्तव्यमित्यत आह ॥ अष्टमे मण्डले स्थित्वा नवमे मण्डले अग्नितप्तमयःपिण्डं सक्त्वा कराभ्यां व्रीहीन्मर्दयित्वा अदग्धहस्तश्चेच्छुद्धिमाप्नुयात्। दग्धहस्तश्चेदशुद्ध इत्यर्थसिद्धम्। यस्तु सन्त्रासात्प्रस्खलन् हस्ताभ्यामन्यत्र दह्यते तथाप्यशुद्धो न भवति। यथाह कात्यायनः॥ प्रस्खलन्नभिशस्तश्चेत्स्थानादन्यत्र दह्यते। अदग्धं तं विदुर्देवास्तस्य भूयोऽपि दापयेदिति॥

---

१ कारण कीं, आठव्या व नवव्या मंडळाच्या मधील सोळा अंगुळें परिमाणाचा आठवा अंतराळभाग ह्या पक्षीं अधिक झाला म्हणून २५६ अंगुळें होतात.

सात मंडलें चालून गेल्यानंतर काय करावें तें (अर्ध्या वचनेंकरून) सांगतो.

**मूलार्थ**– अग्नि टाकून व्रीहींचें मर्दन करावें, दग्ध न होईल तर शुद्ध.

**टीकार्थ**–९ आठव्या मंडलाचे ठायीं उभा राहून नवव्या मंडलावर अग्नि, म्हणजे तापविलेला लोखंडाचा गोळा टाकून, नंतर व्रीहि हातांहींकरून मर्दन करावे. हस्त दग्ध न होईल तर तो शुद्ध, दग्ध झाल्यास अशुद्ध, हें अर्थसिद्ध आहे. जो मनुष्य भयाभीत होऊन पडल्यामुळें हातांशिवाय अन्य ठिकाणीं पोळेल तथापि तो अशुद्ध होत नाहीं. ह्यास प्रमाण.

सात मंडलें चालून गेल्यानंतरचें कृत्य.

**कात्यायन**– शंकितापराधी असा दिव्य करणारा मनुष्य पडेल, आणि त्यामुळें हातांशिवाय अन्य ठिकाणीं दग्ध होईल तर तो अदग्ध, असें देव ह्मणतात. त्या मनुष्याचे हातांवर तो गोळा पुनः द्यावा.

## अन्तरापतिते पिण्डे संदेहे वा पुनर्हरेत् ॥ १०७ ॥

यदा गच्छतोऽन्तराष्टममण्डलादर्वागेव पिण्डःपतति दग्धादग्धत्वे वा संशयस्तदा पुनर्हरेदित्यर्थप्राप्तमुक्तम् । अत्र चायमनुष्ठानक्रमः । पूर्वेद्युर्भूतशुद्धिं विधाय परेद्युर्मण्डलानि यथाशास्त्रं निर्माय मण्डलाधिदेवताश्च मन्त्रैस्तत्र तत्र संपूज्याग्निमुपसमाधाय शान्तिहोमं निर्वर्त्याग्नावयःपिण्डं निधाय धर्मावाहनादिसर्वदेवतापूजां हवनान्तां निर्वर्त्य उपोषितस्य स्नातस्यार्द्रवाससः पश्चिमे मण्डले तिष्ठतो व्रीहिमर्दनादिकं करसंस्कारं विधाय प्रतिज्ञापत्रं समन्त्रकं कर्तुः शिरसि बध्वा प्राड्विवाकस्तृतीये तापेऽग्निमभिमन्त्र्य तप्तमयःपिण्डं सन्दंशेन गृहीत्वा कर्त्रभिमन्त्रितं तस्याञ्जलौ निदध्यात् । सोऽपि मण्डलानि सप्त गत्वा नवमे मण्डले प्रक्षिप्यादग्धः शुद्धो भवतीति ॥ इत्यग्निविधिः ॥ १०७ ॥

**मूलार्थ**– मध्यें कदाचित् लोहपिंड पडेल अथवा कांहीं संशय उपस्थित होईल तर पुनः (लोहपिंड) घ्यावा.

**टीकार्थ**– १० आणि जर कदापि चालतां चालतां आठव्या मंडलापर्यंत पोंचण्याच्या पूर्वींच ( हातांतून ) लोखंडाचा गोळा पडेल अथवा दग्ध अदग्ध याविषयीं संशय प्राप्त होईल तर पुनः तो गोळा हातांत घ्यावा हें अर्थसिद्ध आहे.

ह्या अग्निदिव्याचा अनुष्ठानक्रम असाः– पूर्व दिवशीं भूतशुद्धि करून दुसऱ्या दिवशीं यथाशास्त्र मंडलें करून त्या मंडलांवर पूर्वोक्त देवतांचें तत्तन्मंत्रांनीं तत्तत्स्थानीं पूजन करून अग्नि स्थापन करून त्या अग्नीमध्यें पूर्वोक्त लोहपिंड ठेवावा. नंतर धर्मादि देवतांचें आवाहन पूजन इत्यादि विधीपासून होमपर्यंत यथाविधि कर्म झाल्यानंतर उपोषित व स्नान केलेला असून ओलें वस्त्र परिधान केलेला आणि पश्चिम मंडलावर उभा राहिलेला जो दिव्यकर्ता मनुष्य त्याजकडून व्रीहींचें मर्दन इत्यादि संस्कार करवून त्याचे मस्तकाचे ठायीं समंत्रक प्रतिज्ञापत्र बांधावें. नंतर लोहपिंड तिसऱ्या वेळीं तापविल्यानंतर न्यायाधीशानें अग्नीची प्रार्थना करून तप्त असा तो लोहपिंड सांडसानें धरून दिव्य

करणारानें प्रार्थना केल्यानंतर त्याच्या अंजलीवर ठेवावा. मंतर दिव्य करणारानेंहि सात मंडलें चालून नवव्या मंडलावर तो लोहपिंड ठेवावा; यापासून जर तो दग्ध झाला नाहीं तर तो शुद्ध आहे असें समजावें. याप्रमाणें अग्निदिव्याचा विधि जाणावा. १०७.

---

**सत्येन माभिरक्ष त्वं वरुणेत्यभिशाप्य कम् ।**
**नाभिदघ्नोदकस्थस्य गृहीत्वोरू जलं विशेत् ॥ १०८ ॥**

संप्रत्युदकविधिमाह । हे वरुण सत्येन मामभिरक्ष त्वमित्यनेन मन्त्रेण कमुदकमभिशाप्याभिमन्त्र्य नाभिदघ्नोदकस्थस्य नाभिप्रमाणोदकस्थितस्य पुरुषस्योरू गृहीत्वा शोध्यो जलं प्रविशेत् । जले निमज्जेत् । एतच्च वरुणपूजायां सत्यां । गन्धमाल्यैः सुरभिभिर्मधुक्षीरघृतादिभिः । वरुणाय प्रकुर्वीत पूजामादौ समाहित इति नारदस्मरणात् । तथा साधारणधर्मेषु धर्मावाहनादिसकलदेवतापूजाहोमसमन्त्रकप्रतिज्ञापत्रशिरोनिवेशनान्तेषु सत्सु च । तथा । तोय त्वं प्राणिनां प्राणः सृष्टेराद्यं तु निर्मितम् । शुद्धेश्च कारणं प्रोक्तं द्रव्याणां देहिनां तथा । अतस्त्वं दर्शयात्मानं शुभाशुभपरीक्षण इति प्राड्विवाकेनोदकाभिमन्त्रणे कृते शोध्यः सत्येन माभिरक्ष त्वं वरुणेत्युदकं प्रार्थयते । उदकस्थानानि च नारदेनोक्तानि ॥ नदीषु तनुवेगासु सागरेषु वहेषु च । ह्रदेषु देवखातेषु तडागेषु सरःसु चेति । तथा पितामहेनापि । स्थिरतोये निमज्जेत्तु न ग्राहिणि न चाल्पके । तृणशैवालरहिते जलौकामत्स्यवर्जिते । देवखातेषु यत्तोयं तस्मिन् कुर्याद्विशोधनम् । आहार्यं वर्जयेन्नित्यं शीघ्रगासु नदीषु च । आविशेत्सलिले नित्यमूर्मिपङ्कविवर्जिते इति । आहार्यं तडागादिभ्य आहृतं ताम्रकटाहादिक्षिप्तं जलम् । नाभिप्रमाणोदकस्थश्च यज्ञियवृक्षोद्भवां धर्मस्थूणामवष्टभ्य प्राङ्मुखस्तिष्ठेत् । उदके प्राङ्मुखस्तिष्ठेद्धर्मस्थूणां प्रगृह्य चेति स्मरणात् १०८

शाखा ६ वी.

आतां उदकदिव्याचा विधि सांगतो.

**मूलार्थ**— "सत्येन माभिरक्ष त्वं" ह्या मंत्रेंकरून उदकाचें अभिमंत्रण करून नाभिप्रमाण उदकामध्यें पुरुषाला उभें करून त्याचे ऊरु ( मांड्या ) धरून दिव्यकर्त्यानें उदकांत बुडी मारावी.

**टीकार्थ**— १ हे वरुण, तूं सत्येंकरून माझें रक्षण कर अशा अर्थाच्या (मूळांत सांगितलेल्या ) मंत्रेंकरून उदकाचें अभिमंत्रण करून नाभिप्रमाण उदकामध्यें उभा राहिलेला मनुष्य त्याच्या दोन्ही मांड्या धरून दिव्यकर्त्या मनुष्यानें उदकांत बुडी मारावी. हा विधि वरुणाची पूजा केल्यानंतर करावा; कारण.

उदकदिव्याचा विधि.

**स्मृति**— सुगंध अशीं गंधपुष्पें व मध, दुग्ध, घृत इत्यादि उपचारांनीं वरुणाची पूजा एकाग्रचित्त होत्साता करावी.

२ नंतर दिव्य कर्माचा साधारण विधि व धर्मादि देवतांचें आवाहन, पूजन, होम आणि समंत्रक प्रतिज्ञापत्र मस्तकीं बांधणें इत्यादि पूर्वोक्त सर्व विधि करावा. नंतर न्यायाधीशानें "तोय त्वं प्राणिनां प्राणः" ह्या मंत्रेंकरून उदकाची प्रार्थना केल्यानंतर दिव्यकर्त्यानें "सत्येन माभि रक्ष त्वं वरुण" ह्या ( मूलोक्त ) मंत्रेंकरून प्रार्थना करावी.

उदकाचीं स्थानें नारद सांगतो.

**नारद**— अल्पवेगयुक्त नदी, समुद्र, प्रवाह, ऱ्हद, देवखात, तडाग, सरोवरें (ह्यांचे ठायीं दिव्यकर्त्यानें बुडी मारावी ).

पितामहहि ( उदकस्थानें सांगतो ).

**पितामह**— स्थिर उदकांत प्रवेश करावा, ज्यांत मगर आहेत त्यांत प्रवेश करूं नये, अल्पोदकांतहि प्रवेश करूं नये. तृण, शेवाळ, जळवा, आणि मत्स्य एतद्विरहित उदकांत व देवखात सरोवराच्या उदकांत दिव्य करावें. तलाव इत्यादिकांपासून जें उदक आणून ताम्रमय कढई इत्यादि पात्रांत ठेवलेलें तें वर्ज. अति वेगवत्तर नदीचे ठायीं दिव्य करूं नये. लाटा व चिखल एतद्विरहित उदकांत प्रवेश करावा. नाभिप्रमाण उदकांत उभा रहाणाऱ्या पुरुषानें यज्ञियवृक्षाचा धर्मस्तंभ धरून पूर्वाभिमुख उभें राहावें. (ह्यास प्रमाण )

**स्मृति**— उदकांत धर्मस्तंभाचें अवलंबन करून पूर्वाभिमुख उभें राहावें १०८.

---

## समकालमिषुं मुक्तमानीयान्यो जवी नरः ।
## गते तस्मिन्निमग्नाङ्गं पश्येच्चेच्छुद्धिमाप्नुयात् ॥ १०९ ॥

ततः किं कर्तव्यमित्यत आह ॥ निमज्जनसमकालं गते तस्मिन् जविन्येकस्मिन्पुरुषे अन्यो जवी शरपातस्थानस्थितः पूर्वमुक्तमिषुमानीय जले निमग्नाङ्गं यदि पश्यति तदा स शुद्धो भवति । एतदुक्तं भवति । त्रिषु शरेषु मुक्तेष्वेको वेगवान् मध्यमशरपातस्थानं गत्वा तमादाय तत्रैव तिष्ठति । अन्यस्तु पुरुषो वेगवान् शरमोक्षस्थाने तोरणमूले तिष्ठति । एवं स्थितयोस्तयोस्तृतीयस्यां करतालिकायां शोध्यो निमज्जति । तत्समकालमेव तोरणमूलस्थितोऽपि द्रुततरं मध्यमशरपातस्थानं गच्छति । शरग्राही च तस्मिन्प्राप्ते द्रुततरं तोरणमूलं प्राप्यान्तर्जलगतं यदि न पश्यति तदाऽशुद्धो भवतीति । एतदेव स्पष्टीकृतं पितामहेन । गन्तुश्चापि च कर्तुश्च समं गमनमज्जनम् । गच्छेत्तोरणमूलात्तु लक्ष्यस्थानं जवी नरः । तस्मिन्गते द्वितीयोऽपि वेगादादाय सायकम् । गच्छेत्तोरणमूलं तु यतः स पुरुषो गतः ॥ आगतस्तु शरग्राही न पश्यति यदा जले । अन्तर्जलगतं सम्यक्तदा शुद्धिं विनिर्दिशेदिति । जविनोश्च पुरुषयोर्निर्धारणं कृतं नारदेन । पञ्चाशतो धावकानां यौ स्यातामधिकौ जवे । तौ च तत्र नियोक्तव्यौ शरानयनकारणादिति । तोरणं च निमज्जनसमीपस्थाने समे शोध्यकर्णप्रमाणोच्छ्रि-

तं कार्यम् । गत्वा तु तज्जलस्थानतटे तोरणमुच्छ्रितम् । कुर्वीत कर्णमात्रं तु भूमिभागे समे शुचाविति नारदस्मरणात् ॥ शरत्रयं वैणवं च धनुर्मङ्गलद्रव्यैः श्वेतपुष्पादिभिः प्रथमं संपूजयेत् । शरान् संपूजयेत्पूर्वं वैणवं च धनुस्तथा । मङ्गलैर्धूपपुष्पैश्च ततः कर्म समाचरेदिति पितामहवचनात् ॥ धनुषः प्रमाणं लक्ष्यस्थानं च नारदेनोक्तम् ॥ क्रूरं धनुः सप्तशतं मध्यमं षट्शतं स्मृतम् । मन्दं पञ्चशतं ज्ञेयमेषज्ञेयो धनुर्विधिः ॥ मध्यमेन तु चापेन प्रक्षिपेच्च शरत्रयं । हस्तानां तु शते सार्द्धे लक्ष्यं कृत्वा विचक्षणः । न्यूनाधिके तु दोषः स्यात्क्षिपतः सायकांस्तथेति । अङ्गुलानां सप्ताधिकं शतं सप्तशतं क्रूरं धनुः एवं शट्शतं पञ्चशतं च । एवं चैकादशाङ्गुलाधिकं हस्तचतुष्टयं क्रूरस्य धनुषः प्रमाणम् । मध्यमस्य दशाङ्गुलाधिकं । मन्दस्य नवाङ्गुलाधिकमित्युक्तं भवति । शराश्चानायसाग्रा वैणवाः कार्याः । शरांश्चानायसाग्रांस्तु प्रकुर्वीत विशुद्धये । वेणुकाण्डमयांश्चैव क्षेप्ता तु सुदृढं क्षिपेदिति स्मरणात् ॥ क्षेप्ता तु क्षत्रियस्तद्वृत्तिर्वा ब्राह्मणः सोपवासो नियोक्तव्यः । यदाह ॥ क्षेप्ता च क्षत्रियः प्रोक्तस्तद्वृत्तिर्ब्राह्मणोऽपि वा । अक्रूरहृदयः शान्तः सोपवासस्ततःक्षिपेदिति । त्रिषु मुक्तेषु मध्यमः शरो ग्राह्यः। तेषां च प्रेषितानां च शराणां शास्त्रचोदनात् । मध्यमस्तु शरो ग्राह्यः पुरुषेण बलीयसेति वचनात् ॥ तत्रापि पतनस्थानादानेतव्यो न सर्पणस्थानात् । शरस्य पतनं ग्राह्यं सर्पणं तु विवर्जयेत् । सर्पन् सर्पन् शरो यायाद्दूराद्दूरतरं यत इति वचनात् ॥ वाते च प्रवायति विषमादिदेशे च शरमोक्षो न कार्यः। इषुं न प्रक्षिपेद्विद्वान्मारुते चातिवायति । विषमे भूप्रदेशे च वृक्षस्थानसमाकुले । तृणगुल्मलतावल्लीपङ्कपाषाणसंयुत इति पितामहवचनात् । निमग्नाङ्गं पश्येच्चेच्छुद्धिमाप्नुयादिति वदता उन्मज्जिताङ्गस्याशुद्धिर्दर्शिता । स्थानान्तरगमने चाशुद्धिः पितामहेनोक्ता ॥ अन्यथा न विशुद्धिः स्यादेकाङ्गस्यापि दर्शनादिति । स्थानाद्वान्यत्र गमनाद्यस्मिन्पूर्वं निवेशित इति । एकाङ्गस्यापि दर्शनादिति च कर्णाद्यभिप्रायेण । शिरोमात्रं तु दृश्येत न कर्णौ नापि नासिका । अप्सु प्रवेशने यस्य शुद्धं तमपि निर्दिशेदिति विशेषाभिधानात् । अयमत्र प्रयोगक्रमः । उक्तलक्षणजलाशयसन्निधावुक्तलक्षणं तोरणं विधाय उक्तप्रमाणे देशे लक्ष्यं निधाय तोरणसन्निधौ सशरं धनुः संपूज्य जलाशये वरुणमावाह्य पूजयित्वा तत्तीरे धर्मादींश्च देवान् हवनान्तमिष्ट्वा शोध्यस्य शिरसि प्रतिज्ञापत्रमाबध्य प्राड्विवाको जलमभिमन्त्रयते । तोय त्वं प्राणिनां प्राण इत्यादिना मन्त्रेण । अथ शोध्यः सत्येनेत्यादिना मन्त्रेण जलमभिमन्त्र्य गृहीतस्थूणस्य नाभिमात्रोदकावस्थितस्य बलीयसः पुरुषस्य समीपमुपसर्पति । अथ शरेषु त्रिषु मुक्तेषु मध्यमशरपातस्थाने मध्यमशरं गृहीत्वा जविन्येकस्मिन्पुरुषे स्थिते अन्यस्मिंश्च तोरणमूले स्थिते प्राड्विवाकेन तालत्रये दत्ते युगपद्गमनमज्जनमथशरानयनमिति ॥ इत्युदकविधिः१०९

तदनंतर काय करावें तें सांगतो-

मूलार्थ– त्याच समयीं वेगवान् पुरुष जाऊन पोंचल्यानंतर दुसऱ्या मनुष्यानें, पूर्वी

सोडलेला बाण घेऊन येऊन जर दिव्यकर्त्याचें बुडालेलें अंग पाहील तर तो शुद्ध झाला.

**टीकार्थ**– ३ ज्या समयीं दिव्यकर्त्यानें बुडी मारली त्याच समयीं कोणीएक वेगवान् पुरुष जाऊन पोहोंचल्यानंतर बाणपाताच्या स्थानावर उभा राहणारा असा दुसरा वेगवान् पुरुष, प्रथम सोडलेला बाण घेऊन येऊन दिव्यकर्त्याचें अंग पाण्यांत बुडालेलें पाहील तर तो दिव्यकर्ता शुद्ध होतो.

ह्याचा भावार्थ असाः—तीन बाण सोडिल्यानंतर कोणीएका वेगवान् पुरुषानें जेथें मधला बाण पडला असेल त्या स्थानीं जाऊन तो बाण धरून तेथेंच उभें राहावें, दुसऱ्या वेगवान् पुरुषानें तर बाण सोडण्याचें जें स्थान तोरणस्तंभ त्याचे मूलाचे ठायीं उभें राहावें. याप्रमाणें दोघे उभे राहिल्यानंतर तीन टाळ्या वाजवाव्या. तिसऱ्या टाळीच्या शब्दाबरोबर दिव्यकर्त्यानें पाण्यांत बुडी मारावी, आणि त्याच वेळीं तोरणस्तंभाजवळ उभा राहिलेल्या पुरुषानेंहि येऊन पोचल्यानंतर अतित्वरेनें तोरणस्तंभाजवळ येऊन पाहावें. जलांत बुडी मारलेल्या दिव्यकर्त्या पुरुषास जर न पाहील तर तो शुद्ध झाला असें समजावें.

पितामह हेंच स्पष्ट करून सांगतो.

**पितामह**– बाणपातस्थानीं जाणारा व दिव्यकर्ता यांनीं एककालींच आपापलीं कार्यें करावीं, ह्मणजे जेव्हां दिव्यकर्ता उदकांत बुडी मारील त्याच वेळीं दुसऱ्या मनुष्यानें बाणपातस्थानीं जावें. वेगवान् पुरुषानें तोरणस्तंभापासून लक्ष्य (बाणपात)स्थानीं जावें. तो गेल्यानंतर दुसऱ्या वेगवान् पुरुषानें तो बाण घेऊन, पूर्वीं ज्या स्थानापासून वेगवान् पुरुष गेला तेथें तोरणस्तंभाच्या मूलाजवळ जावें. बाण घेऊन आलेला पुरुष, उदकांत बुडालेल्या पुरुषाला न पाहील तर शुद्ध असें समजावें.

कसे वेगवान् पुरुष असावे त्याचा प्रकार नारद सांगतो.

**नारद**– धांवणाऱ्या पंनास मनुष्यांमध्यें जे अधिक वेगानें धांवतील असे दोन पुरुष बाण आणण्याच्या कामाविषयीं योजावे.

ज्या स्थानीं बुडी मारावयाची असेल त्या स्थानाजवळ समानभूमीवर तोरणस्तंभ दिव्य करणाऱ्या मनुष्याचे कानापर्यंत पोंचे इतका उंच उभा करावा. ( ह्यास प्रमाण )

**नारद**– बुडी मारण्याच्या उदकस्थानाजवळ तीरावर, समान व शुद्ध भूमीचे ठायीं कानापर्यंत पोंचे इतका उंच तोरणस्तंभ उभा करावा.

तीन बाण, वैणव धनुष्य यांची श्वेतपुष्पादिक उपचारांनीं पूर्वीं पूजा करावी. ( ह्यास प्रमाण )

**पितामह**– शर व वैणव धनुष्य यांची मंगल अशा पुष्प धूप उपचारांनीं पूजा करून नंतर दिव्य कर्म करावें.

धनुष्याचें प्रमाण आणि लक्ष्यस्थान नारद सांगतो.

**नारद**– एकशें सात अंगुलपरिमाण जें धनुष्य तें क्रूर ह्मटलें आहे. एकशें सहा अंगुलपरिमाण तें मध्यम, एकशें पांच अंगुलपरिमाण तें मंद, असा विधि समजावा. दी-

इतके हात अंतरावर निशाण धरून कुशल मनुष्यानें मध्यम धनुष्येंकरून तीन बाण टाकावे. कमी अथवा अधिक अंतरावर बाण जाईल तर तो, बाण टाकणाराचा दोष असें समजावें.

एकशें सात अंगुळांचें क्रूर धनुष्य, ह्मणजे चार हात, अकरा अंगुळें प्रमाणाचें होतें, चार हात दहा अंगुलांचें तें मध्यम, आणि चार हात नऊ अंगुळें परिमाणाचें तें मंद म्हणजे कनिष्ठ धनुष्य ह्मटलें आहे.

वेणुकांडमय असून लोखंडाच्या अग्रानें विरहित असे बाण करावे; कारण,

**स्मृति**— दिव्य कर्माविषयीं बाण करावयाचे ते लोहमय अग्रानें विरहित असून वंशकांडमय करावे, आणि ते बाण, सोडणारानें मोठ्या जोरानें सोडावे.

बाण सोडणारा पुरुष क्षत्रिय, किंवा क्षत्रियवृत्ति ब्राह्मण उपवासी नेमावा.

**स्मृति**— बाण सोडणारा क्षत्रिय किंवा क्षत्रियवृत्ति ब्राह्मण नेमावा, आणि त्यानें दयाळु, शांत, उपवासी होऊन ( बाण ) सोडावा.

तीन बाण सोडल्यानंतर त्यांतून मध्यम बाण घ्यावा; कारण,

**स्मृति**— ते जे सोडलेले बाण त्यांतून शास्त्राज्ञेप्रमाणें, बलवान पुरुषानें मध्यम बाण घ्यावा.

तो बाण जेथें पडेल तें त्याचें पतनस्थान होय, ह्यास्तव तेथून तो आणावा, पडल्यानंतर तेथून सरकून पुढें जाईल तथापि तेथून तो घेऊं नये. कारण,

**स्मृति**— बाणाचें पातस्थान ग्रहण करावें, प्रसर्पणस्थान घेऊं नये. कारण, ( तो बाण ) सरकत सरकत अति दूरप्रदेशीं जातो.

वारा ( मोठा ) वहात असेल त्या समयीं, व झाडी वगैरे विषम प्रदेशीं बाण सोडूं नये. कारण,

**पितामह**— विद्वान् पुरुषानें वारा वाहात असतां त्या समयीं व तृण, गुल्म, लता, वल्ली, कर्दम, पाषाण, वृक्ष यांहींकरून निबिड अशा विषम भूप्रदेशीं बाण सोडूं नये.

दिव्यकर्त्याचें अंग उदकांत बुडालेलें असें जर पाहील तेव्हां तो शुद्धि पावेल असें ( चालत्या ) मूळवचनांत सांगितलें, यास्तव ज्याचें अंग तरतें दिसेल त्याची शुद्धि झाली नाहीं असें प्रदर्शित केलें, व कदाचित् बुडी मारण्याच्या स्थानाहून अन्य ठिकाणीं जाईल तर तो शुद्ध नाहीं, असेंहि पितामह सांगतो.

**पितामह**— ज्या ठिकाणीं पूर्वीं बुडी मारली त्या ठिकाणाहून अन्य स्थानीं जाणारा शुद्ध नाहीं, तसेंच उदकांत प्रवेश करणाराचें एकटें मस्तक मात्र कदापि दिसेल, कान किंवा नाक दिसणार नाहीं, तथापि तो शुद्ध होय.

ह्या उदकदिव्याचे ठायीं प्रयोगक्रम असाः— उक्तलक्षण जलाशयाच्या सन्निध जाऊन यथोक्तलक्षण तोरणस्तंभ उभा करून उक्तप्रमाण प्रदेशीं निशाण तयार करून तोरणस्तंभाच्या जवळ धनुष्यसहित बाणाची पूजा करून जलाशयाचे ठायीं वरुणाचें

आवाहन, पूजन करून नंतर तीरावर धर्मादि देवतांचें आवाहन पूजन इत्यादि होमपर्यंत कर्म करून दिव्यकर्त्याचे मस्तकीं प्रतिज्ञापत्र बांधून न्यायाधीशानें "त्वं तोय प्राणिनां प्राण" इत्यादि मंत्रेंकरून उदकाची प्रार्थना करावी. नंतर दिव्य करणाऱ्या पुरुषानें "सत्येन माभिरक्ष त्वं वरुण" इत्यादि (मूलोक्त) मंत्रानें जलदेवतांची प्रार्थना करावी, आणि धर्मस्तंभ हातांत धरून नाभिमात्रोदकांत उभा राहिलेला अशा बलवान् पुरुषाजवळ जाऊन उभें रहावें. त्यानंतर एका वेगवान् पुरुषानें, सोडिलेल्या तीन बाणांतून मध्यम बाणाच्या पातनस्थानाच्या भूमीवर जाऊन तो बाण धरून उभें राहावें आणि दुसऱ्या वेगवान पुरुषानें तोरणस्तंभाजवळ उभें राहावें. नंतर न्यायाधीशानें त्रिवार टाळी वाजवावी. तत्कालींच उदकांत बुडी मारणें व बाण जाऊन आणणें हीं कामें एककालीं करवावीं. याप्रमाणें उदकदिव्याचा विधि समाप्त झाला. १०९

---

त्वं विष ब्रह्मणः पुत्रः सत्यधर्मे व्यवस्थितः।
त्रायस्वास्मादभीशापात्सत्येन भव मेऽमृतम् ॥ ११० ॥
एवमुक्त्वा विषं शार्ङ्गं भक्षयेद्धिमशैलजम्।
यस्य वेगैर्विना जीर्येच्छुद्धिं तस्य विनिर्दिशेत् ॥ १११ ॥

इदानीं विषविधिमाह ॥ त्वं विषेत्यादिमन्त्रेण विषमभिमन्त्र्य कर्ता विषं हिमं शैलजं शृङ्गप्रभवं भक्षयेत्। तच्च भक्षितं यस्य विषं वेगैर्विना जीर्यति स शुद्धो भवति। विषवेगो नाम धातोर्धात्वन्तरप्राप्तिः। धातोर्धात्वन्तरप्राप्तिर्विषवेग इति स्मृत इति वचनात्। धातवश्च त्वगसृङ्मांसमेदोऽस्थिमज्जाशुक्राणीति सप्त एवं च सप्तैव विषवेगा भवन्ति। तेषां च लक्षणानि पृथगेव विषतन्त्रे कथितानि। वेगो रोमाञ्चमाद्यो रचयति विषजः स्वेदवक्त्रोपशोषौ तस्योर्ध्वस्तत्परौ द्वौ वपुषि जनयतो वर्णभेदप्रवेपौ। यो वेगः पञ्चमोऽसौ नयति विवशतां कण्ठभङ्गं च हिक्कां षष्ठो निश्वासमोहौ वितरति च मृतिं सप्तमो भक्षकस्येति। अत्र च महादेवस्य पूजा कर्तव्या। यथाह नारदः ॥ दद्याद्विषं सोपवासो देवब्राह्मणसन्निधौ। धूपोपहारमन्त्रैश्च पूजयित्वा महेश्वरमिति। प्राड्विवाकः कृतोपवासो महादेवं पूजयित्वा तस्य पुरतो विषं व्यवस्थाप्य धर्मादिपूजां हवनान्तां विधाय प्रतिज्ञापत्रं शोध्यस्य शिरसि निधाय विषमभिमन्त्रयते। त्वं विष ब्रह्मणा सृष्टं परीक्षार्थं दुरात्मनाम्। पापानां दर्शयात्मानं शुद्धानाममृतं भव ॥ मृत्युमूर्ते विष त्वं हि ब्रह्मणा परिनिर्मितम्। त्रायस्वैनं नरं पापात्सत्येनास्यामृतं भवेति। एवमभिमन्त्र्य दक्षिणाभिमुखाय स्थिताय दद्यात्। नारदवचनात् ॥ द्विजानां सन्निधावेव दक्षिणाभिमुखे स्थिते। उदङ्मुखः प्राङ्मुखो वा विषं दद्यात्समाहित इति। विषं च वत्सनाभादि ग्राह्यम्। शृङ्गिणो वत्सनाभस्य

हिमजस्य विषस्य वेति पितामहवचनात् । वर्ज्यानि च तथैवोक्तानि । चारितानि च जीर्णानि कृत्रिमाणि तथैव च । भूमिजानि च सर्वाणि विषाणि परिवर्जयेदिति । नारदेनापि ॥ भृष्टं च चारितं चैव धूपितं मिश्रितं तथा । कालकूटमलाबुं च विषं यत्नेन वर्जयेदिति । कालश्च नारदेनोक्तः। तोलयित्वेप्सितं काले देयं तद्धि हिमागमे । नापराह्णे न मध्यान्हे न सन्ध्यायां तु धर्मविदिति । कालान्तरे तूक्तप्रमाणादल्पं देयम् । वर्षे चतुर्यवा मात्रा ग्रीष्मे पञ्चयवा स्मृता । हेमन्ते सा सप्तयवा शरद्यल्पा ततोऽपि हीति स्मरणात् । अल्पेति षड्यवेत्यर्थः । हेमन्तग्रहणेन शिशिरस्यापि ग्रहणम् । हेमन्तशिशिरयोः समासेनेति श्रुतेः । वसन्तस्य च सर्वदिव्यसाधारणत्वात्तत्रापि सप्त यवा विषं च घृतप्लुतं देयम् । नारदवचनात् । विषस्य पलषड्भागाद्भागो विंशतिमस्तु यः । तमष्टभागहीनं तु शोध्ये दद्याद्घृतप्लुतमिति । पलं चात्र चतुःसुवर्णिकम् । तस्य षष्ठो भागो दशमाषाः पंचदश यवाश्च भवन्ति । त्रियवं त्वेककृष्णलं । पञ्चकृष्णलको माषः इत्येको माषः पञ्चदश यवा भवन्ति । एवं पञ्चदशानां माषाणां यवाः सार्द्धं शतं भवन्ति । पूर्वे च दशयवा इति षष्ट्यधिकं शतं यवाः पलस्य षष्ठो भागस्तस्माद्विंशतितमो भागोऽष्टौ यवास्तस्याष्टमभागहीनः एकयवहीनः तं विंशतिमं भागं सप्तयवं घृतप्लुतं दद्यात् । घृतं च विषात् त्रिंशद्गुणं ग्राह्यम् । पूर्वाह्णे शीतले देशे विषं देयं तु देहिनाम् । घृते नियोजितं श्लक्ष्णं पिष्टं त्रिंशद्गुणान्वितमिति कात्यायनवचनात् । त्रिंशद्गुणेन घृतेनान्वितं विषं । शोध्यश्च कुहकादिभ्यो रक्षणीयः । त्रिरात्रं पञ्चरात्रं वा पुरुषैः स्वैरधिष्ठितम् । कुहकादिभयाद्राजा रक्षयेद्दिव्यकारिणम्। ओषधीर्मंत्रयोगांश्च मणीनथ विषापहान् । कर्त्तुः शरीरसंस्थांस्तु गूढोत्पन्नान्परीक्षयेदिति पितामहस्मरणात् ॥ तथा च विषमपि रक्षणीयम् । शार्ङ्गं हैमवतं शस्तं गन्धवर्णरसान्वितम् । अकृत्रिममसंमूढममन्त्रोपहतं च यदिति नारदस्मरणात् । तथा विषे पीते यावत्करतालिकाशतपञ्चकं तावत्प्रतीक्षणीयोऽनन्तरं चिकित्सनीयः। यथाह नारदः । पञ्चतालिशतं कालं निर्विकारो यदा भवेत् । तदा भवति संशुद्धस्ततः कुर्याच्चिकित्सितमिति । पितामहेन तु दिनान्तोऽवधिरुक्तोऽल्पमात्राविषयः । भक्षिते तु यदा स्वस्थो मूर्च्छाछर्दिविवर्जितः । निर्विकारो दिनस्यान्ते शुद्धं तमपि निर्दिशेदिति । अत्र च प्राड्विवाकः सोपवासो महादेवं संपूज्य तत्पुरतो विषं स्थापयित्वा धर्मादीनिष्ट्वा शोध्यस्य शिरसि प्रतिज्ञापत्रं निधाय विषमभिमन्त्र्य दक्षिणाभिमुखाय स्थिताय विषं प्रयच्छति । स च शोध्यो विषमभिमन्त्र्य भक्षयतीति क्रमः ॥ इति विषविधानम् ॥ ११० ॥ १११ ॥

आतां ( दोन वचनांनीं ) विषदिव्याचा विधि सांगतो.

मूलार्थ— " त्वं विष ब्रह्मणः पुत्र " इत्यादि मंत्रेंकरून विषाचें अभिमंत्रण करून हिमालयावर उत्पन्न झालेलें शार्ङ्गविष भक्षण करावें. तें विष वेगांवांचून ज्याला पचेल त्याची शुद्धि जाणावी.

टीकार्थ— मंत्राचा अर्थ.—हे विष, तुला ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें आहे आणि तूं

सत्यधर्माचे ठायीं राहणारा आहेस यास्तव या अभिशापा( मिथ्या आरोपा )पासून माझें रक्षण कर आणि सत्येंकरून मला अमृतप्राय हो, अशा अर्थाच्या मंत्रेंकरून दिव्यकर्त्या पुरुषानें विषाची प्रार्थना करून हिमालयपर्वतावर उत्पन्न झालेलें. शार्ङ्ग ( शृंगोद्भव ) विष भक्षण करावें. नंतर तें विष वेगांवांचून ज्याला पचेल तो शुद्ध होतो.

एक धातूपासून दुसऱ्या धातूंत जो विषाचा प्रवेश तो विषवेग.

**स्मृति**– एक धातूपासून दुसऱ्या धातूंत जो विषाचा प्रवेश तो विषवेग ह्मटला आहे. त्वचा, रुधिर, मांस, मेद, अस्थि, मज्जा आणि शुक्र असे सप्त धातु आहेत ह्मास्तव विषवेगहि सातच आहेत त्यांचीं निरनिराळीं लक्षणें विषतंत्रांत सांगितलीं आहेत.

**विषतंत्र**–पहिला विषवेग रोमांच उत्पन्न करितो, दुसरा वेग घाम व मुखशोष उत्पन्न करितो, तिसरा विषवेग अंगाचा रंग बदलतो, चवथा वेग कंप उत्पन्न करितो, पांचवा वेग नेत्रचर्या बदलतो व स्वरभेद करतो आणि उचकी उत्पन्न करितो, सहावा विषवेग श्वास मूर्च्छा उत्पन्न करितो आणि सातवा विषवेग मरणातें देतो.

ह्या दिव्याचे ठायीं महादेवाची पूजा करावी याविषयीं नारद सांगतो.

**नारद**– उपोषण करून देव ब्राह्मण सन्निध असतां धूप, उपहार मंत्र यांहींकरून महेश्वराची पूजा करावी.

न्यायाधीशानें पूर्वदिवशीं उपोषण करून दुसऱ्या दिवशीं महादेवाची पूजा करून त्याच्या पुढें विष ठेवून धर्मादि देवतांची पूजा होम एततपर्यंत कर्म करून दिव्य करणाऱ्या मनुष्याच्या मस्तकीं प्रतिज्ञापत्र बांधून विषाची प्रार्थना करावी.

**प्रार्थनेच्या मंत्राचा अर्थ**– हे विष, तुला दुर्जनाच्या परीक्षेकरितां ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें आहे यास्तव पापी मनुष्यांनां आपलें स्वरूप दाखीव आणि शुद्ध मनुष्यांला अमृतप्राय हो. हे विष, तूं प्रत्यक्ष मृत्यूची मूर्ति असें ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें यासाठीं या मनुष्याला मिथ्यारोपापासून मुक्त कर आणि सत्येंकरून तूं याला अमृतप्राय हो.

अशी विषाची प्रार्थना करून दक्षिण दिशेस मुख करून उभा राहिलेला अशा दिव्य करणाऱ्या मनुष्याला विष द्यावें. कारण,

**नारद**– ब्राह्मणाच्या समक्ष उत्तराभिमुख अथवा पूर्वाभिमुख न्यायाधीशानें एकाग्र चित्त करून दक्षिणाभिमुख अशा दिव्यकर्त्या मनुष्यास विष द्यावें.

बचनाग वगैरे विष द्यावें. कारण,

**पितामह**– हिमालयावरचें शृंगोद्भव, अथवा बचनागाचें विष द्यावें.

वर्ज्यविषें तो ( पितामह )च सांगतो.

**पितामह**–चारित (उतरून गेलेलें), जीर्ण, कृत्रिम, भूमिज, हीं सर्वविषें वर्ज्य करावीं.

**नारदहि**– भाजलेलें, चारित, धूपित, मिश्रित, कालकूट, आणि अलाबुसंबंधी हीं विषें अत्यंत वर्ज्य करावीं.

नारद विष देण्याचा कालहि सांगतो.

**नारद**– यथायोग्य वजन करून थंडीच्या समयीं विष द्यावें. धर्मज्ञ पुरुषानें अपराण्ह,

माध्यान्ह व संध्या या समयीं देऊं नये. याशिवाय अन्यकालींहि द्यावें, परंतु तें उक्त प्रमाणाहून किंचित् अल्प द्यावें.

**स्मृति**— वर्षाऋतूंत चार यवभार, ग्रीष्मऋतूंत पांच यवभार, हेमंतऋतूंत सात यवभार आणि शरदृऋतूंत त्याहूनहि अल्पभाग ( सहा यवभार ) द्यावें.

हेमंतशब्देंकरून शिशिरऋतूहि समजावा. कारण,

**श्रुतिवचन**— हेमंत आणि शिशिर या दोन ऋतूंचा समास म्हणजे संक्षेप एकशब्दें-करून केला आहे.

वसंत ऋतुहि सर्व प्रकारच्या दिव्याविषयीं साधारण आहे यास्तव त्या ऋतूंतहि सात यवभार घृतमिश्रित ( विष द्यावें ).

**नारद**— पलाच्या सहाव्या भागाचा विसावा अंश घेऊन त्यांतून आठवा भाग कमी करून घृतमिश्रित विष दिव्य करणारे मनुष्यास द्यावें. येथें पल म्हणजे चार कर्ष समजावे. सोळा मासे म्हणजे एक कर्ष. पलाच्या सहाव्या भागाचे दहा माष आणि दहा यव होतात. तीन यव म्हणजे एक कृष्णल (एक रती किंवा गुंज ), पांच कृष्णल म्हणजे एक माष म्हटला आहे, यास्तव एका माषाचे पंधरा यव होतात. याप्रमाणें पलाच्या सहाव्या भागाचे एकशें-साठ यव, त्यांचा विसावा भाग आठ यव होतात त्यांपैकीं आठवा भाग म्हणजे एक यव कमी केल्यानें सात यवभार होतें तितकें विष घृतांत मिश्रित करून द्यावें. विषाहून तीसपट घृत घ्यावें.

**कात्यायन**— दिव्य करणारास विष देणें तें पूर्वाण्हकालीं शीतल प्रदेशीं तीसपट घृतांत मिश्र करून द्यावें.

दिव्य करणाऱ्या मनुष्याचा कपटी लोकांपासून सांभाळ करावा.

**पितामह**— तीन दिवस अथवा पांच दिवसपर्यंत राजानें सरकारी शिपायांच्या ताब्यांत दिव्य करणाऱ्या मनुष्यास देऊन कपटी लोक भेद न करतील असा बंदोबस्त ठेवावा, (व्यास प्रमाण.)

**पितामह**— विषाचा उपशम करणारी औषधी अथवा मंत्रप्रयोग किंवा विषापहारक मणि इत्यादि, दिव्य करणाऱ्या मनुष्याजवळ गुप्त असेल तर (झडती वगैरे घेऊन ) त्याची चौकशी करावी.

तसेंच विषाचेंहि संरक्षण करावें.

**नारद**— शृंगापासून उत्पन्न झालेलें हिमालय पर्वतावरचें आणि प्रशस्त गंध, वर्ण व रस यांहीं युक्त, अकृत्रिम व स्पष्ट रीतीनें संरक्षित असून मंत्रशक्तीनें जें हत झालेलें नाहीं असें विष ( द्यावें ).

विषभक्षण केल्यानंतर पांचशें टाळ्या वाजविण्यास जितका काळ लागतो तितका वेळ-पर्यंत प्रतीक्षा करून नंतर त्याला उतारा द्यावा.

**नारद**— पांचशें टाळ्या वाजविण्यास जितका काळ लागतो तितका वेळपर्यंत जर कोणताहि विकार न होईल तर तो शुद्ध होतो, नंतर त्याला विषाचा उतारा द्यावा.

पितामह— विष भक्षण केल्यानंतर मूर्च्छा वमन इत्यादि कोणताहि विकार न होतां सूर्यास्तपर्यंत जो निर्विकार रहातो तो शुद्ध समजावा,

असा जो पितामहानें सूर्यास्तपर्यंत प्रतीक्षा करण्याचा अवधि सांगितला तो अल्प विषाविषयीं योजावा.

ह्या विषदिव्याचा विधिक्रम असा—उपोषित अशा न्यायाधीशानें महादेवाची पूजा करून त्याच्या अग्रभागीं विष स्थापन करावें. नंतर धर्मादि देवतांची पूजा होम इत्यादि कर्म करून दिव्यकर्त्याच्या मस्तकीं प्रतिज्ञापत्र बांधावें व पूर्वोक्त मंत्रानें विषाची प्रार्थना करून दक्षिणाभिमुख उभा राहिलेल्या अशा दिव्य करणारास विष द्यावें. नंतर दिव्य करणारानेंहि विषाची प्रार्थना करून भक्षण करावें. असा क्रम जाणावा. याप्रमाणें विषदिव्यविधि समाप्त झाला. ११०, १११.

---

**देवानुग्रान्समभ्यर्च्य तत्स्नानोदकमाहरेत् ।**
**संश्राव्य पाययेत्तस्माज्जलं तु प्रसृतित्रयम् ॥ ११२ ॥**

अथ कोशविधिमाह ॥ उग्रान्देवान् दुर्गादित्यादीन् समभ्यर्च्य गन्धपुष्पादिभिः पूजयित्वा संस्नाप्य तत्स्नानोदकमाहरेत् । आहृत्य च तोय त्वं प्राणिनां प्राण इत्यादिना तत्तोयं प्राड्विवाकः संश्राव्य शोध्येन च तत्तोयं पात्रान्तरे कृत्वा सत्येन माभिरक्ष त्वं वरुणेत्यनेनाभिमन्त्रितं पाययेत्प्रसृतित्रयम् । एतच्च साधारणधर्मेषु धर्मावाहनादिमकलदेवतापूजाहोमसमन्त्रकप्रतिज्ञापत्रशिरोनिवेशनांतेषु सत्सु च । अत्र च स्नाप्यदेवनियमः कार्यनियमोधिकारिनियमश्च पितामहादिभिरुक्तः ॥ भक्तो यो यस्य देवस्य पाययेत्तस्य तज्जलम् । समभावे तु देवानामादित्यस्य तु पाययेत् । दुर्गायाः पाययेच्चौरान् ये च शस्त्रोपजीविनः । भास्करस्य तु यत्तोयं ब्राह्मणं तन्न पाययेत् । दुर्गायाः स्नापयेच्छूलमादित्यस्य तु मण्डलम् । अन्येषामपि देवानां स्नापयेदायुधानि लिति देवतानियमः ॥ विस्रम्भे सर्वशङ्कासु सन्धिकार्ये तथैव च । एषु कोशः प्रदातव्यो नित्यं चित्तविशुद्धय इति कार्यनियमः । पूर्वाह्णे सोपवासस्य स्नातस्यार्द्रपटस्य च । सशूकस्याव्यसनिनः कोशपानं विधीयते । सशूक आस्तिकः । मद्यपस्त्रीव्यसनिनां कितवानां तथैव च । कोशः प्राज्ञैर्न दातव्यो ये च नास्तिकवृत्तयः । महापराधे निर्धर्मे कृतघ्ने क्लीबकुत्सिते । नास्तिकव्रात्यदासेषु कोशपानं विवर्जयेदिति । महापराधो महापातकं । निर्धर्मो वर्णाश्रमधर्मरहितः पाखंडी । कुत्सितः प्रतिलोमजः । दाशाः कैवर्ताः इत्यधिकारिनियमः ॥ तथा गोमयस्य मण्डलं कृत्वा तत्र शोध्यमादित्याभिमुखं स्थापयित्वा पाययेदिति नारदवचनादवगन्तव्यम् । यथाह । तमाहूयाभिशस्तं तु मण्डलाभ्यन्तरे स्थितम् । आदित्याभिमुखं कृत्वा पाययेत्प्रसृतित्रयमिति ॥ ११२ ॥

## शाखा ७ वी.

आतां कोशदिव्याचा विधि सांगतो.

**मूलार्थ**— उग्र देवतांचें पूजन करून त्यांचें स्नानोदक ग्रहण करावें. नंतर ( न्यायाधीशानें त्याची ) प्रार्थना करून त्यांतून तीन प्रसृतिप्रमाण उदक प्राशन करवावें.

**टीकार्थ**— १ उग्रदेव ह्मणजे दुर्गा, आदित्य इत्यादि देव यांची गंधपुष्पाद्युपचारांनीं पूजा करून व स्नान घालून "तोय त्वं प्राणिनां प्राण" इत्यादि मंत्रेंकरून न्यायाधीशानें त्या उदकाची प्रार्थना केल्यानंतर दिव्य करणाऱ्या मनुष्यानें तें तीर्थोदक दुसऱ्या पात्रांत घेऊन "सत्येन माभिरक्ष त्वं वरुण" ह्या मंत्रेंकरून त्याची प्रार्थना करावी. नंतर न्यायाधीशानें ( दिव्य करणाऱ्या मनुष्याकडून ) तीन प्रसृतिप्रमाण तें उदक प्राशन करवावें.

कोशदिव्याचा प्रकार.

हें स्नानोदक प्राशन करणें तें, साधारण रीत्या पूर्वीं सांगितलेला असा, धर्मादि देवतांचें आवाहन, पूजन, होम, प्रतिज्ञापत्र मस्तकीं बांधणें इत्यादि विधि झाल्यानंतर करावें.

ह्या कोशदिव्याचे ठायीं स्नाप्य देवतांचे पूजानियम, कार्यनियम आणि अधिकारिनियम पितामहादिकांनीं सांगितले आहेत.

**पितामह**—जो ज्या देवाची उपासना करितो त्याला त्या देवाचें उदक प्राशन करवावें. जो मनुष्य सर्व देवतांला समभावानें मानितो त्याला आदित्याचें (उदक) प्राशन करवावें. दुर्गा देवीचें स्नानोदक चोर, शस्त्रोपजीवी, यांला प्राशन करवावें. ब्राह्मणास तर सूर्याचें उदक प्राशन करवूं नये. दुर्गादेवीच्या त्रिशूळास, सूर्यदेवाचे मंडलास, आणि इतर देवांचे आयुधांस स्नान घालावें. याप्रमाणें देवतानियम समजावा.

**स्मृति**— विश्वासकार्य, शंकितकार्य, आणि संधिकार्य अशा कार्यांचे ठायीं चित्तशुद्धीसाठीं कोशपान करवावें. याप्रमाणें कार्यनियम समजावा.

**स्मृति**— पूर्वदिवसीं उपोषित असून दुसऱ्या दिवसीं प्रातःकालीं स्नान केलेला, ओलें वस्त्र परिधान केलेला, आस्तिक, अव्यसनी असा जो पुरुष त्यानें पूर्वाह्णकालीं कोशपान करावें.

**स्मृति**— मद्यपान करणारा, व्यसनी, जारकर्म करणारा, जुगारी, आणि नास्तिकवृत्ति ह्यांजकडून कोशदिव्य करवूं नये. महापराध ( महापातक ), वर्णाश्रमधर्मरहित, नपुंसक, नास्तिक, कृतघ्न, कुत्सित ( प्रतिलोम जाती ), व्रात्य ( संस्कारहीन ), दाश ( भील, कोळी वगैरे नीच जाति ) ह्यांजकडून कोशपान करवूं नये.

गोमयेंकरून मंडल करून त्या मंडलावर दिव्य करणाऱ्या मनुष्यास सूर्याभिमुख उभा करून प्राशन करवावें, असें नारदवचनेंकरून अवगत होतें.

**नारद**— मंडलावर सूर्याभिमुख उभा राहिलेला, अशा दिव्य करणाऱ्या मनुष्याकडून तीन प्रसृति उदक प्राशन करवावें. ११२

---

**अर्वाक् चतुर्दशादन्हो यस्य नो राजदैविकम् ।**
**व्यसनं जायते घोरं स शुद्धः स्यान्न संशयः ॥ ११३ ॥**

ननु तुलादिषु विषान्तेषु समनन्तरमेव शुद्ध्यशुद्धिभावना कोशे तु कथमित्यत आह ॥ चतुर्दशादन्हः पूर्वं यस्य राजिकं राजनिमित्तं दैविकं देवप्रभवं व्यसनं दुःखं घोरं महत् नो नैव प्रजायते अल्पस्य देहिनामपरिहार्यत्वात्स शुद्धो वेदितव्यः । ऊर्ध्वं पुनरवधेर्न दोषः ॥ यथाह नारदः ॥ ऊर्ध्वं यस्य द्विसप्ताहाद्वैकृतं तु महद्भवेत् । नाभियोज्यः स विदुषा कृतकालव्यतिक्रमादित्यर्थसिद्धमेवोक्तम् ॥ अर्वाक् चतुर्दशादन्ह इत्येतन्महाभियोगविषयम् । महाभियोगेष्वेतानीति प्रस्तुत्याभिधानात् । अवध्यन्तराणि पितामहेनोक्तानि अल्पविषयाणि । कोशमल्पेपि दापयेदिति स्मरणात् । तानि च । त्रिरात्रात्सप्तरात्राद्वा द्वादशाहाद्विसप्तकात् । वैकृतं यस्य दृश्येत पापकृत्स उदाहृत इति । महाभियोगोक्तद्रव्यादर्वाचीनं द्रव्यं त्रिधा विभज्य त्रिरात्राद्यपि पक्षत्रयं व्यवस्थापनीयं ॥ इति कोशविधिः ॥ ११३ ॥

तुलादिव्यापासून तों विषदिव्यापर्यंत दिव्यकर्त्यांची तत्तत्कालींच शुद्धि व अशुद्धि यांविषयींची परीक्षा सांगितली, परंतु कोशदिव्याचे ठायीं ती कसी करावी तें सांगतो.

**मूलार्थ**– चवदा दिवसपर्यंत राजिक किंवा दैविक घोर संकट ज्याला झालें नाहीं तो शुद्ध, यांत संशय नाहीं.

**टीकार्थ**– १ चवदाव्या दिवसाच्या पूर्वीं राजिक अथवा दैविक घोर महाव्यसन (दुःख) ज्याला झालें नाहीं, तो मनुष्य शुद्ध, अल्प दुःख तर देहधारी जीवमात्रांला आहेच, तें कांहीं दूर होणें नाहीं, यास्तव तस अल्प संकट प्राप्त होईल तें संकट असें समजूं नये. चवदा दिवसांनंतर महासंकट प्राप्त असतां दोष नाहीं. ह्यास प्रमाण.

**नारद**– चौदा दिवसांनंतर महत् संकट प्राप्त होईल तर ज्ञात्या पुरुषानें दिव्य करणारास दोषी ( अपराधी ) ठरवूं नये. कारण, चौदा दिवसांची मुदत टळून गेली.

असा अर्थसिद्ध प्रकारच ( नारदानें ) स्पष्ट करून सांगितला.

२ चौदा दिवसांच्या पूर्वीं राजिक अथवा दैविक घोर महाव्यसन ( दुःख ) ज्याला झालें नाहीं तो मनुष्य शुद्ध, असें जें ( मूळांत ) सांगितलें तें महापराधविषयक आहे, कारण, पूर्वीं दिव्य प्रकरणाच्या आरंभीं मूळ वचनाच्या तिसऱ्या चरणांत "हीं दिव्यें महापराधाविषयीं होत" असें सांगितलें आहे. पितामहानें तर याखेरीज दुसरे अवधि सांगितले आहेत ते अल्प अपराधविषयक समजावे. कारण.

**स्मृति**– अल्पापराधाविषयींहि कोशदिव्य करवावें ( असें वचन आहे ).

ते अवधि असेः—

**स्मृति**– तीन दिवसांमध्यें, सात दिवसांमध्यें अथवा दहा दिवसांमध्यें किंवा चौदा दिवसांमध्यें ज्या दिव्य करणारास संकट प्राप्त झालेलें दिसेल तो मनुष्य अपराधी म्हटला आहे.

महापराधाविषयीं सांगितलेल्या द्रव्याचे तीन विभाग करावे. आणि तशा अल्प द्रव्याविषयीं ह्या तीन पक्षांची व्यवस्था करावी. ह्याप्रमाणें कोशदिव्याचा विधि समाप्त झाला.

**तुलादीनि कोशान्तानि पञ्च महादिव्यानि यथोद्देशं योगीश्वरेण व्याख्यातानि। स्मृत्यन्तरे त्वल्पाभियोगविषयाण्यन्यानि दिव्यानि कथितानि ॥ यथाह पितामहः ॥ तण्डुलानां प्रवक्ष्यामि विधिं भक्षणनोदितम् । चौरे तु तण्डुला देया नान्यस्येति विनिश्चयः ॥ तण्डुलान्कारयेच्छुक्लान् शालेर्नान्यस्य कस्यचित् । मृन्मये भाजने कृत्वा आदित्यस्याग्रतः शुचिः ॥ स्नानोदकेन संमिश्रान् रात्रौ तत्रैव वासयेत् । प्राङ्मुखोपोषितं स्नातं शिरोरोपितपत्रकम् । तण्डुलान् भक्षयित्वा तु पत्रे निष्ठीवयेत्ततः ॥ पिप्पलस्य तु नान्यस्य अभावे भूर्ज एव तु । लोहितं यस्य दृश्येत हनुस्तालु च शीर्यते । गात्रं च कंपयेद्यस्य तमशुद्धं विनिर्दिशेदिति । शिरोरोपितपत्रकं तण्डुलान् भक्षयित्वा निष्ठीवयेत्प्राड्विवाकः ॥ भक्षयित्वेति च ण्यन्तात्सिद्धं रूपं । सर्वदिव्यसाधारणं च धर्मावाहनादि पूर्ववदिहापि कर्तव्यं ॥ इति तण्डुलविधिः ॥**

तुलादिव्यापासून तों कोशदिव्यपर्यंत पांच महादिव्यें यथानुक्रमेंकरून योगीश्वरानें (याज्ञवल्क्यानें) सांगितलीं आहेत. दुसऱ्या स्मृतिशास्त्रांत तर अल्प अल्प अपराधाच्या निर्णयाविषयीं कर्तव्य अशीं दुसरींहि दिव्यें सांगितलीं आहेत तीं खालीं पितामहवचनांत सांगतो.

पितामह– ४ तंडुलभक्षणाचा विधि सांगतो. चोराकडून तंडुलदिव्य करवावें, इतराकडून करवूं नये. हा निश्चय समजावा. साळीचे श्वेत तंडुल करवावे, दुसऱ्या कशाचे करवूं नयेत. ते तंडुल मृत्तिकापात्रामध्यें घालून सूर्याच्या सन्मुख ठेवून शुचिर्भूत होत्साता देवतेच्या स्नानोदकानें ते तंडुलमिश्रित करून त्याच ठिकाणीं त्या रात्रीं राहावें. दुसरे दिवशीं उपोषित, पूर्वाभिमुख अशा दिव्य करणाऱ्या मनुष्याचे मस्तकीं प्रतिज्ञापत्र बांधून त्याजकडून, ते तंडुल भक्षण करवावे, नंतर अश्वत्थपत्रावर त्याजकडून थुंकवावे. अन्य वृक्षाच्या पत्रावर थुंकवूं नयेत. अश्वत्थपत्र न मिळेल तर भूर्जपत्रावर थुंकवावे. त्या समयीं ज्या पुरुषाची थुंकी लाल दिसेल, हनुवटी व ताळू विगलित होईल व अंगाला कंप सुटेल तो अशुद्ध समजावा.

५ न्यायाधीशानें दिव्यकर्त्याचे मस्तकीं प्रतिज्ञापत्र बांधून त्याला थुंकण्याविषयीं सांगावें. सर्व दिव्यांतील साधारण विधीप्रमाणें धर्मादि देवतांचें आवाहन, पूजन इत्यादि पूर्वोक्त विधि येथेंहि करावा. याप्रमाणें तंडुलविधि समाप्त झाला.

**तप्तमाषविधिः पितामहेनोक्तः ॥ तथाहि ।**

**सौवर्णं राजतं वापि ताम्रं वा षोडशाङ्गुलम् । चतुरङ्गुलखातं तु मृन्मयं वाथ मण्डलम् । वर्तुलमित्यर्थः । पूरयेद्घृततैलाभ्यां विंशत्या तु पलैस्तु तत् । सुवर्णमाषकं तस्मिन् सुतप्ते निक्षिपेत्ततः ॥ अङ्गुष्ठाङ्गुलियोगेन उद्धरेत्तप्तमाषकम् । कराग्रं यो न धुनुयाद्विस्फोटो वा न जायते । शुद्धो भवति धर्मेण निर्विकारकराङ्गुलिः ॥ उद्धरेदिति वचनात्पात्रादुत्क्षेपणमात्रं न बहिःप्रक्षेपणमादरणीयम् ॥**

पितामह तप्तमाषविधि सांगतो, तो असाः—

पितामह— सुवर्ण, रुपें, अथवा तांबें यांचें पात्र षोडशांगुलप्रमाण, वर्तुळ व चार अंगुळें उंच करावें. किंवा मृत्तिकेचें तसें पात्र करावें, आणि वीस पळें घृत अथवा तेल त्यांत घालून तें चांगलें तप्त करून त्यांत पांच रतीभार सुवर्णाचा तुकडा टाकावा ( यालाच तप्तमाष ह्मणतात). तो तप्तमाष आंगठा व तर्जनी यांहींकरून धरून त्या पात्रांतून उचलावा, उचलते समयीं ज्याचा हात पोळत नाहीं, अथवा कांपत नाहीं, व फोड आला नाहीं तो धर्मेंकरून, निर्विकार अंगुलि असल्या कारणानें शुद्ध होतो.

एथें ' तो तप्तमाष उचलावा ' असें सांगितलें त्यापेक्षां पात्रांतून उचलणें इतकेंच पुरे आहे, बाहेर टाकण्याचें प्रयोजन नाहीं.

अपरकल्पः ॥ सौवर्णे राजते ताम्रे आयसे मृन्मयेपि वा । गव्यं घृतमुपादाय तदग्नौ तापयेच्छुचिः ॥ सौवर्णीं राजतीं ताम्रीमायसीं वा सुशोधिताम् । सलिलेन सकृद्धौतां प्रक्षिपेत्ताम्रमुद्रिकाम् । भ्रमद्वीचितरङ्गाढ्ये ह्यनखस्पर्शगोचरे ॥ परीक्षेतार्द्रपर्णेन चुरुकारं सुघोषकम् । ततश्चानेन मन्त्रेण सकृत्तदभिमन्त्रयेत् । परं पवित्रममृतं घृत त्वं यज्ञकर्मसु ॥ दह पावक पापं त्वं हिमशीतं शुचौ भव । उपोषितं ततः स्नातमार्द्रवाससमागतम् ॥ ग्राहयेन्मुद्रिकां तां तु घृतमध्यगतां तथा । प्रदेशिनीं च तस्याथ परीक्षेयुः परीक्षकाः ॥ यस्य विस्फोटका न स्युः शुद्धोऽसावन्यथा शुचिरिति ॥ अत्रापि धर्मावाहनाद्यनुसन्धातव्यम् ॥ घृतानुमन्त्रणं प्राड्विवाकस्य । त्वमग्ने सर्वभूतानामिति शोध्यस्याप्यभिमन्त्रणमन्त्रः । प्रदेशिनीं परीक्षेयुरिति वचनात् प्रदेशिन्यैव मुद्रिकोद्धरणम् ॥ इति तप्तमाषविधिः ॥

दुसरा प्रकार.

स्मृति— ६ सुवर्णाच्या, रुप्याच्या किंवा तांब्याच्या अथवा लोखंडाच्या किंवा मृत्तिकेच्या पात्रांत गाईचें घृत घालून शुचिर्भूत मनुष्यानें अग्नीवर तें तापवावें. नंतर सुवर्णाची किंवा रुप्याची, अथवा लोखंडाची शुद्ध केलेली मुद्रिका ( एक प्रकारचें नाणें ) ती एक वेळ उदकानें प्रक्षालन करून त्या पात्रांत टाकावी. नंतर चांगल्या रीतीनें त्या घृताला कढ आल्यावर आणि ज्याला नखाचाहि स्पर्श झाला असतां तत्काळ पोळेल असें तें घृत तापल्यानंतर ओलें पान त्यांत टाकावें, चुर चुर शब्द होऊन तें पान तळलें गेल्यावर परीक्षा करावी. नंतर " परं पवित्रममृतं " इत्यादि मंत्रेंकरून घृताची प्रार्थना करावी. पूर्व दिवसीं उपोषित असून दुसऱ्या दिवसीं स्नान करून ओलें वस्त्र परिधान केलेला अशा दिव्य करणाऱ्या मनुष्याकडून त्या तप्त घृतांतून ती मुद्रिका अंगठ्यानें धरून काढवावी, आणि परीक्षकांनीं त्याचे अंगठ्याची परीक्षा करावी, जर फोड न येतील तर तो शुद्ध, आणि फोड आल्यास अशुद्ध.

ह्या दिव्यांतहि धर्मादि देवतांचें आवाहन, पूजन इत्यादि पूर्वोक्त विधि करावा. घृताची प्रार्थना न्यायाधीशानें करावी. " त्वमग्ने सर्वभूतानां " इत्यादि पूर्वोक्त मूळ मंत्रेंक-

रून दिव्यकर्त्यानें अग्नीची प्रार्थना करावी. 'परीक्षकांनीं आंगठ्याची परीक्षा करावी' असें सांगितल्यावरून एका आंगठ्यानेंच मुद्रिका धरून काढावी. याप्रमाणें तप्तमाषविधि समाप्त झाला.

धर्माधर्माख्यदिव्यविधिश्च पितामहेनोक्तः ॥ तथाच ॥ अधुना संप्रवक्ष्यामि धर्माधर्मपरीक्षणम् । हन्तॄणां याचमानानां प्रायश्चित्तार्थिनां नृणाम् । हन्तॄणामिति साहसाभियोगेषु । याचमानानामिति अर्थाभियोगेषु । प्रायश्चित्तार्थिनामिति पातकाभियोगेषु । राजतं कारयेद्धर्ममधर्मं सीसकायसमिति प्रतिमाविधानं सीसकं वा आयसं वेति ॥

धर्माधर्मनामक दिव्याचा विधि पितामहानें सांगितला आहे तो असाः–

पितामह– हनन करणारे, मागणारे, आणि प्रायश्चित्ताची इच्छा करणारे ह्यांविषयीं सांप्रत धर्माधर्माची परीक्षा सांगतो.

७ हनन करणारे ह्मणजे साहस करणारे, मागणारे म्हणजे देण्या घेण्याच्या वादांत मागणारे, आणि प्रायश्चित्ताची इच्छा करणारे ह्मणजे महापातकाचा आरोप असतां प्रायश्चित्ताची इच्छा करणारे ( हे दिव्य करणारे होत असें समजावें).

पितामह–धर्ममूर्ति रुप्याची, आणि अधर्ममूर्ति शिश्याची किंवा लोखंडाची करावी.

पक्षांतरमाह ॥ लिखेद्भूर्जे पटे वापि धर्माधर्मौ सितासितौ ॥ अभ्युक्ष्य पञ्चगव्येन गन्धमाल्यैः समर्चयेत् ॥ सितपुष्पस्तु धर्मः स्यादधर्मोऽसितपुष्पधृक् । एवंविधायोपलिख्य पिण्डयोस्तौ निधापयेत् । गोमयेन मृदा वापि पिण्डौ कार्यौ समन्ततः । मृद्भाण्डकेऽनुपहते स्थाप्यौ चानुपलक्षितौ ॥ उपलिप्ते शुचौ देशे देवब्राह्मणसन्निधौ । आवाहयेत्ततो देवान् लोकपालांश्च पूर्ववत् ॥ धर्मावाहनपूर्वं तु प्रतिज्ञापत्रकं लिखेत् । यदि पापविमुक्तोऽहं धर्मस्त्वायातु मे करे । अशुद्धश्चेन्मम करे पापमायातु धर्मत इति । अभिशस्तोऽभिमन्त्रयते । अभियुक्तस्तयोश्चैकं प्रगृह्णीताविलम्बितः । धर्मे गृहीते शुद्धःस्यादधर्मे तु स हीयते ॥ एवं समासतः प्रोक्तं धर्माधर्मपरीक्षणमिति ॥ इति धर्माधर्मदिव्यविधिः ॥

दुसरा पक्ष सांगतो.

पितामह– ८ अथवा धर्म श्वेत रंगानें, आणि अधर्म काळ्या रंगानें भूर्जपत्रावर किंवा वस्त्रावर लिहून पंचगव्याचें प्रोक्षण करून गंधपुष्पांहींकरून पूजा करावी, धर्माला श्वेतपुष्पें व अधर्माला काळीं पुष्पें समर्पण करावीं. अशा रीतीनें धर्म व अधर्म यांच्या प्रतिमा लिहून पिंडांचे ठायीं त्यांची स्थापना करावी. गोमय किंवा मृत्तिका यांचे पिंड करून ते दोन मृत्तिकापात्रांवर पृथक् पृथक् स्थापन करावे. गोमयानें सारविलेल्या शुद्ध भूमीवर देवब्राह्मणांच्या सन्निध पूर्वोक्त विधीप्रमाणें धर्मादि देवतांचें व लोकपालांचें आवाहन पूजन इत्यादि कर्म करून प्रतिज्ञापत्र मस्तकीं बांधावें. नंतर आरोपी यानें "मी शुद्ध आहें तर माझ्या हातीं धर्म येऊ आणि अशुद्ध आहें तर माझ्या हातीं अधर्म येऊ" अशा अर्थानें युक्त असा 'यदि पापविमुक्तोहं' इत्यादि जो मंत्र तेणेंकरून त्या दोन पिंडांची

प्रार्थना करावी आणि दोहोंपैकीं एक पिंड ( गोळा ) शीघ्र उचलावा. धर्मपिंड उचलला असल्यास तो शुद्ध आणि अधर्मपिंड उचलला असल्यास अशुद्ध. अशा रीतीनें संक्षेपेंकरून धर्माधर्मपरीक्षा सांगितली. याप्रमाणें धर्माधर्मदिव्यविधि समाप्त झाला.

९ अन्ये च शपथा द्रव्याल्पत्वमहत्त्वविषया जातिविशेषविषयाश्च मन्वादिभिरुक्ताः॥ यथा॥ निष्के तु सत्यवचनं द्विनिष्के पादलम्भनम्। त्रिकादर्वाक्तु पुण्यं स्यात्कोशमानमतः परम्॥ सत्येन शापयेद्विप्रं क्षत्रियं वाहनायुधैः। गोबीजकाञ्चनैर्वैश्यं शूद्रं सर्वैस्तु पातकैरित्यादयः। अत्र च शुद्धिविभावना मनुनोक्ता॥ न चार्तिमृच्छति क्षिप्रं स ज्ञेयः शपथे शुचिरिति। आर्तिरपि यस्य नो राजदैविकं व्यसनं जायते घोरमित्युक्तैव। कालनियमश्च एकरात्रमारभ्य त्रिरात्रपर्यन्तं त्रिरात्रमारभ्य पञ्चरात्रपर्यन्तं एकरात्रप्रभृतित्वं कार्यलाघवगौरवपर्यालोचनया द्रष्टव्यं एवं दिव्यैर्जयपराजयावधारणे दण्डविशेषोपि दर्शितः। कात्यायनेन॥ शतार्द्धं दापयेच्छुद्धमशुद्धो दण्डभाग्भवेदिति तं दण्डमाह॥ विषे तोये हुताशे च तुलाकोशे च तण्डुले। सप्तमाषकदिव्ये च क्रमाद्दण्डं प्रकल्पयेत्। सहस्रं षट्शतं चैव तथा पञ्चशतानि च। चतुस्त्र्येकमेवं च हीनं हीनेषु कल्पयेदिति। निन्हवे भावितो दद्यादित्युक्तदण्डे नायं दिव्यनिबंधनो दण्डः समुचीयते॥ इति दिव्यप्रकरणम्॥

ह्यांखेरीज कित्येक शपथविधि, जसजसा विवाद लहानमोठा असेल तदनुरूप असे जातिविशेषाच्या संबंधानें मन्वादि ऋषींनीं सांगितले आहेत. ते असेः—

मनु– एक निष्क[१] भार सुवर्णाची फिर्याद असेल तर सत्याची शपथ, दोन निष्क भार सुवर्णाचे वादाविषयीं पायांवर हात ठेवून शपथ, दोन निष्कांहून अधिक व तीन निष्कांत कांहीं कमी अशा वादांत पुण्याची शपथ करवावी, आणि त्याहून अधिक रकमेचा वाद असतां कोशपान करवावें. ब्राह्मणाला सत्याची शपथ द्यावी; क्षत्रियाला वाहनें, आयुधें, ह्यांची शपथ द्यावी; वैश्याला गाई, धान्य, सोनें ह्यांची शपथ द्यावी, आणि शूद्राला तर सर्व पातकांहींकरून शपथ द्यावी.

शपथेच्या कामामध्येंही शुद्धीचा प्रकार मनूनें सांगितला आहे, तो असाः—

मनु– जर ( शपथ दिल्यानंतर) त्याला संकट शीघ्र प्राप्त होणार नाहीं तर तो शपथेंकरून शुद्ध झाला ( असें समजावें ).

संकट ह्मणजे राजनिमित्त अथवा दैवनिमित्त जें घोर महासंकट पूर्वीं ( ह्या प्रकरणाच्या ७ व्या शाखेच्या २ ऱ्या अंकांत ) सांगितलेलें तेंच समजावें, त्या संकटकालाचा अवधि एक दिवसापासून तीन दिवसपर्यंत, अथवा तिसऱ्या दिवसापासून पांच दिवसपर्यंत, लहानमोठें जसें कार्य असेल त्याच्या तारतम्येंकरून योजावा.

याप्रमाणें पूर्वोक्त दिव्य करून जय किंवा पराजय यांचा निश्चय झाल्यानंतर दंड करण्याविषयीं विशेष विचार कात्यायन सांगतो.

१ सवातीन तोळे दोन वाल आणि दोन रती भार ह्मणजे एक निष्क होतो.

**कात्यायन**– शुद्ध मनुष्यापासून ५० [पण] दंड घ्यावा, आणि अशुद्ध मनुष्यापासून दंड घ्यावा.

तो दंड (कात्यायन) सांगतो.

**कात्यायन**– विष, उदक, अग्नि, तुला, कोश आणि तप्तमाष ह्या दिव्यांचे ठायीं क्रमेंकरून एक हजार, सहाशें, पांचशें, चारशें, तीनशें आणि एकशें (पण) दंड अपराधी असेल त्यापासून घ्यावा. "वादीनें केलेल्या फिर्यादीचा प्रतिवादी नाकबूलपणा करील आणि वादी पुराव्यानें शाबीत करील तर" इत्यादि वचनेंकरून पूर्वी (असाधारण व्यवहार मातृका प्रकरणाच्या ३ ऱ्या शाखेच्या २ ऱ्या मूळ वचनांत) सांगितलेल्या दंडासह, दिव्यांतील पराजयनिमित्त हा दंड मिळवून दोनहि दंड एकत्र करावे. याप्रमाणें दिव्यप्रकरण समाप्त झालें ११३.

---

# दायविभाग प्रकरण ८ वें.

प्रमाणं मानुषं दैवमिति भेदेन वर्णितम्। अधुना वर्ण्यते दायविभागो योगमूर्तिना॥ तत्र दायशब्देन यद्धनं स्वामिसंबन्धादेव निमित्तादन्यस्य स्वं भवति तदुच्यते॥ स च द्विविधः। अप्रतिबन्धः सप्रतिबन्धश्च। तत्र पुत्राणां पौत्राणां च पुत्रत्वेन पौत्रत्वेन च पितृधनं पितामहधनं च स्वं भवतीत्यप्रतिबन्धो दायः। पितृव्यभ्रात्रादीनां तु पुत्राभावे स्वाम्यभावे च स्वं भवतीति पुत्रसद्भावः स्वामिसद्भावश्च प्रतिबन्धस्तदभावे पितृव्यत्वेन भ्रातृत्वेन च स्वं भवतीति सप्रतिबन्धो दायः। एवं तत्पुत्रादिष्वप्यू[illegible]हनीयः। विभागो नाम द्रव्यसमुदायविषयाणामनेकस्वाम्यानां तदेकदे[illegible] द्रव्यस्य व्यवस्थापनं। एतदेवाभिप्रेत्योक्तं नारदेन॥ विभागोऽर्थस्य पैत्र्यस्य तनयैर्यत्र कल्प्यते। दायभाग इति प्रोक्तं व्यवहारपदं बुधैरिति। पैत्र्यस्येति स्वत्वनिमित्तसंबन्धोपलक्षणम्। तनयैरित्यपि प्रत्यासन्नोपलक्षणम्। इदमिह निरूपणीयम्। कस्मिन्काले कस्य कथं कैश्च विभागः कर्तव्य इति। तत्र कस्मिन्काले कथं कैश्चेति तत्र तत्र श्लोकव्याख्यान एव वक्ष्यते। कस्य विभाग इत्येतावदिह चिन्त्यते। किं विभागात्स्वत्वमुत स्वस्य सतो विभाग इति। तत्र स्वत्वमेव तावन्निरूप्यते। किं शास्त्रैकसमधिगम्यं स्वत्वमुत प्रमाणान्तरसमधिगम्यमिति। तत्र शास्त्रैकसमधिगम्यमिति तावद्युक्तं गौतमवचनात्। स्वामी रिक्थक्रयसंविभागपरिग्रहाधिगमेषु ब्राह्मणस्याधिकं लब्धं क्षत्रियस्य विजितं निर्विष्टं वैश्यशूद्रयोरिति प्रमाणान्तरगम्ये स्वत्वेनेदं वचनमर्थवत्स्यात्। तथा स्तेनातिदेशे मनुः॥ योऽदत्तादायिनो हस्ताल्लिप्सेत ब्राह्मणो धनम्। याजनाध्यापनाद्वापि यथा स्तेनस्तथैव स इति। अदत्तादायिनः सकाशात् याजनादिद्वारेण द्रव्यमर्जयतां दण्डविधानमुपपन्नं स्यात्स्वत्वस्यालौकिकत्वे। अपि च। लौकिकं चेत्स्वत्वं मम स्वमनेनापहृतमिति न ब्रूयात्। अपहर्तुरेव स्वत्वात्। अन्यथा स्वं तेनापहृतमिति नापहर्तुः स्वम्। एवं तर्हि सुवर्णरजतादिस्वरूपवदस्य वा स्वमन्यस्य वा स्वमिति सं-

शयो न स्यात् तस्माच्छास्त्रैकसमधिगम्यं स्वत्वमिति ॥ अत्रोच्यते। लौकिकमेव स्वत्वं लौकिकार्थक्रियासाधनत्वात्। व्रीह्यादिवत्। आहवनीयादीनां हि शास्त्रगम्यानां न लौकिकक्रियासाधनत्वमस्ति। नन्वाहवनीयादीनामपि पाकादिसाधनत्वमस्त्येव। नैतत्। न हि तत्राहवनीयादिरूपेण पाकादिसाधनत्वं किं तर्हि प्रत्यक्षादिपरिदृश्यमानाग्न्यादिरूपेण। इह तु सुवर्णादिरूपेण न क्रयादिसाधनत्वमपि तु स्वत्वेनैव। न हि यस्य यत्स्वं न भवति तत्तस्य क्रयाद्यर्थक्रियां साधयति। अपि च। प्रत्यन्तवासिनामप्यदृष्टशास्त्रव्यवहाराणां स्वत्वव्यवहारो दृश्यते। क्रयविक्रयादिदर्शनात्। किंच नियतोपायकं स्वत्वं लोकसिद्धमेवेति न्यायविदो मन्यन्ते। तथाहि। लिप्सासूत्रे तृतीये वर्णके द्रव्यार्जननियमानां क्रत्वर्थत्वे स्वत्वमेव न स्यात्। स्वत्वस्यालौकिकत्वादिति पूर्वपक्षासम्भवमाशंक्य द्रव्यार्जनस्य प्रतिग्रहादिना स्वत्वसाधनत्वं लोकसिद्धमिति पूर्वपक्षः समर्थितो गुरुणा। ननु च द्रव्यार्जनस्य क्रत्वर्थत्वे स्वत्वमेव न भवतीति याग एव न संवर्तेत। प्रलपितमिदं केनापि। अर्जनं स्वत्वं नापादयतीति विप्रतिषिद्धमिति वदता। तथा सिद्धान्तेऽपि स्वत्वस्य लौकिकत्वमङ्गीकृत्यैव विचारप्रयोजनमुक्तम्। अतो नियमातिक्रमः पुरुषस्य न क्रतोरिति। अस्य चार्थ एवं विवृतः। यथा द्रव्यार्जननियमानां क्रत्वर्थत्वं तदा नियमार्जितेनैव द्रव्येण क्रतुसिद्धिः। नियमातिक्रमार्जितेन द्रव्येण न क्रतुसिद्धिरिति न पुरुषस्य नियमातिक्रमदोषः पूर्वपक्षे। राद्धान्ते तु अर्जननियमस्य पुरुषार्थत्वात्तदतिक्रमेणार्जितेनापि द्रव्येण क्रतुसिद्धिर्भवति। पुरुषस्यैव नियमातिक्रमदोष इति नियमातिक्रमार्जितस्यापि स्वत्वमङ्गीकृतम्। अन्यथा क्रतुसिद्ध्यभावात् न चैतावता चौर्यादिप्राप्तस्यापि स्वत्वं स्यादिति मन्तव्यम्। लोके तत्र स्वत्वप्रसिद्ध्यभावात् व्यवहारविसंवादात्। एवं प्रतिग्रहाद्युपायके स्वत्वे लौकिके स्थिते ब्राह्मणस्य प्रतिग्रहादय उपायाः। क्षत्रियस्य विजितादयो वैश्यस्य कृष्यादयः। शूद्रस्य शुश्रूषादय इत्यदृष्टार्थनियमाः। रिक्थादयस्तु सर्वसाधारणाः। स्वामी रिक्थक्रयसंविभागपरिग्रहाधिगमेष्वित्युक्ताः। तत्राप्रतिबन्धो दायो रिक्थं। क्रयः प्रसिद्धः। संविभागः सप्रतिबन्धो दायः। प्रतिग्रहोऽनन्यपूर्वस्य जलतृणकाष्ठादेः स्वीकारः। अधिगमो निध्यादेः प्राप्तिः। एतेषु निमित्तेषु सत्सु स्वामी भवति। कृतेषु ज्ञायते स्वामी ब्राह्मणस्याधिकं लब्धमिति ब्राह्मणस्य प्रतिग्रहादिना यल्लब्धं तदधिकमसाधारणं। क्षत्रियस्य विजितमित्यत्राधिकमित्यनुवर्तते। क्षत्रियस्य विजयदण्डादिलब्धमसाधारणम् ॥ निर्विष्टं वैश्यशूद्रयोरिति अत्राप्यधिकमित्यनुवर्तते। वैश्यस्य कृषिगोरक्षादिलब्धं निर्विष्टं तदसाधारणम्। शूद्रस्य द्विजशुश्रूषादिना भृतिरूपेण यल्लब्धं तदसाधारणम्। एवमनुलोमजानां प्रतिलोमजानां च लोकप्रसिद्धेषु स्वत्वहेतुषु यद्यदसाधारणमुक्तं सूतानामश्वसारथ्यमित्यादि तत्तत्सर्वं निर्विष्टशब्देनोच्यते। सर्वस्यापि भृतिरूपत्वान्निर्वेशो भृतिभोगयोरिति त्रिकाण्डीस्मरणात्। तत्तदसाधारणं वेदितव्य। यद्यपि पत्नी दुहितरश्चेत्यादिस्मरणं तत्रापि स्वामिसम्बन्धितया बहुषु दायविभागितया प्राप्तेषु लोकप्रसिद्धेऽपि स्वत्वे व्यामोहनिवृत्त्यर्थं

स्मरणमिति सर्वमनवद्यं । यदपि मम स्वमनेनापहृतमिति न ब्रूयात्स्वत्वस्य लौकिकत्व इति तदप्यसत् । स्वत्वहेतुभूतक्रयादिसन्देहात्स्वत्वसन्देहोपपत्तेः । विचारप्रयोजनं तु यद्गर्हितेनार्जयन्ति कर्मणा ब्राह्मणा धनम् । तस्योत्सर्गेण शुद्ध्यन्ति जप्येन तपसैव चेति ॥ शास्त्रैकसमधिगम्ये स्वत्वे गर्हितेनासत्प्रतिग्रहवाणिज्यादिना लब्धस्य स्वत्वमेव नास्तीति तत्पुत्राणां तदविभाज्यमेव । यदा तु लौकिकं स्वत्वं तदा सत्प्रतिग्रहादिलब्धस्यापि स्वत्वात् तत्पुत्राणां तद्विभाज्यमेव तस्योत्सर्गेण शुद्ध्यन्तीति प्रायश्चित्तमर्जयितुरेव तत्पुत्रादीनां तु दायत्वेन स्वत्वमिति न तेषां दोषसंबन्धः ॥ सप्त वित्तागमा धर्म्या दायो लाभः क्रयो जयः । प्रयोगः कर्मयोगश्च सत्प्रतिग्रह एव चेति मनुस्मरणात् ॥

## शाखा १ ली.

### सत्तेविषयीं विचार.

मानुष आणि दैव ( दिव्य ) असा दोन प्रकारचा पुरावा सांगितला, आतां योगीश्वर याज्ञवल्क्य दायविभागाचें निरूपण करितो.

दाय शब्दाचा अर्थ.

१ दाय ह्मणजे, जें द्रव्य मालकीच्याच संबंधनिमित्तेंकरून ( मालकाच्याच नात्यानें ) दुसऱ्याचे सत्तेंत येतें तें जाणावें.

तो दाय दोन प्रकारचा; **अप्रतिबंध** ( खुला ) आणि **सप्रतिबंध** ( अटकावलेला ).

अप्रतिबंध दाय म्हणजे काय.

२ **अप्रतिबंधदाय** ह्मणजे, पुत्रत्वरूप व पौत्रत्वरूप नात्यानें पित्याचे धनावर व पितामहाचे धनावर पुत्राची व पौत्राची सत्ता उत्पन्न होते तें धन.

सप्रतिबंध दाय म्हणजे काय.

३ **सप्रतिबंध दाय** म्हणजे, चुलता, भ्राता इत्यादिकांची, पुत्राच्या अभावीं व मालकाच्या अभावीं सत्ता उत्पन्न होते ह्मणून पुत्र विद्यमान असणें व मालक विद्यमान असणें हा ( पितृव्य वगैरेच्या सत्तेविषयीं ) प्रतिबंध आहे, त्यांच्या ( पुत्र व मालक ह्यांच्या ) अभावीं पितृव्यत्व ( चुलतेपणा ), भ्रातृत्व (भाऊपणा) ह्या संबंधानें त्यांची सत्ता ज्यावर उत्पन्न होते तें धन. ह्याप्रमाणेंच त्यांच्या पुत्रादिकांविषयींहि जाणावें.

विभागशब्दाचा अर्थ.

४ विभाग ह्मणजे ( अविभक्त ) द्रव्यसमुदायावर ( पुत्र इत्यादिकांच्या ) ज्या अनेक सत्ता उत्पन्न झालेल्या असतात त्या सत्तांची, त्या द्रव्यसमुदायाच्या अंशांचे ठायीं व्यवस्था करणें तो, (ह्मणजे ह्या अंशावर ह्या मनुष्याचीच सत्ता, अशा रीतीनें जो नियम करणें तो विभाग ).

नारदहि हेंच इष्ट मानून सांगतो.

**नारद**— जेथें पित्याच्या द्रव्याचा पुत्रांनीं विभाग केला जातो तें **दायभाग** ह्या नांवाचें व्यवहार प्रकरण पंडितांनीं ह्मटलें आहे.

येथें ( वरील नारदवचनांत ) "पित्याच्या" असें सांगितलें तें सत्तेचा निमित्तभूत जो

संबंध त्याचें उपलक्षण जाणावें. तसेंच " पुत्रांनीं " असें जें ह्मटलें आहे तेंहि जवळचे संबंधी यांचें उपलक्षण समजावें.

५ आतां एथें इतकें निरूपण करावयाचें आहे कीं, विभाग करण्याचा काळ कोणता, व कशाचा विभाग, आणि कसा विभाग व विभाग करण्याविषयीं अधिकारी कोणते. ह्यांपैकीं कोणता काळ व कसा विभाग, आणि विभाग करण्याचे अधिकारी कोणते हें पुढें त्या त्या वचनाच्या व्याख्यानप्रसंगीं सांगितलें जाईल.

कशाचा विभाग ह्याविषयीं येथें विचार करितो.

६ काय? विभागानें सत्ता उत्पन्न होते, किंवा आपली सत्ता असतां त्याचा विभाग केला जातो? त्यांत प्रथमतः सत्तेचें निरूपण करितो.

७ काय? केवळ शास्त्रप्रमाणसिद्ध सत्ता किंवा लोकप्रमाणसिद्ध सत्ता? तर शास्त्रप्रमाणसिद्धच सत्ता म्हणावी हें योग्य. कारण, गौतमवचन आहे म्हणून.

**गौतम**— रिक्थ, क्रय, संविभाग, परिग्रह, आणि अधिगम, इतक्या निमित्तांनीं मालक होतो. ( तसेंच ) ब्राह्मणास प्रतिग्रहानें जें मिळालें तें, क्षत्रियास विजयप्राप्त, वैश्यास उदीम व्यापारानें मिळालें तें, आणि शूद्रास सेवालब्ध, हें मात्र ज्याचें त्यास अधिक समजावें.

जर सत्ता लोकप्रमाणसिद्ध मानिली तर ह्या ( वरील) गौतमवचनास वैयर्थ्यापत्ति येईल.

८ तसेंच चोराच्या अतिदेशाविषयीं ( खालीं सांगितलेलें ) मनुवचन आहे त्यासहि विरोध येईल.

**मनु**— जो ब्राह्मण चोराच्या हातून याजन, अध्यापन इत्यादि करवून एतन्निमित्तानें धन संपादन करितो तो चोरासारिखा समजावा.

असें जो चोरापासून याजनादि कारणानें द्रव्य संपादन करणारास दंडविधि सांगितला त्याची उपपत्ति, जर सत्ता लोकप्रमाणसिद्ध मानिली तर होणार नाहीं.

९ आणखी असें आहे कीं जर सत्ता लोकप्रमाणसिद्ध मानिली तर ( दोष येतो तो असा)—ह्यानें माझें द्रव्य चोरून नेलें, असें बोलणें ( कोणापासूनहि ) संभवणार नाहीं. कारण, त्या द्रव्यावर चोरणाराचीच सत्ता आहे. जर ' दुसऱ्याचें द्रव्य ह्यानें चोरलें ' ह्या वाक्यांतच दुसऱ्याचें ह्मणजे ' दुसऱ्याचें सत्ताविशिष्ट ' असा अर्थ होतो म्हणून चोरणाराची त्याजवर सत्ताच नाहीं असें ह्मणाल तर, जसें लोकांत सोनें रुपें इत्यादि द्रव्य प्रत्यक्ष पाहिलें असतां हें सुवर्णादिक आहे किंवा नाहीं असा संशय उत्पन्न होत नाहीं, तसाच हें ह्याचें द्रव्य किंवा अन्याचें द्रव्य ( दुसऱ्याचें द्रव्य दुसऱ्यानें चोरिलें असतां चोरी करणारा ह्मणेल कीं, माझें द्रव्य ह्यानें चोरिलें, नंतर सभासदांनीं ऐकिल्यावर त्यांस ह्याचें द्रव्य किंवा अन्याचें द्रव्य ) असा सत्तेविषयीं वस्तुगत्या संशय होतो तो होणार नाहीं. तस्मात् शास्त्रप्रमाणसिद्धच सत्ता ह्मणावी हें योग्य.

१ सत्ता म्हणजे क्रय, प्रतिग्रह इत्यादिक जे उपाय त्यांपासून झालेला शक्तिविशेष.

१० सिद्धांत– जें जें लौकिक क्रियांचें साधन होतें तें तें लौकिक; जसें व्रीहि ( तांदूळ ) वगैरे, पदार्थ लौकिक कार्योपयोगी साधन आहेत. अशा अनुमानप्रमाणावरून सत्ता लोकप्रमाणसिद्धच म्हटली पाहिजे. कारण, तीहि लोकव्यवहारांचें साधन आहे.

जें जें लौकिक नव्हे तें तें लोकव्यवहारांचें साधनहि होत नाहीं. जसें शास्त्रप्रमाणसिद्ध जे आहवनीयादिक अग्नि ते ( लौकिक नव्हत म्हणून ) लोकव्यवहारोपयोगीहि होत नाहींत. (तशी सत्ताहि शास्त्रप्रमाणसिद्ध मानली तर लोकव्यवहाराचें साधन होणार नाहीं).

११ शंका– आहवनीयादिक अग्नि वगैरे पदार्थहि पाकादि क्रियांचें साधन होतातच, तस्मात् ते लोकव्यवहारोपयोगी आहेत असें कां मानूं नये.

१२ समाधान– असें मानूं नये. कारण, आहवनीयादिक अग्निहि पाकादि क्रियांचें साधन आहेत; परंतु आहवनीयत्वेंकरून ( म्हणजे आहवनीयादि शब्दवाच्य जो अग्नि तेणेंकरून ) नाहींत. केवळ प्रत्यक्ष पाहण्यांत येणारा जो लौकिक अग्नि तेणेंकरून आहेत. एथें तर विकत आणणें, देणें इत्यादि लौकिक कामांत सोनें रुपें इत्यादि स्वरूपेंकरून कोणतेंहि द्रव्य उपयोगी होत नाहीं; केवळ सत्तास्वरूपानेंच होतें. कारण, ज्या द्रव्यावर ज्या मनुष्याची सत्ता नाहीं त्याच्याकडून त्या द्रव्याचा क्रय, दान इत्यादि व्यवहार होऊं शकत नाहीं.

१३ आणखी असें कीं, ज्यांस शास्त्रीय व्यवहार मुळींच माहीत नाहीं असे जे शिद्दी वगैरे अज्ञानी लोक त्यांमध्येंहि सत्ताव्यवहार पाहण्यांत येतो, कारण, त्या लोकांतहि खरेदी, विक्री, देवघेव वगैरे व्यापार दृष्टीस पडतो, यास्तव सत्ता लोकप्रमाणसिद्धच मानिली पाहिजे.

१४ दुसरें असें कीं, नियतोपायक ( जीचे उपाय नियमित केले आहेत अशी ) सत्ता लोकप्रमाणसिद्धच आहे असें न्यायवेत्ते मानितात. तो प्रकार असा;– ( पूर्व मीमांसाशास्त्रांतील ) लिप्सा सूत्राचे ठायीं तिसऱ्या वर्णकांत द्रव्यसंपादन करण्याचे जे प्रतिग्रहादि नियम सांगितले आहेत ते यज्ञासाठीं उपयोगी आहेत, असें मानिलें असतां त्या (प्रतिग्रहादि[illegible]पायेंकरून संपादन केलेल्या ) द्रव्यावर मुळीं पुरुषाची सत्ताच उत्पन्न होणार नाहीं, कारण, सत्ता ही लोकप्रमाणसिद्ध नाहीं, या रीतीनें पूर्वपक्षाच्या असंभवाची शंका करून प्रतिग्रह वगैरे उपायांनीं द्रव्य संपादन करावें, हें सत्ता उत्पन्न होण्याचें साधन लोकांत प्रसिद्ध आहे ( यास्तव सत्ता लोकप्रमाणसिद्ध नाहीं ) अशा रीतींनीं गुरूनें पूर्वपक्ष स्थापित केला.

१५ शंका– द्रव्य संपादन करणें तें यज्ञासाठीं, असें मानिलें असतां त्या संपादित द्रव्यावर पुरुषाची सत्ताच नाहीं, यास्तव ( ज्यावर सत्ता नाहीं ) अशा द्रव्येंकरून केलेला

---

१. १७ व्या अंकापासून एथपर्यंत सत्ता शास्त्रप्रमाणसिद्ध असा पूर्वपक्ष सिद्ध करून सिद्धांत मत सांगतो. जसें व्रीहि, यव इत्यादि पदार्थ लौकिक क्रियांचें साधन होतात तद्वत् सत्ताही लौकिक व्यवहारांचें साधन आहे म्हणून लोकसिद्धच सत्ता असें सिद्ध झालें.

जो याग तो यागच होणार नाहीं. असा कोणी कुतर्क केला, परंतु संपादनानें त्या द्रव्यावर त्याची सत्ता येत नाहीं, असें म्हणणें अगदींच विरुद्ध आहे असें गुरु ह्मणतो.

१६ तसेंच सिद्धांतींहि सत्ता लोकप्रमाणसिद्ध आहे असें मानूनच विचार करण्याचें प्रयोजन सांगितलें आहे. ह्यास्तव नियमाचें उल्लंघन करणें हा दोष पुरुषाचा आहे, यज्ञाचा नाहीं, ह्मणून यागाला दोष लागणार नाहीं. म्हणजे याचा अर्थ असाः– जेव्हां द्रव्यसंपादनाचे जे प्रतिग्रहादिक उपाय ते यज्ञासाठीं असें मानिलें तेव्हां प्रतिग्रहादिनियमांहींकरून संपादन केलेल्या द्रव्यानेंच यज्ञाची सिद्धि होते. प्रतिग्रहादि नियमांचें उल्लंघन करून संपादन केलेल्या द्रव्यानें यज्ञसिद्धि होत नाहीं, म्हणून नियमांचें उल्लंघन केल्याचा दोष पुरुषाकडे नाहीं, असें पूर्वपक्षाचें मत. सिद्धांत विचाराप्रमाणें तर द्रव्यसंपादनाचे जे प्रतिग्रहादिनियम उक्त आहेत ते पुरुषार्थासाठीं, ह्यास्तव त्या नियमांचें उल्लंघन करून संपादिलेल्या द्रव्यानेंहि यज्ञसिद्धि होते, नियमाचें उल्लंघन केल्याचा दोष पुरुषाला लागतो.

असें नियमाचें उल्लंघन करून संपादिलेल्या द्रव्यावरहि सत्ता उत्पन्न होते असें मानिलें आहे, न मानिलें तर ( सत्ताविरहित द्रव्यानें ) यागसिद्धि होणार नाहीं. असें सांगितल्यानें केवळ चोरी वगैरे अन्यायानें संपादिलेल्या द्रव्यावरहि सत्ता होईल असें मानूं नये, कारण, तशा द्रव्यावर सत्ता असणें याची लौकिकांत प्रसिद्धि नाहीं, ( इतकेंच नाहीं, तर ) व्यवहारांतहि ही गोष्ट विरुद्ध दिसते.

१७ ह्याप्रमाणें प्रतिग्रहादिक उपायांनीं उत्पन्न झालेली सत्ता लोकप्रमाणसिद्ध असें सिद्ध झालें असतां, ब्राह्मणास प्रतिग्रहादिक उपाय, क्षत्रियांस विजयादिक, वैश्यांस शेतकी, वाढ वगैरे आणि शूद्रांला सेवा वगैरे असे जे ( द्रव्यसंपादनाविषयीं ) शास्त्रांत नियम सांगितले ते स्वधर्मरक्षणार्थ जाणावे.

*सत्ता उत्पन्न होण्याचे विशेष उपाय.*

१८ रिक्थ, क्रय इत्यादिक जे उपाय सांगितले आहेत ते तर सर्व वर्णाच्या लोकांला साधारण रीत्या सारखेच, ते ७ व्या अंकांत सांगितले आहेत. रिक्थ ह्मणजे अप्रतिबंधदाय ( जिंदगी ), क्रय ह्मणजे खरेदी, संविभाग ह्मणजे सप्रतिबंधदाय, परिग्रह ह्मणजे ज्यावर कोणाची पूर्वी सत्ता नाहीं अशा जल, तृण, काष्ठ इत्यादि पदार्थांचा स्वीकार, अधिगम म्हणजे निधि इत्यादि द्रव्याचा अकल्पित लाभ, या इतक्या कारणांतून कोणत्या एकाद्या कारणाकडून ( मनुष्य ) द्रव्याचा मालक होतो.

*सत्ता उत्पन्न होण्याचे सर्व साधारण उपाय.*

ब्राह्मणाला प्रतिग्रहादिकेंकरून जें धन मिळालें तें विशेष अधिक, ह्मणजे तें त्याचें सत्तेचें होय; क्षत्रियास विजयादिकेंकरून जें मिळालें तें अधिक ह्मणजे त्याचें सत्तेचं; वैश्यास शेतकी, गुराखीपणा इत्यादिकेंकरून जें मिळालें तें अधिक, ह्मणजे सत्तेचें; शूद्रास, सेवा चाकरी करून मिळालेलें तें धन अधिक, ह्मणजे त्याचें सत्तेचें;

१९ ह्याप्रमाणें सत्ता उत्पन्न होण्याचीं साधनें लोकप्रसिद्ध आहेत. या रीतीनें अनुलोम संकरजाति व प्रतिलोम संकरजाति या मनुष्यांला "सूत जातीच्या लोकांनीं घोडा गाडी

हांकण्याचा धंदा करावा " इत्यादि वचनेंकरून धन मिळविण्याचे उपाय लोकप्रसिद्ध जे जे सांगितले आहेत त्या त्या उपायांनीं संपादिलेलें धन त्या त्या जातीच्या मनुष्यांचें तें अधिक, म्हणजे तें त्यांचें सत्तेचें असें समजावें.

२० (अपुत्र (निपुत्रिक) मरण पावला असतां त्याचे जिंदगीचे वारसांचा अनुक्रम दाखविणारी) "पत्नी, तिच्या अभावीं कन्या " इत्यादिक जी (पुढील २६ व्या शाखेच्या १ ल्या अंकाची) मूळ स्मृति, तीहि सत्ता लोकसिद्ध असली तथापि मालकाच्या संबंधानें बहुत वारस प्राप्त झाले असतां ( जिंदगी ) कोणास द्यावी असा कदाचित् व्यामोह ( भ्रांति ) पडेल तो न पडावा एतदर्थ आहे. ह्याप्रमाणें सर्व निर्दोष जाणावें.

२१ जर सत्ता लोकसिद्धच आहे तर " माझ्या द्रव्याचा ह्यानें अपहार केला असें बोलूं नये," असें ह्मणणेंहि अप्रयोजक. कारण, सत्ता होण्याविषयीं साधनीभूत जीं दान, विक्री इत्यादिक कारणें ( सांगितलीं आहेत ) ह्याविषयीं संदेह झाल्यावरून सत्तेविषयींहि संदेहाची उपपत्ति घडते.

२२ हा विचार करण्याचें प्रयोजन इतकेंच आहे कीं, जर सत्ता शास्त्रप्रमाणसिद्ध मानिली तर " ब्राह्मणांनीं निंद्य कर्मानें जें द्रव्य संपादित केलें असेल त्याचा परित्याग केल्यानें, जप, व तपश्चर्या हीं केल्यानें ते शुद्ध होतात." अशा वचनावरून दुष्प्रतिग्रह, वाणिज्य इत्यादि उपायेंकरून मिळविलेल्या धनावर ( संपादकाची ) सत्ताच उत्पन्न होत नाहीं, म्हणून त्याच्या पुत्रांकडून तें धन विभागलें जाणार नाहीं.

२३ आणि सत्ता लोकसिद्ध मानिली ह्मणजे ( सदर्हू दुष्प्रतिग्रहनिंदक स्मृतीचा अर्थ समर्पक बसतो तो असा)— दुष्प्रतिग्रह इत्यादिक उपायांकडून संपादिलेल्या द्रव्यावरहि संपादकाची सत्ता आहेच ह्मणून त्याच्या पुत्रांस तें विभाज्य ( विभागयोग्य )च होतें. " त्याचा त्याग केल्यानें, जपानें व तपश्चर्येनें ते शुद्ध होतात." असें जें प्रायश्चित्त ( वरच्या स्मृतींत ) सांगितलें तें संपादकानेंच करावें, त्याच्या पुत्रादिकांस तर तें धन वारशाच्या हक्कानें स्वसत्तात्मक होतें, ह्यास्तव त्यांजकडे अगदीं दोषसंबंध नाहीं. ह्यास प्रमाण—

**मनु**— दाय, लाभ, क्रय, जय, व्याज बट्टा, चाकरी, आणि सत्प्रतिग्रह असे द्रव्यप्राप्तीचे सात आगम धर्म्य आहेत.

इदानीमिदं संदिह्यते । विभागात्स्वमुत स्वस्य सतो विभाग इति । तत्र विभागात्स्वत्वमिति तावद्युक्तम् । जातपुत्रस्याधानविधानात् । यदि जन्मनैव स्वत्वं स्यात्तदोत्पन्नस्य पुत्रस्यापि तत्स्वं साधारणमिति द्रव्यसाध्येष्वाधानादिषु पितुरनधिकारः स्यात् । तथा विभागात्प्राक्पितृप्रसादलब्धस्य विभागप्रतिषेधो नोपपद्यते । सर्वानुमत्या दत्तत्वाद्विभागप्राप्त्यभावात् । यथाह ॥ शौर्यभार्याधने चोभे यच्च विद्याधनं भवेत् । त्रीण्येतान्यविभाज्यानि प्रसादो यश्च पैतृक इति ॥ तथा । भर्त्रा प्रीतेन यद्दत्तं स्त्रियै तस्मिन्मृतेऽपि तत् । सा यथाकाममश्नीयाद्दद्याद्वा स्थावरादृत इति प्रीतिदानवचनं नोपपद्यते ॥ तज्जन्मनैव स्वत्वे न च स्थावरादृते यद्दत्तमिति संबन्धो

युक्तो व्यवहितयोजनाप्रसङ्गात् । यदपि । मणिमुक्ताप्रवालानां सर्वस्यैव पिता प्रभुः । स्थावरस्य तु सर्वस्य न पिता न पितामहः । तथा । पितृप्रसादाद्भुज्यन्ते वस्त्राण्याभरणानि च । स्थावरं तु न भुज्येत प्रसादे सति पैतृके इति स्थावरस्य प्रसाददानप्रतिषेधवचनं तत्पितामहोपात्तस्थावरविषयम् । अतीते पितामहे तद्धनं पितापुत्रयोः साधारणमपि मणिमुक्तादि पितुरेव । स्थावरं तु साधारणमित्यस्मादेव वचनादवगम्यते । तस्मान्न जन्मना स्वत्वं किंतु स्वामिनाशाद्विभागाद्वा स्वत्वम् । अत एव पितुरूर्ध्वं विभागात्प्राग्द्रव्यस्वत्वस्य प्रहीणत्वादन्येन गृह्यमाणं न निवार्यत इति चोद्यस्यानवकाशः । तथैकपुत्रस्यापि पितृप्रयाणादेव पुत्रस्य स्वमिति न विभागमपेक्षत इति । अत्रोच्यते । लोकप्रसिद्धमेव स्वत्वमित्युक्तम् । लोके च पुत्रादीनां जन्मनैव स्वत्वं प्रसिद्धतरं नापन्हवमर्हति विभागशब्दश्च बहुस्वामिकधनविषयो लोकप्रसिद्धो नान्यदीयविषयो न प्रहीणविषयः । तं तथोत्पन्नस्यैवार्थस्वामित्वं लभेतेत्याचार्या इति गौतमवचनाच्च । मणिमुक्ताप्रवालानामित्यादि वचनं च जन्मना स्वत्वपक्ष एवोपपद्यते । न च पितामहोपात्तस्थावरविषयमिति युक्तं । न पिता न पितामह इति वचनात् । पितामहस्य हि स्वार्जितमपि पुत्रे पौत्रे च सत्यदेयमिति वचनं जन्मना स्वत्वं गमयति । यथा परमते मणिमुक्तावस्त्राभरणादीनां पैतामहानामपि पितुरेव स्वत्वं वचनात् । एवमस्मन्मतेपि पित्रार्जितानामप्येतेषां पितुर्दानाधिकारो वचनादित्यविशेषः । यत्तु भर्त्रा प्रीतेनेत्यादिविष्णुवचनं स्थावरस्य प्रीतिदानज्ञापनं तत्स्वोपार्जितस्यापि पुत्राद्यभ्यनुज्ञयैवेति व्याख्येयम् । पूर्वोक्तैर्मणिमुक्तादिवचनैः स्थावरव्यतिरिक्तस्यैव प्रीतिदानयोग्यत्वनिश्चयात् । यदप्यर्थसाध्येषु वैदिकेषु कर्मस्वनधिकार इति तत्र तद्विधानबलादेवाधिकारो गम्यते । तस्मात्पैतृके पैतामहे च द्रव्ये जन्मनैव स्वत्वम् । तथापि पितुरावश्यकेषु धर्मकृत्येषु वाचनिकेषु प्रसाददानकुटुम्बभरणापद्विमोक्षादिषु च स्थावरव्यतिरिक्तद्रव्यविनियोगे स्वातन्त्र्यमिति स्थितम् । स्थावरं तु स्वार्जिते पित्रादिप्राप्ते च पुत्रादिपारतन्त्र्यमेव । स्थावरं द्विपदं चैव यद्यपि स्वयमर्जितम् । असंभूय सुतान्सर्वान्न दानं न च विक्रयः । ये जाता येऽप्यजाताश्च ये च गर्भे व्यवस्थिताः । वृत्तिं च तेऽभिकाङ्क्षन्ति न दानं न च विक्रय इत्यादिस्मरणात् । अस्यापवादः ॥ एकोपि स्थावरे कुर्याद्दानाधमनविक्रयम् । आपत्काले कुटुम्बार्थे धर्मार्थे च विशेषत इति । अस्यार्थः ॥ अप्राप्तव्यवहारेषु पुत्रेषु पौत्रेषु वा अनुज्ञादानाद्यसमर्थेषु भ्रातृषु वा तथाविधेष्वविभक्तेष्वपि सकलकुटुम्बव्यापिन्यामापदि तत्पोषणे वावश्यं कर्तव्येषु पितृश्राद्धादिषु स्थावरस्य दानाधमनविक्रयमेकोपि समर्थः कुर्यादिति । यत्तु वचनम् ॥ अविभक्ता विभक्ता वा सपिण्डाः स्थावरे समाः । एको ह्यनीशः सर्वत्र दानाधमनविक्रय इति तदप्यविभक्तेषु द्रव्यस्य मध्यस्थत्वादेकस्यानीश्वरत्वात् सर्वाभ्यनुज्ञावश्यं कार्या । विभक्तेषूत्तरकालं विभक्ताविभक्तसंशयव्युदासेन व्यवहारसौकर्याय सर्वाभ्यनुज्ञा न पुनरेकस्यानीश्वरत्वेनातो विभक्तानुमतिव्यतिरेकेणापि व्यवहारः सिद्ध्यतीत्येवेति व्या-

रूपेयम् । यदपि । स्वग्रामज्ञातिसामन्तदायादानुमतेन च । हिरण्योदकदानेन षड्भिर्गच्छति मेदिनीति ॥ तत्रापि ग्रामानुमतिः प्रतिग्रहः प्रकाशः स्यात्स्थावरस्य विशेषत इति स्मरणात् व्यवहारप्रकाशनार्थमेवापेक्ष्यते न पुनर्ग्रामानुमत्या विना व्यवहारासिद्धिः । सामन्तानुमतिस्तु सीमाप्रतिपत्तिनिरासाय । ज्ञातिदायादानुमतेस्तु प्रयोजनमुक्तमेव हिरण्योदकदानेनेति । स्थावरे विक्रयो नास्ति कुर्यादाधिमनुज्ञयेति स्थावरस्य विक्रयप्रतिषेधात् ॥ भूमिं यः प्रतिगृह्णाति यश्च भूमिं प्रयच्छति । उभौ तौ पुण्यकर्माणौ नियतौ स्वर्गगामिनाविति दानप्रशंसादर्शनाच्च । विक्रयेऽपि कर्तव्ये सहिरण्यमुदकं दत्वा दानरूपेण स्थावरविक्रयं कुर्यादित्यर्थः ॥

## शाखा २ री.

१ आतां विभागानें सत्ता उत्पन्न होते, किंवा ज्या धनावर प्रथमपासून सत्ता आहे त्याचा विभाग होतो ह्याविषयीं संदेह आहे त्याचा विचार करितो.

२ ( पूर्व पक्षाचें मत) विभागानें सत्ता उत्पन्न होते असें मानणें हें सयुक्त. कारण, पुत्र झाला ह्मणजे पुत्रवानानें आधान सिद्ध करावें, असा शास्त्रविधि आहे. जर जन्मेंकरून सत्ता उत्पन्न होईल तर पित्याची आणि उत्पन्न झालेल्या पुत्राचीहि त्या द्रव्यावर सत्ता समानच होईल, यास्तव द्रव्यसाध्य जीं आधानादि कर्मे त्यांजविषयीं एकट्या पित्याला अधिकारच नाहींसा होईल.

३ तसेंच विभागाच्या पूर्वीं पित्यानें संतोषेंकरून दिलेल्या द्रव्याचा विभाग नाहीं असा निषेध सांगितला आहे त्याचीहि संगति होणार नाहीं. कारण सर्वांची संमति घेऊन तें द्रव्य दिल्यामुळें त्याचे विभागाचे प्राप्तीचा संभवहि नाहीं.

**स्मृति**— ४ शौर्यसंपादित धन, स्त्रीधन, आणि विद्येकडून मिळविलेलें धन हीं तीन धनें अविभाज्य; तसेंच पित्यानें स्वसंतोषानें दिलेलें जें धन तेंहि अविभाज्य जाणावें.

**विष्णु**— ५ तसेंच नवऱ्यानें संतुष्ट होऊन जें स्त्रीला दिल्हें तें द्रव्य नवरा मरण पावल्यानंतरहि तिनें यथेच्छ उपभोगावें. देणें झाल्यास स्थावरावांचून द्यावें.

असें जें प्रीतिदानाविषयीं वचन आहे त्याची संगति, जन्मेंकरूनच ( पुत्राची ) सत्ता मानिली तर होणार नाहीं. "स्थावरावांचून इतर धन दिलें असेल तर" अशा प्रकारचा अन्वयसंबंध करणें योग्य नाहीं, कारण, अति दूर रहाणाऱ्या शब्दांशीं अन्वय योजना करण्याचा प्रसंग येईल.

**स्मृति**—६ मणि, मोतीं, पोवळीं, इत्यादि सर्व धनाचा मालक पिता होतो, परंतु सर्व स्थावराचा तर पिता मालक नाहीं, व पितामहहि होत नाहीं.

**स्मृति**— ७ तसेंच पित्याच्या प्रसन्नतेनें प्राप्त झालेलीं जीं वस्त्रें व भूषणें त्यांचा ( पुत्रादिकांनीं ) उपभोग करावा. परंतु स्थावर जरी पित्याचे संतोषानें मिळालें आहे तरी त्याचा ( एकट्यानें स्वतंत्र ) उपभोग करूं नये.

८ अशीं जीं स्थावरधनाच्या प्रीतिदानाविषयीं निषेध करणारीं वचनें आहेत तीं

तर पितामहसंपादित स्थावराविषयीं. पितामह निवर्तल्यानंतर त्या ( स्थावर जंगम ) धनावर जरी पितापुत्रांची सत्ता समान आहे तथापि मणि, मोतीं वगैरे जंगम पित्याचेंच. स्थावरावर मात्र पितापुत्रांची सत्ता समान असें ह्याच ( ७ व्या अंकाचे ) वचनावरून अवगत होतें.

९ तस्मात् जन्मदिवसापासून ( धनावर मनुष्याची ) सत्ता उत्पन्न होत नाहीं, तर मालक मरण पावल्यानें किंवा विभाग झाल्यानें सत्ता उत्पन्न होते ह्याजकरितां पित्याचे मरणोत्तरकालीं, विभाग झाल्यापूर्वीं द्रव्यावर कोणाचीच सत्ता नसल्यामुळें तें धन दुसरा घेत असतां त्याचें निवारण होऊं शकत नाहीं, अशा शंकेला अवकाशच राहत नाहीं.

१० तसेंच ज्यास एकच पुत्र आहे असा पिता मरण पावल्यानेंच ( जिंदगीवर ) पुत्राची सत्ता उत्पन्न होते, ह्मणून विभागाची गरज रहात नाहीं.

११ ह्या पूर्व पक्षावर सिद्धांत सांगतो कीं, सत्ता लोकसिद्धच असें ( १ ल्या शाखेच्या १० व्या अंकांत ) सांगितलें. पुत्र इत्यादिकांची सत्ता जन्मेंकरूनच लोकांत विशेष प्रसिद्ध आहे, ती नाकबूल करवत नाहीं, ' विभाग ' हा शब्दहि ज्याला बहुत मालक आहेत असें जें द्रव्य त्याविषयीं लोकांत प्रसिद्ध आहे. परंतु परकीय धनाविषयीं किंवा ज्या धनाविषयीं मालक नाहीं त्याविषयींहि नव्हे.

गौतमहि– जन्मेंकरूनच द्रव्याचें स्वामित्व पावतो असें आचार्यांचें मत आहे.

१२ जन्मेंकरून सत्ता उत्पन्न होते ह्या पक्षींच ६ व्या व ७ व्या अंकांची उपपत्ति होते सहाव्या व सातव्या अंकांचीं वचनें पितामहसंपादित स्थावराविषयीं होत असें म्हणणेंहि योग्य नाहीं, कारण, " स्थावराचा मालक पिता नाहीं व पितामहहि होत नाहीं," असें त्याच वचनांत सांगितलें आहे.

१३ पितामहाचें जरी स्वसंपादित कांहीं धन असलें तरी तें देण्याविषयीं पुत्र व पौत्र विद्यमान असतां पितामहास अधिकार नाहीं, असें जें वचन तेंहि जन्मेंकरूनच सत्ता दाखवितें.

१४ जसें दुसऱ्यांच्या[२] मतीं मणि, मोतीं, वस्त्रें, भूषणें इत्यादिक धन जरी पितामहानें संपादित आहे, तरी त्यावर पित्याचीच सत्ता वचनेंकरून सिद्ध होते, तसें आमच्या मतींहि मणि, मोतीं, वस्त्रें, भूषणें इत्यादि धन पित्यानें संपादित आहे तथापि त्याचें दान करण्याविषयीं पित्याला अधिकार आहे असें वचनेंकरून सिद्ध होतें, ह्यांत विशेष नाहीं.

१५ " नवऱ्यानें संतुष्ट होऊन जें धन स्त्रीला दिलें " इत्यादि जें ९ व्या अंकाचें

---

१ २ ऱ्या अंकांत विभागानें सत्ता होते असा पूर्वपक्षाचा सिद्धि केली, आतां सिद्धांत सांगतो.

२ दुसऱ्याचे मताचा अभिप्राय असा कीं, स्थावरावांचून स्वोपार्जित धनाचें दान, पुत्र वगैरेंची संमति घेतल्यावांचून पिता करण्यास अधिकारी आहे. ३ स्थावर धन स्वोपार्जित असेल तथापि अनुमति देण्यास जे लायक असतील त्या सर्वांची संमति घेतल्यावांचून त्या स्थावराचें दान, विक्रय करण्याला अधिकार नाहीं, जंगमाविषयीं अनुमति नको.

स्थावराचें प्रीतिदान दाखविणारें विष्णुस्मृतिवचन, त्या वचनाचा अर्थ असा करावा कीं, स्वतः संपादित स्थावर असलें तरी त्या स्थावराचे प्रीतिदानाविषयीं पित्यास पुत्रादिकांची संमति पाहिजे. कारण, पूर्वी ( ६ व्या व ७ व्या अंकांत ) सांगितलेल्या वचनावरून, स्थावराखेरीज जें द्रव्य तेंच प्रीतिदानाविषयीं योग्य असें निश्चित झालें.

द्रव्यसाध्य जीं वैदिक ( श्रौत ) कर्में त्यांविषयीं ( पुत्रवंतास ) अधिकार नाहीं, असें पूर्वी ( २ ऱ्या शाखेच्या २ ऱ्या अंकांत ) सांगितलें, परंतु तेथें त्या त्या स्थळीं सांगितलेल्या विधिबलानेंच वैदिक कर्माविषयीं अधिकार प्राप्त होतो.

१६ तस्मात् पित्याच्या व पितामहाच्या जिंदगीवर ( पुत्रपौत्रांची ) सत्ता जन्मेंकरूनच उत्पन्न होते, तथापि पित्यानें अवश्य कर्तव्य जीं वाचनिक धर्मकृत्यें (श्राद्धादिक), प्रीतिदान, व कुटुंबपोषण, संकटपरिहार इत्यादिकांसाठीं स्थावरविरहित इतर द्रव्य खर्च करण्याविषयीं पित्याला स्वतंत्रता ( मुखत्यारी ) आहे, असें सिद्ध झालें.

१७ स्थावर तर स्वतः संपादित किंवा वडिलोपार्जित असलें तरी त्याविषयीं पुत्रादिकांचें पारतंत्र्य आहेच. कारण,

**स्मृति**– स्थावर धन, द्विपद (दास दासी वगैरे ) धन, जरी स्वतः संपादित आहे तरी सर्व पुत्रांची संमति असल्यावांचून त्याचें दान, विक्री हीं होत नाहींत. जे जन्मले व जे जन्मले नाहींत ( ह्मणजे पुढें जन्म घेणारे ) व जे गर्भस्थ आहेत तेहि उपजीविकेची इच्छा धरून असतात, यास्तव तिचें ( उपजीविकेचें ) दान व विक्री करूं नये.

वरील स्मृतीचा अपवाद.

**स्मृति**– १८ आपत्तिकालीं, कुटुंबासाठीं, आणि विशेषतः धर्मकृत्यासाठीं एकानें देखील स्थावराचें दान, गहाण, विक्री करावी.

**वरील स्मृतीचा अर्थ**– वयांत न आलेले व संमति देण्याविषयीं असमर्थ असे पुत्र, पौत्र अथवा भ्रातेहि तसेच असून अविभक्त आहेत, आणि सकल कुटुंबास व्यापक असी आपत्ति आली असतां त्या कुटुंबाचें पोषण व अवश्य कर्तव्य पितृश्राद्धादि धर्मकृत्य ह्यांसाठीं स्थावराचें दान, गहाण, विक्री एकानें देखील करावी. परंतु तो समर्थ ( प्राप्तव्यवहार[1] ) असल्यास.

**मनु**– १९ सपिंड विभक्त किंवा अविभक्त असोत, स्थावर जिंदगीविषयीं त्यांचा अधिकार सारखाच आहे, ह्मणून ( स्थावराचें ) दान, गहाण, विक्री हीं करण्याविषयीं एकटा मुखत्यार नाहीं.

असें जें वचन आहे त्याचीहि व्याख्या असी करावी कीं, भ्राते वगैरे अविभक्त असतां जिंदगी समाईक असल्यामुळें एकट्यालाच अधिकार नाहीं. ह्मणून एकानें सर्वांची अनुमति अवश्य घेतली पाहिजे.

विभक्त झाल्यानंतरहि विभक्त किंवा अविभक्त आहेत असा संशय न होतां व्यवहार

---

१ घरचा सर्व व्यवहार स्वातंत्र्यानें चालवीत असेल तो प्राप्तव्यवहार म्हटला आहे.

सुरळीत चालावा, एतदर्थ सर्वांची अनुमति पाहिजे, केवळ एकव्यालाच अधिकार नाहीं असें नव्हे, ह्यास्तव विभक्ताची अनुमति घेतल्यावांचूनहि व्यवहार सिद्ध होतोच.

**स्मृति**– २० आपले गांवकरी, स्वज्ञाति, सामंत, दायाद ह्यांची अनुमति, आणि हिरण्यसहित उदकदान ह्या सहा कारणांनीं भूमि ( दानविक्रयादिद्वारा दुसऱ्याचे स- त्तेंत ) जाते.

असें जें वचन आहे त्यांतहि गांववाल्यांची अनुमति ( सही ) घेण्याविषयीं अशाक- रितां सांगितलें.

**स्मृति**– "प्रतिग्रह करणें तो प्रसिद्धपणें करावा, त्यांत स्थावराचा प्रतिग्रह तर विशेषेंकरून प्रसिद्धपणें करावा."

असें स्मृतिवचन आहे, यास्तव झालेला व्यवहार सर्वांस प्रसिद्ध होई असें करावें, एत- दर्थ समजावें. केवळ गांवकरी लोकांच्या सहीवांचून केलेला व्यवहार सिद्ध ( खरा ) होत नाहीं असें नव्हे.

सामंतांची संमति तर, सीमेसंबंधी वाद न पडावा एतदर्थ जाणावी. ज्ञाति व दायाद ह्यांच्या अनुमतीचें कारण तर वर सांगितलेंच आहे. ( वरच्या स्मृतींत ) "हिरण्यसहित उदकदान" असें ह्मटलें आहे त्याचाहि अर्थ असाच कीं, "स्थावराचा विक्रय होत नाहीं, ह्मणून ( वारस इत्यादिकांची ) अनुमति ( सही ) घेऊन तें स्थावर गहाण टेवावें." असा स्थावराचे विक्रयाविषयीं निषेध सांगितला आहे.

**स्मृति**– जो भूमीचें दान करितो तो, व जो भूमीचें दान घेणारा हे दोघेहि पुण्यकर्मे होत्साते निश्चयें स्वर्गाप्रत जाणारे होतात.

अशी भूमीचे दानाविषयीं प्रशंसा सांगितल्यावरून स्थावराचा विक्रय करणें असेल त- थापि हिरण्यसहित उदक देऊन दानरूपेंकरून करावा.

---

पैतृके पैतामहे च धने जन्मनैव स्वत्वेपि विशेषं भूयो पितामहोपात्तेऽत्र वक्ष्यामः । इदानीं यत्र काले येन च यथाविभागः कर्तव्यस्तद्दर्शयन्नाह ॥

**विभागं चेत्पिता कुर्यादिच्छया विभजेत्सुतान् ।**
**ज्येष्ठं वा श्रेष्ठभागेन सर्वे वा स्युः समांशिनः ॥ ११४ ॥**

यदा विभागं पिता चिकीर्षति तदा इच्छया विभजेत् । पुत्रानात्मनः सकाशात् पुत्रं पुत्रौ पुत्रान् ॥

इच्छया निरङ्कुशत्वादनियमप्राप्तौ नियमार्थमाह ॥ ज्येष्ठं वा श्रेष्ठभागेनेति । ज्येष्ठं श्रेष्ठभागेन मध्यमं मध्यभागेन कनिष्ठं कनिष्ठभागेन विभजेदित्यनुवर्तते । श्रेष्ठादि- विभागश्च मनुनोक्तः। ज्येष्ठस्य विंश उद्धारः सर्वद्रव्याच्च यद्वरम् । ततोऽर्द्धं मध्यमस्य स्यात्तुरीयं तु यवीयस इति । वाशब्दो वक्ष्यमाणपक्षापेक्षः । सर्वे वा स्युः समांशिन इति । सर्वे वा ज्येष्ठादयः समांशभाजः कर्तव्याः । अयं च विषमो विभागः स्वा-

र्जितद्रव्यविषयः । पितृक्रमायाते तु समस्वाम्यस्य वक्ष्यमाणत्वान्नेच्छया विषमो विभागो युक्तः । विभागं चेत्पिता कुर्यादिति यदा पितुर्विभागेच्छा स तावदेकः कालः । अपरोऽपि जीवत्यपि पितरि द्रव्यनिस्पृहे निवृत्तरमणे मातरि च निवृत्तरजस्कायां पितुरनिच्छायामपि पुत्रेच्छयैव विभागो भवति ॥ यथोक्तं नारदेन ॥ अत ऊर्ध्वं पितुः पुत्रा विभजेयुर्धनं सममिति । पित्रोरूर्ध्वं विभागं प्रतिपाद्य मातुर्निवृत्ते रजसि प्रत्तासु भगिनीषु च । निवृत्ते चापि रमणे पितर्युपरतस्पृह इति दर्शितः । अत्र पुत्रा धनं समं विभजेयुरित्यनुषज्यते । गौतमेनापि । ऊर्ध्वं पितुः पुत्रा रिक्थं विभजेरन्नित्युक्त्वा निवृत्ते चापि रजसीति द्वितीयः कालो दर्शितः । जीवति चेच्छतीति तृतीयः कालो दर्शितः । तथा सरजस्कायामपि मातर्यनिच्छत्यपि पितर्यधर्मवर्तिनि दीर्घरोगग्रस्ते च पुत्राणामिच्छया भवति विभागः । यथाह शङ्खः॥ अकामे पितरि रिक्थविभागो वृद्धे विपरीतचेतसि रोगिणि चेति ॥ १४ ॥

### शाखा ३ री.

पित्यानें संपादित व पितामहानें संपादित जिंदगीवर जरी ( पुत्रपौत्रांची ) जन्मतांच सत्ता आहे, तथापि एतत्संबंधी विशेष विचार, " पितामहानें जी संपादित भूमि " इत्यादि मूळवचन पुढें ( ११ व्या शाखेंत ) सांगेल त्याच्या व्याख्यानप्रसंगीं सांगूं. आतां कोणत्या काळीं व कोणी व कसा विभाग करावा हें एथें निरूपण करितो.

**मूलार्थ**— जर पिता विभाग करील तर इच्छेप्रमाणें पुत्रांस विभाग द्यावे. ज्येष्ठाला श्रेष्ठ विभाग किंवा सर्वांस समविभाग द्यावे.[२]

**टीकार्थ**— १ ज्या काळीं पिता विभाग करूं इच्छितो त्या काळीं त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें आपल्या एक, दोन अथवा बहुत पुत्रांस विभाग करून द्यावे. इच्छेस कोणत्याहि प्रकारचा प्रतिबंध नाहीं म्हणून विभागांविषयीं कोणता नियम राहणार नाहीं ह्यास्तव नियम सांगतो.

(पित्यानें आपल्या इच्छेप्रमाणें पुत्रांस विभाग करून द्यावे.)

२ ज्येष्ठ पुत्रास श्रेष्ठ ( मोठा ) विभाग, मध्यमास मध्यमविभाग, कनिष्ठाला कनिष्ठविभाग देऊन विभक्त करावें, अथवा सर्वांस समविभागी करावें.

(ज्येष्ठास श्रेष्ठ, मध्यमास मध्यम, कनिष्ठाला कनिष्ठ विभाग.)

---

१ पूर्वी १ ल्या शाखेच्या पांचव्या अंकांत विभाग करण्याचा काळ कोणता व कशाचा विभाग वगैरेचें निरूपण त्या त्या ठिकाणीं केलें; असें सांगून कशाचा विभाग ह्या विषयाचें मात्र एथपर्यंत निरूपण केलें. बाकी राहिल्या विषयाचें एथें निरूपण करितो. २ वचनांत पूर्वार्धांत जो इच्छेनें विभाग सांगितला त्याचेंच उत्तरार्धेंकरून विवरण केलें. म्हणजे असें:— उत्तरार्धांत सांगितलेले जे दोन पक्ष त्यांविषयींच इच्छेला नियमविधि संभवत असतां ह्या दोहोंपेक्षां खेरीज इच्छेला स्वातंत्र्याचा संबंध नाहीं. तात्पर्य हें कीं, वांटे करण्याचे दोन पक्ष सांगितले त्या दोन पक्षांत मात्र पित्याची इच्छा, दोहों पक्षांबाहेर पित्याची इच्छा स्वतंत्र नाहीं. आणि असें न केलें तर वाक्यभेददोष येतो, आणि एकाला लक्ष रुपये, दुसऱ्याला कपर्दिका ( कवडी ) व तिसऱ्यास अगदींच कांहीं नाहीं अशी अव्यवस्थाहि होईल. वाक्यभेद म्हणजे वाक्याचा उद्देश्यविधेयभावघटित एक अर्थ होत असतां ते उद्देश्यविधेय बदलून अनेक वाक्यार्थ करणें, हा वाक्यभेद, मीमांसक दोष मानितात. व्यवहारमयूख.

श्रेष्ठ, मध्यम इत्यादि विभागाचे प्रकार मनु सांगतो.

**मनु**– ज्येष्ठ पुत्राला सर्व समाईक द्रव्यांतून विसावा अंश ( शेकडा ५ ) उद्धार व सर्व द्रव्यांत जें श्रेष्ठ असेल तें, मधल्याला त्याचें अर्ध, कनिष्ठास चतुर्थांश. ( बाकीचें द्रव्य समान विभागून वारसांस वांटून द्यावें ).

( मूळवचनांत ) जो 'वा'शब्द आहे तो दुसऱ्या पक्षाविषयीं आहे. अथवा ज्येष्ठ वगैरे सर्व पुत्रांस समविभाग देऊन विभक्त करावें.

हा जो विषम विभाग सांगितला तो स्वतः संपादित द्रव्याविषयीं. वडिलोपार्जित द्रव्याविषयीं तर पितापुत्रांची सत्ता सारखीच आहे असें पुढें ( ११ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितलें आहे, म्हणून पित्याच्या इच्छेप्रमाणें जो विषमविभाग सांगितला तो योग्य नाहीं.

हा विषमविभाग स्वसंपादित द्रव्याविषयीं.

३ १ ल्या अंकाचे मूळवचनांत " जर पिता विभाग करील " असें सांगितल्यावरून ज्या कालीं पित्याला विभाग करण्याची इच्छा होईल तो एक विभागकाल होतो, आणि पिता जिवंत असतां द्रव्याविषयीं निस्पृह व **निवृत्तरमण** आहे किंवा माता **निवृत्तरजस्क** आहे तर पित्याची विभाग करण्याची इच्छा नसली तरी पुत्रांच्या इच्छेंकरून विभाग होतो.

पिता जीवंत असतां विभाग करूं इच्छितो तो एक विभागकाल.

**नारद**– माता पिता मरण पावल्यानंतर पित्याची जिंदगी पुत्रांनीं सारखी वांटून घ्यावी, " अशी मातापित्यांच्यामागें विभागव्यवस्था दाखवून " ( मातापिता जिवंत असतांहि ) माता **निवृत्तरजस्क** असून बहिणींचीं लग्नें झालीं असतां, किंवा पिता निवृत्तरमण, किंवा द्रव्याविषयीं निस्पृह झाला असून बहिणींचीं लग्नें झालीं असतां पुत्रांनीं विभाग करावा, " असें सांगितलें."

येथेंहि पुत्रांनीं जिंदगी समान विभागून घ्यावी, असा वरच्या स्मृतीवरून संबंध येतो.

**गौतमहि** पितृमरणानंतर पुत्रांनीं जिंदगी वांटून घ्यावी, " असें सांगून " माता निवृत्तरजस्क झाली असतां, " दुसरा विभागकाळ दाखविला, " पिता जिवंत असतांहि जर विभाग करायास इच्छितो तर, " तो तिसरा विभागकाळ."

४ तसेंच माता सरजस्क व पिता ( विभाग करण्यास ) इच्छीत नाहीं, आणि अधर्मवर्ती अथवा महारोगग्रस्त आहे तर पुत्रांच्या इच्छेनें विभाग होतो. ह्यास प्रमाण.

**शंख**– पिता निवृत्तरमण, वृद्ध, अधर्मवर्ती, अथवा महारोगग्रस्त, झाला असतां ( पुत्रांच्या इच्छेनें ) जिंदगीचा विभाग होतो. ११४

---

**यदि कुर्यात्समानंशान् पत्न्यः कार्याः समांशिकाः ।**
**न दत्तं स्त्रीधनं यासां भर्त्रा वा श्वशुरेण वा ॥ ११५ ॥**

---

१ त्याचें अर्ध म्हणजे चाळिसावा भाग ( शेकडा २॥ ) व सर्व द्रव्यामध्यें जें मध्यम असेल तें. कनिष्ठाला चतुर्थांश म्हणजे समाईक द्रव्यांतून ऐशींवा भाग ( शेकडा १। ) व कनिष्ठ द्रव्य असेल तें, याप्रमाणें समजावें.

**पितुरिच्छया विभागो द्विधा दर्शितः। समो विषमश्च तत्र समविभागे विशेषमाह॥ यदा स्वेच्छया पिता सर्वानेव सुतान् समविभागिनः करोति तदा पत्न्यश्च पुत्रसमांशभाजः कर्तव्याः। यासां पत्नीनां भर्त्रा श्वशुरेण वा स्त्रीधनं न दत्तं। दत्ते तु स्त्रीधनेऽर्द्धांशं वक्ष्यति॥ दत्ते त्वर्द्धं प्रकल्पयेदिति। यदा तु श्रेष्ठभागादिना ज्येष्ठादीन् विभजति तदा पत्न्यः श्रेष्ठादिभागाश्च लभन्ते किंतूद्धृतोद्धारात्समुदायात्समानेवांशान् लभन्ते स्वोद्धारं च। यथाहापस्तम्बः। परीभाण्डं च गृहेलङ्कारो भार्याया इति॥ ११५॥**

शाखा ४ थी.

पित्याच्या इच्छेनें विभाग दोन प्रकारचा सांगितला. सम आणि विषम. त्यांत समविभागाविषयीं विशेष सांगतो.

**मूलार्थ**— जर पुत्रांस समविभाग देईल तर पत्नींलाहि समविभाग द्यावे. परंतु ज्यांला नवऱ्यानें किंवा सासऱ्यानें स्त्रीधन दिलें नाहीं त्यांस.

स्त्रियांसहि पुत्रांबरोबर विभाग द्यावे.

**टीकार्थ**— जर पिता स्वेच्छेनें सर्व पुत्रांस सारखे वांटे देतो तर आपल्या पत्नींसहि पुत्रांच्या वांट्याबरोबर समविभाग द्यावे. परंतु ज्या पत्नींला नवऱ्यानें किंवा सासऱ्यानें स्त्रीधन दिलें नसेल त्यांस. स्त्रीधन दिलें असेल तर अर्धा विभाग द्यावा असें पुढें ( ३३ व्या शाखेच्या ८ व्या अंकांत ) सांगितलें आहे.

२ जर कदाचित् पिता ज्येष्ठ पुत्राला श्रेष्ठ विभाग इत्यादि पूर्वोक्त विचाराप्रमाणें ज्येष्ठादि पुत्रांस विभाग करून देतो तर स्त्रियांसहि श्रेष्ठमध्यमादि विभाग मिळणार नाहीं, केवळ उद्धार काढून बाकी राहिलेल्या समाईक द्रव्यांतून समविभागच मिळेल व आपला उद्धारहि मिळेल. तो उद्धार आपस्तम्ब सांगतो.

**आपस्तम्ब**— घरांतील परीभाण्ड व अलंकार हे भार्येचे. ११५

---

## शक्तस्यानीहमानस्य किंचिद्दत्वा पृथक् क्रिया।

ज्येष्ठं वा श्रेष्ठभागेन सर्वे वा स्युः समांशिन इति पक्षद्वयेऽप्यपवादमाह॥ स्वयमेव द्रव्यार्जनसमर्थस्य पितृद्रव्यमनीहमानस्यानिच्छतो यत्किंचिदसारमपि दत्वा पृथक्क्रिया विभागः कार्यः पित्रा। तत्पुत्रादीनां दायजिघृक्षा मा भूदिति॥

शाखा ५ वी.

ज्येष्ठाला श्रेष्ठ विभाग अथवा सर्वांला समविभाग द्यावे, असे दोन पक्ष (तिसऱ्या शाखेच्या २ ऱ्या अंकांत ) सांगितले त्या उभयपक्षींहि अपवादक वचन सांगतो.

**मूलार्थ**— स्वतां समर्थ अतएव पितृद्रव्य घेऊं इच्छीत नाहीं तर त्याला यत्किंचित् तरी देऊन फारखत करून घ्यावी.

टीकार्थ– जो ( पुत्र किंवा भ्राता ) स्वतां द्रव्यसंपादनाविषयीं समर्थ असल्यामुळें पित्याचें द्रव्य घेऊं इच्छीत नाहीं तर त्याला कांहीं हलक्या किंमतीची वस्तू देऊन फारखत करून घ्यावी. कारण, पुढें त्याच्या पुत्रादिकांस वांटा घेण्याची इच्छा न व्हावी.

**न्यूनाधिकविभक्तानां धर्म्यः पितृकृतः स्मृतः ॥ १६॥**

ज्येष्ठं वा श्रेष्ठभागेनेति न्यूनाधिकविभागो दर्शितः तत्र शास्त्रोक्तोद्धारादिविषमविभागव्यतिरेकेणान्यथाविषमविभागनिषेधार्थमाह ॥

न्यूनाधिकविभागेन विभक्तानां पुत्राणामसौ न्यूनाधिकविभागो यदि धर्म्यः शास्त्रोक्तो भवति तदासौ पितृकृतः कृतएव न निवर्त्तते इति मन्वादिभिः स्मृतः। अन्यथा तु पितृकृतोऽपि निवर्त्तते इत्यभिप्रायः॥ यथाह नारदः ॥ व्याधितः कुपितश्चैव विषयासक्तमानसः। अन्यथाशास्त्रकारी च न विभागे पिता प्रभुरिति ११६

३ ऱ्या श्लोकाच्या २ ऱ्या अंकांत जो विषम विभाग सांगितला त्यांत शास्त्रोक्त जो उद्धारादि विषम विभाग त्याखेरीज ऐच्छिक विषम विभागाविषयीं ( अर्ध्या वचनेंकरून ) निषेध सांगतो.

मूलार्थ– विषम विभागेंकरून विभक्त झालेले जे त्यांचा तो विषम विभाग जर धर्मशास्त्रप्रमाणें आहे तर पित्यानें केलेला विषम विभाग उलटत नाहीं.

टीकार्थ– न्यूनाधिक विभागेंकरून विभक्त जे पुत्र त्यांचा तो विषम विभाग जर धर्मशास्त्रप्रमाणें आहे तर तो पित्यानें केला तो केलाच, उलटत नाहीं, असें मन्वादिक ऋषींनीं सांगितलें आहे. जर तो विषम विभाग धर्मशास्त्रप्रमाणें नसेल तर पित्यानें केलेला असला तरी उलटतोच.

बापानें केलेला विभाग धर्मशास्त्रप्रमाणें नसल्यास उलटतो.

नारद– व्याधित, कुपित, व ज्याचें अंतःकरण विषयासक्त आणि शास्त्रविपरीत करणारा असा पिता विभाग करण्याविषयीं अधिकारी होत नाहीं. ११६

---

इदानीं विभागस्य कालान्तरं कर्त्रन्तरं प्रकारनियममाह ॥

**विभजेरन्सुताः पित्रोरूर्ध्वं रिक्थमृणं समम्।**

पित्रोर्मातापित्रोरूर्ध्वं प्रयाणादिति कालो दर्शितः। सुता इति कर्त्तारो दर्शिताः। सममिति प्रकारनियमः। सममेवेति रिक्थमृणं च विभजेरन्। ननूर्ध्वं पितुश्च मातुश्चेत्युपक्रम्य ज्येष्ठ एव तु गृह्णीयात्पित्र्यं धनमशेषतः। शेषास्तमुपजीवेयुर्यथैव पितरं तथेत्युक्तोक्तम् ज्येष्ठस्य विंश उद्धारः सर्वद्रव्याच्च यद्वरम्। ततोऽर्द्धं मध्यमस्य स्यात्तुरीयं तु यवीयस इति। सर्वस्माद्धनसमुदायाद्विंशतिमो भागः सर्वद्रव्येभ्यश्च यच्छ्रेष्ठं तज्ज्येष्ठाय दातव्यम्। तदर्द्धं चत्वारिंशत्तमो भागो मध्यमं च द्रव्यं

मध्यमाय दातव्यम्। तुरीयमशीतितमो भागो हीनं द्रव्यं च कनिष्ठाय दातव्यमिति। मातापित्रोरूर्ध्वं विभजतामुद्धारविभागो मनुना दर्शितः। तथा। उद्धारेऽनुद्धृते त्वेषामियं स्यादंशकल्पना। एकाधिकं हरेज्ज्येष्ठः पुत्रोऽध्यर्द्धं ततोऽनुजः। अंशमंशं यवीयांस इति धर्मो व्यवस्थित इति। ज्येष्ठस्य द्वौ भागौ तदनन्तरजातस्य सार्द्ध एको भागः ततोऽनुजानामेकैको विभाग इत्युद्धारव्यतिरेकेणापि विषमो विभागो दर्शितः। पित्रोरूर्ध्वं विभजतां जीवद्विभागे च स्वयमेव विषमो विभागो दर्शितो ज्येष्ठं वा श्रेष्ठभागेनेति। अतः सर्वस्मिन्नपि काले विषमो विभागोऽस्तीति कथं सममेव विभजेरन्निति नियम्यते। अत्रोच्यते। सत्यम्। अयं विषमो विभागः शास्त्रदृष्टस्तथापि लोकविद्विष्टत्वान्नानुष्ठेयः। अस्वर्ग्यं लोकविद्विष्टं धर्म्यमप्याचरेन्न त्विति निषेधात्। यथा। महोक्षं वा महाजं वा श्रोत्रियायोपकल्पयेदिति विधानेऽपि लोकविद्विष्टत्वादननुष्ठानम्। यथा वा मैत्रावरुणीं गां वशामनुबन्ध्यामालभेत इति गवालम्भनविधानेऽपि लोकविद्विष्टत्वादननुष्ठानम्। उक्तं च। यथा नियोगधर्मो नो नानुबन्ध्यावधोऽपि वा। तथोद्धारविभागोऽपि नैव संप्रति वर्तत इति। आपस्तम्बोऽपि। जीवन्पुत्रेभ्यो दायं विभजेत्सममिति समतामुक्त्वा ज्येष्ठो दायाद इत्येक इति कृत्स्नधनग्रहणं ज्येष्ठस्यैकीयमतेनोपन्यस्य देशविशेषे सुवर्णं कृष्णा गावः कृष्णं भौमं ज्येष्ठस्य रथः पितुः परीभाण्डं च गृहेऽलङ्कारो भार्याया ज्ञातिधनं चेत्येक इत्येकीयमतेनैवोद्धारविभागं दर्शयित्वा तं शास्त्रविप्रतिषिद्धमिति निराकृतवान्। तं च शास्त्रविप्रतिषेधं स्वयमेव दर्शयतिस्म मनुः। पुत्रेभ्यो दायं विभजेदित्यविशेषेण श्रूयते इति। तस्माद्विषमो विभागः शास्त्रदृष्टोऽपि लोकविरोधाच्छ्रुतिविरोधाच्च नानुष्ठेय इति सममेव विभजेरन्निति नियम्यते॥

## शाखा ६ वी.

आतां विभाग करण्याविषयीं ( पूर्वीं सांगितले त्यांखेरीज ) आणखी दुसरा काळ व दुसरा कर्ता आणि कसा करावा त्याचा नियम ( पूर्वार्धेंकरून ) सांगतो.

**मूलार्थ**—माता, पिता निवर्तल्यावर पुत्रांनीं जिंदगी व कर्ज हीं समविभाग वांटून घ्यावीं.

**टीकार्थ**—१ माता, पिता निवर्तल्यावर "हा विभागकाळ दाखविला," पुत्रांनीं "हा अधिकारनियम दाखविला," त्यांची जिंदगी व कर्ज हीं समविभाग वांटून घ्यावीं, हा प्रकारनिमय सांगितला.

मातापिता यांच्या पाठीमागें जिंदगी व कर्ज हीं समान वांटून घ्यावीं.

**मनु–शंका**—२ मातेच्या व पित्याच्या पाठीमागें "असा उपक्रम करून" ज्येष्ठानेंच पित्याची सर्व जिंदगी घ्यावी. आणि इतरांनीं पित्याच्या आज्ञेंत राहिल्याप्रमाणें भ्रात्याच्या आज्ञेंत राहून उपजीवन करावें. "असें सांगून" सर्व समाईक द्रव्यांतून विसावा अंश उद्धार व सर्व द्रव्यांत जें श्रेष्ठ असेल तें ज्येष्ठाला, मधल्याला त्यापेक्षां अर्धें आणि कनिष्ठाला तर चतुर्थांश. ( याप्रमाणें विभाग करावे. )

सर्व समाईक द्रव्यांतून विसावा अंश ( शेंकडा ५ ) **उद्धार** व सर्व द्रव्यांत जें श्रेष्ठ असेल तें ज्येष्ठ पुत्रास द्यावें, मधल्याला त्यापेक्षां अर्धें ह्मणजे चाळीसावा अंश ( शेंकडा २॥ ) **उद्धार** व मध्यम द्रव्य द्यावें, आणि कनिष्ठाला चतुर्थांश ह्मणजे ऐंशीवा हिसा ( शेंकडा १।) **उद्धार** व हीनद्रव्य द्यावें, असा मनूनें मातापिता मरण पावल्यानंतर विभाग करणारे जे ( पुत्रादिक ) त्यांस उद्धारविभाग सांगितला आहे. तसेंच,

**मनु**— जर ( समाईक द्रव्यांतून ) उद्धार न काढिला तर विभागयोजना अशी कीं, ज्येष्ठपुत्रानें विभागापेक्षां एक अंश अधिक घ्यावा, त्याच्या कनिष्ठानें अर्धा अंश अधिक घ्यावा, इतर कनिष्ठांनीं एकेकच हिसा घ्यावा. अशी विभागाची व्यवस्था धर्मशास्त्रप्रमाणें होय.

म्हणजे ज्येष्ठपुत्रास दोन भाग, त्याच्या पाठीमागून झालेल्यास दीडभाग, इतरांस एकेकच भाग. असा मातापित्यांच्या मागें विभाग करणारांस **उद्धार**विभागावांचूनहि विषमविभाग मनूनें दाखविला व माता पिता जिवंत असतां तर ( ३ ऱ्या शाखेच्या २ ऱ्या अंकांत ) स्वतां ( याज्ञवल्क्यानें )हि विषमविभाग दाखविला आहे.

असा विषमविभाग सर्वकालिक असतां समानच वांटे करावे असा नियम कसा केला ?

**समाधान**— ३ हा ( वर सांगितलेला ) विषमविभाग शास्त्रविहित खरा तथापि लोकविरुद्ध आहे ह्मणून तो आचरूं नये.

विषमविभाग लोकविरुद्ध म्हणून आचरूं नये.

**स्मृति**— जें धर्मशास्त्रप्रमाणें असून लोकविरुद्ध आहे तें आचरूं नये, कारण, त्यापासून स्वर्ग प्राप्त होणार नाहीं. उदाहरण.

**याज्ञवल्क्य**— **श्रोत्रिय** घरीं आला असतां (त्याची मधुपर्कपूजा करण्याचेसमयीं) मोठा धुरीण बैल किंवा मोठा बोकड त्याला अर्पण करावा.

असें विधान सांगितलें आहे तथापि तें कर्म लोकविरुद्ध आहे म्हणून कोणी आचरण करीत नाहीं. अथवा

**श्रुति**— मित्रावरुण जीची देवता आहे व जी अनुबंध्या नामानें प्रसिद्ध त्या वांझणी गाईचा वध करावा. याप्रमाणें (यज्ञप्रकरणीं श्रुतिवचनेंकरून) गवालम्भनविधि सांगितला आहे खरा, परंतु तो लोकविरुद्ध आहे यास्तव करण्यांत येत नाहीं.

**स्मृति**— जसा नियोगधर्म व अनुबंध्या गाईचा वध हीं सांप्रत ( कलीमध्यें ) नाहींत, तसा **उद्धार**विभागही सांप्रत चालत नाहीं.

**आपस्तंबहि**— पिता जिवंत असतां त्यानें पुत्रांस जिंदगी वांटून द्यावी, " असें स्वमत सांगून " ज्येष्ठपुत्रच जिंदगीचा वारस असें कोणी ह्मणतात. " ज्येष्ठाला सर्व धन घेण्याचा एकीयमतानें उपन्यास करून " देशविशेषीं सुवर्ण, काळ्या गाई, कृष्णं[1] भौम, हीं

---

१ कृष्णभौम म्हणजे भूमीपासून झालेलें माषादि धान्य किंवा कृष्णायस.

ज्येष्ठाचीं, रथ[1] पित्याचा, आणि घरांतील परीभांड व अलंकार भार्येचे आणि ज्ञाति[2] धन असा एकीय मतानें उद्धारविभाग सांगून तो शास्त्रनिषिद्ध आहे असें निराकरण करिता झाला.

तो शास्त्रनिषेध मनु स्वतांच दाखवितो.

मनु– पुत्रांस जिंदगी वांटून द्यावी असें सामान्यतः श्रुत आहे.

तस्मात् विषमविभाग जरी शास्त्रविहित आहे तथापि लोकविरुद्ध व स्मृतिविरुद्ध आहे ह्मणून तो आचरूं नये. अतएव समच विभाग करावे असें नियमित केलें.

## मातुर्दुहितरः शेषमृणा

मातापित्रोर्धनं सुता विभजेरन्नित्युक्तं तत्र मातृधनेपवादमाह । मातुर्धनं दुहितरो विभजेरन् । ऋणाच्छेषं मातृकृतर्णापाकरणावशिष्टं अतश्चर्णसमं न्यूनं वा मातृधनं वा सुता विभजेरन्नित्यस्य विषयः । एतदुक्तं भवति । मातृकृतमृणं पुत्रैरेवापाकरणीयं न दुहितृभिः ऋणावशिष्टं तु धनं दुहितरो गृह्णीयुरिति युक्तं चैतत् । पुमान्पुंसोऽधिके शुक्रे स्त्री भवत्यधिके स्त्रिया इति स्त्र्यवयवानां दुहितृषु बाहुल्यात् स्त्रीधनं दुहितृगामि पितृधनं पुत्रगामि पित्रवयवानां पुत्रेषु बाहुल्यादिति । तत्र च गौतमेन विशेषो दर्शितः । स्त्रीधनं दुहितृणामप्रमत्तानामप्रतिष्ठितानां चेति । अस्यार्थः । प्रत्ताऽप्रत्तासमवायेऽप्रत्तानामेव स्त्रीधनं । प्रत्तासु चाप्रतिष्ठिताप्रतिष्ठितासमवायेऽप्रतिष्ठितानां चेति । अप्रतिष्ठिता निर्धनाः ॥

शाखा ७ वी.

मातापितरांचें धन पुत्रांनीं वांटून घ्यावें असें ( ६ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितलें, त्यांत मातेच्या धनाविषयीं अपवाद सांगतो.

मूलार्थ– कर्ज फिटून राहिलेलें मातेचें धन कन्यांनीं वांटून घ्यावें.

टीकार्थ– १ मातेनें केलेलें कर्ज फिटून बाकी राहिलेलें मातेचें धन कन्यांनीं वांटून घ्यावें. ह्यास्तव कर्ज फिटण्यापुरतेंच किंवा त्यापेक्षांहि कमी जर मातेचें धन असेल तर पुत्रांनीं वांटून घ्यावें. ह्मणजे असें;– मातेनें केलेलें कर्ज पुत्रांनींच फेडावें, कन्यांनीं फेडूं नये. कर्ज फिटून राहिलेलें मातृधन तर कन्यांनीं घ्यावें, हें युक्तच आहे; कारण,

मातेचें धन कन्यांनीं वांटून घ्यावें.

स्मृति– ( गर्भधारणसमयीं ) पुरुषाचें वीर्य अधिक असेल तर पुत्र होतो आणि स्त्रीचें वीर्य अधिक होईल तर कन्या होते.

ह्यास्तव स्त्रीचे अवयव कन्येचे ठायीं अधिक आहेत ह्मणून स्त्रीधन कन्यांकडे जातें. पित्याचे अवयव पुत्रांचे ठायीं अधिक आहेत म्हणून पित्याचें धन पुत्रांकडे जातें.

---

१ रथ पित्याचा, येथें कोणी म्हणतात कीं पित्याचा रथ म्हणजे पिता जो रथ वापरीत होता तो ज्येष्ठ पुत्रानें घ्यावा. परंतु वचनानें तात्पर्य पाहिलें असतां रथ पित्याचा म्हणजे पित्याचा जो रथ असेल तो त्याच्या उद्देशानें धर्म करावा, असा अर्थ बरा. रथशब्देंकरून आणखीहि जें त्याचें वाहन असेल तें घ्यावें.–सुबोधिनी.

२ ज्ञातिधन म्हणजे आईबाप वगैरे ह्यांस जें पिता वगैरेपासून मिळालें असेल तें, तें ज्येष्ठपुत्र, पिता, भार्या ह्यांनीं वांटून घ्यावें.–सुबोधिनी.

ह्याविषयीं गौतम विशेष सांगतो.

**गौतम**– २ स्त्रीधन, अविवाहित व निर्धन अशा कन्यांकडे जातें.

स्त्रीधन अविवाहित कन्यांनीं घ्यावें.

**वरील स्मृतीचा अर्थ**– कांहीं कन्या विवाहित व कांहीं अविवाहित अशा असतां अविवाहित कन्यांनींच स्त्रीधन घ्यावें. सर्व विवाहित असतां त्यांत ज्या निर्धन असतील त्यांनीं घ्यावें.

**ताभ्य ऋतेऽन्वयः ॥ ११७ ॥**

**दुहित्रभावे मातृधनमृणावशिष्टं को गृह्णीयादित्यत आह । ताभ्यो दुहितृभ्यो विना दुहितृणामभावे अन्वयः पुत्रादिर्गृह्णीयात् । एतच्च विभजेरन् सुताः पित्रोरूर्ध्वमित्यनेनैव सिद्धं स्पष्टार्थमुक्तम्** ॥ ११७ ॥

कन्या नसतील तर, कर्ज फिटून शेष राहिलेलें मातेचें धन कोणी घ्यावें हें सांगतो.

**मूलार्थ**– कन्या नसतील तर पुत्रादिकांनीं घ्यावें.

**टीकार्थ**– ३ कन्या नसतील तर मातृधन पुत्रादिकांनीं घ्यावें. हें ( ६ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे वचनावरून ) सिद्धच आहे, तथापि स्पष्टप्रतिपत्त्यर्थ पुनः सांगितलें. ११७

कन्यांच्या अभावीं पुत्रादिक घेतील.

---

अविभाज्यमाह ॥

**पितृद्रव्याविरोधेन यदन्यत्स्वयमार्जितम् ।**
**मैत्रमौद्वाहिकं चैव दायादानां न तद्भवेत् ॥ ११८ ॥**
**क्रमादभ्यागतं द्रव्यं हृतमप्युद्धरेत्तु यः ।**
**दायादेभ्यो न तद्दद्याद्विद्यया लब्धमेव च ॥ ११९ ॥**

मातापित्रोर्द्रव्याविनाशेन यत्स्वयमर्जितं मैत्रं मित्रसकाशाद्यल्लब्धं औद्वाहिकं विवाहलब्धं दायादानां भ्रातृणां तन्न भवेत् । क्रमात्पितृक्रमादायातं यत् किंचित् द्रव्यं अन्यैर्हृतमसामर्थ्यादिना पित्रादिभिरनुद्धृतं यः पुत्राणां मध्ये इतराभ्यनुज्ञयोद्धरति तद्दायादेभ्यो भ्रात्रादिभ्यो न दद्यात् । उद्धर्तैव गृह्णीयात् । तत्र क्षेत्रे तुरीयांशमुद्धर्ता लभते शेषं तु सर्वेषां सममेव । यथाह शंखः। पूर्वं नष्टां तु यो भूमिमेकश्चेदुद्धरेत्क्रमात् । यथाभागं लभन्तेऽन्ये दत्वांशं तु तुरीयकमिति । क्रमादभ्यागतमिति शेषः । तथा विद्यया वेदाध्ययनेनाध्यापनेन वेदार्थव्याख्यानेन वा यल्लब्धं तदपि दायादेभ्यो न दद्यात् । अर्जक एव गृह्णीयात् । अत्र च पितृद्रव्याविरोधेन यत्किंचित्स्वयमर्जितमिति सर्वत्र शेषः । अतश्च पितृद्रव्याविरोधेन यन्मैत्रमर्जितं पितृद्रव्याविरोधेन यदौद्वाहिकं पितृद्रव्याविरोधेन यत्क्रमादायातमुद्धृतं पितृद्रव्यावि-

रोधेन विद्यया यल्लब्धमिति प्रत्येकमभिसंबध्यते। तथा च पितृद्रव्यविरोधेन प्रत्युपकारेण यन्मैत्रं। आसुरादिविवाहेषु यल्लब्धं । तथा पितृद्रव्यव्ययेन यत्क्रमायातमुद्धृतं तथा पितृद्रव्यव्ययेन लब्धया विद्यया यल्लब्धं तत् सर्वं सर्वैर्भ्रातृभिः पित्रा च विभजनीयम् । तथा पितृद्रव्याविरोधेनेत्यस्य सर्वशेषत्वादेव पितृद्रव्याविरोधेन प्रतिग्रहलब्धमिति विभजनीयम् । अस्य च सर्वशेषत्वाभावे मैत्रमौद्वाहिकमित्यादिना लब्धव्यम् । अथ पितृद्रव्यविरोधेनापि यन्मैत्रादिलब्धं तस्याविभाज्यत्वायन्मैत्रादिवचनमित्यर्थवदित्युच्यते । तथा सति समाचारविरोधः विद्यालब्धे नारदवचनविरोधश्च ॥ कुटुम्बं बिभृयाद्भ्रातुर्यो विद्यामधिगच्छतः। भागं विद्याधनात्तस्मात्स लभेताश्रुतोपि सन्निति । तथा विद्याधनस्याविभाज्यस्य लक्षणमुक्तं कात्यायनेन। परभक्तोपयोगेन विद्या प्राप्तान्यतस्तु या । तया लब्धं धनं यत्तु विद्याप्राप्तं तदुच्यत इति । तथा पितृद्रव्याविरोधेनेत्यस्य भिन्नवाक्यत्वे प्रतिग्रहलब्धस्याविभाज्यत्वमाचारविरुद्धमापद्येत । एतदेव स्पष्टीकृतं मनुना । अनुपघ्नन् पितृद्रव्यं श्रमेण यदुपार्जयेत् । दायादेभ्यो न तद्दद्याद्विद्यया लब्धमेव चेति । श्रमेण सेवया युद्धादिना। ननु पितृद्रव्याविरोधेन यन्मैत्रादिलब्धं द्रव्यं तदविभाज्यमिति न वक्तव्यं ।विभागप्राप्त्यभावात् । यद्येन लब्धं तत्तस्यैव नान्यस्येति प्रसिद्धतरम् । प्राप्तिपूर्वकश्च प्रतिषेधः ।

### शाखा ८ वी.

अविभाज्य धन कोणतें हें सांगतो.

**मूलार्थ**— मातापितरांचें द्रव्य खर्च न होतां जें कांहीं स्वतां संपादिलेलें, मित्रापासून मिळालेलें, विवाहलब्ध हें भ्रात्यांस मिळणार नाहीं; आणि परंपरागत द्रव्य जें दुसऱ्यांनीं हरण केलेलें संपादिलें जातें तें व विद्यालब्ध हीं भ्रात्यांस देऊं नयेत.

**टीकार्थ**—१ मातापितरांचें द्रव्य खर्च झाल्यावांचून जें स्वतां संपादिलेलें, मित्रापासून लब्ध, आणि विवाहलब्ध, असें जें धन तें भ्रात्यांस मिळणार नाहीं.

स्वतां संपादिलेल्या द्रव्याचा विभाग नाहीं.

२ तसेंच जें परंपरागत द्रव्य ( सरकारांत राहिलें अथवा जप्त ) दुसऱ्यांनीं हरण केलेलें असून पिता इत्यादिकांच्या असामर्थ्यामुळें हस्तगत न झालें तें, पुत्रांपैकीं जो कोणी इतर भ्रात्यांच्या आज्ञेनें व मातापितरांचें द्रव्य खर्च न करितां स्वपराक्रमानें हस्तगत करितो त्यानें त्या द्रव्याचा विभाग भ्रात्यांस देऊं नये, संपादकानेंच तें घ्यावें.

३ वर ( २ ऱ्या अंकांत ) सांगितल्याप्रमाणें जर क्षेत्र ( भूमि ) आहे, तर संपादकानें त्या क्षेत्राचा चतुर्थांश घेऊन बाकी क्षेत्र ( संपादकासुद्धां) इतर भ्रात्यांनीं समान वांटून घ्यावें.

हरण केलेलें क्रमागत क्षेत्र हस्तगत करणारानें चतुर्थांश अधिक घ्यावा.

**शंख**— पितापितामहानुक्रमापासून चालत आलेली भूमि पूर्वीं नष्ट झालेली पुनः जो हस्तगत करितो त्याला ( त्या भूमीचा ) चतुर्थांश देऊन ( संपादकासुद्धां ) इतर भ्रात्यांनीं यथाविभाग ती वांटून घ्यावी.

४ तसेंच माता पिता ह्यांचें द्रव्य खर्च न होतां जें विद्येकडून मिळालेलें, ह्मणजे वेदाध्ययन किंवा अध्यापन अथवा वेदार्थाचें व्याख्यान ह्यांकडून मिळालें तेंहि भ्रात्यांस देऊं नये; तें संपादकानेंच घ्यावें.

विद्यासंपादित धनाचा विभाग नाहीं.

५ अर्थात् मातापितरांचें द्रव्य खर्च करून प्रत्युपकारेंकरून जें मित्रलब्ध, व मातापितरांचें द्रव्य खर्च करून जें आसुरादि विवाहांत मिळालेलें, आणि पितापितामहानुक्रमेंकरून चालत आलेलें द्रव्य, (इनलाख धर्मादाय वगैरे) पूर्वीं बुडालें असून तें मातापितरांचें द्रव्य खर्च करून जें पुनः संपादन केलेलें, तसेंच मातापित्यांचें द्रव्य खर्च करून संपादिलेल्या विद्येकडून मिळालेलें हीं सर्व धनें सर्व भ्रात्यांनीं व पित्यानें समभाग वांटून घ्यावीं.

मातापितरांचें द्रव्य खर्च करून संपादिलेलें द्रव्य सर्व भ्रात्यानीं वांटून घ्यावें.

६ "मातापितरांचें द्रव्य खर्च न होतां" (१ ला, २ रा, ३ रा, व ४ था ह्या अंकांस) ह्या वाक्याचा संबंध आहे, यास्तवच मातापितरांचें द्रव्य खर्च करून जें कांहीं दानप्रतिग्रहानें मिळालेलें द्रव्य तेंहि (सर्वांनीं) यथाविभाग वांटून घ्यावें.

७ "मातापितरांचें द्रव्य खर्च न होतां जें कांहीं संपादिलें" ह्या वाक्याचा संबंध जर सर्व वाक्यांकडे (१ ला, २ रा, ३ रा, ४ था ह्या अंकांकडे) मानिला नाहीं तर **मित्रलब्ध, विवाहलब्ध** इत्यादिक विशेषेंकरून सांगावयास नको. कारण, मातापितरांचें द्रव्य खर्च न होतां जें जें संपादिलें तें **अविभाज्य**, येणेंकरूनच मित्रलब्ध इत्यादि धनांचा संग्रह होतो.

८ मातापितरांचें द्रव्य खर्च करूनहि जें मित्रादिकांपासून मिळालें तेंहि **अविभाज्य** असें जाणविण्याकरितां **मित्रलब्ध, विवाहलब्ध** इत्यादिक वचनाचा उपयोग होतो असें म्हणावें तर तशा प्रकारचें द्रव्य विभागून घेण्याविषयीं लोकांत जो शिष्टाचार आहे त्यास विरोध येतो, व विद्याधनाविषयीं नारदानें सांगितलेल्या वचनाशींहि विरोध येतो.

**नारद**— जो भाऊ विद्याध्ययन करणाऱ्या भावांचें कुटुंब पोषण करितो तो जरी विद्याहीन असला तरी व (भ्रात्यांशीं) पूर्वीं करार केलेला नसला तरी त्या **विद्याधनाचा** विभागी होतो.

तसेंच अविभाज्य विद्याधनाचें स्वरूप कात्यायन सांगतो.

**कात्यायन**— परान्नभोजनेंकरून जी दुसऱ्यापासून विद्या संपादिली त्या विद्येकडून जें मिळालें धन तें **विद्याधन** म्हटलें आहे.

विद्याधनाचें स्वरूप.

९ तसेंच "मातापितरांचें द्रव्य खर्च न होतां जें कांहीं स्वतां संपादिलें" हें वाक्य जर निराळें मानिलें तर **प्रतिग्रहलब्ध** धनहि **अविभाज्य** आहे, तें शिष्टाचारास विरुद्ध होईल.

---

१ विवाह आठ प्रकारचे आहेत, ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस आणि पैशाच; पैकीं आसुरादि चार विवाह ब्राह्मणव्यतिरिक्तांस उक्त होत. २ एथें कोणी म्हणतात कीं, मातापितरांचें द्रव्य खर्च न करितां जें कांहीं प्रतिग्रहलब्ध झालें तेंहि वांटून घ्यावें. अशीं दोन मतें आहेत. परंतु वर लिहिलेला पक्ष युक्त दिसतो.

मनुहि हेंच स्पष्ट करून सांगतो.

मनु— मातापितरांचें द्रव्य खर्च न करितां श्रमेंकरून ह्मणजे सेवा, चाकरी, युद्ध इत्यादिकेंकरून जें संपादिलें त्याचा विभाग भ्रात्यांस देऊं नये, व विद्याधनाचाहि विभाग देऊं नये.

शंका— मातापितरांचें द्रव्य खर्च न होतां जें मित्रलब्ध, विवाहलब्ध इत्यादिक धन तें अविभाज्य आहे असें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. कारण, (अशा प्रकारच्या द्रव्याच्या) विभागाची प्राप्तिच नाहीं, व जें ज्यानें संपादिलें तें त्याचेंच, दुसऱ्याचें होत नाहीं, असें लोकांत विशेष प्रसिद्ध आहे. आणि जें करण्याविषयीं प्राप्त होतें त्याचाच निषेध शास्त्रांत होतो.

अत्र कश्चिदित्थं प्राप्तिमाह ॥ यत्किंचित्पितरि प्रेते धनं ज्येष्ठोऽधिगच्छति । भागो यवीयसां तत्र यदि विद्यानुपालिन इति ॥ ज्येष्ठो वा कनिष्ठो वा मध्यमो वा पितरि प्रेते अप्रेते वा यवीयसां वर्षीयसां चेति व्याख्यानेन पितरि सत्यसति च मैत्रादीनां विभाज्यत्वं प्राप्तं प्रतिषिध्यते इति । तदसत् । न ह्यत्र प्राप्तस्य प्रतिषेधः । किं तु सिद्धस्यानुवादोऽयम् । लोकसिद्धस्यैवानुवादकान्येव प्रायेणास्मिन्प्रकरणे वचनानि । अथवा समवेतैस्तु यत्प्राप्तं सर्वे तत्र समांशिन इति प्राप्तस्यापवाद इति सन्तुष्यतु भवान् । अतश्च यत्किंचित्पितरि प्रेते इत्यस्मिन्वचने ज्येष्ठादिपदाविवक्षया प्राप्तिरिति व्यामोहमात्रं । अतो मैत्रादिवचनैः पितुः प्रागूर्ध्वं वा विभाज्यत्वेनोक्तस्य यत्किंचित्पितरि प्रेते इत्यस्यापवाद इति व्याख्येयम् । तथान्यदप्यविभाज्यमुक्तं मनुना॥वस्त्रं पत्रमलङ्कारं कृतान्नमुदकं स्त्रियः । योगक्षेमं प्रचारं च न विभाज्यं प्रचक्षते इति । धृतानामेव वस्त्राणामविभाज्यत्वं येन धृतं तत्तस्यैव । पितृधृतानि तु पितुरूर्ध्वं विभजतां श्राद्धभोक्त्रे दातव्यानि । यथाह बृहस्पतिः । वस्त्रालङ्कारशय्यादि पितुर्यद्वाहनादिकम् । गन्धमाल्यैः समभ्यर्च्य श्राद्धभोक्त्रे समर्पयेदिति । अभिनवानि तु वस्त्राणि विभाज्यान्येव । पत्रं वाहनमश्वशिबिकादि तदपि येनारूढं तत्तस्यैव । पित्र्यं तु वस्त्रवदेव । अश्वादीनां बहुत्वे तु तद्विक्रयोपजीविनां विभाज्यत्वमेव वैषम्येण विभाज्यत्वे ज्येष्ठस्य । अजाविकं सैकशफं न जातु विषमं भजेत् । अजाविकं सैकशफं ज्येष्ठस्यैव विधीयते इति मनुस्मरणात् । अलङ्कारोपि यो येन धृतः स तस्यैव । अधृतः साधारणो विभाज्य एव । पत्यौ जीवति यः स्त्रीभिरलङ्कारो धृतो भवेत् । न तं भजेरन्दायादा भजमानाः पतन्ति त इति ॥ अलङ्कारो धृतो भवेदिति विशेषणोपादानादधृतानां विभाज्यत्वं गम्यते । कृतान्नं तण्डुलमोदकादि । तदप्यविभाज्यम् । यथासंभवं भोक्तव्यम् ॥ उदकं तूदकाधारः कूपादिः तच्च विषमं मूल्यद्वारेण न विभाज्यं पर्यायेणोपभोक्तव्यं । स्त्रियश्च दास्यो विषमा न मूल्यद्वारेण विभाज्याः पर्यायेण कर्म कारयितव्याः । अवरुद्धास्तु पित्रा स्वैरिण्याद्याः समा अपि पुत्रैर्न विभाज्याः । स्त्रीषु च संयुक्तास्वविभाग इति गौतमस्मरणात् । योगश्च क्षेमश्च योगक्षेमं । योगशब्देनालब्धलाभकारणं श्रौतस्मार्ताग्निसाध्यमिष्टं कर्म लक्ष्यते । क्षेमशब्देन ल-

ब्धपरिरक्षणहेतुभूतं बहिर्वेदिदानतडागारामनिर्माणादि पूर्तं कर्म लक्ष्यते । तदुभयं पैतृकमपि पितृद्रव्यविरोधार्जितमप्यविभाज्यं । यथाह लौगाक्षिः । क्षेमं पूर्तं योगमिष्टमित्याहुस्तत्त्वदर्शिनः । अविभाज्ये च ते प्रोक्ते शयनासनमेव चेति । योगक्षेमशब्देन योगक्षेमकारिणो राजमन्त्रिपुरोहितादय उच्यन्ते इति केचित् । छत्रचामरशस्त्रोपानत्प्रभृतय इत्यन्ये । प्रचारो गृहारामादिषु प्रवेशनिर्गममार्गः सोऽप्यविभाज्यः। यत्तूशनसा क्षेत्रस्याविभाज्यत्वमुक्तं । अविभाज्यं सगोत्राणामासहस्रकुलादपि । याज्यं क्षेत्रं च पत्रं च कृतान्नमुदकं स्त्रिय इति तद्ब्राह्मणोत्पन्नक्षत्रियादिपुत्रविषयम् । न प्रतिग्रहभूर्देया क्षत्रियादिसुताय वै । यद्यप्येषां पिता दद्यान्मृते विप्रासुतो हरेदिति स्मरणात् । याज्यं याजनकर्मलब्धं । पितृप्रसादलब्धस्याविभाज्यत्वं वक्ष्यते । नियमातिक्रमस्याविभाज्यत्वमनन्तरमेव निरासि पितृद्रव्यविरोधेन यदर्जितं तद्विभजनीयमिति स्थितम् तत्रार्जकस्य भागद्वयं वसिष्ठवचनात् । येन चैषां स्वयमुपार्जितं स्यात्स द्व्यंशमेव लभेतेति ॥ ११८ ॥ ११९ ॥

ह्या ठिकाणीं कोणी ह्या रीतीनें विभागाची प्राप्ति सांगतो.—

**स्मृति**— ११ पिता मरण पावल्यानंतर जें कांहीं द्रव्य ज्येष्ठपुत्र संपादन करितो त्यांत त्याच्या कनिष्ठ भ्रात्यांचा विभाग आहे, परंतु ते ( कनिष्ठ भ्राते ) जर विद्यासंपादन करीत असतील तर.

**वरील स्मृतीचा अर्थ**— ज्येष्ठ, मध्यम, किंवा कनिष्ठ पुत्र, पिता मरण पावला असतां किंवा जीवंत असतां जें कांहीं द्रव्य मिळवितो त्यामध्यें कनिष्ठ भ्रात्याचा किंवा ज्येष्ठ भ्रात्याचा विभाग आहे; ह्याप्रमाणें स्मृतीचा अर्थ करून पिता विद्यमान असो किंवा नसो, मित्रलब्ध इत्यादिक द्रव्याचा विभाग प्राप्त झाला अतएव त्याचा निषेध केला.

१२ **समाधान**— वर केलेली शंकाच सयुक्त नाहीं; कारण, " भ्रात्यांस देऊं नये." असा येथें ( १ ल्या अंकाचे वचनांत ) निषेध सांगितला तो विभाग प्राप्त झाल्यामुळें सांगितला असें नव्हे, केवळ लोकसिद्धाचाच एथें अनुवाद केला; कारण, ह्या प्रकरणीं जीं वचनें आहेत तीं प्रायः लोकरूढीचींच अनुवादक आहेत.

अथवा ( समाधानाविषयीं दुसरा पक्ष.)

**स्मृति**— १३ अविभक्तांनीं जें संपादिलें त्याविषयीं सर्व समभागी होतात.

अशा प्रकारें विभागप्राप्तीविषयीं प्राप्त झालेल्या स्मृतीचें हें ( १ ल्या अंकाचें मूळवचन ) अपवादकवचन आहे असें समजून तुह्मीं संतुष्ट व्हावें.

१४ ह्यास्तव " पिता मरण पावल्यानंतर जें कांहीं द्रव्य ज्येष्ठ पुत्र संपादन करितो " ह्या ( ११ व्या अंकांतल्या ) स्मृतींतील ज्येष्ठादि पदें अविवक्षित स्वार्थपर ( ह्मणजे वास्तवार्थ सोडून ऐच्छिक अर्थाची कल्पना करून ) भ्रात्यांस विभागप्राप्ति आहे असें स-

१ ज्येष्ठादि पदें अविवक्षित स्वार्थपर म्हणजे ज्येष्ठपदबोध्य जो आपला अर्थ तत्परत्व ज्येष्ठादि पदांस न मानतां केवळ मध्यम कनिष्ठ ह्या अर्थांनींहि उपलक्षक होतात. ह्याप्रमाणेंच कनिष्ठादि पदें जाणावीं.

मजणें हा केवळ व्यामोह मात्र होय. वास्तव मित्रलब्ध, विवाहलब्ध इत्यादि ( १ ल्या अंकांतील ) वचनेंकरून सांगितलेलें जें, पिता जीवंत असतां किंवा मेल्यावर धनाविषयीं अविभाज्यत्व, त्याचें, " पिता मरण पावल्यानंतर जें कांहीं द्रव्य ज्येष्ठ पुत्र संपादन करितो त्यांत कनिष्ठ भ्रात्यांचा विभाग आहे;" हें ( ११ व्या अंकाचें ) स्मृतिवचन अपवादक आहे, असी व्याख्या करावी.

### शाखा ९ वी.

तशींच आणखी अविभाज्य द्रव्यें मनु सांगतो.

**मनु**– पत्र, वस्त्र, अलंकार, कृतान्न, उदक, स्त्रिया, योग, क्षेम, प्रचार, हीं अविभाज्य द्रव्यें ह्मटलीं आहेत.

**अर्थ**–१ वापरलेलीं मात्र वस्त्रें अविभाज्य. कारण, जें ज्यानें वापरलें तें त्याचेंच, दुसऱ्याचें नव्हे. पित्यानें वापरलेलीं ( वस्त्रादिक ) तर पिता मरण पावल्यावर विभाग करणाऱ्या पुत्रादिकांनीं पितृश्राद्धीं भोजन करणारा जो ब्राह्मण त्यास द्यावीं.

जें ज्यानें वापरलें तें त्याचें, त्याचा विभाग नाहीं.

**बृहस्पति**– वस्त्र, अलंकार, शय्या, वाहन इत्यादिक जें पित्याचें असेल तें, पिता मरण पावल्यानंतर गंधपुष्पादिकेंकरून पुजून पितृश्राद्धीं भोजन करणारे ब्राह्मणास अर्पावें.

जीं नवीं ( कोणी वापरलेलीं नव्हत अशीं ) वस्त्रें आहेत तीं तर विभाज्यच होतात, म्हणजे तीं विभागून घ्यावीं.

२ पत्र म्हणजे वाहन, म्हणजे घोडा, पालखी वगैरे जें ज्याचें बसायाचें असेल तें त्याचेंच ( त्याचा विभाग नाहीं ). पित्याचें असल्यास त्याचा वर सांगितल्या वस्त्राप्रमाणेंच विनियोग करावा.

वाहन वगैरे जें ज्याचें बसायाचें तें त्याचेंच. विभाग नाहीं.

घोडे वगैरे बहुत आहेत आणि त्यांचे धनी त्या घोडे वगैरेंच्या विक्रीवर उपजीवन करणारे आहेत, तर त्या अश्वादिकांचेहि विभाग होतातच.

जर अश्वादिक विषम आहेत तर ते अविभाज्य ह्मणून ज्येष्ठानेंच घ्यावे.

**मनु**– मेंढ्या, बकऱ्या, आणि एकशफ हीं जर विषम आहेत तर वांटे करूं नयेत. मेंढ्या व बकरीं, एकशफ हीं ज्येष्ठानेंच घ्यावीं.

३ अलंकारहि जो ज्यानें धारण केला आहे तो त्याचाच. धारण न केलेला असा सामाईक असल्यास तो वांटून घ्यावा.

दागिना जो ज्यानें धारण केला तो त्याचा.

---

१ विषम म्हणजे तीन, पांच, सात, असा विषमसंख्यावाचक विषमशब्द नव्हे. येथें विषम म्हणजे जितके वांटे केले पाहिजेत तितक्यांस अपर्याप्त किंवा त्यापेक्षां यत्किंचित् अधिक जी संख्या तद्वाच्य विषमशब्द. म्हणजे असें–तीन अश्व किंवा बकऱ्या तीन आहेत आणि पुत्र तीन आहेत तर विभाग बरोबरच होतील. अश्व विषमसंख्याक आहेत म्हणून अविभाज्य असें नव्हे. परंतु अश्व चार आणि पुत्र तीन किंवा पांच आहेत तर बरोबर विभाग घडत नाहीं. वास्तव ज्येष्ठास गावे असें सांगितल्यावरून विभागापुरते अश्वादिकांना विभाग करून उर्वरित अश्वादिक ज्येष्ठास गावे असा विषमशब्दाचा अर्थ जाणावा. सुबोधिनी.

**स्मृति**– पति जीवंत असतां स्त्रियांनीं जो दागिना धारण केला (वापरला) असेल तो वारसांनीं वांटून घेऊं नये. वांटून घेतील तर ते अधोगतीस जातील.

ह्या वरील स्मृतिवचनांत "धारण केला असेल" असें विशेषण आहे. यावरून जे धारण केले नसतील ते विभागयोग्य होतात असें सिद्ध झालें.

४ **कृतान्न** ह्मणजे तांदळांचे मोदक इत्यादिक शिजविलेलें जें अन्न तेंहि अविभाज्य. त्याचा उपभोग यथासंभव करावा.

शिजलेल्या अन्नाचा विभाग नाहीं.

५ **उदक** ह्मणजे वापी, कूप इत्यादिक जलाधार, तीं जर विषम आहेत तर त्यांचें मोल ठरवून विभाग करूं नये. त्यांचा पाळीपाळीनें उपभोग करावा.

उदकाचा विभाग नाहीं.

६ **स्त्रिया** ह्मणजे दासी इत्यादि विषम असल्यास मोल ठरवून द्रव्यद्वारा वांटूं नयेत. पाळीपाळीनें त्यांच्या हातून काम घ्यावें. पित्याच्या ठेवणाईत स्वैरिणी वगैरे स्त्रिया, ह्या जरी सम (विभागपर्याप्त) असल्या तरी पुत्रांनीं विभागूं नयेत. कारण;

दासांचा विभाग नाहीं.

**गौतम**– उपभोगार्थ नियमित केलेल्या अशा स्त्रियांचा विभाग नाहीं.

७ **योग** ह्मणजे अलब्धलाभाचें साधनीभूत जें **श्रौतस्मार्त** अग्निसाध्य यज्ञादिक कर्म तें.

**क्षेम** ह्मणजे लब्ध झालें त्याचे संरक्षणाचें कारणीभूत जें तडागबाग इत्यादिक पूर्तकर्म तें. हीं दोन्हीं पित्याचें द्रव्य खर्चून जरी संपादिलेलीं आहेत तरी ह्यांचा विभाग होत नाहीं.

**लौगाक्षीहि**– क्षेम ह्मणजे पूर्त आणि योग ह्मणजे यज्ञादिक, हीं विभागिलीं जात नाहींत. तसेंच शयन, आसन (बैठक) हींहि विभागिलीं जात नाहींत.

८ कोणी असें ह्मणतात कीं, **योगक्षेमशब्दें**करून योगक्षेम करणारा राजा प्रधान पुरोहित इत्यादिक जाणावे.

दुसरे ह्मणतात कीं, योगक्षेम ह्मणजे शस्त्र, चामर, छत्र, चर्मी जोडा इत्यादिक.

९ **प्रचार**– ह्मणजे गृहवाडी इत्यादिकांत जाण्यायेण्याचा मार्ग, तोहि अविभाज्य.

**उशना**– १० याजनापासून जें लब्ध तें व क्षेत्र व वाहन व केलेलें अन्न, वापी कूपादिक आणि स्त्रिया (पित्यानें राखलेल्या स्वैरिणी) त्यांचे स्वगोत्रांचीं सहस्र कुलें होतपर्यंतहि वांटे होऊं शकत नाहींत.

असा जो उशनानें क्षेत्राविषयीं विभागाचा निषेध सांगितला तो ब्राह्मणापासून विवाहित क्षत्रियादिक स्त्रीचे ठायीं उत्पन्न झाला जो पुत्र त्याच्या विभागाविषयीं जाणावा.

**स्मृति**– प्रतिग्रहप्राप्त भूमीचा विभाग क्षत्रियादिपुत्रांस देऊं नये. जर कदाचित् त्यांचा पिता देईल तर पिता निवर्तल्यानंतर ब्राह्मणीपुत्रानें घ्यावा.

---

[१] स्त्रियाशब्द उपलक्षणमात्र सांगितल्यावरून जो ज्यानें धारण केलेला असेल तो त्याचाच असें वर सांगितलें त्याला विरोध येत नाहीं. तसाच पतिशब्दही पुत्रादिकांचा उपलक्षक जाणावा.

पित्याच्या प्रसन्नतेकडून लब्ध झालेलें द्रव्य अविभाज्य असें पुढें सांगितलें आहे.

द्रव्यसंपादनाचे जे नियम सांगितले त्यांचें उल्लंघन करून संपादिलेलें द्रव्य विभागयोग्य नाहीं ह्याचा निरास पूर्वींच ( १ ल्या शाखेच्या २३ व्या अंकांत ) केला आहे.

११ मातापितरांचें द्रव्य खर्च करून जें संपादिलें तें वांटून घ्यावें, असें सिद्ध झालें. परंतु त्यांत संपादकानें दोन भाग घ्यावे. कारण,

पितृद्रव्याचा व्यय करून जें संपादिलें त्यांत अर्जकानें दोन अंश घ्यावे.

वसिष्ठ- भ्रात्यांमध्यें जो कोणी कांहीं संपादन करितो त्यानें दोन भाग घ्यावे. ११८, ११९

---

## सामान्यार्थसमुत्थाने विभागस्तु समः स्मृतः ।

अस्यापवादमाह ॥ अविभक्तानां भ्रातृणां सामान्यस्यार्थस्य कृषिवाणिज्यादिना संभूय समुत्थाने सम्यग्वर्धने केनचित्कृते सम एव विभागो नार्जयितुरंशद्वयम् ॥

ह्याचा अपवाद ( अर्ध्या वचनानें ) सांगतो.

मूलार्थ- सामान्य द्रव्य वाढविलें असतांहि विभाग समान सांगितला आहे.

टीकार्थ- १२ अविभक्त भ्रात्यांतून कोणी एकानें जरी सामान्य ( समाईक ) द्रव्य शेतकी, व्यापार वगैरे करून तें वाढविलें तरी विभाग समानच, संपादकास दोन भाग नाहींत.

## अनेकपितृकाणां तु पितृतो भागकल्पना ॥ १२० ॥

पित्र्ये द्रव्ये तु पुत्राणां विभागो दर्शितः । इदानीं पैतामहे पौत्राणां विभागे विशेषमाह । यद्यपि पैतामहे द्रव्ये पौत्राणां जन्मना स्वत्वं पुत्रैरविशिष्टं तथापि तेषां पितृद्वारेणैव पैतामहद्रव्ये विभागकल्पना । न स्वरूपापेक्षया । एतदुक्तं भवति । यदा विभक्ता भ्रातरः पुत्रानुत्पाद्य दिष्टं गतास्तदैकस्य द्वौ पुत्रावन्यस्य त्रयोऽपरस्य चत्वार इति पुत्राणां वैषम्ये तत्र द्वावेकं स्वपित्र्यमंशं लभेते । अन्ये त्रयोऽप्येकमंशं पित्र्यं चत्वारोप्येकमंशं पित्र्यं लभन्त इति। तथा केषु चित्पुत्रेषु म्रियमाणेषु केषुचित्पुत्रानुत्पाद्य विनष्टेष्वयमेव न्यायो ध्रियमाणाः स्वांशानेव लभन्ते । नष्टानामपि पुत्राः पित्र्यानेवांशान्लभन्त इति वाचनिकी व्यवस्था ॥ १२० ॥

### शाखा १० वी.

पितृद्रव्याविषयीं पुत्रांनीं कसा विभाग घ्यावा, तो प्रकार सांगितला. आतां पितामहद्रव्याचा विभाग पौत्रांनीं कसा घ्यावा ह्याविषयीं विशेष ( उत्तरार्धेकरून ) सांगतो.

मूलार्थ- ज्यांचे पिते अनेक ( निरनिराळे ) असतील अशा पौत्रांच्या विभागांची कल्पना पित्यापासून होते.

टीकार्थ- १ जरी पितामहाच्या द्रव्यावर पित्यासारखी पौत्रांचीहि जन्मतः सत्ता आहे, तथापि त्यांस ( पौत्रांस ) पित्याच्या द्वारेंच पितामहाच्या द्रव्याचा विभाग, स्वतः नाहीं. म्हणजे असें:—जर **अविभक्त** भ्राते पुत्रवंत होऊन निवर्तले; त्यांत एकाला दोन पुत्र, दुसऱ्याला तीन, इतराला चार असे पुत्र आहेत तर एकाच्या दोन पुत्रांस एकच पित्रंश वांटून द्यावा. दुसऱ्याच्या तिघां पुत्रांनींहि एकच आपल्या बापाचा अंश वांटून घ्यावा. तसेंच ज्याचे चार पुत्र आहेत त्याचा अंश जो असेल तो चार पुत्रांनीं वांटून घ्यावा.

पितामहानें धन पौत्रांनीं वांटून घेण्याचा प्रकार.

२ तसेंच कित्येक भ्राते जीवंत आहेत आणि कित्येक पुत्रवंत होऊन मरण पावले आहेत तेथेंहि असीच व्यवस्था कीं, जीवंत आहेत ते आपापले अंश पावतात, आणि मेलेल्यांचे पुत्रहि आपापल्या पित्याचा जो विभाग असेल तितकाच घेण्याविषयीं अधिकारी होतात, या रीतीनें वचनसिद्ध व्यवस्था जाणावी. १२०

---

**भूर्या पितामहोपात्ता निबन्धो द्रव्यमेव च ।**
**तत्र स्यात्सदृशं स्वाम्यं पितुः पुत्रस्य चैव हि ॥ १२१ ॥**

अधुना विभक्ते पितर्यविद्यमानभ्रातृके वा पौत्रस्य पैतामहे द्रव्ये विभागो नास्ति । अध्रियमाणे पितरि पितृतो भागकल्पनेत्युक्तत्वात् । भवतु वा स्वार्जितवत् पितुरिच्छयैवेत्याशङ्कित आह । भूः शालिक्षेत्रादिका । निबन्ध एकस्य पर्णभारकस्येयन्ति पर्णानि । तथा एकस्य क्रमुकफलभारकस्येयन्ति क्रमुकफलानीत्याद्युक्तलक्षणः । द्रव्यं सुवर्णरजतादि यत्पितामहेन प्रतिग्रहविजयादिना लब्धं तत्र पितुः पुत्रस्य च स्वाम्यं लोकप्रसिद्धमिति कृत्वा विभागोऽस्ति । हियस्मात्तत्सदृशं समानं । तस्मान्न पितुरिच्छयैव विभागो नापि पितुर्भागद्वयम् । अतः पितृतो भागकल्पनेत्येतत्स्वाम्ये समेऽपि वाचनिकम् । विभागं चेत्पिता कुर्यादित्येतत्स्वार्जितविषयं । तथा द्वावंशौ प्रतिपद्येत विभजन्नात्मनः पितेत्येतदपि स्वार्जितविषयम् । जीवतोरस्वतन्त्रः स्याज्जरयापि समन्वित इत्येतदपि पारतन्त्र्यं मातापित्रर्जितद्रव्यविषयम् । तथा अनीशास्तेहि जीवतोरित्येतदपि । तथाच सरजस्कायां मातरि सस्पृहे च पितरि विभागमनिच्छत्यपि पुत्रेच्छया पैतामहद्रव्यविभागो भवति । तथा विभक्तेन पित्रा पैतामहे द्रव्ये दीयमाने विक्रियमाणे वा पौत्रस्य निषेधेऽप्यधिकारः । पित्रर्जिते तु न निषेधाधिकारः तत्परतन्त्रत्वात् । अनुमतिस्तु कर्तव्या । तथाहि । पैतृके पैतामहे च स्वाम्यं यद्यपि जन्मनैव तथापि पैतृके पितृपरतन्त्रत्वात् पितुः स्वार्जकत्वेन प्राधान्यात् पित्रा विनियुज्यमाने स्वार्जिते द्रव्ये पुत्रेणानुमतिः कर्तव्या । पैतामहे तु द्वयोः स्वाम्यमविशिष्टमिति निषेधाधिकारोऽप्यस्तीति विशेषः । मनुरपि । पैतृकं तु पिता द्रव्यमनवाप्तं यदाप्नुयात् । न तत्पुत्रैर्भजेत्सार्द्धमकामः स्वयमर्जितमिति ।

यत्पितामहार्जितं केनाप्यपहृतं पितामहेनानुद्धृतं यदि पितोद्धरति तत्स्वार्जितमिव पुत्रैः सार्द्धमकामः स्वयं न विभजेदिति वदन् पितामहार्जितमकामोऽपि पुत्रेच्छया पुत्रैः सह विभजेदिति दर्शयति ॥ १२१ ॥

### शाखा ११ वी.

पिता अविभक्त किंवा भ्रातृहीन आहे तर पौत्राला पितामहद्रव्याचा विभाग नाहीं. कारण, पिता जिवंत असतां त्याच्या द्वारें विभाग होतो असें पूर्वी ( १० व्या शाखेंत ) सांगितलेंच आहे. अथवा विभाग असो, पण पितृसंपादित द्रव्याचा विभाग जसा पित्याच्या इच्छेनेंच होतो तद्वत् पितामहद्रव्याचाहि विभाग पित्याच्या इच्छेनेंच पौत्राला मिळेल असी शंका घेऊन सांगतो.

**मूलार्थ**– भूमि, निबंध व द्रव्य जें पितामह संपादित असेल त्यावर पित्याची व पुत्राचीहि सत्ता समानच जाणावी.

पितामहाच्या जिंदगीवर पितापुत्रांची सत्ता समान.

**टीकार्थ**– १ भूमि ह्मणजे भाताचें शेत वगैरे, निबंध म्हणजे एका पानभाऱ्यास इतकीं पानें, किंवा एका सुपारीचे ओझ्यास इतक्या सुपाऱ्या इत्यादिक, द्रव्य म्हणजे सोनें वगैरे जें पितामहानें प्रतिग्रह, विजय इत्यादिकेंकरून[1] संपादित आहे त्यावर पितापुत्रांची सत्ता लोकप्रसिद्धच आहे ह्मणून पौत्राचा विभाग आहेच, आणि उभयतांची (पितापुत्रांची ) सत्ता समान आहे म्हणून विभागाविषयीं पित्याचीच इच्छा नियामक असें नाहीं, व पित्यास दोन विभाग असेंहि नाहीं.

ह्यास्तव " पित्याच्या द्वारें विभाग " असें जें ( १० व्या शाखेंत ) सांगितलें तें जरी पितापुत्रांची सत्ता समान आहे तरी हा विचार वाचनिक (वचनसिद्ध) जाणावा.

पित्याचे स्वसंपादित द्रव्याचा विभाग.

२ ( ३ ऱ्या शाखेच्या २ ऱ्या अंकांत ) " जर पिता विभाग करील तर इच्छेप्रमाणें पुत्रांस विभाग द्यावे, " असा जो विभागप्रकार सांगितला तो पित्यानें संपादिलेल्या द्रव्याविषयीं जाणावा.

**स्मृति**– आपणापासून पुत्रांस विभाग देणाऱ्या पित्यानें स्वतांसाठीं दोन विभाग घ्यावे. असें जें वचन तेंहि पित्याच्या स्वतःसंपादित द्रव्याविषयींच जाणावें.

**स्मृति**– पुत्र वृद्ध झाला तरी माता पिता जीवंत आहेत तोंपर्यंत तो स्वतंत्र होत नाहीं. असा जो पराधीनपणा सांगितला तोहि मातापित्यांनीं संपादिलेल्या द्रव्याविषयींच.

**स्मृति**– मातापिता जीवंत आहेत तोंपर्यंत पुत्र विभाग करण्याविषयीं अधिकारी नाहींत; अशी जी स्मृति तीहि ( मातापित्यांनीं संपादिलेल्या द्रव्याविषयींच ).

पुत्रांच्या इच्छेनें विभाग करण्याचा प्रकार.

३ एवंच वर लिहिलेल्या सिद्धांताप्रमाणें माता रजस्वला होत आहे व पिता द्रव्यलोभी होत्साता विभाग करण्याविषयीं इच्छीत नसेल तथापि पुत्रांच्या इच्छेनें पितामहद्रव्याचा विभाग होतो.

---

१ इत्यादिक म्हणजे वाढी, दिढी, सावकारी, सेवालब्ध वगैरे जाणावें.

४ तसेंच पिता अविभक्त असतां तो पितामहाची जिंदगी कोणास देईल किंवा विकील तर त्यास प्रतिबंध करण्याविषयीं पौत्रास अधिकार आहे. पित्यानें स्वतां संपादिलेल्या द्रव्याविषयीं तर पुत्राला निषेध करण्याविषयीं अधिकार नाहीं. परंतु त्याच्या पराधीनतेमुळें अनुमति दिली पाहिजे. म्हणजे असीः—पित्यानें संपादिलेल्या द्रव्यावर आणि पितामहोपार्जित द्रव्यावर (पौत्राची) सत्ता जरी जन्मदिवसापासूनच आहे तथापि पित्याच्या द्रव्याविषयीं पुत्रास पराधीनता आहे, आणि संपादक पित्याला स्वतंत्रता आहे यास्तव पिता स्वतःसंपादित जिंदगी दुसऱ्यास दान देईल किंवा विकील तर त्याविषयीं त्यानें पुत्राची अनुमति (सही) घ्यावी, व पुत्रानें त्याप्रमाणें द्यावी.

५ पितामहानें संपादिलेल्या द्रव्यावर तर दोघांची (पितापुत्रांची) सत्ता समानच आहे ह्मणून (पिता स्वेच्छेप्रमाणें त्या द्रव्याचा विनियोग करूं लागल्यास) त्याचा निषेध करण्याविषयीं पुत्रास अधिकार आहे इतका विशेष समजावा.

मनुहि सांगतो कीं, पितामहानें संपादिलेलें द्रव्य कोणी हरण केलें आणि तें हरण केलेलें द्रव्य पितामहाच्यानें हस्तगत करवलें नाहीं व तेंच द्रव्य जर पिता हस्तगत करितो, तर जसा पित्यास विभाग करण्याची इच्छा नसतां त्यानें मिळविलेल्या द्रव्याचा विभाग होत नाहीं, तसाच ह्याहि द्रव्याचा विभाग पुत्रांबरोबर होत नाहीं.

असें सांगण्यानें पितामहानें संपादिलेल्या द्रव्याचा विभाग जरी पिता करूं इच्छीत नाहीं तरी त्यानें त्या द्रव्याचे पुत्रांच्या इच्छेनेंच पुत्रांबरोबर विभाग करावे, असें दाखवितो. १२१

---

## विभक्तेषु सुतो जातः सवर्णायां विभागभाक् ।

विभागोत्तरकालमुत्पन्नस्य पुत्रस्य कथं विभागकल्पनेसत आह । विभक्तेषु पुत्रेषु पश्चात्सवर्णायां भार्यायामुत्पन्नो विभागभाक् । विभज्यते इति विभागः । पित्रोर्विभागस्तं भजतीति विभागभाक् । पित्रोरूर्ध्वं तयोरंशं लभत इत्यर्थः । मातृभागं च सत्यां दुहितरि मातुर्दुहितरः शेषमित्युक्तत्वात् । असवर्णायामुत्पन्नस्तु स्वांशमेव पित्र्याल्लभते । मातृकं तु सर्वमेव । एतदेव मनुनोक्तम् । ऊर्ध्वं विभागाज्जातस्तु पित्र्यमेव हरेद्धनमिति । पित्रोरिदं पित्र्यमिति व्याख्येयम् । अनीशः पूर्वजः पित्रोर्भ्रातुर्भागे विभक्तज इति स्मरणात् । विभक्तयोर्मातापित्रोर्विभागे विभागात्पूर्वमुत्पन्नो न स्वामी विभक्तजश्च भ्रातुर्भागे न स्वामीत्यर्थः । तथा विभागोत्तरंकालं पित्रा यत्किंचिदर्जितं तत्सर्वं विभक्तजस्यैव ॥ पुत्रैः सह विभक्तेन पित्रा यत्स्वयमर्जितम् । विभक्तजस्य तत्सर्वमनीशाः पूर्वजाः स्मृता इति स्मरणात् । ये च विभक्ताः पित्रा सह संसृष्टाः पितुरूर्ध्वं तैः सार्द्धं विभक्तजो विभजेत् ॥ यथाह मनुः ॥ संसृष्टास्तेन वा ये स्युर्विभजेत स तैः सहेति ।

## शाखा १२ वी.

विभाग झाल्यानंतर उत्पन्न झालेल्या पुत्रास विभाग कसा द्यावा हें सांगतो.

**मूलार्थ**– ( पुत्र ) विभक्त झाल्यानंतर सवर्ण स्त्रीचे ठायीं झालेला पुत्र विभागाचा अधिकारी होतो.

**टीकार्थ**– १ पुत्र विभक्त झाल्यानंतर सजातीय भार्येचे ठायीं उत्पन्न झालेला पुत्र माता पिता मृत झाल्यानंतर त्यांच्या द्रव्याचा विभागी होतो. परंतु मातेचा अंश मिळणें तो कन्येच्या अभावीं मिळेल; कारण, "कर्ज फिटून राहिलेलें मातेचें धन कन्यांनीं घ्यावें," असें ( ७ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितलें आहे.

विभाग झाल्यानंतर झालेला पुत्र मातापितरांचें द्रव्य घेतो.

२ असवर्ण भार्येचे ठायीं उत्पन्न झालेला पुत्र पित्याच्या द्रव्यांतून यथाविभाग आपला मात्र अंश पावतो, आणि मातेचा अंश तर ( कन्येच्या अभावीं ) सर्वच पावतो.

असवर्ण भार्येचा पुत्र तर आपल्या जननीचें सर्व द्रव्य घेतो.

मनुहि हेंच सांगतो. विभाग झाल्यानंतर उत्पन्न झालेला पुत्र मातापितरांचेंच मात्र द्रव्य घेण्याविषयीं अधिकारी होतो.

**स्मृति**– विभाग होण्यापूर्वींच उत्पन्न झालेला पुत्र मातापितरांचा विभाग झाल्यानंतर मातापितरांचे द्रव्याचा मालक होत नाहीं. आणि विभागानंतर झालेला पुत्रहि पहिल्या भ्रात्यांच्या विभागाचा मालक होत नाहीं.

३ तसेंच विभाग झाल्यानंतर पित्यानें जें द्रव्य मिळविलें असेल तें सर्व विभक्तज ( विभक्त झाल्यानंतर झालेल्या ) पुत्राचेंच होतें; कारण,

विभागानंतर पित्यानें संपादिलें तें सर्व विभक्तज पुत्राचें.

**स्मृति**– ( बृहस्पति ) पुत्रापासून पिता अविभक्त होऊन नंतर तो जें द्रव्य स्वतां मिळवितो तें सर्व विभक्तज पुत्राचें, विभागापूर्वीं झालेल्या पुत्रांचा त्या द्रव्यावर वारसा नाहीं.

जे विभक्त होऊन पुनः पित्याशीं एकत्र राहतात ते संसृष्ट होत, त्या संसृष्ट भ्रात्यांबरोबर विभक्तज पुत्रानें, पिता मृत झाल्यानंतर विभाग करून घ्यावा. कारण,

**मनु** सांगतो–पित्याशीं ( विभक्त होऊन ) जे पुनः संसृष्ट ( एकत्र ) राहतील त्यांच्या बरोबर तो ( विभक्तज पुत्र ) विभाग घेईल.

**पितुरूर्ध्वं पुत्रेषु विभक्तेषु पश्चादुत्पन्नस्य कथं विभागकल्पनेत्यतआह ॥**

### दृश्याद्वा तद्विभागः स्यादायव्ययविशोधितात् ॥ १२२ ॥

**तस्य पितरि प्रेते भ्रातृविभागसमयेऽस्पष्टगर्भायां मातरि भ्रातृविभागोत्तरकालमुत्पन्नस्य विभागस्तद्विभागः कुत इत्यत आह ॥ दृश्याद्भ्रातृभिर्गृहीताद्धनात् कीदृशात् आयव्ययविशोधितात् आयः प्रतिदिवसं प्रतिमासं प्रत्यब्दं वा यदुत्पद्यते व्ययः पितृकृतर्णापाकरणम् ताभ्यामायव्ययाभ्यां यच्छोधितं तस्मात् उद्धृत्य तद्भागो दा-**

तव्यः स्यात् । एतदुक्तं भवति ॥ प्रातिस्विकेषु भागेषु तदुत्थमायं प्रवेश्य पितृकृतं चर्णमपनीयावशिष्टेभ्यः स्वेभ्यः स्वेभ्यो भागेभ्यः किंचित्किंचिदुद्धृत्य विभक्तजस्य भागः स्वभागसमः कर्तव्य इति । एतच्च विभागसमयेऽप्रजस्य भ्रातुर्भार्यायामस्पष्टगर्भायां विभागादूर्ध्वमुत्पन्नस्यापि वेदितव्यम् । स्पष्टगर्भायां तु प्रसवं प्रतीक्ष्य विभागः कर्तव्यः ॥ यथाह वसिष्ठः ॥ अथ भ्रातॄणां दायविभागो याश्चानपत्याः स्त्रियस्तासामापुत्रलाभादिति । गृहीतगर्भाणामाप्रसवात्प्रतीक्षणमिति योजनीयम् ॥ १२२ ॥

## शाखा १३ वी.

पिता निवर्तला व पुत्रहि विभक्त झाले, त्यानंतर उत्पन्न झालेल्या पुत्रास कसा विभाग मिळावा हें ( अर्ध्या वचनेंकरून ) सांगतो.

**मूलार्थ**— विभागून घेतलेल्या द्रव्याचा आय व व्यय तपासून जी बाकी असेल तींतून त्याला विभाग द्यावा.

पिता मृत झाल्यावर विभक्तज पुत्राचा विभाग.

**टीकार्थ**—१ पिता मृत झाल्यानंतर भ्राते विभाग करावयास लागले त्या समयीं माता गर्भिणी आहे असें स्पष्ट समजण्यांत न येतां विभाग झाले आणि त्यानंतर कितीएक दिवसांनीं पुत्र उत्पन्न झाला, तर भ्रात्यांनीं जो आपापला विभाग घेतला असेल त्याचा आय ह्मणजे, दररोज दरमहिना किंवा दरसाल जें उत्पन्न होतें तें व व्यय ह्मणजे पित्यानें केलेलें ऋण फेडणें वगैरे तपास करून जें नक्की द्रव्य राहील त्यांतून त्याला विभाग द्यावा. तो प्रकार असाः—आपापल्या भागांत जें उत्पन्न ( व्याज वगैरे ) झालें असेल तें मिळवून व पित्याचें ऋण फेडून बाकी राहिलेल्या आपापल्या भागांतून कांहीं कांहीं अंश काढून स्वभागसम वांटा करून विभक्तज पुत्रास द्यावा.

विभक्तज पुतण्याचा विभाग.

२ हाच प्रकार अनपत्य भ्राता मरण पावला असतां विभाग करण्याच्या समयीं त्याची स्त्री गर्भिणी आहे असें समजण्यांत न आलें आणि विभाग झाल्यानंतर तिला पुत्र झाला तर त्याविषयींही जाणावा.

जर ( भ्रातृपत्नी किंवा माता ) गर्भिणी आहे असें विभागकाळीं समजण्यांत आलें तर ती प्रसूत होईपर्यंत प्रतीक्षा करून नंतर विभाग करावा.

**वसिष्ठ**— यानंतर भ्रात्यांचे द्रव्याचा विभाग, ज्या स्त्रिया अनपत्य असतील त्यांची प्रतीक्षा पुत्र होईपर्यंत करावी. गर्भिणी स्त्रिया असतील तर प्रसूतिकालापर्यंत प्रतीक्षा करावी. १२२

---

विभक्तजः पित्र्यं मातृकं च सर्वं धनं गृह्णातीत्युक्तं तत्र यदि विभक्तः पिता माता वा विभक्ताय पुत्राय स्नेहवशादाभरणादिकं प्रयच्छति तत्र विभक्तजेन दानप्रतिषेधो न कर्तव्यो नापि दत्तं प्रत्याहर्तव्यमित्याह ।

**पितृभ्यां यस्य यद्दत्तं तत्तस्यैव धनं भवेत् ।**

मातापितृभ्यां विभक्ताभ्यां पूर्वं विभक्तस्य पुत्रस्य यद्दत्तमलङ्कारादि तत्तस्यैव पुत्रस्य न विभक्तजस्य स्वं भवति । न्यायसाम्याद्विभागात्प्रागपि यस्य यद्दत्तं तत्तस्यैव तथाऽसति विभक्तजे विभक्तयोः पित्रोरंशं तदूर्ध्वं विभजतां यस्य यद्दत्तं तत्तस्यैव नान्यस्येति वेदितव्यम् ॥

शाखा १४ वी.

विभक्त झाल्यानंतर उत्पन्न झालेला पुत्र मातापित्यांचें सर्व धन घेतो असें ( १२ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितलें, परंतु जर विभक्त पिता किंवा माता विभक्त पुत्रास ममतेच्या योगानें कांहीं अलंकारादिक देतात तर त्याविषयीं विभक्तज पुत्रानें देण्याचा निषेध करूं नये, व दिलेलें परतहि घेऊं नये असें ( अर्ध्या वचनेंकरून ) सांगतो.

**मूलार्थ–** मातापित्यांनीं जें ज्याला धन दिलें असेल, तें त्याचेंच सत्तात्मक होतें.

**टीकार्थ–** १ विभक्त झालेल्या आईबापांनी पूर्वीं विभक्त झालेल्या ज्या पुत्रास दिलेलें जें अलंकारादिक असेल तें त्याचेंच, त्यावर विभक्तजाची सत्ता नाहीं.

वडिलानीं विभक्त पुत्रास दिल्यावर विभक्तजाचा वारसा नाहीं.

ह्या न्यायेंकरूनच विभागापूर्वींहि जें ज्याला दिलें असेल तें त्याचेंच. तसेंच विभक्तज पुत्र नसला तरी विभक्त आईबापांपासून पुत्रादिकांस जें मिळालें असेल तें आईबाप निवर्तल्यावर त्यांची जिंदगी वांटून घेणाऱ्या भावांमध्यें जें ज्याला दिलें असेल तें त्याचेंच, इतरांची त्याजवर सत्ता नाहीं.

## पितुरूर्ध्वं विभजतां माताप्यंशं समं हरेत् ॥ १२३ ॥

जीवद्विभागे स्वपुत्रसमांशित्वं पत्नीनामुक्तं यदि कुर्यात्समानंशानित्यादिना । पितुरूर्ध्वं विभागेऽपि मातुः स्वपुत्रसमांशित्वं दर्शयितुमाह ॥ पितुरूर्ध्वं पितुः प्रयाणादूर्ध्वं विभजतां मातापि स्वपुत्रांशसमं अंशं हरेत् ॥ यदि स्त्रीधनं न दत्तं । दत्ते त्वर्द्धांशहारिणीति वक्ष्यते ॥ १२३ ॥

शाखा १५ वी.

पिता जिवंत असतां विभागकाळीं आपल्या पत्नीसही पुत्राबरोबर समविभाग द्यावा असें ( ४ थ्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितलें. आतां पिता मृत झाल्यानंतर विभागसमयीं जननीसही आपल्या पुत्रांबरोबर समविभाग घेण्याचा अधिकार आहे. असें प्रदर्शित करण्यासाठीं ( उत्तरार्धेंकरून ) सांगतो.

**मूलार्थ–** पिता मृत झाल्यानंतर विभाग करणारांची माताहि समविभाग पावते.

**टीकार्थ–** १ पिता निवर्तल्यानंतर विभागसमयीं जननीहि आपल्या पुत्रांसमान विभाग घेण्यास अधिकारी आहे, परंतु जर तिला स्त्रीधन दिलें नसेल तर. तें दिलें असल्यास अर्धा विभाग घेणारी होईल असें पुढें (२३ व्या शाखेच्या ८ व्या अंकाचे मूळवचनांत) सांगितलें आहे. १२३

पिता निवर्तल्यावर मातेला पुत्रासमान विभाग.

पितरि प्रेते यद्यसंस्कृता भ्रातरः सन्ति तत्संस्कारे कोऽधिक्रियत इत्यत आह।

**असंस्कृतास्तु संस्कार्या भ्रातृभिः पूर्वसंस्कृतैः।**

पितुरूर्ध्वं विभजद्भिर्भ्रातृभिरसंस्कृता भ्रातरः समुदायद्रव्येण संस्कर्तव्याः।

पिता मरण पावल्यानंतर जर भ्राते असंस्कृत आहेत तर त्यांच्या संस्काराविषयीं कोण अधिकारी हें सांगतो.

**मूलार्थ**– पूर्व संस्कृत भ्रात्यांनीं असंस्कृत भ्रात्यांचे संस्कार करावे.

**टीकार्थ**– १ पिता मृत झाल्यानंतर विभाग करणाऱ्या संस्कृत भ्रात्यांनीं असंस्कृत भ्रात्यांचे संस्कार समाईक द्रव्यानें करावे.

असंस्कृत भ्रात्यांचे संस्कार संस्कृत भ्रात्यांनीं करावे.

**भगिन्यश्च निजादंशाद्दत्वांशं तु तुरीयकम्॥ १२४॥**

असंस्कृतासु भगिनीषु विशेषमाह। अस्यार्थः भगिन्यश्चासंस्कृताः संस्कर्तव्या भ्रातृभिः किं कृत्वा निजादंशाच्चतुर्थमंशं दत्वा। अनेन दुहितरोऽपि पितुरूर्ध्वं अंशभागिन्य इति गम्यते। तत्र निजादंशादिति प्रत्येकं परिकल्पितादंशादुद्धृत्य चतुर्थांशो दातव्य इत्ययमर्थो न भवति किं तु यज्जातीया कन्या तज्जातीयपुत्रभागाच्चतुर्थांशभागिनी सा कर्तव्या। एतदुक्तं भवति। यदि ब्राह्मणी सा कन्या तदा ब्राह्मणीपुत्रस्य यावानंशो भवति तस्य चतुर्थांशस्तस्या भवतीति। तद्यथा। यदि कस्यचिद्ब्राह्मण्येव एका पत्नी पुत्रश्चैकः कन्या चैका तत्र पित्र्यं सर्वमेव द्रव्यं द्विधा विभज्य तत्रैकं भागं चतुर्धा विभज्य तुरीयमंशं कन्यायै दत्वा शेषं पुत्रो गृह्णीयात्। यदा तु द्वौ पुत्रौ एका कन्या तदा पितृधनं सर्वं त्रेधा विभज्य एकं भागं चतुर्धा विभज्य तुरीयमंशं कन्यायै दत्वा शेषं द्वौ पुत्रौ विभज्य गृह्णीतः॥ अथ त्वेकः पुत्रो द्वे कन्ये तदा पित्र्यं धनं त्रेधा विभज्य एकं भागं चतुर्धा विभज्य तत्र द्वौ भागौ द्वाभ्यां कन्याभ्यां दत्वावशिष्टं सर्वं पुत्रो गृह्णातीत्येवं समानजातीयेषु समविषमेषु भ्रातृषु भगिनीषु च योजनीयम्॥ यदा तु ब्राह्मणीपुत्र एकः क्षत्रियाकन्यैका तत्र पित्र्यं धनं सप्तधा विभज्य क्षत्रियापुत्रभागांस्त्रींश्चतुर्धा विभज्य तुरीयांशं क्षत्रियाकन्यायै दत्वा शेषं ब्राह्मणीपुत्रो गृह्णाति। यत्र तु द्वौ ब्राह्मणीपुत्रौ क्षत्रियाकन्या चैका तत्र पित्र्यं धनमेकादशधा विभज्य तेषु क्षत्रियापुत्रभागान् त्रीन् चतुर्धा विभज्य चतुर्थमंशं क्षत्रियाकन्यायै दत्वा शेषं सर्वं ब्राह्मणीपुत्रौ विभज्य गृह्णीतः। एवं जातिवैषम्ये भ्रातृणां भगिनीनां च संख्यायाः साम्ये वैषम्ये च सर्वत्रोहनीयम्। न च निजादंशाद्दत्वांशं तु तुरीयकमिति तुरीयांशाविवक्षया संस्कारमात्रोपयोगि द्रव्यं दत्वेति व्याख्यानं युक्तम्। मनुवचनविरोधात्। स्वेभ्योंऽशेभ्यस्तु कन्याभ्यः प्रदद्युर्भ्रातरः पृथक्। स्वात्स्वादंशाच्चतुर्भागं पतिताः स्युरदित्सव इति। अस्यार्थः ब्राह्मणादयो भ्रातरो ब्राह्मणीप्रभृतिभ्यो भगिनीभ्यः स्वेभ्यः स्वजातिविहितेभ्योंऽशेभ्यश्चतुरोंऽशान् हरेद्विप्र इत्यादिवक्ष्यमाणेभ्यः स्वात्स्वादंशादात्मीया-

त्मीयभागाच्चतुर्थं चतुर्थं भागं दद्युः न चात्मीयभागादुद्धृत्य चतुर्थांशो देय इत्युच्यते। किंतु स्वजातिविहितादेकस्मादंशात्पृथक्पृथगेकस्यै कन्यायै चतुर्थोऽशो देय इति जातिवैषम्ये संख्यावैषम्ये च विभागक्लृप्तिरुक्तैव। पतिताः स्युरदित्सव इत्यकरणे प्रत्यवायश्रवणादवश्यं दातव्यता प्रतीयते। अत्रापि चतुर्भागवचनमविवक्षितं संस्कारोपयोगि द्रव्यदानमेव विवक्षितमिति चेन्न। स्मृतिद्वयेपि चतुर्थांशदानाविवक्षायां प्रमाणाभावाददाने प्रत्यवायश्रवणाच्चेति। यदपि कैश्चिदुच्यते। अंशदानविवक्षायां बहुभ्रातृकायां बहुधनत्वं बहुभगिनीकस्य च निर्धनता प्राप्नोतीति तदुक्तरीत्या परिहृतमेव। न ह्यत्रात्मीयाद्भागादुद्धृत्य चतुर्थांशस्य दानमुच्यते येन तथा स्यादतोऽस्मत्सहायमेधातिथिप्रभृतीनां व्याख्यानमेव चतुरस्रं न भारुचेः। तस्मात्पितुरूर्ध्वं कन्याप्यंशभागिनी पूर्वं चेयत्किंचित्पिता ददाति तदेव लभते विशेषवचनाभावादिति सर्वमनवद्यम्॥ १२४॥

मूलार्थ– आणि त्यांनीं बहिणींचे संस्कार आपापल्या अंशांतून चतुर्थांश देऊन करावे.

टीकार्थ– ३ भ्रात्यांनीं आपापल्या अंशांतून चतुर्थांश देऊन आपल्या असंस्कृत भगिनींचे संस्कार (विवाहादिक) करावे असें सांगितल्यावरून कन्या देखील पित्याच्या पाठीमागें विभागाच्या अधिकारी होतात असें प्राप्त झालें.

*अविवाहित बहिणींचे संस्कार भ्रात्यांनीं करावे.*

४ "आपल्या अंशांतून" म्हणजे प्रत्येक जातीच्या भावानें स्वांशांतून चतुर्थांश द्यावा असा अर्थ नाहीं. तर ज्या जातीची ती कन्या असेल ती तज्जातीय पुत्राच्या एक विभागाच्या चतुर्थांशाची विभागी होते.

म्हणजे असें, जर ब्राह्मणी कन्या आहे तर ब्राह्मणी पुत्राचा जितका विभाग आहे त्यांतील चतुर्थांश तिचा होतो. तो असा. जर कोणे एकास ब्राह्मणी पत्नी आहे व पुत्र एक, आणि कन्याहि एक आहे, तर सर्व द्रव्याचे २ विभाग करून त्यांतील एका भागाचा चतुर्थांश कन्येला देऊन बाकी (१ भाग आणि $\frac{3}{4}$ तीनचतुर्थांश) पुत्रानें घ्यावे.

*बहिणी चौथा हिसा विभागाच्या अधिकारी.*

५ जर दोन पुत्र आणि एक कन्या आहे तर सगळ्या पितृधनाचे ३ तीन विभाग करून त्यांतील एक्या विभागांतून चतुर्थांश कन्येला देऊन बाकी (२ विभाग आणि $\frac{3}{4}$ तीनचतुर्थांश) राहिले ते दोघांनीं वांटून घ्यावे.

७ जर एक पुत्र आणि दोन कन्या आहेत तर पितृधनाचे ३ वांटे करून त्यांतील एका वांट्याचे ४ हिसे करून त्यांपैकीं २ हिसे दोघी कन्यांस देऊन बाकी २ भाग आणि $\frac{2}{4}$ दोनचतुर्थांश राहिले ते सर्व पुत्रानें घ्यावे. ह्याप्रमाणें समानजातीय आणि सम विषम भाऊ बहिणी ह्यांविषयींहि योजावें.

७ जर एक ब्राह्मणीपुत्र व क्षत्रिया कन्या एक आहे तर पितृद्रव्याचे ७ विभाग करून क्षत्रियापुत्राचे जे ३ विभाग त्यांचे पुनः ४ अंश करून त्यांतील एकचतुर्थांश

क्षत्रिया कन्येला देऊन बाकी ( ४ विभाग व तीन विभागांचे $\frac{3}{4}$ तीनचतुर्थांश ) ब्राह्मणीपुत्रानें घ्यावे.

८ जर ब्राह्मणीपुत्र दोन व क्षित्रियाकन्या एक आहे तर पितृद्रव्याचे ११ विभाग करून त्यांतील क्षत्रियापुत्राचे जे ३ विभाग त्यांचाच चतुर्थांश क्षत्रियाकन्येला देऊन बाकी ( ८ विभाग व तीन विभागाचे $\frac{3}{4}$ तीनचतुर्थांश ) दोघां ब्राह्मणीपुत्रांनीं विभागून घ्यावे.

ह्याप्रमाणें जातीचें वैषम्य असतां व भाऊबहिणींची संख्या सम विषम असतां सर्वत्र विभागयोजना करावी.

९ आपल्या अंशांतून चतुर्थांश देऊन भगिनींचे संस्कार करावे. असें ( ३ ऱ्या अंकाचे मूळवचनांत ) सांगितलें तेथें ४ थ्या अंशाची विवक्षा न धरितां केवळ संस्कारापुरतें द्रव्य द्यावें, असा अर्थ करणें सयुक्त नव्हे. कारण (खालीं सांगितलेल्या) मनुवचनास विरोध येतो.

**मनु**— भ्रात्यांनीं आपापल्या अंशांतून कन्यांस पार्थक्येंकरून अंश द्यावा. आपल्या अंशांतून चतुर्थांश न देणारे ( भ्राते ) पतित होतात.

**वरील स्मृतीचा अर्थ**— ब्राह्मणादिक जातीच्या भ्रात्यांनीं ब्राह्मणी इत्यादिक आपापले जातीच्या भगिनींस आपापले जातीला विहित जे अंश, ह्मणजे " चार भाग ब्राह्मणीपुत्रानें, ३ भाग क्षत्रियापुत्रानें घ्यावे " असें पुढें ( १६ व्या शाखेंत ) सांगितलें आहे, त्या आपापल्या भागांतून चौथा चौथा भाग द्यावा, परंतु सामान्यतः आपापल्या भागांतून चतुर्थांश काढून द्यावा असें सांगत नाहीं. तर आपापल्या जातीस विहित जो स्वांश ( ह्मणजे ब्राह्मणाला ४, क्षत्रियाला ३, वैश्याला २, शूद्रास १ अंश ) त्यांतून प्रत्येक कन्येस एकेक चतुर्थांश द्यावा. अशी जातिवैषम्येंकरून व संख्येच्या समविषममानेंकरून विभागाची कल्पना वर सांगितलीच आहे.

आणि " न देणारे पतित होतात, " असा न देणाऱ्यांस दोष सांगितला आहे, त्यापेक्षां अवश्य विभाग दिलाच पाहिजे असें प्राप्त होतें.

एथें ( मनुवचनांत )हि चतुर्थ भाग देण्याविषयीं तात्पर्य नाहीं, तर संस्कारा ( विवाहा ) पुरतें जितकें द्रव्य पाहिजे तितकेंच देण्याविषयीं तात्पर्य आहे अशी कल्पना करूं नये. कारण, दोहीं ( याज्ञवल्क्य. मनु ) स्मृतींतहि चतुर्थांश देण्याविषयीं सांगितलें असतां तें सोडून अन्यार्थाची कल्पना करण्यास प्रमाण नाहीं, व चतुर्थांश न देणारांस दोषहि सांगितला आहे.

चतुर्थांश देण्याविषयीं तात्पर्य असें मानावें तर **बहुभ्रातृक** बहिणी सधन होतील व **बहुभगिनीक** भ्राता निर्धन होईल, असें जें कोणी ( ग्रंथकार ) ह्मणतात त्यांचेंहि निवारण वर सांगितल्या रीतीनें झालेंच.

एथें आपल्या भागांतून चतुर्थांश द्यावा असें सांगितलें नाहीं, कारण, तसें सांगितलें

असें तर तो प्रसंग ( बहुभ्रातृक जी बहीण ती सधन व बहुभगिनीक भ्राता निर्धन ) प्राप्त होईल.

ह्यास्तव आमचे सहाय जे मेधातिथिप्रभृति ग्रंथकर्ते ह्यांनीं केलेलाच अर्थ सयुक्तिक आहे, भारुचीचा अर्थ सयुक्त नाहीं.

१० तस्मात् पित्याचे मागें कन्या देखील अंशाची विभागी होते. पिता विद्यमान असेल तेव्हां तर पिता जें कांहीं देईल तितकेंच मिळेल. कारण, विभाग मिळण्याविषयीं विशेष वचन नाहीं. ह्या प्रकारें सर्व निर्दोष जाणावें. १२४

---

एवं विभागं चेत्पिताकुर्यादित्यादिना प्रबन्धेन समानजातीयानां भ्रातृणां परस्परं पित्रा सह विभागक्लृप्तिरुक्ता । अधुना भिन्नजातीयानां विभागमाह ।

**चतुस्त्रिद्व्येकभागाः स्युर्वर्णशो ब्राह्मणात्मजाः ।**
**क्षत्रजास्त्रिद्व्येकभागा विड्जास्तु द्व्येकभागिनः ॥ १२५ ॥**

तिस्रो वर्णानुपूर्व्येणेति ब्राह्मणस्य चतस्रः क्षत्रियस्य तिस्रो वैश्यस्य द्वे शूद्रस्यैकेति भार्या दर्शितास्तत्र ब्राह्मणात्मजा ब्राह्मणोत्पन्ना वर्णशः वर्णशब्देन ब्राह्मणादिवर्णाः स्त्रिय उच्यन्ते । संख्यैकवचनाच्च वीप्सायामित्यधिकरणकारकादेकवचनाद्वीप्सायां शस् । अतश्च वर्णे वर्णे ब्राह्मणोत्पन्ना यथाक्रमं चतुस्त्रिद्व्येकभागाः स्युर्भवेयुः । एतदुक्तं भवति । ब्राह्मणेन ब्राह्मण्यामुत्पन्ना एकैकशश्चतुरश्चतुरो भागाँल्लभन्ते । तेनैव क्षत्रियायामुत्पन्नाः प्रत्येकं त्रींस्त्रीन् भागान् लभन्ते । वैश्यायां द्वौ द्वौ शूद्रायामेकमेकमिति । क्षत्रजाः क्षत्रियेणोत्पन्नाः वर्णश इत्यनुवर्तते । यथाक्रमं त्रिद्व्येकभागाः क्षत्रियेण क्षत्रियायामुत्पन्नाः प्रत्येकं त्रीन् त्रीन् भागान् लभन्ते । वैश्यायां द्वौ द्वौ शूद्रायामेकमेकं । विड्जाः वैश्येनोत्पन्नाः अत्रापि वर्णश इत्यनुवर्तते । यथाक्रमं द्व्येकभागिनः वैश्येन वैश्यायामुत्पन्नाः प्रत्येकं द्वौ द्वौ भागौ लभन्ते । शूद्रायामेकमेकं । शूद्रस्यैकैव भार्येति भिन्नजातीयपुत्राभावात्तत्पुत्राणां पूर्वोक्त एव विभागः । यद्यपि चतुस्त्रिद्व्येकभागा इत्यविशेषेणोक्तं तथापि प्रतिग्रहप्राप्तभूव्यतिरिक्तविषयमिदं द्रष्टव्यम् । यतः स्मरन्ति । न प्रतिग्रहभूर्देया क्षत्रियादिसुताय वै । यद्यप्येषां पिता दद्यान्मृते विप्रासुतो हरेदिति । प्रतिग्रहग्रहणात्क्रयादिना लब्धा भूः क्षत्रियादिसुतानामपि भवत्येव शूद्रापुत्रस्य विशेषप्रतिषेधाच्च । शूद्र्यां द्विजातिभिर्जातो न भूमेर्भागमर्हतीति यदि क्रयादिप्राप्ता भूः क्षत्रियादिसुतानां न भवेत्तदा शूद्रापुत्रस्य विशेषप्रतिषेधो नोपपद्यते यत्पुनः ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्रापुत्रो न रिक्थभाक् । यदेवास्य पिता दद्यात्तदेवास्य धनं भवेदिति । तदपि जीवता पित्रा यदि शूद्रापुत्राय किमपि प्रदत्तं स्यात्तद्विषयं यदा तु प्रसाददानं नास्ति तदैकांशभागित्वविरुद्धम् ॥ १२५ ॥

शाखा १८ वी.

ह्याप्रमाणें ३ ऱ्या ( व ६ व्या ) शाखेंत समानजातीय भ्रात्यांची परस्पर व पित्याबरो-

वर विभाग करण्याची रीति सांगितली. आतां भिन्न जातीच्या पुत्रांच्या विभागाचा प्रकार सांगतो.

**मूलार्थ**– वर्णाच्या अनुलोम स्त्रियांचे ठाईं ब्राह्मणोत्पन्न पुत्र चार, तीन, दोन, एक, असे विभाग पावतात. तसेच क्षत्रियोत्पन्न पुत्रहि तीन, दोन, एक; तसेच वैश्योत्पन्न पुत्र दोन, एक असे पावतात.

**टीकार्थ**– ब्राह्मणास चार ( ब्राह्मणी, क्षत्रिया, वैश्या, आणि शूद्रा ), क्षत्रियाला तीन ( क्षत्रिया, वैश्या, शूद्रा ), ह्याप्रमाणें वैश्यास दोन आणि शूद्रास एक अशा भार्या ( आचाराध्यायांत विवाहप्रकरणीं सांगितल्या ) आहेत, त्यांत ब्राह्मणोत्पन्न पुत्र आपापल्या वर्णाच्या अनुक्रमानें चार, तीन, दोन, आणि एक, अशा विभागाचे अधिकारी होतात.

ब्राह्मणीपुत्रास चार विभाग.

ह्मणजे असें:—ब्राह्मणापासून ब्राह्मणी स्त्रियांचे ठायीं झालेले प्रत्येक पुत्र चार चार अंशांचे विभागी होतात. ब्राह्मणापासून क्षत्रियेच्या ठायीं झालेले प्रत्येक पुत्र तीन, तीन अंशांचे अधिकारी होतात. ब्राह्मणापासून वैश्येला झालेले पुत्र दोन दोन अंशांचे अधिकारी होतात. ब्राह्मणापासून शूद्रेचे ठायीं झालेले प्रत्येक पुत्र एकेक अंशाचे विभागी होतात.

क्षत्रिया पुत्रास तीन विभाग.

२ क्षत्रियापासून क्षत्रियेचे ठायीं झालेल्या प्रत्येक पुत्रास तीन तीन विभाग मिळतील. क्षत्रियापासून वैश्येचे ठायीं झालेले प्रत्येक पुत्र दोन, दोन भाग पावतील. क्षत्रियापासून शूद्रेला झालेला प्रत्येक पुत्र एकेक विभाग पावेल.

वैश्यापुत्रास दोन विभाग.

३ वैश्यापासून वैश्येला झालेले प्रत्येक पुत्र दोन, दोन विभाग पावतात. वैश्यापासून शूद्रेला झालेले प्रत्येक पुत्र एकेक भागाचे अधिकारी होतात.

शूद्रापुत्रास एकच भाग.

४ शूद्राला तर एकच ( सजातीय ) भार्या अतएव त्यास भिन्नजातीय पुत्र नाहींत म्हणून पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ( एकेकच प्रत्येकास विभाग. )

५ जरी १ ला, २ रा, व ३ रा हे अंक सामान्यतः सांगितले तथापि ते अंक प्रतिग्रहसंपादित भूमीवांचून इतर द्रव्याविषयीं जाणावे; कारण,

**स्मृति**– ( बृहस्पति ) ब्राह्मणापासून क्षत्रियादि स्त्रियांचे ठायीं झालेल्या पुत्रांस प्रतिग्रहसंपादित भूमि देऊंनये. जरी त्यांच्या पित्यानें दिली असेल तरी तो ( पिता) निवर्तल्यावर ब्राह्मणीपुत्रानें परत घ्यावी.

खरेदी वगैरे उपायेंकरून मिळविलेल्या भूमीचा वांटा क्षत्रियादि पुत्रास आहे.

" प्रतिग्रहसंपादित भूमि देऊं नये " असें सांगितल्यावरून खरेदी इत्यादिक उपायेंकरून प्राप्त झालेल्या भूमीचा विभाग क्षत्रियादि स्त्रियांच्या पुत्रांस आहेच. कारण, ह्याविषयीं शूद्रापुत्रास मात्र विशेषेंकरून निषेध सांगितला आहे.

देवल– द्विजापासून शूद्रेचे ठायीं झालेला पुत्र भूमीचा ( स्थावर जिंदगीचा ) विभाग घेऊं शकत नाहीं.

शूद्रापुत्रास भूमीचा वांटा नाहीं.

जर खरेदी इत्यादि उपायेंकरून संपादन केलेल्या भूमीचा विभाग क्षत्रियादि स्त्रियांच्या पुत्रांस मिळणार नाहीं तर शूद्रापुत्राला भूमीच्या विभागाविषयीं (वर सांगितलेला) जो विशेष प्रतिषेध त्याची उपपत्ति ( संगति ) होणार नाहीं.

मनु– ९ ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांपासून शूद्रेचे ठायीं झालेला पुत्र विभागाचा अधिकारी होत नाहीं. जितकें त्याचे पित्यानें दिलें असेल तितकें मात्र त्याचें धन होईल.

असें जें वचन तें पिता जिवंत असतां शूद्रापुत्रांस कांहीं दिलें असतां त्याविषयीं जर बक्षीस दिलें नाहीं तर शूद्रापुत्र एका हिशाचा अधिकारी होतो. ह्यास्तव विरोध नाहीं. १२५

---

## अन्योन्यापहृतं द्रव्यं विभक्ते यत्तु दृश्यते ।
## तत्पुनस्ते समैरंशैर्विभजेरन्निति स्थितिः ॥ १२६ ॥

अथ सर्वविभागशेषं किंचिदुच्यते ॥ परस्परापहृतं समुदायद्रव्यं विभागकाले वा ज्ञातं विभक्ते पितृधने यद्दृश्यते तत्समैरंशैर्विभजेरन्नित्येवं स्थितिः शास्त्रमर्यादा ॥ अत्र समैरंशैरिति वदता उद्धारविभागो निषिद्धः ॥ विभजेरन्निति वदता येन दृश्यते तेनैव न ग्राह्यमिति दर्शितं । एवं च वचनस्यार्थवत्त्वान्न समुदायद्रव्यापहारे दोषाभावपरत्वम् । ननु मनुना ज्येष्ठस्यैव समुदायद्रव्यापहारे दोषो दर्शितो न कनीयसाम् । यो ज्येष्ठो विनिकुर्वीत लोभाद्भ्रातॄन्यवीयसः । स ज्येष्ठः स्यादभागश्च नियन्तव्यश्च राजभिरिति वचनात् । नैतत् यतः संभावितस्वातन्त्र्यस्य पितृस्थानीयस्य ज्येष्ठस्यापि दोषं वदता ज्येष्ठपरतन्त्राणां कनीयसां पुत्रस्थानीयानां दण्डापूपिकनीत्या सुतरां दोषो दर्शित एव ॥ तथा चाविशेषेणैव दोषः श्रूयते ॥ यो वै भागिनं भागान्नुदते चयते चैनं स यदि चैनं न चयतेऽथ पुत्रं पौत्रं चयत इति । यो भागिनं भागार्हं भागान्नुदते भागादपाकरोति भागं तस्मै न प्रयच्छति स भागान्नुन्न एनं नोत्तारं चयते नाशयति दोषिणं करोति । यदि न नाशयति तदा तस्य पुत्रं पौत्रं वा नाशयतीति ज्येष्ठविशेषमन्तरेणैव साधारणद्रव्यापहारिणो दोषः श्रुतः । अथ साधारणं द्रव्यमात्मनोऽपि स्वं भवतीति स्वबुद्ध्या गृह्यमाणं न दोषमावहतीति मतं । तदसत् । स्वबुद्ध्या गृहीतेपि वर्जनीयतया परस्वमपि गृहीतमेवेति निषेधानुप्रवेशाद्दोषमावहत्येव । यथा मौद्गे चरौ विपन्ने सदृशतया माषेषु गृह्यमाणेषु अयज्ञिया वै माषा इति निषेधो न प्रविशति । मुद्गावयवबुद्ध्या गृह्यमाणत्वादिति पूर्वपक्षिणोक्ते मुद्गावयवेषु गृह्यमाणेषु वर्जनीयतया माषावयवा अपि गृह्यन्त एवेति निषेधः प्रविशत्येवेति राद्धान्तिनोक्तम् । तस्माद्वचनतो न्यायतश्च साधारणद्रव्यापहारे दोषोऽस्त्येवेति सिद्धम् ॥ १२६ ॥

## शाखा १७ वी.

सर्व विभाग होऊन कांहीं शेष राहिलें असल्यास त्याविषयीं सांगतो.

समाईक द्रव्यांतून अभिलाष केलेल्या धनाचे समविभाग करावे.

**मूलार्थ**– परस्परांनीं अपहार केलेलें द्रव्य विभाग झाल्यानंतर जें उघाडीस येतें तें पुनः त्यांनीं समविभाग वांटून घ्यावें, अशी शास्त्रमर्यादा आहे.

**टीकार्थ**– १ परस्परांनीं ( गुप्तपणें ) अपहार केलेलें समाईक द्रव्य, विभागकाळीं समजण्यांत न येतां पितृधनाचा विभाग झाल्यानंतर उघाडीस आलें तर तें समविभाग वांटून घ्यावें अशी शास्त्रमर्यादा आहे.

येथें समविभाग, असें सांगितल्यानेंच उद्धारविभागाचा निषेध झाला. आणि वांटून घ्यावें असें सांगितल्यावरून ज्यानें उघाडीस आणिलें असेल त्यानेंच घेऊं नये असें दाखविलें.

ह्याप्रमाणें वरच्या वचनाची सार्थकता होते ह्मणून तें ( वचन ) समुदायद्रव्यांतून कांहीं अपहार केला असतां दोष नाहीं असें या वचनाचें तात्पर्य नाहीं.

**शंका**– २ मनूनें तर ज्येष्ठ पुत्रानें समाईक द्रव्याचा अपहार केला असतां त्याला मात्र दोष सांगितला, कनिष्ठ भ्रात्याविषयीं नाहीं. कारण,

**मनु**–जो ज्येष्ठ भ्राता लोभानें कनिष्ठ भ्रात्याशीं प्रतारणा करितो तो ज्येष्ठ भ्राता विभागहीन करून राजांनीं त्याला शिक्षा करावी.

**समाधान**– ३ परंतु असें नाहीं, कारण संभावित स्वातंत्र्य व वडीलपणामुळें पितृस्थानापन्न जो ज्येष्ठ त्यालाहि दोष सांगणारा जो मनु त्यानें ज्येष्ठाच्या स्वाधीन व पुत्रस्थानापन्न अशा कनिष्ठ भ्रात्यासहि दंडापूपिका[1] न्यायेंकरून विशेषेंकरून दोष प्रदर्शित केला.

तसाच आणखीहि श्रुतिवचनांत सामान्येंकरून दोष श्रुत आहे.

**श्रुति**– ४ जो विभागयोग्याला विभाग देत नाहीं, ह्मणजे त्याला भागापासून भ्रष्ट करितो तर तो विभागापासून भ्रष्ट झालेला आपल्यास विभागहीन करणाराचा नाश करितो ह्मणजे दोषी करितो. जर त्याचा नाश करीत नाहीं तर त्याच्या पुत्राचा किंवा पौत्राचा नाश करितो.

असा ज्येष्ठादिकांचा विशेष निर्देश न करितां समाईक द्रव्याच्या अपहारीं दोष सांगितला आहे.

५ आतां समाईक द्रव्यावर सर्वांची सत्ता असल्यामुळें आपलीहि ( अपहार करणाराचीहि ) सत्ता आहेच म्हणून हें आपलेच अशा बुद्धीनें घेतलें असतां त्यापासून दोष नाहीं.

---

१ दंडापूपिका न्याय म्हणजे एका दंडांत कांहीं घारगे ओंवले असतां तो दंड उचलला म्हणजे सहजच त्याबरोबर घारगेहि येतात. कारण, ते त्याच्यांत ओंवले गेले. ह्याप्रमाणेंच ज्येष्ठ पुत्रास समाईक द्रव्यापहारी दोष सांगितला, तो ज्येष्ठाच्या आज्ञेंत वागणारे जे कनिष्ठ त्यांसहि येतो.

असें जें (कोणाचें) मत तेंहि अयोग्य; कारण, 'हें द्रव्य आपलें' अशा बुद्धीनें घेतलें तरी समाईकपणामुळें दुसऱ्याचीहि सत्ता आहे ह्मणून परद्रव्याचाहि अपहार घडतोच (दुसऱ्याचें द्रव्य घेऊं नये, इत्यादिक निषेधशास्त्राची येथें प्रसक्ति झाली) ह्यास्तव दोष आहेच आहे.

६ जसें (कोणे एका यज्ञांत मुगांचा चरुहोम करण्याविषयीं सांगितलें परंतु) मुगांचा चरु नसल्यामुळें मुगांसारिखीच उडदांची आकृति आहे ह्मणून सारखेपणामुळें उडीद घेतले असतां "उडीद यज्ञकर्मांत उपयोगी नाहीं" असा निषेध येथें प्राप्त होत नाहीं. कारण, हे मूग अशा बुद्धीनें उडीद घेतले असें पूर्वपक्षकर्त्याचें मत परंतु सिद्धांतवादीचें असें मत कीं मुगांच्या बुद्धीनें जरी उडीद घेतले तरी निषेधकोटिप्रविष्ट जे उडीद त्यांचें ग्रहण झालेंच ह्मणून निषेधहि प्राप्त झाला.

तस्मात् शास्त्रवचनेंकरून व वर सांगितल्या न्यायेंकरूनहि समाईक द्रव्याचा अपहार केला असतां दोष आहेच असें सिद्ध झालें. १२६

---

## अपुत्रेण परक्षेत्रे नियोगोत्पादितः सुतः ।
## उभयोरप्यसौ रिक्थी पिण्डदाता च धर्मतः ॥ १२७ ॥

द्व्यामुष्यायणस्य भागविशेषं दर्शयंस्तस्य स्वरूपमाह ॥ अपुत्रां गुर्वनुज्ञात इत्याद्युक्तविधिना अपुत्रेण देवरादिना परक्षेत्रे परभार्यायां गुरुनियोगेनोत्पादितः पुत्र उभयोर्बीजिक्षेत्रिणोरसौ रिक्थी रिक्थहारी पिण्डदाता च धर्मत इत्यस्यार्थः । यदासौ नियुक्तो देवरादिः स्वयमप्यपुत्रोऽपुत्रस्य क्षेत्रे स्वपरपुत्रार्थं प्रवृत्तो यं जनयति स द्विपितृको द्व्यामुष्यायणो द्वयोरपि रिक्थहारी पिण्डदाता च । यदा तु नियुक्तः पुत्रवान् केवलं क्षेत्रिणः पुत्रार्थं प्रयतते तदा तदुत्पन्नः क्षेत्रिण एव पुत्रा भवतीति न बीजिनः । स च न नियमेन बीजिनो रिक्थहारी पिण्डदो वेति ॥ यथोक्तं मनुना ॥ क्रियाभ्युपगमात्क्षेत्रं बीजार्थं यत्प्रदीयते॥यस्येह भागिनौ दृष्टौ बीजी क्षेत्रिक एव चेति॥ क्रियाभ्युपगमादिति अत्रोत्पन्नमपत्यमावयोरुभयोरपि भवत्विति संविदङ्गीकरणाद्यत्क्षेत्रं क्षेत्रस्वामिना बीजावपनार्थं बीजिने दीयते तत्र तस्मिन्क्षेत्रे उत्पन्नस्यापत्यस्य बीजिक्षेत्रिणौ भागिनौ स्वामिनौ दृष्टौ महर्षिभिः। तथा । फलं त्वनभिसंधाय क्षेत्रिणां बीजिनां तथा । प्रत्यक्षं क्षेत्रिणामर्थो बीजाद्योनिर्बलीयसीति । फलं त्वनभिसधायेति अत्रोत्पन्नमपत्यमावयोरुभयोरस्त्वित्येवमनभिसंधाय परक्षेत्रे यदपत्यमुत्पाद्यते तदपत्यं क्षेत्रिण एव।यतो बीजाद्योनिर्बलीयसीति गवाश्वादिषु तथा दर्शनात्।अत्रापि नियोगो वाग्दत्ताविषय एव।इतरस्य नियोगस्य मनुना निषिद्धत्वात्। देवराद्वा सपिण्डाद्वा स्त्रिया सम्यङ्नियुक्तया । प्रजेप्सिताधिगन्तव्या सन्तानस्य परिक्षये । विधवायां नियुक्तस्तु घृताक्तो वाग्यतो निशि । एकमुत्पादयेत्पुत्रं न द्वितीयं कथंचनेत्येवं नियोगमुपन्यस्य मनुः स्वयमेव निषेधति ॥ नान्यस्मिन्विधवा नारी नियोक्तव्या द्विजातिभिः । अन्य-

हे नियुञ्जाना धर्मं हन्युः सनातनं ॥ नोद्वाहिकेषु मन्त्रेषु नियोगः कीर्त्यते क- । न विवाहविधावुक्तं विधवावेदनं पुनः ॥ अयं द्विजैर्हि विद्वद्भिः पशुधर्मो वि- ः । मनुष्याणामपि प्रोक्तो वेने राज्यं प्रशासति ॥ स महीमखिलां भुञ्जन् रा- नवरः पुरा । वर्णानां संकरं चक्रे कामोपहतचेतनः ॥ ततः प्रभृति यो मोहात् ्पतिकां स्त्रियम् । नियोजयत्यपत्यार्थे गर्हन्ते तं हि साधव इति। न च विहितप्र- द्धत्वाद्विकल्प इति मन्तव्यम् । नियोक्तृणां निन्दाश्रवणात्। स्त्रीधर्मेषु व्यभिचा- बहुदोषश्रवणात्। संयमस्य प्रशस्तत्वाच्च। यथाह मनुरेव॥कामं तु क्षपयेद्देहं पुष्प- ्लैः शुभैः। न तु नामापि गृह्णीयात्पत्यौ प्रेते परस्यत्विति ॥ जीवनार्थं पुरुषान्त- यणं प्रतिषिध्य ॥ आसीतामरणात् क्षान्ता नियता ब्रह्मचारिणी । यो धर्म ए- ीनां काङ्क्षन्ती तमनुत्तमम् ॥ अनेकानि सहस्राणि कौमारब्रह्मचारिणाम् । दिवं ने विप्राणामकृत्वा कुलसंततिम् । मृते भर्तरि साध्वी स्त्री ब्रह्मचर्ये व्यवस्थिता । गच्छत्यपुत्रापि यथा ते ब्रह्मचारिणः ॥ अपत्यलोभाद्या तु स्त्री भर्तारमतिव- सेह निन्दामवाप्नोति परलोकाच्च हीयते इति पुत्रार्थमपिपुरुषान्तराश्रयणं निषे- ॥ तस्माद्विहितप्रतिषिद्धत्वाद्विकल्प इति न युक्तम्। एवं विवाहसंस्कृतानियोगे षेद्धे कस्तर्हि धर्म्यो नियोग इत्यत आह ॥ यस्या म्रियेत कन्याया वाचा सत्ये ्तिः। तामनेन विधानेन निजो विन्देत देवरः॥यथाविध्यभिगम्यैनां शुक्लवस्त्रां व्रताम् । मिथो भजेताप्रसवात्सकृत्सकृदृतावृतौ इति ॥ यस्मै वाग्दत्ता कन्या स ्हमन्तरेणैव तस्याः पतिरित्यस्मादेववचनादवगम्यते तस्मिन्प्रेते देवरस्तस्य ज्येष्ठः ्ठो वा निजः सोदरो विन्देत परिणयेत् । यथाविधि यथाशास्त्रमधिगम्य परि- य अनेन विधानेन घृताभ्यङ्गवाङ्नियमादिना शुक्लवस्त्रां शुचिव्रतां मनोवाक्काय- ् मिथोरहस्यागर्भग्रहणात् प्रत्यृत्वेकैकंवारं गच्छेत् । अयं च विवाहो वाचनिको यज्ञादिनियमवन्नियुक्ताभिगमनाङ्गमिति न देवरस्य भार्यात्वमापादयति । अत- न्नमपत्यं क्षेत्रस्वामिन एव भवति । न देवरस्य । संविदातूभयोरपि ॥ १२७ ॥

शाखा १८ वी.

्यामुष्यायण पुत्राला विभागाचा विशेष विचार सांगण्यासाठीं त्याचें स्वरूपहि ।.

्वार्थ— अपुत्रानें परकीयक्षेत्रीं नियोगविधीकरून उत्पन्न केलेला जो पुत्र तो दोघांचेहि ंचा वारीस व पिंड देणारा होतो.

कार्थ— १ "गुरूच्या आज्ञेवरून दीर इत्यादिकानें पुत्रासाठीं अपुत्र स्त्रीशीं ( ऋतु-

---

॥ द्व्यामुष्यायण प्रकरणींचा व्यवहार बहुतकरून शेतकीसारिखाच आहे म्हणून शब्दहि शेतकींत- जेले आहेत. ते असे—क्षेत्र शब्द शेताच्या अर्थीं रूढ आहे. प्रकृतीं तत्तुल्य बायको अर्थात् क्षेत्री व क्षेत्र ॥ शब्देंकरूनही मालक ह्मणजे नवरा. तसाच बीजी म्हणजे ज्याचें बीज तो, अर्थात् पेरणी करणा- शेत अर्धेलीच्या करारानें दिलें असल्यास उत्पन्नहि दोघांचें तसें येथेंही जाणावें.

द्व्यामुष्यायणपुत्र दोघां पित्यास पिंड देऊन त्यांची जिंदगी पावतो.

कालीं ) संग करावा " अशा ( आचाराध्यायीं ) सांगितलेल्या विधीनें अपुत्र दीर इत्यादिकानें दुसऱ्याच्या स्त्रीचे ठाईं गुरूच्या नियोगेंकरून उत्पादित जो पुत्र तो हा दोघांच्या म्हणजे **बीजी** व क्षेत्री, ह्यांच्या जिंदगीचा यथाशास्त्र अधिकारी व पिंड देणारा होतो. ह्मणजे याचा अर्थ असाः– जर संग करण्याविषयीं गुरूच्या आज्ञेवरून **नियुक्त** जो दीर इत्यादिक तो स्वतांहि अपुत्र असून आपणास पुत्र पाहिजे आणि **क्षेत्रीला**हि पुत्र पाहिजे एतदर्थ संगत झाला तर त्यापासून जो पुत्र उत्पन्न होतो तो **द्विपितृक**, त्यालाच द्व्यामुष्यायण अशी संज्ञा आहे, तो दोघांच्याहि जिंदगीचा अधिकारी व दोघांसहि पिंड देणारा होतो.

नियुक्त पुत्रवान् आहे तर क्षेत्रीचाच पुत्र होतो.

२ जर नियुक्त ( दीर वगैरे ) पुत्रवान् असून केवळ क्षेत्रीलाच पुत्र असावा एतदर्थ प्रयत्न करितो, तर तो उत्पन्न झालेला क्षेत्रीचाच पुत्र होतो, बीजीचा नव्हे ह्मणून तो पुत्र बीजीच्या जिंदगीचा वारीस व श्राद्ध करणाराहि होत नाहीं.

मनुहि हेंच सांगतो.

**मनु**– ह्या क्षेत्रीं उत्पन्न झालेलें अपत्य आपलें दोघांचें होईल, असा नियम ( करार ) करून **क्षेत्रस्वामीनें** जें क्षेत्र, **बीजीला** संततीसाठीं दिलें जातें, त्या क्षेत्रीं झालेल्या अपत्याचे **बीजी** व **क्षेत्री** हे दोघे स्वामी होत असें ऋषींनीं सांगितलें आहे.

**मनु**– तसेंच, ह्या क्षेत्रीं उत्पन्न झालेलें अपत्य आपलें दोघांचें होईल, असा **बीजी** व **क्षेत्री** ह्यांचा परस्पर करार न होतां दुसऱ्याच्या क्षेत्रीं जें अपत्य उत्पन्न केलें जातें तें अपत्य क्षेत्रीचेंच होय; कारण, बीजापेक्षां क्षेत्र बलवत्तर होय; असा न्याय आहे. तो गाई, अश्व इत्यादिकांत तसा प्रकार पाहण्यांत येतो.

३ ह्या वचनांतहि जो **नियोग** सांगितला तो जी वाग्दत्ता झाली तीविषयींच जाणावा. कारण, त्याशिवाय दुसऱ्या **नियोगाचा** मनूनें निषेध सांगितला आहे.

**मनु**– (गुरूनें) **नियुक्त** जी स्त्री तिनें, संततीचा क्षय असतां दिरापासून किंवा **सपिंडा**पासून इष्ट प्रजा उत्पन्न करावी. अशा विधवा स्त्रीचे ठायीं **नियुक्तानें**हि घृताचा अभ्यंग करून व रात्रीं मौन धरून एक पुत्र उत्पन्न करावा, दुसरा करूं नये.

असा ( स्त्रीविषयीं ) नियोगाचा प्रकार प्रथमतः सांगून मनु आपणच त्याचा ( खालीं ) निषेध करितो.

**मनु**– द्विजांनीं विधवा स्त्रीला नियोगविधीकरून अन्य पुरुषापाशीं संग करावयास योजूं नये. कारण, अन्य पुरुषाशीं संगत होण्याविषयीं (स्त्रीला) नियोग करणारे सनातन धर्माचा नाश करितात. विवाहसंबंधी ( वेद ) मंत्रांत कोणत्याहि ठिकाणीं नियोगविधि सांगितला नाहीं, आणि विवाहविधीचे ठायीं विधवेचा पुनर्विवाहहि सांगितला नाहीं, ह्मणून याप्रमाणें विद्वान् द्विजांनीं हा **नियोग** केवळ पशुधर्म म्हणून निंदित केला आहे. ज्या कालीं

वेन राजा राज्य करीत होता त्या काळीं त्यानें हा नियोगधर्म मनुष्यांसहि चालू केला. ( असें सांगितलें आहे. ) प्राचीन काळांत कोणेक समयीं सर्व राजर्षींमध्यें श्रेष्ठ असा वेन नामक राजा सर्व पृथ्वीचें राज्य करीत असतां तो केवळ विषयलंपट होऊन वर्णांचा संकर करिता झाला, व त्या काळापासून मनुष्य अज्ञानेंकरून विधवा स्त्रीला अपत्यासाठीं नियोगविधीकरून परपुरुषापाशीं संगत होण्याविषयीं आज्ञा करावयास प्रवृत्त झाला, परंतु विद्वज्जन त्याची निंदा करितात.

४ एथें ( वरच्या मनुवचनांत ) नियोगाचा विधि व निषेध असे दोन प्रकार सांगितले आहेत यास्तव ( ज्याची इच्छा असेल त्यानें करावा व इच्छा नसेल त्यानें न करावा असा ) विकल्प आहे असें मानूं नये. कारण, नियोग करणारांची ( शास्त्रांत ) निंदा श्रुत आहे. आणखी स्त्रीधर्माचे ठायीं व्यभिचाराविषयीं बहुत दोषहि सांगितले आहेत, आणि इंद्रियनिग्रहाची विशेष प्रशंसा केली आहे.

मनुच सांगतो.

**मनु**– भर्ता मरण पावल्यानंतर स्त्रीनें शुद्ध कंद, मूलफलादिकांचें भक्षण करून देह अत्यंत क्षीण करावा. परंतु परपुरुषाचें नामहि घेऊं नये.

विधवेनें व्रतस्थ असावें.

" असा उपजीविकेसाठींहि परपुरुषाचे आश्रयाचा निषेध करून " विधवेनें मरणपर्यंत ( सर्व दुःख सहन करून ) क्षमाशील, नियतब्रह्मचर्य व्रत धारण करून पतिव्रता स्त्रियांचा जो परमोत्कृष्ट धर्म त्याचें पालन करीत राहावें. केवळ कौमारावस्थपासून ब्रह्मचर्यव्रतसंपन्न असे अनेक सहस्र ब्राह्मण संतति उत्पन्न न करितां स्वर्गलोकीं गेले आहेत. तशी भर्ता मृत झाल्यावर पतिव्रता स्त्री जर ब्रह्मचर्य धारण करून राहते तर ती अपुत्रा असूनहि स्वर्गलोकीं जाते, जसे ते ब्रह्मचारी गेले, आणि जी स्त्री अपत्यलोभानें परपुरुषाशीं संग करिते ती इहलोकीं निंदित होऊन अधोगतीस जाते.

असा ह्या ( वरील ) वचनेंकरून पुत्रार्थहि परपुरुषाचा समागम निषेधिला आहे.

५ तस्मात् नियोगाविषयीं शास्त्रांत विधि सांगितला आहे आणि निषेधहि सांगितला आहे, यास्तव दोन पक्षांचा विकल्प आहे असें ह्मणणें युक्त नाहीं.

## शाखा १९ वी.

ह्याप्रमाणें विवाहित स्त्रीच्या नियोगाविषयीं वर निषेध सांगितला, आतां कोणता नियोग यथाशास्त्र तें ( मनु ) सांगतो.

**मनु**– वाग्दान करून निश्चय झाल्यानंतर ज्या कन्येचा पति मृत होतो, तिच्याशीं ह्या विधीकरून, तिच्या सख्या दिरानें विवाह करावा. नंतर घृताभ्यंग, मौन यांहींकरून युक्त होऊन श्वेतवस्त्र परिधान केलेली व मनोवाक्कायसंयत अशा त्या स्त्रीशीं गर्भ धारण होईपर्यंत, प्रत्येक ऋतुकालीं एकेक वेळ एकांतीं संग करावा.

१ ज्याला वाग्दान करून कन्या दिली होती त्या पुरुषानें यथाशास्त्र कन्यादान घेतलें नाहीं तथापि त्या कन्येचा तो पति झाला, असें या वचनावरूनच प्राप्त होतें. तो जर

वाग्दान झाल्यावर मृत होईल तर त्याच्या ज्येष्ठ किंवा कनिष्ठ सोदर भ्रात्यानें त्या कन्ये-शीं विवाह करावा.

ह्याप्रमाणें यथाशास्त्र विवाह करून शुभ्रवस्त्र परिधान केलेली; मन, वाणी, शरीर ह्यांचें दमन करणारी अशा त्या स्त्रियेचे ठायीं त्यानेंहि घृताभ्यंग, मौन यांहीं युक्त होऊन गर्भ-धारण होईपर्यंत प्रत्येक ऋतुकालीं एकेक वेळ असा एकांतीं संग करावा.

जसे घृताभ्यंग, मौनधारण इत्यादि नियम, नियुक्त स्त्रीच्या संयोगाचें अंग आहेत, त्याप्रमाणेंच हा ( वर मनुवचनांत सांगितलेला ) वाचनिक विवाहहि अंग आहे, यास्तव ह्या विवाहसंस्कारेंकरून ती स्त्री दिराची भार्या होत नाहीं, ह्मणून त्या दिरापासून त्या स्त्रीचे ठायीं उत्पन्न झालेलें अपत्य क्षेत्रस्वामीचेंच होतें, दिराचें होत नाहीं. परंतु जर कदाचित् पहिला करार असेल तर उभयतांचेंहि होतें. १२७

---

**औरसो धर्मपत्नीजस्तत्समः पुत्रिकासुतः ।**
**क्षेत्रजः क्षेत्रजातस्तु सगोत्रेणेतरेण वा ॥ १२८ ॥**

समानासमानजातीयानां पुत्राणां विभागक्लृप्तिरुक्ता अधुना मुख्यगौणपुत्राणां दायग्रहणव्यवस्थां दर्शयिष्यन् तेषां स्वरूपं तावदाह ॥ उरसो जात औरसः पुत्रः स च धर्मपत्नीजः सवर्णा धर्मविवाहोढा धर्मपत्नी तस्यां जात औरसः पुत्रो मुख्यः । तत्समः पुत्रिकासुतः तत्सम औरससमः पुत्रिकायाः सुतः पुत्रिकासुतः । अत एवौरससमः ॥ यथाह वसिष्ठः । अभ्रातृकां प्रदास्यामि तुभ्यं कन्यामलंकृताम् । अस्यां यो जायते पुत्रः स मे पुत्रो भवेदितीति । अथवा पुत्रिकैव सुतः पुत्रिकासुतः सोप्यौरससम एव पित्रवयवानामल्पत्वात् मात्रवयवानां बाहुल्याच्च ॥ यथाह वसिष्ठः । द्वितीयः पुत्रिकैवेति । द्वितीयः पुत्रः पुत्रिकैवेत्यर्थः ॥ द्व्यामुष्यायणस्तु जनकस्यौरसादपकृष्टोऽन्यक्षेत्रोत्पन्नत्वात् । क्षेत्रजः क्षेत्रजातस्तु सगोत्रेणेतरेण वा । इतरेणासपिण्डेन देवरेण वोत्पन्नः पुत्रः क्षेत्रजः ॥ १२८ ॥

शाखा २० वी.

समानजातीय पुत्रांचे आणि भिन्नजातीय पुत्राचे विभाग सांगितले. आतां मुख्य व गौण पुत्र ह्यांस विभाग घेण्याची व्यवस्था दाखवीत होत्साता प्रथमतः त्यांचें स्वरूप सांगतो.

मूलार्थ– धर्मपत्नीचे ठायीं आपणापासून उत्पन्न झालेला जो पुत्र तो औरस पुत्र; त्यासारखाच पुत्रिकासुत; सगोत्रापासून किंवा इतरापासून आपल्या क्षेत्राचे ठायीं उत्पन्न झालेला तो क्षेत्रज पुत्र.

टीकार्थ– १ स्वकीय वर्णांतली असून धर्म्य विवाहविधीकरून वरलेली जी स्त्री ती धर्मपत्नी. तिचे ठाईं आपणापासून उत्पन्न झालेला जो पुत्र तो औरस, हा सर्व पुत्रांत मुख्य होय.

औरस पुत्र.

२ **पुत्रिकासुत** म्हणजे कन्येचा पुत्र हाहि औरसासारखाच ( कारण कन्याहि औरसच आहे यास्तव तिजपासून झालेला पुत्रहि औरसासारखा, परंतु त्याला औरसत्व मात्र नाहीं. )

पुत्रिकासुत.

**वसिष्ठ– अभ्रातृक** कन्या मी तुला सालंकृत करून देतों, ह्या कन्येला जो **पुत्र** होईल तो माझा पुत्र ( असा कन्यादान करतेवेळेस करार करून दिलेल्या कन्येला झालेला पुत्र ) अथवा पुत्रिकाच पुत्ररूपेंकरून मानली तर तो पुत्रिकासुत औरसपुत्रासमानच आहे. कारण, कन्येच्या ठाईं पित्याचे अवयव अल्प आणि मातेचे अवयव बहुत आहेत.

**वसिष्ठ** सांगतो– कन्या हा द्वितीय पुत्रच आहे.

३ **द्व्यामुष्यायण** पुत्र हा जनकाचा पुत्र तर खरा परंतु परकीय **क्षेत्रीं** उत्पन्न झाला यास्तव **औरसापेक्षां निकृष्ट.**

द्व्यामुष्यायण पुत्र.

**क्षेत्रज** पुत्र ह्मणजे जो सपिंडापासून किंवा दिरापासून उत्पन्न होतो तो. १२८

क्षेत्रज पुत्र.

---

**गृहे प्रच्छन्न उत्पन्नो गूढजस्तु सुतः स्मृतः ।**
**कानीनः कन्यकाजातो मातामहसुतो मतः ॥ १२९ ॥**

गूढजः पुत्रो भर्तृगृहे प्रच्छन्न उत्पन्नो हीनाधिकजातीयपुरुषजत्वपरिहारेण पुरुषविशेषजत्वनिश्चयाभावेपि सवर्णजत्वनिश्चये सति बोद्धव्यं । कानीनस्तु कन्यकायामुत्पन्नः पूर्ववत्सवर्णात्समातामहस्य पुत्रः । यद्यनूढा सा भवेत्तथा पितृगृह एव संस्थिता । अथोढा तदा वोढुरेव पुत्रः ॥ यथाह मनुः । पितृवेश्मनि कन्या तु यं पुत्रं जनयेद्रहः । तं कानीनं वदेन्नाम्ना वोढुः कन्यासमुद्भव इति ॥ १२९ ॥

**मूलार्थ–** भर्त्याच्या घरीं गुप्त रीतीनें जो उत्पन्न तो गूढजपुत्र आणि कन्येच्या ठाईं उत्पन्न झालेला तो कानीन, तो मातामहाचा पुत्र ह्मटला आहे.

**टीकार्थ–** ४ भर्त्याच्या गृहीं गुप्तपणानें उत्पन्न झालेला परंतु नीचजातीय नसून किंवा उत्कृष्टजातीय नसून हा अमुक पुरुषापासून झाला असा निश्चय नसतांहि सवर्णापासून झालेला इतका निश्चय असला पाहिजे.

गूढज पुत्र.

५ **कानीन** ह्मणजे जो कन्येचे ठाईं सवर्ण पुरुषापासून जन्मला तो मातामहाचा पुत्र, परंतु जर ती कन्या अविवाहित असली आणि पित्याच्या घरींच राहत आहे तर. विवाहित असल्यास तो पुत्र, ज्याशीं विवाह झाला त्याचा समजावा.

कानीनपुत्र.

**मनु–** कन्या पितृगृहीं असतां एकांतीं जो पुत्र जन्मला जातो त्याला कानीन ह्मटलें आहे आणि ज्याशीं त्या कन्येचा विवाह झाला असेल त्याचा तो पुत्र होतो. १२९

---

**अक्षतायां क्षतायां वा जातः पौनर्भवः सुतः ।**
**दद्यान्माता पिता वा यं स पुत्रो दत्तको भवेत् ॥ १३० ॥**

पौनर्भवस्तु पुत्रोऽक्षतायां क्षतायां वा पुनर्भ्वां सवर्णादुत्पन्नः । मात्रा भर्त्रनुज्ञया प्रोषिते प्रेते वा भर्तरि पित्रा वोभाभ्यां वा सवर्णाय यस्मै दीयते स तस्य दत्तकः पुत्रः ॥ यथाह मनुः ॥ माता पिता वा दद्यातां यमद्भिः पुत्रमापदि । सदृशं प्रीतिसंयुक्तं स ज्ञेयो दत्त्रिमः सुत इति । आपद्ग्रहणादनापदि न देयः दातुरयं प्रतिषेधः। तथा एकपुत्रो न देयः। न त्वेवैकं पुत्रं दद्यात् । प्रतिगृह्णीयाद्वेति वसिष्ठस्मरणात्। तथानेकपुत्रसद्भावेपि ज्येष्ठो न देयः । ज्येष्ठेन जातमात्रेण पुत्री भवति मानव इति । तस्यैव पुत्रकार्यकरणे मुख्यत्वात् । पुत्रप्रतिग्रहप्रकारश्च पुत्रं प्रतिग्रहीष्यन्बन्धूनाहूय राजनि चावेद्य निवेशनमध्ये व्याहृतिभिर्हुत्वा अदूरबान्धवं बन्धुसन्निकृष्ट एव प्रतिगृह्णीयादिति वसिष्ठेनोक्तः । अदूरबान्धवमित्यत्यन्तदेशभाषाविप्रकृष्टस्य प्रतिषेधः । एवं क्रीतस्वयंदत्तकृत्रिमेष्वपि योजनीयम् । समानन्यायत्वात् ॥ १३० ॥

**मूलार्थ**— अक्षत किंवा क्षत अशा पुनर्भूचे ठाई जो उत्पन्न झाला तो पौनर्भव पुत्र. माता किंवा पिता यांनीं जो दिला जातो तो दत्तकपुत्र.

**टीकार्थ**— ६ पौनर्भव ह्मणजे क्षता किंवा अक्षता ( अशी दोन प्रकारची प्रथमाध्यायांत सांगितलेली ) जी पुनर्भू स्त्री तिचे ठाई सवर्णापासून उत्पन्न झालेला जो पुत्र तो.

पौनर्भवपुत्र.

### शाखा २१ वी.

१ **दत्तक** म्हणजे, भर्ता परदेशगत असतां किंवा मृत असतां त्याच्या आज्ञेवरून मातेनें किंवा पित्यानें अगर उभयतांनींहि ज्या कोणी सवर्णाला पुत्र यथाविधि दिला जातो तो त्याचा दत्तकपुत्र होतो.

दत्तकपुत्र.

**मनु**— मातेनें किंवा पित्यानें अथवा उभयतांनीं परस्परांच्या संमतीनें आपत्कालीं प्रीतीनें उदकदानपूर्वक जो सदृश ( समान जातीचा ) पुत्र ज्यास दिला जातो तो त्याचा **दत्तक** पुत्र जाणावा.

२ ( **वरील मनुवचनांत**) आपत्कालीं असें ह्मटल्यावरून आपत्काल नसल्यास पुत्र देऊं नये परंतु हा निषेध देणारास ( घेणाराला नाहीं), तसेंच एकच पुत्र असेल तर तो देऊं नये व घेऊंहि नये; कारण,

एकुलता पुत्र दत्तक देऊं नये.

**वसिष्ठ**— एकुलता पुत्र देऊं नये आणि घेऊंहि नये.

तसेंच अनेक पुत्र असले तरी वडील पुत्र दत्तक देऊं नये. कारण "ज्येष्ठ पुत्र झाल्यानें मनुष्य पुत्रवान् होतो" ह्मणून पितृकार्य करण्याविषयीं ज्येष्ठपुत्रासच मुख्यत्व सांगितलें आहे.

अनेक पुत्र असले तरी ज्येष्ठ पुत्र देऊं नये.

दत्तक घेण्याचा प्रकार.

**वसिष्ठ–** ३ दत्तक घेणारानें बंधूंस बोलावून राजाला निवेदन करून मध्य घरांत होम करून दत्तक घ्यावा. आणि तो अदूरबांधव (ह्मणजे ज्याचे बंधु दूर देशीं नाहींत असा ) व बंधुसंनिकृष्ट (ह्मणजे जवळचाच) घ्यावा.

दत्तक घेण्याचा विधि.

अदूरबांधव शब्देंकरून अत्यंत दूरदेश व भाषाभेद ह्यांचा निषेध सांगितला.

ह्याप्रमाणेंच क्रीत, स्वयंदत्त, कृत्रिम ह्या पुत्रांविषयीं योजावें; कारण, दत्तकाप्रमाणेंच त्यांचाहि प्रकार आहे. १३०

---

**क्रीतश्च ताभ्यां विक्रीतः कृत्रिमः स्यात्स्वयंकृतः ।**
**दत्तात्मा तु स्वयंदत्तो गर्भे विन्नः सहोढजः ॥ १३१ ॥**

क्रीतस्तु पुत्रस्ताभ्यां मातापितृभ्यां मात्रा पित्रा वा विक्रीतः पूर्ववत् तथैकं ज्येष्ठं च पुत्रं वर्जयित्वा आपदि सवर्ण इत्येव । यत्तु मनुनोक्तम् । क्रीणीयाद्यस्त्वप-त्यार्थं मातापित्रोर्यमन्तिकात् । स क्रीतकः सुतस्तस्य सदृशोऽसदृशोपि वेति । त-द्गुणैः सदृशोऽसदृशो वेति व्याख्येयम् । न जात्या सजातीयेष्वयं प्रोक्त इत्युपसंहा-रात् । कृत्रिमः स्यात्स्वयंकृतः कृत्रिमस्तु पुत्रः स्वयं पुत्रार्थिना धनक्षेत्रप्रदर्शनादि-प्रलोभनैव पुत्रीकृतो मातापितृविहीनस्तत्सद्भावे तत्परतन्त्रत्वात् दत्तात्मा तु पुत्रो यो मातापितृविहीनस्ताभ्यां त्यक्तो वा तवाहं पुत्रो भवामीति स्वयं दत्तत्वमुपगतः । सहोढजस्तु गर्भे स्थितो गर्भिण्यां परिणीतायां यः परिणीतः स सहोढजः पुत्रः॥१३१

शाखा २२ वी.

**मूलार्थ–** मातापितरांनीं जो विकला तो क्रीतपुत्र, जो स्वतां पुत्रत्वेंकरून केलेला तो कृत्रिमपुत्र, जो स्वतांच दुसऱ्याचा पुत्र होतो तो स्वयंदत्त आणि गर्भिणी स्त्रीशीं विवाह केला असतां जो पुत्र होतो तो सहोढज.

**टीकार्थ–** १ क्रीतपुत्र ह्मणजे जो आईबापांनीं मिळून अथवा आईनें किंवा बापानें विकला त्याचा तो क्रीतपुत्र. येथेंहि दत्तकाप्रमाणेंच पुत्रविक्रय करणें तर आपत्कालींच आणि सवर्णास करावा. परंतु वडील किंवा एकुलता विकूं नये.

क्रीतपुत्र.

**मनु–** जो संतत्यर्थ ज्या सदृश किंवा असदृश पुत्राला आईबापांजवळून विकत घेतो, तो त्या विकत घेणाराचा क्रीतपुत्र होतो.

असें जें सांगितलें तेथें सदृश असदृश म्हणजे गुणेंकरून सदृश किंवा असदृश असा त्याचा अर्थ, जातीनें सदृश असदृश असें नाहीं. कारण ( २४ व्या शाखेंत ) "मी स-जातीय पुत्रांविषयीं हा विधि सांगितला आहे" असा शेवटीं उपसंहार केलाच आहे.

२ **कृत्रिमपुत्र** ह्मणजे जो पुत्रार्थीनें स्वतां धन क्षेत्र इत्यादिक आपले जिंदगीचा लोभ दाखवून केलेला तो. परंतु तो मातापितृहीन असला पाहिजे. कारण, आईबाप असतां तो त्यांच्या स्वाधीन. (आंगचा धनी नाहीं.)

कृत्रिमपुत्र.

३ **स्वयंदत्त** ह्मणजे दत्तात्मा, जो मातापितृविहीन किंवा आईबाप जिवंत असून त्यांनीं टाकलेला असा असून 'मी तुझा पुत्र होतों' असें बोलून स्वतां प्राप्त झालेला तो.

स्वयंदत्त.

४ **सहोढज** ह्मणजे जो गर्भांत असून गर्भिणीचा विवाह झाला असतां तिजबरोबर विवाहित होतो तो. १३१

सहोढज.

---

## उत्सृष्टो गृह्यते यस्तु सोपविद्धो भवेत्सुतः ।

**अपविद्धो मातापितृभ्यामुत्सृष्टो यो गृह्यते स गृहीतुः पुत्रः । सर्वत्र सवर्ण इत्येव ॥**

**मूलार्थ**— टाकिलेला जो पुत्रत्वेंकरून घेतला तो **अपविद्ध पुत्र.**

**टीकार्थ**—५ **अपविद्ध** ह्मणजे जो आईबापांनीं टाकलेला असतां दुसऱ्यानें कोणी घेतला जातो तो त्या घेणाराचा पुत्र होतो.

वर जे पुत्रांचे प्रकार सांगितले ते सर्वत्र सजातीयांविषयीं जाणावे.

**एवं मुख्यामुख्यपुत्राननुक्रम्यैतेषां दायग्रहणे क्रममाह ॥**

## पिण्डदोंशहरश्चैषां पूर्वाभावे परः परः ॥ १३२ ॥

**एतेषां पूर्वोक्तानां पुत्राणां द्वादशानां पूर्वस्य पूर्वस्याभावे उत्तरः उत्तरः पिण्डदः श्राद्धदोऽशहरो धनहरो वेदितव्यः । औरसपौत्रिकेयसमवाये औरसस्यैव धनग्रहणे प्राप्ते मनुरपवादमाह ॥ पुत्रिकायां कृतायां तु यदि पुत्रोऽनुजायते । समस्तत्र विभागः स्यात् ज्येष्ठता नास्ति हि स्त्रिया इति ॥ तथा अन्येषामपि पूर्वस्मिन् पूर्वस्मिन् सत्यप्युत्तरेषां पुत्राणां चतुर्थांशभागित्वमुक्तं वसिष्ठेन । तस्मिंश्चेत्प्रतिगृहीते औरस उत्पद्येत चतुर्थभागभागी स्यात् दत्तक इति । दत्तकग्रहणं क्रीतकृत्रिमादीनां प्रदर्शनार्थम् । पुत्रीकरणाविशेषात् । तथा च कात्यायनः । उत्पन्ने त्वौरसे पुत्रे चतुर्थांशहराः सुताः । सवर्णा असवर्णास्तु ग्रासाच्छादनभाजना इति । सवर्णा दत्तकक्षेत्रजादयस्ते सत्यौरसे चतुर्थांशहराः । असवर्णाः कानीनगूढोत्पन्नसहोढजपौनर्भवास्ते त्वौरसे सति न चतुर्थांशहराः किंतु ग्रासाच्छादनभाजनाः । यदपि विष्णुवचनम् ॥ अप्रशस्तास्तु कानीनगूढोत्पन्नसहोढजाः । पौनर्भवश्च नैवैते पिण्डरिक्थांशभागिन इति ॥ तदप्यौरसे सति चतुर्थांशनिषेधपरमेव । औरसाद्यभावे तु कानीनादीनामपि सकलपित्र्यधनग्रहणमस्त्येव । पूर्वाभावे परः पर इति वचनात् । यदपि मनुवचनम् । एक एवौरसः पुत्रः पित्र्यस्य वसुनः प्रभुः । शेषाणामानृशंस्यार्थं प्रदद्यात्तु प्रजीवनमिति । तदपि दत्तकादीनामौरसप्रतिकूलत्वे निर्गुणत्वे च वेदितव्यम् । तत्र क्षेत्रजस्य विशेषो दर्शितस्तेनैव । षष्ठं तु क्षेत्रजस्यांशं प्रदद्यात्पैतृकाद्धनात् । औरसो विभजन्**

दायं पित्र्यं पञ्चममेव वेति। प्रतिकूलत्वनिर्गुणत्वसमुच्चये षष्ठमंशम्। एकतरसद्भावे पञ्चममिति विवेक्तव्यं। यदपि मनुना पुत्राणां षट्कद्वयमुपन्यस्य पूर्वषट्कस्य दायादबान्धवत्वमुक्तं उत्तरषट्कस्यादायादबान्धवत्वमुक्तम्। औरसः क्षेत्रजश्चैव दत्तः कृत्रिम एव च। गूढोत्पन्नोऽपविद्धश्च दायादा बान्धवाश्च षट्। कानीनश्च सहोढश्च क्रीतः पौनर्भवस्तथा। स्वयंदत्तश्च शौद्रश्च षडदायादबान्धवा इति। तदपि स्वपितृसपिण्डसमानोदकानां सन्निहितरिक्थहरान्तराभावे पूर्वषट्कस्य तद्रिक्थहरत्वमुत्तरषट्कस्य तु तन्नास्ति। बान्धवत्वं पुनः समानगोत्रत्वेन सपिण्डत्वेन चोदकप्रदानादिकार्यकरत्वं वर्गद्वयस्यापि सममेवेति व्याख्येयम्॥ गोत्ररिक्थे जनयितुर्न भजेद्दत्रिमः सुतः। गोत्ररिक्थानुगः पिण्डो व्यपैति ददतः स्वधेत्यत्र दत्रिमग्रहणस्य पुत्रप्रतिनिधिप्रदर्शनार्थत्वात्। पितृधनहारित्वं तु पूर्वस्य पूर्वस्याभावे सर्वेषामविशिष्टम्। न भ्रातरो न पितरः पुत्रा रिक्थहराः पितुरित्यौरसव्यतिरिक्तानां पुत्रप्रतिनिधीनां सर्वेषां रिक्थहारित्वप्रतिपादनपरत्वात्। औरसस्य तु एक एवौरसः पुत्रः पित्र्यस्य वसुनः प्रभुरित्यनेनैव रिक्थभाक्त्वस्योक्तत्वात्। दायादशब्दस्य दायादानपि दापयेदित्यादौ पुत्रव्यतिरिक्तरिक्थभाग्विषयत्वेन प्रसिद्धत्वाच्च। वासिष्ठादिषु वर्गद्वयेऽपि कस्यचिद्व्यत्ययेन पाठो गुणवदगुणवद्विषयो वेदितव्यः। गौतमीये तु पौत्रिकेयस्य दशमत्वेन पाठो विजातीयविषयः तस्मात्स्थितमेतत्पूर्वपूर्वाभावे परः परोऽशभागिति॥ यत्तु भ्रातॄणामेकजातानामेकश्चेत्पुत्रवान् भवेत्। सर्वे ते तेन पुत्रेण पुत्रिणो मनुरब्रवीदिति। तदपि भ्रातृपुत्रस्य पुत्रीकरणसंभवेऽन्येषां पुत्रीकरणनिषेधार्थम्। न पुनः पुत्रत्वप्रतिपादनाय। तत्सुतो गोत्रजो बन्धुरित्यनेन विरोधात्॥ १३२॥

## शाखा २३ वी.

याप्रमाणें मुख्य व गौण पुत्रांचा अनुक्रम सांगून त्यांचे विभागाविषयीं क्रम ( अर्ध्या वचनेंकरून ) सांगतो.

**मूलार्थ–** ह्यांमध्यें पहिल्याच्या अभावीं दुसरा, त्याच्या अभावीं तिसरा, असा उत्तरोत्तर पिंड देणारा व जिंदगी घेणारा होतो.

**टीकार्थ–** १ हे जे पूर्वी १२ प्रकारचे पुत्र सांगितले त्यांमध्यें पहिल्या पुत्राच्या अभावीं दुसरा, त्याच्या अभावीं तिसरा, तिसऱ्याच्या अभावीं चौथा अशा ( बाराव्या पुत्रापर्यंत ) क्रमानें पिंड देणारा ( श्राद्ध करणारा ) व जिंदगी घेणारा अधिकारी जाणावा.

वर सांगितलेल्या पुत्रांस विभाग मिळण्याचा क्रम.

**औरस आणि पुत्रिकासुत** हे दोघेहि विद्यमान असतील तर जिंदगीचा अधिकारी औरस पुत्र असें (२० व्या शाखेच्या २ ऱ्या अंकावरून) प्राप्त झालें त्याचा अपवाद मनु सांगतो.

**मनु–** २ पुत्रिकासुत कल्पिल्यानंतर जर औरस पुत्र होईल तर दोघांस समसमान विभाग मिळेल, कारण, स्त्रियांस ज्येष्ठत्व नाहीं ( ह्मणून ज्येष्ठ पुत्राला मिळण्याविषयीं शास्त्रांत सांगितलेला श्रेष्ठ भाग मिळणार नाहीं असें तात्पर्य).

वसिष्ठ तर सर्व पुत्रांमध्यें पूर्व पूर्व पुत्र असतां इतर पुत्र चतुर्थांशाचा अधिकारी होतो असें सांगतो.

**वसिष्ठ**– ३ दत्तक घेतल्यावर जर औरस पुत्र होईल तर दत्तक चतुर्थांशाचा विभागी होतो.

दत्तक घेतल्यावर औरस झाला तर दत्तकाला चतुर्थांश.

४ दत्तकाविषयीं जो वर सांगितलेला प्रकार तो, क्रीतपुत्र, कृत्रिमपुत्र इत्यादिकांविषयींहि जाणावा. कारण, त्यांविषयींहि पुत्रीकरणाचा विधि समान ( दत्तकाप्रमाणेंच ) आहे.

**कात्यायनहि** तसेंच सांगतो– औरस पुत्र झाल्यावर इतर पुत्र चौथ्या हिशाचे विभागी होतात. परंतु ते जर **सवर्ण** आहेत तर, **असवर्ण** आहेत तर आन्नाच्छादन मात्र पावतात.

औरस पुत्र असल्यास सवर्ण पुत्र चौथ्या हिशाचे अधिकारी, असवर्ण अन्नाच्छादन मात्र पावतील.

**सवर्ण** ह्मणजे क्षेत्रज, दत्तक, इत्यादिक; ते **औरस** असतां चतुर्थांशाचे विभागी होतात. आणि **असवर्ण** ह्मणजे **कानीन, गूढोत्पन्न, सहोढ, पौनर्भव;** हे **औरस** असतां चौथ्या हिशाचे देखील वारस होत नाहींत. केवळ अन्नाच्छादन मात्र पावतील.

**विष्णु**– ५ **कानीन, गूढोत्पन्न, सहोढज, पौनर्भव,** हे **असवर्ण** आहेत ह्मणून श्राद्ध करण्यास व जिंदगी घेण्यास अधिकारीच होत नाहींत.

असें जें वचन आहे तेंहि जर **औरस** पुत्र असला तर **असवर्णांस** चतुर्थांशाच्या निषेधाविषयीं जाणावें. औरसादिकांच्या अभावीं तर कानीनादिकांसहि पित्याची सगळी जिंदगी घेण्यास अधिकार आहेच. कारण " पहिल्याच्या अभावीं दुसरा, त्याच्या अभावीं तिसरा " वगैरे प्रकार पहिल्या अंकाचे मूळ वचनांत सांगितलाच आहे.

**मनु**– ६ एक **औरस** पुत्र मात्र पित्याच्या जिंदगीचा मालक होतो; त्यानें इतर पुत्रांस जीवनासाठीं अन्नाच्छादन मात्र द्यावें.

असें जें वचन आहे तें दत्तकादिक पुत्र जर निर्गुण किंवा औरसाशीं प्रतिकूळ आहेत तर त्यांविषयीं जाणावें.

त्यांत क्षेत्रज पुत्राविषयीं तोच ( मनु ) विशेष सांगतो.

**मनु**– ७ औरस पुत्रानें पित्याच्या जिंदगीचा विभाग करिते समयीं क्षेत्रजपुत्रास पित्याच्या जिंदगींतून सहावा अथवा पांचवा हिसा द्यावा.

औरस, असतां निर्गुण क्षेत्रज पुत्र पांचव्या हिशाचा अधिकारी.

त्यांत (सहावा अथवा पांचवा विभाग ह्या विकल्पाचें तात्पर्य असें कीं) प्रतिकूळ असून निर्गुण आहे तर सहावा आणि प्रतिकूळ किंवा निर्गुण आहे तर पांचवा असें योजावें.

मनु तर पुत्रांच्या दोन षट्कांचा उपन्यास करून पहिलें षट्क वारस बंधु व दुसरें षट्क वारस नसतां बंधु असें सांगतो.

**मनु**– ८ **औरस, क्षेत्रज, दत्तक, कृत्रिम, गूढोत्पन्न,** आणि **अपविद्ध** हे सहा

'वारस बंधु, व कानीन, सहोढज, पौनर्भव, क्रीत, स्वयंदत्त, व शूद्रापुत्र, हे वारस नसतां बंधु.

असें जें वचन त्याचीहि व्याख्या अशी कीं आपल्या पित्याचे जे सपिंड व समानोदक ह्यांचा जवळचा कोणी जिंदगी घेणारा नसल्यास प्रथम षट्काला मात्र त्यांची जिंदगी घेण्याचा अधिकार आहे. दुसरे षट्काला तर त्यांच्या अभावीं देखील जिंदगी घेण्याचा अधिकार नाहीं. बंधुत्व मात्र, एकगोत्रत्वेंकरून व सापिंड्येंकरून आहे. उदकप्रदान (तिलांजलि) इत्यादि क्रिया करणें षट्कद्वयास समान जाणावें.

दत्तक पुत्र आपल्या जनक पित्याचें गोत्र व जिंदगी पावत नाहीं.

**मनु**— ९ दत्तक पुत्र आपल्या जनकपित्याचें गोत्र व जिंदगी ह्यांचा अधिकारी होत नाहीं. (तर ज्याचा दत्तक होतो त्याचें गोत्र व जिंदगी पावतो) तसेंच पिंडदान (श्राद्धादिक)हि ज्याचें गोत्र व जिंदगी पावतो त्याच्या उद्देशेंकरून करावें; कारण, देणारापासून ह्मणजे जनकापासून स्वधा (श्राद्धादि करणें) निवृत्त होतें.

१० वरच्या (मनु) वचनांत दत्तक असें जें ह्मटलें तें पुत्रांच्या प्रतिनिधींचे उपलक्षणार्थ आहे असें जाणावें.

पित्याची जिंदगी घेण्याचा अधिकार तर पहिल्याच्या अभावीं दुसरा अशा अनुक्रमानें उत्तरोत्तर सर्वांस समानच आहे.

**मनु**— पुत्रच पित्याची जिंदगी घेण्याविषयीं अधिकारी होतात; भ्राते होत नाहींत व पितर (आईबाप) हि होत नाहींत.

असें औरसाखेरीज (पुत्रिकासुत) वगैरे जे पुत्रप्रतिनिधि त्यांस जिंदगी घेण्याविषयीं प्रतिपादन केलें आहे.

११ औरस पुत्रास तर "एकटा औरस पुत्रच पित्याच्या जिंदगीचा मालक" येणेंकरून जिंदगी घेण्याचा अधिकार सांगितलाच आहे.

१२ वारस शब्द तर "वारसांसहि देववावें" इत्यादिक स्थळीं पुत्राखेरीज इतर जे जिंदगी घेणारे त्यांचा वाचक प्रसिद्धच आहे.

वसिष्ठ इत्यादिकांच्या[२] वचनांतील षट्कद्वयांतहि कोणी एकाचा व्यत्यासेंकरून[३] पाठ केला आहे; तो सगुण, निर्गुण, ह्या विषयभेदानें जाणावा.

---

१ शूद्रापुत्र म्हणजे जो ब्राह्मणापासून विवाहित शूद्रेच्या ठायीं जन्मला तो अनुलोमज औरस पुत्र खरा, परंतु द्वादशविध पुत्रांतून अन्यतम असतां त्याला पित्याची जिंदगी घेण्यास अधिकार नाहीं. ह्मणून ह्या प्रकरणीं मनूनें (औरस पुत्रांत अंतर्भाव न करितां) शेवटीं निवेश केला. २ इत्यादि शब्देंकरून कात्यायन, विष्णु, मनु वगैरे. ३ व्यत्यास म्हणजे असा, २० व्या शाखेंत याज्ञवल्क्यानें तर औरस, पुत्रिकासुत, क्षेत्रज, गूढज, कानीन, पौनर्भव, दत्तक, क्रीत, कृत्रिम, स्वयंदत्त, सहोढ, आणि अपविद्ध, असा बारा प्रकारचे पुत्रांचा अनुक्रम सांगितला. परंतु स्मृत्यंतरीं अन्यथा प्रकार सांगितला. त्याच शाखेच्या २ ऱ्या अंकांतील दुसऱ्या वसिष्ठवचनांत कन्या हाच दुसरा पुत्र असें सांगितलें. २३ व्या शाखेंत ४ थ्या अंकांत कात्यायनानेंहि सवर्ण आणि असवर्ण अशा दोन कोटी करून, असवर्ण कोटींत

गौतमवचनांत तर पौत्रिकेय दहावा असें सांगितलें आहे. तें विजातीयाविषयीं जाणावें.

१३ तस्मात् पहिल्याच्या अभावीं दुसरा, त्याच्या अभावीं तिसरा, असे उत्तरोत्तर बाराव्या पुत्रापर्यंत विभागाचे अधिकारी होतात असें सिद्ध झालें.

**मनु**— सोदर भ्रात्यांत एक जरी भ्राता पुत्रवान् होईल तरी त्या पुत्रेंकरून सर्व सोदर भ्राते पुत्रवंत होतात असें मनु बोलला.

भ्रात्याचा पुत्र असतां इतर पुत्र दत्तक घेऊं नये.

असें जें वचन आहे तेंहि पुतण्याला पुत्र करणें संभवत असतां इतरांस पुत्र करण्याविषयीं निषेध आहे, असें सुचविण्यासाठीं सांगितलें. केवळ पुतण्याच पुत्र होतो असें प्रतिपादन करण्यासाठीं सांगितलें नाहीं. कारण " भ्राता, त्याच्या अभावीं भ्रात्याचा पुत्र, त्याच्या अभावीं गोत्रज, त्याच्या अभावीं बांधव " असें पुढें (२६ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितलें त्याशीं विरोध येईल.

---

## सजातीयेष्वयं प्रोक्तस्तनयेषु मया विधिः ।

इदानीमुक्तोपसंहारव्याजेन तत्रैव नियममाह ॥ समानजातीयेष्वेव पुत्रेषु अयं पूर्वाभावे परः पर इत्युक्तो विधिः न भिन्नजातीयेषु । तत्र च कानीनगूढोत्पन्नसहोढजपौनर्भवाणां सवर्णत्वं जनकद्वारेण न स्वरूपेण तेषां वर्णजातिलक्षणाभावस्योक्तत्वात् । तथानुलोमजानां मूर्धावसिक्तादीनामौरसेष्वन्तर्भावात्तेषामप्यभावे क्षेत्रजादीनां दायहरत्वं बोद्धव्यम् । शूद्रापुत्रस्त्वौरसोऽपि कृत्स्नं भागमन्याभावेपि न लभते॥यथाह मनुः । यद्यपि स्यात्तु सत्पुत्रो यद्यपुत्रोऽपि वा भवेत् । नाधिकं दशमाद्दद्याच्छूद्रापुत्राय धर्मत इति । यदि सत्पुत्रो विद्यमानद्विजातिपुत्रो यद्यपुत्रोऽविद्यमानद्विजातिपुत्रो वा स्यात्तस्मिन्मृते क्षेत्रजादिर्वान्यो वाऽसपिण्डः शूद्रापुत्राय तद्धनाद्दशमांशादधिकं न दद्यादित्यस्मादेव क्षत्रियावैश्यापुत्रयोः सवर्णापुत्राभावे सकलधनग्रहणं गम्यते ॥

### शाखा २४ वी.

आतां सांगितलेल्या विस्ताराचा उपसंहार करून त्याविषयींच कांहीं नियम ( अर्ध्या वचनेंकरून ) सांगतो.

**मूलार्थ**— मी सजातीय पुत्रांविषयीं हा विधि सांगितला आहे.

**टीकार्थ**— १ पहिल्याच्या अभावीं दुसरा, दुसऱ्याच्या अभावीं तिसरा, असा उत्तरोत्तर पिंड देणारा व जिंदगी घेणारा होतो असा जो पूर्वीं ( २३ व्या शाखेच्या १ल्या

---

कानीन, गूढोत्पन्न, सहोढ, पौनर्भव, ह्यांचा निवेश केला. ५ व्या अंकांत विष्णूनें, तसेंच मनूनें वारस बंधु आणि वारस नसतां बंधु अशा दोन कोटी करून, वारस बंधूचे कोटीमध्यें औरस, क्षेत्रज, दत्तक, स्वयंकृत, गूढोत्पन्न, अपविद्ध, ह्यांचा निवेश केला. आणि वारस नसतां बंधूचे कोटींत कानीन, सहोढ, क्रीत, पौनर्भव, स्वयंदत्त, व शूद्रापुत्र; ह्यांचा निवेश केला.

अंकाचे वचनांत) सांगितलेला प्रकार तो समानजातीय पुत्रांविषयींच जाणावा, भिन्नजातीय पुत्रांविषयीं नव्हे.

त्यांमध्यें (बारा पुत्रांमध्येंहि) कानीन, गूढज, सहोढज, आणि पौनर्भव हे पित्याच्या द्वारें सवर्ण, स्वतां सवर्ण नाहींत; कारण, त्यांस (कानीन इत्यादिकांस) वर्ण (ब्राह्मणादिक) व जाति ह्यांच्या लक्षणाचा अभाव (प्रथमाध्यायांत) सांगितला आहे.

तसेंच अनुलोम जातीचे जे मूर्द्धावसिक्तादिक ह्यांचा औरसांत अंतर्भाव आहे. ह्मणून त्यांच्याहि अभावीं क्षेत्रजादि पुत्रांसहि दायग्रहणाविषयीं अधिकार जाणावा.

३ शूद्रापुत्र तर औरस असला तथापि इतर पुत्रांच्या अभावींहि तो सर्व जिंदगी पावत नाहीं.

शूद्रापुत्राला जिंदगी घेण्याचा अधिकार नाहीं.

**मनु**— जरी सत्पुत्र असला किंवा अपुत्र असला तरी शूद्रापुत्रास दशमांशापेक्षां अधिक देऊं नये, हें यथाधर्म जाणावें.

**अर्थ**— सत्पुत्र ह्मणजे द्विजाति पुत्र ज्यास आहेत तो, किंवा अपुत्र ह्मणजे ज्यास द्विजाति पुत्र नाहींत तो, असा असून तो मरण पावला असतां त्याचा क्षेत्रजादिक पुत्र अथवा इतर कोणी गोत्रज ह्यानें मयताच्या जिंदगींतून शूद्रापुत्राला दशमांशापेक्षां अधिक देऊं नये.

येणेंकरून (वरील मनुवचनावरून) सवर्णापुत्राच्या अभावीं क्षत्रियापुत्रांनीं व वैश्यापुत्रांनीं सर्व जिंदगी घ्यावी असें सुचविलें जातें. १३२

अधुना शूद्रधनविभागे विशेषमाह ॥

**जातोऽपि दास्यां शूद्रेण कामतोंऽशहरो भवेत् ॥ १३३ ॥**
**मृते पितरि कुर्युस्तं भ्रातरस्त्वर्द्धभागिकम् ।**
**अभ्रातृको हरेत्सर्वं दुहितॄणां सुताहते ॥ १३४ ॥**

शूद्रेण दास्यामुत्पन्नः पुत्रः कामतः पितुरिच्छया भागं लभते । पितुरूर्ध्वं तु यदि परिणीतापुत्राः सन्ति तदा ते भ्रातरस्तं दासीपुत्रं अर्धभागिनं कुर्युः स्वभागादर्द्धं दद्युरित्यर्थः । अथ परिणीतापुत्रा न सन्ति तदा कृत्स्नं धनं दासीपुत्रो गृह्णीयात् । यदि परिणीतादुहितरस्तत्पुत्रा वा न सन्ति तत्सद्भावे त्वर्द्धभागिक एव दासीपुत्रः। अत्र च शूद्रग्रहणाद्द्विजातिना दास्यामुत्पन्नः पितुरिच्छयाप्यंशं न लभते नाप्यर्द्धं दूरत एव कृत्स्नं । किंत्वनुकूलश्चेज्जीवनमात्रं लभते ॥ १३३ ॥ १३४ ॥

शाखा २५ वी.

आतां शूद्रसंबंधी द्रव्याचे विभागाविषयीं विशेष सांगतो.

**मूलार्थ**— शूद्रापासून दासीचे ठायीं झालेलाहि पुत्र पित्याचे इच्छेनें विभाग पावेल.

१ सोळाव्या शाखेच्या १ ल्या अंकांत शूद्रापुत्रास एक विभाग सांगितला, आणि एथें तर दशमांश सांगितला, ह्यास्तव विरोध दिसतो, परंतु विरोध नाहीं; कारण, ब्राह्मणीपुत्राचे चार भाग, क्षत्रियापुत्राचे तीन, वैश्यापुत्राचे दोन आणि शूद्रापुत्राचा एक मिळून दहा, त्यांतील दशमांश. २ द्विजातिपुत्र म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ह्या तीन जातींच्या विवाहित स्त्रीचे ठायीं झालेले ते

पिता मृत झाल्यानंतर भ्रात्यांनीं त्याला विभाग द्यावा. भ्रातृविरहित असेल तर सर्व जिंदगीचा मालक होईल, परंतु कन्यांचा पुत्र नसेल तर.

टीकार्थ– १ शूद्रापासून दासीचे ठायीं उत्पन्न झालेला पुत्र पिता जिवंत असतां पित्याचे इच्छेनें विभाग पावतो. पिता मृत झाल्यावर जर लग्नाच्या स्त्रियेचे पुत्र आहेत तर त्यांनीं त्या दासीपुत्राला आपल्या विभागाचा अर्धा हिसा द्यावा.

शूद्राचा दासीपुत्र पित्याच्या मार्गे अर्धा हिसा पावतो.

२ जर लग्नाच्या बायकोचे पुत्र नाहींत तर पित्याची सर्व जिंदगी दासीपुत्र घेईल. परंतु जर लग्नाच्या बायकोची कन्या किंवा दौहित्र नसतील तर, असल्यास दासीपुत्र अर्ध्या विभागाचा अधिकारी होतो.

लग्नाच्या बायकोचे पुत्र नसल्यास सर्व जिंदगी दासीपुत्रास मिळेल.

३ एथें (मूळ वचनांत) "शूद्रापासून" असें सांगितल्यावरून अर्थात् द्विजातींपासून दासीचे ठायीं झालेला पुत्र पित्याचे इच्छेनेंहि विभाग पावत नाहीं, व ( पिता मृत झाल्यावर ) अर्धा विभाग देखील पावत नाहीं. मग सगळी जिंदगी मिळणें तर दुरापास्तच आहे; परंतु इतकेंच कीं तो अनुकूळ असल्यास अन्नाच्छादन मात्र घेईल. १३३, ३४.

द्विजातींच्या दासीपुत्रास अगदींच विभाग नाहीं.

---

**पत्नी दुहितरश्चैव पितरौ भ्रातरस्तथा ।**
**तत्सुता गोत्रजा बन्धुः शिष्यः सब्रह्मचारिणः ॥ १३५ ॥**
**एषामभावे पूर्वस्य धनभागुत्तरोत्तरः ।**
**स्वर्यातस्य ह्यपुत्रस्य सर्ववर्णेष्वयं विधिः ॥ १३६ ॥**

मुख्यगौणसुता दायं गृह्णन्तीति निरूपितम् । तेषामभावे सर्वेषां दायादक्रम उच्यते । पूर्वोक्ता द्वादशपुत्रा यस्य न सन्ति असावपुत्रः तस्यापुत्रस्य स्वर्यातस्य परलोकं गतस्य धनभाक् धनग्राही एषां पत्न्यादीनामनुक्रान्तानां मध्ये पूर्वस्याभाव उत्तर उत्तरो धनभागितिसंबन्धः सर्वेषु मूर्द्धावसिक्तादिषु अनुलोमजेषु प्रतिलोमजेषु वर्णेषु च ब्राह्मणादिषु अयं दायग्रहणविधिर्दायग्रहणक्रमो वेदितव्यः । तत्र प्रथमं पत्नी धनभाक् । पत्नी विवाहसंस्कृता पत्युर्नोयज्ञसंयोग इति स्मरणात् । एकवचनं च जात्यभिप्रायेण अतश्च बह्व्यश्चेत्सजातीया विजातीयाश्च यथांशं विभज्य धनं गृह्णन्ति । यथा वृद्धमनुरपि पत्न्याः समग्रधनसंबन्धं वक्ति । अपुत्रा शयनं भर्तुः पालयन्ती व्रते स्थिता । पत्न्येव दद्यात्तत्पिण्डं कृत्स्नमंशं लभेत चेति । बृहद्विष्णुरपि । अपुत्रधनं पत्न्यभिगामि तदभावे दुहितृगामि तदभावे पितृगामि तदभावे मातृगामीति ॥ कात्यायनोपि ॥ पत्नी पत्युर्धनहारी या स्यादव्यभिचारिणी । तदभावे तु दुहिता यद्यनूढा भवेत्तदेति ॥ तथा । अपुत्रस्यार्यकुलजा

पत्नी दुहितरोऽपि वा। तदभावे पिता माता भ्राता पुत्राश्च कीर्तिता इति। बृहस्पतिरपि। कुल्येषु विद्यमानेषु पितृभ्रातृसनाभिषु। असुतस्य प्रमीतस्य पत्नी तद्भागहारिणी। एतद्विरुद्धानीव वाक्यानि लक्ष्यन्ते। भ्रातॄणामप्रजाः प्रेयान् कश्चिच्चेत्प्रव्रजेत वा। विभजेरन् धनं तस्य शेषास्ते स्त्रीधनं विना। भरणं चास्य कुर्वीरन्स्त्रीणामाजीवनक्षयात्॥ रक्षन्ति शय्यां भर्तुश्चेदाच्छिद्युरितरासुचेति। पत्नीसद्भावेऽपि भ्रातॄणां धनग्रहणं पत्नीनां च भरणमात्रं नारदेनोक्तं। मनुना तु। पिता हरेदपुत्रस्य रिक्थं भ्रातर एववेत्यपुत्रस्य धनं पितुर्भ्रातुर्वेति दर्शितम्। यथा अनपत्यस्य पुत्रस्य माता दायमवाप्नुयात्। मातर्यपि च वृत्तायां पितुर्माता हरेद्धनमिति मातुः पितामह्याश्च धनसंबन्धो दर्शितः। शंखेनापि। स्वर्यातस्य ह्यपुत्रस्य भ्रातृगामि द्रव्यं तदभावे पितरौ हरेयातां ज्येष्ठा वा पत्नीति। भ्रातॄणां पित्रोर्ज्येष्ठायाश्च पत्न्याः क्रमेण धनसंबन्धो दर्शितः। कात्यायनेनापि। विभक्ते संस्थिते द्रव्यं पुत्राभावे पिता हरेत्। भ्राता वा जननी वाथ माता वा तत्पितुः क्रमादित्येवमादीनां विरुद्धार्थानां वाक्यानां योगीश्वरेण व्यवस्था दर्शिता। पत्नी गृह्णीयादित्येतद्वचनजातं विभक्तभ्रातृस्त्रीविषयम्। सा च यदि नियोगार्थिनी भवति। कुत एतत् नियोगसव्यपेक्षायाः पत्न्या धनहरणं न स्वतन्त्राया इति। पिता हरेदपुत्रस्येत्यादिवचनात्तत्र व्यवस्थाकारणं वक्तव्यम्। नान्यद्व्यवस्थाकारणमस्तीति गौतमवचनाच्च। पिण्डगोत्रर्षिसंबन्धा रिक्थं भजेरन् स्त्री वानपत्यस्य बीजं लिप्सेतेति। अस्यार्थः। पिण्डगोत्रर्षिसंबन्धा अनपत्यस्य रिक्थं भजेरन्स्त्री वा रिक्थं भजेत। यदि बीजं लिप्सेतेति। मनुरपि। धनं यो बिभृयाद्भ्रातुर्मृतस्य स्त्रियमेव वा। सोऽपत्यं भ्रातुरुत्पाद्य दद्यात्तस्यैव तद्धनमिति। अनेनैतद्दर्शयति विभक्तधनेऽपि भ्रातर्युपरतेऽपत्यद्वारेणैव पत्न्या धनसंबन्धो नान्यथेति। तथाऽविभक्तधनेऽपि॥ कनीयान् ज्येष्ठभार्यायां पुत्रमुत्पादयेद्यदि। समस्तत्र विभागः स्यादिति धर्मो व्यवस्थित इति। तथा वसिष्ठोऽपि। रिक्थलोभान्नास्ति नियोग इति। रिक्थलोभान्नियोगं प्रतिषेधन् नियोगद्वारक एव पत्न्या धनसंबन्धो नान्यथेति दर्शयति। नियोगाभावे तु पत्न्या भरणमात्रमेव। नारदवचनात्॥ भरणं चास्य कुर्वीरन्स्त्रीणामाजीवनक्षयादिति॥ योगीश्वरेणापि किल वक्ष्यते। अपुत्रा योषितश्चैषां भर्तव्याः साधुवृत्तयः। निर्वास्या व्यभिचारिण्यः प्रतिकूलास्तथैव चेति॥ अपिच। द्विजातिधनस्य यज्ञार्थत्वात्स्त्रीणां च यज्ञेऽनधिकाराद्धनग्रहणमयुक्तम्। तथा च केनापि स्मृतं। यज्ञार्थं द्रव्यमुत्पन्नं तत्रानधिकृतास्तु ये। अरिक्थभाजस्ते सर्वे ग्रासाच्छादनभाजनाः॥ यज्ञार्थं विहितं वित्तं तस्मात्तद्विनियोजयेत्। स्थानेषु धर्मजुष्टेषु न स्त्रीमूर्खविधर्मिष्विति तदनुपपन्नम्। पत्नीदुहितर इत्यत्र नियोगस्याप्रतीतेरप्रस्तुतत्वाच्च। अपिच इदमत्र वक्तव्यम्। पत्न्या धनग्रहणे नियोगो वा निमित्तं तदुत्पन्नमपत्यं वा। तत्र नियोगस्यैव निमित्तत्वे अनुत्पादितपुत्राया अपि धनसंबन्धः प्राप्नोति। उत्पन्नस्य च पुत्रस्य धनसंबन्धो न प्राप्नोति। अथ तदपत्यस्यैव निमित्तत्वं

तथा सति पुत्रस्यैव धनसंबन्धात्पत्नीति नारब्धव्यम् । अथ स्त्रीणां पतिद्वारको धनसंबन्धः पुत्रद्वारको वा नान्यथेति मतं तदप्यसत् । अध्यग्न्यध्यावहनिकं दत्तं च प्रीतिकर्मणि । भ्रातृमातृपितृप्राप्तं षड्विधं स्त्रीधनं स्मृतमित्यादिविरोधात् । किंच सर्वपुत्राभावे पत्नी दुहितर इत्यारब्धं तत्र नियुक्ताया धनसंबन्धं वदता क्षेत्रजस्यैव धनसंबन्ध उक्तो भवति । सच प्रागेवाभिहित इत्यपुत्रप्रकरणे पत्नीति नारब्धव्यम् । अथ पिण्डगोत्रर्षिसंबन्धा रिक्थं भजेरन्स्त्री वानपत्यस्य बीजं लिप्सेतेति गौतमवचनान्नियुक्ताया धनसंबन्ध इति तदप्यसत् । न हि यदि बीजं लिप्सेत तदानपत्यस्य स्त्री धनं गृह्णीयादित्ययमर्थोऽस्मात्प्रतीयते ॥ किंत्वनपत्यस्य धनं पिण्डगोत्रर्षिसंबन्धा भजेरन्स्त्री वा सा स्त्री बीजं वा लिप्सेत संयता वा भवेदिति तस्या धर्मान्तरोपदेशः । वाशब्दस्य पक्षान्तरवचनत्वेन यथार्थाप्रतीतेः । अपि च संयताया एव धनग्रहणं युक्तम् । न नियुक्तायाः स्मृतिलोकनिन्दितायाः ॥ अपुत्रा शयनं भर्तुः पालयन्ती व्रते स्थिता । पत्न्येव दद्यात्तत्पिण्डं कृत्स्नमंशं लभेत चेति संयताया धनग्रहणमुक्तम् । तथा नियोगश्च निन्दितो मनुना ॥ नान्यस्मिन्विधवा नारी नियोक्तव्या द्विजातिभिः । अन्यस्मिन् हि नियुञ्जाना धर्मं हन्युः सनातनमित्यादिना । यत्तु वसिष्ठवचनम् । रिक्थलोभान्नास्ति नियोग इति । तदविभक्ते संसृष्टिनि वा भर्तरि प्रेते तस्या धनसंबन्धो नास्तीति स्वापत्यस्य धनसंबन्धार्थं नियोगो न कर्तव्य इति व्याख्येयम् । यदपि नारदवचनम् ॥ भरणं चास्य कुर्वीरन् स्त्रीणामाजीवनक्षयादिति । तदपि संसृष्टानां तु यो भागस्तेषामेव स इष्यत इति । संसृष्टानां प्रस्तुतत्वात्तत्स्त्रीणामनपत्यानां भरणमात्रप्रतिपादनपरम् । नच भ्रातृणामप्रजाः प्रेयानित्येतस्य संसृष्टिविषयत्वे संसृष्टानां तु यो भाग इत्यनेन पौनरुक्त्यमाशङ्कनीयम् । यतः पूर्वोक्तविवरणेन स्त्रीधनस्याविभाज्यत्वं तत्स्त्रीणां च भरणमात्रं विधीयते । यदप्यपुत्रा योषितश्चैषामित्यादिवचनं तत् क्लीबादिस्त्रीविषयमिति वक्ष्यते । यत्तु द्विजातिधनस्य यज्ञार्थत्वात्स्त्रीणां च यज्ञेऽनधिकाराच्च धनग्रहणमयुक्तमिति तदसत् । सर्वस्य द्रव्यजातस्य यज्ञार्थत्वे दानहोमाद्यसिद्धेः । अथ यज्ञशब्दस्य धर्मोपलक्षणत्वात् दानहोमादीनामपि धर्मत्वात्तदर्थत्वमविरुद्धमिति मतम् । एवं तर्ह्यर्थकामयोर्धनसाध्ययोरसिद्धिरेव स्यात् । तथा सति धर्ममर्थं च कामं च यथाशक्ति न हापयेत् । तथा न पूर्वाह्णमध्यन्दिनापराह्णानफलान्न कुर्याद्यथाशक्ति धर्मार्थकामेभ्यः । तथा । न तथैतानि शक्यन्ते संनियन्तुमसेवयेत्यादियाज्ञवल्क्यगौतममनुवचनविरोधः । अपि च । धनस्य यज्ञार्थत्वे हिरण्यं धार्यमिति हिरण्यसाधारणस्य क्रत्वर्थत्वानिराकरणेन पुरुषार्थत्वमुक्तं तत्प्रत्युद्धृतं स्यात् । किंच । यज्ञशब्दस्य धर्मोपलक्षणपरत्वे स्त्रीणामपि पूर्तधर्माधिकाराद्धनग्रहणं युक्ततरम् । यत्तु पारतन्त्र्यवचनं न स्त्री स्वातन्त्र्यमर्हतीत्यादि । तदस्तु पारतन्त्र्यं धनस्वीकारे तु को विरोधः । कथं तर्हि यज्ञार्थं धनमुत्पन्नमित्यादिवचनम् । उच्यते । यज्ञार्थमेवार्जितं यद्धनं तद्यज्ञ एव नियोक्तव्यं पुत्रादिभिरपीत्येवंपरं तत् । यज्ञार्थं लब्धमददद्भासः काकोऽपि वा भवेदिति दोष-

श्रवणस्य पुत्रादिष्वप्यविशेषात् । यदपि कात्यायनेनोक्तम् । अदायिकं राजगामि योषिद्भृत्यौर्ध्वदेहिकम् । अपास्य श्रोत्रियद्रव्यं श्रोत्रियेभ्यस्तदर्पयेदिति । अदायिकं दायादरहितं यद्धनं तद्राजगामि राज्ञो भवति । योषिद्भृत्यौर्ध्वदेहिकमपास्य तत्स्त्रीणामशनाच्छादनोपयुक्तं और्ध्वदेहिकं धनिनः श्राद्धाद्युपयुक्तं चापास्य परिहृत्य राजगामि भवतीति संबन्धः । अस्यापवादः । श्रोत्रियद्रव्यं च योषिद्भृत्यौर्ध्वदेहिकमपास्य श्रोत्रियायोपपादयेदिति एतदप्यवरुद्धस्त्रीविषयं योषिद्ग्रहणात् । नारदवचनं च अन्यत्र ब्राह्मणात्किंतु राजा धर्मपरायणः । तत्स्त्रीणां जीवनं दद्यादेष दायविधिः स्मृत इत्यवरुद्धस्त्रीविषयमेव । स्त्रीशब्दग्रहणात् । इह तु पत्नीशब्दादूढायाः संयताया धनग्रहणमविरुद्धम् । तस्माद्विभक्तासंसृष्टिन्यपुत्रे स्वर्याते पत्नी धनं प्रथमं गृह्णातीत्ययमर्थः सिद्धो भवतीति । विभागस्योक्तत्वात्संसृष्टिनां वक्ष्यमाणत्वात् । एतेनाल्पधनविषयत्वं श्रीकरादिभिरुक्तं निरस्तं वेदितव्यम् । तथा ह्यौरसेषु पुत्रेषु सत्स्वपि जीवद्विभागे अजीवद्विभागे च पत्न्याः पुत्रसमांशग्रहणमुक्तम् । यदि कुर्यात्समानंशान् पत्न्यः कार्याः समांशिकाः । पितुरूर्ध्वं विभजतां माताप्यंशं समं हरेदिति च । तथासत्यपुत्रस्य स्वर्यातस्य धनं पत्नी भरणादतिरिक्तं न लभत इति व्यामोहमात्रम् । अथ पत्न्यः कार्याः समांशिका इत्यत्र माताप्यंशं समं हरेदित्यत्र च जीवनोपयुक्तमेव धनं स्त्री हरतीति मतं तदसत् । अंशशब्दस्य समशब्दस्य चानर्थक्यप्रसङ्गात् । स्यान्मतम् । बहुधने जीवनोपयुक्तं धनं गृह्णाति अल्पे तु पुत्रांशसममंशं गृह्णातीति तच्च न । विधिवैषम्यप्रसङ्गात् । तथाहि पत्न्यः कार्याः समांशिका माताप्यंशं समं हरेदिति च बहुधने जीवनमात्रोपयुक्तं । वाक्यान्तरमपेक्ष्य प्रतिपादयति अल्पधने तु पुत्रांशसममंशं प्रतिपादयतीति । तथा चातुर्मास्येषु द्वयोः प्रणयन्तीत्यत्र पूर्वपक्षिणा सौमिकप्रणयनातिदेशे हेतुत्वेन वैश्वदेव उत्तरवेदिमुपकिरन्ति न शुनासीरीय इत्युत्तरवेदिप्रतिषेधे दर्शिते राद्धान्तैकदेशिना न सौमिकप्रणयनातिदेशप्राप्ताया उत्तरवेद्याः प्रथमोत्तमयोः पर्वणोरयं प्रतिषेधः किंतूपात्रवपन्तीति प्राकरणिकेन वचनेन प्राप्ताया उत्तरवेद्याः प्रतिषेधोऽयमित्यभिहिते पुनः पूर्वपक्षिणोपात्तवपन्तीति प्रथमोत्तमयोः पर्वणोः प्रतिषेधमपेक्ष्य पाक्षिकीमुत्तरवेदिं प्रापयति मध्यमयोस्तु निरपेक्षमेव नित्यवदुत्तरवेदिं प्रतिपादयतीति विधिवैषम्यं दर्शितम् । राद्धान्तेऽपि विधिवैषम्यभयात्प्रथमोत्तमयोः पर्वणोरुत्तरवेदिप्रतिषेधो नित्यानुवादो द्वयोः प्रणयन्तीत्याद्यर्थवादपर्यालोचनयोपात्तं वपन्तीति मध्यमयोरेव वरुणप्रघाससाकमेधपर्वणोरुत्तरवेदिं विधत्त इति दर्शितम् । यदपि मतम् । पिता हरेदपुत्रस्य रिक्थं भ्रातर एव वेति मनुस्मरणात् । तथा स्वर्यातस्य ह्यपुत्रस्य भ्रातृगामि द्रव्यं तदभावे पितरौ हरेयातां ज्येष्ठा वा पत्नीति शंखस्मरणाच्च अपुत्रस्य धनं भ्रातृगामि इति प्राप्तं भरणं चास्य कुर्वीरन्स्त्रीणामाजीवनक्षयादित्यादिवचनाच्च भरणोपयुक्तं धनं पत्नी लभत इत्यपि स्थितम् । एवं स्थिते बहुधने अपुत्रे स्वर्याते भरणोपयुक्तं पत्नी गृह्णाति शेषं च भ्रातरो यदा तु पत्नीभरणमात्रोपयुक्तमे-

व द्रव्यमस्ति ततो न्यूनं वा तदा किं पत्न्येव गृह्णात्युत भ्रातरोऽपीति विरोधे पूर्वबलीयस्त्वज्ञापनार्थं पत्नी दुहितर इत्यारब्धमिति तदप्यत्र भगवानाचार्यो न मृष्यति। यतः पिता हरेदपुत्रस्य रिक्थं भ्रातर एव वेति विकल्पस्मरणान्नेदं क्रमपरं वचनमपितु धनग्रहणेऽधिकारप्रदर्शनमात्रपरम्। तच्चासत्यपि पत्न्यादिगणे घटत इति व्याचचक्षे। शंखवचनमपि संसृष्टभ्रातृविषयमिति। अपिचाल्पविषयत्वमस्माद्वचनात्प्रकरणाद्वा नावगम्यते। धनभागुत्तरोत्तर इत्यस्य च पत्नी दुहितर इति विषयद्वये वाक्यान्तरमपेक्ष्याल्पधनविषयत्वम्। पित्रादिषु तु धनमात्रविषयत्वमिति पूर्वोक्तं विधिवैषम्यं तदवस्थमेवेति यत्किंचिदेतत्॥ यत्तु हारीतवचनम्। विधवा यौवनस्था चेन्नारी भवति कर्कशा। आयुषः क्षपणार्थं तु दातव्यं जीवनं तदेति। तदपि शङ्कितव्यभिचारायाः सकलधनग्रहणनिषेधपरम्। अस्मादेव वचनादशङ्कितव्यभिचारायाः सकलधनग्रहणं गम्यते। एतदेवाभिप्रेत्योक्तं शंखेन। ज्येष्ठा वा पत्नीति। ज्येष्ठा गुणज्येष्ठा अनाशङ्कितव्यभिचारा सा सकलं धनं गृहीत्वान्यां कर्कशामपि मातृवत्पालयतीति सर्वमनवद्यम्। तस्मादपुत्रस्य स्वर्यातस्य विभक्तस्यासंसृष्टिनः परिणीता स्त्री संयता सकलमेव धनं गृह्णातीति स्थितम्। तदभावे दुहितरः। दुहितर इति बहुवचनं समानजातीयानामसमानजातीयानां च समविषमांशप्राप्त्यर्थम्। तथाच कात्यायनः। पत्नी भर्तुर्धनहरी या स्यादव्यभिचारिणी। तदभावे तु दुहिता यद्यनूढा भवेत्तदेति॥ बृहस्पतिरपि। भर्तुर्धनहरी पत्नी तां विना दुहिता स्मृता। अङ्गादङ्गात्संभवति पुत्रवद्दुहिता नृणाम्॥ तस्मात्पितृधनं त्वन्यः कथं गृह्णीत मानव इति। तत्र चोढानूढासमवायेऽनूढैव गृह्णाति। तदभावे तु दुहिता यद्यनूढा भवेत्तदेति विशेषस्मरणात्। तथा प्रतिष्ठिताप्रतिष्ठितासमवाये अप्रतिष्ठितैव तदभावे प्रतिष्ठिता। स्त्रीधनं दुहितॄणामप्रत्तानामप्रतिष्ठितानां चेति गौतमवचनस्य पितृधनेऽपि समानत्वात् न चैतत्पुत्रिकाविषयमिति मन्तव्यम्। तत्समः पुत्रिकासुत इति पुत्रिकायास्तत्सुतस्य चौरससमत्वेन पुत्रप्रकरणेऽभिधानात्। चशब्दाद्दुहित्रभावे दौहित्रो धनभाक्॥ यथाह विष्णुः। अपुत्रपौत्रसंताने दौहित्रा धनमाप्नुयुः। पूर्वेषां तु स्वधाकारे पौत्रा दौहित्रिका मता इति॥ पुनरपि॥ अकृता वा कृता वापि यं विंदेत्सदृशात्सुतम्। पौत्री मातामहस्तेन दद्यात्पिण्डं हरेद्धनमिति। तदभावे पितरौ मातापितरौ धनभाजौ। यद्यपि युगपदधिकरणवचनतायां द्वन्द्वस्मरणात्। तदपवादत्वादेकशेषस्य धनग्रहणे पित्रोः क्रमो न प्रतीयते। तथापि विग्रहवाक्ये मातृशब्दस्य पूर्वनिपातादेकशेषभावपक्षे च मातापितराविति मातृशब्दस्य पूर्वं श्रवणात् पाठक्रमादेवार्थक्रमावगमाद्धनसंबन्धेपि क्रमापेक्षायां प्रतीतक्रमानुरोधेनैव प्रथमं माता धनभाक्॥ तदभावे पितेति गम्यते। किंच पिता पुत्रान्तरेष्वपि साधारणो माता तु न साधारणीति प्रत्यासत्त्यतिशयादनन्तरः सपिण्डाद्यस्तस्य तस्य धनं भवेदिति वचनान्मातुरेव प्रथमं धनग्रहणं युक्तम्। न च सपिण्डेष्वेव प्रत्यासत्तिर्नियामिका अपि तु. समानोदकादिष्वप्यविशेषण धनग्रहणे प्राप्ते प्रत्यासत्तिरेव नियामिके-

तस्मादेव वचनादवगम्यत इति। मातापित्रोर्मातुरेव च प्रत्यासन्त्यतिशयाद्धनग्रहणं युक्ततरम्। तदभावे पिता धनभाक्। पित्रभावे भ्रातरो धनभाजः। तथाच मनुः॥ पिता हरेदपुत्रस्य रिक्थं भ्रातर एव वेति। यत्पुनर्धारेश्वरेणोक्तम्। अनपत्यस्य पुत्रस्य माता दायमवाप्नुयात्। मातर्यपि च वृत्तायां पितुर्माता हरेद्धनमिति मनुवचनाज्जीवत्यपि पितरि मातरि वृत्तायां पितुर्माता पितामही धनं हरेन्न पिता। यतः पितृगृहीतं धनं विजातीयेष्वपि पुत्रेषु गच्छति। पितामहीगृहीतं तु सजातीयेष्वेव गच्छतीति पितामह्येव गृह्णातीति। एतदप्याचार्यो नानुमन्यते। विजातीयपुत्राणामपि धनग्रहणस्योक्तत्वात्। चतुस्त्रिद्व्येकभागाः स्युरित्यादिनेति। यत्पुनरहार्यं ब्राह्मणद्रव्यं राज्ञा नित्यमितिस्थितिरिति मनुस्मरणं तन्नृपाभिप्रायं न तु पुत्राभिप्रायम्। भ्रातृष्वपि सोदराः प्रथमं गृह्णीयुः-भिन्नोदराणां मात्रा विप्रकर्षात्। अनन्तरः सपिण्डाद्यस्तस्य तस्य धनं भवेदिति स्मरणात्। सोदराणामभावे भिन्नोदरा धनभाजः। भ्रातृणामप्यभावे तत्पुत्राः पितृक्रमेण धनभाजः। भ्रातृभ्रातृपुत्रसमवाये भ्रातृपुत्राणामनधिकारः। भ्रात्रभावे भ्रातृपुत्राणामधिकारवचनात्। यदा त्वपुत्रे भ्रातरि स्वर्याते तद्भ्रातृणामविशेषेण धनसंबन्धे जाते भ्रातृधनविभागात्प्रागेव यदि कश्चिद्भ्राता मृतस्तदा तत्पुत्राणां पितृतोऽधिकारे प्राप्ते तेषां भ्रातृणां च विभज्य ग्रहणे पितृतो भागकल्पनेति युक्तम्। भ्रातृपुत्राणामप्यभावे गोत्रजा धनभाजः। गोत्रजाः पितामहीसपिण्डाः समानोदकाश्च। तत्र पितामही प्रथमं धनभाक् मातर्यपि च वृत्तायां पितुर्माता धनं हरेदिति मात्रनन्तरं पितामह्या धनग्रहणे प्राप्ते पित्रादीनां भ्रातृसुतपर्यन्तानां बद्धक्रमत्वेन मध्येऽनुप्रवेशाभावात् पितुर्माता धनं हरेदित्यस्य वचनस्य धनग्रहणाधिकारप्राप्तिमात्रपरत्वादुत्कर्षे तत्सुतानन्तरं पितामही गृह्णातीत्यविरोधः। पितामह्याश्चाभावे समानगोत्रजाः सपिण्डाः पितामहादयो धनभाजः। भिन्नगोत्राणां सपिण्डानां बन्धुशब्देन ग्रहणात्। तत्र च पितृसन्तानाभावे पितामही पितामहः पितृव्यास्तत्पुत्राश्च क्रमेण धनभाजः। पितामहसन्तानाभावे प्रपितामही प्रपितामहस्तत्पुत्रास्तत्सूनवश्चेत्येवमासप्तमात्समानगोत्राणां सपिण्डानां धनग्रहणं वेदितव्यम्। तेषामभावे समानोदकानां धनसंबन्धः। ते च सपिण्डानामुपरि सप्त वेदितव्याः। जन्मनामज्ञानावधिका वा। यथाह बृहन्मनुः॥ सपिण्डता तु पुरुषे सप्तमे विनिवर्त्तते। समानोदकभावस्तु निवर्तेताचतुर्दशात्। जन्मनाम्नोः स्मृतेरेके तत्परं गोत्रमुच्यते इति। गोत्रजाभावे बन्धवो धनभाजः। बन्धवश्च त्रिविधाः। आत्मबन्धवः पितृबन्धवो मातृबन्धवश्चेति। यथोक्तम्। आत्मपितृष्वसुः पुत्रा आत्ममातृष्वसुः सुताः। आत्ममातुलपुत्राश्च विज्ञेया ह्यात्मबान्धवाः॥ पितुः पितृष्वसुः पुत्राः पितुर्मातृष्वसुः सुताः। पितुर्मातुलपुत्राश्च विज्ञेयाः पितृबान्धवाः॥ मातुः पितृष्वसुः पुत्रा मातुर्मातृष्वसुः सुताः। मातुर्मातुलपुत्राश्च विज्ञेया मातृबान्धवा इति॥ तत्र चान्तरङ्गत्वात्प्रथममात्मबन्धवो धनभाजस्तदभावे पितृबन्धवस्तदभावे मातृबन्धव इति क्रमो वेदितव्यः। बन्धूनामभावे आचा-

र्यः। तदभावे शिष्यः॥ पुत्राभावे यः प्रत्यासन्नः सपिण्डस्तदभावे आचार्यः। आचार्याभावेऽन्तेवासीत्यापस्तम्बस्मरणात् ॥ शिष्याभावे सब्रह्मचारी धनभाक् । येन सहैकस्मादाचार्यादुपनयनाध्ययनतदर्थज्ञानप्राप्तिः स सब्रह्मचारी । तदभावे ब्राह्मणद्रव्यं यः कश्चित् श्रोत्रियो गृह्णीयात् ॥ श्रोत्रिया ब्राह्मणस्यानपत्यस्य रिक्थं भजेरन्निति गौतमस्मरणात् । तदभावे ब्राह्मणमात्रम् । यथाह मनुः । सर्वेषामप्यभावे तु ब्राह्मणा रिक्थभागिनः । त्रैविद्याः शुचयो दान्तास्तथा धर्मो न हीयते इति ॥ न कदाचिदपि ब्राह्मणद्रव्यं राजा गृह्णीयात् । अहार्यं ब्राह्मणद्रव्यं राज्ञा नित्यमिति स्थितिरिति मनुवचनात् । नारदेनाप्युक्तम् । ब्राह्मणार्थस्य तन्नाशे दायादश्चेन्न कश्चन । ब्राह्मणायैव दातव्यमेनस्वी स्यान्नृपोऽन्यथेति । क्षत्रियादिधनं सब्रह्मचारिपर्यंतानामभावे राजा हरेत् । न ब्राह्मणः । यथाह मनुः । इतरेषां तु वर्णानां सर्वाभावे हरेन्नृप इति ॥ १३५ ॥ १३६ ॥

## शाखा २६ वी.

मुख्य व गौण पुत्र जिंदगीचे वारीस होतात हें सांगितलें. आतां ते नसतां जिंदगीचे वारीस कोण व त्यांचा अनुक्रम कसा तें सांगतो.

**मूलार्थ**— सर्वहि जातींत निपुत्रिक मरण पावला असतां त्याच्या जिंदगीचे वारीस पत्नी, कन्या, जननी, पिता, भ्राता, भ्रातृपुत्र, गोत्रज, बंधु, शिष्य, सब्रह्मचारी ह्यांतून पहिल्याच्या अभावीं दुसरा असे अनुक्रमेंकरून उत्तरोत्तर जाणावे.

**टीकार्थ**— १ पूर्वी ( २० व्या शाखेंत ) सांगितलेले बारा पुत्र ज्यास नाहींत असा निपुत्रिक मृत असतां त्याची जिंदगी घेण्याचे अधिकारी पत्नी, कन्या, जननी, पिता, भ्राते, भ्रातृपुत्र, गोत्रज, बंधु, शिष्य आणि सब्रह्मचारी हे पत्नी इत्यादिक वारीस सांगितले, ह्यांतून पहिल्याच्या अभावीं दुसरा जिंदगीचा वारीस, त्याच्या अभावीं तिसरा ह्याप्रमाणें उत्तरोत्तर सब्रह्मचारीपर्यंत क्रम जाणावा.

निपुत्रिक मृत असतां क्रमानें जिंदगीचे वारस.

सर्व **मूर्द्धावसिक्तादिक अनुलोम** जातीचे व **सूतादिक प्रतिलोम** जातीचे व ब्राह्मणादि वर्ण ह्यांत जिंदगी घेण्याविषयीं हाच क्रम जाणावा.

२ ह्या क्रमांत जिंदगी घेण्याविषयीं प्रथम पत्नी अधिकारिणी आहे. ह्मणजे यथोक्त विवाहसंस्कार झालेली स्त्री. कारण, "पत्युर्नो यज्ञसंयोगे" ह्या पाणिनी व्याकरणांतील सूत्रानें यज्ञयागादि श्रौत स्मार्त कर्म ज्या स्त्रियेच्या साहाय्येंकरून केलें जातें तशा स्त्रीविषयीं पत्नीशब्दाची प्रवृत्ति आहे. पत्नी असा एकवचनांत निर्देश केला तो जात्यभिप्रायेंकरून[1]; ह्यास्तव अनेक **सजातीय भिन्नजातीय**, पत्नी असल्यास त्यांनीं यथांश[2] विभागून घ्यावी.

---

१ जात्यभिप्राय म्हणजे अनेक व्यक्तींवर राहणारा असा सत्तारूप एक धर्म आहे. त्या धर्माच्या पुरस्कारें अनेक सजातीय अशा बहुतांचा वाचक असा एकवचनांत निर्देश करणें. म्हणजे असें—ती फौज, तें सैन्य, ती बायको, तें माणूस, "बायको जमा झाली" तेथें फार माणूस मिळालें आहे इत्यादिक.

२ यथांश म्हणजे ब्राह्मणीनें चार, क्षत्रियेनें तीन, वैश्येनें दोन आणि शूद्रेनें एक अंश ह्याप्रमाणें.

**वृद्धमनु**हि पत्नीलाच सर्व द्रव्य घेण्याचा अधिकार सांगतो.

**वृद्धमनु**– नवऱ्याच्या शय्येचें रक्षण करणारी, व्रतस्थ, व निपुत्रिक अशा पत्नीनेंच त्याला पिंड द्यावा, आणि त्याची सगळी जिंदगी घ्यावी.

**बृहद्विष्णुहि**– अपुत्राच्या जिंदगीची वारस पत्नी, तिच्या अभावीं कन्या, तिच्या अभावीं पिता, त्याच्या अभावीं माता.

**कात्यायन**– नवऱ्याचें धन पत्नी घेईल, परंतु ती जर व्यभिचारिणी नसेल तर, तिच्या अभावीं कन्या, परंतु ती अविवाहित असेल तर.

**स्मृति**– निपुत्रिकाच्या जिंदगीची वारीस कुलीन[1] पत्नी, तदभावीं कन्या, तदभावीं पिता, त्याच्या अभावीं माता, भ्राता, भ्रातृपुत्र, हे यथाक्रम सांगितले आहेत.

**बृहस्पतिही**– स्वकुलोत्पन्न जे पिता, माता, सहोदर, हे विद्यमान असतां निपुत्रिक मरण पावल्यानंतर जिंदगीची वारीस पत्नी.

३ **शंका**– वर सांगितलेल्या वचनाशीं विरुद्ध अशीं वचनें पाहण्यांत येतात.

**नारद**– जर भ्रात्यांतून कोणी निपुत्रिक मृत होईल किंवा संन्यासी होईल, तर त्याचें धन इतर भ्रात्यांनीं वांटून घ्यावें परंतु स्त्रीधनावांचून, आणि जो मृत झाला त्याच्या स्त्रियांचें मरणपर्यंत पोषण करावें परंतु पतिव्रता असल्यास, पतिव्रता नसल्यास अन्नाच्छादन देखील देऊं नये.

असें नारदानें पत्नी विद्यमान असतांहि भ्रात्यांनीं धन घ्यावें व स्त्रियांचें पोषण मात्र करावें, असें सांगितलें आहे.

**मनु**– अपुत्राची जिंदगी पित्यानें घ्यावी, अथवा भ्रात्यांनीं घ्यावी.

असें मनूनें अपुत्राचें धन पित्याकडे किंवा भ्रात्यांकडे जातें असें दाखविलें आहे.

**मनु**– तसेंच अपुत्राची जिंदगी मातेनें घ्यावी, माता निवर्तल्यानंतर पितामहीनें घ्यावी. असा मातेला व पितामहीला जिंदगीचा संबंध दाखविला आहे.

**शंख**– अपुत्र मृत झाला असतां त्याचें धन भ्रात्यांकडे जातें, त्यांच्या अभावीं मातापिता घेतील, किंवा ज्येष्ठ पत्नी घेईल.

असा शंखानें भ्रात्यांस, मातापित्यांस, आणि ज्येष्ठ पत्नीस क्रमानें धनसंबंध दाखविला आहे.

**कात्यायनहि**– विभक्त असून अपुत्र मरण पावला तर जिंदगीचा वारस पिता अथवा भ्राता किंवा जननी अगर पितामही असा क्रम सांगतो.

**इत्यादिक** जीं विरुद्ध वाक्यें आहेत त्यांची धारेश्वर व्यवस्था दाखवितो.

४ अपुत्राची जिंदगी पत्नीनें घ्यावी असें दाखविणारा जो वचनसमुदाय तो विभक्त भ्रात्याच्या पत्नीविषयीं, परंतु ती जर नियोग इच्छिणारी आहे तर.

**पत्नी नियोग** इच्छिणारी आहे तर तिला धनसंबंध, स्वातंत्र्येंकरून नाहीं असा अर्थ कोठून म्हणाल तर ( सांगतो ) " अपुत्राचें धन पिता घेईल किंवा भ्राते घेतील," **इत्या-**

---

१ कुलीन म्हणजे सत्कुलांत झालेली अर्थात् सुशील अव्यभिचारिणी अशी.

दिक वचनावरून तेथें कांहीं तरी व्यवस्थाकारण सांगितलें पाहिजे. तें ह्यावांचून दुसरें व्यवस्थाकारण दिसत नाहीं, व गौतमवचनावरूनहि असेंच सिद्ध होतें.

**गौतम**— पिंड, गोत्र, ऋषि ह्यांचा ज्यांस संबंध आहे ते अपुत्राचें **रिक्थ** घेतील, किंवा स्त्री घेईल. परंतु ती **नियोग** इच्छिणारी आहे तर.

**मनु**— जो भ्राता मृत झालेल्या अपुत्र भ्रात्याची स्थावर जंगम जिंदगी, व स्त्री यांचें रक्षण करील त्यानें त्याचे स्त्रीचे ठायीं नियोगधर्मानें पुत्र उत्पन्न करून त्या पुत्राला ती सर्व जिंदगी द्यावी. ( हा निर्णय विभक्तभ्रातृविषयक आहे ).

**इत्यादिक** वचनावरून हें दाखविलें जातें कीं, भ्राता जिंदगीनें विभक्त असूनहि जर मृत झाला तर त्याच्या **पत्नीला** संततिद्वाराच धनसंबंध आहे, अन्यथा नाहीं. तसेंच **अविभक्त** असतांहि,

**स्मृति**— कनिष्ठभ्राता ज्येष्ठभ्रात्याचे भार्येला जर पुत्र उत्पन्न करितो तर तेथें समविभाग होईल, अशी धर्मव्यवस्था आहे.

**वसिष्ठहि**— ( स्त्रीला ) जिंदगीचे लोभासाठीं नियोग नाहीं,

असा जिंदगीचे लोभास्तव **नियोगाचा** निषेध करून नियोगद्वाराच पत्नीला धनसंबंध आहे, अन्यथा नाहीं, असें दाखवितो.

६ **नियोग** नसतांहि पत्नीचें पोषण मात्र करावें असें नारदवचनावरून सिद्ध होतें.

**नारद**— भ्रात्यांच्या स्त्रियांचें आमरणपर्यंत पोषण करावें.

याज्ञवल्क्यहि पुढें (३० व्या शाखेच्या ७ व्या अंकाचे वचनांत ) सांगतो.

**याज्ञवल्क्य**— ह्यांच्या ( भ्रात्यांच्या ) निपुत्रिक स्त्रिया सदाचारसंपन्न आहेत तर त्यांचें पोषण करावें, आणि व्यभिचारिणी, तशाच प्रतिकूळ असतील त्या घालवून द्याव्या.

७ आणखी असें कीं द्विजांचें धन यज्ञासाठीं आहे व स्त्रियांस तर यज्ञाविषयीं अधिकार नाहीं; ह्मणून स्त्रियांस धनग्रहण अयोग्य.

तसेंच आणखी कोणी सांगतो.

**स्मृति**— द्रव्यसंपादन यज्ञासाठीं आहे, अतएव यज्ञाविषयीं जे अनधिकारी त्या सर्वांस रिक्थ देऊं नये. ते अन्नाच्छादन मात्र पावतील. धन यज्ञासाठीं विहित आहे ह्मणून त्याचा धर्माकडेच विनियोग करावा. स्त्री, मूर्ख, अधर्मवर्ती, ह्यांचे ठायीं करूं नये.

८ असें[1] जें सांगितलें, त्याची उपपत्ति होत नाहीं; कारण **पत्नी**, ( तिच्या अभावीं ) कन्या, इत्यादिकांचें प्रतिपादक जें वचन[2] त्यांत **नियोगाची** अगदीं प्रतीति नाहीं. आणि तेथें **नियोग** सांगणेंहि अप्रस्तुत आहे.

९ आणखी असें कीं, **पत्नीला** जिंदगी घेण्याविषयीं नियोगच निमित्त, किंवा नियोगानें उत्पन्न झालेलें अपत्य निमित्त.

जर **नियोग** निमित्त मानिलें तर जिला ( नियोग झाला पण ) अपत्य झालें नाहीं अशा **पत्नीलाहि** धनसंबंध प्राप्त होतो. उत्पन्न झालेल्या पुत्रास धनसंबंध येत नाहीं.

---

१ असें.जें म्हणजे ४ थ्या अंकापासून येथपर्यंत. २ वचन म्हणजे पहिल्या अंकाचें वचन.

जर नियोगानें उत्पन्न जें अपत्य, तें ( धनग्रहणाविषयीं ) निमित्त मानिलें तर पुत्रा-सच धनसंबंध प्राप्त झाला. यास्तव वचनांत "पत्नी" असा प्रथमतः उपक्रम केला तो व्यर्थ.

स्त्रियांस धनसंबंध नवऱ्याच्या द्वारा, किंवा पुत्रद्वारा आहे, अन्यथा नाहीं. असें जें मत आहे तेंहि योग्य नाहीं. कारण,

" अध्यग्नि, अध्यावहनिक, प्रीतिदत्त, तसेंच भ्रातृदत्त, मातृदत्त, पितृदत्त. असें सहा प्रकारच स्त्रीधन सांगितलें;"

इत्यादि वचनांशीं विरोध येतो.

आणखी असें कीं " सर्व पुत्रांच्या अभावीं पत्नी,कन्या " असा उपक्रम केला त्यांत नियुक्तेला धनसंबंध सांगणारानें क्षेत्रजासच धनसंबंध सांगितल्यासारखा होतो. आणि तो तर पूर्वींच सांगितला आहे. मग ह्या अपुत्रप्रकरणीं "पत्नी" असा आरंभ करायास नको.

गौतम– १० पिंड, गोत्र, ऋषि ह्यांचा ज्यांस संबंध आहे ते निपुत्रिकाची जिंदगी घेतील किंवा स्त्री घेईल, किंवा जी नियोगापासून गर्भेच्छा धरील ती स्त्री घेईल.

अशा गौतमवचनावरून नियुक्त स्त्री वारस ह्मणावी, तर तेंहि नीट नाहीं. कारण "जर ती नियोगापासून गर्भ धारण करील तर अनपत्य नवऱ्याचें धन पावेल" असा अर्थ ह्या (गौतम) वचनावरून अवगत होत नाहीं. इतकाच त्याचा अर्थ कीं निपुत्रिकाचें धन, त्याचे पिंड, गोत्र, ऋषि, ह्या संबंधाचे असतील ते घेतील, किंवा स्त्रीनें घ्यावें. त्या स्त्रीनें नियोगापासून गर्भेच्छा धरावी किंवा व्रतस्थ रहावें, असा तिला वैकल्पिक अन्य धर्माचा उपदेश सांगितला. विकल्पवाचक " किंवा " ह्या शब्दापासून " जर " ह्या अर्थाची अगदीं प्रतीति होत नाहीं.

११ दुसरें असें कीं व्रतस्थ पत्नीलाच धनग्रहण युक्त आहे. स्मृतिनिंदित व लोकनिंदित अशा नियुक्त स्त्रीला धनग्रहण युक्त नाहीं.

स्मृति– नवऱ्याच्या शय्येचें संरक्षण करणारी, व्रतस्थ, अशा अपुत्र स्त्रीनेंच आपल्या नवऱ्यास पिंड द्यावा आणि त्याचें सर्व धन घ्यावें.

असें व्रतस्थ स्त्रीलाच धनग्रहण सांगितलें आहे.

तसाच नियोगाविषयीं तर मनु निषेध सांगतो.

मनु–१२ द्विजांनीं विधवेला अन्य पुरुषाचे ठायीं नियुक्त करूं नये. कारण अन्याशीं नियुक्त करणारे, सनातनधर्माचा उच्छेद करितात.

वसिष्ठ– ( केवळ ) जिंदगीच्या लोभास्तव स्त्रीला नियोग विहित नाहीं.

असें जें वसिष्ठवचन आहे त्याचीहि व्याख्या अशी कीं, अविभक्त किंवा संसृष्टी झालेला असा भर्ता मृत झाला असतां त्याच्या स्त्रीला धनग्रहणाचा संबंध नाहीं, यास्तव आपल्या अपत्यास तो धनग्रहणसंबंध असावा इतक्यासाठीं तिनें नियोग करूं नये.

नारद– ह्याच्या ( निपुत्रिक मृत भ्रात्याच्या ) स्त्रियांचें आमरणपर्यंत पोषण करावें. असें जें वचन तेंहि "संसृष्टीचा जो भाग असेल तो त्यांचाच ह्मणजे संसृष्टींनींच घ्यावा"

१ वचनांत म्हणजे १ ल्या अंकाचे वचनांत. २ अपुत्रप्रकरणीं म्हणजे २६ व्या शाखेंत.

असें हें वचन संसृष्टिप्रकरणांतलें आहे. म्हणून त्याच्या ( संसृष्टींतून एखाद्या मृत झालेल्याच्या ) अनपत्य स्त्रियेचें पोषण मात्र करावें असें प्रतिपादन करितें.

**नारद**–१३ भ्रात्यांतून कोणी एकादा भ्राता निपुत्रिक मृत होईल अथवा संन्यासी होईल तर त्याचें धन इतर विद्यमान भ्रात्यांनीं वांटून घ्यावें; परंतु स्त्रीधनावांचून.

असें जें वचन, तेंहि संसृष्टीविषयींच असें मानिलें तर वरचें वाक्य व हें वाक्य हीं एकार्थप्रतिपादक झालीं ह्मणून पुनरुक्तिदोष येतो, अशी शंका घेऊं नये. कारण, पूर्वीं सांगितलेल्याचीच आतां व्याख्या करितांना **स्त्रीधन अविभाज्य** आणि त्यांचें ( अविभक्ताच्या किंवा संसृष्टीच्या स्त्रियांचें ) पोषण मात्र करावें, अशा वाक्यैकरून दोहों अर्थांचा विशेष विचार सांगितला. केवळ पूर्वोक्त अर्थच पुनः सांगितला असें नाहीं, ह्यास्तव पुनरुक्तिदोष प्राप्त होत नाहीं.

**याज्ञवल्क्य**– भ्रात्यांच्या अपुत्र स्त्रिया सदाचारसंपन्न, अशा असतील तर त्यांचें पालनपोषण करावें, व्यभिचारिणी किंवा प्रतिकूल असतील त्या ( घरांतून ) घालवाव्या.

असें जें वचन, तें नपुंसकादिकांच्या स्त्रियांविषयीं, असें पुढें (२०व्या शाखेच्या ७व्या अंकाचे वचनांत ) सांगितलें जाईल.

१४ आणखी द्विजातीचें धन यज्ञार्थ आहे आणि स्त्रियांस तर यज्ञाविषयीं अधिकार नाहीं, ह्मणून त्यांस धनग्रहणच युक्त नाहीं.

असें जें ( पूर्वीं ७ व्या अंकाचे स्मृतिवचनांत ) सांगितलें तें योग्य नाहीं, कारण, जर सर्व द्रव्य यज्ञार्थ आहे असें मानिलें तर द्रव्यसाध्य जीं दान होम वगैरे इतर धर्मकृत्यें तीं घडणार नाहींत.

१५ बरें, जर यज्ञशब्द धर्ममात्राचें उपलक्षण करून दान, होम इत्यादिक हीं धर्मकार्यांतर्गतच आहेत ह्मणून द्रव्यसमुदायास धर्मार्थत्व विरुद्ध नाहीं, असें मत आहे म्हणावें तर द्रव्यसाध्य ( कृषि, व्यापार इत्यादि उपायांनीं प्राप्त होणारे ) जे अर्थ, काम त्यांची तर सिद्धिच होणार नाहीं.

**याज्ञवल्क्य**– धर्म, अर्थ, आणि काम, ह्यांचा त्याग करूं नये; ते यथाशक्ति आचरण करावे.

**गौतम**– धर्म, अर्थ, व काम हे यथाशक्ति आचरण केल्यावांचून पूर्वाण्ह, माध्यान्ह, आणि अपराण्ह हे तीन काळ विफळ जाऊं देऊं नयेत.

**मनु**– ह्या ( विषयासक्तीनें दोषजनक ) इंद्रियांचें रूपादि विषयांच्या उपभोगावांचून तसें दमन होऊं शकत नाहीं.

---

१ तसें म्हणजे अविनाशी अशा विषयांत सर्वदा संचार करणारीं अशीं जीं इंद्रियें त्यांच्या नियमनाविषयीं यत्न करावा. असा इंद्रियसंयमाविषयीं मनु उपक्रम करून सांगतो कीं सर्व काम्य विषयांचा उपभोग करावा, ह्यापेक्षां परित्याग करावा हें समीचीन. कारण, विषयासक्तीनें दोषोत्पादक जीं हीं इंद्रियें त्यांचें रूपादि विषयोपभोगावांचून तसें दमन होऊं शकत नाहीं कीं जसें विषयोपभोगानें दमन करवतें. परंतु तो उप-

इत्यादिक जीं याज्ञवल्क्य, गौतम व मनु यांचीं वचनें त्यांशीं विरोध येतो.

१६ आणखी असें कीं, जर द्रव्य यज्ञार्थ आहे असें मानिलें तर "हिरण्य धारण करावें" ह्या वचनेंकरून हिरण्यधारणास यज्ञार्थतेचें निराकरण करून सिद्धांतीं पुरुषार्थसाधकत्वच (मीमांसेंत) सांगितलें आहे त्यास वैयर्थ्यापत्ति येईल. (असा न्यायविरोधहि येईल.)

१७ जर कदाचित् 'यज्ञशब्द' यावत् धर्मकार्याचा उपलक्षक आहे असें मानिलें तर पूर्तधर्मकृत्य करण्याविषयीं स्त्रियांसहि अधिकार आहे, यास्तव त्यांस धन ग्रहण करण्याविषयीं तर विशेषेंकरून योग्य आहे. "स्त्री स्वतंत्रपणाला योग्य नाहीं" असें जें पारतंत्र्यबोधक वचन आहे तेणेंकरून पारतंत्र्य असो, परंतु (आपल्या पतीचें) धन घेण्याविषयीं कोणताहि विरोध नाहीं.

१८ **शंका**– "द्रव्य यज्ञार्थ उत्पन्न झालेलें आहे" इत्यादिक अर्थविचार दाखविणारी (७ व्या अंकांतील) जी स्मृति तिची उपपत्ति (संगति) कोणत्या रीतीनें करावी?

**समाधान**– जें द्रव्य यज्ञार्थ संपादिलें त्याचा विनियोग पुत्रादिकांनींहि यज्ञाविषयींच करावा, असा त्या वचनाचा अर्थ योजावा. कारण, यज्ञार्थ संपादिलेलें धन यज्ञाविषयीं जो खर्च करीत नाहीं तो भासपक्षी किंवा काकपक्षी होईल, असा जो सांगितलेला दोष तो पुत्रादिकांचे ठायींहि सारखाच लागू आहे.

१९ **कात्यायन**– बेवारीस जिंदगी राजानें घ्यावी, परंतु मालकाच्या स्त्रियांस अन्नाच्छादन व मालकाचें श्राद्धादिक व चाकर ह्यांपुरती जिंदगी ठेवून बाकी राहिलेली, आणि श्रोत्रियाची जिंदगी बेवारीस असल्यास (मालकाच्या स्त्रिया, श्राद्धादिक, चाकर, ह्यांपुरती राखून बाकी) श्रोत्रियांस द्यावी.

असें जें वचन तेंहि अवरुद्ध स्त्रीविषयींच योजावें, कारण, वचनांत स्त्रीशब्दाचा निर्देश केला आहे (पत्नीशब्दाचा निर्देश नाहीं.)

**नारद**– ब्राह्मणाशिवाय अन्य जातींतली बेवारीस जिंदगी राजानें घ्यावी, आणि मालकाच्या स्त्रियांस उपजीविकेपुरतें द्रव्य द्यावें, असा दाय घेण्याचा विधि सांगितला आहे.

असें जें वचन तेंहि अवरुद्ध स्त्रीविषयींच, कारण, या वचनांतहि स्त्रीशब्दाचा निवेश केला आहे, म्हणून एथें (२६ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे मूळवचनांत) तर पत्नीशब्दाचा निर्देश केला आहे, म्हणून विवाहित, व व्रतस्थ अशी जी पत्नी तिला धनग्रहणाविषयीं विरोध नाहीं.

२० तस्मात् विभक्त व असंसृष्टी असा अपुत्र (निपुत्रिक) मरण पावला असतां त्याची जिंदगी घेणारी प्रथमतः पत्नी हा अर्थ सिद्ध झाला. कारण, विभाग तर पूर्वीं (४ थ्या शाखेंत) सांगितलाच आहे. व संसृष्टी पुढें (२८ व्या शाखेंत) सांगितले आहेत म्हणून.

येणेंकरून श्रीकरादिकांनीं पत्नीला जो अल्पधनग्रहणाविषयीं अधिकार सांगितला

भोग अनिषिद्ध विषयांचा असला पाहिजे; कारण, अनिषिद्ध विषयोपभोगाला वैराग्योत्पादकत्वेंकरून कर्तव्यता आहे, म्हणून अर्थ व काम अवश्य साधावे. (सुबोधिनी).

तेंहि निरस्त झाला. तो प्रकार असा.—औरसपुत्र असले तरी व मालक जिवंत असतां किंवा मृत असतांहि पत्नीला पुत्रसमान विभाग असें ( ४ थ्या शाखेच्या १ ल्या अंकाचे मूळवचनांत ) सांगितलें आहे, तें असें:—" जर पुत्रांस समविभाग देतो तर पत्नींलाहि समविभाग द्यावा," तसेंच " पिता निवर्तल्यावर विभाग करणाराची जननीहि समविभाग पावेल " असें ( १९ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे मूळवचनांत ) सांगितलें आहे, ह्मणून अपुत्र मृताचें धन पत्नीला अन्नाच्छादनाहून अधिक मिळणार नाहीं असें ह्मणणें केवळ अज्ञानमूलक मात्र आहे.

अणखी " पत्नींलाहि समविभाग द्यावा " असें ( ४ थ्या शाखेच्या १ ल्या अंकांत) सांगितलें आणि " जननीहि समविभाग पावेल " असें ( १९ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितलें, तेथें उपजीविकेपुरतेंच धन द्यावें असें जें मत आहे तें योग्य नाहीं, कारण, ( तसें मानिलें तर ) अंशशब्दास व समशब्दास वैयर्थ्यापत्ति येईल.

२१ (अपुत्र मृताचें) बहुधन असल्यास पत्नीला उपजीविकेपुरतें मात्र द्यावें आणि अल्प असलें तर पत्नीनें पुत्राबरोबर अंश घ्यावा, असें मत असलें तरी तेंहि संभवत नाहीं. कारण, विधिवैषम्यदोषप्रसंग[1] येतो. तो प्रकार असा—"पत्नीलाहि समविभाग द्यावा" आणि "जननीहि समविभाग पावेल " ह्या वचनेंकरून बहुधन असल्यास पत्नीला उपजीविकेपुरतें द्यावें; असें प्रतिपादन करणें तर वचनांतराच्या आश्रयानें केलें पाहिजे, अन्यथा होत नाहीं. आणि अल्प धन आहे तर पुत्राच्या विभागाबरोबर विभाग घ्यावा, हें प्रतिपादन करावयास वचनांतराची अपेक्षा नको.

जसें चातुर्मास्य यज्ञांत दोन पर्वांचेठायीं अग्निप्रणयन करावें असें श्रुतिवचन आहे त्या ठिकाणीं पूर्वपक्षवादी ह्मणतो कीं, सोमयागाचे ठायीं जसें अग्निप्रणयन करतात

---

१ विधिवैषम्यदोषप्रसंग म्हणजे, कोणे स्थळीं एक वेळ सांगितलेलें एकच वचन, पक्षीं सापेक्ष होतें आणि पक्षीं निरपेक्ष होतें असें एकरूपत्व नाहीं, प्रकृतींही तसेंच आहे. २ हा विचार धर्ममीमांसा सूत्राच्या ७ व्या अध्यायाच्या ३ पादीं केला आहे. त्याचा सारांश असा आहे कीं, सोमयागांत कर्तव्य अग्निप्रणयन म्हणून कांहीं एक विशेषप्रकार आहे आणि दर्शपौर्णमास यागाचेठायीं तर साधारण रीतीनें अग्नि प्रणयन कर्तव्य आहे. गार्हपत्य कुंडांतून आहवनीयादि कुंडांत जो अग्नि नेला जातो त्या कर्माला अग्निप्रणयन म्हटलें आहे. सोमयागाचे ठायीं उत्तरवेदी होते, दर्शपौर्णमास यागाचे ठायीं होत नाहीं अशी प्रयोगाची स्थिति आहे. आतां एक वर्षामध्यें चार यज्ञ करण्याविषयीं सांगितले आहेत. ते असे कीं एक यज्ञ झाल्यानंतर मध्यें तीन महिने टाकून चौथ्या चौथ्या मासाचे ठायीं यज्ञ करावा असे जे एका वर्षांत चार यज्ञ करणें त्याला चातुर्मास्य असें साधारण नांव आहे. त्यामध्यें प्रथम यज्ञाचें वैश्वदेव, दुसऱ्या यज्ञाचें वरूणप्रघास, तिसऱ्या यज्ञाचें साकमेध आणि चौथ्या यज्ञाचें शुनासीराय अशीं चार नांवें आहेत. ह्या चहूंला पर्व अशीही संज्ञा आहे. ह्या चातुर्मास्य यज्ञांत दोन पर्वांचे ठायीं अग्निप्रणयन करावें त्याचें कारण हें कीं दोहोंनीं गमन आणि दोन पर्वें त्या यज्ञाच्या जंघा होत असें श्रुतिवचनांत सांगितलें आहे. त्यांत संशय असा कीं सोमयागांत जितकें अग्निप्रणयन आहे तितकें करावें किंवा, साधारण रीत्या दर्शपौर्णमास यागांत जितकें होईल तितकें करावें ? या ठिकाणीं पूर्वपक्षवादी म्हणतो कीं सोमयागाप्रमाणें करावें हें युक्त आहे. कारण प्रकृतियागाप्रमाणें अनुष्ठान, विकृतियागाचे ठायीं करावें अशा अर्थाचें जें अतिदेशवाक्य

तसें अग्निप्रणयन दोन पर्वांचेठायीं करावें असा अतिदेश येथें केलेला आहे. "वैश्वदेव पर्वांचेठायीं उत्तरवेदी करूं नये, तसेंच शुनासीरीय पर्वांचेठायीं उत्तरवेदी करूं नये" अशा दोन श्रुतिवचनांनीं जो उत्तरवेदीचा निषेध केला तोच वर लिहिलेला अतिदेश सिद्ध होण्याकरितां आहे. ह्या पूर्वपक्षावर कोणी एकदेशी सिद्धांतवादी ह्मणतो कीं 'सोमयागाप्रमाणें अग्निप्रणयन करावें' अशा अतिदेशेंकरून प्राप्त झालेली जी उत्तरवेदी तिच्या पहिल्या व शेवटच्या ह्या दोन पर्वांविषयीं हे निषेध आहेत असें नाहीं, तर चातुर्मास्यप्रकरणीं सांगितलेलें जें "येथें उत्तरवेदी करावी" असें श्रुतिवचन आहे तेणेंकरून प्राप्त झालेल्या उत्तरवेदीचा निषेध होतो. ह्या भाषणावर पूर्वपक्षवादी "येथें उत्तरवेदी करावी" ह्या वचनेंकरून, पहिलें व शेवटचें ह्या दोन पर्वांविषयीं वर सांगितलेल्या दोन वचनांनीं सांगितलेला जो निषेध त्याची अपेक्षा ठेवून एकपक्षीं उत्तरवेदी करण्याविषयीं प्राप्त झालें आणि मध्यवर्ती जीं दोन पर्वें त्यांचे ठायीं तर कोणाचीहि अपेक्षा न धरितां नित्यविधीप्रमाणें वेदी करण्याविषयीं प्रतिपादन करतो यास्तव विधिवैषम्यदोषप्रसंग प्राप्त झाला असें दाखवितो. त्यानंतर [2]सिद्धांतमतींहि विधिवैषम्यदोषप्रसंगास्तव पहिलें व शेवटचें

---

तेणेंकरून दर्शपूर्णमासाप्रमाणें अग्निप्रणयन करावें असें प्राप्त झालें असतां केवळ सामान्य अग्निप्रणयन केल्यानें वर सांगितलेल्या श्रुतिवचनाची सार्थकता होत नाहीं. आतां त्या श्रुतिवचनेंकरून सोमयागाप्रमाणेंच अग्निप्रणयन करावें असा अतिदेश आहे असें समजण्याकरितां आहे. कारण हें कीं विधि प्राप्त झाल्यावांचून निषेध प्राप्त होत नाहीं आणि वैश्वदेव पर्वाचे ठायीं तर उत्तरवेदी करूं नये; तसेंच शुनासीरीय पर्वाचे ठायीं उत्तरवेदी करूं नये अशा दोन श्रुतिवचनांहींकरून उत्तरवेदीचा निषेध केला आहे यास्तव चातुर्मास्य यज्ञांत सोमयागाप्रमाणें सर्व प्रकार आहे अशी कल्पना केल्यानें ज्या उत्तरवेदीची प्राप्ति आली तिचा निषेध करण्याकरितां वर सांगितलेलीं दोन श्रुतिवचनें आहेत. अर्थात् तींच दोन वचनें सोमयागाप्रमाणें अग्निप्रणयन करावें असा अतिदेश दाखविण्याकरितां आहेत असा पूर्वपक्ष वादीचा अभिप्राय.

१ "येथें उत्तरवेदी करावी" ह्या वचनेंकरून चारहि पर्वांचे ठायीं उत्तरवेदीचें समसमान विधान सांगितलें आणि "वैश्वदेव पर्वाचे ठायीं उत्तरवेदी करूं नये" व "शुनासीरीय पर्वांचेठायीं उत्तरवेदी करूं नये" ह्या दोन वचनेंकरून दोन पर्वांचे ठायीं उत्तरवेदीचा निषेध केला म्हणून विधि व निषेध हे दोनही श्रुतिवचनावरून प्राप्त होतात. यास्तव जेव्हां दोन पर्वांचे ठायीं वर सांगितलेल्या दोन श्रुतिवचनांनीं उत्तरवेदीचा निषेध केला तेव्हां "येथें उत्तरवेदी करावी हें श्रुतिवचन एक पक्षीं उत्तरवेदीचें विधान करितें आणि मधल्या दोन पर्वांचेठायीं तर निषेधबोधक वचनद्वयाची अपेक्षा धरल्यावांचूनच नित्यविधिप्रमाणें उत्तरवेदीचें प्रतिपादन करितें. याप्रमाणें विधिवैषम्यनामक वाक्यदोष प्राप्त होतो असा पूर्वपक्षवादीचा अभिप्राय आहे. २ एकदेशी सिद्धांतवादीच्या मताप्रमाणें विचार केला असतां विधिवैषम्यदोषाचें निवारण होणें अशक्य आहे यास्तव मुख्य सिद्धांतवादीचें म्हणणें असें आहे कीं दोन पर्वांचे ठायीं अग्निप्रणयन करावें, त्याचें कारण "दोहोंनीं गमन आणि दोन पर्वें तीं यज्ञाच्या जंघा होत" अशा अर्थवादवाक्यापासून मधल्या दोन पर्वांचेठायीं अग्निप्रणयन करण्याविषयीं सांगितलें. जेथें अग्निप्रणयन कर्तव्य असेल तेथेंच उत्तरवेदी कर्तव्य आहे यास्तव "येथें उत्तरवेदी करावी" ह्या श्रुतिवचनेंकरून उत्तरवेदीचें जें विधान सांगितलें तेंही अर्थवादवाक्याला अनुसरून मधल्या दोन पर्वांविषयींच आहे या कारणाकरितां पहिलें व शेवटचें ह्या दोन पर्वांचेठायीं उत्तरवेदीची प्राप्ति होतच नाहीं. त्यामुळें वर सांगितलेल्या निषेधबोधक दोन श्रुतिवचनांहींकरून पहिलें व शेवटचें ह्या दोन पर्वांचेठायीं उत्तरवेदी करूं नये असें जें सिद्ध केलें त्याचाच अनुवाद केला आहे. ह्याप्रमाणें मुख्य सिद्धांतविचाराचा सारांश आहे.

या दोन पर्वांचे ठायीं जो उत्तरवेदीचा निषेध केला तोच स्पष्ट सांगण्याकरितां हा अनुवाद येथें केला आहे. आणि दोन पर्वांचे ठायीं अग्निप्रणयन करावें इत्यादिक जें अर्थवादरूप वाक्य त्याचा विचार करून पाहिलें असतां येथें उत्तरवेदी करावी हें वचन, मध्यवर्ती जीं वरुणप्रघास व साकमेध अशीं दोन पर्वें त्यांविषयीं उत्तरवेदीचें विधान केलें आहे असें प्रतिपादन करितें. आणखी मतांतर असें आहे कीं,

**मनु**–२२ अपुत्राची जिंदगी पित्यानें अथवा भ्रात्यांनीं घ्यावी.

**शंख**– अपुत्र मृताचें द्रव्य भ्रात्यांनीं, त्याच्या अभावीं मातापितरांनीं, किंवा ज्येष्ठ **पत्नीनें** घ्यावें.

ह्याप्रमाणें मनुवचन व शंखवचन ह्यांवरून अपुत्रधन भ्रात्यांकडे जातें असें प्राप्त झालें व " अनपत्य स्त्रीचें आमरणपर्यंत पोषण करावें" इत्यादि ( नारद ) वचनावरून अनपत्य भ्रात्याची स्त्री पोषणापुरतें मात्र धन पावते, असें सिद्ध झालें असतां बहुधन अपुत्र मृत झाला तर त्याच्या स्त्रीनें उपजीविकेपुरतें धन घ्यावें. आणि अवशिष्ट धन भ्रात्यांनीं घ्यावें.

बरें, जर **पत्नीच्या** उपजीविकेपुरतेंच द्रव्य आहे किंवा त्यापेक्षांही न्यून आहे तर काय **पत्नीच** घेईल ? अथवा भ्राते घेतील ? असा विरोध प्राप्त झाला असतां प्रथम ( पत्नी घेईल हा ) कल्पच बलवत्तर, असें सुचविण्यासाठीं "पत्नी कन्या" इत्यादिकांचा ( २६ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) उपक्रम केला.

२३ असें जें (कोणी ग्रंथकाराचें ) मत आहे तेंही भगवान् (विश्वरूप) आचार्य मान्य करीत नाहीं. कारण "अपुत्राची जिंदगी पित्यानें अथवा भ्रात्यांनीं घ्यावी " असा मनूनें विकल्प सांगितल्यावरून हें ( मनु ) वचन ( पित्याच्या अभावीं भ्राते असा ) क्रम दाखविणारें नव्हे. केवळ, जिंदगी घेण्याविषयीं पित्यास अधिकार दाखविणारें मात्र होय. तो अधिकार, पत्नी इत्यादिकांच्या अभावीं आहे, ह्मणून हें मनुवचन पत्न्यादि गणाच्या अभावींहि कृतार्थ होतें. शंखवचनहि संसृष्टि भ्रात्याविषयींच आहे.

आणखी असें आहे कीं, अल्पधन असल्यास पत्नी घेईल असें ह्या ( २६ व्या शाखेच्या मूळ ) वचनापासून किंवा प्रकरणापासून देखील अवगत होत नाहीं. आणि तसें मानिलें असतां ' पूर्वपूर्वाच्या अभावीं उत्तरोत्तर, अपुत्र मृताचा धनाधिकारी होईल ' ह्या वाक्यशेषाचें वचन पत्नी व कन्या ह्या दोहोंविषयीं अन्य वचनाची अपेक्षा ठेवून अल्प धनग्रहणाचा अधिकार दाखवितें व पिता इत्यादिकांविषयीं तर सर्व धन घेण्याचा अधिकार दाखवितें. या रीतीनें पूर्वीं सांगितलेला विधिवैषम्यदोष प्रसंग पुनः येतोच, यास्तव हें मत जसें तसेंच ( विचाररहित ) आहे.

**हारीत**– विधवा तारुण्य दशेंत असल्यामुळें जर **कर्कशा** आहे तर तिचें आयुष्य आहे तोंपर्यंत तिला अन्नाच्छादन मात्र द्यावें.

असें जें वचन तेंहि जर ती **कर्कशा** ह्मणजे शंकितव्यभिचारिणी आहे तर तिला सर्व द्रव्य घेण्याचे निषेधाविषयीं आहे. अर्थात् ह्या वचनावरून ज्या स्त्रियेला व्यभिचारशंकेचा अपवाद नाहीं त्या स्त्रीनें सर्व धन घ्यावें हें सिद्ध होतें.

शंखही हाच अभिप्राय मनांत आणून सांगतो.

**शंख**– अपुत्र मृताचें धन भ्रात्यांनीं, त्याच्या अभावीं मातापितरांनीं; अथवा ज्येष्ठ पत्नीनें घ्यावें.

ज्येष्ठ ह्मणजे गुणेंकरून ज्येष्ठ, अर्थात् जी स्त्री शंकितव्यभिचारिणी नाहीं तिनें सर्व द्रव्य घेऊन दुसऱ्या कर्कशास्त्रीचेंहि मातृवत् पोषण करावें. ह्याप्रमाणें एथपर्यंत झालेला सर्व विचार निर्दोष जाणावा.

२४ तस्मात् विभक्त आणि असंसृष्ट असा अपुत्र मरण पावला असतां त्याची विवाहित व व्रतस्थ स्त्री त्याच्या जिंदगीची मालक होते असें सिद्ध झालें.

२५ पत्नीच्या अभावीं कन्या वारस होतात. ( मूळवचनांत ) " दुहितरः " (कन्याः) असा बहुवचनांत निर्देश केला आहे तो समानजातीय कन्यांस व भिन्नजातीय कन्यांस समविषमांश ( वर्णानुक्रम प्रमाणें चार, तीन, दोन, एक असा ) दाखविण्यासाठीं आहे.

पत्नीच्या अभावीं कन्या वारस.

**कात्यायन**– भर्त्याच्या जिंदगीची वारस पत्नी, परंतु ती व्यभिचारिणी नसेल तर, तिच्या अभावीं कन्या, पण ती अविवाहित असेल तर.

**बृहस्पतिहि**– नवऱ्याचें धन घेणारी पत्नी, तिच्या अभावीं कन्या, कारण, पुत्राप्रमाणें कन्येचाहि संभव मातापितरांच्या प्रत्येक अंगापासून आहे. यास्तव पितृधन ( कन्या संभवत असतां ) दुसरा मनुष्य कसें घेईल ?

कन्याहि विवाहित व अविवाहित अशा दोन प्रकारच्या असल्यास अविवाहित कन्येनेंच धन घ्यावें. कारण, " तिच्या अभावीं कन्या, पण जर ती अविवाहित असेल तर " असें कात्यायनाचें विशेष वचन आहे ह्मणून.

तसेंच सधन व निर्धन अशा दोन प्रकारच्या कन्या असल्यास निर्धन कन्याच घेईल, तिच्या अभावीं सधन कन्या घेईल.

**गौतम**– **स्त्रीधन**[1], **अविवाहित** व निर्धन अशा कन्येकडे जातें.

असें गौतमवचन पितृधनाविषयींहि समानच लागू आहे.

परंतु हें ( गौतम ) वचन **पुत्रिकेविषयीं** असेंहि कोणी मानतील तर तसें मानूं नये. कारण, "औरसासारिखाच पुत्रिकासुत" असें **पुत्रिका** व तिचा पुत्र हे औरसासारिखेच असें पुत्रप्रकरणीं ( २० व्या शाखेचे मूळवचनांत ) सांगितलें आहे.

२६ ( मूळ वचनांत )च शब्द आहे यास्तव कन्येच्या अभावीं दौहित्र ( कन्यापुत्र ) जिंदगीचा वारस होतो.

कन्येच्या अभावीं दौहित्र वारस.

**विष्णु**– पुत्र अथवा पौत्र संतान नसेल तर दौहित्र जिंदगी घेतील; कारण, पूर्वजाच्या ( मातामहादिकांच्या ) श्राद्धादिकांविषयीं पौत्राच्या ठिकाणीं दौहित्र अधिकारी होतात.

---

१ स्त्रीधन एथील स्त्रीशब्द पित्याचाहि उपलक्षक असें सांप्रदायिक म्हणतात.–मयूख.

**मनुहि**— कन्या पुत्रस्थानीं मानलेली असो किंवा नसो, तिला सवर्ण पतीपासून जो पुत्र होतो तेणेंकरून तो मातामह पौत्री ह्मणजे ज्यास पुत्राचा पुत्र आहे असा होतो. तो पौत्र त्या मातामहाचें धन घेतो व मातामहास पिंड देणाराहि होतो.

२७ त्याच्या (दौहित्राच्या) अभावीं पितर (मातापितर) जिंदगीचे वारीस होतात. जरी एक-समयावच्छेदेंकरून जे पदार्थ उद्दिष्ट असतात त्यांच्या वाचक शब्दांचाच द्वन्द्व समास सांगितला आहे व अनेक पदांपैकीं एक पद राहून बाकीच्यांचा लोप होतो असा जो एक शेष तोही द्वन्द्वाचा अपवादक आहे यास्तव तशाच स्थळीं होतो. म्हणून धनग्रहणाविषयीं मातापितरांचा क्रम, ह्मणजे अगोदर मातेनें घ्यावें व ती नसल्यास पित्यानें घ्यावें, असें दिसत नाहीं तरीं "माता च पिता च" (माता आणि पिता) या विग्रहवाक्यामध्यें माता शब्दाचा उच्चार पूर्वीं आहे, आणि एकशेष होत नाहीं तेव्हां मातापितरौ (माता आणि पिता) या प्रयोगांत माता शब्दाचें श्रवण पूर्वीं आहे आणि ज्या क्रमानें पठन असतें त्याच क्रमानें अर्थाचा बोध होतो यास्तव धनग्रहणाविषयींहि क्रम कोणता ही आकांक्षा आली असतां बोध झालेल्या क्रमाच्या अनुरोधानें प्रथमतः माता धन घेणारी होते. तिच्या अभावीं पिता वारस होतो. एका पुत्राचा जो पिता तोच दुसऱ्या पुत्राचाहि पिता होतो यास्तव सर्व पुत्रांविषयींहि पित्याचा संबंध साधारण आहे, परंतु जननी इतर पुत्रां (सावत्र पुत्रां) विषयीं तशी नाहीं. ह्मणून **प्रत्यासत्तीच्या** आधिक्यास्तव (ह्मणजे पित्यापेक्षां जननीचा निकट संबंध आहे यास्तव) आणि "**सपिंडामध्यें** जो जवळचा असेल तो जिंदगी घेईल" अशा मनुवचनावरून जननीच प्रथमतः जिंदगीची वारीस होते, हें योग्य आहे.

दौहित्राच्या अभावीं जननी वारीस.

२८ (जिंदगीच्या वारसपणाविषयीं) प्रत्यासत्तीवरून निर्णय करण्याचा नियम सपिंडांतच आहे असें नाहीं, तर सामान्यतः समानोदकांतहि जिंदगीचा वारीसपणा प्राप्त असतां तेथेंहि प्रत्यासत्तीवरूनच वारसाचा निर्णय करावा असें ह्या (वरच्या मनु) वचनावरून अवगत होतें, यास्तव माता, पिता ह्या दोहोंमध्यें मातेचीच विशेष प्रत्यासत्ति असल्यामुळें प्रथमतः माताच धनग्रहणाविषयीं विशेष अधिकारी हें सयुक्त आहे.

२९ जननीच्या अभावीं पिता जिंदगीचा वारस होतो, पित्याचे अभावीं भ्राता जिंदगीचा वारस.

जननीच्या अभावीं पिता वारस, त्याच्या अभावी भ्राता.

**मनु**— अपुत्राची जिंदगी पित्यानें अथवा (पित्याचे अभावीं) भ्रात्यांनीं घ्यावी.

---

१ विष्णुवचन— निपुत्रिकाची जिंदगी पत्नीकडे जाते, तिच्या अभावीं कन्या, कन्येच्या अभावीं दौहित्र, त्याच्या अभावीं पिता, त्याच्या अभावीं माता, तिच्या अभावीं भ्राता, त्याच्या अभावीं पुतण्या, त्याच्या अभावीं गोत्रज घेतील. असा जो क्रम दाखविला त्यास हा (पित्याचे पूर्वीं माता धनग्रहणाविषयीं वारीस, कारण, पिता जसा सर्व पुत्रांविषयीं सारखा तशी माता नाहीं, तिचा विशेष संबंध असल्या कारणानें तीच प्रथमतः वारीस होते इत्यादिक) विचार विष्णुवचनास विरुद्ध आहे म्हणून तो उपेक्ष्य होय. कारण, मातेचा विशेष संबंध आणि पित्याचा सर्व पुत्रांविषयीं साधारण संबंध हीं जिंदगीचे वारसपणाविषयीं नियामक मानावीं याविषयीं प्रमाण नाहीं.—मयूख.

## धारेश्वराचें मत.

**मनु**– अनपत्य पुत्राची जिंदगी मातेनें घ्यावी. माता मृत झाल्यावर पितामहीनें घ्यावी.

अशा मनुवचनावरून, पिता जिवंत आहे तथापि माता निवर्तल्यावर पितामही जिंदगीची वारीस, पिता नाहीं. कारण पित्यानें घेतलेलें धन भिन्नजातीय पुत्रांकडेही जातें, आणि पितामहीनें घेतलेलें धन तर सजातीय पुत्रांकडेसच जातें ह्मणून पितामहीनेंच घ्यावें.

असें जें धारेश्वरानें सांगितलें तेंहि (विश्वरूप) आचार्यांस अनुमत नाहीं. कारण, वर्णाच्या अनुक्रमाप्रमाणें चार, तीन, दोन, आणि एक भाग पावतात. इत्यादि ( १६ व्या शाखेंत सांगितलेल्या ) वचनेंकरून भिन्नजातीय पुत्रांसहि धनग्रहण सांगितलें आहे.

**मनु**– राजानें ब्राह्मणद्रव्य कदापि हरण करूं नये अशी शास्त्रमर्यादा आहे.

असें जें वचन तें तर राजानें ( राजसत्तेच्या संबंधानें मात्र) घेऊं नये अशा अभिप्रायाचें आहे, परंतु पुत्र (क्षत्रियापुत्र) असेल तर त्यानेंही घेऊं नये अशा अभिप्रायाचें नव्हे.

पित्याचे अभावीं सोदर भ्राते वारस.

३० भ्रात्यांतही प्रथमतः जे सोदर भ्राते असतील तेच घेतील. कारण, सापत्न भ्रात्याची जननी भिन्न आहे.

**मनु**– सापिंडामध्यें ( नात्यानें ) सन्निहित असेल तो जिंदगी घेईल.

सोदर भ्रात्याच्या अभावीं सापत्न भ्राता वारस.

३१ सोदर भ्रात्यांच्या अभावीं सापत्न भ्राते जिंदगीचे वारस. भ्रात्यांचे अभावीं पुतणे आपापल्या पित्याच्या अनुक्रमानें जिंदगीचे वारीस.

३२ भ्राते व पुतणे हे दोघे असल्यास जिंदगी घेण्याचा अधिकार पुतण्यास नाहीं. कारण, भ्रात्यांच्या अभावींच पुतण्यास अधिकार असें वचनावरून प्राप्त होतें.

३३ अपुत्र भ्राता मरण पावल्यानंतर त्याच्या भ्रात्यांस तर त्याची जिंदगी घेण्याचा अधिकार सर्वांस सारखा ( सामान्यतः ) प्राप्त आहे, परंतु मयत भ्रात्याचे जिंदगीचे वांटे होण्यापूर्वींच जर त्यांतून एकादा भ्राता मृत झाला तर त्याच्या पुत्रांस पितृद्वारा, विभाग घेण्याचा अधिकार प्राप्त झाला. ह्यास्तव त्या सर्व भ्रात्यांस जिंदगी वांटून घेण्याविषयीं पितृद्वारें ( १० व्या शाखेंत सांगितलेली ) विभागकल्पनाच सयुक्तिक आहे.

३४ पुतण्याच्या अभावीं गोत्रज जिंदगीचा वारीस. गोत्रज ह्मणजे ( मृताचे गोत्रांत

---

१ सोदर भ्रात्यांच्या अभावीं सापत्न भ्राते, त्यांच्या अभावीं पुतणे, असें जें सांगितलें तें योग्य नाहीं, कारण, 'भ्राते' ह्या पदाची शक्ति सोदर भ्रात्यावर कल्पिली आणि सापत्न भ्रात्यावर लक्षणा कल्पिली असतां वृत्तिद्वयविरोध येतो.– वृत्तिद्वय— शक्ति, लक्षणा, आणि व्यंजना, अशा शब्दाच्या तीन वृत्ति आहेत. गौणी वृत्ति ही लक्षणेंतलाच भेद. एका शब्दाची शक्ति एका अर्थाविषयीं मानिल्यानंतर पुनः त्या शब्दाचा दुसरा अर्थ करणें तो शक्तीनें होत नाहीं, तेव्हां लक्षणेनें करावा. केला असतां एका शब्दालाच दोन वृत्ति स्वीकारिल्या असतां त्या शास्त्रमतें विरुद्ध आहेत. प्रकृतींत सोदर भ्रात्यावर शक्ति कल्पून सापत्न भ्रात्यावर लक्षणा कल्पिणें ह्या एका भ्रातृशब्दावर दोन वृत्ति स्वीकार करणें हें मीमांसा शास्त्रमतें विरुद्ध आहे.–मयूख.

पुतण्याच्या अभावीं गोत्रज.

उत्पन्न झालेला ) पितामही, सपिंड व समानोदक. त्यांत प्रथमतः पितामही जिंदगीची वारस. " माता निवर्तल्यानंतर पितामहीनें जिंदगी घ्यावी " असा मातेच्या पाठीमागें पितामहीला जिंदगी घेण्याविषयीं अधिकार प्राप्त असतां मातेपासून पुतण्यापर्यंत वारसांच्या बांधलेल्या अनुक्रमांत मध्यें अन्याचा ( पितामहीचा ) प्रवेश होऊं शकत नाहीं. कारण, " पितामहीनें जिंदगी घ्यावी " हें वचन पितामहीला जिंदगी घेण्याविषयीं अधिकार मात्र दाखवितें. म्हणून पुतण्यांच्या अभावीं गोत्रजांमध्यें प्रथमतः पितामही वारस केली, असा विरोधपरिहार जाणावा.

३५ पितामहीच्या अभावीं **समानगोत्रज** असे पितामह इत्यादिक सपिंड जिंदगीचे वारस होतात. कारण, भिन्नगोत्र अशा सपिंडांचें ग्रहण पुढें बंधुशब्देंकरून केलें आहे.[1]

३६ समानगोत्रज सपिंडांमध्येंहि पित्याचा वंश ( भ्राता पुतण्या वगैरे ) नसेल तेव्हां

पितृवंश नसल्यास पितामहाचा वंश.

पितामही, पितामह, चुलता, चुलतभाऊ, हे अनुक्रमानें जिंदगीचे अधिकारी होतात.

३७ पितामहाचा वंश नसेल तर प्रपितामही, प्रपितामह, त्याचे पुत्र, त्याच्या पुत्रांचे

पितामहाचा वंश नसल्यास प्रपितामहाचा वंश.

पुत्र ह्याप्रमाणें सातव्या पिढीपर्यंत समानगोत्र सपिंड ह्यांस धनग्रहणाविषयीं अधिकार जाणावा.[2]

३८ त्यांच्या (समानगोत्रांच्या व सपिंडांच्या ) अभावीं **समानोदक** जिंदगीचे वारस. सपिंडांच्या पुढें सात पिढ्यांपर्यंत ते समानोदक जाणावे अथवा जन्म व नांव जेथपर्यंत ज्ञात आहे तेथपर्यंत (पुरुष) समानोदक जाणावे.

**बृहन्मनु**—सपिंड सात पिढ्यांपर्यंत, पुढें नाहींत. आणि समानोदक तर चौदा पिढ्यांप-

---

१ मनुस्मृतींत सपिंडाच्या अभावीं सकुल्य अथवा आचार्य किंवा शिष्य हे वारस होतात असें सांगितलें आहे. त्यांत सकुल्य शब्दांत सगोत्र, समानोदक, मातुळ व दुसरे भिन्नगोत्र सपिंड व तीन प्रकारचे बंधु इतके येतात. याज्ञवल्क्याच्या वचनांतहि बंधुशब्दानें मातुळाचें ग्रहण होतें; कारण. जर बंधुशब्दांत मातुळ न येईल तर त्याचे पुत्र वारशास अधिकारी असतां तो ( मातुळ ) स्वतः जवळचा नातलग असून त्यास वारशाचा अधिकार नसणें हा मोठा अयोग्यपणा होईल. वीरमि. प. २०९, पृ० २ पं. ६. २ " गोत्रज " ह्या शब्दांत मिताक्षरा व मयूख ह्या ग्रंथांप्रमाणें, पुढें लिहिलेले नातलग येतात—१ पितामही (बापाची आई ); २ गोत्रज सपिंड; आणि ३ गोत्रज समानोदक. वीरमित्रोदयांत पितामहीनंतर विभक्त पुरुषाची जिंदगी घेण्यास अधिकारी गोत्रज सांगितले आहेत. ते येणेंप्रमाणें:—

१ पितामह ( बापाचा बाप ); २ बापाचे भाऊ ( चुलते ); ३ बापाच्या भावाचे मुलगे ( चुलत भाऊ ); ४ प्रपितामही ( पणजी ); ५ प्रपितामह ( पणजा ); ६ पितामहाचे भाऊ ( चुलत आजे ); ७ पितामहाच्या भावाचे मुलगे ( चुलत चुलते ); आणि वारसांचा हा क्रम सातव्या पूर्वजापर्यंत न्यावयाचा.

मयूखांतील क्रम पुढें लिहिल्याप्रमाणें आहे.—

१ सख्खी बहीण; २ पितामह आणि सावत्र भाऊ, दोघे एकदमच वारस; ३ पितामह, चुलता आणि सावत्र भावांचे मुलगे, हे एकदम वारस; आणि याप्रमाणें सातव्या पूर्वजापर्यंतचे सर्व गोत्रज त्यांच्या जवळच्या नात्याप्रमाणें.

र्यंत. कोणी ह्मणतात कीं जन्म व नांव ह्यांची स्मृति आहे तावत्पर्यंत समानोदक, त्याच्या पुढें गोत्र म्हटलें आहे.

३९ गोत्रजांच्या अभावीं बांधव जिंदगी घेण्याविषयीं अधिकारी होतात.

बांधव जिंदगीचे वारस.

बांधव तीन प्रकारचे आत्मबंधु, पितृबंधु, आणि मातृबंधु.

**स्मृति**– आत्मबंधु ह्मणजे आपल्या आतेचे पुत्र, आपल्या मावशीचे पुत्र आणि आपल्या मामाचे पुत्र; पितृबंधु ह्मणजे पित्याच्या आतेचे पुत्र, पित्याच्या मावशीचे पुत्र, आणि पित्याच्या मामाचे पुत्र; मातृबंधु म्हणजे मातेच्या आतेचे पुत्र, मातेच्या मावशीचे पुत्र, आणि मातेच्या मामाचे पुत्र.

४० त्यांत जवळच्या नात्यामुळें प्रथमतः आत्मबंधु जिंदगीचे वारस, त्यांच्या अभावीं पितृबंधु, पितृबंधूंच्या अभावीं मातृबंधु असा अनुक्रम समजावा.

सदरहू बंधूंस जिंदगी घेण्याचा क्रम.

४१ बंधुत्रयाच्या अभावीं आचार्य, त्याच्या अभावीं शिष्य.

बंधुत्रयाच्या अभावीं आचार्य, त्याच्या अभावीं शिष्य.

**आपस्तंब**– पुत्राच्या अभावीं जो जवळचा सपिंड असेल तो ( जिंदगी घेईल), त्याच्या अभावीं आचार्य, त्याच्या अभावीं अंतेवासी ( शिष्य ).

४२ शिष्याच्या अभावीं सब्रह्मचारी जिंदगीचा वारस. सब्रह्मचारी ह्मणजे ज्या सहवर्तमान एका गुरूपासून मौंजी, व वेदाध्ययन आणि त्या वेदाचें अर्थज्ञान प्राप्त झालें तो.

शिष्याच्या अभावीं सहाध्यायी.

४३ ब्राह्मणद्रव्य असल्यास सब्रह्मचारीच्या अभावीं श्रोत्रिय वारस होतो. ह्यास प्रमाण.

निपुत्रिक ब्राह्मणाची बेवारस जिंदगी श्रोत्रियास द्यावी.

**गौतम**–निपुत्रिक ब्राह्मणाची जिंदगी श्रोत्रियानें घ्यावी. श्रोत्रियाच्या अभावीं सामान्य ब्राह्मण जिंदगीचा वारस.

**मनु**–सर्व वारसांच्या अभावीं त्रैविद्य, शुचिर्भूत, इंद्रियनिग्रह करणारे असे ब्राह्मण जिंदगीचे वारस, असें झालें असतां धर्मलोप होत नाहीं.

असें ( वचन ) आहे ह्मणून ब्राह्मणद्रव्य राजानें कधींहि घेऊं नये.

**मनु**–राजानें ब्राह्मणद्रव्याचें हरण कधींहि करूं नये अशी शास्त्रमर्यादा आहे.

**नारदहि (सांगतो)**–ब्राह्मण मरण पावला असतां त्याच्या जिंदगीला कोणी वारस नसेल तर ती जिंदगी राजानें ब्राह्मणासच द्यावी. असें न केल्यास राजा पापी होतो.

---

१ हा बंधुविषयक क्रम बौधायनोक्त आहे असें माधवावरून निश्चित होतें, आणि अवांतर बंधूविषयीं क्रम धरणें तोंहि पाठिक क्रमच धरावा. कारण, अणुमात्र जरी विशेष असेल तरी तोही निर्णयाचा निश्चयकारक होतो असा न्याय आहे. २ उपनयनसंस्कार करून ज्याणें वेदाध्ययन सांगितलें तो आचार्य म्हटला आहे.

४४ क्षत्रियादिकांची जिंदगी तर सब्रह्मचारीपर्यंत वारस नसल्यास राजानें घ्यावी
ब्राह्मणाखेरीज इतर जातींत ( तीविषयीं ) ब्राह्मण अधिकारी नाहीं.
बेवारस जिंदगी राजानें घ्यावी.

मनु– इतर जातींत सर्व वारसांच्या अभावीं राजानें जिंदगी घ्यावी. १२९, १३६

---

पुत्राः पौत्राश्च दायं गृह्णन्ति तदभावे पत्न्यादय इत्युक्तं इदानीं तदुभयापवादमाह॥

**वानप्रस्थयतिब्रह्मचारिणां रिक्थभागिनः ।**
**क्रमेणाचार्यसच्छिष्यधर्मभ्रात्रेकतीर्थिनः ॥ १३७ ॥**

वानप्रस्थस्य यतेर्ब्रह्मचारिणश्च क्रमेण प्रतिलोमक्रमेणाचार्यः सच्छिष्यो धर्मभ्रात्रेकतीर्थी च रिक्थस्य धनस्य भागिनः । ब्रह्मचारी नैष्ठिकः । उपकुर्वाणस्य तु धनं मात्रादय एव गृह्णन्ति । नैष्ठिकस्य तु धनं तदपवादत्वेनाचार्यो गृह्णातीत्युच्यते । यतेस्तु धनं सच्छिष्यो गृह्णाति । सच्छिष्यः पुनरध्यात्मशास्त्रश्रवणधारणतदर्थानुष्ठानक्षमः। दुर्वृत्तस्याचार्यादेरपि भागानर्हत्वात् । वानप्रस्थस्य धनं धर्मभ्रात्रेकतीर्थी गृह्णाति । धर्मभ्राता प्रतिपन्नो भ्राता । एकतीर्थी एकाश्रमी धर्मभ्राता चासावेकतीर्थी च धर्मभ्रात्रेकतीर्थी । एतेषामाचार्यादीनामभावे पुत्रादिषु सत्स्वप्येकतीर्थ्येव गृह्णाति । नन्वनंशास्त्वाश्रमान्तरगताः इति वसिष्ठस्मरणादाश्रमान्तरगतानां रिक्थसंवन्ध एव नास्ति कुतस्तद्विभागः। न च नैष्ठिकस्य स्वार्जितधनसंवन्धो युक्तः। प्रतिग्रहादिनिषेधात् । अनिचयो भिक्षुरिति गौतमस्मरणात् । भिक्षोरपि न स्वार्जितधनसंबन्धसंभवः। उच्यते । वानप्रस्थस्य तावत् । अह्नो मासस्य षण्णां वा तथा संवत्सरस्य वा । अर्थस्य निचयं कुर्यात्कृतमाश्वयुजे त्यजेदिति वचनाद्धनसंबन्धोस्त्येव । यतेरपि । कौपीनाच्छादनार्थं वा वासोऽपि बिभृयाच्च सः । योगसंभारभेदांश्च गृह्णीयात्पादुके तथेत्यादिवचनाद्वस्त्रपुस्तकसंबन्धोऽस्त्येव । नैष्ठिकस्यापि शरीरयात्रार्थं वस्त्रादिसंबन्धोऽस्त्येवेति तद्विभागकथनं युक्तमेव ॥ १३७ ॥

शाखा २७ वी.

पुत्र व पौत्र जिंदगी घेतात. त्यांच्या अभावीं पत्नी इत्यादिक अधिकारी असें सांगितलें ह्या दोहोंचा अपवाद सांगतो.

**मूलार्थ–वानप्रस्थ**, संन्यासी, आणि **ब्रह्मचारी**, ह्यांच्या जिंदगीचे आचार्य, सच्छिष्य, **धर्मभ्रात्रेकतीर्थी**, हे क्रमानें वारस होतात.

**टीकार्थ– वानप्रस्थ**[1], संन्यासी, आणि **ब्रह्मचारी**, ह्यांच्या जिंदगीचे **आचार्य**, सच्छिष्य, **धर्मभ्रात्रेकतीर्थी**, हे क्रमानें ह्मणजे उलट क्रमानें वारस होतात.

---

१ बैरागी गोसावी वगैरेंचाहि अंतर्भाव वानप्रस्थांतच योजावा.

२ येथें **ब्रह्मचारी** ह्मणजे नैष्ठिक[1] ब्रह्मचारी समजावा. कारण उपकुर्वाण ब्रह्मचारीचें धन माता वगैरे घेतील. नैष्ठिकाचें धन तर वरच्या वचनबलास्तव माता वगैरेचा बाध करून आचार्य घेतो.

संन्याशाच्या जिंदगीचा वारस सच्छिष्य.

३ संन्याशाची जिंदगी तर सच्छिष्यानें घ्यावी. सच्छिष्य ह्मणजे जो अध्यात्म शास्त्राचें श्रवण, मनन, आचरण, ह्यांविषयीं समर्थ तो. कारण आचार्यादिकहि जर दुर्वृत्त आहेत तर धन घेण्यास अधिकारी नाहींत.

वानप्रस्थाच्या जिंदगीचा वारस धर्मभ्रात्रेकतीर्थी.

४ वानप्रस्थाचें[2] धन घेण्यास धर्मभ्रात्रेकतीर्थी अधिकारी आहे. **धर्मभ्रात्रेकतीर्थी** ह्मणजे **धर्मभ्राता** ( धर्मार्थ मानलेला भाऊ ) असा **एकतीर्थी** ह्मणजे उभयतांचा ब्रह्मचर्यादिक आश्रमहि एकच असा जो तो, **धर्मभ्रात्रेकतीर्थी** ह्मटला आहे.

सदरहू आचार्य सच्छिष्य व धर्मभ्रात्रेकतीर्थी ह्यांचा अभाव आहे आणि त्यांचे पुत्रादिक जरी विद्यमान आहेत तरी ( वानप्रस्थ, संन्यासी, नैष्ठिक ब्रह्मचारी ) ह्यांच्या जिंदगीचा वारस एकतीर्थीच होतो.

**वसिष्ठ–५ शंका**–ज्यांनीं अन्य आश्रम स्वीकारिला त्यांस विभाग नाहीं.

अशा वसिष्ठवचनावरून, गृहस्थाश्रमावांचून इतर आश्रमांत गत झालेल्यास मुळींच जिंदगी घेण्याचा अधिकार नाहीं, तर मग त्याच्या द्रव्याचा विभाग होणार कोठून. आणि नैष्ठिक ब्रह्मचाऱ्यास स्वसंपादित धनाचा तर संबंधच नाहीं; कारण, दानप्रतिग्रह वगैरे जे द्रव्यप्राप्तीचे उपाय सांगितले त्यांचा त्यास निषेध आहे.

**गौतम**–भिक्षूनें संचय करूं नये.

असें वचन आहे ह्मणून भिक्षूला स्वोपार्जित धनाचा संबंध नाहीं.

**स्मृति–६ वरील शंकेचें समाधान**–एका दिवसापुरता, अथवा एका महिन्यापुरता, किंवा सहा महिन्यांपुरता, अथवा वर्षापुरता, धान्यसंचय वानप्रस्थानें करावा. आणि ( अधिक केलेला संचय ) आश्विनमासीं खर्च करावा. ( आणि तीर्थयात्रेस जावें).

असें जें वचन त्यावरून वानप्रस्थास द्रव्यसंग्रह उक्त आहेच.

**स्मृति**–संन्यासी यानेंहि " कौपीन, व आच्छादन ह्यांसाठीं वस्त्र धारण करावें. आणि योगाभ्यास व अध्यात्मविचार ह्यांची सामग्री, तशाच पादुकाहि घ्याव्या.

इत्यादि वचनावरून संन्यासी यासहि वस्त्र पुस्तक इत्यादि वस्तूंचा संग्रह करण्याविषयीं विहित आहेच.

---

१ ब्रह्मचारी दोन प्रकारचा एक नैष्ठिक व दुसरा उपकुर्वाण. उपनयन संस्कार झाल्यानंतर ब्रह्मचर्य व्रत पाळून वेदाध्ययन पुरें झाल्यानंतरहि आमरणांत ब्रह्मचारी राहण्याचा ज्यानें संकल्प केला तो नैष्ठिक ब्रह्मचारी, आणि यथाशक्ति वेदाध्ययन करून नंतर गृहस्थाश्रम ग्रहण करण्याची इच्छा करणारा तो उपकुर्वाण.

२ " वानप्रस्थाचें धन आचार्य घेईल किंवा शिष्य घेईल " अशा विष्णुवचनावरून क्रमपदाचा अर्थ 'अनुक्रमानें' असा करून आचार्यादिक वारीस असें मदनाचें मत–मयूख.

८ तसेंच नैष्ठिक ब्रह्मचारी ह्यासहि शरीरसंरक्षणार्थ उपयोगी अशा वस्त्रपात्रादिकांचा संबंध आहेच.

ह्यास्तव ह्याचा ( वानप्रस्थ, संन्यासी, आणि नैष्ठिक ब्रह्मचारी ह्यांच्या धनाचा ) विभाग सांगितला तो सयुक्तच आहे. १३७.

---

इदानीं स्वर्यातस्यापुत्रस्य पत्न्यादयो धनभाज इत्यस्यापवादमाह ॥

**संसृष्टिनस्तु संसृष्टी**

विभक्तं धनं पुनर्मिश्रीकृतं संसृष्टं तदस्यास्तीति संसृष्टी । संसृष्टत्वं च न येन केनापि किंतु पित्रा भ्रात्रा पितृव्येण वा । यथाह बृहस्पतिः । विभक्तो यः पुनः पित्रा भ्रात्रा वैकत्र संस्थितः। पितृव्येणाथवा प्रीत्या स तत्संसृष्ट उच्यत इति । तस्य संसृष्टिनो मृतस्यांशं विभागं विभागकाले अविज्ञातगर्भायां भार्यायां पश्चादुत्पन्नस्य पुत्रस्य संसृष्टी दद्यात् । पुत्राभावे संसृष्ट्येवापहरेत् गृह्णीयात् न पत्न्यादिः ॥

शाखा २८ वी.

अपुत्र ( निपुत्रिक ) मरण पावला असतां त्याच्या धनाचे वारस पत्नी कन्या इत्यादिक होतात असें पूर्वीं ( २६ व्या शाखेंत ) सांगितलें त्याचा अपवाद सांगतो.

**मूलार्थ**–संसृष्टीच्या जिंदगीचा वारस संसृष्टीच.

**टीकार्थ**–१ जें विभाग केलेलें धन पुनः एकत्र मिळविलें तें **संसृष्ट** ( म्हटलें आहे ). तें ज्याला आहे तो **संसृष्टी**.

संसृष्टीचें स्वरूप.

भलत्या कोणाशीं संसृष्टी होऊं शकत नाहीं, तर पित्याशीं किंवा भ्रात्याशीं अथवा पितृव्याशीं होतो.

बृहस्पति सांगतो–जो विभक्त झाला असतां पुनः पित्याशीं, भ्रात्याशीं, अथवा पितृव्याशीं संतोषानें एकत्र राहतो तो त्याचा संसृष्ट म्हटला जातो.

२ संसृष्टी मृत असतां त्याचा अंश विभागकाळीं भार्या अज्ञातगर्भा असल्यामुळें विभाग झाला, नंतर पुत्र झाला, तर त्या पुत्राला त्या संसृष्टीनें विभाग द्यावा. पुत्राच्या अभावीं संसृष्टीनें घ्यावा. पत्नी कन्या इत्यादिकांस मिळणार नाहीं.

निपुत्रिक संसृष्टी मृत झाल्यानंतर पत्नी वगैरे असतांहि संसृष्टीच जिंदगी घेईल.

---

१ 'जे जे विभाग करणारे ते ते संसृष्ट होतात' असें सामानाधिकरण्यें करून संसृष्टी म्हणावे हें युक्त. वरच्या ( याज्ञवल्क्य ) वचनांतील पिता, भ्राता, पितृव्य हीं पदें तर जितके विभाग करणारे तितक्यांचीं उपलक्षक होत, तेणेंकरून पत्नी, पितामह, भ्राता, पौत्र, चुलता, पुत्र इत्यादिकहि परस्पर संसृष्ट होतात. जो जो विभक्त झालेला एकवट झाला तो संसृष्ट असें सामानाधिकरण्य आहे म्हणून विभक्त झालेल्या भ्रात्यांचे पुत्र परस्पर संसृष्ट होऊं शकत नाहींत.–मयूख.

संसृष्टिनस्तु संसृष्टीत्यस्यापवादमाह ॥

**सोदरस्य तु सोदरः ।**
**दद्यादपहरेच्चांशं जातस्य च मृतस्य च ॥ १३८ ॥**

संसृष्टिनः संसृष्टीत्यनुवर्तते अतश्च सोदरस्य संसृष्टिनो मृतस्यांशं सोदरः संसृष्टी संसृष्टानुजातस्य सुतस्य दद्यात् । तदभावे अपहरेदिति पूर्ववत् संबन्धः । एवंच सोदरासोदरसंसर्गे सोदरसंसृष्टिनो धनं सोदर एव संसृष्टी गृह्णाति न भिन्नोदरः संसृष्ट्यपीति पूर्वोक्तस्यापवादः ॥ १३८ ॥

संसृष्टीच्या जिंदगीचा वारस संसृष्टी असें जें ( १ ल्या अंकाचे मूळवचनांत ) सांगितलें त्याचा अपवाद सांगतो.

मूलार्थ–संसृष्ट सोदर भ्रात्याला पुत्र झाल्यास विभाग द्यावा, आणि निपुत्रिक मरेल तर त्याचा विभाग भ्रात्यानें घ्यावा.

टीकार्थ–३ "संसृष्टीच्या जिंदगीचा वारस संसृष्टीच" ह्या स्मृतीची अनुवृत्ति झाली.

संसृष्टीचें द्रव्य संसृष्ट सोदर भ्राती घेईल.

ह्यास्तव सोदर भ्राता संसृष्टी होऊन मरण पावला असतां संसृष्ट झाल्यानंतर जर पुत्र झाला तर त्यास त्या सोदर भ्रात्यानें विभाग द्यावा. आणि पुत्राच्या अभावीं आपण ( विभाग ) घ्यावा. असा पूर्वी ( २ ऱ्या अंका ) प्रमाणेंच संबंध जाणावा.

४ ह्याप्रमाणेंच सोदर भ्राते, सापत्न भ्राते, हे संसृष्ट झाले असतां संसृष्टी सोदर भ्रात्याचें धन संसृष्टी सोदर भ्राताच घेण्यास अधिकारी होतो. सापत्न भ्राता संसृष्टी असला तरी तो अधिकारी होत नाहीं. ह्मणून पूर्वी सांगितल्याचें (१ ल्या अंकाचे मूळवचनाचें) हें अपवादवचन जाणावें. १३८

---

इदानीं संसृष्टिन्यपुत्रे स्वर्याते संसृष्टिनो भिन्नोदरस्य सोदरस्य चासंसृष्टिनः सद्भावे कस्य धनग्रहणमिति विवक्षायां द्वयोर्विभज्य ग्रहणे कारणमाह ॥

**अन्योदर्यस्तु संसृष्टी नान्योदर्यो धनं हरेत् ।**
**असंसृष्ट्यपि वा दद्यात्संसृष्टो नान्यमातृजः ॥ १३९ ॥**

---

१ ह्या स्मृतीची म्हणजे १ ल्या अंकाचे मूळवचनाची.

२ अन्वयांत कांहीं एक पदाची किंवा वाक्याची अपूर्ति असल्यामुळें त्या अन्वयाची किंवा वाक्याची पूर्ति होण्यासाटीं ज्या मागील वाक्यांतून पद किंवा वाक्य घेतलें जातें ती अनुवृत्ति.

ज्याविषयीं सामान्य शास्त्राची प्रवृत्ति तेथेंच विशेष शास्त्राची प्रवृत्ति आहे म्हणून पूर्वी सांगितलें जें "निपुत्रिक" ह्या पदाची अनुवृत्ति आहे म्हणून हें ( वरचें ) वचनहि पुत्रपौत्ररहित अशा संसृष्टीविषयीं, यास्तव तशा ( पुत्रपौत्ररहित ) मृत संसृष्टीची असंसृष्ट पत्नी कन्या इत्यादिक असले तरी दुसरा संसृष्टीच धन घेईल. असें जें विज्ञानेश्वरमदनादिकांचें मत तें चिंत्य म्हणजे विचारणीय, किंवा निर्मूल, युक्तिशून्य; कारण, अनुवृत्तीवांचून वचनाची गति होत असतां अनुवृत्ति करावी ह्याविषयीं गमक ( प्रमाण ) नाहीं. मयूख.

अन्योदर्यः सापत्नो भ्राता संसृष्टी धनं हरेत् न पुनः अन्योदर्यो धनं हरेदसंसृष्टी। अनेनान्वयव्यतिरेकाभ्यामन्योदर्यस्य संसृष्टित्वं धनग्रहणे कारणमुक्तं भवति। असंसृष्टीत्येतदुत्तरेणापि संबध्यते। अतश्चासंसृष्टयपि संसृष्टिनो धनमाददीत। कोसावित्यत आह। संसृष्ट इति। संसृष्ट एकोदरसंसृष्टः सोदर इति यावत्। अनेनासंसृष्टस्यापि सोदरस्य धनग्रहणे सोदरत्वं कारणमुक्तम्॥ संसृष्ट इत्युत्तरेणापि संबध्यते तत्रच संसृष्टः संसृष्टीत्यर्थः नान्यमातृजः। अत्रैवशब्दाध्याहारेण व्याख्यानं कार्यं संसृष्टयप्यन्यमातृज एव संसृष्टिनो धनं नाददीतेति। एवं चासंसृष्टयपि वा दद्यादित्यपिशब्दश्रवणात्। संसृष्टो नान्यमातृज एवेत्यवधारणनिषेधाच्चासंसृष्टसोदरस्य संसृष्टभिन्नोदरस्य च विभज्य ग्रहणं कर्तव्यमित्युक्तं भवति। द्वयोरपि धनग्रहणकारणस्यैकैकस्य सद्भावात्। एतदेव स्पष्टीकृतं मनुना॥ विभक्ताः सहजीवन्तो विभजेरन्पुनर्यदीति संसृष्टिविभागं प्रक्रम्य येषां ज्येष्ठः कनिष्ठो वा हीयेतांशप्रदानतः। म्रियेतान्यतरो वापि तस्य भागो न लुप्यते॥ सोदर्या विभजेयुस्तं समेत्य सहिताः समम्। भ्रातरो ये च संसृष्टा भगिन्यश्च सनाभय इति वदता येषां भ्रातॄणां संसृष्टिनां मध्ये ज्येष्ठः कनिष्ठो मध्यमो वांशप्रदानतोऽशप्रदाने सार्वविभक्तिकस्तसिः। विभागकाल इति यावत् हीयेत स्वांशाद्भ्रश्येत आश्रमान्तरपरिग्रहेण ब्रह्महत्यादिना वा म्रियेत वा तस्य भागो न लुप्यते अतः पृथगुद्धरणीयो न संसृष्टिन एव गृह्णीयुरित्यर्थः॥ तस्योद्धृतस्य विनियोगमाह। सोदर्या विभजेयुस्तमिति। तमुद्धृतं भागं सोदर्याः सहोदरा असंसृष्टा अपि समेत्य देशान्तरगता अपि समागम्य सहिताः संभूय समं न न्यूनाधिकभावेन ये च भ्रातरो भिन्नोदराः संसृष्टास्ते च सनाभयो भगिन्यश्च समं विभजेयुः। समं विभज्य गृह्णीयुरिति स्पष्टोऽर्थः॥१३९॥

शाखा २९ वी.

आतां अपुत्र संसृष्टी मृत झाला असतां संसृष्टी, सापत्न भ्राता व सोदर भ्राता असंसृष्टी असे दोघेहि विद्यमान असल्यास कोणी धन घ्यावें असा संदेह प्राप्त झाला असतां दोघांनीं वांटून घेण्याचें कारण सांगतो.

**मूलार्थ**— सापत्न भ्राता असून संसृष्टी आहे तर जिंदगी घेईल. असंसृष्टी सापत्न भ्राता घेणार नाहीं. असंसृष्टी असूनहि सोदर भ्राता आहे तर तो जिंदगी घेईल. सापत्नभ्राता संसृष्टी असला तरी तो एकटाच जिंदगी पावणार नाहीं.

**टीकार्थ**—१ सापत्नभ्राता संसृष्टी आहे तरच तो जिंदगी घेईल. सापत्नभ्राता संसृष्टी नाहीं, तर तो जिंदगी घेण्यास अधिकारी नाहीं. असा अन्वयव्यतिरेक सांगितल्यावरून सावत्र भ्रात्याचें संसृष्टित्व धनग्रहणाविषयीं कारण सांगितलें.

सापत्नभ्राता संसृष्ट असल्यास वांटा घेईल.

१ अन्वय म्हणजे कार्यकारणांची नियमें करून एकत्र स्थिति असणें तो. प्रकृतीं "सापत्नभ्राता संसृष्टी आहे तरच तो जिंदगी घेईल" हा अन्वय; आणि व्यतिरेक म्हणजे जेथें कार्याचा अभाव तेथें कारणाचाहि नियमेंकरून अभाव राहतो तो. प्रकृतीं "सापत्नभ्राता संसृष्टी नाहीं तर तो जिंदगी घेण्यास अधिकारी नाहीं," हा व्यतिरेक.

२ संसृष्टीची जिंदगी असंसृष्टीहि घेतो, परंतु तो ( असंसृष्टी) सोदरभ्राता असेल तर. येणेंकरून असंसृष्टी सोदरभ्रात्याला जिंदगी घेण्याविषयीं सोदरभ्रात्याचें नातेंच कारण आहे असें सांगितलें.

सोदरभ्राता संसृष्ट झालेलाहि संसृष्टीचें धन घेतो.

३ संसृष्टी सापत्नभ्राताच संसृष्टीची जिंदगी घेतो असें नव्हे, तर असंसृष्टीहि घेतो. असा अप्यर्थबोधक ' हि ' शब्द सांगितल्यावरून, आणि " सापत्नभ्राता संसृष्ट असला तरी तो एकटाच घेणार नाहीं " अशा निश्चयबोधक " च " शब्दानें निषेध सांगितल्यामुळें असंसृष्ट सोदरभ्राता व संसृष्ट सापत्नभ्राता ह्यांनीं वांटून घ्यावें, असें सिद्ध झालें; कारण, दोघांस जिंदगी घेण्याविषयीं एकेक निराळें कारण आहेच.

मनुहि हेंच स्पष्ट सांगतो.

मनु–विभक्त झालेले एकत्र होऊन पुनः धनाचे वांटे करितील तर " असा संसृष्टीविषयीं विभागाचा उपक्रम करून " ह्या संसृष्टी भ्रात्यांतून वडील, धाकटा, किंवा मधला भाऊ विभागसमयीं आपल्या वांट्याला मुकेल किंवा एखादा मरेल तर त्याचा भाग लोपला जाणार नाहीं.

संसृष्टींतून कोणी मरेल तर त्याचा वांटा काढून ठेवावा.

अर्थ–संसृष्ट भ्रात्यांतून जो वडील, मधला, किंवा कनिष्ठ आश्रमांतर घेतल्यामुळें किंवा ब्रह्महत्यादि पातकामुळें विभागकाळीं वांट्याला मुकेल किंवा मृत होईल तर त्याचा तो विभाग लोपला जाणार नाहीं. ह्यास्तव निराळा काढून ठेवावा. केवळ संसृष्टींनींच घेऊं नये.

विभाग निराळा काढून ठेवावा असें वर सांगितलें त्याचा विनियोग सांगतो.

मनु–संसृष्ट असे सावत्र भाऊ, व सखे भाऊ ह्यांनीं येऊन व सख्या बहिणी ह्यांनीं तो विभाग समसमान वांटून घ्यावा.

तो काढून ठेवलेला वांटा समविभाग वांटून घ्यावा.

अर्थ–४ तो निराळा काढलेला वांटा सोदर भ्राते असंसृष्टही असले तरी व देशांतरीं गेले असले तरी त्यांनीं एकत्र मिळून आणि जे सापत्न भ्राते असून संसृष्ट आहेत ते, व सख्या बहिणी ह्या सर्वांनीं मिळून समविभाग वांटून घ्यावा. न्यूनाधिक विभाग करूं नयेत. १३९

---

पुत्रपत्न्यादिसंसृष्टिनां यद्दायग्रहणमुक्तं तस्यापवादमाह ॥

**क्लीबोथ पतितस्तज्जः पङ्गुरुन्मत्तको जडः ।**

**अन्धोऽचिकित्स्यरोगाद्या भर्तव्याः स्युर्निरंशकाः ॥ १४० ॥**

क्लीबस्तृतीयाप्रकृतिः पतितो ब्रह्महादिः तज्जः पतितोत्पन्नः पङ्गुः पादविकलः उन्मत्तकः वातिकपैत्तिकश्लैष्मिकसन्निपातग्रहावेशलक्षणैरुन्मादैरभिभूतः जडो विकलान्तःकरणः हिताहितावधारणाक्षम इति यावत् । अन्धो नेत्रेन्द्रियविकलः अचि-

कित्स्वरोगः अप्रतिसमाधेययक्ष्मादिरोगग्रस्तः आद्यशब्देनाश्रमान्तरगतपितृद्वेष्युपपातकिबाधिरमूकनिरिन्द्रियाणां ग्रहणम् ॥ यथाह वसिष्ठः। अनंशास्त्वाश्रमान्तरगता इति ॥ नारदेनापि। पितृद्विट् पतितः षण्ढो यश्च स्यादौपपातिकः। औरसा अपि नैते-ऽशं लभेरन्क्षेत्रजाः कुत इति ॥ मनुरपि। अनंशौ क्लीबपतितौ जात्यन्धपतितौ तथा। उन्मत्तजडमूकाश्च येच केचिन्निरिन्द्रिया इति ॥ निरिन्द्रियो निर्गतमिन्द्रियं यस्माद्व्याध्यादिना स निरिन्द्रियः। एते क्लीबादयोऽनंशा रिक्थभाजो न भवन्ति। केवलमशनाच्छादनदानेन पोषणीया भवेयुः। अभरणे तु पतितत्वदोषः ॥ सर्वेषामपि तु न्याय्यं दातुं शक्त्या मनीषिणा। ग्रासाच्छादनमत्यन्तं पतितो ह्यददद्भवेदिति मनुस्मरणात्। अत्यन्तं यावज्जीवमित्यर्थः ॥ एतेषां विभागात्प्रागेव दोषप्राप्तावनंशत्वमुपपन्नं न पुनर्विभक्तस्य। विभागोत्तरकालमप्यौषधादिना दोषनिर्हरणे भागप्राप्तिरस्त्येव। विभक्तेषु सुतो जातः सवर्णायां विभागभागित्यस्य समानन्यायत्वात् ॥ पतितादिषु पुल्लिङ्गत्वमविवक्षितं अतश्च पत्नीदुहितृमात्रादीनामप्युक्तदोषदुष्टानामनंशित्वं वेदितव्यम् ॥ १४० ॥

## शाखा ३० वी.

पुत्र पत्नी आदि करून व संसृष्टी ह्यांस जें धनग्रहण सांगितलें त्याचा अपवाद सांगतो.

**मूलार्थ**–षंढ, पतित, व पतितापासून उत्पन्न, पांगळा, उन्मत्त, जड, अंधळा, असाध्यरोगग्रस्त इत्यादिकांस विभाग न देतां त्यांचें पोषण मात्र करावें.

षंढ पतित वगैरेस विभाग नाहीं.

**टीकार्थ**–१ षंढ; **पतित** म्हणजे ब्रह्महत्या वगैरे महापातक करणारा व पतितापासून झालेला; पांगळा; उन्मत्त म्हणजे वात, पित्त, कफ, संनिपात यांच्या विकारापासून वेडा झालेला, किंवा ग्रह, भूत, पिशाच इत्यादिकांच्या उपद्रवानें वेडा झालेला; जड म्हणजे हृदयशून्य म्हणजे स्वतांचें हिताहित न जाणणारा; अंधळा; असाध्यरोगग्रस्त म्हणजे औषधानें असाध्य अशा राजयक्ष्मादिकांनीं ग्रस्त झालेला. मूळांतील आदिशब्देंकरून ज्यांनीं आश्रमांतर घेतलें आहे ते, व **पितृद्वेषी, उपपातकी**, बहिरा, मुका, निरिंद्रिय, हेही समजावे.

**वसिष्ठ**– ज्यांनीं **आश्रमांतर** घेतलें, त्यांस ( म्हणजे नैष्ठिक ब्रह्मचारी, वानप्रस्थ, संन्यासी ह्यांस ) विभाग नाहीं.

---

१ 'दपयात्रित' इति मयूखे पाठो दृश्यते तदर्थः–राजद्रोहाद्यपराधेन बन्धभिर्घटस्फोटादिना बहिष्कृत इति मदनः। व्यवसायार्थं नावादिना समुद्रमध्ये द्वीपान्तरं गन्तेति तु युक्तम्। द्विजस्याब्धौ तु नौयातुः शोधितस्याप्यसङ्ग्रह इति। तस्य कलौ संसर्गनिषेधात्। राजद्रोहादौ घटस्फोटबहिष्कारयोरविधानाच्च। शंखलिखितौ। अपयात्रिते रिक्थपिण्डोदकानि व्यावर्तन्ते इति ॥ २ पुत्रशब्देंकरून पौत्राचेंही ग्रहण होतें व आदिशब्देंकरून कन्या दौहित्र आई बाप इत्यादिकांचें ग्रहण जाणावें.– सुबोधिनी.

**नारदहि**– पितृद्वेषी, पतित, षंढ व उपपातकी हे औरस पुत्र असले तरी विभाग पावत नाहींत, मग क्षेत्रज पुत्र असल्यास कोठून पावतील.

**मनुहि**– नपुंसक, पतित ह्यांस विभाग नाहीं. तसाच जन्मांध, व जन्मबहिरा, उन्मत्त व जड, मुका,व जे कोणी निरिंद्रिय असतील त्यांसहि विभाग मिळणार नाहीं.

**निरिंद्रिय** म्हणजे व्याध्यादिक उपद्रवानें ज्याचें इंद्रिय गेलें तो. हे ( सदरहू सांगितलेले ) षंढादिक जिदगीचे विभागी होत नाहींत. केवळ अन्नाच्छादन मात्र पावतात. त्यांचें पोषण न केलें तर पातित्याचा दोष प्राप्त होतो.

**मनु**– सुज्ञानें सर्वांस ( षंढादिकांस ) हि मरणपर्यंत यथाशक्ति अन्नाच्छादन द्यावें हें न्याय्य होय; कारण न देणारा पतित होतो.

२ ह्यांस ( षंढादिकांस ) विभाग मिळणार नाहीं, असें जें सांगितलें तें, विभागाचे पूर्वीं तो तो दोष उद्भवला असल्यास विभाग नाहीं. विभाग झाल्यानंतरहि औषधादिकेंकरून दोषनिराकरण झालें असतां विभाग आहेच. कारण "विभक्त झाल्यानंतर सवर्ण भार्येच्या ठायीं झालेला पुत्र विभागाचा अधिकारी होतो" असें जें ( १२ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे मूळवचनांत ) सांगितलें तें येथेंहि लागू पडतें.

विभागानंतर औषधादिकेंकरून निर्दोष झाल्यास विभागयोग्य होतात.

३ पतितादिकांविषयीं जो पुल्लिंगनिर्देश केला त्याची विवक्षा नाहीं. ह्यास्तव पत्नी, कन्या, आई, बाप, इत्यादिकहि वरच्याप्रमाणें दोषदुष्ट असल्यास विभागहीन जाणावे. १४०

क्लीबादीनामनंशित्वात्तत्पुत्राणामप्यनंशित्वे प्राप्ते इदमाह ॥

**औरसाः क्षेत्रजास्त्वेषां निर्दोषा भागहारिणः ॥**

एतेषां क्लीबादीनामौरसाः क्षेत्रजा वा पुत्रा निर्दोषा अंशग्रहणविरोधिक्लैब्यादिदोषरहिता भागहारिणोऽशग्राहिणो भवन्ति । तत्र क्लीबस्य क्षेत्रजः पुत्रः संभवत्यन्येषामौरसा अपि । औरसक्षेत्रजयोर्ग्रहणमितरपुत्रव्युदासार्थम् ॥

षंढादिकांस विभाग नाहीं असें सांगितल्यावरून त्यांच्या पुत्रादिकांसहि विभाग नाहीं असें प्राप्त झालें त्याविषयीं सांगतो.

**मूलार्थ**– ह्यांचे औरस व क्षेत्रजपुत्र, निर्दोष असल्यास विभागाचे अधिकारी होतात.

---

१ "औपपातिक" येथें "अपयात्रित" असा मयूखांत पाठ आहे. अपयात्रित म्हणजे राजद्रोहादिक अपराध केल्यामुळें ज्ञात्यांनीं घटस्फोटादिकेंकरून बहिष्कृत केलेला तो, असा मदनाचे मतीं अर्थ.– नौकेंत बसून समुद्रांतून व्यापारार्थ द्वीपांतरीं जाणारा तो अपयात्रित, असा इतरांचे मतीं अर्थ. हाचे अर्थ सयुक्तिक, कारण "समुद्रांत नौकेंत बसून ( द्वीपांतरीं ) जाणारा शुद्ध झाला तरी त्याला जातींत घेऊं नये" असा कलियुगांत त्याचा संसर्ग निषेधिला आहे, व राजद्रोहादिक अपराधीं घटस्फोट व बहिष्कार ह्यांचें विधानहि सांगितलें नाहीं. म्हणून पहिला अर्थ अयुक्त दिसतो. शंखलिखित–जिदगी, पिंड, तिलांजलि हीं अपयात्रितास देऊंनयेत. २ इत्यादिक म्हणजे भाऊ, पुतणे, पितामही, पितामह, प्रपितामही, प्रपितामह, चुलता, चुलतभाऊ, गोत्रज, सपिंड, समानोदक, आत्मबंधु, पितृबंधु, मातृबंधु, शिष्य, सब्रह्मचारी.

**टीकार्थ**–४ ह्या ( १ ल्या अंकांत सांगितलेल्या ) षंढादिकांचे औरस किंवा क्षेत्रज-पुत्र निर्दोष, ह्मणजे विभाग घेण्यास अटकाव करणारे असे षंढत्व, अंधत्व इत्यादिक जे दोष सांगितले तद्रहित असल्यास विभागाचे अधिकारी होतात.

षंढ अंधळा वगैरेंच्या पुत्रांस विभाग आहे.

५ त्यांत नपुंसकाचा क्षेत्रजपुत्र संभवतो. इतरांचे ( अंधादिकांचे ) औरसपुत्रहि संभवतात.

येथें ( ४ थ्या अंकाचे वचनांत ) औरस व क्षेत्रज ह्याचेंच मात्र ग्रहण केलें, तें इतरांचें ( १० पुत्रांचें ) ग्रहण न व्हावें एतदर्थ.

क्लीवादिदुहितॄणां विशेषमाह ॥

**सुताश्चैषां प्रभर्तव्या यावद्वै भर्तृसात्कृताः ॥ १४१ ॥**

एषां क्लीबादीनां सुता दुहितरो यावद्विवाहसंस्कृता भवन्ति तावद्भरणीयाः। चशब्दात्संस्कार्याश्च ॥ १४१ ॥

षंढादिकांच्या कन्यांविषयीं विशेष सांगतो.

**मूलार्थ**– ह्यांच्या कन्यांचें लग्न होईपर्यंत पोषण करावें.

**टीकार्थ**–६ ह्यांच्या ह्मणजे षंढादिकांच्या कन्यांचें लग्न होई तोंपर्यंत पोषण करावें, आणि लग्नहि करावें. १४१

षंढ अंधळा इत्यादिकांच्या कन्यांचें पोषण करावें.

---

क्लीबादिपत्नीनां विशेषमाह ॥

**अपुत्रा योषितश्चैषां भर्तव्याः साधुवृत्तयः ॥**
**निर्वास्या व्यभिचारिण्यः प्रतिकूलास्तथैव च ॥ १४२ ॥**

एषां क्लीबादीनामपुत्राः पत्न्यः साधुवृत्तयः सदाचाराश्चेद्भर्तव्याः भरणीयाः। व्यभिचारिण्यस्तु निर्वास्याः प्रतिकूलास्तथैव च निर्वास्या भवन्ति भरणीयाश्चाव्यभिचारिण्यश्चेत् । न पुनः प्रातिकूल्यमात्रेण भरणमपि न कर्तव्यम् ॥ १४२ ॥

षंढादिकांच्या स्त्रियांविषयीं विशेष सांगतो.

**मूलार्थ**– ह्यांच्या निपुत्रिक स्त्रिया जर सदाचारसंपन्न आहेत तर पोसाव्या. आणि व्यभिचारिणी, तशाच प्रतिकूल असतील त्या घालवून द्याव्या.

**टीकार्थ**–७ ह्या ( १ ल्या अंकांत सांगितलेल्या ) षंढादिकांच्या निपुत्रिक अशा स्त्रिया जर सदाचारसंपन्न आहेत तर त्यांचें पोषण करावें. आणि व्यभिचारिणी, तशाच प्रतिकूल असल्यास घालवून द्याव्या. परंतु प्रतिकूल असून जर सदाचारसंपन्न आहेत तर त्यांचें पोषण करावें. १४२

षंढ पतित इत्यादिकांच्या बायका व्यभिचारिणी असल्यास पोसूं नयेत.

---

विभजेरन्सुताः पित्रोरित्यत्र स्त्रीपुन्धनविभागं संक्षेपेणाभिधाय पुरुषधनविभागो विस्तरेणाभिहितः । इदानीं स्त्रीधनविभागं विस्तरेणाभिधास्यन्तत्स्वरूपं तावदाह ॥

पितृमातृपतिभ्रातृदत्तमध्यग्न्युपागतम् ॥
आधिवेदनिकाद्यं च स्त्रीधनं परिकीर्तितम् ॥ १४३ ॥

पित्रा मात्रा पत्या भ्रात्रा च यद्दत्तं यच्च विवाहकालेऽग्नावधिकृत्य मातुलादिभिर्दत्तं आधिवेदनिकं अधिवेदननिमित्तं अधिविन्नस्त्रियै दद्यादित्यादिति वक्ष्यमाणं। आद्यशब्देन रिक्थक्रयसंविभागपरिग्रहाधिगमप्राप्तमेतत् स्त्रीधनं मन्वादिभिरुक्तम्। स्त्रीधनशब्दश्च यौगिको न पारिभाषिकः योगसंभवे परिभाषाया अयुक्तत्वात् । यत्पुनर्मनुनोक्तम् ॥ अध्यग्न्यध्यावहनिकं दत्तं च प्रीतिकर्मणि । भ्रातृमातृपितृप्राप्तं षड्विधं स्त्रीधनं स्मृतमिति स्त्रीधनस्य षड्विधत्वं तन्न्यूनसंख्याव्यवच्छेदार्थं नाधिकसंख्याव्यवच्छेदाय ॥ अध्यग्न्यादिस्वरूपं च कात्यायनेनाभिहितम् ॥ विवाहकाले यत्स्त्रीभ्यो दीयते ह्यग्निसन्निधौ । तदध्यग्निकृतं सद्भिः स्त्रीधनं परिकीर्तितम् ॥ यत्पुनर्लभते नारी नीयमाना पितुर्गृहात् । अध्यावहनिकं नाम स्त्रीधनं तदुदाहृतम् ॥ प्रीत्यादत्तं तु यत्किंचिच्छ्वश्र्वा वा श्वशुरेण वा । पादवन्दनिकं चैव प्रीतिदत्तं तदुच्यते ॥ ऊढया कन्यया वापि पत्युः पितृगृहेऽपि वा । भ्रातुः सकाशात्पित्रोर्वा लब्धं सौदायिकं स्मृतमिति ॥ १४३ ॥

## शाखा ३१ सावी.

### स्त्रीधनाविषयीं.

मातापिता निवर्तल्यावर पुत्रांनीं जिंदगी व कर्ज हीं समान वांटून घ्यावीं असें (६ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे मूळवचनांत) सांगितलें, तेथें स्त्रीपुरुषांच्या धनाचा विभाग संक्षेपेंकरून सांगून पुरुषधनाचा विभाग विस्तरानें सांगितला. आतां स्त्रीधनाचा विभाग विस्तरानें सांगतांना प्रथमतः त्या स्त्रीधनाचें स्वरूप सांगतो.

**मूलार्थ**– पिता, माता, नवरा, भ्राता, ह्यांनीं दिलेलें व अध्यग्नि, तसेंच आधिवेदनिक इत्यादिक, स्त्रीधन सांगितलें आहे.

**टीकार्थ**–१ पित्यानें, मातेनें, नवऱ्यानें, आणि भ्रात्यानें जें दिलें असेल तें; व जें अध्यग्नि ह्मणजे विवाहकालीं विवाहाग्निसमीप मातुल वगैरेंनीं दिलेलें तें; आधिवेदनिक ह्मणजे दुसरें लग्न करिते समयीं पहिल्या बायकोला दिलेलें तें. "अधिविन्न स्त्रीला धन द्यावें," असें पुढें (३३ व्या शाखेच्या ८ व्या अंकाचे मूळांत) सांगितलेलें आणि इत्यादिक ह्मणजे (१ ल्या शाखेच्या १८ व्या अंकांत सांगितलेले) "अप्रतिबंधदाय, क्रय, सप्रतिबंधदाय, अधिगम, परिग्रह," ह्या संबंधानें मिळालेलें हें स्त्रीधन होय; असें मन्वादिक ऋषींनीं सांगितलें आहे.

स्त्रीधनाचें स्वरूप.

"स्त्रीधन" हा शब्द ( स्त्रियेचें धन ह्या दोन शब्दांच्या अर्थांच्या संयोगापासून झाला आहे यास्तव ) यौगिक आहे. पारिभाषिक ह्मणजे सांकेतिक नव्हे. कारण, जेथें योगाचा संभव असेल तेथें परिभाषा मानावी हें योग्य नाहीं.

**मनु**–२ अध्यग्नि, अध्यावहनिक, प्रीतिदत्त, तसेंच भ्राता व माता व पिता ह्यांपांसून मिळालेलें; असें सहा प्रकारचें स्त्रीधन सांगितलें.

असे जे **स्त्रीधनाचे** सहा प्रकार सांगितले, ते सहा प्रकारांपेक्षां कमी प्रकार नाहींत असें समजण्यासाठीं. केवळ सहा प्रकारांपेक्षां अधिक प्रकारचें **स्त्रीधन** नाहीं असें नव्हे.

अध्यग्नि इत्यादिक **स्त्रीधनाचें** स्वरूप कात्यायन सांगतो.

३ अध्यग्नि ह्मणजे विवाहसमयीं विवाहाग्नीच्या संनिध जें धन स्त्रियांस दिलें जातें तें.

**अध्यावहनिक** म्हणजे कन्येला माहेराहून ( सासऱ्यांस ) नेतेसमयीं जें मिळतें धन तें. ( त्यालाच आंदण ह्मणतात ) पादवंदनिक तेंच प्रीतिदत्त–जेव्हां वधू सासूसासरा ह्यांचे पायां पडावयास जाते तेव्हां जें त्यांनीं प्रीतीनें तिला दिलें जातें तें.

**सौदायिक** म्हणजे लग्न झाल्यानंतर नवऱ्याच्या घरीं, किंवा माहेरीं, भावांपासून अथवा आईबापांपासून जें मिळालें जातें तें. १४३

---

## बन्धुदत्तं तथा शुल्कमन्वाधेयकमेव च ॥

**किंच ॥ बन्धुभिः कन्याया मातृबन्धुभिःपितृबन्धुभिश्च यद्दत्तं । शुल्कं यद्गृहीत्वा कन्या दीयते । अन्वाधेयकं परिणयनादनुपश्चादाहितं दत्तं । उक्तंच कात्यायनेन॥ विवाहात्परतो यच्च लब्धं भर्तृकुलात्स्त्रिया । अन्वाधेयं तु तद्द्रव्यं लब्धं पितृकुलात्तथेति । स्त्रीधनं परिकीर्तितमिति गतेन संबन्धः ॥**

**मूलार्थ**– तसेंच बंधुदत्त, शुल्क, आणि अन्वाधेयक हेंहि **स्त्रीधनच**.

**टीकार्थ**–४ **बंधुदत्त** ह्मणजे कन्येचे मातृबंधु, व पितृबंधु ह्यांनीं दिलें तें. **शुल्क** म्हणजे जें द्रव्य घेऊन कन्या दिली जाते तें. **अन्वाधेयक** म्हणजे विवाह झाल्यानंतर जें दिलें जातें तें.

**कात्यायन**– लग्न झाल्यानंतर भर्त्याच्या कुलाकडून, तसेंच पित्याच्या कुलाकडून, जें मिळतें तें **अन्वाधेयक स्त्रीधन** म्हटलें आहे.

असें तीन प्रकारचें द्रव्य स्त्रीधन ह्मटलें आहे, याप्रमाणें अन्वयसंबंध योजावा.

**एवं स्त्रीधनमुक्तं तद्विभागमाह ॥**

## अतीतायामप्रजसि बान्धवास्तदवाप्नुयुः ॥ १४४ ॥

---

१ ह्यांपासून म्हणजे ह्या प्रत्येकापासून जें निरनिराळें मिळालेलें असें तीन प्रकारचें जें धन त्यालाच सौदायिक म्हटलें आहे.

तत्पूर्वोक्तं स्त्रीधनमप्रजसि अनपत्यायां दुहितृदौहित्रीपुत्रपौत्ररहितायां स्त्रियामतीतायां बान्धवा भर्त्रादयो वक्ष्यमाणा गृह्णन्ति ॥ १४४ ॥

शाखा ३२ वी.

ह्याप्रमाणें जें स्त्रीधन सांगितलें त्याचा विभाग सांगतो.

मूलार्थ—अनपत्य स्त्री मृत झाली असतां तिचें धन बांधवांस मिळेल.

टीकार्थ—१ अनपत्य ह्मणजे कन्या, कन्येची कन्या, दौहित्रपुत्र, पौत्र, ह्यांविरहित अशी स्त्री, निवर्तली असतां तिचें पूर्वी ( २१ व्या शाखेंत ) सांगितलेलें स्त्रीधन, बांधव ह्मणजे नवरा वगैरे पुढें सांगितलेले घेतील. १४४

अनपत्य स्त्रीच्या धनाचे वारस नवरा वगैरे.

सामान्येन बान्धवा धनग्रहणाधिकारिणो दर्शिताः इदानीं विवाहभेदेनाधिकारिभेदमाह ॥

अप्रजस्त्रीधनं भर्तुर्ब्राह्मादिषु चतुर्ष्वपि ॥
दुहितॄणां प्रसूताचेच्छेषेषु पितृगामि तत् ॥ १४५ ॥

अप्रजस्त्रियाः पूर्वोक्तायाः ब्राह्मदैवार्षप्राजापत्येषु चतुर्षु विवाहेषु भार्यात्वं प्राप्ताया अतीतायाः पूर्वोक्तं धनं प्रथमं भर्तुर्भवति । तदभावे तत्प्रत्यासन्नानां सपिण्डानां भवति । शेषेष्वासुरगान्धर्वराक्षसपैशाचेषु विवाहेषु तदप्रजस्त्रीधनं पितृगामि । माता च पिता च पितरौ तौ गच्छतीति पितृगामि । एकशेषनिर्दिष्टाया अपि मातुः प्रथमं धनग्रहणं पूर्वमेवोक्तं । तदभावे तत्प्रत्यासन्नानां धनग्रहणं सर्वेष्वेव विवाहेषु प्रसूतापत्यवतीचेद्दुहितॄणां तद्धनं भवति । अत्र दुहितृशब्देन दुहितृदुहितर उच्यन्ते । साक्षाद्दुहितॄणां मातुर्दुहितरः शेषमित्यत्रोक्तत्वात् । अतश्च मातृधनं मातरि वृत्तायां प्रथमं दुहितरो गृह्णन्ति । तत्र चोढानूढासमवायेऽनूढा गृह्णाति । तदभावे परिणीता । तत्रापि प्रतिष्ठिताप्रतिष्ठितासमवायेऽप्रतिष्ठिता गृह्णाति । तदभावे प्रतिष्ठिता ॥ यथाह गौतमः । स्त्रीधनं दुहितॄणामप्रत्तानामप्रतिष्ठितानां चेति । तत्र चशब्दात् प्रतिष्ठितानां च । अप्रतिष्ठिता अनपत्या निर्धना वा । एतच्च शुल्कव्यतिरेकेण । शुल्कं तु सोदर्याणामेव । भगिनीशुल्कं सोदर्याणामूर्ध्वं मातुरिति गौतमवचनात् । सर्वासां दुहितॄणामभावे दुहितृदुहितरो गृह्णन्ति । दुहितॄणां प्रसूता चेदित्यस्माद्वचनात् । तासां भिन्नमातृकाणां विषमाणां समवाये मातृद्वारेण भागकल्पना ॥ प्रतिमातृतो वा स्ववर्गेण भागविशेष इति गौतमस्मरणात् । दुहितृदौहित्रीणां समवाये दौहित्रीणां किंचिदेव दातव्यम् ॥ यथाह मनुः । यास्तासां स्युर्दुहितरस्तासामपि यथार्हतः । मातामह्या धनात्किंचित्प्रदेयं प्रीतिपूर्वकमिति । दौहित्रीणामप्यभावे दौहित्रा धनहारिणः ॥ यथाह नारदः । मातुर्दुहितरोऽभावे दुहितॄणां तदन्वय इति तच्छब्देन सन्निहितदुहितृपरामर्शात् । दौहित्राणामभावे पुत्रा गृह्णन्ति । ताभ्य ऋतेऽन्वय

इत्युक्तत्वात् । मनुरपि दुहितॄणां पुत्राणां च मातृधनसंबन्धं दर्शयति ॥ जनन्यां संस्थितायां तु समं सर्वे सहोदराः । भजेरन्मातृकं रिक्थं भगिन्यश्च सनाभय इति । मातृकं रिक्थं सर्वे सहोदराः समं भजेरन् सनाभयो भगिन्यश्च समं भजेरन्निति संबन्धः । न पुनः सहोदरा भगिन्यश्च संभूय भजेरन्निति । इतरेतरयोगस्य द्वंद्वैकशेषाभावादप्रतीतेः विभागकर्तृत्वान्वयेनापि चशब्दोपपत्तेः । यथा देवदत्तः कृषिं कुर्याद्यज्ञदत्तश्चेति समग्रहणमुद्धारविभागनिवृत्त्यर्थं । सोदरग्रहणं भिन्नोदरनिवृत्त्यर्थं । अनपत्यहीनजातिस्त्रीधनं तु भिन्नोदराप्युत्तमजातीयसपत्नीदुहिता गृह्णाति । तदभावे तदपत्यं । तथाच मनुः ॥ स्त्रियास्तु यद्भवेद्वित्तं पित्रा दत्तं कथंचन । ब्राह्मणी तद्धरेत्कन्या तदपत्यस्य वा भवेदिति । ब्राह्मणीग्रहणमुत्तमजात्युपलक्षणम् । अतश्चानपत्यवैश्याधनं क्षत्रियाकन्या गृह्णाति । पुत्राणामभावे पौत्राः पितामहीधनहारिणः । रिक्थभाज ऋणं प्रतिकुर्युरिति गौतमस्मरणात् । पुत्रपौत्रैर्ऋणं देयमिति पौत्राणामपि पितामह्यर्णपाकरणेऽधिकारात् । पौत्राणामप्यभावे पूर्वोक्तभर्त्रादयो बान्धवा धनहारिणः १४५

सामान्यतः बांधव धन घेण्याविषयीं अधिकारी दाखविले. आतां लग्नाच्या भेदेंकरून जिंदगी घेण्याविषयीं जे अधिकारी त्यांचाहि भेद सांगतो.

**मूलार्थ–** ब्राह्मादिक चार विवाहांतून विवाहित अशा अनपत्य स्त्रीचें धन नवरा घेईल. आसुरादि ( चार ) विवाहांतून विवाहित अनपत्य स्त्रीचें धन मातापितरांकडे जाईल. परंतु तिला कन्या असल्यास कन्या घेतील.

**टीकार्थ–** २ ब्राह्म, दैव, आर्ष, आणि प्राजापत्य, ह्या चार विवाहांतून कोणत्याहि विवाहानें विवाहित अशी अनपत्य स्त्री निवर्तली असतां तिचें पूर्वीं ( ३१ व्या शाखेंत सांगितलेलें ) स्त्रीधन प्रथमतः नवरा घेईल. त्याच्या अभावीं त्याचे जवळचे सपिंड घेतील.

ब्राह्म, दैव, आर्ष आणि प्राजापत्य ह्या विवाहांतून विवाहित स्त्रीचें धन नवरा घेईल.

३ आसुर, गांधर्व, राक्षस, आणि पैशाच, ह्या विवाहांतून कोणत्याही विवाहानें विवाहित अशी अनपत्य स्त्री मरण पावली असतां तिचें धन मातापित्यांनीं घ्यावें. त्यांत प्रथमतः मातेनें घ्यावें. आईबापांच्या अभावीं त्यांचे जवळचे संबंधी धन घेण्यास अधिकारी होतात.

आसुरादिक विवाहसंबंधी अनपत्य स्त्रीचें धन आईबाप घेतील.

४ आठा विवाहांतून कोणत्याहि विवाहानें विवाहित अशी स्त्री जर लेंकुरवाळी आहे तर तिचें तें धन कन्यांनीं घ्यावें.

लेंकुरवाळी स्त्री निवर्तल्यावर तिचें धन कन्यांनीं घ्यावें.

येथें कन्याशब्देंकरून कन्यांच्या कन्या जाणाव्या. कारण साक्षात् कन्यांविषयीं "कर्ज फिटून राहिलेलें आईचें धन कन्यांनीं घ्यावें." असें पूर्वीं ( ७ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे मूळवचनांत ) सांगितलेंच आहे, ह्यास्तव मातेचें धन माता निवर्तल्यावर प्रथमतः कन्यांनीं घ्यावें. त्यांत विवाहित व अविवाहित असल्यास अविवाहितेनें घ्यावें. तिच्या

अभावीं विवाहितेनें घ्यावें. त्यांत सधन व निर्धन असल्यास निर्धन कन्येनें घ्यावें. तिच्या अभावीं सधन कन्येनें घ्यावें.

**गौतम**– स्त्रीधन, अविवाहित व निर्धन अशा कन्येकडे जातें.

५ हा ( कन्यांनीं धन घेण्याचा ) प्रकार सांगितला तो शुल्काशिवाय इतर स्त्रीधनाविषयीं जाणावा. शुल्क तर सख्या भ्रात्यांनींच घ्यावें.

**गौतम**– बहिणीचें शुल्क सख्या भ्रात्यांचें, त्यांच्या अभावीं मातेच्या संततेत येतें.

६ सर्व कन्यांच्या अभावीं ( मातृधन ) कन्यांच्या कन्यांनीं घ्यावें. कारण, "कन्या असल्यास कन्या घेतील." असें याज्ञवल्क्यवचन आहे.

कन्यांच्या अभावीं कन्यांच्या कन्या घेतील.

त्या ( कन्यांच्या कन्या ) जर सावत्र आहेत आणि सम विषम ( ह्मणजे एकीची एक, दुसरीच्या दोन, तिसरीच्या चार, अशा ) आहेत, तर त्यांस आपापल्या मातेच्या द्वारें ( ह्मणजे १० व्या शाखेंत जसा पितृद्वारा पुत्रांस विभाग सांगितला तद्वत् येथेंहि ) विभाग मिळतील.

**गौतम**– संततीला त्यांच्या त्यांच्या जननीच्या द्वारेंच विभागयोजना करावी.

७ कन्या व कन्यांच्या कन्याहि विद्यमान असल्या तर त्यांस ( कन्यांच्या कन्यांस ) कांहीं तरी द्यावें.

**मनु**– ज्या कन्यांच्या कन्या विद्यमान असतील त्यांसहि मातामहीच्या धनांतून संतोषानें यथाशक्ति कांहीं तरी द्यावें.

८ कन्यांच्या कन्या नसल्यास दौहित्रानें धन घ्यावें.

दौहित्री नसल्यास दौहित्र घेतील.

**नारद**– मातेचें धन कन्यांनीं घ्यावें, त्यांच्या अभावीं त्यांच्या ( कन्यांच्या ) वंशानें दौहित्रानें घ्यावें.

९ दौहित्राच्या अभावीं पुत्र धन घेतील. कारण "कन्यांच्या अभावीं पुत्रादिकांनीं घ्यावें," असें ( ७ व्या शाखेच्या ३ ऱ्या अंकाचे वचनांत ) सांगितलें आहे.

दौहित्राच्या अभावीं पुत्र वारस.

मनुही मातृधनाचा संबंध कन्यांकडे आणि पुत्रांकडे दाखवितो.

**मनु**– जननी मृत झाली असतां तिची जिंदगी सर्व सख्या भ्रात्यांनीं सारखी वांटून घ्यावी, व सख्या बहिणींनींहि समान वांटून घ्यावी.

**अर्थ**– जननीचें धन सर्व सखे भ्राते समान वांटून घेतील. व सख्या बहिणीहि घेतील. परंतु सखे भ्राते व सख्या बहिणी ह्यांनीं एकत्र मिळून वांटून घ्यावें असें नाहीं.

समान वांटून घ्यावी असें ( वरच्या मनुवचनांत ) सांगितलें तें उद्धारविभागनिवृत्त्यर्थ, आणि "सखे भ्राते" असें सांगितलें तें सावत्र भ्रात्यांच्या निषेधार्थ.

१० अनपत्य निकृष्ट जातीच्या स्त्रीचें धन तर सावत्र कन्याहि घेईल, परंतु ती आपल्यापेक्षां उत्कृष्ट जातीच्या सवतीची असेल तर; कन्येच्या अभावीं कन्येच्या अपत्यानें घ्यावें.

अनपत्य निकृष्टजातीय स्त्रीच्या धनाची वारस उत्कृष्टजातीय कन्या.

**मनु**– स्त्रीला बापानें दिलेलें द्रव्य असेल तें ( औरस कन्येच्या अभावीं ) ब्राह्मणी कन्येनें घ्यावें. अथवा तिच्या ( कन्येच्या ) अपत्यानें घ्यावें. येथें (मनुवचनांत) ब्राह्मणीकन्येचें ग्रहण केलें तें आपल्यापेक्षां उत्कृष्ट जातीच्या कन्येचें उपलक्षण. द्यास्तव अनपत्य (मृत) वैश्येचें धन क्षत्रियाकन्या घेईल.

११ पुत्रांच्या अभावीं पौत्र, पितामहीचें धन घेण्यास अधिकारी. कारण,

**गौतम**– जे कर्ज फेडतील ते जिंदगी घेण्याविषयीं अधिकारी होतात.

"पुत्रांनीं व पौत्रांनीं कर्ज फेडावें" असें (ऋणादान प्रकरणाच्या ७ व्या शाखेच्या १ ल्या अंकाचे वचनांत ) सांगितल्यावरून पौत्रांसहि पितामहीचें ऋण फेडायास अधिकार आहे.

१२ पौत्रांच्या अभावीं पूर्वीं सांगितलेले नवरा इत्यादिक बांधव जिंदगीचे वारस होतील. १४९

पौत्राच्या अभावीं बांधव घेतील.

---

स्त्रीधनप्रसंगेन वाग्दत्ताविषयं किंचिदाह ॥

## दत्त्वा कन्यां हरन्दण्ड्यो व्ययं दद्याच्च सोदयम् ॥

कन्यां वाचा दत्वापहरन् द्रव्यानुबन्धाद्यनुसारेण राज्ञा दण्डनीयः। एतच्चापहरणकारणाभावे। सति तु कारणे दत्तामपि हरेत्कन्यां श्रेयांश्चेद्वर आव्रजेदित्यपहाराभ्यनुज्ञानान्न दण्ड्यः। यच्च वाग्दाननिमित्तं वरेण स्वसंबन्धिनां कन्यासंबन्धिनां वोपचारार्थं धनं व्ययीकृतं तत्सर्वं सोदयं सवृद्धिकं कन्यादाता वराय दद्यात् ॥

### शाखा ३३ वी.

स्त्रीधनविभागाच्या प्रसंगसंगतीनें, जिचा वाङ्निश्चय झालेला आहे तिजविषयीं कांहीं सांगतो.

**मूलार्थ.**– कन्या वाग्दत्त करून परत घेईल तर त्यास दंड करून त्यापासून खर्च झालेला सव्याज भरून देववावा.

**टीकार्थ**– १ कन्येचें वाग्दान करून ती पुनः परत घेणारापासून राजानें द्रव्यादिकाच्या खर्चाच्या तारतम्यानें दंड घ्यावा.

वाङ्निश्चय झाल्यावर कन्या परत घेणारास दंड.

२ हा प्रकार परत घेण्याविषयीं योग्य कारण नसल्यास जाणावा. योग्य कारण अ

वाङ्निश्चयानंतरही योग्य कारण असल्यास कन्या परत घ्यावी.

सल्यास " वाग्दत्त केलेलीहि कन्या परत घ्यावी. परंतु जर ( पहिल्या वरापेक्षां ) उत्कृष्ट वर मिळेल तर. " अशी ( आचाराध्यायीं विवाहप्रकरणांत याज्ञवल्क्यवचनेंकरून) परत घेण्याविषयीं अभ्यनुज्ञा ( संमति ) आहे ह्मणून त्यापासून दंड घेऊं नये.

वाङ्निश्चयासाठीं झालेला खर्च परत घ्यावा.

३ आणि वाङ्निश्चयासाठीं नवऱ्यानें आपल्या आप्तांच्या व नवरीच्या आप्तांच्या सत्कारासाठीं जें द्रव्य खर्चिलें असेल, तें कन्यादान करणारानें वराला सव्याज द्यावें.

**अथ कथंचिद्वाग्दत्ता संस्कारात्प्राक् म्रियेत तदा किं कर्तव्यमित्यत आह ॥**

## मृतायां दत्तमादद्यात्परिशोध्योभयव्ययम् ॥ १४६ ॥

**यदि वाग्दत्ता मृता तदा यत्पूर्वमङ्गुलीयकादि शुल्कं वा वरेण दत्तं तद्वर आददीत ॥ परिशोध्योभयव्ययम् । उभयोरात्मनः कन्यादातुश्च यो व्ययस्तं परिशोध्य विगणय्यावशिष्टमाददीत । यत्तु कन्यायै मातामहादिभिर्दत्तं शिरोभूषणादिकं वा क्रमागतं तत्सहोदरा भ्रातरो गृह्णीयुः ॥ रिक्थं मृतायाः कन्याया गृह्णीयुः सोदरास्तदभावे मातुस्तदभावे पितुरिति बौधायनस्मरणात् ॥ १४६ ॥**

वाग्दत्त झालेली कन्या विवाहसंस्कार होण्यापूर्वींच कदाचित् मृत होईल तर काय करावें तें ( अर्ध्या वचनेंकरून ) सांगतो.

**मूलार्थ**—वाग्दत्त झालेली कन्या मृत झाली असतां दिलेल्या द्रव्यांत उभयतांचा खर्च वजा करून बाकी परत घ्यावें.

**टीकार्थ**—४जर कन्या वाग्दत्त झाल्यावर मृत होईल तर जें कांहीं अंगठी वगैरे, अथवा

वाङ्निश्चय झाल्यावर विवाहापूर्वीं कन्या मरण पावल्यास जें शुल्क वगैरे दिलें असेल तें परत घ्यावें.

शुल्क वरानें दिलें असेल तें परत घ्यावें. परंतु आपला व कन्यादान करणाराचा जो खर्च झाला असेल तो वजा करून उरलेलें घ्यावें.

५ परंतु कन्येस मातामहादिकांनीं दिलेले जे डोकींत घालण्याचे अलंकार व दुसऱ्या देणग्या व क्रमानें ज्या जिनगीचा तिला वारसा मिळाला असेल ती जिनगी तिचे सख्खे भाऊ घेतील. कारण,

**बौधायन**—मृत झालेल्या कन्येचें धन सख्या भावांनीं घ्यावें; त्यांच्या अभावीं मातेनें, तिच्या अभावीं पित्याच्या सत्तेत येतें. १४६

---

६ **मृतप्रजास्त्रीधनं भर्तृगामीत्युक्तं । इदानीं जीवन्त्याः सप्रजाया अपि स्त्रिया धनग्रहणे क्वचिद्भर्तुरभ्यनुज्ञामाह ॥**

## दुर्भिक्षे धर्मकार्ये च व्याधौ संप्रतिरोधके ।
## गृहीतं स्त्रीधनं भर्ता न स्त्रियै दातुमर्हति ॥ १४७ ॥

दुर्भिक्षे कुटुम्बभरणार्थं धर्मकार्ये अवश्यकर्तव्ये व्याधौ च संप्रतिरोधके बन्दिग्रहणनिग्रहादौ द्रव्यान्तररहितः स्त्रीधनं गृह्णन् भर्ता न पुनर्दातुमर्हति । प्रकारान्तरेणापहरन्दद्यात् । भर्तृव्यतिरेकेण जीवन्त्याः स्त्रिया धनं केनापि दायादेन न गृहीतव्यम् । जीवन्तीनां तु तासां ये तद्धरेयुः स्वबान्धवाः । तांश्छिष्याच्चौरदण्डेन धार्मिकः पृथिवीपतिरिरिति दण्डविधानात् ॥ तथा । पत्यौ जीवति यः स्त्रीभिरलङ्कारो धृतो भवेत् । न तं भजेरन्दायादा भजमानाः पतन्ति ते इति दोषश्रवणाच्च ॥ १४७ ॥

अनपत्य मृत स्त्रीचें धन नवऱ्याच्या सत्तेंत जातें, असें (३२ व्या शाखेच्या २ ऱ्या अंकांत) सांगितलें. आतां जिवंत असून लेंकुरवाळीहि स्त्री असली तरी समयविशेषीं तिचें धन नवऱ्याला घेण्याचा अधिकार आहे असें सांगतो.

**मूलार्थ**– दुष्काळांत, धर्मकृत्यासाठीं, व्याधि दूर होण्यासाठीं व बंधांतून सुटण्यासाठीं, नवऱ्यानें घेतलेलें स्त्रीधन जर त्याची परत देण्याची इच्छा नाहीं तर स्त्रीला तें मिळणार नाहीं.

**टीकार्थ**– ६ (जवळ द्रव्य नसल्यामुळें) दुष्काळांत कुटुंबपोषणार्थ, व जें अवश्य केलें पाहिजे अशा धर्मकार्यासाठीं, व्याधि दूर करण्यासाठीं व बंधांतून मुक्त होणें इत्यादिकांसाठीं, नवऱ्यानें स्त्रीधन घेतलेलें पुनः परत देऊं नये. परंतु नवऱ्याला जर स्त्रीधनाशिवाय दुसरें द्रव्य नसेल तर. ह्याशिवाय दुसऱ्या कार्यासाठीं स्त्रीचें धन घेईल तर तें परत द्यावें.

संकटकाळीं नवऱ्यानें घेतलेलें स्त्रीचें धन तिला परत मिळणार नाहीं.

७ विधवा स्त्री जिवंत असतां तिचे धनाचा कोणत्याहि वारसानें अपहार करूं नये. (केला असतां दंड सांगितला आहे.)

विधवेच्या जिंदगीचा दाइजानें अपहार करूं नये.

**मनु**– (विधवा) स्त्रिया जिवंत असतां त्यांचे धनांचा जे बांधव अपहार करि, त्यांस धार्मिक राजानें चोराच्या दंडानें शिक्षा करावी.

**मनु**– तसेंच नवरा जिवंत असतांना जो दागिना स्त्रियांनीं नेहेमीं वापरला जातो त्याचे वारसांनीं वांटे करूं नयेत. केले असतां अधोगतीस जातात. " असा दोषहि सांगितला आहे. "

---

आधिवेदनिकं स्त्रीधनमुक्तं तदाह ॥

**अधिविन्नस्त्रियै दद्यादाधिवेदनिकं समम् ।**
**न दत्तं स्त्रीधनं यस्यै दत्ते त्वर्द्धं प्रकीर्तितम् ॥ १४८ ॥**

यस्या उपरि विवाहः साधिविन्ना सा चासौ स्त्री चेत्यधिविन्नस्त्री तस्यै अधिविन्नस्त्रियै आधिवेदनिकं अधिवेदननिमित्तं धनं समं यावदधिवेदनार्थं व्ययीकृतं तावद्दद्यात् । यस्यै श्वशुरेण भर्त्रा वा स्त्रीधनं न दत्तम् । दत्ते पुनः स्त्रीधने आधि-

वेदनिकद्रव्यस्यार्द्धं दद्यात् । अर्द्धशब्दश्चात्र समविभागवचनो न भवति अतश्च यावता तत्पूर्वदत्तमाधिवेदनिकसमं भवति तावद्देयमित्यर्थः ॥ १४८ ॥

आधिवेदनिक स्त्रीधन ( ३१ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत ) सांगितलें त्याचें स्वरूप सांगतो.

मूलार्थ– नवरा दुसरा विवाह करितो तर त्याच्या खर्चासमान अधिविन्न स्त्रीला धन द्यावें. पण तिला स्त्रीधन दिलें नसेल तर. दिलें असल्यास अर्धें द्यावें.

टीकार्थ– ८ जिशीं लग्न केल्यानंतर अणखी विवाह केला जातो ती पहिली स्त्री अधिविन्ना ह्मटली आहे. त्या अधिविन्ना स्त्रीला दुसरा विवाह करण्यानिमित्त जें धन द्यावयाचें, तें सम, ह्मणजे दुसरा करण्यासाठीं जितका खर्च केला असेल तितकें द्यावें. परंतु तिला जर आपण (नवऱ्यानें ) किंवा सासऱ्यानें स्त्रीधन दिलें नसेल तर. दिलें असल्यास दुसरा विवाह करण्यास जो खर्च केला असेल त्याचे अर्धें द्यावें.

दुसरें लग्न केलें तर त्याच्या खर्चाइतकें पहिले बायकोला धन द्यावें.

९ एथें (वरच्या वचनांत) अर्धशब्देंकरून समविभागाचें ग्रहण नाहीं. ह्मणून पूर्वीं दिलेलें स्त्रीधन जितक्यानें आधिवेदनिक द्रव्याइतकें होईल तितकें द्यावें असें तात्पर्य. १४८

---

एवं विभागमुक्त्वा इदानीं तत्संदेहे निर्णयहेतूनाह ॥

**विभागनिह्नवे ज्ञातिबन्धुसाक्ष्यभिलेखितैः ।**
**विभागभावना ज्ञेया गृहक्षेत्रैश्च यौतकैः ॥ १४९ ॥**

विभागस्य निह्नवे अपलापे ज्ञातिभिः पितृबन्धुभिर्मातृबन्धुभिः मातुलादिभिः साक्षिभिः पूर्वोक्तलक्षणैर्लेख्येन च विभागपत्रेण विभागभावना विभागनिर्णयो ज्ञातव्यः ॥ तथा यौतकैः पृथक्कृतैर्गृहक्षेत्रैश्च पृथक्कृष्यादि कार्यप्रवर्तनं। पृथक् पञ्चमहायज्ञादिधर्मानुष्ठानं च नारदेन विभागलिङ्गमुक्तम् ॥ विभागधर्मसंदेहे दायादीनां विनिर्णयः । ज्ञातिभिर्भागलेख्येन पृथक्कार्यप्रवर्तनात् ॥ भ्रातृणामविभक्तानामेको धर्मः प्रवर्तते । विभागे सति धर्मोऽपि भवेत्तेषां पृथक् पृथगिति ॥ तथापराण्यपि विभागलिङ्गानि तेनैवोक्तानि ॥ साक्षित्वं प्रातिभाव्यं च दानं ग्रहणमेव च । विभक्ता भ्रातरः कुर्युर्नाविभक्ताः कथंचनेति ॥ इति रिक्थविभागप्रकरणम् ॥१४९॥

शाखा ३४ वी.

ह्याप्रमाणें विभागव्यवस्था सांगून आतां त्या विभागाच्या संदेहाविषयीं निर्णयाचीं कारणें सांगतो.

मूलार्थ– विभागाचा निन्हव केला असतां ज्ञाति, बांधव, साक्षी, लेख, व स्थावर जिंदगीचे वांटे, ह्यांकडून विभागाचा पुरावा करावा.

टीकार्थ– १ कोणी विभाग झाल्याचा निन्हव केला असतां जात, व बांधव जे पूर्वी

विभागाविषयीं संशय असल्यास निर्णय करण्याचीं साधनें.

( २६ व्या शाखेच्या ३९ व्या अंकांत) सांगितले त्यांकडून, व साक्षींकडून, व लेखाकडून आणि घरांचे वांटे, व क्षेत्राचे वांटे, ह्मणजे निरनिराळी शेतकी करणें, तशींच पंचमहायज्ञादिक धर्माचीं अनुष्ठानें वेगवेगळालीं असणें; इतक्या कारणांवरून विभाग झाल्याचा निर्णय जाणावा.

नारदहि विभागाचीं चिन्हें सांगतो.

नारद– २ वारसांचा विभाग झाला किंवा न झाला असा संदेह प्राप्त झाला असतां ज्ञातीकडून, व विभागपत्रावरून, आणि निरनिराळें कर्म करीत असल्यास त्यावरून, विभागाचा निर्णय करावा. कारण, अविभक्त भावांचा सर्वांमिळून एकच धर्म ( पंचमहायज्ञ, श्राद्ध, इत्यादिक ) चालत असतो व विभक्त झाले असतां धर्म देखील निरनिराळा होतो.

तशींच आणखी विभागाचीं चिन्हें तोच ( नारद ) सांगतो.

नारद– ३ साक्ष, जामिनकी, देणें घेणें, हे व्यवहार विभक्त झालेले भ्राते करूं शकतात. अविभक्त भ्रात्यांनीं कधींहि करूं नयेत. १४९

---

## सीमाविवाद प्रकरण ९ वें.

अधुना सीमाविवादनिर्णय उच्यते ॥

**सीम्नो विवादे क्षेत्रस्य सामन्ताः स्थविरादयः ।**
**गोपाः सीमाकृषाणा ये सर्वे च वनगोचराः ॥ १५० ॥**
**नयेयुरेते सीमानं स्थलाङ्गारतुषद्रुमैः ।**
**सेतुवल्मीकनिम्नास्थिचैत्याद्यैरुपलक्षिताम् ॥ १५१ ॥**

ग्रामद्वयसंबन्धिनः क्षेत्रस्य सीम्नो विवादे तथैकग्रामान्तर्वर्तिक्षेत्रमर्यादाविवादे च सामन्तादयः स्थलाङ्गारादिभिः पूर्वकृतैः सीमालक्षणैरुपलक्षितां चिह्नितां सीमां नयेयुः निश्चिनुयुः ॥ सीमा क्षेत्रादिमर्यादा सा चतुर्विधा । जनपदसीमा ग्रामसीमा क्षेत्रसीमा गृहसीमा चेति ॥ सा च यथासंभवं पञ्चलक्षणा ॥ तदुक्तं नारदेन ॥ ध्वजिनी मत्स्यिनी चैव नैधानी भयवर्जिता । राजशासननीता च सीमा पञ्चविधा स्मृतेति ॥ ध्वजिनी वृक्षादिलक्षिता । वृक्षादीनां प्रकाशत्वेन ध्वजतुल्यत्वात् ॥ मत्स्यिनी सलिलवती । मत्स्यशब्दस्य स्वाधारजललक्षणत्वात् ॥ नैधानी निखाततुषाङ्गारादिमती । तेषां निखानत्वेन निधानतुल्यत्वात् ॥ भयवर्जिता अर्थिप्रत्यर्थिपरस्परसंमतिपत्तिनिर्मिता । राजशासननीता ज्ञातृचिह्नाभावे राजेच्छया निर्मिता । एवंभूतायां षोढा विवादः संभवति । यथाह कात्यायनः ॥ आधिक्यन्यूनता चांशे

अस्तिनास्तित्वमेव च। अभोगभुक्तिः सीमा च षड्भूवादस्य हेतव इति ॥ तथाहि। ममात्र पञ्चनिवर्तनाया भूमेरधिकाभूरस्तीति केनचिदुक्ते पञ्चनिवर्तनैव नाधिकेत्याधिक्ये विवादः। पञ्चनिवर्तना मदीया भूमिरित्युक्तेन ततो न्यूनैवेति न्यूनतायां। पञ्चनिवर्तनो ममांश इत्युक्ते अंश एव नास्तीत्यस्तिनास्तित्वविवादः संभवति। मदीया भूः प्रागविद्यमानभोगैव भुज्यते इत्युक्ते न सन्तता चिरन्तन्येव मे भुक्तिरित्यभोगभुक्तौ विवादः। इयं मर्यादेयं वेति सीमाविवाद इति षट्प्रकार एव विवादः संभवति। षट्प्रकारेऽपि भूविवादे श्रुत्यर्थाभ्यां सीमाया अपि निर्णीयमानत्वात् सीमानिर्णयप्रकरणे तस्यान्तर्भावः। समन्ताद्भवाः सामन्ताः। चतसृषु दिक्ष्वनन्तरग्रामादयस्ते च प्रतिसीमं व्यवस्थिताः॥ ग्रामो ग्रामस्य सामन्तः क्षेत्रं क्षेत्रस्य कीर्तितम्। गृहं गृहस्य निर्दिष्टं समन्तात्परिरभ्यहीति कात्यायनवचनात्। ग्रामादिशब्देन तत्स्थाः पुरुषा लक्ष्यन्ते। ग्रामः पलायित इति यथा। सामन्तग्रहणं च तत्संसक्ताद्युपलक्षणार्थम्॥ उक्तंच कात्यायनेन॥ संसक्तकास्तु सामन्तास्तत्संसक्तास्तथोत्तराः। संसक्तसक्तसंसक्ताः पद्माकाराः प्रकीर्तिता इति॥ स्थविरा वृद्धाः। आदिग्रहणेन मौलोद्धृतयोर्ग्रहणम्। वृद्धादिलक्षणं च तेनैवोक्तम्। निष्पाद्यमानं यैर्दृष्टं तत्कार्यं तद्गुणान्वितैः। वृद्धा वा यदि वाऽवृद्धास्ते तु वृद्धाः प्रकीर्तिताः॥ ये तत्र पूर्वं सामन्ताः पश्चाद्देशान्तरं गताः। तन्मूलत्वात्तु ते मौला ऋषिभिः परिकीर्तिताः॥ उपश्रवणसंभोगकार्याख्यानोपचिह्निताः। उद्धरन्ति पुनर्यस्मादुद्धृतास्ते ततः स्मृता इति॥ गोपाः गोचारकाः॥ सीमाकृषाणाः सीमासंनिहितक्षेत्रकर्षकाः॥ सर्वे च वनगोचराः वनचारिणो व्याधादयः॥ ते च मनुनोक्ताः॥ व्याधान् शाकुनिकान् गोपान् कैवर्तान् मूलखातकान्। व्यालग्राहानुञ्छवृत्तीनन्यांश्च वनगोचरानिति॥ स्थलमुन्नतो भूप्रदेशः। अङ्गारोऽग्नेरुच्छिष्टं। तुषा धान्यत्वचः। द्रुमा न्यग्रोधादयः। सेतुर्जलप्रवाहबन्धः। चैत्यं पाषाणादिबन्धः। आदिशब्देन वेणुवाल्मीकादीनां ग्रहणम्। एतानि च प्रकाशाप्रकाशभेदेन द्विप्रकाराणि॥ तथा च मनुः॥ सीमावृक्षांस्तु कुर्वीत न्यग्रोधाश्वत्थकिंशुकान्। शाल्मलीशालतालांश्च क्षीरिणश्चैव पादपान्॥ गुल्मान्वेणूंश्च विविधान् शमीवल्लीस्थलानि च। शरान्कुब्जकगुल्मांश्च यथा सीमा न नश्यति॥ तडागान्युदपानानि वाप्यः प्रस्रवणानि च। सीमासंधिषु कार्याणि देवतायतनानि चेति प्रकाशरूपाणि॥ उपच्छन्नानि चान्यानि सीमालिङ्गानि कारयेत्। सीमाज्ञाने नृणां वीक्ष्य नित्यं लोके विपर्ययम्॥ अश्मनोऽस्थीनि गोवालांस्तुषान् भस्मकपालिकाः। करीषमिष्टकाङ्गारशर्करावालुकास्तथा॥ यानि चैवं प्रकाराणि कालाद्भूमिर्न भक्षयेत्। तानि संधिषु सीमायामप्रकाशानि कारयेत्॥ एतैर्लिङ्गैर्नयेत्सीमां राजा विवदमानयोरिति प्रच्छन्नलिङ्गानि॥ एतैः प्रकाशाप्रकाशरूपैर्लिङ्गैः सामन्तादिप्रदर्शितैः सीमांप्रति विवदमानयोः सीमानिर्णयं कुर्याद्राजा॥ १५०॥ १५१॥

## शाखा १ ली.

आतां सीमेच्या वादाचा निर्णय सांगतो.

**मूलार्थ**– क्षेत्राच्या सीमेचा वाद उपस्थित झाला असतां **सामंत, वृद्ध, इत्यादिक**, तसेच गुराखी, शिवेजवळचें शेत नांगरणारे, व सर्व वनचारी ह्यांनीं; टेंकडी, कोळसे, कोंडा, वृक्ष, सेतु, वारूळ, खोरा, हाडें, चैत्य;इत्यादिक खुणांनीं उपलक्षित जी सीमा ती दाखवावी.

**टीकार्थ**– १ दोहों गांवांसंबंधी जें क्षेत्र त्याच्या सीमेचा वाद, तसाच एका गांवासंबंधी जें क्षेत्र त्याच्या सीमेचा वाद पडला असतां, **सामंत, वृद्ध, इत्यादिक**, व गौळी, शिवेच्या जवळचे शेतकरी, व सर्व वनचारी ह्यांनीं टेंकडी, कोळसे, कोंडा, वृक्ष, सेतु, वारूळ, खोरा, हाडें, चैत्य; व (मूळांतील ) इत्यादिक शब्देंकरून वेणू, वाळू, वगैरे पूर्वीं केलेल्या चिन्हांकडून युक्त जी सीमा तिचा निश्चय करावा.

सामंतादिकांनीं शिवेच्या खुणा दाखवाव्या.

२ सीमा ह्मणजे क्षेत्रादिकांची हद्द; ती चार प्रकारची. देशाची सीमा, गांवाची सीमा, क्षेत्राची सीमा, आणि घराची सीमा.

ह्या चार प्रकारच्या सीमांचीं यथासंभव पांच लक्षणें आहेत तीं नारद सांगतो.

**नारद**–३ ध्वजिनी, मत्स्यिनी, नैधानी, भयवर्जिता, आणि राजशासननीता. अशी पांच प्रकारची सीमा सांगितली आहे.

**ध्वजिनी** म्हणजे वृक्षादिकेंकरून जी चिन्हित ती; कारण, वृक्षादिक प्रसिद्धपणानें ध्वजासारखे आहेत.

**मत्स्यिनी** ह्मणजे जी उदकविशिष्ट ती;कारण, येथें मत्स्य शब्देंकरून मत्स्यांचें आश्रयभूत जें जल त्याची **लक्षणा** केली आहे. उदकविशिष्ट ह्मणजे पाट वगैरे लक्षणांनीं युक्त.

**नैधानी** ह्मणजे आंत पुरलेला कोंडा,कोळसे इत्यादिकेंकरून जी युक्त ती. कारण, कोंडा, कोळसे वगैरे जमीनींत पुरल्यामुळें ते निधितुल्य आहेत.

**भयवर्जिता** ह्मणजे वादिप्रतिवादींचा परस्पर वादविवाद होऊन निर्णीत केलेली ती.

**राजशासननीता** ह्मणजे सीमेचीं ओळखण्यालायक चिन्हें नसल्यामुळें राजानें स्वेच्छेनें करून दिलेली. अशा प्रकारच्या सीमेविषयीं सहा प्रकारचा विवाद संभवतो.

**कात्यायन**– ४ कांहीं अंशीं आधिक्य व कांहीं अंशीं न्यूनता; कांहीं अंशीं आहे ह्मणणें, आणि नाहीं ह्मणणें. तशीच अभोगभुक्ति आणि सीमा अशीं स्थावरवादाविषयीं सहा कारणें आहेत.

शिवेच्या वादाचीं कारणें सहा आहेत.

हेंच स्पष्ट करून दाखवितो.

५ आधिक्य म्हणजे माझी येथें पांचा निवर्त्तनांपेक्षां अधिक जमीन आहे, असें कोणी ह्मटलें असतां दुसरा ह्मणतो कीं पांच निवर्तनेंच जमीन आहे, अधिक नाहीं; असा अधिकपणाविषयीं विवाद.

अधिकपणाविषयीं वाद.

६ न्यूनता ह्मणजे पांच निवर्तनें माझी जमीन आहे, असें कोणी ह्मटलें असतां दुसरा ह्मणतो नाहीं, त्यापेक्षांही कमी आहे, असा न्यूनतेविषयीं विवाद.

शिवेच्या कमतीविषयी वाद.

७ आहे ह्मणणें आणि नाहीं ह्मणणें ह्मणजे असें–पांच निवर्तनें माझा हिस्सा आहे, असें ह्मटलें असतां प्रतिवादी ह्मणतो, तुझा हिस्सा नाहीं असा, आहे नाहीं ह्मणण्याविषयीं वाद.

८ अभोगभुक्ति ह्मणजे ह्या माझ्या भूमीवर पहिल्यापासून ह्याचा भोगवटा नसतां हा आतां उपभोग करीत आहे, असें ह्मटलें असतां दुसरा म्हणतो असें नाहीं. बहुत काळापासून निरंतर माझाच भोगवटा आहे, असा अभोगभुक्तीविषयीं वाद संभवतो.

अभोगभुक्तीविषयीं वाद.

९ सीमा म्हणजे ही ह्या क्षेत्राची शींव, ही ह्या क्षेत्राची शींव असा सीमेविषयीं वाद संभवतो.

ह्याप्रमाणें स्थावराविषयीं सहा प्रकारचा विवाद संभवतो. ह्या सहा प्रकारच्या वादांत वचन व न्याय ह्यांकडून शिवेचाही निर्णय केला जातो. ह्मणून ह्या सीमानिर्णयप्रकरणीं स्थावराविषयींच्या वादाचा अंतर्भाव केला.

१० सामंत ह्मणजे आसपासचे राहणारे, ह्मणजे चोंहीं दिशेस जवळचे गांव नगर वगैरे ते ते दर शिवेस आहेतच.

सामंतांचें स्वरूप.

कात्यायन– गांवाचा सामंत गांव, क्षेत्राचा सामंत क्षेत्र, घराचा सामंत घर, असें आसमंतात् सामंतांनीं वेष्टिलें आहे.

ह्या वचनांतील गांव क्षेत्र इत्यादि शब्देंकरून गांवकरी क्षेत्री इत्यादिकांची लक्षणा करावी. " जसें गांव पळाला " असें ह्मटलें असतां गांवांतील लोक पळाले असा अर्थ होतो, तसाच सामंतांचा निर्देश केला तो सामंतांचेही जे संसक्त ( शेजारी ) असतील त्यांचा संग्रह होण्यासाठीं.

कात्यायन– सामंत ह्मणजे आसपासचे शेजारी; शेजाऱ्यांचे शेजारी तेहि सामंतच; ह्या सामंतांचेही जे आणखी शेजारी तेहि सामंतच; असे कमलाचे दलांसारिखे वर्णिले आहेत.

११ ( १ ल्या अंकाचे मूळवचनांतील ) इत्यादिक शब्देंकरून मौल, उद्धृत घ्यावे. वृद्ध, मौल, उद्धृत, ह्यांचें स्वरूपहि तो ( कात्यायन )च सांगतो.

वृद्ध म्हणजे शींव निष्पन्न झालेली किंवा शिवेचा निर्णय झालेला ज्यांनीं पाहिला असे जे माहितगार ते. ते वयानें वृद्ध असोत किंवा नसोत त्या विचाराचें कारण नाहीं.

वृद्धाचें स्वरूप.

१ जेथें प्रत्यक्ष सीमाविवाद असेल तेव्हां साक्षात् शास्त्रवचनेंकरून निर्णय करावा व जेथें क्षेत्र गृह इत्यादिकाचे सीमेचा वाद असेल तेथें शास्त्रवचनेंकरून सिद्ध केलेल्या न्यायाकडून सीमानिर्णय करावा असें सुबोधिनींत सांगितलें आहे. २ दलांसारिखे म्हणजे जसा कमलाचे दलांचा आंतला एक थर, त्याच्या बाहेरून दुसरा थर, त्यांचेहि बाहेरून तिसरा थर असतो त्याप्रमाणें सामंतहि जाणावे.

मौल म्हणजे जे पूर्वीं तेथें सामंत होते, नंतर देशांतरीं गेले, असे मूळचे तेथचे राहणारे ते.

मौलांचें स्वरूप.

उद्धृत म्हणजे, ह्या सीमाविवादांत मूळची हकीकत याप्रमाणें आहे व भोगवट्याची वहिवाट अशी आहे असें सांगून जे शींव दाखविणारे ते.

उद्धृतांचें स्वरूप.

( मूळ वचनांत ) सर्व वनगोचर म्हणजे वनचारी व्याधादिक असें म्हटलें आहे ते कोणते ते मनु सांगतो.

**मनु**— १३ व्याध, पक्षी मारून उपजीवन करणारे, गुराखी, ढीवर, वृक्षादिकांचीं मुळखंडें खणून उपजीवन करणारे, सर्प धरणारे ( गारोडी ), उंच्छवृत्तीनें उपजीविका करणारे, व आणखी जे ( फलपुष्पांसाठीं ) रानांत संचार करणारे तेहि.

१४ टेंकडी; कोळसे; कोंडा; वड, पिंपळ इत्यादिक वृक्ष; सेतु; चैत्य व ( मूळांतील) इत्यादि शब्देंकरून वेळू, वाळू वगैरे घ्याव्या.

ह्या वर सांगितलेल्या शिंवेच्या खुणा उघड व गुप्त ह्या भेदेंकरून दोन प्रकारच्या आहेत. त्या मनु सांगतो.

**मनु**— १५ वड, पिंपळ, पळस, कांटे शेवरी, शाल, ताड, व ज्यांस चीक येतो असे जे वृक्ष ( शेर वगैरे ) ते, **गुल्म**, वेणु, शमी, वेली, टेंकडी, शेर, **कुब्जकगुल्म**, असे शिवेवर वृक्ष लावावे. असें केलें असतां शींव नष्ट होत नाहीं. व तळीं, कूप, विहिरी, झरे, ओढे, अशीं शिंवेच्या ठिकाणीं करावीं; आणि देवालयें करावीं "हीं प्रसिद्ध चिन्हें आहेत."

शिंवेच्या उघड खुणा.

**मनु**— १६ पाषाण, हाडें, पशूंचीं पुच्छें, कोंडा, राख, खापऱ्या, शेणी, विटा, कोळसे, रेती, वाळू, व आणखीहि ज्या अशा प्रकारच्या असतील त्या; अशा प्रकारच्या खुणांस काळेंकरून भूमि ग्रासीत नाहीं, म्हणून व सीमा समजण्याविषयीं उत्तरोत्तर लोकांत बुद्धिविपर्यय आहे, म्हणून अशा प्रकारच्या गुप्त खुणा शिंवेच्या संधीवर कराव्या.

शिंवेच्या गुप्त खुणा.

ह्याप्रमाणें प्रसिद्ध व गुप्त खुणा ज्या सामंतादिकांनीं दाखविल्या त्यांकडून राजानें शिंवेविषयीं वाद सांगणाराच्या शिंवेचा निर्णय करावा. ॥ १५० ॥ १५१ ॥

---

यदा पुनश्चिह्नानि न सन्ति विद्यमानानि वा लिङ्गालिङ्गतया संदिग्धानि तदा निर्णयोपायमाह।

**सामन्ता वा समग्रामाश्चत्वारोऽष्टौ दशापि वा।**
**रक्तस्रग्वसनाः सीमां नयेयुः क्षितिधारिणः॥ १५२॥**

सामन्ताः पूर्वोक्तलक्षणाः। समग्रामाश्चत्वारोऽष्टौदशापिवेति एवं समसंख्याः प्रत्यासन्नग्रामीणाः। रक्तस्रग्विणो रक्ताम्बरधरा मूर्ध्न्यारोपितक्षितिखण्डाः सीमानं नयेयुः प्रदर्शयेयुः। सामन्ता वेति विकल्पाभिधानं स्मृत्यन्तरोक्तसाक्ष्यभिप्रायम्॥

यथाह मनुः ॥ साक्षिप्रत्यय एव स्यात्सीमावादविनिर्णय इति ॥ तत्र च साक्षिणां निर्णेतृत्वं मुख्यं तदभावे सामन्तानाम् । तदुक्तम् । साक्ष्यभावे तु चत्वारो ग्रामाः सीमान्तवासिनः । सीमाविनिर्णयं कुर्युः प्रयता राजसन्निधाविति ॥ तदभावे तत्संसक्तादीनां निर्णेतृत्वम् । यथाह कात्यायनः ॥ स्वार्थसिद्धौ प्रदुष्टेषु सामन्तेष्वर्थगौरवात् । तत्संसक्तैस्तु कर्तव्य उद्धारो नात्र संशयः ॥ संसक्तसक्तदोषे तु तत्संसक्ताः प्रकीर्तिताः । कर्तव्या न प्रदुष्टास्तु राज्ञा धर्मं विजानतेति ॥ सामन्ताद्यभावे मौलादयो ग्राह्याः । तेषामभावे सामन्तमौलवृद्धोद्धृतादयः । स्थावरे षट्प्रकारेऽपि कार्या नात्र विचारणेति कात्यायनेन क्रमविधानात् । एते च सामन्तादयः संख्यागुणातिरेकेण संभवन्ति । सामन्ताः साधनं पूर्वं निर्दोषाः स्युर्गुणान्विताः । द्विगुणास्तूत्तरा ज्ञेयास्ततोऽन्ये त्रिगुणा मता इति स्मरणात् । तेच साक्षिणः सामन्तादयश्च स्वैः शपथैः शापिताः सन्तः सीमां नयेयुः ॥ शिरोभिस्ते गृहीत्वोर्वीं स्रग्विणो रक्तवाससः । सुकृतैः शापिताः स्वैः स्वैर्नयेयुस्ते समञ्जसमिति मनुस्मरणात् । नयेयुरिति बहुवचनं द्वयोर्निरासार्थं नैकस्य ॥ एकश्चेदुन्नयेत्सीमां सोपवासः समुन्नयेत् । रक्तमाल्याम्बरधरो भूमिमादाय मूर्द्धनीति नारदेनैकस्याभ्यनुज्ञानात् । योऽयं नैकः समुन्नयेत्सीमां नरः प्रत्ययवानपि । गुरुत्वादस्य कार्यस्य क्रियैषा बहुषु स्थितेत्येकस्य निषेधः स उभयानुमतधर्मविद्व्यतिरिक्तविषय इत्यविरोधः । स्थलादिचिह्नाभावेपि साक्षिसामन्तादीनां सीमाज्ञान उपायविशेषो नारदेनोक्तः । निम्नगापहृतोत्सृष्टनष्टचिह्नासु भूमिषु । तत्प्रदेशानुमानाच्च प्रमाणाद्भोगदर्शनादिति । निम्नगाया नद्या अपहृतेनापहरणेनोत्सृष्टानि स्वस्थानात्प्रच्युतानि नष्टानि वा लिङ्गानि यासु मर्यादाभूमिषु तत्र तत्प्रदेशानुमानादुत्सृष्टनष्टचिह्नानां प्राचीनप्रदेशानुमानात् ग्रामादारभ्य सहस्रदण्डपरिमितं क्षेत्रमस्य ग्रामस्य पश्चिमे भागे इत्येवंविधात्प्रमाणाद्वा प्रत्यर्थिसमक्षमविप्रतिपन्नाया अस्मार्तकालोपलक्षितभुक्तेर्वा निश्चिनुयुः ॥ बृहस्पतिना चात्र विशेषो दर्शितः । आगमं च प्रमाणं च भोगकालं च नाम च । भूभागलक्षणं चैव ये विदुस्तेऽत्र साक्षिण इति ॥ एते च साक्षिसामन्तादयः शपथैः श्राविताः सन्तः कुलादिसमक्षं राज्ञा प्रष्टव्याः॥ यथाह मनुः ॥ ग्रामेयककुलानां तु समक्षं सीम्नि साक्षिणः । प्रष्टव्याः सीमलिङ्गानि तयोश्चैव विवादिनोरिति । तेच पृष्टाः साक्ष्यादयः ऐकमत्येन समस्ताः सीम्नि निर्णयं ब्रूयुः । तैर्निर्णीतां सीमानं तत्प्रदर्शितसकललिङ्गयुक्तां साक्ष्यादिनामान्वितां चाविस्मरणार्थं पत्रे समारोपयेत् ॥ उक्तंच मनुना । ते पृष्टास्तु यथा ब्रूयुः समस्ताः सीम्नि निर्णयम् । निबध्नीयात्तथा सीमां सर्वांस्तांश्चैव नामत इति ॥ एतेषां साक्षिसामन्तप्रभृतीनां सीमाचङ्क्रमणदिनादारभ्य यावत्त्रिपक्षं राजदैविकं व्यसनं चेन्नोत्पद्यते तदा तत्प्रदर्शनात्सीमानिर्णयः । अयं च राजदैविकव्यसनावधिः कात्यायनेनोक्तः ॥ सीमाचङ्क्रमणे कोशे पादस्पर्शे तथैव च । त्रिपक्षपक्षसप्ताहं दैवराजिकमिष्यत इति ॥ १५२ ॥

## शाखा २ री.

### जर शिवेच्या खुणा नसतील अथवा असून संदिग्ध असतील तर निर्णय करण्याचा उपाय सांगतो.

**मूलार्थ**— अथवा चार, आठ किंवा दहा असे जवळचे सामंत ह्यांनीं आरक्त वस्त्रें नेसून, रक्तपुष्पमाला घालून मस्तकीं मातीचें ढेंकूळ घेऊन शींव दाखवावी.

**टीकार्थ**— १ चार, आठ, किंवा दहा, असे समसंख्या व प्रत्यासन्न ( जवळचे) सामंत ह्यांनीं तांबडीं वस्त्रें नेसून रक्तपुष्पांच्या माळा घालून मस्तकीं मातीचें ढेंकूळ घेऊन शींव दाखवावी.

शिवेच्या खुणा नसल्यास सामंतांनीं निर्णय सांगावा.

२ ( मूळांत ) वा (अथवा ) असा विकल्प सांगितला तो स्मृत्यंतरीं जे साक्षी सांगितले आहेत त्यांकडून अथवा सामंतांकडून सीमानिर्णय करावा, असे दोन पक्ष प्रदर्शित करण्यासाठीं अशा अभिप्रायेंकरून जाणावा.

**मनु**— सीमावादाच्या निर्णयाविषयीं साक्षीदारच प्रमाण होत.

त्यांत साक्षीकडून निर्णय करणें मुख्यपक्ष, त्यांच्या अभावीं सामंत.

**मनु**— साक्षीच्या अभावीं तर जवळच्या चहूंकडील चार गांवांनीं राजाच्या समक्ष शिवेचा निर्णय करावा.

त्यांच्या ( सामंतांच्या ) अभावीं सामंतांचे शेजारी जे सामंत ते निर्णायक होत.

**कात्यायन**— स्वार्थसिद्धीविषयीं निर्दिष्ट केलेले सामंत जर सदोष ठरले तर सामंतांचे जे शेजारी असतील त्यांकडून निर्णय करावा. ह्याविषयीं संशय नको. जर सामंतांच्या शेजाऱ्यांवर दोषोद्भवन केलें तर त्या शेजाऱ्यांचेहि शेजारी असतील ते निर्णायक सांगितले आहेत. परंतु धर्मज्ञ राजानें जे सदोष असतील ते निर्णायक करूं नयेत.

३ सामंतादिकांच्या अभावीं मौल, उद्धृत हे निर्णायक करावे.

सामंतांच्या अभावीं मौल उद्धृत निर्णायक.

**कात्यायन**— त्यांच्या अभावीं सहा प्रकारच्या स्थावर वादाविषयीं मौल, वृद्ध, उद्धृत इत्यादिक निर्णायक करावे.

हे सामंतादिक संख्या, गुण, ह्यांच्या उत्कर्षतारतम्यानें निर्णायक होतात.

**स्मृति**— निर्दोष व गुणी असे सामंत सीमानिर्णयाविषयींचें मुख्य साधन होय. आणि सामंतांचे शेजारी सामंतांपेक्षां द्विगुण असल्यास निर्णायक होतात. त्यांच्याहि पलीकडचे शेजारी पहिल्यापेक्षां तिप्पट असले तर निर्णायक होतात.

४ ते साक्षी व सामंतादिक ह्यांनीं आपापल्या जातीस विहित शपथ घेऊन शिवेचा निश्चय सांगावा.

साक्षिसामंतांनीं शपथ घेऊन शींव दाखवावी.

**मनु**— शींव दाखविणारांनीं मस्तकीं मृत्तिका घेऊन व गळ्यांत माळा घालून आरक्त वस्त्रें नेसून आपापल्या पुण्याची शपथ करून समंजसपणानें शींव दाखवावी.

५ सीमानिर्णय करणारे बहुत असावे, किंवा एक असावा. दोहोंचा मात्र निषेध.

**नारद**– जर शींव दाखविणारा एकच आहे तर त्यानें उपोषित राहून व तांबड्या पुष्पांच्या माळा घालून, रक्तवस्त्र परिधान करून, मातीचें ढेंकूळ मस्तकीं धरून शींव दाखवावी.

अशी नारदाची एकाविषयींहि आज्ञा आहे.

**स्मृति**– विश्वासू मनुष्य असूनहि तो जर एक आहे तर त्याजकडून शिंवेचा निर्णय करूं नये, कारण, ह्या सीमानिर्णयाचें कार्य मोठें म्हणून ही क्रिया बहुतांवर आहे.

असा जो एकाविषयीं निषेध सांगितला तो सीमानिर्णय करणारा एक असून तो जर दोघांस संमत आणि धर्मज्ञ नाहीं तर त्याविषयीं जाणावा.

टेंकडी, कोळसे इत्यादिक सीमाचिन्हांच्या अभावीं साक्षिसामंतादिक ह्यांस शींव समजण्याचा उपायविशेष नारद सांगतो.

**नारद**–६ नदीच्या पुरानें शिंवेच्या खुणा स्थानभ्रष्ट झाल्या अथवा नष्ट झाल्या तर त्या त्या प्रदेशाच्या सुमारानें ह्मणजे ज्या स्थानभ्रष्ट किंवा नष्ट झालेल्या खुणा, त्यांचें हेंच मूळ ठिकाण असावें अशा अनुमानेंकरून किंवा गांवाच्या पश्चिमेस हजार दंडपरिमित हें क्षेत्र आहे अशा प्रमाणेंकरून अथवा प्रतिवादीच्या समक्ष बिनहरकत, अस्मार्तकाल जो भोगवटा तेणेंकरून शिंवेचा निर्णय करावा.

सीमेच्या खुणा नदीच्या पुरानें वाहवल्या तर अनुमानानें निर्णय करावा.

७ शिंवेच्या निर्णयाविषयीं जे साक्षी त्यांविषयीं बृहस्पति विशेष सांगतो.

**बृहस्पति**– आगम, प्रमाण, भोगवटा, अमुक काळ, अमुक नांव, आणि भूमीच्या शिंवेचीं लक्षणें, जे जाणतात ते ह्या शिंवेच्या निर्णयाविषयीं साक्षी होतात.

८ राजानें हे साक्षी व सामंत इत्यादिकांस शपथ देऊन कुल, श्रेणी इत्यादिकांच्या समक्ष पुसावें.

**मनु**– राजानें पूग, कुल, व श्रेणी ह्यांच्या समक्ष आणि वादिप्रतिवादींच्या समक्ष साक्षींस शिंवेच्या खुणा पुसाव्या.

९ नंतर सर्व साक्षी व सामंत इत्यादिकांनीं एकमतानें शिंवेचा निर्णय सांगावा. आणि आठवण रहावी ह्मणून राजानें जो शिंवेचा निर्णय केला तो व त्यांनीं दाखविलेल्या सकल खुणा व साक्षिसामंतांचीं नांवें हीं पत्रीं लिहावीं. ( ह्या पत्रास सीमापत्र असें ह्मटलें आहे ).

साक्षिसामंतादिकांनीं एकमतानें निर्णय सांगावा.

मनुहि हेंच सांगतो.

**मनु**– त्या सामंतांस पुसल्यावर ते शिंवेविषयीं जसा निर्णय सांगतील तशी शींव बांधून द्यावी, आणि त्या सर्वांचीं नांवें ( सीमापत्रावर ) लिहावीं.

१० ह्या साक्षिसामंतादिकांस सीमा दाखविलेल्या दिवसापासून दीड महिनापर्यंत जर कांहीं राजिक व दैविक संकट उपस्थित झालें नाहीं, तर त्यांनीं शींव दाखविल्यावरून केलेला सीमानिर्णय खरा जाणावा.

ह्या राजदैविक संकटाचा अवधि कात्यायन सांगतो.

कात्यायन– शिवेच्या निर्णयाविषयीं, कोशदिव्याविषयीं, तसेंच पायांचे शपथेविषयीं अनुक्रमानें दीडमहिना, पक्ष, आणि सप्तकपर्यंत दैविक, राजिक संकट उपस्थित होण्याची मर्यादा जाणावी. १९२.

---

यदा त्वमीषामुक्तसाक्ष्यवचसां त्रिपक्षाभ्यन्तरे रोगादि दृश्यते अथवा प्रतिवादिनिर्दिष्टाभ्यधिकसंख्यागुणसाक्ष्यन्तरविरुद्धवचनता तदा ते मृषाभाषितया दण्डनीयास्तदाह ।

## अनृते तु पृथक् दण्ड्या राज्ञा मध्यमसाहसम् ।

अनृते मिथ्यावदने निमित्तभूते सति सर्वे सामन्ताः प्रत्येकं मध्यमसाहसेन चत्वारिंशदधिकेन पणपञ्चशतेन दण्डनीयाः । सामन्तविषयता चास्य साक्षिमौलादीनां स्मृत्यन्तरे दण्डान्तरविधानादवगम्यते ॥ तथाच मनुः । यथोक्तेन नयन्तस्ते पूयन्ते सत्यसाक्षिणः । विपरीतं नयन्तस्तु दाप्याः स्युर्द्विशतं दममिति ॥ नारदोपि। अथ चेदनृतं ब्रूयुः सामन्ताः सीमनिर्णये । सर्वे पृथक् पृथक् दण्ड्या राज्ञा मध्यमसाहसमिति ॥ सामन्तानां मध्यमसाहसं दण्डमभिधाय शेषाश्चेदनृतं ब्रूयुर्नियुक्ता भूमिकर्मणि । प्रत्येकं तु जघन्यास्ते विनेयाः पूर्वसाहसमिति तत्संसक्तादिषु प्रथमं साहसमुक्तवान् ॥ मौलादीनामपि तमेव दण्डमाह ॥ मौलवृद्धादयस्त्वन्ये दण्डगत्या पृथक् पृथक् । विनेयाः प्रथमेनैव साहसेनानृते स्थिता इति । आदिशब्देन गोपशाकुनिकव्याधवनगोचराणां ग्रहणम् । यद्यपि शाकुनिकादीनां पापरतत्वाल्लिङ्गप्रदर्शन एवोपयोगो न साक्षात्सीमानिर्णये तथापि लिङ्गदर्शन एव मृषाभाषित्वसंभवाद्दण्डविधानमुपपद्यत एव । अनृते तु पृथक् दण्ड्या इत्येतद्दण्डविधानमज्ञानविषयम् ॥ बहूनां तु गृहीतानां न सर्वे निर्णयं यदि । कुर्युर्भयाद्वा लोभाद्वा दण्ड्यास्तूत्तमसाहसमिति ज्ञानविषये साक्ष्यादीनां कात्यायनेन दण्डान्तरविधानात् । तथा साक्षिवचनभेदेऽप्ययमेव दण्डस्तेनैवोक्तः ॥ कीर्तिते यदि भेदः स्याद्दण्ड्यास्तूत्तमसाहसमिति । एवमज्ञानादिनानृतवदने साक्ष्यादीन् दण्डयित्वा पुनः सीमाविचारः प्रवर्तयितव्यः ॥ अज्ञानोक्तौ दण्डयित्वा पुनः सीमां विचारयेदित्युक्त्वा॥ त्यक्त्वा दुष्टांस्तु सामन्तानन्यान्मौलादिभिः सह । संमिश्र्य कारयेत्सीमामेवं धर्मविदो विदुरिति निर्णयप्रकारस्तेनैवोक्तः ॥

जर ह्यांस ( सामंतांस ) दिडामहिन्याच्या आंत रोगादिक उद्भवेल अथवा पहिल्या साक्षींपेक्षां संख्येनें किंवा गुणानें अधिक असे जे प्रतिवादीनें आणखी दाखविलेले साक्षी त्यांची साक्ष जर पहिल्या साक्षींपेक्षां विरुद्ध आहे तर पहिले साक्षी खोटे ठरले ह्मणून त्यांपासून दंड घ्यावा असें सांगतो.

**मूलार्थ**— सामंतांनीं खोटें सांगितलें ह्मणून राजानें त्या प्रत्येकास **मध्यमसाहस** दंड करावा.

**टीकार्थ**—११ सर्व सामंतांनीं खोटी साक्ष दिली ह्मणून त्या प्रत्येकास **मध्यमसाहस** म्हणजे ५४० **पण** दंड करावा.

खोटी साक्ष देण्याबद्दल प्रत्येक सामंतास मध्यमसाहस दंड.

साक्षी व **मौल इत्यादिकांस** स्मृत्यंतरीं निराळा दंड सांगितला आहे ह्मणून वरचें **मूळवचन सामंतांविषयींच** जाणावें.

**मनु**— जे साक्षी सीमेचा निर्णय वास्तविक सांगतील तर ते पवित्र होतील आणि विपरीत सांगतील तर २०० ( **पण** ) दंडास पात्र होतील.

**नारदहि**— जर शिंवेच्या निर्णयाविषयीं **सामंत** अनृत बोलतील तर त्या सर्वांपासून **राजानें** पृथक् पृथक् **मध्यमसाहस** दंड घ्यावा. " असा **सामंतांस मध्यमसाहस** दंड सांगून " जर शिंवेच्या **निर्णयाविषयीं** नियुक्त केलेले असे इतर ( सामंतांचे शेजारी व मौलादिक ) अनृत बोलतील तर त्या प्रत्येक दुष्टापासून **प्रथमसाहस** दंड घ्यावा. " असा **सामंतांचे** शेजारी जे **सामंतादिक** त्या प्रत्येकास **प्रथमसाहस** दंड सांगता झाला."

**मौल, वृद्ध**, इत्यादिकांस तो ( वरचा)च दंड सांगतो.

**नारद**—१२ इतर म्हणजे **मौल वृद्ध** इत्यादिक जर अनृत बोलतील तर त्या प्रत्येकास **प्रथमसाहस** दंड करावा.

वरच्या **इत्यादिक** शब्देंकरून गुराखी, पारधी, व्याध व इतर जे अरण्यांत राहणारे ते समजावे.

जरी पारधी व्याध वगैरे हे पापकर्मी रत असल्यामुळें त्यांचा खुणा दाखविण्याविषयीं मात्र उपयोग, सीमानिर्णयाविषयीं नाहीं खरा, तथापि खुणा दाखविण्याविषयीं खोटें बोलण्याचा संभव आहे ह्मणून दंड सांगितला तो युक्तच आहे.

**कात्यायन**—१३ साक्षीविषयीं क्रम करून घेतलेले सर्व साक्षी जर भयानें किंवा लोभानें मिथ्या निर्णय सांगतील तर त्या प्रत्येकास निरनिराळा **उत्तमसाहस** दंड करावा.

असा, जाणून अनृत सांगणाऱ्या **साक्षिसामंतादिकांस** कात्यायनानें निराळा दंड सांगितला आहे. ह्मणून ११ व्या अंकाचे मूळवचनांत जो **मध्यमसाहस** दंड सांगितला तो अज्ञानानें खोटें सांगितलें असल्यास त्याविषयीं समजावा.

तसाच साक्षींच्या बोलण्यांत विपर्यास पडला असतांहि हा ( वरचा)च दंड सांगतो.

**कात्यायन**— साक्षींचे सांगण्यांत विपर्यास पडला तर **उत्तमसाहस** दंड करावा.

१४ ह्याप्रमाणें अज्ञानादिकेंकरून अनृत भाषण घडलें असतां **साक्षिसामंतादिकांस** दंड करून पुनः शिंवेविषयीं वाद चालवावा.

कात्यायन— अज्ञानानें खोटें सांगितलें असतां दंड करून पुनः सीमाविचार करावा. " असें सांगून " दुष्ट ( खोटें बोलणारे ) सामंत असतील त्यांस टाकून मौल, वृद्ध इत्यादिक दुसरे घेऊन सीमानिर्णय करावा, असें धर्मज्ञ बोलतात " असा सीमानिर्णयाचा प्रकार सांगता झाला."

यदा पुनः सामन्तप्रभृतयो ज्ञातारश्चिह्नानि च न सन्ति तदा कथं निर्णय इत्यत आह ॥

**अभावे ज्ञातृचिह्नानां राजा सीम्नः प्रवर्तिता ॥ १५३ ॥**

ज्ञातृणां सामन्तादीनां लिङ्गादीनां च वृक्षादीनामभावे राजैव सीम्नः प्रवर्तिता प्रवर्तयिता । अन्तर्भावितोऽत्र ण्यर्थः । ग्रामद्वयमध्यवर्तिनीं विवादास्पदीभूतां भुवं समं प्रविभज्य अस्येयं भूरस्येयमित्युभयोः समर्प्य तन्मध्ये सीमालिङ्गानि कुर्यात् ॥ यदा तस्यां भूमावन्यतरस्योपकारातिशयो दृश्यते तदा तस्यैव ग्रामस्य सकला भूः समर्पणीया ॥ यथाह मनुः । सीमायामविषह्यायां स्वयं राजैव धर्मवित् । प्रदिशेद्भूमिमेकेषामुपकारादिति स्थितिरिति ॥ १५३ ॥

शाखा ३ री.

जर शींव जाणणारे सामंतादिक नाहींत व शिवेच्या खुणाही नाहींत तर कसा निर्णय करावा तें सांगतो.

**मूलार्थ**— शिवेचे माहितगार व शिवेच्या खुणा नाहींत तर राजानें शींव पाडून द्यावी.

**टीकार्थ**—१ शिवेचे माहितगार सामंतादिक नाहींत व शिवेच्या ज्या वृक्षादिक खुणा त्या नाहींत तर राजाच शींव बांधून देणारा म्हणजे दोहों गांवांच्या मधल्या विवादास्पदीभूत जमिनीचे सारिखे वांटे करून; ही ह्याची जमीन, आणि ही ह्याची जमीन, अशी दोघांस वांटून देऊन मध्यभागीं शिवेच्या खुणा राजानें करून द्याव्या.

२ जर त्या ( विवादास्पदीभूत ) भूमीचा दोहों गांवांतून अमुक गांवास अधिक फायदा दिसेल तर त्याच गांवच्या सत्तेंत ती सगळी भूमि द्यावी.

**मनु**— साक्षिसामंतादिक, व शिवेच्या खुणा नसल्यामुळें शिवेचा निर्णय होऊं शकत नाहीं तर राजानें शींव पाडून द्यावी, परंतु जर दोहों गांवांतून एकास विशेष फायदा असेल तर त्याच गांवाकडे सारी जमीन द्यावी, अशी शास्त्रमर्यादा आहे. १५३

---

असत्यामप्यतद्भावाशङ्कायामस्याः स्मृतेर्न्यायमूलतां दर्शयितुमतिदेशमाह ॥

**आरामायतनग्रामनिपानोद्यानवेश्मसु ।**
**एष एव विधिर्ज्ञेयो वर्षाम्बुप्रवहादिषु ॥ १५४ ॥**

आरामः पुष्पफलोपचयहेतुर्भूभागः । आयतनं निवेशनं । पलालकूटाद्यर्थं वि-

भक्तो भूप्रदेशः । ग्रामः प्रसिद्धः। ग्रामग्रहणं च नगराद्युपलक्षणार्थं । निपानं पानीयस्थानं वापीकूपप्रभृतिकं । उद्यानं क्रीडावनं । वेश्म गृहं । एतेष्वारामादिष्वयमेव सामन्तसाक्ष्यादिलक्षणो विधिर्ज्ञातव्यः । तथा प्रवर्षणोद्भूतजलप्रवाहेषु अनयोर्गृहयोर्मध्येन जलौघः प्रवहति अनयोर्वेत्येवंप्रकारे विवादे आदिग्रहणात्प्रासादादिष्वपि प्राचीन एव विधिर्वेदितव्यः । तथाच कात्यायनः ॥ क्षेत्रकूपतडागानां केदारारामयोरपि । गृहप्रासादावसथनृपदेवगृहेषु चेति ॥ १५४ ॥

शाखा ४ थी.

ही ( १ ल्या शाखेच्या १ ल्या अंकाची ) स्मृति न्यायमूल आहे असें दाखविण्यासाठीं अतिदेश सांगतो.

**मूलार्थ**– बाग, निवेशन, गांव, व पानीयस्थान, क्रीडावन, घर आणि पर्जन्याचें पाणी वाहण्याचा मार्ग इत्यादिकांविषयीं हाच निर्णय जाणावा.

**टीकार्थ**– बाग ह्मणजे फुलांच्या व फळांच्या समृद्धीचें कारण जी भूमि तो, निवेशन ह्मणजे वैरण काडी वगैरे ठेवण्याची जागा; गांव, गांवशब्देंकरून नगर शहर इत्यादिक घ्यावीं, व विहीर, कूप वगैरे पाण्याचें ठिकाण, क्रीडावन ह्मणजे क्रीडेसाठीं केलेली रमणीय भूमि, घरें, तसेंच पावसाचें पाणी जावयाचे मार्ग, ह्मणजे ह्या दोहों घरांच्या मधून पावसाचें पाणी जात असतें, किंवा ह्या दोहों घरांमधून जात असतें अशा प्रकारच्या विवादाविषयीं, तसें प्रासाद ह्मणजे देवालय, राजवाडा इत्यादिकांविषयींही हा ( १ ल्या शाखेच्या १ ल्या अंकापासून एथपर्यंत सांगितलेला ) निर्णय जाणावा.

**कात्यायन**– क्षेत्र कूप, तळीं, केदार, बाग, घरें, गांव, राजमंदिरें, देवालयें, ह्यांविषयीं हाच ( सदर्हू ) निर्णय जाणावा. १५४

सीमानिर्णयमुक्त्वा तत्प्रसङ्गेन मर्यादाप्रभेदनादौ दण्डमाह ॥

**मर्यादायाः प्रभेदे च सीमातिक्रमणे तथा ।**
**क्षेत्रस्य हरणे दण्डा अधमोत्तममध्यमाः ॥ १५५ ॥**

अनेकक्षेत्रव्यवच्छेदिका साधारणा भूमर्यादा तस्याः प्रकर्षेण भेदने सीमातिक्रमणे सीमानमतिलंघ्य कर्षणे क्षेत्रस्य च भयादिप्रदर्शनेन हरणे यथाक्रमेण अधमोत्तम-

---

१ एका विषयासाठीं सांगितलेला जो न्याय त्याचा उपयोग दुसऱ्या विषयाकडे करण्यासाठीं जें वचन तो अतिदेश म्हटला आहे. जेथें पूर्वोत्तरविषयाचें स्वरूप निरनिराळें असेल तेथें, "पूर्वी जसें सांगितलें तसेंच एथेंहि समजावें," अशा रीतीचा अतिदेश करणें भाग पडतो. वाडी वगैरे स्थावर तर क्षेत्रासारिखाच लहानमोठा भूमीचा भाग होय, यास्तव चालत्या प्रकरणाच्या आरंभापासून "क्षेत्राच्या सीमेच्या विवादाचे ठायीं" इत्यादि वचनेंकरून जो न्याय सांगितला त्याचा वाडी वगैरेंचेठायीं अतिदेश करण्याचें कांहीं कारण नाहीं, असी शंका जरी एथें उपस्थित होईल तथापि न्यायसिद्ध अर्थ दाखविणारीहि कितीएक शास्त्रवचनें आहेत असें विद्यार्थ्यास सूचित करण्यासाठीं पुढचें वाक्य अतिदेशरूप होय, असा याचा अभिप्राय सुबोधिनी टीकेंत प्रदर्शित केला आहे.

मध्यमसाहसा दण्डा वेदितव्याः। क्षेत्रग्रहणं चात्र गृहारामाद्युपलक्षणार्थम्। यदा पुनः स्वीयभ्रान्त्या क्षेत्रादिकमपहरति तदा द्विशतो दमो वेदितव्यः। यथाह मनुः॥ गृहं तडागमारामं क्षेत्रं वा भीषया हरन्। शतानि पञ्च दण्डयः स्यादज्ञानाद्द्विशतो दम इति॥ अपह्रियमाणक्षेत्रादिभूयस्त्वपर्यालोचनया कदाचिदुत्तमोपि दण्डः प्रयोक्तव्यः। अत एवाह॥ वधः सर्वस्वहरणं पुरान्निर्वासनाङ्कने। तदङ्गच्छेद इत्युक्तो दण्ड उत्तमसाहस इति॥ १५५॥

शाखा ५ वी.

शिवेविषयीं निर्णय सांगून प्रसंगानें मर्यादेच्या भंगादिकाविषयीं दंड सांगतो.

**मूलार्थ**— मर्यादेचा भंग केला असतां व शिवेचा अतिक्रम केला असतां आणि क्षेत्राचा अपहार केला असतां अनुक्रमानें प्रथमसाहस, उत्तमसाहस, आणि मध्यमसाहस, दंड योजावे.

**टीकार्थ**—१ मर्यादा ह्मणजे अनेक क्षेत्रांचे विभाग करणारी अशी जी साधारण भूमि, तिचा विशेषेंकरून भंग केला असतां, व शिवेचें उल्लंघन करून अधिक नांगरलें असतां, आणि धमकी वगैरे दाखवून क्षेत्राचा अपहार केला असतां, (ह्या तिहीं अपराधांस अनुक्रमानें) प्रथमसाहस, उत्तमसाहस, मध्यमसाहस दंड जाणावे.

मर्यादेचा भंग, शिवेचें उल्लंघन व क्षेत्राचें हरण करणारास दंड.

२ (मूळांतील) क्षेत्रशब्देंकरून घर, बाग इत्यादिक घ्यावीं. (ह्यास्तव) घर बाग वगैरेचा अपहार करणारासहि मध्यमसाहस दंड योजावा.

३ जर हें माझें आहे अशा भ्रांतीनें क्षेत्रादिकाचा अपहार करितो तर २०० (पण) दंड करावा.

हें माझें अशा भ्रांतीनें दुसऱ्याचें शेत वगैरे ह्याचा अपहार करणारास दोनशें पण दंड.

**मनु**— जर धमकी दाखवून घर, तलाव, बाग, किंवा क्षेत्र ह्यांचा अपहार करील तर त्यापासून ५०० पण दंड घ्यावा. जर अज्ञानानें अपहार करील तर २०० पण दंड घ्यावा.

अपहार केलेलें क्षेत्रादिक मोठें आहे तर तारतम्यानें कदाचित् उत्तमसाहसहि दंड योजावा.

**नारद**— वध, सर्वस्वहरण, गांवांतून हांकून देणें, डाग देणें, आणि ज्या अवयवानें अपराध केला असेल तो तोडणें, असा उत्तमसाहस दंड सांगितला आहे. १५५

यः पुनः परक्षेत्रे सेतुकूपादिकं प्रार्थनयार्थदानेन वा लब्धानुज्ञो निर्मातुमिच्छति तन्निषेधतः क्षेत्रस्वामिन एव दण्ड इत्याह॥

न निषेध्योऽल्पबाधस्तु सेतुः कल्याणकारकः।
परभूमिं हरन्कूपः स्वल्पक्षेत्रो बहूदकः॥ १५६॥

परकीयां भूमिमपहरन् नाशयन्नपि सेतुर्जलप्रवाहबन्धः क्षेत्रस्वामिना न प्रतिषेध्यः स चेदीषत्पीडाकरो बहूपकारकश्च भवति । कूपश्चाल्पक्षेत्रव्यापित्वेनाल्पबाधो बहूदकत्वेन कल्याणकारकश्चातो बहूदको नैव निवारणीयः। कूपग्रहणं च वापीपुष्करिण्याद्युपलक्षणार्थम्। यदा पुनरसौ सर्वक्षेत्रवर्तितया बहुबाधो नद्यादिसमीपक्षेत्रवर्तितया अल्पोपकारकस्तदासौ निषेध्य इत्यर्थादुक्तं भवति । सेतोश्च द्वैविध्यमुक्तं नारदेन ॥ सेतुश्च द्विविधो ज्ञेयः खेयो बन्ध्यस्तथैव च । तोयप्रवर्तनात्खेयो बन्ध्यः स्यात्तन्निवर्तनादिति । यदा त्वन्यनिर्मितं सेतुं भेदनादिना नष्टं स्वयं संस्करोति तदा पूर्वस्वामिनं तद्वंश्यं नृपं वा पृष्ट्वैव संस्कुर्यात् । यथाह नारदः ॥ पूर्वप्रवृत्तमुत्सन्नमपृष्ट्वा स्वामिनं तु यः । सेतुं प्रवर्तयेत्कश्चिन्न स तत्फलभाग्भवेत् ॥ मृते तु स्वामिनि पुनस्तद्वंश्ये वापि मानवे । राजानमामन्त्र्य ततः कुर्यात्सेतुप्रवर्तनमिति ॥१५६॥

दुसऱ्याच्या क्षेत्रांत त्याला विचारून किंवा द्रव्य देऊन त्याची आज्ञा घेऊन
सेतु कूप इत्यादि बांधायास इच्छीत असतां प्रतिबंध करणारा जो मालक
त्यासच दंड सांगतो.

**मूलार्थ**— थोड्याशा भूमीला अडवून बहुतांस उपयोगी असा जो सेतु त्याविषयीं, तसाच दुसऱ्याच्या थोड्याशा भूमीला अडविणारा परंतु उदकसमृद्धीमुळें बहुतांस उपयोगी असा जो कूप तो बांधण्याविषयीं मालकानें निषेध करूं नये.

**टीकार्थ**—४ परकीय भूमीला अडचण करणारा असा जो सेतु तो बांधण्याविषयीं मालकानें अडथळा करूं नये, परंतु तो जर थोडी जमीन अडवून बहुत उपयोगी होईल तर; आणि तो कूपहि, थोडें क्षेत्र अडविल्यामुळें थोडेंसें नुकसान करणारा खरा, परंतु, पुष्कळ पाणी देणारा असल्यामुळें बहुत लोकांस उपयोगी होतो तर तो बांधण्याविषयीं मालकानें हरकत करूं नये.

सेतु विहीर वगैरे बांधणाराला मालकानें हरकत करूं नये.

( मूळांत ) कूपशब्दाचा निर्देश केला तो वापी पुष्करणी इत्यादिकांचा संग्रह होण्यासाठीं आहे.

५ जर सेतु, कूप, इत्यादिक, हे सगळ्या क्षेत्रास अडवून बहुत नुकसान करणारे व नदी इत्यादिकांच्या जवळील क्षेत्रांत बांधल्यामुळें त्यापासून विशेष उपयोग होत नाहीं असें असेल तर ते सेतु, कूपादि बांधण्याविषयीं निषेध करावाच, असें अर्थसिद्ध होतें.

सेतु, विहीर ह्यांच्या बांधण्यानें विशेष फायदा नसल्यास हरकत करावी.

सेतु दोन प्रकारचा असें नारद सांगतो.

**नारद**—६ सेतु खेय आणि बंध्य असा दोन प्रकारचा समजावा. खेय ह्मणजे ज्याच्या खालून पाणी वाहत जातें तो ( ज्याला लोकांत पूल असें ह्मणतात), आणि बंध्य म्हणजे उदकाचा प्रवाह बंद करून जो बांधला जातो तो (ज्याला धरण असें ह्मणतात).

७ दुसऱ्यानें बांधलेला सेतु फुटून नाश पावला असतां जो कोणी त्याचा जीर्णोद्धार करावयास इच्छितो त्याणें त्याच्या प्रथम बांधणाऱ्या मालकास किंवा (मालकाच्या अभावीं) त्याचा वंशज असेल त्याला अथवा (त्याच्या अभावीं) राजाला विचारून जीर्णोद्धार करावा.

जीर्णोद्धार करणारानें मालकाची आज्ञा घ्यावी.

नारद— पूर्वीं बांधलेला सेतु कालेंकरून नाश पावला असतां त्याच्या मालकाला पुसल्यावांचून जो त्याच्या सेतूचा जीर्णोद्धार करितो त्याला त्याचें (सेतूचें) उत्पन्न मिळणार नाहीं (धनीच घेईल). मालकाच्या अभावीं (त्याच्या वंशजाला) किंवा वंशजाच्या अभावीं राजाला पुसून नंतर सेतूचा जीर्णोद्धार करावा. १५६

---

क्षेत्रस्वामिनं प्रत्युपदिष्टमिदानीं सेतोः प्रवर्तयितारं प्रत्याह ॥

**स्वामिने योऽनिवेद्यैव क्षेत्रे सेतुं प्रवर्त्तयेत् ।**
**उत्पन्ने स्वामिनो भोगस्तदभावे महीपतेः ॥ १५७ ॥**

क्षेत्रस्वामिनमनभ्युपगम्य तदभावे राजानं वा यः परक्षेत्रे सेतुं प्रवर्तयत्यसौ फलभाग् न भवत्यपि तु तदुत्पन्ने फले क्षेत्रस्वामिनो भोगस्तदभावे राज्ञः । तस्मात्प्रार्थनया अर्थदानेन वा क्षेत्रस्वामिनं तदभावे राजानं वानुज्ञाप्यैव परक्षेत्रे सेतुः प्रवर्तनीय इति तात्पर्यम् ॥ १५७ ॥

याप्रमाणें क्षेत्राच्या मालकाविषयीं सांगितलें. आतां सेतु बांधणाराविषयीं सांगतो.

मूलार्थ— मालकास न विचारतां त्याच्या क्षेत्रांत सेतु बांधील तर त्याचें उत्पन्न मालक घेईल. त्याच्या अभावीं राजा घेईल.

टीकार्थ—८मालकास, त्याच्या अभावीं राजाला विचारल्यावांचून त्याच्या क्षेत्रांत जो सेतु बांधितो त्याला त्याचें (सेतूचें) उत्पन्न मिळणार नाहीं, तर त्याचें उत्पन्न क्षेत्राच्या मालकानें घ्यावें. त्याच्या अभावीं राजानें घ्यावें. तस्मात् प्रार्थनेकडून किंवा द्रव्य देऊन क्षेत्रस्वामीची किंवा त्याच्या अभावीं राजाची अनुमति घेऊनच दुसऱ्याच्या क्षेत्रांत सेतु बांधावा असें तात्पर्य समजावें. १५७

सेतु वगैरे बांधणारानें मालकास पुसावें.

---

क्षेत्रस्वामिना सेतुर्न प्रतिषेध्य इत्युक्तमिदानीं तस्यैव प्रसक्तानुप्रसक्त्या कंचिद्विध्यन्तरमाह ॥

**फालाहतमपि क्षेत्रं न कुर्याद्यो न कारयेत् ॥**
**स प्रदाप्यः कृष्टफलं क्षेत्रमन्येन कारयेत् ॥ १५८ ॥**

यः पुनः क्षेत्रस्वामिपार्श्वे अहमिदं क्षेत्रं कृषामीति अङ्गीकृत्य पश्चादुत्सृजति न चान्येन कर्षयति तच्च क्षेत्रं यद्यपि फालाहतं ईषद्धलेन विदारितं न सम्यग्बीजवापार्हं तथापि तस्याकृष्टस्य फलं यावत्तत्रोत्पत्त्यर्हं सामन्तादिकल्पितं तावदसौ कर्षको दापनीयः । तच्च क्षेत्रं पूर्वकर्षकादाच्छिद्यान्येन कारयेत् ॥ इति सीमाविवादप्रकरणम् ॥ १५८ ॥

क्षेत्राच्या धन्यानें सेतु बांधण्याविषयीं हरकत करूं नये असें सांगितलें. आतां त्याच्याच प्रसंगसंगतीनें स्थलविशेषीं दुसरा प्रकार सांगतो.

मूलार्थ— नांगरलेलें क्षेत्र जो स्वतां वाहत नाहीं, आणि दुसऱ्याकडूनहि वाहवीत नाहीं, तर त्यापासून त्या नांगरलेल्या क्षेत्राचें उत्पन्न घेऊन क्षेत्र दुसऱ्याकडून करवावें.

टीकार्थ—९ जो मनुष्य क्षेत्राच्या धन्याजवळ " मी हें शेत करीन " असें कबूल करून नंतर तें टाकून देतो, आणि दुसऱ्याकडूनहि वाहवीत नाहीं, असें जरी थोडेंसें नांगरलेलें, ह्मणजे चांगलें पेरणी करावयाजोगें नांगरलेलें नाहीं, तथापि त्यांत " इतकें पीक उत्पन्न व्हावयाजोगें आहे असें " सामंतादिकांनीं निर्णीत केलेलें तितकें उत्पन्न त्या नांगरणारापासून देवावें, आणि तें पहिल्या शेतकऱ्यापासून घेऊन दुसऱ्याकडून करवावें. १५८

---

## स्वामिपालविवाद प्रकरण १० वें.

व्यवहारपदानां परस्परहेतुहेतुमद्भावाभावात् तेषामाद्यमृणादानमित्यादिना पाठक्रमो न विवक्षित इति व्युत्क्रमेण स्वामिपालविवादोऽभिधीयते ॥

**माषानष्टौ तु महिषी सस्यघातस्य कारिणी ॥**
**दण्डनीया तदर्द्धं तु गौस्तदर्द्धमजाविकम् ॥ १५९ ॥**

परसस्यविनाशकारिणी महिषी अष्टौ माषान्दण्डनीया । गौस्तदर्द्धं चतुरो माषान् । अजा मेषाश्च माषद्वयं दण्डनीयाः । महिष्यादीनां धनसंबन्धाभावात्तत्स्वामी पुरुषो लक्ष्यते । माषश्चात्र ताम्रिकपणविंशतिमो भागः ॥ माषो विंशतिमो भागः पणस्य परिकीर्तित इति नारदस्मरणात् । एतच्चाज्ञानविषयम् ॥ ज्ञानपूर्वंतु पणस्य पादौ द्वौ गां तद्द्विगुणं महिषीं तथा । तथाजाविकवत्सानां पादो दण्डः प्रकीर्तित इति स्मृत्यन्तरोक्तं द्रष्टव्यम् ॥ यत्पुनर्नारदेनोक्तम् । माषं गां दापयेद्दण्डं द्वौ माषौ महिषीं तथा । तथाजाविकवत्सानां दण्डः स्यादर्द्धमाषिक इति तत्पुनः प्ररोहयोग्यमूलावशेषभक्षणविषयम् ॥ १५९ ॥

शाखा १ ली.

व्यवहारप्रकरणांचा परस्पर कार्यकारणभाव नाहीं म्हणून ( १ ल्या प्रकरणाच्या ४ थ्या शाखेच्या ४ थ्या अंकांतल्या मनुवचनांत ) " ऋणादान, निक्षेप, अस्वामिवि-

क्रय" इत्यादिक जो अनुक्रम सांगितला तो एथें विवक्षित नाहीं, अतएव क्रमापेक्षा न धरितां स्वामिपालविवाद प्रकरणाचें निरूपण करितो.

**मूलार्थ**– धान्याचा नाश करणाऱ्या म्हशीस आठ माष दंड, गाईला त्याचें अर्ध (चार माष) आणि शेळ्यामेंढ्यांस अर्धाचें अर्द्ध दंड करावा.

**टीकार्थ**– १ परकीयाच्या धान्याचा नाश करणाऱ्या म्हशीला आठ माष दंड करावा. गाईला त्याचें अर्ध ह्मणजे चार माष, आणि शेळ्यामेंढ्यांस दोन दोन माष दंड करावा.

दुसऱ्याच्या शेताचा नाश करणाऱ्या म्हैस वगैरेस दंड.

म्हैस इत्यादि पशूंस धनसंबंध नाहीं ह्मणून वर सांगितलेला जो दंड तो त्या पशूंच्या मालकास समजावा. एथें माष ह्मणजे तांब्याच्या पणाचा विसावा अंश जाणावा. कारण,

**नारद**– माष ह्मणजे पणाचा विसावा अंश सांगितला आहे.

२ हा (वरचा) दंडप्रकार, अजाणतां घडलेल्या अपराधाविषयीं आहे. जाणून केलेल्या अपराधाविषयीं तर (खालच्या) स्मृतींत सांगितलेला दंड योजावा.

**स्मृति**–गाईला अर्धा पण, ह्मशीला त्याच्या दुप्पट (एक पण), आणि शेळ्यामेंढ्यांस पणाचा एकचतुर्थांश दंड करावा.

**नारद**– ३ गाईला एक माष, ह्मशीला दोन माष, तसाच शेळ्या मेंढ्या ह्या प्रत्येकास अर्धमाष दंड करावा.

असें जें सांगितलें तें पुनः फुटावयाजोगीं अशीं मुळें, फांद्या वगैरे राहून भक्षिलें असल्यास त्याविषयीं जाणावें. १५९

---

अपराधातिशयेन क्वचिद्दण्डद्वैगुण्यमाह ॥

**भक्षयित्वोपविष्टानां यथोक्ताद्विगुणो दमः ॥**

यदि पशवः परक्षेत्रे सस्यं भक्षयित्वा तत्रैवानिवारिताः शेरते तदा यथोक्ताद्दण्डाद्विगुणो दण्डो वेदितव्यः । सवत्सानां पुनर्भक्षयित्वोपविष्टानां यथोक्ताच्चतुर्गुणो दण्डो वेदितव्यः ॥ वसतां द्विगुणः प्रोक्तः सवत्सानां चतुर्गुण इति वचनात् ॥

अधिक अपराध असल्यामुळें क्वचित् स्थळीं दुप्पट दंड (अर्ध्या वचनेंकरून) सांगतो.

**मूलार्थ**– भक्षण करून तेथेंच बसलीं तर त्या त्या स्थळीं सांगितलेल्या दंडाच्या दुप्पट दंड.

**टीकार्थ**– ४ जर पशु (गुरें) दुसऱ्याच्या शेतांतलें धान्य खाऊन कोणी न हाकितां तेथेंच बसतात तर वर (१ ल्या अंकांत) सांगितलेल्या त्या त्या दंडाच्या दुप्पट दंड जाणावा. आणि वासरांसुद्धां धान्य खाऊन तेथेंच बसतील तर पूर्वी (१ ल्या अंकांत) सांगितलेल्या त्या त्या दंडाच्या चौपट दंड करावा.

गुरें धान्य खाऊन तेथेंच बसल्यास दुप्पट दंड.

स्मृति- ( धान्य खाऊन तशींच ) बसलीं तर दुप्पट, आणि वासरांसहित तशीं सलीं तर चौपट दंड.

क्षेत्रान्तरे पश्वन्तरे चातिदेशमाह ॥

**सममेषां विवीतेऽपि खरोष्ट्रं महिषीसमम् ॥ १६० ॥**

विवीतः प्रचुरतृणकाष्ठो रक्ष्यमाणः परिगृहीतो भूमदेशः तदुपघातेपीतरक्षेत्र दण्डेन समं दण्डमेषां महिष्यादीनां विद्यात् । खराश्च उष्ट्राश्च खरोष्ट्रं तन्महिषीसमम् । महिषी यत्र तादृशेन दण्डेन दण्ड्यते तत्र तादृशेनैव दण्डेन खरोष्ट्रमपि प्रत्येकं दण्डनीयम् । सस्योपरोधकत्वेन खरोष्ट्रयोः प्रत्येकं महिषीतुल्यत्वाद्दण्डस्य चापराधानुसारित्वात्खरोष्ट्रमिति समाहारो न विवक्षितः ॥ १६० ॥

दुसऱ्या क्षेत्राविषयीं व दुसऱ्या पशूंविषयीं ( पूर्वोक्त दंडाचा ) अतिदेश ( अर्ध्या वचनेंकरून ) सांगतो.

**मूलार्थ**—विवीताचाहि नाश केला असतां क्षेत्राच्या नाशाप्रमाणेंच ह्मशी इत्यादिकांस दंड करावा. आणि गर्दभ व उंट ह्यांसहि ह्मशीप्रमाणेंच दंड जाणावा.

विवीत नाशाविषयींही क्षेत्रनाशाप्रमाणेंच दंड व गाढव व उंट ह्यांस ह्मशीप्रमाणें दंड.

**टीकार्थ**— १ विवीत ह्मणजे ज्यामध्यें पुष्कळ तृण, काष्ठें आहेत असा घेऊन राखलेला भूप्रदेश, त्याचा नाश केला असतांहि इतर क्षेत्राच्या नाशाविषयीं जो दंड सांगितला आहे, तोच ह्मशी वगैरे पशूंस योजावा. आणि गाढव, उंट ह्यांसहि ह्मशीसमानच, ह्मणजे ह्मशीला ज्या अपराधीं जो दंड केला जातो तोच दंड गाढव व उंट ह्या प्रत्येकास त्या त्या अपराधीं करावा. कारण धान्यनाशाविषयीं गाढवें व उंटें हीं ह्मशींप्रमाणेंच आहेत, व दंडहि अपराधानुसारच आहे. १६०

---

परस्य विनाशे गोस्वामिनो दण्ड उक्तः इदानीं क्षेत्रस्वामिने फलमप्यसौ दापनीय इत्याह ॥

**यावत्सस्यं विनश्येत्तु तावत्स्यात्क्षेत्रिणः फलम् ॥**
**गोपस्ताड्यस्तु गोमी तु पूर्वोक्तं दण्डमर्हति ॥ १६१ ॥**

सस्यग्रहणं क्षेत्रोपचयोपलक्षणार्थम् । यस्मिन्क्षेत्रे यावत्पलालधान्यादिकं गवादिभिर्विनाशितं तावत्क्षेत्रफलमेतावति क्षेत्रे एतावद्भवतीति सामन्तैः परिकल्पितं तत्क्षेत्रस्वामिने गोमी दापनीयः । गोपस्तु ताडनीय एव न फलं दापनीयः । गोपस्य ताडनं पूर्वोक्तधनदण्डसहितमेव पालदोषेण सस्यनाशे द्रष्टव्यम् ॥ या नष्टा पालदोषेण गौस्तु सस्यानि नाशयेत् । न तत्र गोमिनां दण्डः पालस्तं दण्डम-

ईतीति वचनात् ॥ गोमी पुनः स्वापराधेन सस्यनाशे पूर्वोक्तं दण्डमेवार्हति न ताडनम् । फलदानं पुनः सर्वत्र गोस्वामिन एव । तत्फलपुष्टमहिष्यादिक्षीरेणोपभोगद्वारेण तत्क्षेत्रफलभागित्वात् । गवादिभक्षितावशिष्टं पलालादिकं गोस्वामिनैव गृहीतव्यम् । मध्यस्थकल्पितमूल्यदानेन क्रीतप्रायत्वात् ॥ अत एव नारदः ॥ गोभिस्तु भक्षितं सस्यं यो नरः प्रतियाचते । सामन्तानुमतं देयं धान्यं यत्तत्र वापितम् ॥ पलालं गोमिनां देयं धान्यं वै कर्षकस्य त्विति ॥ १६१ ॥

शाखा २ री.

दुसऱ्याच्या क्षेत्रांतील धान्यादिकांच्या नाशाविषयीं पशूंच्या धन्याला दंड सांगितला. आतां शेतकऱ्याचें नुकसान देखील त्याजकडून देवविण्याविषयीं सांगतो.

**मूलार्थ**– जितकें धान्य नाशिलें असेल तितकें क्षेत्रस्वामीचें नुकसान भरून देववावें. गुराख्याला ताडन करावें हाच दंड. आणि पशुस्वामी तर पूर्वीं सांगितलेल्या दंडास योग्य होतो.

**टीकार्थ**– १ एथें धान्यशब्देंकरून जें क्षेत्रांत उत्पन्न होतें तें सर्व. ज्या क्षेत्रांतलें जितकें धान्य व वैरण वगैरे, गुरांनीं [१]नाशिलें असेल तितकें उत्पन्न " इतक्या क्षेत्रांत इतकें उत्पन्न होत असतें असें सामंतांनीं कूप्त केलेलें " क्षेत्राचे मालकाला पशुस्वामीकडून देववावें. गुराख्याला तर ताडन मात्र करावें. त्याजकडून उत्पन्न देऊं नये. गुराख्याच्या अन्यायानें धान्यादिकांचा नाश झाला असल्यास ताडन करून पूर्वीं ( १ ल्या शाखेंत ) सांगितलेला दंडही करावा.

मध्यस्थांनीं कूप्त केलेलें मालकानें नुकसान भरून देववावें.

**स्मृति**– जर गुराख्याच्या अन्यायामुळें चुकलेली गाय ( दुसऱ्याचें ) शेत खाते तर तिच्याबद्दल पशुस्वामीला दंड नाहीं; गुराखीच त्या दंडास योग्य होतो.

२ पशुस्वामीच्या अन्यायानें धान्यनाश झाला असल्यास पशुस्वामी पूर्वीं ( १ ल्या शाखेंत ) सांगितलेल्या दंडास मात्र योग्य होतो, ताडन नाहीं. पशुस्वामीचा, किंवा गुराख्याचा, कोणाचाहि अन्याय असला तरीं नुकसान भरून देणें पशुस्वामीकडेसच. कारण, त्या क्षेत्रांतलें फलादिक खाऊन पुष्ट झालेल्या गुरांच्या दुधाचा उपभोग धनी घेतो. अतएव तद्द्वारा क्षेत्रांतील उत्पन्नाचा उपभोगहि पशुस्वामीकडे येतो. ह्यास्तव गुरांनीं खाऊन राहिलेलें **पलालही** पशुस्वामीनें घ्यावें; कारण, मध्यस्थांनीं सांगितलेलें मोल दिल्यामुळें तें उत्पन्न विकत घेतल्यासारिखेंच आहे.

कोणाचाही अन्याय असला तरी पशुस्वामीनेंच नुकसान भरून दिलें पाहिजे.

**नारदहि**– **क्षेत्रांत** पेरलेलें धान्य गुरांनीं खाल्लेलें **क्षेत्री** परत मागतो तर तें **सामंत** सांगतील तितकें धान्यादिक ( किंवा त्याचें मोल ) क्षेत्रीला परत द्यावें. **पलाल** पशुस्वामीनें घ्यावें, आणि धान्य तर क्षेत्रीनें घ्यावें. १६१

---

१ एथें गायशब्द पशुमात्राचें उपलक्षण.

क्षेत्रविशेषे अपवादमाह ॥

**पथि ग्रामविवीतान्ते क्षेत्रे दोषो न विद्यते ॥**
**अकामतः कामचारे चौरवद्दण्डमर्हति ॥ १६२ ॥**

पथि ग्रामसमीपवर्तिनि क्षेत्रे ग्रामविवीतसमीपवर्तिनि च क्षेत्रे अकामतो ग भक्षिते गोपगोमिनोर्द्वयोरप्यदोषः । दोषाभावप्रतिपादनं दण्डाभावार्थं विनष्ट मूल्यदानप्रतिषेधार्थं च । कामचारे कामतश्चारणे चौरवत् चौरस्य यादृशो द स्तादृशं दण्डमर्हति । एतच्चानावृतक्षेत्रविषयम् ॥ यत्रापरिवृतं धान्यं विहिंस्युः वो यदि । न तत्र प्रणयेद्दण्डं नृपतिः पशुरक्षिणामिति दण्डाभावस्यानावृतक्षेत्र षयत्वेन मनुनोक्तत्वात् । आवृते पुनर्मार्गादिक्षेत्रेपि दोषोऽस्त्येव वृतिकरणं च नैवोक्तम् ॥ वृतिं च तत्र कुर्वीत यामुष्ट्रो नावलोकयेत् । छिद्रं निवारयेत्सर्वं श्व करमुखानुगमिति ॥ १६२ ॥

शाखा ३ री.

* कांहीं क्षेत्रांविषयीं अपवाद सांगतो.

**मूलार्थ**– मार्ग, गांव, किंवा विवीत ह्याजवळचे क्षेत्रांत न कळतां गुरें चरलीं अस दोष नाहीं, बुद्ध्या चारिलीं असतां चोराप्रमाणें दंड.

**टीकार्थ**–१ मार्गाजवळचें क्षेत्र, गांवाजवळचें क्षेत्र आणि विवीताजवळचें क्षेत्र, कळतां गुरांनीं खाल्लें असतां गुराख्याकडे व पशुस्वामीकडे दो नाहीं.

वाटेजवळचे वगैरे शेताच्या नुकसानीविषयीं.

एथें दोष नाहीं असें जें सांगितलें तें दंड न होण्यासाठीं व गुरांनीं खाल्लेल्या फलादि कांचें मोल न देण्यासाठीं.

(वर सांगितलेल्या क्षेत्रांत) बुद्ध्या गुरें चारलीं असतां चोराप्रमाणें दंड ह्मणजे चो रास जो दंड तोच त्याला दंड.

२ हा (१ ल्या अंकांतला) प्रकार ज्या क्षेत्राला कुपण नाहीं त्याविषयीं जाणावा.

कुपण न केलेल्या शेतांत गुरें चरलीं असतां दंड नाहीं.

**मनु**– क्षेत्र उघडें असल्यामुळें जर गुरें त्या क्षेत्राची नासाडी करितील तर त्याबद्दल राजानें गुराख्यास दंड करूं नये.

असा उघड्या शेताविषयीं निषेध सांगितला आहे.

३ कुंपण केलेलें अशा मार्ग इत्यादिकाजवळच्या क्षेत्रांत गुरें चरलीं असतां दंड आहेच.

कुंपण घालण्याचा प्रकारही तोच सांगतो.

**मनु**– जेणेंकरून उंटाच्या दृष्टीस तें क्षेत्र पडणार नाहीं असें कुंपण करावें, आणि कुतरीं, डुकरें ह्यांचीं तोंडें शिरकतील अशीं छिद्रें बुजवावीं. १६२

कुंपण करण्याचा प्रकार.

पशुविशेषेऽपि दण्डाभावमाह ॥

**महोक्षोत्सृष्टपशवः सूतिकागन्तुकादयः ॥**
**पालो येषां च ते मोच्या दैवराजपरिप्लुताः ॥ १६३ ॥**

महांश्चासावुक्षा च महोक्षो वृषः सेक्ता । उत्सृष्टपशवः वृषोत्सर्गादिविधानेन देवतोद्देशेन त्यक्ताः । सूतिका प्रसूता अनिर्दशाहा । आगन्तुकः स्वयूथात्परिभ्रष्टो देशान्तरादागतः । एते मोच्याः । परसस्यभक्षणेऽपि न दण्ड्याः । येषां च पालो न विद्यते तेऽपि दैवराजपरिप्लुताः दैवराजोपहताः सस्यनाशकारिणो न दण्ड्याः । आदिग्रहणाद्धस्त्यश्वादयो गृह्यन्ते । ते चोशनसोक्ताः ॥ अदण्ड्या हस्तिनो ह्यश्वाः प्रजापाला हि ते स्मृताः॥ अदण्ड्यौ काणकुब्जौ च ये शश्वत्कृतलक्षणाः॥ अदण्ड्यागन्तुकी गौश्च सूतिका वाभिसारिणी । अदण्ड्याश्चोत्सवे गावः श्राद्धकाले तथैव चेति । अत्रोत्सृष्टपशूनामस्वामिकत्वेन दण्ड्यत्वासंभवात् दृष्टान्तार्थमुपादानम् । यथोत्सृष्टपशवो न दण्ड्या एवं महोक्षादय इति ॥ १६३ ॥

शाखा ४ थी.

कांहीं पशूंविषयीं दंडाचा निषेध सांगतो.

**मूलार्थ**— पोळ, उत्सृष्टपशु, प्रसूत झालेली व चुकलेला पशु, इत्यादिक, हे सोडून द्यावे व ज्यांस रक्षक आहे तेहि राजदैविक उपद्रवानें पीडित झालेले आहेत तर सोडून द्यावे.

**टीकार्थ**—१ पोळ ह्मणजे वळु, उत्सृष्टपशु म्हणजे वृषोत्सर्गविधानेंकरून किंवा देवतोद्देशेंकरून सोडिलेले बैल, व्यालेली सोयरतुली (गाय वगैरे), आपल्या कळपांतून चुकलेला पशु, हे सोडून द्यावे; ह्मणजे दुसऱ्याचें शेत खाल्लें असतां दंड करूं नये.

पोळ वृषोत्सर्ग वगैरे पशूंनी शेत खाल्ले असता दंड नाही.

२ ज्यांस रक्षक आहे तेहि जर दैवराजिक उपद्रवानें पीडित झाल्यामुळें दुसऱ्याचे धान्यादिकाचा नाश करितात, तर दंड करूं नये. व (मूळांतील) इत्यादिक शब्देंकरून हत्ती, घोडे वगैरे घ्यावे.

राजदैविक उपद्रवाने पीडित झालेल्या गुरास दंड नाही.

**उशना**—३ हत्ती, घोडे, हे दंडास योग्य नाहींत. कारण, ते प्रजापाल ह्मटले आहेत. तसेच काणा, पांगळा, व वारंवार शेतांत शिरतात ह्मणून ताडन वगैरे करून ज्यांस कांहीं खूण केलेली असते तेहि दंडास योग्य नव्हत. तशीच कळपांतून चुकलेली, किंवा सोयरतुली, किंवा फळावयाकरितां सोडलेली गाय दंड्य नाहीं. तसेंच लग्नादिक उत्सवकाळीं व श्राद्धकाळीं पशूंस दंड नाहीं.

हत्ती घोडे व फळावयाकरितां सोडलेली गाय इत्यादिकास दंड नाही.

एथें (१ल्या अंकांत) उत्सृष्टपशूंचा निर्देश केला तो दृष्टांतामाठीं ह्मणजे जसा उत्सृष्टपशूंस दंड नाहीं, तसाच पोळ इत्यादिकांसहि नाहीं. १६३

गोस्वामिन उक्तमिदानीं गोपं प्रत्युपदिश्यते ॥

**यथार्पितान् पशून्गोपः सायं प्रत्यर्पयेत्तथा ।**
**प्रमादमृतनष्टांश्च प्रदाप्यः कृतवेतनः ॥ १६४ ॥**

गोस्वामिना प्रातःकाले यथा गणयित्वा यथा समर्पिताः पशवस्तथैव सा काले गोपो गोस्वामिने पशून् विगणय्य प्रत्यर्पयेत् । प्रमादेन स्वापराधेन मृता ष्टांश्च पशून् कृतवेतनः कल्पितवेतनो गोपः स्वामिने दाप्यः ॥ वेतनकल्पना नारदेनोक्ता ॥ गवां शताद्वत्सतरी धेनुः स्याद्विशताद्भृतिः । प्रतिसंवत्सरं ग सन्दोहश्चाष्टमेऽहनीति । प्रमादनाशश्च मनुना स्पष्टीकृतः ॥ नष्टं जग्धं च कृमि श्वहतं विषमे मृतम् । हीनं पुरुषकारेण प्रदद्यात्पाल एव तिति । प्रसह्य चौरैरप तान् न दाप्यः । यथाह मनुः ॥ विक्रम्य तु हृतं चौरैर्न पालो दातुमर्हति । य देशे च काले च स्वामिनः स्वस्य शंसतीति । दैवराजमृतानां पुनः कर्णादि प्रद नीयम् ॥ कर्णौ चर्म च वालांश्च बस्तिं स्नायूनि रोचनाम् । पशुस्वामिषु दद्यात्तु मृ ष्वङ्गानि दर्शयन्निति मनुस्मरणात् ॥ १६४ ॥

शाखा ५ वी.

पशुस्वामीविषयीं सांगितलें. आतां गुराख्याविषयीं सांगतो.

**मूलार्थ**— वेतनदार गुराख्यानें धन्यापासून जशीं गुरें आणिलीं असतील तशीं सा काळीं परत करावीं. हयगईमुळें मेलेलीं किंवा हरवलेलीं धन्याचीं भरून द्यावीं.

**टीकार्थ**—१ धन्यानें सकाळीं जशीं मोजून गुरें हवालीं केलीं असतील तशींच संध्या काळीं वेतनदार गुराख्यानें धन्याला मोजून परत करावीं. व गुराख्याच्या हयगईमुळें मेलीं किंवा हरवलीं, तर गुराख्यानें धन्याचीं भरून द्यावीं.

हयगईनें नष्ट झालेलीं गुरें गुराख्यानें भरून द्यावीं.

वेतन देण्याची रीति नारद सांगतो.

**नारद**—२ शंभर गाईंसाठीं दरवर्षास एक कालवड वेतन, दोनशें गाईंसाठीं एक दुभतं धेनु वेतन द्यावें. आणि दर आठव्या दिवशीं (सर्व) गुरांचें दू द्यावें.

गुराख्याचें वेतन.

गुराख्याच्या हयगईमुळें गुरांच्या नाशाचा प्रकार मनु सांगतो.

**मनु**—३ हरवलेलें, किंवा विंचू इत्यादिकानें खाल्लेलें जनावर, अथवा कुत्र्यानें मारलेलें, किंवा अपघातानें मेलेलें, गुराख्यानें भरून द्यावें. परंतु गुराख्याच्या हयगईमुळें घडलें असेल तर. चोरांनीं जबरीनें हरण केलें असल्यास गुराख्याकडून देववूं नये.

अन्यायानें नाश पावलेलीं गुरें गुराख्यानें भरून द्यावीं.

---

१ कुतरा शब्देंकरून वाघ, लांडगा इत्यादिकही समजावे.

**मनु**— चोरांनीं गलबला करून हरण केलेलें गुराख्याकडून देववूं नये. परंतु जर गुराखी त्याच वेळेस गांवाला किंवा आपल्या धन्याला निवेदन करितो तर.

४ दैविक किंवा राजिक उपद्रवानें मेलेल्या गुरांचें कर्णादिक अंग (धन्याला) दाखवावें.

मेलेल्या गुरांचा मुद्दा धन्याला दाखवावा.

**मनु**— (राजदैविक उपद्रवानें) गुरें मेलीं असतां कान, कातडें, पुच्छ, वसा, स्नायु, रोचन, असे त्याचे अवयव आणून गुरांच्या धन्याला द्यावे व इतर अवयवहि दाखवावे १६४.

---

**पालदोषविनाशे तु पाले दण्डो विधीयते।**
**अर्द्धत्रयोदशपणः स्वामिनो द्रव्यमेव च ॥ १६५ ॥**

किंच पालदोषेण पशुविनाशे अर्द्धाधिकत्रयोदशपणं दण्डं पालो दाप्यः। स्वामिनश्च द्रव्यं विनष्टपशुमूल्यं मध्यस्थकल्पितं। दण्डपरिमाणार्थः श्लोकोन्यत्पूर्वोक्तमेव ॥ १६५ ॥

**मूलार्थ**— गुराख्याचे अपराधानें गुरें नाश पावलीं तर गुराख्याला साडेतेरा पण दंड करून धन्याचें नुकसान भरून देववावें.

**टीकार्थ**—५ गुराख्याच्या अपराधानें गुरें नाश पावलीं असतां गुराख्याला १३ ॥ पण दंड करून नाश पावलेल्या गुरांचें मोल मध्यस्थानें सांगितल्याप्रमाणें धन्याला देववावें.

गुराख्याच्या अन्यायानें नुकसान झाल्यास दंड करून नुकसान भरून देववावें.

गुराख्याला दंड किती असावा हें समजण्यासाठीं हें वचन. इतर प्रकार पूर्वीं (३ ऱ्या अंकांत) सांगितलाच आहे १६५.

---

गोप्रसङ्गात् गोप्रचारमाह ॥

**ग्रामेच्छया गोप्रचारो भूमिराजवशेन वा।**
**द्विजस्तृणैधःपुष्पाणि सर्वतः सर्वदाहरेत् ॥ १६६ ॥**

ग्रामेच्छया ग्राम्यजनेच्छया भूम्यल्पत्वमहत्त्वापेक्षया राजेच्छया वा गोप्रचारः कर्तव्यः। गवादीनां प्रचारणार्थं कियानपि भूभागोऽकृष्टः परिकल्पनीय इत्यर्थः। द्विजस्तृणेन्धनाद्यभावे गवाग्निदेवतार्थं तृणकाष्ठकुसुमानि सर्वतः स्ववदनिवारित आहरेत्। फलानि त्वपरिवृतादेव। गोग्न्यर्थं तृणमेधांसि वीरुद्वनस्पतीनां च पुष्पा-

---

१ इतर अवयव म्हणजे ज्या अवयवावर व्यावर्तक चिन्हें असतील ते ते.

णि स्ववदाददीत फलानि चापरिवृतानामिति गौतमस्मरणात् । एतच्च परि
विषयम् । अपरिगृहीते द्विजव्यतिरिक्तस्यापि परिग्रहादेव स्वत्वसिद्धेः । यथ
वोक्तम् । स्वामी रिक्थक्रयसंविभागपरिग्रहाधिगमेष्विति । यत्पुनरुक्तम् ॥ तृ
यदि वा काष्ठं पुष्पं वा यदि वा फलम् । अनापृच्छन् हि गृह्णानो हस्तच्छेद
तीति तद्द्विजव्यतिरिक्तविषयमनापद्विषयं वा । गवादिव्यतिरिक्तविषयं वेति॥

शाखा ६ वी.

गुरांच्या प्रसंगानें गुरें चारण्यासाठीं कांहीं रान राखावें
त्याचा प्रकार सांगतो.

**मूलार्थ**— गांवाच्या इच्छेप्रमाणें, भूमींच्या तारतम्यानें, किंवा राजाच्या इच्छेप्र
गुरें चारण्यासाठीं रान राखावें, द्विजानें तृण, काष्ठें, फुलें, हीं सर्व स्थलापासून स
घ्यावीं.

**टीकार्थ**—१ गांवकऱ्यांच्या इच्छेप्रमाणें, अथवा भूमीच्या अल्पत्वमहत्त्वाच्या तारतम्या
नें, किंवा राजाच्या इच्छेप्रमाणें, कांहीं एक भूभाग
चारण्यासाठीं नांगरल्यावांचून तसाच राखावा.

दरगांवास गुरें चारण्यासाठीं एक रान राखावें.

२ द्विजानें तृणादिक नसल्यास गाई, अग्नि, देवता, ह्यांसाठीं तृण, काष्ठें, फुलें,
पाहिजे तेथून सत्तेनें आणावीं, निवारण केल्यास घेऊं नये
फळें घेणें तर ज्याला कुंपण नाहीं अशा क्षेत्रादिकांतून घ्यावीं

ब्राह्मणानें तृणकाष्ठादिक पाहिजे तेथून घ्यावें.

**गौतम**— गाई, अग्नि, ह्यांसाठीं तृण, काष्ठें, वनस्पतींचीं फुलें पाहिजे तेथून आणावीं
फळें तर उघडच्या ( क्षेत्रादिका ) पासून मात्र आणावीं.

३ हा प्रकार ( २ रा अंक ) ज्याला स्वामी आहे अशा क्षेत्राविषयीं. अस्वामिक
क्षेत्राविषयीं तर ब्राह्मणाखेरीज इतरांचीही परिग्रहानेंच सत्ता उत्पन्न होते असें
त्यानें (गौतमानें) च (दायविभाग प्रकरणीं १ ल्या शाखेच्या १८ व्या अंकांत ) सांगितलें
आहे. " रिक्थ, क्रय, संविभाग, परिग्रह, आणि अधिगम, इतक्या निमित्तांवरून
मालक समजला जातो. "

**स्मृति**—४ तृण, काष्ठें, फुलें अथवा फळें, हीं कोणी न पुसतांना घेतो तर तो हस्तच्छे-
दास योग्य होतो.

असें जें सांगितलें तेंहि ब्राह्मणाखेरीज इतरांविषयीं अथवा चालत्या काळावि-
षयीं, किंवा गाई, अग्नि इत्यादिकांवांचून इतरांविषयीं. १६६

---

१ एथें द्विजशब्देंकरून ब्राह्मण घ्यावे.

## अस्वामिविक्रय प्रकरण ११ वें.

इदमपरं गवादीनां स्थानासनसौकर्यार्थमुच्यते ॥

**धनुःशतं परीणाहो ग्रामे क्षेत्रान्तरं भवेत् ।**
**द्वे शते खर्वटस्य स्यान्नगरस्य चतुःशतम् ॥ १६७ ॥**

ग्रामक्षेत्रयोरन्तरं धनुःशतपरिमितं परीणाहः। सर्वतो दिशं अनुप्तसस्यं कार्यम् । खर्वटस्य प्रचुरकण्टकसन्तानस्य ग्रामस्य द्वे शते परीणाहः । नगरस्य बहुजनसंकीर्णस्य धनुषां चतुःशतपरिमितमन्तरं कार्यम् ॥ इति स्वामिपालविवादप्रकरणम् ॥१६७॥

गाई इत्यादिकांस बसण्याउठण्याचें सुगम पडावें म्हणून आणखीं एक स्थळ सांगतो.

मूलार्थ– गांव व क्षेत्रें ह्यांच्या मध्यें शंभर धनुष्यें रान राखावें. खर्वटाला दोनशें धनुष्यें आणि नगराला चारशें धनुष्यें.

टीकार्थ– १ गांव क्षेत्रें ह्यांच्यामध्यें शंभर धनुष्यांइतकें गांवाच्या सभोंवतें पेरणी केल्यावांचून तसेंच रान राखावें, आणि खर्वट ह्मणजे ज्या गांवाला कांटेझाडें, निबारा पुष्कळ आहे तो; अशा गांवाला दोनशें धनुष्यें रान राखावें, आणि शहरांत वस्ती फार ह्मणून चारशें धनुष्यें रान राखावें. १६७.

गुरें चारण्यासाठीं गांवच्या सुमारानें रान राखण्याचा प्रकार.

---

संप्रत्यस्वामिविक्रयाख्यं व्यवहारपदमुपक्रमते तस्य च लक्षणं नारदेनोक्तम् ॥ निक्षिप्तं वा परद्रव्यं नष्टं लब्ध्वापहृत्य वा । विक्रीयते समक्षं यत् स ज्ञेयोऽस्वामिविक्रय इति ॥

तत्र किमित्याह ॥

**स्वं लभेतान्यविक्रीतं क्रेतुर्दोषोऽप्रकाशिते ।**
**हीनाद्रहो हीनमूल्ये वेलाहीने च तस्करः ॥ १६८ ॥**

स्वमात्मसंबन्धि द्रव्यं अन्यविक्रीतमस्वामिविक्रीतं यदि पश्यति तदा लभेत गृह्णीयात् । अस्वामिविक्रयस्य स्वत्वहेतुत्वाभावात् । विक्रीतग्रहणं दत्ताहितयोरुपलक्षणार्थम् । अस्वामिक्रीतत्वेन तुल्यत्वात् ॥ अत एवोक्तम् ॥ अस्वामिविक्रयं दानमाधिं च विनिवर्तयेदिति । क्रेतुः पुनरप्रकाशिते गोपिते क्रय्ये दोषो भवति । तथा हीनाद्द्रव्यागमोपायहीनाद्रहसि चैकान्ते संभाव्य द्रव्यादपि हीनमूल्येनाल्पतरेण च मूल्येन क्रये वेलाहीने वेलया हीनो वेलाहीनः क्रयो राज्यादौ कृतस्तत्र च क्रेता तस्करो भवति । तस्करवत् दण्डभाग्भवतीत्यर्थः । यथोक्तम् ॥ द्रव्यमस्वामिवि-

---

१ चार हात आणि अकरा अंगुळांचें एक धनुष्य समजावें.

क्रीतं प्राप्य स्वामी तदाप्नुयात् । प्रकाशक्रयतः शुद्धिः क्रेतुः स्तेयं रहः क्रया। ति ॥ १६८ ॥

शाखा १ ली.

आतां अस्वामिविक्रयसंज्ञक व्यवहारप्रकरणाचें निरूपण करितो.

त्याचें स्वरूप नारद सांगतो.

**नारद**–१ दुसऱ्याची ठेव, किंवा हरवलेलें सांपडलें, अथवा चोरलेलें द्रव्य, मा‹ काच्या परोक्ष ( व आज्ञेशिवाय ) जें विकलें जातें, तो ऱ स्वामिविक्रय व्यवहार ह्मटला आहे.

अस्वामि विक्रयाचें स्वरूप.

त्या द्रव्याविषयीं पुढें काय करावें तें सांगतो.

**मूलार्थ**– तिऱ्हाइतानें विकलेलें जें स्वीय द्रव्य तें घ्यावें. गुप्तांत खरेदी केल्यास खरे‹ करणारा अपराधी होतो, तसेंच अयोग्य पुरुषापासून व एकांतीं, व कमी दरानें, व अकाळ् खरेदी करणारा चोर होतो.

**टीकार्थ**–२ ( आज्ञेशिवाय ) तिऱ्हाइतानें विकलेलें असें आपलें द्रव्य जर पाहते तर तें घ्यावें. कारण, त्याजवर विकणाराची सत्ता नाहीं ह्मणून त्यानें केलेला जो विक्रय तो विक्रय नव्हे.

आपल्यास न कळतां विकलेलें द्रव्य मालकास सांपडलें घ्यावें.

ह्याप्रमाणेंच गहाण ठेवलें किंवा दान दिलें असल्यास त्याविषयीं जाणावें. कारण, मालकाच्या परोक्ष केल्यामुळें विवाद एकसारिखाच आहे.

**कात्यायन**– विकरी, दान, गहाण हे व्यवहार तिऱ्हाइतानें केलेले उलटतात.

३. खरीद करणारानें गुप्तपणीं खरेदी केल्यास तो अपराधी ठरतो. तसेंच त्या वस्तूचा आगम दाखविण्याविषयीं असमर्थ म्हणजे ती वस्तु ज्याच्या-पाशीं येण्याचा संभव नाहीं अशा अयोग्य मनुष्यापासून किंवा एकांतीं, किंवा बाजारकिमतीपेक्षां फार अल्प मोलानें, अथवा अकाळीं म्हणजे रात्रीं, खरेदी केल्यास खरेदी करणारा चोराप्रमाणें दंड्य होतो.

एकांतीं कमी दरानें किंवा अकाळीं विकणारा किंवा खरेदी करणारा दोषी ठरतो.

**स्मृति**– मालकाच्या परोक्ष विकलेलें द्रव्य दृष्टीस पडलेलें, मालकानें घ्यावें. प्रसिद्धपणें विक्रय झाला असतां दोष नाहीं. एकांतीं विक्रय करणारा चोर १६८.

---

स्वाम्यभियुक्तेन क्रेत्रा किं कर्त्तव्यमित्यत आह ॥

**नष्टापहृतमासाद्य हर्त्तारं ग्राहयेन्नरम् ।**

**देशकालातिपत्तौ च गृहीत्वा स्वयमर्पयेत् ॥ १६९ ॥**

नष्टमपहृतं वान्यदीयं क्रयादिना प्राप्य हर्त्तारं विक्रेतारं नरं ग्राहयेत् । चौरोद्धरणकादिभिः । आत्मविशुद्ध्यर्थं राजदण्डाप्राप्त्यर्थं च ॥ अथाविदितदेशान्तरं

---

१ तिऱ्हाइतानें म्हणजे मालक व त्याचा आज्ञांकित ह्याशिवाय दुसऱ्यानें.

गतः कालान्तरे वा विपन्नस्तदा मूलसमाहरणाशक्तेर्विक्रेतारमदर्शयित्वैव स्वयमेव तद्धनं नाष्टिकस्य समर्पयेत् । तावतैवासौ शुद्धो भवतीति श्रीकराचार्येण व्याख्यातं तदिदमनुपपन्नम् ॥ विक्रेतुर्दर्शनाच्छुद्धिरित्यनेन पौनरुक्त्यप्रसङ्गादतोऽन्यथा व्याख्यायते । नष्टापहृतमिति नाष्टिकं प्रत्ययमुपदेशः । नष्टमपहृतं वात्मीयद्रव्यमासाद्य क्रेतृहस्तस्थं ज्ञात्वा तं हर्तारं क्रेतारं स्थानपालादिभिर्ग्राहयेत् । देशकालातिपत्तौ देशकालातिक्रमे स्थानपालाद्यसंनिधाने तद्विज्ञापनकालात् प्राक् पलायनाशङ्कायां स्वयमेव गृहीत्वा तेभ्यः समर्पयेत् ॥ १६९ ॥

## शाखा २ री.

खरीद करणारास मालकानें धरल्यानंतर त्यानें काय करावें तें सांगतो.

**मूलार्थ**– हरवलेलें किंवा चोरीस गेलेलें हस्तगत करून हरण करणाऱ्या मनुष्यास धरवावें. काल देश ह्यांची अडचण पडल्यास स्वतांच धरून द्यावा.

**टीकार्थ**–१ हरवलेल्या किंवा चोरीस गेलेल्या द्रव्याची खरेदी ( गहाण ) इत्यादिक व्यवहार करणारानें आपल्या वरचा आळ जावा, व राजदंड न व्हावा, एतदर्थ विकणारास ( किंवा गहाण वगैरे ठेवणारास ) चोर धरणारांकडून धरवावें.

अस्वामि द्रव्याच्या विकणारास धरून द्यावें.

जर तो अविज्ञातदेशीं गेला किंवा बहुत काळेंकरून मेला सबब मूल दाखविण्याविषयीं असमर्थ, तर विकणाराची उजूर न धरितां खरेदी करणारानेंच तें धन नाष्टिकाचें परत द्यावें. ह्मणजे तितक्यानेंच तो निर्दोष होतो.

जर तो सांपडत नाहीं तर खरीद करणारानें नाष्टिकाचें परत द्यावें.

२. अशी श्रीकराचार्यानें व्याख्या केली आहे, परंतु ती युक्त नाहीं. कारण, हा अर्थ पुढें ( ३ ऱ्या अंकाचे मूळ वचनांत ) सांगितल्यामुळें पुनरुक्तदोष मात्र येतो. ह्यास्तव प्रकारांतरेंकरून त्याची व्याख्या करितों. ती अशीः–

हें ( १ ल्या अंकाचें मूळ वचन ) नाष्टिकाविषयीं सांगितलें. ह्मणजे असें–हरवलेलें किंवा चोरीस गेलेलें आपलें द्रव्य खरीद करणाराचे हातांत पाहून त्याला नाष्टिकानें चौकीदार वगैरे ह्यांकडून धरवावें. जर कदाचित् देश काल ह्यांची अडचण पडत आहे व चौकीदार वगैरेहि जवळ नाहींत सबब त्यांस सांगण्याचे पूर्वींच हा पळून जाईल अशी शंका आहे तर, नाष्टिकानें आपणच त्याला धरून चौकीदारांचे हवालीं करावें १६९.

---

१ सुबोधिनी. ह्या वचनाचा अर्थ असा सांगितला आहे कीं हरवलेलें किंवा चोरीस गेलेलें द्रव्य ज्या कोणी तिऱ्हाइतापासून क्रयप्रतिग्रह इत्यादिकेंकरून मिळालें असतां तोही आणखी दुसऱ्यास विकतो, तेव्हां विकत घेणारानें मधल्याला धरावें. २ वस्तु विकणारा.

ग्राहिते हर्तरि किं कर्तव्यमित्यत आह ।

**विक्रेतुर्दर्शनाच्छुद्धिः स्वामी द्रव्यं नृपो दमम् ।**
**क्रेता मूल्यमवाप्नोति तस्माद्यस्तस्य विक्रयी ॥ १७० ॥**

यद्यसौ गृहीतः क्रेता न मयेदमपहृतमन्यसकाशात्क्रीतमिति वक्ति तदा तस्य क्रेतुर्विक्रेतुर्दर्शनमात्रेण शुद्धिर्भवति । न पुनरसावभियोज्यः । किं तु तत्प्रदर्शितेन विक्रेत्रा सह नाष्टिकस्य विवादः । यथाह बृहस्पतिः ॥ मूले समाहृते क्रेता नाभियोज्यः कथंचन । मूलेन सह वादस्तु नाष्टिकस्य विधीयत इति ॥ तस्मिन् विवादे यद्यस्वामिविक्रयनिश्चयो भवति तदा तस्य नष्टापहृतस्य गवादिद्रव्यस्य यो विक्रयी विक्रेता तस्य सकाशात्स्वामी नाष्टिकः स्वीयं द्रव्यमवाप्नोति ॥ नृपश्चापराधानुरूपं दण्डं क्रेता च मूल्यमवाप्नोति ॥ अथासौ देशान्तरगतस्तदा योजनसंख्यया नयनार्थं कालो देयः । प्रकाशं वा क्रयं कुर्यान्मूलं वापि समर्पयेत् । मूलानयनकालश्च देयस्तत्राध्वसंख्ययेति स्मरणात् ॥ अथाविज्ञातदेशतया मूलमाहर्तुं न शक्नोति तदा क्रयं शोधयित्वैव शुद्धो भवति। असमाहार्यमूलस्तु क्रयमेव विशोधयेदिति वचनात् ॥ यदा पुनः साक्ष्यादिभिर्दिव्येन वा क्रयं न शोधयति मूलं च न प्रदर्शयति तदा स एव दण्डभाग्भवतीति ॥ अनुपस्थापयन्मूलं क्रयं वाप्यविशोधयन् । यथाभियोगं धनिने धनं दाप्यो दमं च स इति मनुस्मरणात् ॥ १७० ॥

खरेदी करणारास धरल्यानंतर काय करावें तें सांगतो.

**मूलार्थ**– विकणारास दाखवून दिल्यानें ( खरीद करणारा ) निर्दोष होतो. मग जो तें द्रव्य विकणारा, त्यापासून नाष्टिक आपलें द्रव्य आणि खरीद करणारा मोल पावतात. व राजा दंड घेतो.

**टीकार्थ**–३ जर तो धरलेला खरीद करणारा ह्मणेल कीं हें मीं चोरिलें नाहीं, दुसऱ्यापासून विकत घेतलें, तर विकणारा दाखविल्यानें तो निर्दोष होतो. सबब त्यावर दावा लागू होणार नाहीं. त्यानें दाखवून दिलेल्या विकणारावर नाष्टिकानें वाद सांगावा.

खरीद करणारानें विकणारास दाखविलें म्हणजे तो निर्दोष होतो.

४ त्या वादांत जर हें अस्वामिक द्रव्य विकलें आहे असा निर्णय होतो, तर त्या हरवलेल्या किंवा चोरीस गेलेल्या गाय ( ह्मैस ) वगैरे जिनसेचा जो विकणारा, त्यापासून नाष्टिकाची जिनस व खरीद करणाराचें मोल देववून राजानें अपराधानुसार दंड घ्यावा.

चोरीस गेलेलें किंवा हरवलेलें दुसऱ्याचें द्रव्य विकणारास दंड.

५ जर तो ( विकणारा ) देशांतरीं गेला असेल तर त्याला आणावयाकरितां मार्गाच्या तारतम्यानें मुदत द्यावी.

मुद्दा देशांतरीं असल्यास आणावयाकरितां मुदत देण्याचा प्रकार.

**स्मृति**– खरीदी करणें ती प्रसिद्धपणें करावी, किंवा मूळ दाखवून द्यावें. तो देशांतरीं गेला असेल तर त्याला आणावयाकरितां मार्गाच्या सुमारानें मुदत द्यावी.

६ जर मूळ अविज्ञातदेशीं गेल्यामुळें तें खरीद करणारा दाखवूं शकत नाहीं, तर खरेदीची (साक्षिलेख्यादिकेंकरून) शाबिती करून दिल्यानेंच तो निर्दोष होतो.

मूळ दाखवूं शकत नाहीं तर खरेदीची शाबिती करावी.

**स्मृति**–मूळ दाखवूं शकत नाहीं तर खरेदीचाच पुरावा करून द्यावा.

७ जर साक्षिलेख्यादिकेंकरून अथवा दिव्यानें खरेदीचा पुरावा करीत नाहीं, व विकणारासहि दाखवीत नाहीं, तर त्यानेंच (मोल देऊन) दंड द्यावा.

खरेदीचीही शाबिती करीत नाहीं तर दंड.

**स्मृति**– मूळ दाखवीत नाहीं व खरेदीचाहि पुरावा करून देत नाहीं, तर फिर्यादी-अन्वयें **नाष्टिका**चें धन देववून दंडहि करावा. १७०

---

**स्वं लभेतान्यविक्रीतमित्युक्तं तल्लिप्सुना किं कर्तव्यमित्यत आह ।**

**आगमेनोपभोगेन नष्टं भाव्यमतोऽन्यथा ।**
**पञ्चबन्धो दमस्तस्य राज्ञे तेनाविभाविते ॥ १७१ ॥**

आगमेन रिक्थक्रयादिना उपभोगेन च मदीयमिदं द्रव्यं तच्चैवं नष्टमपहृतं वेत्यपि भाव्यं साधनीयं तत्स्वामिना । अतोऽन्यथा तेन स्वामिना अविभाविते पञ्चबन्धो नष्टद्रव्यस्य पञ्चमांशो दमो नाष्टिकेण राज्ञे देयः । अत्र चायं क्रमः । पूर्वस्वामी नष्टमात्मीयं साधयेत् ततः क्रेता चौर्यपरिहारार्थं मूल्यलाभाय च विक्रेतारं आनयेत् । अथानेतुं न शक्नोति तदात्मदोषपरिहाराय क्रयं शोधयित्वा द्रव्यं नाष्टिकस्य समर्पयेदिति ॥ १७१ ॥

. तिऱ्हाइतानें विकलेलें आपलें द्रव्य घ्यावें असें (१ ल्या शाखेच्या २ अंकाचे मूळांत) सांगितलें; तें घेणारा जो **नाष्टिक** त्यानें काय करावें तें सांगतो.

**मूलार्थ**– हरवलेलें द्रव्य **नाष्टिका**नें आगमाकडून किंवा उपभोगानें आपलेंसें शाबीत करावें. शाबीत करीत नाहीं तर त्यापासून **राजा**नें नष्ट झालेल्या द्रव्याचा पंचमांश दंड घ्यावा.

**टीकार्थ**– ८ अमुकप्रकारानें हरवलेलें किंवा चोरीस गेलेलें हें माझें द्रव्य आहे, असें मालकानें आगमाकडून किंवा उपभोगानें शाबीत करून द्यावें. शाबीत करूं शकत नाहीं तर त्यापासून **राजा**नें त्या (विवादास्पदीभूत) द्रव्याचा पंचमांश दंड घ्यावा.

हरवलेलें किंवा चोरीस गेलेलें मालकानें आपलेंसें शाबीत न केल्यास पंचमांश दंड.

आतां एथें क्रम असा जाणावा, कीं हरवलेलें द्रव्य प्रथमतः **नाष्टिका**नें आपलेंसें शा-

बीन करावें, नंतर खरीद करणारानें आपल्यावरील चोरीचा दोष जाण्यासाठीं व दि मोल परत मिळण्यासाठीं विकणारास दाखवून द्यावें. जर तो (विकणारास) दाखवूं श नाहीं तर केलेल्या खरीदीचा (साक्षिलेखाकडून) पुरावा करून देऊन विक्रीत धन द्रव्य नाष्टिकाचें द्यावें. १७१

---

तस्करस्य प्रच्छादकं प्रत्याह ॥

**हृतं प्रनष्टं यो द्रव्यं परहस्तादवाप्नुयात् ।**

**अनिवेद्य नृपे दण्ड्यः स तु षण्णवतिं पणान् ॥ १७२**

हृतं प्रनष्टं वा चौरादिहस्तस्थं द्रव्यमनेन मदीयं द्रव्यमपहृतमिति नृपस्यानिवे दर्पादिना यो गृह्णाति असौ षडुत्तरान् नवतिपणान् दण्डनीयः तस्करप्रच्छादक न दुष्टत्वात् ॥ १७२ ॥

शाखा ३ री.

चोराला लपावून ठेवणारा विषयीं सांगतो.

**मूलार्थ**– हरवलेलें किंवा चोरीस गेलेलें द्रव्य राजास न कळवितां जो स्वतांच त्याप सून घेतो त्याला ९६ पण दंड करावा.

**टीकार्थ**–१ हरवलेलें किंवा चोरीस गेलेलें द्रव्य चोरादिकांच्या हातीं पाहून "हें मा द्रव्य यानें अपहारिलें" असें सरकारांत न कळवितां जो ध मकी वगैरे देऊन स्वतांच घेतो त्यापासून ९६ पण दंड घ्यावा कारण, चोराला लपविल्यामुळें अपराधी ठरला ह्मणून. १७

सरकारांत न कळवितां स्वतां चोरापासून आपलें द्रव्य घेतां त्यास ९६ पण दंड.

---

राजपुरुषानीतं प्रत्याह ॥

**शौल्किकैः स्थानपालैर्वा नष्टापहृतमाहृतम् ।**

**अर्वाक्संवत्सरात्स्वामी हरेत परतो नृपः ॥ १७३ ॥**

यदा तु शुल्काधिकारिभिः स्थानरक्षिभिर्वा नष्टमपहृतं द्रव्यं राजपार्श्वे प्रत्यानीतं तदा संवत्सरादर्वाक् प्राप्तश्चेत् नाष्टिकस्तद्द्रव्यमवाप्नुयात्। ऊर्ध्वं पुनः संवत्सराद्राजा गृह्णीयात्। स्वपुरुषानीतं च द्रव्यं जनसमूहेपूद्घोष्य यावत्संवत्सरं राज्ञा रक्षणीयम्। यथाह गौतमः ॥ प्रनष्टस्वामिकमधिगम्य राज्ञे प्रब्रूयुर्विख्याप्य संवत्सरं राज्ञा रक्ष्यमिति। यत्पुनर्मनुना विध्यन्तरमुक्तम्। प्रनष्टस्वामिकं द्रव्यं राजा त्र्यब्दं निधापयेत्। अर्वाक् त्र्यब्दाद्धरेत्स्वामी परतो नृपतिर्हरेदिति तच्छ्रुतवृत्तसंपन्नब्राह्मणविषयम्। रक्षणनिमित्तषड्भागग्रहणं च तेनैवोक्तम् ॥ आददीताथ षड्भागं प्र-

नष्टाधिगतान्नृपः । दशमं द्वादशं वापि सतां धर्ममनुस्मरन्निति ॥ तृतीयद्वितीयप्रथमसंवत्सरेषु यथाक्रमं षष्ठादयो भागा वेदितव्याः । मपञ्चितं चैतत्पुरस्तात् ॥१७३॥

सरकारी शिपायांनीं आणिलेलें द्रव्य काय करावें तें सांगतो.

**मूलार्थ**– हरवलेलें किंवा चोरीस गेलेलें द्रव्य जकातदार किंवा पाहरेकरी ह्यांनीं सरकारांत दिल्यानंतर एका वर्षांत मालक हजर झाल्यास त्यास द्यावें, पुढें सरकारानें घ्यावें.

**टीकार्थ**– २ हरवलेलें किंवा चोरीस गेलेलें द्रव्य जकातदार किंवा चौकीदार ह्यांनीं सरकारांत हजर केल्यानंतर एका वर्षाचे आंत मालक हजर झाल्यास द्यावें. वर्षापुढें सरकार घेईल. सरकारी मनुष्यांनीं आणिलेलें द्रव्य लोकांत प्रसिद्ध करून एक वर्ष सरकारानें तसेंच राखावें.

हरवलेले द्रव्याविषयीं एक वर्षपर्यंत मालकाची वाट पहावी.

**गौतम**– हरवलेलें किंवा चोरीस गेलेलें द्रव्य सांपडलेलें सरकारांत कळवावें. सरकारानें लोकांत प्रसिद्ध करून एक वर्षपर्यंत रक्षण करून ठेवावें.

**मनु**– हरवलेलें द्रव्य सांपडलें असतां तें राजानें तीन वर्षें राखावें. तीन वर्षांचे आंत जर मालक हजर होईल तर त्याला द्यावें. पुढें राजानें घ्यावें.

असा जो मनूनें तीन वर्षांचा अवधि सांगितला तो श्रुतवृत्तसंपन्न अशा ब्राह्मणाविषयीं ( जाणावा).

रक्षणानिमित्त राजानें षष्ठांशादिक घ्यावें असें तो ( मनु )च सांगतो.

**मनु**– ३ हरवलेलें द्रव्य सांपडलें असतां त्यांतून राजानें सद्धर्मास अनुसरून सहावा, दहावा, किंवा बारावा हिसा ( रक्षणानिमित्त) घ्यावा.

रक्षणानिमित्त राजानें सहावा वगैरे अंश घ्यावा.

सहावा, दहावा, किंवा बारावा, असे भाग सांगितले; ते, तिसरें, दुसरें, आणि पहिलें, वर्ष ह्यांच्या अनुक्रमानें घ्यावे.

हा प्रकार पूर्वीं ( २ ऱ्या प्रकरणाचे १६ व्या व १७ व्या शाखेंत ) सविस्तर सांगितला आहे. १७३.

---

मनूक्तषड्भागादिग्रहणस्य द्रव्यविशेषे अपवादमाह ॥

**पणानेकशफे दद्याच्चतुरः पञ्च मानुषे ।**
**महिषोष्ट्रगवां द्वौ द्वौ पादं पादमजाविके ॥ १७४ ॥**

एकशफे अश्वादौ प्रनष्टाधिगते तत्स्वामी राज्ञे रक्षणनिमित्तं चतुरः पणान् दद्यात् । मानुषे मनुष्यजातीये द्रव्ये पञ्च पणान् । अजाविके पुनः प्रत्येकं पादं पादं महिषोष्ट्रगवां रक्षणनिमित्तं प्रत्येकं द्वौ द्वौ पणान् दद्यादिति सर्वत्रानुषज्जते ॥

---

१ अनुक्रमानें म्हणजे तिसऱ्या वर्षीं सहावा, दुसऱ्या वर्षीं दहावा, आणि पहिल्या वर्षीं बारावा ह्या रीतीनें.

अजाविकमिति समासनिर्देशेऽपि पादंपादमिति वीप्साबलात्प्रत्येकं संबन्धोऽवगम्यते ॥ इत्यस्वामिविक्रयप्रकरणम् ॥ १७४ ॥

"सहावा, दहावा, बारावा, हिसा घ्यावा" असें मनूनें सांगितलें, त्याचा कांहीं द्रव्यविशेषीं अपवाद सांगतो.

**मूलार्थ**– एका खुराचे पशूबद्दल चार पण; मनुष्याबद्दल पांच पण; हैस, उंट, गाई ह्या प्रत्येकाबद्दल दोन दोन पण; आणि शेळ्या मेंढ्या ह्या प्रत्येकाबद्दल (पणाचा) एकेकचतुर्थांश द्यावा.

सांपडलेल्या पशूबद्दल सरकारानें कर घेण्याचा प्रकार.

**टीकार्थ**– ४ एका खुराचा पशु म्हणजे अश्वादिक, तो हरवलेला सरकारांत सांपडला असतां त्याचे धन्यानें रक्षणानिमित्त चार पण सरकारांत द्यावे. मनुष्याविषयी पांच पण. हैस, उंट, गाई, ह्या प्रत्येकाचे रक्षणानिमित्त दोन दोन पण आणि शेळ्या, मेंढ्या ह्या प्रत्येकाबद्दल पणाचा एकेक चतुर्थांश द्यावा. १७४

---

## दत्ताप्रदानिक प्रकरण १२ वें.

अधुना विहिताविहितमार्गद्वयाश्रयतया दत्तानपाकर्म दत्ताप्रदानिकमिति च लब्धाभिधानद्वयं दानाख्यं व्यवहारपदं अभिधीयते ॥ तत्स्वरूपं च नारदेनोक्तम् । दत्त्वा द्रव्यमसम्यग्यः पुनरादातुमिच्छति । दत्ताप्रदानिकं नाम व्यवहारपदं हि तदिति ॥ असम्यगविहितमार्गाश्रयेण द्रव्यं दत्त्वा पुनरादातुमिच्छति यस्मिन विवादपदे तद्दत्ताप्रदानिकं दत्तस्याप्रदानं पुनर्हरणं यस्मिन्दानाख्ये तद्दत्ताप्रदानिकं नाम व्यवहारपदम् । विहितमार्गाश्रयत्वेन तत्प्रतिपक्षभूतं तदेव व्यवहारपदं दत्तानपाकर्मेत्यथादुक्तं भवति । दत्तस्यानपाकर्म अपुनरादानं यत्र दानाख्ये विवादपदे तद्दत्तानपाकर्म। तच्च देयादेयादिभेदेन चतुर्विधम् । यथाह नारदः ॥ अथ देयमदेयं च दत्तं वाऽदत्तमेव च । व्यवहारेषु विज्ञेयो दानमार्गश्चतुर्विध इति । तत्र देयमित्यनिषिद्धदानक्रियायोग्यमुच्यते । अदेयमस्वतया निषिद्धतया वा दानानर्हं यत्पुनः प्रकृतिस्थेन दत्तमव्यावर्तनीयं तद्दत्तमुच्यते । अदत्तं तु यत्प्रत्याहरणीयं तत्कथ्यते । तदेतत्संक्षेपतो निरूपयितुमाह ॥

### स्वं कुटुम्बाविरोधेन देयं

समान्मीयं कुटुम्बाविरोधेन कुटुम्बानुपरोधेन कुटुम्बभरणावशिष्टमिति यावत्तद्यात् । तद्भरणस्यावश्यकत्वात् ॥ तथाच मनुः । वृद्धौ च मातापितरौ साध्वी भार्या सुतः शिशुः। अप्यकार्यशतं कृत्वा भर्तव्या मनुरब्रवीदिति । कुटुम्बाविरोधेनेत्यनेनादेयमेकविधं दर्शयति । स्वं दद्यादित्यनेन चास्वभूतानामन्वाहितयाचितकाधिसाधारणनिक्षेपाणां पञ्चानामप्यदेयत्वं व्यतिरेकतो दर्शितम् । यत्पुनर्नारदेनाष्टवि-

धत्वमदेयानामुक्तम् । अन्वाहितं याचितकमाधिः साधारणं च यत् । निक्षेपः पुत्रदारांश्च सर्वस्वं चान्वये सति ॥ आपत्स्वपि च कष्टासु वर्तमानेन देहिना ॥ अदेयान्याहुराचार्या यच्चान्यस्मै प्रतिश्रुतमिति ॥ एतददेयत्वमात्राभिप्रायेण न पुनः स्वत्वाभावाभिप्रायेण । पुत्रदारसर्वस्वप्रतिश्रुतेषु स्वत्वस्य सद्भावात् ॥ अन्वाहितादीनां स्वरूपं प्रागेव प्रपंचितम् ॥

शाखा १ ली.

आतां विहित मार्ग व अविहित मार्ग ह्यांच्या आश्रयेंकरून दत्तानपकर्म, दत्ताप्रदानिक, अशा दोहों नांवांचे दानसंज्ञक व्यवहारप्रकरणाचें निरूपण करितो.

त्यांत दत्ताप्रदानिकाचें स्वरूप नारद सांगतो.

नारद— अविहित मार्गानें ( अयोग्य रीतीनें ) द्रव्य देऊन पुनः परत घेऊं इच्छितो तर तें व्यवहारप्रकरण दत्ताप्रदानिकसंज्ञक ह्मटलें आहे.

अर्थ— १ ज्या व्यवहारीं अविहित मार्गाच्या आश्रयानें द्रव्य देऊन पुनः परत घेऊं इच्छितो तो दत्ताप्रदानिक, म्हणजे ज्या दानसंज्ञक व्यवहारीं दिलेलें पुनः हरण केलें जातें असा जो व्यवहार तो.

दत्ताप्रदानिकाचें स्वरूप.

२ अर्थात् ज्या व्यवहारीं विहित मार्गानें द्रव्य दिलेलें पुनः परत घेतलें जात नाहीं असा जो दानसंज्ञक व्यवहार तो दत्तानपकर्म ह्मटला आहे.

दत्तानपकर्माचें स्वरूप.

३ असा जो दानसंज्ञक व्यवहार तो देय, अदेय, दत्त आणि अदत्त असा चार प्रकारचा.

दानव्यवहार चार प्रकारचा.

नारद— देय, अदेय, दत्त, अदत्त, असा व्यवहारांत दानविधि चार प्रकारचा सांगितला आहे.

देय ह्मणजे अनिषिद्ध जी दानक्रिया तिजविषयीं जें योग्य तें. ( ह्मणजे द्यावयास योग्य ).

अदेय ह्मणजे आपली सत्ता नसल्यामुळें अथवा दानाविषयीं निषेधामुळें जें दान करण्याविषयीं अयोग्य तें.

दत्त ह्मणजे स्वस्थप्रकृति अशा मनुष्यानें दिलेलें ह्मणून पुनः परत घ्यावयाजोगें नव्हे तें.

अदत्त ह्मणजे जें दिलेलें परत घ्यावयाजोगें तें.

चोहों प्रकारच्या दान संज्ञक व्यवहाराचें संक्षेपतः निरूपण करितो.

मूलार्थ— कुटुंबपोषणाहून अतिरिक्त असें जें स्वसत्तात्मक असेल तें देय ( द्यावयास योग्य. )

टीकार्थ– ४ कुटुंबपोषणाहून अधिक असें जें स्वसत्तात्मक असेल तें देय.
कुटुंबपोषणाहून अधिक कुटुंबपोषण आवश्यक आहे.
असेल तें देय.

मनु– आई बाप वृद्ध, व भार्या पतिव्रता आणि पुत्र बाल ह्यांचें पोषण शेंकडों
मेंकरूनहि करावें.

ह्यावरून देय एक प्रकारचें आहे असें दाखविलें. आणि " स्वसत्ताक असेल तें द्या
असें सांगितल्यावरून ज्यांवर आपली सत्ता नाहीं अशीं अन्वाहित, याचितक, गह
समायिक द्रव्य, व निक्षेप, हीं पांच अदेय असें व्यतिरेकेंकरून दाखविलें.

नारद– ५ अन्वाहित, याचितक, गहाण, समायिक द्रव्य, ठेव, स्त्री, पुत्र, अ
वंश कायम असतां सर्वस्व व दुसऱ्यास प्रतिश्रुत केलेलें असीं आठ प्रकारचीं द्रव्यें, म
ध्य घोर विपत्तींत असला तरीहि अदेय आहेत, असें आचार्य सांगतात.

असे जे आठ प्रकार सांगितले तेहि द्रव्यें अदेय आहेत अशा अभिप्रायेंकरून;
वळ इतक्या द्रव्यावर आपली सत्ता आहे अशा अभिप्रायेंकरून सांगितलें नाहीं. कार
स्त्री, पुत्र, सर्वस्व, प्रतिश्रुत, ह्यांवर आपली सत्ता आहेच. अन्वाहितादिकांचें स्वरूप
पूर्वींच ( निक्षेपप्रकरणीं ) सविस्तर सांगितलें आहे.

स्वं दद्यादित्यनेन दारसुतादेरपि स्वत्वाविशेषेण देयत्वप्रसक्तै प्रतिषेधमाह ॥

दारसुतादृते ।
नान्वये सति सर्वस्वं यच्चान्यस्मै प्रतिश्रुतम् ॥ १७५ ॥

दारसुतादृते दारसुतव्यतिरिक्तं स्वं दद्यात्र दारसुतमित्यर्थः । तथा पुत्रपौत्राद्य
न्वये विद्यमाने सर्वं धनं न दद्यात् । पुत्रानुत्पाद्य संस्कृत्य वृत्तिं चैषां प्रकल्पयेदिति
स्मरणात् । तथा हिरण्यादिकमन्यस्मै प्रतिश्रुतमन्यस्मै न देयम् ॥ १७५ ॥

" स्वसत्तात्मक असेल तें द्यावें," असें ( मुळांत ) सांगितल्यामुळें स्त्रीपुत्रादिकांवर-
हि सत्ता समान आहेच म्हणून तीहि द्यावीं, असें प्राप्त होईल त्याचा अपवाद सांगतो.

मूलार्थ– स्त्री, पुत्र, ह्यांवांचून द्यावें, व वंश कायम असतां सर्वस्व देऊं नये व जें
एकाला देऊं केलें तें दुसऱ्यास देऊं नये.

टीकार्थ– ६ पुत्र, स्त्री, ह्यांवांचून जें स्वकीय असेल तें द्यावें. स्त्रीपुत्र देऊं नयेत.
तसेंच पुत्रपौत्रादिक वंश विद्यमान असतां सर्वस्व जिंदगी देऊं नये.

स्मृति– पुत्रांला उत्पन्न करून व त्यांचे (मौंजी, विवाह वगैरे) संस्कार करून त्यांस
जीवनोपाय करून ठेवावा.

तसेंच एकाला देऊं केलेलें हिरण्यादि द्रव्य दुसऱ्यास देऊं नये १७५.

एवं दारसुतादिव्यतिरिक्तं देयमुक्त्वा प्रसङ्गाददेयधनग्रहणं च प्रतिग्रहीत्रा प्रकाशमेव कर्तव्यमित्याह ॥

**प्रतिग्रहः प्रकाशः स्यात्स्थावरस्य विशेषतः ।**

प्रतिग्रहणं प्रतिग्रहः सः प्रकाशः कर्तव्यः विवादनिराकरणार्थम् । स्थावरस्य च विशेषतः प्रकाशमेव ग्रहणं कार्यम् । तस्य सुवर्णादिवदात्मनि स्थितस्य दर्शयितुमशक्यत्वात् ॥

ह्याप्रमाणें स्त्रीपुत्रादिकांवांचून देय धन सांगून प्रसंगसंगतीनें प्रतिग्रह करणारानें प्रसिद्धपणें देय द्रव्याचा प्रतिग्रह करावा, असें सांगतो.

मूलार्थ– प्रतिग्रह करणें तो प्रसिद्धपणें करावा, स्थावराचा तर विशेषेंकरून (प्रसिद्धपणेंच करावा).

टीकार्थ– ७ प्रतिग्रह करणें तो पुढें विवाद न पडावा एतदर्थ प्रसिद्धपणें करावा. त्यांत स्थावराचा प्रतिग्रह तर विशेषेंकरून प्रसिद्धपणेंच करावा. कारण, जसें सुवर्णादिक आपल्याजवळ असलेलें (हें माझें आहे असें) दाखवितां येतें तसें स्थावर दाखवितां येत नाहीं.

प्रतिग्रह प्रसिद्धपणें करावा.

एवं प्रासङ्गिकमुक्त्वा प्रकृतमनुसरन्नाह ॥

**देयं प्रतिश्रुतं चैव दत्वा नापहरेत्पुनः ॥ १७६ ॥**

देयं प्रतिश्रुतं चैव । यद्यस्मै धर्मार्थं प्रतिश्रुतं तत्तस्मै देयमेव यद्यसौ धर्मात्प्रच्युतो न भवति । प्रच्युते न पुनर्दातव्यम् । प्रतिश्रुत्याप्यधर्मसंयुक्ताय न दद्यादिति गौतमस्मरणात् । दत्त्वा नापहरेत्पुनः । न्यायमार्गेण यद्दत्तं तत्सप्तविधमपि पुनर्नापहर्तव्यम् । किंतु तथैवानुमन्तव्यम् । यत्पुनरन्यायेन दत्तं तददत्तं षोडशप्रकारमपि प्रत्याहर्तव्यमेवेत्यर्थादुक्तं भवति । नारदेन च । दत्तं सप्तविधं प्रोक्तमदत्तं षोडशात्मकमिति प्रतिपाद्य दत्तादत्तयोः स्वरूपं विवृतम् । पण्यमूल्यं भृतिस्तुष्ट्या स्नेहात्प्रत्युपकारतः । स्त्रीशुल्कानुग्रहार्थं च दत्तं दानविदो विदुः ॥ अदत्तं तु भयक्रोधशोकवेगरुगन्वितैः । तथोत्कोचपरीहासव्यत्यासच्छलयोगतः ॥ बालमूढास्वतन्त्रार्तमत्तोन्मत्तापवर्जितम् । कर्ता ममेदं कर्मेति प्रतिलाभेच्छया च यत् ॥ अपात्रे पात्रमित्युक्ते कार्ये वा धर्मसंयुते । यद्दत्तं स्यादविज्ञानाददत्तमिति तत्स्मृतमिति ॥ अयमर्थः । पण्यस्य क्रीतद्रव्यस्य यन्मूल्यं दत्तम् । भृतिर्वेतनं कृतकर्मणे दत्तम् । तुष्ट्या बन्दिचारणादिभ्यो दत्तम् । स्नेहाद्दुहितृपुत्रादिभ्यो दत्तम् । प्रत्युपकारतः उपकृतवते प्रत्युपकाररूपेण दत्तम् । स्त्रीशुल्कं परिणयनार्थं कन्याज्ञातिभ्यो यद्दत्तम् । यच्चानुग्रहार्थमदृष्टार्थं दत्तं तदेतत्सप्तविधमपि दत्तमेव न प्रत्याहरणीयम् । भयेन बन्दिग्राहादिभ्यो दत्तम् । क्रोधेन पुत्रादिभ्यो वैरनिर्यातनायान्यस्मै दत्तम् । पुत्रवियोगादि-

निमित्तशोकावेशेन दत्तम् । उत्कोचेन कार्यप्रतिबन्धनिरासार्थमधिकृतेभ्यो दत्तम् परिहासेनोपहासेन दत्तम्। एकोऽपि स्वं द्रव्यमन्यस्मै ददात्यन्योऽपि तस्मै ददाती दानव्यत्यासः । छलयोगतः शतदानमभिसंधाय सहस्रमिति परिभाष्य ददाति बालेनाप्राप्तषोडशवर्षेण । मूढेन लोकवादानभिज्ञेन । अस्वतन्त्रेण पुत्रदासादिना आर्तेन रोगाभिभूतेन । मत्तेन मदनीयमत्तेन । उन्मत्तेन वातिकाद्युन्मादग्रस्तेन अपवर्जितं दत्तम् । तथायं मदीयं कर्म करिष्यतीति प्रतिलाभेच्छया दत्तम् । अचतुर्वेदाय चतुर्वेदोऽहमित्युक्तवते दत्तम् । यज्ञं करिष्यामीति धनं लब्ध्वा द्यूतादौ विनियुञ्जानाय दत्तमित्येवं षोडशप्रकारमपि दत्तमदत्तमित्युच्यते । प्रत्याहरणीयत्वात् । आर्तदत्तस्यादत्तत्वं धर्मकार्यव्यतिरिक्तविषयम् । स्वस्थेनार्तेन वा दत्तं श्रावितं धर्मकारणात् । अदत्वा तु मृते दाप्यस्तत्सुतो नात्र संशय इति कात्यायनस्मरणात् । तथेदमपरं संक्षिप्तार्थवचनं सर्वविवादसाधारणम् ॥ योगाधमनविक्रीतं योगदानप्रतिग्रहम् । यस्य वाप्युपधिं पश्येत्तत्सर्वं विनिवर्तयेदिति ॥ योग उपाधिः। येनागामिनोपाधिविशेषेणाधिविक्रयदानप्रतिग्रहाः कृतास्तदुपाधिविगमे तान् क्रयादीन्विनिवर्तयेदित्यस्यार्थः । यः पुनः षोडशप्रकारमपि अदत्तं गृह्णाति यश्चादेयं प्रयच्छति तयोर्दण्डो नारदेनोक्तः॥ गृह्णात्यदत्तं यो लोभाद्यश्चादेयं प्रयच्छति । अदेयदायको दण्ड्यस्तथादत्तप्रतीच्छक इति ॥ इति दत्ताप्रदानिकं नाम प्रकरणम् ॥ १७६ ॥

असें प्रासंगिक सांगून आतां प्रकृत सांगतो.

**मूलार्थ**— जें ज्याला देऊं केलें तें द्यावेंच, देऊन पुनः परत घेऊं नये.

**टीकार्थ**— जें ज्याला धर्मासाठीं देऊं केलें तें त्याला द्यावेंच, परंतु तो धर्मापासून भ्रष्ट झाला नाहीं तर. धर्मभ्रष्ट झाला तर देऊं केलेलेंहि देऊं नये.

धर्मार्थ देऊं केलेलें हा धर्मभ्रष्ट असल्यास देऊं नये.

**गौतम**— धर्मार्थ कबूल करूनहि दानपात्र अधर्मी असल्यास देऊं नये.

१ विहित ( योग्य ) मार्गास अनुसरून जें दत्त द्रव्य, तें सात प्रकारचें आहे. तें पुनः परत घेऊं नये. तर तसेंच मान्य करावें.

विहित मार्गानें दिलेलें परत घेऊं नये.

ह्यावरून, अविहित ( अयोग्य मार्गास अनुसरून दिलेलें. असें सोळा प्रकारचेंही अदत्त द्रव्य परत घ्यावेंच. असें अर्थात् सिद्ध होतें. )

अविहित मार्गानें दिलेलें परत घ्यावें.

**नारद**— दत्त सात प्रकारचें, आणि अदत्त सोळा प्रकारचें असें नारदानें सांगून त्याचें विवरण केलें. तें असें कीं,

दत्त द्रव्याचें स्वरूप नारद सांगतो.

**नारद**— पण्य द्रव्याचें मोल, म्हणजे विकत घेतलेल्या जिनसाचें मोल; भृति म्हणजे काम करणारास दिलेलें; बक्षीस ह्मणजे बंदीजन; भाट, इत्यादिकांस दिलेलें; प्रेमतेनें दिलेलें, ह्मणजे कन्यापुत्रादिकांस दिलेलें; प्रत्युपकारानें दिलेलें ह्मणजे उपकार करणारास उपकार

दत्त द्रव्याचे सात प्रकार व त्यांचीं स्वरूपें.

फिटण्यासाठीं दिलेलें; स्त्रीशुल्क ह्मणजे विवाहासाठीं कन्येचे आईबाप इत्यादिकांस दिलेलें; आणि पुण्यासाठीं दिलेलें, असें हें सात प्रकारचें द्रव्य, दत्त द्रव्य ह्मटलें आहे, तें धर्मज्ञांनीं पुनः परत घेऊं नये.

### अदत्त द्रव्याचें स्वरूपहि तोच सांगतो.

**नारद**– भयग्रस्त, क्रोधाविष्ट, शोकार्त, ह्यांनीं दिलेलें; तसाच लांच, *परिहासानें, व्यत्यासानें, कपटानें, दिलेलें; बाल, मूढ परतंत्र, रोगार्त, मत्त, उन्मत्त, ह्यांनीं दिलेलें; तसेंच हा माझें हें काम करील, अशा प्रतिलाभाच्या आशेनें दिलेलें; स्वतां अपात्र असतां मी सत्पात्र आहें, असें सांगणारास दिलेलें; अधर्म कार्यार्थ दिलेलें; असें जें अज्ञानानें दिलेलें तें एथें अदत्त ह्मटलें आहे.

अदत्त द्रव्याचे सोळा प्रकार व त्यांची स्वरूपे.

**अर्थ**–११ भयग्रस्तानें बंदिग्राहादिकांस भयानें दिलेलें; क्रोधाविष्टानें पुत्रादिकांच्या वैरभावामुळें दुसऱ्यास दिलेलें; शोकार्तानें पुत्रादिकांच्या वियोगामुळें शोकानें दिलेलें; तसाच उत्कोचें ( लांच ) ह्मणजे कार्याविषयीं जो मध्यें प्रतिबंध येतो त्याचें निवारण व्हावें एतदर्थ अधिकाऱ्यांस दिलेलें; परिहासानें दिलेलें; व्यत्यासानें ह्मणजे एकानें आपलें द्रव्य दुसऱ्याला दिलें व त्यानेंहि आपलें द्रव्य ह्याला दिलें तें; कपटानें ह्मणजे शत देण्याचा संकल्प करून सहस्राचा उल्लेख करून दिलेलें; बालानें दिलेलें; मूढानें ह्मणजे शास्त्रीय व लौकिक व्यवहाराविषयीं अनभिज्ञ जो त्यानें दिलेलें; पराधीनानें ह्मणजे पुत्रदास इत्यादिकानें दिलेलें; रोग्यानें दिलेलें; मत्तानें दिलेलें; उन्मत्तानें दिलेलें; तसेंच हा माझें अमुक कार्य करील अशा प्रतिलाभाच्या इच्छेनें दिलेलें; चार वेदांचें अध्ययन केलें नसून मी चतुर्वेद जाणणारा आहें असें सांगणारा जो त्यास दिलेलें; मी यज्ञ करणार आहें, अशा निमित्तानें धन संपादून तें जुगारांत उडविणारा, अशा अधार्मिकास दिलेलें; असें सोळा प्रकारचें दिलेलेंहि अदत्त ह्मणजे न दिल्यासारिखेंच, अतएव तें पुनः परत घ्यावें. कारण अन्यायमार्गानें दिलें ह्मणून.

रोग्याने दिलेले धर्मकार्यासाठी असल्यास परत घ्यावे.

१२ रोगी मनुष्यानें दिलेलें परत घ्यावें, असें सांगितलें तें धर्मकार्याशिवाय इतर द्रव्य दिलेल्याविषयीं जाणावें; कारण,

**कात्यायन**– स्वस्थ किंवा रोगार्त असतांना त्यानें धर्मार्थ जें दिलें किंवा धर्मार्थ दान ऐकविलें तें न देतां जर तो मरेल तर निःसंशय त्याच्या पुत्राकडून तें देववावें.

### तसेंच सर्व विवादांविषयीं साधारण लागू पडेल असें आणखी एक संक्षिप्तार्थ वचन सांगतो.

**मनु**–कांहीं एक उपाधि ( छळ ) वशेंकरून केलेले जे गहाण, विक्रय, दान, प्रति-

* परिहासाने दिलेले म्हणजे देण्याचा इरादा न धरितां उगेच मस्करीने दिलेले.

ग्रह, हे व्यवहार, त्यांचा तो तो उपाधि समजण्यांत आला असतां ते (पूर्वोक्तव्यवहार) उलटतात.

जो सोळा प्रकारचें अदत्त द्रव्य घेतो किंवा सात प्रकारचें अदेय द्रव्य देतो त्या दोघांस नारद दंड सांगतो.

नारद–१३ जो लोभानें (सोळा प्रकारचें) अदत्त घेतो तो अदत्त घेणारा, व जो अदेय द्रव्य देतो तो अदेय देणारा, ह्मणून त्या दोघांस (त्या द्रव्याच्या तारतम्यानें) दंड करावा. १७६.

## क्रीतानुशय प्रकरण १३ वें.

अथ क्रीतानुशयः कथ्यते ॥ तत्स्वरूपं नारदेनोक्तम् ॥ क्रीत्वा मूल्येन यः पण्यं क्रेता न बहु मन्यते । क्रीतानुशय इत्येतद्विवादपदमुच्यते इति ॥ तत्र च यस्मिन्नहनि पण्यं क्रीतं तस्मिन्नेवाह्नि तदविकृतं प्रत्यर्पणीयमिति तेनैवोक्तम् ॥ क्रीत्वा मूल्येन यत्पण्यं दुःक्रीतं मन्यते क्रयी ॥विक्रेतुः प्रतिदेयं तत्तस्मिन्नेवाह्न्यविक्षतमिति । द्वितीयादिदिने तु प्रत्यर्पणे विशेषस्तेनैवोक्तः ॥ द्वितीयेऽह्नि ददत्क्रेता मूल्यात् त्रिंशांशमावहेत् । द्विगुणं तु तृतीयेऽह्नि परतः क्रेतुरेवतदिति ॥ परतोऽनुशयो न कर्तव्य इत्यर्थः ॥ एतच्च बीजातिरिक्तोपभोगादिविनश्वरवस्तुविषयम् ॥

बीजादिक्रये पुनरन्य एव प्रत्यर्पणविधिरित्याह ॥

**दशैकपञ्चसप्ताहमासत्र्यहार्द्धमासिकम् ।**
**बीजायोवाह्यरत्नस्त्रीदोह्यपुंसां परीक्षणम् ॥ १७७ ॥**

बीजं व्रीह्यादिबीजम् । अयो लोहादि । वाह्यो बलीवर्दादिः । रत्नं मुक्ताप्रवालादिकम् । स्त्री दासी । दोह्यं माहिष्यादि । पुमान् दासः । एषां बीजादीनां यथाक्रमेण दशाहादिकः परीक्षाकालो विज्ञेयः। परीक्ष्यमाणे च बीजादौ यद्यसम्यक्त्वबुद्ध्यानुशयो भवति तदा दशाहाभ्यन्तर एव क्रयनिवृत्तिर्न पुनरूर्ध्वमित्युपदेशप्रयोजनम् ॥ यत्तु मनुवचनम् । क्रीत्वा विक्रीय वा किंचिद्यस्येहानुशयो भवेत् । सोन्तर्दशाहात् तद्द्रव्यं दद्याच्चैवाददीत चेति । तदुक्तलोहादिव्यतिरिक्तोपभोगाविनश्वरगृहक्षेत्रयानशयनासनादिविषयम् । सर्वं चैतदपरीक्षितक्रीतविषयम् । यत्पुनः परीक्ष्य न पुनः प्रत्यर्पणीयमिति समयं कृत्वा क्रीतं तद्विक्रेत्रे न प्रत्यर्पणीयम् ॥ तदुक्तम् । क्रेता पण्यं परीक्षेत प्राक् स्वयं गुणदोषतः । परीक्ष्याभिमतं क्रीत विक्रेतुर्न भवेत्पुनरिति ॥ १७८ ॥

शाखा १ ली.

क्रीतानुशयाचें स्वरूप नारद सांगतो.

नारद–१ मोल देऊन जिनस खरीद केल्यावर खरीद करणाराच्या पसंतीस पडत

क्रीतानुशयाचें स्वरूप.

नाहीं तर त्याविषयीं जो व्यवहार तो **क्रीतानुशय** म्हटला आहे.

त्या व्यवहारीं ज्या दिवशीं जिनस खरीद केला त्याच दिवशीं जशाचा तसा (ह्मणजे कांहीं बिघाड न करितां ) परत करावा असें तोच (नारद) सांगतो.

**नारद**– २ मोलानें जिनस खरीद केल्यानंतर खरीद करणारास वाटेल कीं खरीदी चांगली झाली नाहीं, तर त्याच दिवशीं जशाचा तसा तो परत करावा.

खरीद केल्यावर पसंतीस न पडेल तर त्याच दिवशीं परत करावा.

पुढें ( दुसऱ्या दिवसापासून ) परत केला असतां विशेष तो ( नारद ) च सांगतो.

**नारद**– ३ दुसऱ्या दिवशीं परत केल्यास किमतींत तिसावा अंश कमी करून किंमत माघारी द्यावी. तिसऱ्या दिवशीं परत केल्यास किमतीचा पंधरावा अंश कमी करावा. ह्याच्या पुढें जिनस परत करूं नये.

तिसऱ्या दिवसापुढें जिनस परत होत नाहीं.

वरचा प्रकार ( ३ रा अंक ) उपभोगेंकरून नाश पावावयाजोगा असा बीज इत्यादि जो जिनस त्याखेरीज जो दुसरा जिनस त्याविषयीं जाणावा.

बीज इत्यादि जिनस परत करण्याविषयीं तर दुसरीच मुदत सांगतो.

**मूलार्थ**–बीज, लोखंड, वाह्य, रत्न, स्त्री, दोह्य, पुरुष ह्या प्रत्येकाची परीक्षा यथाक्रमें-करून दहा, एक, पांच, सात, तीस, तीन, पंधरा, दिवसपर्यंत करावी.

**टीकार्थ**– ४ बीज ह्मणजे धान्य तांदूळ गोधूम इत्यादिक; लोखंड; वाह्य ह्मणजे भारवाहक बैल टोणगा वगैरे; रत्न ह्मणजे मोतीं पोंवळीं इत्यादिक; स्त्री ह्मणजे दासी; दोह्य ह्मणजे दुभतें गुरूं गाय, ह्मैस इत्यादिक आणि पुरुष ( दास ) ह्यांची यथाक्रमेंकरून दहा, एक, पांच, सात, तीस, तीन, पंधरा, दिवसपर्यंत चौकशी करण्याची मुदत सांगितली. ह्मणजे खरीद केलेल्या धान्यादिकांची चौकशी करून हा जिनस सोईवार किंवा चांगला मिळाला नाहीं, असें वाटेल तर वर सांगितलेल्या त्या त्या मुदतींत तो तो जिनस परत करावा, पुढें परत होणार नाहीं.

धान्यादि जिनस परत करण्याविषयीं.

**मनु**– ५ कांहीं जिनस विकत दिल्यावर किंवा घेतल्यानंतर वाटेल कीं सौदा नीट जाहला नाहीं तर दहा दिवसांच्या आंत तो जिनस परत द्यावा किंवा परत घ्यावा. (पुढें) नाहीं.

असी जी मनूनें दहा दिवसांचीं मुदत सांगितली, ती वर ( ४ थ्या अंकांत) सांगितलेले जे लोखंड वगैरे पदार्थ त्यांखेरीज, व उपभोगेंकरून नाश पावावयाजोगें नव्हे असें जें वर क्षेत्र, शयन, आसन इत्यादिक द्रव्य, त्याविषयीं जाणावी.

६ हा सर्व ( १ ल्या अंकापासून एथपर्यंत सांगितलेला ) प्रकार चौकशी न करून

चौकशी करून व परत न करण्याची बोली करून घेतलेला जिनस परत होत नाही.

घेतलेल्या जिनसाविषयीं; चौकशी करून व पुन्हा परत करावयाचा नाहीं अशी कबुलात करून घेतलेला जिनस तर परत घेऊं नये व देऊं नये.

स्मृति-खरीद करणारानें स्वतां पूर्वींच चौकशी करून माल घ्यावा, चौकशी करून घेतलेला माल विकणारा परत घेणार नाहीं १७७.

---

दोह्यादिपरीक्षाप्रसंगेन स्वर्णादेरपि परीक्षामाह ॥

**अग्नौ सुवर्णमक्षीणं रजते द्विपलं शते ।**

**अष्टौ त्रपुणि सीसे च ताम्रे पञ्च दशायसि ॥ १७८ ॥**

वह्नौ प्रताप्यमानं सुवर्णं न क्षीयते अतः कटकादिनिर्माणार्थं यावत्स्वर्णकारहस्ते प्रक्षिप्तं तावत्तुलितं तैः प्रत्यर्पणीयम् । इतरथा क्षयं दाप्यो दण्ड्यश्च । रजते तु शतपले प्रताप्यमाने पलद्वयं क्षीयते । अष्टौ त्रपुणि सीसे च शत इत्यनुवर्तते । त्रपुणि सीसे च शतपले प्रताप्यमानेऽष्टौ पलानि क्षीयन्ते । ताम्रे पञ्च दशायसि ताम्रे शतपले पञ्चपलानि । अयसि दशपलानि क्षीयन्ते । अत्रापि शत इत्येव । कांस्यस्य तु त्रपुताम्रयोनित्वात्तदनुसारेण क्षयः कल्प्यः । इतोऽधिकक्षयकारिणः शिल्पिनो दण्ड्याः ॥ १७८ ॥

शाखा २ री.

धान्यादिकांच्या परीक्षाप्रसंगानें सुवर्णादिकांचीहि परीक्षा सांगतो.

मूलार्थ-अग्नीचे ठायीं सोनें आटलें असतां कमी होत नाहीं; रुपें शेंकडा दोन पलें जळतें; त्रपु, शिसें आठ पलें; तांबें पांच पलें; लोखंड दहा पलें जळतें.

टीकार्थ-१ अग्नींत सोनें आटलें असतां कमी होत नाहीं ह्यास्तव कडीं, तोडे वगैरे

सुवर्णादि धातू आटल्या असतां कोणत्या धातूची किती तूट यावी तो प्रकार.

अलंकार करावयासाठीं सोनाराला जितकें वजन करून दिलें असेल तितका अलंकार वजन करून घ्यावा, त्यांत कमती आल्यास तूट भरून घ्यावी, व दंडहि घ्यावा. रुपें आटलें असतां शेंकडा दोन पलें तुटतें. त्रपु, शिसें आठ पलें जळतें. तांबें आटलें तर शेंकडा पांच पलें जळतें. लोखंड आटलें असतां शेंकडा दहा पलें तुटतें. कांसें तर त्रपु व तांबें ह्या दोहोंचें होतें ह्मणून त्याची तूट त्या दोहों धातूंच्या सुमारानें कल्पावी. ह्यापेक्षां अधिक तूट करणारे कारेगारांस दंड करावा. १७८.

---

कश्चित्कम्बलादौ वृद्धिमाह ॥

**शते दशपला वृद्धिरौर्णे कार्पाससौत्रिके ।**

**मध्ये पञ्चपला वृद्धिः सूक्ष्मे तु त्रिपला मता ॥ १७९ ॥**

---

१ गुंजा ३२० ह्मणजे ३ तोळे, ४ मासे,

स्थूले नौर्णसूत्रेण यत्कम्बलादिकं क्रियते तस्मिन् शतपले दशपला वृद्धिर्वेदितव्या । एवं कार्पाससूत्रनिर्मिते पटादौ वेदितव्यम् । मध्ये अनतिसूक्ष्मनिर्मिते पटादौ पञ्चपला वृद्धिः । सूक्ष्मसूत्ररचिते शते त्रिपला वृद्धिर्वेदितव्या । एतच्चाप्रक्षालितवासोविषयम् ॥ १७९ ॥

ऊर्णादिवस्त्राविषयीं वाढ सांगतो.

मूलार्थ–ऊर्णावस्त्र व कापड ह्यांची शेंकडा दहा पलें वाढ. तींच मध्यम असल्यास पांच पलें वाढ, बारीक असल्यास तीन पलें वाढ.

टीकार्थ–२ लोंकरीच्या जाड्या सुताचें कांबळें, धाबळी, इत्यादि विणिलें असतां शेंकडा दहा पलें वाढ. ह्याचप्रमाणें कापसाच्या जाड्यासुताचे कापडाविषयीं जाणावें. मध्यम सुताच्या कापडाची शेंकडा पांच पलें वाढ. बारीक सुताच्या विणलेल्या वस्त्रादिकांस शेंकडा तीन पलें वाढ. हा प्रकार (२ रा अंक) कोऱ्या कापडाविषयीं समजावा. १७९

कोणते कापड विणलें असतां कितीवाढ येते तो प्रकार.

---

द्रव्यान्तरे विशेषमाह ॥

**कार्मिके रोमबन्धे च त्रिंशद्भागः क्षयो मतः ।**
**न क्षयो न च वृद्धिश्च कौशेये वल्कलेषु च ॥ १८० ॥**

कार्मिकं कर्मणा चित्रेण निर्मितम् । यत्र निष्पन्ने पटे चक्रस्वस्तिकादिकं चित्रसूत्रैः क्रियते तत्कार्मिकमित्युच्यते । यत्र प्रावारादौ रोमाणि बध्यन्ते स रोमबद्धः तत्र त्रिंशत्तमो भागः क्षयो वेदितव्यः। कौशेये कोशप्रभवे वल्कलेषु वृक्षत्वङ्निर्मितेषु वसनेषु वृद्धिह्रासौ न स्तः । किंतु यावद्वयनार्थं कुविन्दादिभ्यो दत्तं तावदेव प्रत्यादेयम् ॥ १८० ॥

दुसऱ्या द्रव्यांविषयीं कांहीं विशेष सांगतो.

मूलार्थ– कार्मिक व रोमबद्ध हीं वस्त्रें विणिलीं असतां तिसावा अंश तूट, कौशेय व वल्कलें ह्यांची तर तूट नाहीं व वाढहि नाहीं.

टीकार्थ–३ कार्मिक ह्मणजे कुशलतेनें विणलेलें कापड, ह्मणजे अनेक रंगांच्यां सुतांनीं विणलेलें वस्त्र तयार झालें असतां कमळें झाडें वेलबुटी इत्यादि निष्पन्न होतात असें जें कापड तें, आणि रोमबद्ध ह्मणजे उत्तरीय वस्त्र लोकरीनें विणलें जातें तें, कार्मिक व रोमबद्ध हीं विणलीं असतां तिसावा अंश तूट येते.

४ रेशमी कापड व वल्कलें ह्मणजे वृक्षाचे अंतर साली पासून निर्मिलेलीं वस्त्रें, ह्यांची तूट नाहीं व वाढहि नाहीं; अत एव विणावयाकरितां जितकें वजन करून कोष्टी, साळी इत्यादिकांच्या स्वाधीन केलें असेल तितकें परत घ्यावें. १८०

---

१ जाजम गालिशा सतरंजी हशा पासोडा छीट वगैरे. २ धुशा, शालजोडी वगैरे वस्त्र.

द्रव्यानन्त्यात्प्रतिद्रव्यं क्षयवृद्धिप्रतिपादनाशक्तेः सामान्येन ह्रासवृद्धिज्ञानोपायमाह ॥

**देशं कालं च भोगं च ज्ञात्वा नष्टे बलाबलम् ।**
**द्रव्याणां कुशला ब्रूयुर्यत्तद्दाप्यमसंशयम् ॥ १८१ ॥**

शाणक्षौमादौ द्रव्ये नष्टे ह्रासमुपगते द्रव्याणां कुशलाः द्रव्यवृद्धिक्षयाभिज्ञाः देशं कालमुपभोगं तथा नष्टद्रव्यस्य बलाबलं सारासारतां च परीक्ष्य यत्कल्पयन्ति तदसंशयं शिल्पिनो दाप्याः ॥ इति क्रीतानुशयप्रकरणम् ॥ १८१ ॥

द्रव्याच्या असंख्यपणामुळें प्रत्येक द्रव्याची वाढ तूट सांगतां पुरवत नाहीं ह्मणून सामान्यतः वाढ तूट समजण्याचा उपाय सांगतो.

मूलार्थ– वस्त्रादिद्रव्य विणल्यानंतर तूट आली तर त्या त्या द्रव्याचे जे माहीतगार ते काल, देश, उपभोग व द्रव्याची योग्यता जाणून जितकें सांगतील तितकें देवावें.

टीकार्थ– ९ तागापासून केलेलें कापड व क्षौम इत्यादि वस्त्र, ह्यांत तूट आली असतां त्यांतले जे माहीतगार असतील ते देश, काल, उपभोग व त्या सनगाची योग्यता पाहून जें सांगतील तें कारेगारांकडून देववावें. १८१

---

साम्प्रतमभ्युपेत्याशुश्रूषाख्यमपरं विवादपदमभिधातुमुपक्रमते । तत्स्वरूपं च नारदेनोक्तम् ॥ अभ्युपेत्य तु शुश्रूषां यस्तां न प्रतिपद्यते। अशुश्रूषाभ्युपेत्यैतद्विवादपदमुच्यत इति ॥ आज्ञाकरणं शुश्रूषा तामङ्गीकृत्य पश्चाद्यो न संपादयति तद्विवादपदमभ्युपेत्याशुश्रूषाख्यम् ॥ शुश्रूषकश्च पञ्चविधः । शिष्योऽन्तेवासी भृतकोऽधिकर्मकृद्दास इति तेषामाद्याश्चत्वारः कर्मकारा इत्युच्यन्ते ते च शुभकर्मकारिणः । दासाः पुनर्गृहजातादयः पञ्चदशप्रकाराः गृहद्वाराशुचिस्थानरथ्यावस्करशोधनाद्यशुभकर्मकारिणः। तदिदं नारदेन स्पष्टीकृतम् ॥ शुश्रूषकः पञ्चविधः शास्त्रे दृष्टो मनीषिभिः । चतुर्विधः कर्मकरस्तेषां दासास्त्रिपञ्चकाः ॥ शिष्यान्तेवासिभृतकाश्चतुर्थस्त्वधिकर्मकृत् । एते कर्मकरा ज्ञेया दासास्तु गृहजादयः ॥ सामान्यमस्वतन्त्रत्वमेषामाहुर्मनीषिणः । जातिकर्मकरस्तूक्तो विशेषो वृत्तिरेव च ॥ कर्मापि द्विविधं ज्ञेयमशुभं शुभमेव च । अशुभं दासकर्मोक्तं शुभं कर्मकृतां स्मृतम् ॥ गृहद्वाराशुचिस्थानरथ्यावस्करशोधनम् । गुह्याङ्गस्पर्शनोच्छिष्टविण्मूत्रग्रहणोज्झनम् ॥ इच्छतः स्वामिनश्चाङ्गैरुपस्थानमथो ततः । अशुभं कर्म विज्ञेयं शुभमन्यदतः परमिति ॥ तत्र शिष्यो वेदविद्यार्थी । अन्तेवासी शिल्पशिक्षार्थी । मूल्येन यः कर्म करोति स भृतकः । कर्मकुर्वतामधिष्ठाताधिकर्मकृत् । अशुचिस्थानमुच्छिष्टप्रक्षेपार्थं गर्तादिकम् । अवस्करो गृहमार्जितं पांस्वादिनिचयस्थानम् । उज्झनं त्यागः । भृतकश्चात्र त्रिविधः । तदुक्तम् । उत्तमस्त्वायुधीयोऽत्र मध्यमस्तु कृषीवलः । अधमो भारवाही

स्यादित्येवं त्रिविधो भृत इति ॥ दासः पुनः । गृहजातस्तथा क्रीतो लब्धो दायादुपागतः । अनाकालभृतस्तद्वदाहितः स्वामिना च यः ॥ मोक्षितो महतश्चर्णाद्युद्धप्राप्तः पणे जितः । तवाहमित्युपगतः प्रव्रज्यावसितः कृतः ॥ भक्तदासश्च विज्ञेयस्तथैव वडवाहृतः । विक्रेता चात्मनः शास्त्रे दासाः पञ्चविधाः स्मृताः ॥ गृहे दास्यां जातो गृहजातः । क्रीतो मूल्येन । लब्धः प्रतिग्रहादिना । दायादुपागतः पित्रादिदासः । अनाकालभृतो दुर्भिक्षे यो दासत्वाय मरणाद्रक्षितः । आहितः स्वामिना धनग्रहणेनाधितां नीतः । ऋणमोचनेन दासत्वमभ्युपगतः ऋणदासः। युद्धप्राप्तः समरे विजित्य गृहीतः । पणे जितः यद्यस्मिन् विवादे पराजितोऽहं तदा त्वद्दासो भवामीति परिभाष्य जितः । तवाहमित्युपगतः तवाहं दास इति स्वयं संप्रतिपन्नः । प्रव्रज्यावसितः प्रव्रज्यातश्च्युतः । कृतः एतावत्कालं त्वद्दास इति अभ्युपगमितः। भक्तदासः सर्वकालं भक्तार्थमेव दासत्वमभ्युपगम्य यः प्रविष्टः । वडवाहृतः वडवा गृहदासी तयाहृतः तल्लोभेन तामुद्वाह्य दासत्वेन प्रविष्टः ॥ य आत्मानं विक्रीणीते असावात्मविक्रेतेत्येवं पञ्चदशप्रकाराः ॥ यत्तु मनुना ॥ ध्वजाहृतो भक्तदासो गृहजः क्रीतदत्रिमौ । पैतृको दण्डदासश्च सप्तैते दासयोनय इति सप्तविधत्वमुक्तं तत्तेषां दासत्वप्रतिपादनपरम् न तु परिसंख्यार्थम् । तत्रैषां शिष्यान्तेवासिभृतकाधिकर्मकृद्दासानां मध्ये शिष्यवृत्तिः प्रागेवप्रतिपादिता । आहूतश्चाप्यधीयीत लब्धं चास्मै निवेदयेदित्यादिना ॥ अधिकर्मकृद्भृतकानां तु वेतनादानप्रकरणे वक्ष्यते ॥ यो यावत्कुरुते कर्म तावत्तस्य तु वेतनमित्यादिना ॥

## शाखा १ ली.

आतां अभ्युपेत्याशुश्रूषा ह्या नांवाचें जें व्यवहार प्रकरण त्याचें निरूपण करितो. त्याचें स्वरूप नारद सांगतो.

नारद– १ जो चाकरी पतकरून पुढें ती करीत नाहीं तर त्या विषयीं जो कांहीं वाद प्रवृत्त होतो त्याचें नांव अभ्युपेत्याशुश्रूषा.

२ चाकर पांच प्रकारचा शिष्य, अंतेवासी, भृतक, नायक, आणि दास, त्यांत शिष्यादिक आद्य जे चार ते योग्य काम करणारे, आणि दास पंधरा प्रकारचा तो द्वार, उष्टेखळी, रस्ता, ह्यांचें संमार्जनादि अमंगळ काम करणारा.

नारद हें (वरचें) च स्पष्ट करून दाखवितो.

नारद–सेवक पांच प्रकारचा शास्त्रांत सांगितला आहे त्यांत शिष्य, अंतेवासी, भृतक, नायक, असे चार प्रकार हे कामकरी आणि दास तर गृहजात क्रीत इत्यादिक पंधरा प्रकारचा ह्या पांचासही पारतंत्र्य एकसारिखेंच; जाति, काम आणि वृत्ति हीं मात्र निरनिराळीं आहेत व त्यांचें कामही दोन प्रकारचें अनिंद्य व अमंगल, त्यांत शिष्य, अंतेवासी, भृतक, नायक ह्यांनीं करावयाचें जें काम तें अनिंद्य आणि दासांनीं करावयाचें जें काम तें अमंगल ह्मणजे घर, द्वार, उष्टेखळी, रस्ता ह्यांचें संमार्जन, गुह्यांगस्पर्श, उच्छिष्ट,

विष्ठा, मूत्र हीं घेऊन बाहेर टाकणें व धन्याची इच्छा असल्यास त्याचें आंग रगडणें इत्यादिक हें अमंगल काम ह्मटलें. ह्याहून दुसरें तें सर्व अनिंद्य काम.

शिष्य ह्मणजे वेद(शास्त्र) ह्यांचें अध्ययन करणारा. अंतेवासी ह्मणजे शिल्पशास्त्र शिकणारा. भृतक ह्मणजे मजूर मोलानें काम करणारा. नायक म्हणजे कामगारांवर जे दरोगा ठेवलेला तो. अशुचिस्थान ह्मणजे उष्ट्या पत्रावळी वगैरे टाकण्यासाठीं केलेलं खाड्डा इत्यादिक, अवस्कर ह्मणजे घरांतील केरकचरा इत्यादि टाकण्याचें स्थान (उकिरडा). त्यांत भृतक तीन प्रकारचा— शस्त्रोपजीवी, शेतकरी आणि भारवाहक.

स्मृति–त्यांत शस्त्रोपजीवी उत्तम, शेतकरी मध्यम आणि भारवाहक निकृष्ट.

स्मृति–३ गृहदास, क्रीत, लब्ध, दायप्राप्त, दुर्भिक्षरक्षित, गहाण ठेवलेला, तसाच ऋणमोचित, युद्धप्राप्त, पणजित, स्वयंदास, संन्यासभ्रष्ट, कृतकाल, भक्तदास, तसाच वडवाहृत आणि आत्मविक्रयी, असे पंधरा दास शास्त्रांत सांगितले आहेत.

## वरील स्मृतीचा अर्थ—

(गृहदास) ह्मणजे घरच्या दासीचे ठायीं झालेला. क्रीत ह्मणजे मोल देऊन विकत घेतलेला. लब्ध ह्मणजे प्रतिग्रहादिकेंकरून मिळालेला. दायप्राप्त म्हणजे पित्रादिकांचा दास वांटणींत आलेला. दुर्भिक्षरक्षित ह्मणजे आपलें दास्य करावें एतदर्थ दुकाळांत मरणापासून रक्षिलेला. गहाण ठेवलेला म्हणजे ऋण फिटेपर्यंत उत्तमर्णाचा दास होतो तो. ऋणमोचित ह्मणजे ऋणापासून मुक्त केल्यामुळें दास्य पतकरून राहिलेला. युद्धप्राप्त ह्मणजे युद्धांत जिंकून आणलेला. पणजित ह्मणजे जर ह्या वादांत पराजय पावेन तर तुझा दास होईन असा प्रतिज्ञापूर्वक वादांत पराजित झालेला दास होतो तो. स्वयंदास ह्मणजे जो स्वतांच दास्य पतकरून राहिलेला. संन्यासभ्रष्ट ह्मणजे संन्यास धर्मापासून भ्रष्ट झालेला (आमरणपर्यंत राजाचा) दास होतो. कृतकाल ह्मणजे इतके दिवसपर्यंत तुझा दास होईन असा करार करून राहिलेला. भक्तदास ह्मणजे जो सर्वकाळ अन्नासाठीं दास्य पतकरून राहिलेला. वडवाहृत ह्मणजे, वडवा म्हणजे घरची दासी तिच्या लोभानें तिशीं लग्न लावून दास्य पतकरून राहिलेला. आत्मविक्रयी म्हणजे आपणास विकून घेणारा. असे पंधरा प्रकार सांगितले आहेत.

मनु–४ ध्वजाहृत, भक्तदास, गृहदास, क्रीत, स्वयंदास, दायप्राप्त, दंडदास, ह्मणजे पणजित, असे हे सात दास ह्मटले आहेत.

असे जे मनूनें सात दास सांगितले ते, ह्यांस दास्यत्व आहे असें समजण्यासाठीं, केवळ सातां पेक्षां अधिक दास नाहींत असें सांगण्यासाठीं नव्हे.

हे जे शिष्य, अंतेवासी, भृतक, नायीक, दास, वर सांगितले, त्यांत शिष्यांची वृत्ति तर पूर्वींच (आचाराध्यायांत) "गुरूनें बोलाविलें असतां अध्ययन करावें आणि ह्मट-

लेल्याची परीक्षा घ्यावी, " इत्यादिकेंकरून सांगितली आहे. नायीक व भृतक ह्यांची वृत्ति पुढें ( वेतनादानप्रकरणीं आठव्या अंकाचे मूळांत ) "जो जितकें काम करितो त्याप्रमाणें त्यास वेतन (पगार)" इत्यादिक सांगितली आहे. १८१

---

दासान्तेवासिनोस्तु धर्मविशेषं वक्तुमाह ॥

**बलाद्दासीकृतश्चौरैर्विक्रीतश्चापिमुच्यते ।**

**स्वामिप्राणप्रदोभक्तत्यागात्तन्निष्क्रयादपि ॥ १८२ ॥**

बलात् बलावष्टम्भेन यो दासीकृतः । यश्चौरैरपहृत्य विक्रीतः । अपिशब्दादाहितो दत्तश्च स मुच्यते । यदि स्वामी न मुञ्चति तर्हि राज्ञा मोचयितव्यः ॥ उक्तं च नारदेन । चौरापहृतविक्रीता ये च दासीकृता बलात् । राज्ञा मोचयितव्यास्ते दास्यं तेषु हि नेष्यते इति ॥ चौरव्याघ्राद्यवरुद्धस्य स्वामिनः प्राणान् यः प्रददाति रक्षत्यसावपि मोचयितव्यः । तदिदं सर्वदासानां साधारणं दास्यनिवृत्तिकारणम् ॥ यो वैषां स्वामिनं कश्चिन्मोचयेत्प्राणसंशयात् । दासत्वात्स विमुच्येत पुत्रभागं लभेत चेति नारदस्मरणात् ॥ भक्तदासादीनां प्रातिस्विकमपि मोक्षकारणमुच्यते ॥ अनाकालभृतभक्तदासौ भक्तस्य सागाद्दासभावादारभ्य स्वामिद्रव्यं यावदुपभुक्तं तावद्दत्वा मुच्येते ॥ आहितर्णदासौ तु तन्निष्क्रयात् ॥ यद्गृहीत्वा स्वामिना आहितो यश्च दत्वा धनिनोत्तमर्णान्मोचितस्तस्य निष्क्रयात्सवृद्धिकस्य प्रत्यर्पणान्मुच्येते ॥ नारदेन विशेषोऽप्युक्तः ॥ अनाकालभृतो दासान्मुच्यते गोयुगं ददत् । संभक्षितं यद्दुर्भिक्षे न तच्छुद्ध्येत कर्मणा ॥ भक्तस्योत्क्षेपणात्सद्यो भक्तदासः प्रमुच्यते । आहितोपि धनं दत्वा स्वामी यद्येनमुद्धरेत् ॥ ऋणं तु सोदयं दत्वा ऋणी दास्यात्प्रमुच्यत इति ॥ तथा तवाहमित्युपगतयुद्धप्राप्तपणजितकृतकवडवाहृतानां च प्रातिस्विकं मोचनकारणं च तेनैवोक्तम् ॥ यथा तवाहमित्युपगतो युद्धप्राप्तः पणेजितः ॥ प्रतिशीर्षप्रदानेन मुच्येरंस्तुल्यकर्मणा ॥ कृतकालव्युपगमात्कृतकोपि विमुच्यते । निग्रहाद्वडवायास्तु मुच्यते वडवाहृत इति ॥ दासेन सह संभोगनिरोधादित्यर्थः॥ तदेवं गृहजातक्रीतलब्धदायप्राप्तात्मविक्रयिणां स्वामिप्राणप्रदानतत्प्रसादरूपसाधारणकारणव्यतिरेकेण मोक्षो नास्ति । विशेषकारणानभिधानात्॥दासमोक्षश्चानेन क्रमेण कर्तव्यः। स्वं दासमिच्छेद्यः कर्तुमदासं प्रीतमानसः । स्कन्धादादाय तस्यासौ भिन्द्यात्कुम्भं सहाम्भसा ॥ साक्षताभिः सपुष्पाभिर्मूर्द्धन्यद्भिरवाकिरेत् । अदास इत्यथोक्त्वात्रिः प्राङ्मुखं तमवासृजेदिति तेनैवोक्तम् ॥ १८२ ॥

आतां दास व अंतेवासी ह्यांच्या वृत्तीविषयीं कांहीं विशेष ( निर्णय ) सांगतो.

मूलार्थ—जबरीनें केलेला दास व चोरांनीं हरण करून विकलेला व धन्याचे प्राणसंर-

क्षण करणारा हे दास ( दासपणांतून ) मुक्त होतात. **भक्तदास धन्याचें जें अन्न खाल्लें** असेल तें फेडल्यानें व दुसरेहि दास ते ते निष्क्रय दिल्यानें मुक्त होतात.

**टीकार्थ**—५ जुलमानें गुलाम केलेला, व चोरांनीं हरण करून विकलेला, गहाण ठेव-लेला, किंवा दिलेलाहि धन्यानें मुक्त करावा.

जर धनी त्यास मुक्त करीत नाहीं तर सरकारानें धन्याकडून मुक्त करवावा.

**नारद**—चोरांनीं हरण करून विकलेले व जे जुलमानें गुलाम केलेले ते सरकारानें ( धन्याकडून ) सोडवावे. कारण, त्यांवर त्यांचें दासत्व नाहीं.

६ चोर वाघ इत्यादिकांचे अडचणींत सांपडलेल्या धन्याचे प्राण जो वांचवितो तोहि दासत्वापासून सूट पावतो.

धन्याचें प्राणसंरक्षण करणें व तसें केल्यामुळें दासत्वापासून सूट पावणें हें सर्व दासां-विषयीं एकसारखेंच आहे. ( कारण )

**नारद**—ह्या ( पूर्वोक्त ) पंधरा दासांतून जो कोणी धन्याला प्राणसंकटापासून मुक्त करितो तो दासत्वापासून मुक्त होऊन पुत्राबरोबर विभाग पावतो.

भक्तदासादिकांचेंहि दासत्वापासून सूट पावण्याविषयीं प्रत्येकांचें
निरनिराळें ( दुसरें ) कारण सांगतो.

७ **दुर्भिक्षरक्षित**, भृतक व **भक्तदास** ह्या तिघांनीं दासत्वास आरंभ करून जितकें धन्याचें अन्न खाल्लें असेल तितकें दिलें ह्मणजे ते मुक्त होतात. गहाण ठेवलेला दास तर जितकें धन घेऊन धन्यानें गहाण ठेविला असेल तितकें धन दिल्यानें सूट पावतो.

**ऋणदास**हि, जितकें द्रव्य देऊन धन्यानें सावकारापासून सोडविला असेल ति-तकें द्रव्य सव्याज धन्याचें दिलें ह्मणजे सूट पावतो.

नारद तर ( सूट पावण्याविषयीं ) आणखी विशेष ( प्रकार ) सांगतो.

**नारद**— ८ **दुर्भिक्षरक्षित** दासानें जें दुर्भिक्षांत भक्षिलें असेल तें देऊन आणखी ध-न्याला दोन गाई द्याव्या ह्मणजे मुक्त होतो. कारण, दुर्भिक्षांत पोषण केलें हे धन्याचे उपकार केवळ चाकरीनेंच फिटत नाहींत. **भक्तदास** तर जेव्हां भक्षिलेलें अन्न देईल तेव्हां मुक्त होतो. गहाण ठेविलेला दासहि जेव्हां धनी गहाण सोडवील तेव्हां मुक्त होतो. **ऋणदास** सव्याज कर्ज दिल्यानें दासत्वापासून मुक्त होतो. **स्वयंदास**, **युद्धप्राप्त**, **पण-जित**, हे आपल्या सारिखा काम करणारा असा बदल्या दिल्यानें दासत्वापासून मुक्त होतात. **कृतकाल** दास तर मुदत भरल्यानंतर मुक्त होतो. **वडवाहृत** दास तर तिशीं त्यानें संगनिरोध केला ह्मणजे दासत्वापासून सूट पावतो.

९ **गृहदास**, **क्रीत**, **लब्ध**, **दायप्राप्त**, आणि **आत्मविक्रयी ह्यांस**. सूट पावण्या-विषयीं विशेष कारण सांगितलें नाहीं. अतएव धन्याचें प्राणसंकटापासून संरक्षण करणें अथवा त्याची प्रीति संपादन करणें हेंच सुटण्याविषयीं साधन आहे; ह्याशिवाय दुसरें साधन नाहीं.

दासाला सूट देण्याचा प्रकारहि तोच सांगतो.

**नारद**– १० जो धनी संतोषानें आपल्या दासाला सूट देऊं इच्छितो त्यानें दासाकडून खांद्यावरून जलानें भरलेला कुंभ घेववून फोडावा. आणि अक्षता, पुष्पें, उदक, हीं त्याचे मस्तकीं शिंपडून 'आतां तूं माझा दास नाहींस' असें त्रिवार बोलून पूर्वाभिमुख त्याचा उत्सर्ग करावा. १८२

दासाला सूट देण्याचा विधि.

---

प्रव्रज्यावसितस्य तु मोक्षो नास्तीत्याह ॥

## प्रव्रज्यावसितो राज्ञो दास आमरणान्तिकम् ।

**प्रव्रज्या संन्यासस्ततोऽवसितः प्रच्युतः । अनभ्युपगतप्रायश्चित्तश्चेद्राज्ञ एव दासो भवति । मरणमेव तद्दासत्वस्यान्तोऽन्यस्मिन् काले न मोक्षोऽस्ति ॥**

संन्यासभ्रष्ट दासाला तर मुक्तताच नाहीं असें ( अर्ध्या वचनेंकरून ) सांगतो.

**मूलार्थ**– संन्यासधर्मापासून भ्रष्ट झालेला आमरणांत राजाचा दास होतो.

**टीकार्थ**– ११ संन्यासधर्मापासून भ्रष्ट झालेला जर प्रायश्चित्त स्वीकारीत नाहीं तर मरणपर्यंत राजाचाच तो दास होऊन राहतो. मध्यें त्याची मुक्तता नाहीं.

संन्यासधर्मापासून भ्रष्ट झालेला राजाचा दास होतो.

वर्णापेक्षया दास्यव्यवस्थामाह ॥

## वर्णानामानुलोम्येन दास्यं न प्रतिलोमतः ॥ १८३ ॥

**ब्राह्मणादीनां वर्णानामानुलोम्येन दास्यम् । ब्राह्मणस्य क्षत्रियादयः । क्षत्रियस्य वैश्यशूद्रौ । वैश्यस्य शूद्र इत्येवमानुलोम्येन दासभावो भवति ॥ न प्रातिलोम्येन ॥ स्वधर्मत्यागिनः पुनः परिव्राजकस्य प्रातिलोम्येनापि दासत्वमिष्यत एव ॥ यथाह नारदः । वर्णानां प्रातिलोम्येन दासत्वं न विधीयते । स्वधर्मत्यागिनोऽन्यत्र दारवद्दासता मतेति ॥ १८३॥**

वर्णांच्या अनुलोमक्रमानें दास करण्याची व्यवस्था सांगतो.

**मूलार्थ**– **वर्णांच्या अनुलोम** जातीचा दास करावा; **प्रतिलोम** जातीचा करूं नये.

**टीकार्थ**– १२ ब्राह्मणादि वर्णांच्या **अनुलोम** जातीचे दास म्हणजे ब्राह्मणाचे क्षत्रियादिक दास, क्षत्रियाचे वैश्य शूद्र, वैश्याचा शूद्र[१] ह्याप्रमाणें दास होतात.

निकृष्ट जातीनें उत्कृष्ट जातीचें दास्य करावें.

**प्रतिलोम** जातीचा दास होत नाहीं. स्वधर्मापासून भ्रष्ट असा जो संन्यासी तो तर **प्रतिलोम** जातीचा दास होतो ( ह्यास प्रमाण ).

---

१ शूद्रापेक्षां पलीकडे निकृष्ट वर्ण नाहीं म्हणून शूद्राचा शूद्रच दास होतो.

नारद- वर्णाच्या प्रतिलोम जातीचें दासत्व होत नाहीं, परंतु संन्यासभ्रष्ट दासाशिवाय इतर दासांचें दास्य भार्येसारिखें आहे. १८३

---

अन्तेवासिधर्मानाह ॥

**कृतशिल्पोऽपि निवसेत्कृतकालं गुरोर्गृहे ।**
**अन्तेवासी गुरुप्राप्तभोजनस्तत्फलप्रदः ॥ १८४ ॥**

अन्तेवासी गुरोर्गृहे कृतकालं वर्षचतुष्टयमायुर्वेदादिशिल्पशिक्षार्थं त्वद्गृहे वसामीति यावदङ्गीकृतं तावत्कालं वसेत् । यद्यपि वर्षचतुष्टयादर्वागेव लब्धापेक्षितशिल्पविद्यः कथं निवसेत् । गुरुप्राप्तभोजनः गुरोः सकाशात् प्राप्तं भोजनं येन स तथोक्तः । तत्फलप्रदः तस्य शिल्पस्य फलमाचार्याय प्रददातीति तत्फलप्रदः । एवंभूतो वसेत् ॥ नारदेन विशेषोप्यत्र दर्शितः । स्वशिल्पमिच्छन्नाहर्तुं बान्धवानामनुज्ञया । आचार्यस्य वसेदन्ते कृत्वा कालं सुनिश्चितम् ॥ आचार्यः शिक्षयेदेनं स्वगृहे दत्तभोजनम् । न चान्यत्कारयेत्कर्म पुत्रवच्चैनमाचरेत् ॥ शिक्षयन्तमसन्दुष्टं य आचार्यं परित्यजेत् । बलाद्वासयितव्यः स्याद्वधबन्धौ च सोऽर्हति ॥ शिक्षितोपि कृतं कालमन्तेवासी समाप्नुयात् । तत्र कर्म च यत्कुर्यादाचार्यस्यैव तत्फलम् ॥ गृहीतशिल्पः समये कृत्वाचार्यं प्रदक्षिणम् । शिक्षितश्चानुमान्यैनमन्तेवासी निवर्तत इति ॥ वधशब्दोऽत्र ताडनार्थः दोषस्याल्पत्वात् । इत्यभ्युपेत्याशुश्रूषाख्यं विवादपदम् १८४

अंतेवासीनें कसें वर्तावें तें सांगतो.

**मूलार्थ**- शिल्पशास्त्राची विद्या पूर्ण झाली तरी नियमित काळपर्यंत अंतेवासीनें गुरुच्या घरीं भोजन करून रहावें, आणि शिकलेल्या शिल्पविद्येचें फल गुरूला द्यावें.

**टीकार्थ**- १३ अंतेवासीनें गुरूच्या घरीं नियमित काळपर्यंत ह्मणजे "चार वर्षें शिल्प शास्त्र शिकण्यासाठीं तुझ्या घरीं राहीन, असा करार मुदती पर्यंत" रहावें. जरी करार मुदतीचे आंतच अपेक्षितविद्या पूर्ण झाली तरी मुदत भरेपर्यंत त्याचे घरीं जेवून व शिकलेल्या शिल्पाचें [2]फल गुरूला देऊन रहावें.

शिल्प शास्त्र शिकणारानें गुरूच्या घरीं कसें वर्तावें तो प्रकार.

नारद याविषयीं विशेष सांगतो.

**नारद**- १४ शिल्पविद्या संपादनाविषयीं प्रवृत्त जो त्यानें माता पिता इत्यादिकांची आज्ञा घेऊन करार मुदतपर्यंत गुरूच्या घरीं रहावें. गुरूनेंहि आपल्या घरीं भोजन देऊन

---

१ भार्येसारिखें म्हणजे, भार्या जशा अनुलोम जातीच्या आहेत (ह्याचा विशद प्रकार दायविभाग प्रकरणी १६ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत पहावा.) तसें दासत्व नाहीं.

२. फल म्हणजे असें; पांचा वर्षांचा करार करून राहिलेला असतां तिहीं वर्षांचे आंत विद्या पूर्ण झाली तर पुढें दोन वर्षें त्याच घरीं जेवून फुकट शिल्पकर्म करावें किंवा शिल्पकर्मानें जें मिळेल तें.

पुत्राप्रमाणें त्याश प्रीतीनें वर्तवावें, व त्याला दुसरें काम सांगूं नये, व आस्थेनें विद्या सांगणारा व सुशील अशा गुरूचा जो त्याग करितो त्याला ( राजानें ) बलात्कारानें गुरुगृहीं दास करून ठेवावें. (न राहील तर) ताडन व बंधन ह्या शिक्षेस योग्य होतो. कृतविद्य झाला तरी करार मुदत भरेपर्यंत तेथेंच रहावें. आणि त्या मुदतींत जें काम करील त्याचें फल गुरूला द्यावें. शिल्पविद्या पूर्ण होऊन करार मुदत भरल्यावर गुरूला प्रदक्षिणा घालून स्वगृहीं जावें, व गुरूनेंही त्यास अनुमोदन द्यावें. १८४

---

## संविद्व्यतिक्रम प्रकरण १५ वें.

संप्रति संविद्व्यतिक्रमः कथ्यते ॥ तस्य च लक्षणं नारदेन व्यतिरेकमुखेन दर्शितम् । पाखण्डनैगमादीनां स्थितिः समय उच्यते । समयस्यानपाकर्म तद्विवादपदं स्मृतमिति ॥ पारिभाषिकधर्मेण व्यवस्थानं समयस्तस्यानपाकर्माव्यतिक्रमः परिपालनं तद्व्यतिक्रम्यमाणं विवादपदं भवतीत्यर्थः ॥

### शाखा १ ली.

आतां संविद्व्यतिक्रम संज्ञक व्यवहाराचें निरूपण करितो; त्याचें स्वरूप नारद व्यतिरेकद्वारा सांगतो.

संविद्व्यतिक्रमाचें स्वरूप.

नारद— १ पाखंड नैगम इत्यादिकांची जी स्थिति तिला समय म्हटलें आहे. त्या समयाचें ( ह्मणजे मर्यादेचें किंवा कराराचें ) उल्लंघन करूं नये, असें आहे अतएव त्या समयाचें उल्लंघन झालें असतां जो व्यवहार त्यास संविद्व्यतिक्रम म्हटलें आहे.

( बहुसंमतीनें ) नियम करून त्या नियमाप्रमाणें जी व्यवस्था चालणें तो समय ( अथवा संविद् ) म्हटला आहे. त्या समयाचें पालन करावें, ह्मणजे त्याचें उल्लंघन करूं नये, आणि जर उल्लंघन करील तर जो व्यवहार तें संविद्व्यतिक्रमनामक विवादपद होतें, असा त्या वचनाचा अर्थ समजावा.

---

तदुपक्रमार्थं किंचिदाह ॥

**राजा कृत्वा पुरे स्थानं ब्राह्मणान्न्यस्य तत्र तु ।**
**त्रैविद्यं वृत्तिमद्ब्रूयात्स्वधर्मः पाल्यतामिति ॥ १८५ ॥**

राजा स्वपुरे दुर्गादौ स्थानं धवलगृहादिकं कृत्वा तत्र ब्राह्मणान् न्यस्य स्थापयित्वा तद्ब्राह्मणव्रातं त्रैविद्यं वेदत्रयसंपन्नं वृत्तिमद्भूहिरण्यादिसंपन्नं च कृत्वा स्वधर्मो वर्णाश्रमनिमित्तः श्रुतिस्मृतिविहितो भवद्भिरनुष्ठीयतामिति तान् ब्राह्मणान् ब्रूयात् ॥ १८५ ॥

त्याचे उपक्रम समजण्यासाठीं कांहीं सांगतो.

**मूलार्थ**– राजानें नगरांत (एक) स्थल नेमून त्यांत त्रैविद्य अशा ब्राह्मणांस वृत्ति देऊन ठेवावें आणि सांगावें कीं, तुह्मी स्वधर्मसंरक्षण करावें.

**टीकार्थ**–२ राजानें, ज्यांत स्वच्छ शुभ्र घरें बांधिलेलीं असें आपल्या नगरांत (अथवा किल्यांत) एक स्थळ करून त्यांत ब्राम्हणांचा समुदाय ठेवून त्यांजकडून वेदत्रय इत्यादिकांचें अध्ययन करवावें, व अध्यापन करवून सकल विद्या संपन्न होतील असें करून त्यांस अग्रहार वर्षासनें देऊन सांगावें कीं तुह्मीं वर्ण, व आश्रम, व श्रुति, व स्मृति, ह्यांस विहित अशा स्वधर्मांचें संरक्षण करावें. १८५.

राजानें ब्राम्हणांस वर्षासनें अग्रहार देऊन स्वधर्म संरक्षणाविषयीं नेमावें.

---

एवं नियुक्तैस्तैर्यत्कर्म कर्तव्यं तदाह ॥

**निजधर्माविरोधेन यस्तु सामयिको भवेत् ।**
**सोऽपि यत्नेन संरक्ष्यो धर्मो राजकृतश्च यः ॥ १८६ ॥**

श्रौतस्मार्तधर्मानुपमर्देन समयान्निष्पन्नो यो धर्मो गोप्रचारोदकरक्षणदेवगृहपालनादिरूपः सोपि यत्नेन पालनीयः। तथा राज्ञा च निजधर्माविरोधेनैव यः सामयिको धर्मो यावत्पथिकं भोजनं देयमस्मदरातिमण्डलं तुरङ्गादयो न प्रस्थापनीया इत्येवं रूपः सोपि रक्षणीयः ॥ १८६ ॥

असे स्वधर्मसंरक्षणाविषयीं नियुक्त जे त्यांनीं काय करावें तें सांगतो.

**मूलार्थ**–आपल्या धर्माच्या अविरोधानें जो सामयिक धर्म होईल तो, व जो राजानें केलेला धर्म तोहि यत्नानें संरक्षित करावा.

**टीकार्थ**–३ जेणेंकरून श्रौतस्मार्त धर्माचा उपमर्द न होईल अशा मर्यादेनें स्थापलेला, जसा गाई चारणें, पानपोई, देवगृह इत्यादिकांचें संरक्षण इत्यादिरूप जो सामयिक धर्म, तसाच स्वधर्मास विरोध न होतां जो अन्नसत्र, आमच्या शत्रुमंडलांत अश्वादिक पाठवूं नयेत असा राजानें केलेला धर्म (कायदा), तोहि आस्थेनें रक्षित करावा १८६.

स्वधर्म राखून समूहधर्म व राजधर्महीं रक्षावा.

---

एवं समयधर्मः परिपालनीय इत्युक्त्वा तदतिक्रमादौ दण्डमाह ॥

**गणद्रव्यं हरेद्यस्तु संविदं लङ्घयेच्च यः ।**
**सर्वस्वहरणं कृत्वा तं राष्ट्राद्विप्रवासयेत् ॥ १८७ ॥**

यः पुनर्गणस्य ग्रामादिजनसमूहस्य संबन्धि साधारणं द्रव्यमपहरति । संवित्समयस्तां समूहकृतां राजकृतां वा यो लङ्घयेदतिक्रामेत्तदीयं सर्वं धनमपहृत्य स्वराष्ट्राद्वि-

प्रवासयेन्निष्कासयेत् । अयं च दण्डोऽनुबन्धाद्यतिशये द्रष्टव्यः ॥ अनुबन्धाल्पत्वे तु यो ग्रामदेशसंघानां कृत्वा सत्येन संविदम् । विसंवदेन्नरो लोभात्तं राष्ट्राद्विप्रवासयेत् । निगृह्यदापयेदेनं समयव्यभिचारिणम् । चतुःसुवर्णं षण्निष्कं शतमानं च राजतमिति मनुप्रतिपादितदण्डानां निर्वासनचतुःसुवर्णषण्निष्कशतमानानां चतुर्णामन्यतमो जातिशक्त्याद्यपेक्षया कल्पनीयः ॥ १८७ ॥

## शाखा २ री.

अशा समयधर्माचें संरक्षण करावें असें सांगून त्याचें उल्लंघनादि केलें असतां दंड सांगतो.

**मूलार्थ**– जो गणद्रव्याचें हरण करितो व सामयिक धर्माचें जो उल्लंघन करितो त्याचें सर्वस्व हरण करून त्यास राष्ट्रांतून घालवावें.

**टीकार्थ**– १ **गणद्रव्य** म्हणजे ग्रामादि जनसमूहाचें जें सामायिक द्रव्य त्याचा जो अपहार करितो व समूहानें केलेला जो **सामयिक** धर्म व राजानें केलेला धर्म ( कायदा ) त्याचें जो उल्लंघन करितो त्याचें सर्वस्व हरण करून त्याला आपल्या देशांतून हाकून द्यावें. म्हणजे हद्दपार करावें.

गणद्रव्याच्या हरण करणारास हद्दपार करावें.

हा जो ( वरचा ) दंड सांगितला तो अपराध मोठा असल्यास योजावा.

सामान्य अपराधाविषयीं तर मनु सांगतो.

**मनु**– २ ग्रामजनसमूह, देशजनसमूह, ह्यांशीं जो शपथ करून व योग्य ठराव झाल्यानंतर लोभानें विरुद्ध वागेल त्याला हद्दपार करावें. किंवा ४ **सुवर्ण**, ६ **निष्क**, १०० **राजत** दंड करावा.

असें मनूनें सांगितलेलें जें हद्दपार करणें, ४ **सुवर्ण**, ६ **निष्क**, १०० **राजत** ह्या चार दंडांतून एकादा दंड; जाति शक्ति ह्यांच्या तारतम्यानें योजावा १८७.

---

इदं च तैः कर्तव्यमित्याह ॥

### कर्तव्यं वचनं सर्वैः समूहहितवादिनाम् ।

गणिनां मध्ये ये समूहहितवादनशीलास्तद्वचनमितरैर्गणानामन्तर्गतैरनुसरणीयम् ॥

आतां त्या नेमलेल्या लोकांनीं काय करावें तें (अर्ध्या वचनेंकरून) सांगतो.

**मूलार्थ**– **समूहशुभचिंतकांचें** वचन सर्वांनीं मानावें.

**टीकार्थ**– ३ त्या **गणांमध्यें** जे **समूहशुभचिंतक** असतील त्यांचें वचन त्या मंडळींतले जे दुसरे पुरुष त्यांनीं मान्य करावें.

---

१ गण म्हणजे १ त्या शाखेच्या २ अंकांत सांगितलेली व तशीच गांवानें किंवा देशानें नेमलेली मंडळी.

अन्यथा दण्ड इत्याह ॥

**यस्तत्र विपरीतः स्यात्स दाप्यः प्रथमं दमम् ॥ १८८ ॥**

यस्तु गणिनां मध्ये समूहहितवादिवचनप्रतिबन्धकारी स राज्ञा प्रथमसाहसं दण्डनीयः ॥ १८८ ॥

( वर सांगितल्याप्रमाणें ) मान्य न केल्यास ( उत्तरार्धेंकरून ) दंड सांगतो.

मूलार्थ– त्यांमध्यें जो विपरीत वागेल त्यास प्रथम साहस दंड करावा.

टीकार्थ–४ जो त्या मंडळीमध्यें समूहशुभचिंतकांचें वचन मानीत नाहीं त्याला राजानें प्रथम साहस दंड करावा. १८८

---

राज्ञा चेत्थं गणिषु वर्तनीयमित्याह ॥

**समूहकार्य आयातान्कृतकार्यान् विसर्जयेत् ।**
**स दानमानसत्कारैः पूजयित्वा महीपतिः ॥ १८९ ॥**

समूहकार्यनिवृत्त्यर्थं स्वपार्श्वं प्राप्तान् गणिनो निर्वर्तितात्मीयप्रयोजनान् दानमानसत्कारैः स राजा परितोष्य विसर्जयेत् ॥ १८९ ॥

शुभचिंतकांचे गणाविषयीं राजानें कसें वर्तावें तें सांगतो.

मूलार्थ– गणाचें कार्यासाठीं आलेले जे त्यांस राजानें कृतकार्य करून व दानमानें-करून सत्कार करून पाठवावें.

टीकार्थ–५ ग्रामादिजनसमूह किंवा देशजनसमूह ह्यांचे कार्यसिद्ध्यर्थ आपणाकडे आलेले जे महाजन, त्यांस कृतकार्य करून व दानमानसत्कारेंकरून संतुष्ट करून परत पाठवावें. १८९

---

समूहदत्तापहारिणं प्रत्याह ॥

**समूहकार्यप्रहितो यल्लभेत तदर्पयेत् ।**
**एकादशगुणं दाप्यो यद्यस्मै नार्पयेत्स्वयम् ॥ १९०**

समूहकार्यार्थं महाजनैः प्रेरितो राजपार्श्वे यद्धिरण्यवस्त्रादिकं लभते तदप्रार्थित एव महाजनेभ्यो निवेदयेत् । अन्यथा लब्धादेकादशगुणं दण्डं दापनीयः १९०

गणास दिलेलें जें ( वस्त्रादिक ) त्याचा अपहार करणाऱ्याविषयीं सांगतो.

मूलार्थ– मंडळीचे कार्यसिद्ध्यर्थ पाठविलेला जो त्यास जें मिळेल तें त्यानें अर्पण करावें. जर तो स्वतः अर्पण करीत नाहीं तर ११ पट दंड करावा.

टीकार्थ– ६ मंडळीचें कार्यसिद्ध्यर्थ महाजनांनीं राजाकडे पाठविलेला जो त्याला जें

राजापासून वस्त्रहिरण्यादिक मिळतें तें न मागतां त्यानें महाजनांस निवेदित करावें, करीत नाहीं तर लाभाचे ११ पट दंड करावा. १९०

---

एवंप्रकाराश्च कार्यचिन्तकाः कार्या इत्याह ॥

**धर्मज्ञाः शुचयोऽलुब्धा भवेयुः कार्यचिन्तकाः ॥**
**कर्तव्यं वचनं तेषां समूहहितवादिनाम् ॥ १९१ ॥**

श्रौतस्मार्तधर्मज्ञाः बाह्याभ्यन्तरशौचयुक्ताः अर्थेष्वलुब्धाः कार्यविचारकाः कर्तव्याः । तेषां वचनमितरैः कार्यमित्येतदादरार्थं पुनर्वचनम् ॥ १९१ ॥

ते शुभचिंतक कसे असावेत तें सांगतो.

**मूलार्थ**–धर्मज्ञ, शुचि, निर्लोभी, असे ते शुभचिंतक नेमावे आणि त्यांचें वचन इतर सर्वांनीं मानावें.

**टीकार्थ**–७ धर्म ह्मणजे श्रौतस्मार्त धर्म जाणणारे, शुचि ह्मणजे सबाह्याभ्यंतर पवित्र, द्रव्याविषयीं निर्लोभी, असे जे पुरुष असतील ते शुभचिंतक करावे. (हा विधि सांगितला.) आणि त्यांचें वचन इतरांनीं मानावें, असें पुनः सांगितलें तें आवश्यकता दाखविण्यासाठीं. १९१

शुभचिंतक गुणशीलसंपन्न असावे.

---

इदानीं त्रैविद्यानां प्रतिपादितं धर्मं श्रेण्यादिष्वतिदिशन्नाह ॥

**श्रेणिनैगमपाखण्डिगणानामप्ययं विधिः ॥**
**भेदं चैषां नृपो रक्षेत्पूर्ववृत्तिं च पालयेत् ॥ १९२ ॥**

एकपण्यशिल्पोपजीविनः श्रेणयः । नैगमाः ये वेदस्याप्तप्रणीतत्वेन प्रामाण्यमिच्छन्ति । पाशुपतादयः ॥ पाखण्डिनो ये वेदस्य प्रामाण्यमेव नेच्छन्ति नग्नाः सौगतादयः । गणो व्रातः आयुधीयादीनामेककर्मोपजीविनामेषां चतुर्विधानामप्ययमेव विधिः । यो निजधर्माविरोधेनेत्यादिना प्रतिपादितः । एतेषां च श्रेण्यादीनां भेदं धर्मव्यवस्थां नृपो रक्षेत् । पूर्वोपात्तां वृत्तिं च पालयेत् । इति संविद्व्यतिक्रमप्रकरणम् ॥ १९२ ॥

आतां त्रैविद्यांविषयीं जो विचार सांगितला त्याचा अतिदेश, श्रेणी पूग इत्यादिकांचे ठायींहि सांगतो.

**मूलार्थ**–श्रेणी, निगमवादी, पाखंडी, गण, ह्यांविषयींहि हाच प्रकार जाणावा व राजानें ह्यांच्या भेदाचें रक्षण करावें आणि त्यांची क्रमागत वृत्तिहि तशीच चालवावी.

**टीकार्थ**–८ श्रेणी; निगमवादी ह्मणजे जे, वेद आप्तानें सांगितलेला आहे

ज्या ज्या धर्माचे जे असतील त्यांचा तो धर्म व प्राचीन वृत्तिही पूर्ववत् चालवावी.

दाला प्रमाण मानितात ते; पाशुपत इत्यादिक; पाखंडी ह्मणजे वेद प्रमाणच मानीत नाहींत ते; दिगंबर, सौगत इत्यादिक; गण ह्मणजे हत्यारबंद इत्यादिक; जे एका कामावर उपजीवन करणारे; ह्या चौघांचाहि हाच ( १ ल्या शाखेच्या १ ल्या अंकापासून एथपर्यंत सांगितलेला ) प्रकार जाणाना. आणि ह्यांची धर्मव्यवस्था व त्यांची त्यांची प्राचीन वृत्ति असेल तीहि तशीच चालवावी. १९२

---

## वेतनादान प्रकरण १६ वें.

संप्रति वेतनस्यानपाकर्माख्यं व्यवहारपदं प्रस्तूयते ॥ तत्स्वरूपं च नारदेनोक्तम्॥ भृत्यानां वेतनस्योक्तो दानादानविधिक्रमः । वेतनस्यानपाकर्म तद्विवादपदं स्मृतमिति । अस्यार्थः । भृत्यानां वेतनस्य वक्ष्यमाणश्लोकैरुक्तो दानादानविधिक्रमो यत्र विवादपदे तद्वेतनस्यानपाकर्मेत्युच्यते । तत्र निर्णयमाह ॥

---

१ इत्यादिक म्हणजे कापालिक, तेच सोम सिद्धांती हेहि पाशुपतांतील भेद आहेत. हे सेश्वरवादी. ह्यांचा वेष, हातांत नरकपाल, गळ्यांत हाडांच्या माळा, स्मशानवास, नरकपालांत भिक्षा व भोजनही. ह्यांची उपास्यदेवता भैरवरूपी शिव उपासना; भैरव देवतोद्देशकरून मांस, सुरा ह्यांचा होम; पशु इत्यादिकांचें बलिदान व त्यांचें मांसभक्षण अशा उपासनेनें शिवसारूप्य मोक्ष होतो. जगतांतले पदार्थ मात्र परस्पर भिन्न आहेत, पण जग ईश्वराहून भिन्न नाही. जसें, सोन्याचे कडीं, तोडे, अंगठी वगैरे दागिने परस्पर भिन्न आहेत पण सोन्याहून भिन्न नाहींत.

लिंगधारी—लिंगाईत हेहि पाशुपतांतील एक भेद आहेत. ह्यांची उपास्यदेवता वीरभद्र, परंतु हे कापालिकांप्रमाणें क्रूर कर्म करणारे व यथेच्छ विषय सेवन करून वागणारे नव्हत. हेहि शिवावांचून दुसरा देव मानीत नाहींत.

जंगम—हेहि पाशुपतांतील एक भेद आहेत, ह्यांची उपास्यदेवता वीरभद्र.

२ दिगंबर—तेच नग्न—जैन नास्तिक—निरीश्वरवादी, ह्यांच्या मतीं जीवात्माच उपास्य. नऊ आहेत द्वारें ज्यास असें शरीर एतल्लक्षण जें गृह त्यांत दीपाप्रमाणें परिछिन्नपरिमाण जीवात्माच प्रकाशक मानितात. हल्लीं जे तोंडावर फडकें बांधून हातीं कुंचा घेऊन हातीं दंडकमंडलु घेऊन शुभ्र वस्त्रें नेसून दंभ दाखवितात ते ह्या मताचेच. हे स्रावक मारवाड्यांचे गुरु.

३ सौगत—तोच बौद्ध सिद्धांती. हेहि निरीश्वरवादी ह्यांच्या मतीं ह्या धर्मासारखा दुसरा धर्म नाहीं. कारण ह्या धर्मांत विषयसौख्य व मोक्षहि ह्यांच्या मतीं मरणरूपच मोक्ष. ह्यांच्या मतीं ज्ञान दोन प्रकारचें, सविषयक व निर्विषयक अतएव हे पदार्थ मात्र विज्ञानस्वरूप व क्षणक्षयी आहेत असें मानितात. निर्विषयक ज्ञानाला मोक्षकारण मानितात.

बौद्ध सिद्धांतांत एक सेश्वरवादी मत आहे; त्यांची उपास्य देवता पारसनाथ; त्यांच्या मतीं ईश्वराचे चोवीस अवतार त्यांत ऋषभ योगी मुख्य. ह्या मताचे प्रवर्तक गौतमाचार्य, दुसऱ्या जातीचे मारवाडी पारसनाथाचे ... ह्यांचे गुरु जती.

**गृहीतवेतनः कर्म त्यजन् द्विगुणमावहेत् ॥**
**अगृहीते समं दाप्यो भृत्यै रक्ष्य उपस्करः ॥ १९३ ॥**

**गृहीतं वेतनं येनासौ स्वाङ्गीकृतं कर्म त्यजन् अकुर्वन् द्विगुणां भृतिं स्वामिने दद्यात् । यदा पुनरभ्युपगतं कर्म अगृहीते एव वेतने त्यजति तदा समं यावद्वेतनमभ्युपगतं तावद्दाप्यो न द्विगुणम् । यद्वाङ्गीकृतां भृतिं दत्वा बलात्कारयितव्यः । कर्माकुर्वन् प्रतिश्रुत्य कार्यो दत्वा भृतिं बलादिति नारदवचनात् । भृतिरपि तेनैवोक्ता । भृत्याय वेतनं दद्यात्कर्मस्वामी यथाक्रमम् । आदौ मध्येऽवसाने वा कर्मणो यद्विनिश्चितमिति । तैश्च भृत्यैरुपस्कर उपस्करणं लाङ्गलादीनां प्रग्रहयोक्त्रादिकं यथाशक्त्या रक्षणीयमितरथा कृष्यादिनिष्पत्त्यनुपपत्तेः ॥ १९३ ॥**

**शाखा १ ली.**

वेतनादानव्यवहाराचें स्वरूप नारद सांगतो.

**नारद**— १ चाकराचें वेतन देणें आणि न देणें ह्याविषयींचा विचार ज्यांत सांगितला आहे त्याला **वेतनादानसंज्ञक** व्यवहारप्रकरण ह्मटलें आहे.

त्याविषयीं निर्णय सांगतो.

**मूलार्थ**—मजुरी घेऊन काम करीत नाहीं तर ती दुप्पट परत देववावी. मजुरी घेतली नाहीं, कबुलात मात्र झाली आहे, तर जितकी मजुरी घेण्याची ठरविली असेल तितकी परत देववावी, चाकरांनीं औत वगैरेचा सांभाळ करावा.

**टीकार्थ**—२ जो चाकर धन्यापासून वेतन घेऊन कराराप्रमाणें काम करीत नाहीं त्याजकडून दुप्पट वेतन धन्याचें परत देववावें. जर वेतन घेतलें नाहीं पण वेतनाविषयीं व कामाविषयीं ठराव मात्र झाला, असें असतां कबूल केलेलें काम करीत नाहीं तर करार केलेल्या वेतना इतकें द्रव्य धन्याला देववावें. अथवा कराराप्रमाणें मजुरी देवून जबरीनें त्यापासून काम घ्यावें.

वेतन घेऊन कराराप्रमाणें काम करीत नाहीं तर दुप्पट परत देववावें.

**नारद**— जो चाकर कबुलात करून काम करीत नाहीं त्यापासून जबरीनें काम घेऊनच त्याची मजुरी द्यावी.

वेतन देण्याचा प्रकारहि तोच सांगतो.

**नारद**—३ ज्या कामाबद्दल जितकें वेतन धन्यानें चाकराला कबूल केलें असेल तितकें, प्रारंभीं, मध्यें, किंवा शेवटीं, अशा अनुक्रमानें द्यावें.

आरंभीं मध्यें किंवा शेवटीं कबुलातीप्रमाणें वेतन द्यावें. चाकरांनीं औतें संभाळावीं.

४ चाकरांनीं औत ह्मणजे नांगर, गाडा, कासरा, नाडा, इत्यादिक सामाना ह्यांचें यथाशक्ति रक्षण करावें; अन्यथा शेतकी वगैरे कामें होणार नाहींत. १९३

भृतिमपरिच्छिद्य यः कर्म कारयति तं प्रत्याह ॥

**दाप्यस्तु दशमं भागं वाणिज्यपशुसस्यतः ॥**

**अनिश्चित्य भृतिं यस्तु कारयेत्स महीक्षिता ॥ १९४ ॥**

यस्तु स्वामी वणिक् गोमी क्षेत्रिको वा अपरिच्छिन्नवेतनमेव भृत्यं कर्म कारयति तस्माद्वाणिज्यपशुसस्यलक्षणात्कर्मणो यल्लब्धं तस्य दशमं भागं भृत्याय महीक्षिता राज्ञा दापनीयः ॥ १९४ ॥

मजुरीची कबुलात न करितां चाकरापासून जो काम घेतो त्याविषयीं सांगतो.

**मूलार्थ**– जो मजुरीचा करार न करितां चाकरापासून काम घेतो त्या धन्यापासून राजानें उदीम, शेतकी, पशु ह्यांच्या उत्पन्नाचा दहावा भाग त्या चाकराला देवावा.

**टीकार्थ**–५ वाणी, पशुस्वामी, किंवा केतकरी, जो कोणी धनी ह्यानें मजुरीचा करार न करितां चाकरापासून व्यापार पशुरक्षण, शेतकी इत्यादि काम घेतलें असतां त्या कामापासून जो नफा होईल त्याचा दहावा अंश राजानें धन्याकडून चाकराला देवावा. १९४

चाकरींची कबुलात केली नाहीं तर उत्पन्नाचा दहावा भाग देवावा.

---

अनाज्ञप्तकारिणं प्रत्याह ॥

**देशं कालं च योऽतीयाल्लाभं कुर्याच्च योऽन्यथा ॥**

**तत्र स्यात्स्वामिनश्छन्दोऽधिकं देयं कृतेऽधिके ॥ १९५ ॥**

यस्तु भृत्यः पण्यविक्रयाद्युचितं देशं कालं च पण्यविक्रयाद्यकुर्वन् दर्पादिनोल्लङ्घयेत्तस्मिन्नेव वा देशे काले च लाभमन्यथाव्ययायतिशयसाध्यतया हीनं करोति तस्मिन् भृतके भृतिदानंप्रति स्वामिनः छन्दः इच्छा भवेद्यावदिच्छति तावद्द्यान्न पुनः सर्वामेव भृतिमित्यर्थः । यदा पुनर्देशकालाभिज्ञतया अधिको लाभः कृतस्तदा पूर्वपरिच्छिन्नाया भृतेरपि किमपि धनमधिकं स्वामिना भृत्याय दातव्यम् ॥ १९५ ॥

धन्यानें सांगितलेलें काम न करणाराविषयीं सांगतो.

**मूलार्थ**– जो चाकर लाभयोग्य असे काळ, देश, ह्यांचा अतिक्रम करील, किंवा तद्देशकालीं तोटा करील, तेथें धन्यानें इच्छेप्रमाणें मजुरी द्यावी; अधिक नफा केल्यास अधिक द्यावी.

**टीकार्थ**– ६ जो चाकर जिनसाची विकरी वगैरे करण्यास योग्य अशा देशीं, किंवा काळीं, सुस्तीनें जिनसाची विकरी वगैरे करीत नाहीं; किंवा त्याच देशीं किंवा काळीं तोटा करून विकतो ( किंवा खरेदी करितो ) त्या चाकराला मजुरी देण्याविषयीं धन्याची इच्छा; ह्मणजे जितकी द्यावयाची असेल तितकी द्यावी; सर्वच मजुरी द्यावी असें नाहीं.

सुस्ती करून धन्याचा तोटा करितो तर धन्याच्या इच्छेप्रमाणें मुजरी.

७ जर अमुक देशीं किंवा अमुक काळीं विकलें असतां अधिक नफा होईल, असें समजून तशा देशीं किंवा काळीं विकून अधिक नफा करितो, तर कबूल केलेल्या वेतनापेक्षां अधिकहि वेतन द्यावें. १९५

नफा करील तर अधिक मजुरी द्यावी.

---

अनेकभृत्यसाध्यकर्मणि भृतिदानप्रकारमाह ॥

**यो यावत्कुरुते कर्म तावत्तस्य तु वेतनम् ॥**
**उभयोरप्यसाध्यं चेत्साध्ये कुर्याद्यथाश्रुतम् ॥ १९६ ॥**

यदा पुनरेकमेव कर्म नियतवेतनमुभाभ्यां क्रियमाणं उभयोरप्यसाध्यं चेद्व्याध्याद्यभिभवादुभाभ्यां अपिशब्दाद्बहुभिरपि यदि न परिसमापितं तदा यो भृत्यो यावत्कर्म करोति तावत्तस्मै तत्कृतकर्मानुसारेण मध्यस्थकल्पितं वेतनं देयं न पुनः समम् । न चावयवशः कर्मणि वेतनस्यापरिभाषितत्वाददानमिति मन्तव्यम् । साध्ये तूभाभ्यां कर्मणि निवर्तिते यथाश्रुतं यावत्परिभाषितं तावदुभाभ्यां देयं न पुनः प्रत्येकं कृत्स्नवेतनं नापि कर्मानुरूपं परिकल्प्य देयम् ॥ १९६ ॥

अनेक चाकरांनीं करावया जोगें अशा कामाविषयीं वेतन देण्याचा प्रकार सांगतो.

**मूलार्थ**—दोघांसहि असाध्य असें काम जो जितकें करितो तितकें त्याला वेतन द्यावें; सुसाध्य आहे तर कराराप्रमाणें द्यावें.

**टीकार्थ**— ८ ज्याविषयीं वेतनाचा करारहि ठरला असें एकच काम दोघांनीं किंवा बहुतांनीं करावया जोगें असून रोगादि कारणामुळें दोघांकडून किंवा बहुतांकडून शेवटास न गेलें, तर जो चाकर जितकें काम करील, त्याला तितक्या कामाचें मध्यस्थ लोकांनीं ठरविलेलें वेतन द्यावें; समविभागानें द्यावें असें नाहीं, अथवा कामाच्या वांटणीवर बोली नाहीं ह्मणून अगदींच देऊं नये असें नाहीं.

अनेक चाकरांनीं शेवटास न्यावया जोगें असें काम एकानें केलें असतां कामाची मजुरी.

९ जर साध्य ( ह्मणजे एकास व्हावया जोगें ) काम दोघांनीं शेवटास नेलें, तर जितकें वेतन कबूल केलें असेल तितकें दोघांस वांटून द्यावें. प्रत्येकास सगळें देऊं नये व कामावर ठरवूनहि देऊं नये. १९६

एकास व्हावयाजोगें काम दोघांनीं केलें तर कामावर मजुरी.

---

आयुधीयभारवाहकौ प्रत्याह ॥

**अराजदैविकं नष्टं भाण्डं दाप्यस्तु वाहकः ॥**
**प्रस्थानविघ्नकृच्चैव प्रदाप्यो द्विगुणां भृतिम् ॥ १९७ ॥**

न विद्यते राजदैविकं यस्य भाण्डस्य तत्तथोक्तम् । तद्यदि प्रज्ञाहीनतया वाहकेन नाशितं तदा नाशानुसारेणासौ तद्भाण्डं दापनीयः ॥ तदाह नारदः ॥ भाण्डं व्यसनमागच्छेद्यदि वाहकदोषतः । दाप्यो यत्तत्र नश्येत्तु दैवराजकृतादृते इति ॥ यः पुनर्विवाहाद्यर्थं मङ्गलवति वासरे प्रतिष्ठमानस्य तत्प्रस्थानौपयिकं कर्म प्रागङ्गीकृत्य तदानीं न करिष्यामीति प्रस्थानविघ्नमाचरति तदासौ द्विगुणां भृतिं दाप्यः । अत्यन्तोत्कर्षहेतुकर्मनिरोधात् ॥ १९७ ॥

शाखा २ री.

हत्यारबंद व हेलकरी ह्यांविषयीं सांगतों.

मूलार्थ–राजिक दैविक उपद्रवावांचून हेलकऱ्यापासून पात्रांचा नाश होईल तर त्यापासून भरून घ्यावें. आणि प्रस्थान करतेसमयीं विघ्न करणारापासून दुप्पट भृति परत घ्यावी.

टीकार्थ–राजदैविक उपद्रवावांचून केवळ हेलकऱ्याच्या हयगयीनें पात्रादिक ह्मणजे मालाचें पेट्या वगैरें बारदान नाश पावेल तर तें बारदान नुकसानाच्या सुमाराप्रमाणें त्यापासून भरून घ्यावें.

हेलकऱ्याच्या सुस्तीनें नुकसान झालेलें भरून घ्यावें.

नारद– हेलकऱ्याच्या अन्यायानें पात्रादिक खराब होईल किंवा नाश पावेल तर तें त्याजकडून देववावें, परंतु राजदैविक उपद्रवावांचून.

२ विवाहादि मंगलकार्यासाठीं सुमुहूर्तीं प्रस्थान करणाराचें पूर्वी कबूल केलेलें काम (आइत्यावेळेस) मी करीत नाहीं म्हणून प्रस्थानसमयीं विघ्न करितो तर त्यापासून दुप्पट भृति परत देववावी. कारण उत्साहाच्या कामाचा प्रतिबंध केला ह्मणून. १९७

आइत्या वेळेस काम टाकून जातो तर दुप्पट वेतन परत घ्यावें.

---

प्रक्रान्ते सप्तमं भागं चतुर्थं पथि संत्यजन् ॥
भृतिमर्द्धपथे सर्वां प्रदाप्यस्त्याजकोऽपि च ॥ १९८ ॥

किंच प्रक्रान्ते अध्यवसिते प्रस्थाने स्वाङ्गीकृतं कर्म यस्त्यजति असौ भृतेः सप्तमं भागं दाप्यः । नन्वत्रैव विषये प्रस्थानविघ्नकृदित्यादिना द्विगुणभृतिदानमुक्तं इदानीं सप्तमो भाग इति विरोधः ॥ उच्यते । भृत्यन्तरोपादानावसरसंभवे स्वाङ्गीकृतं कर्म यस्त्यजति तस्य सप्तमो विभागः । यस्तु प्रस्थानलग्नसमय एव त्यजति तस्य द्विगुणभृतिदानमित्यविरोधः ॥ यः पुनः पथि प्रक्रान्ते गमने वर्तमाने सति कर्म त्यजति स भृतेश्चतुर्थं भागं दाप्यः । अर्धपथे पुनः सर्वां भृतिं दाप्यः । यस्तु

१ शस्त्रोपजीवी उत्तम, शेतकरी मध्यम, आणि भारवाहक निकृष्ट असा तीन प्रकारचा भृतक अभ्युपेत्याशुश्रूषा प्रकरणीं १ ल्या शाखेच्या २ ऱ्या अंकांत सांगितला त्यांत शेतकऱ्यांविषयीं सदरहु प्रकार सांगितले, आतां शस्त्रोपजीवी व भारवाहक ह्यांविषयीं सांगतो.

त्याजकः कर्मात्यजन्तं त्याजयति स्वामी पूर्वोक्तप्रदेशेष्वसावपि पूर्वोक्तसप्तमभागादिकं भृत्याय दापनीयः । एतच्चाव्याधितादिविषयम्॥भृत्यो नार्तो न कुर्याद्यो दर्पात्कर्म यथोदितम् । स दण्ड्यः कृष्णलान्यष्टौ न देयं तस्य वेतनमिति मनुवचनात् । यदा पुनर्व्याधावपगतेन्तरितदिवसान्परिगणय्य पूरयति तदा लभत एव वेतनम्॥ आर्तस्तु कुर्यात्स्वस्थः सन् यथाभाषितमादितः । सुदीर्घस्यापि कालस्य स्वं लभेतैव वेतनमिति मनुस्मरणात् ॥ यस्त्वपगतव्याधिः स्वस्थ एव वाऽऽलस्यादिना स्वारब्धं कर्माल्पोनं न करोति परेण वा न समापयति तस्मै वेतनं न देयमिति ॥ यथाह मनुः॥ यथोक्तमार्तः स्वस्थो वा यस्तत्कर्म न कारयेत् । न तस्य वेतनं देयमल्पोनस्यापि कर्मण इति ॥ १९८ ॥ इति वेतनादानप्रकरणम् ॥

**मूलार्थ**–प्रस्थानाविषयीं निश्चय केला असतां त्यावेळेस काम टाकितो त्याचे वेतनाचा सातवा भाग, आणि मार्गांतच काम टाकितो तर चौथा भाग, कमी करावा. अर्धमार्गांतच काम टाकितो तर अगदींच भृति देऊं नये, व टाकविणारापासूनहि तसेंच चाकरास देववावें.

**टीकार्थ**–३ प्रस्थानाविषयीं निश्चय झाला असतां जो पतकरलेलें काम टाकितो त्याचे मजुरीचा सातवा भाग कमी करावा.

सुमुहूर्त निश्चय झाला असतां काम टाकितो तर सातवा हिसा कापावा.

**शंका**–ह्याचविषयीं वरच्या अंकांत "दुप्पट भृति परत द्यावी," असें सांगितलें आणि येथें सातवा भाग सांगितला, ह्मणून विरोध येतो.

**समाधान**– पतकरलेलें काम करीत नाहीं, व बदल्या देण्यास अवसर असतां बदल्या ही देत नाहीं, तर सातवा भाग कमी करावा. व प्रस्थानेंलग्नसमयींच काम टाकून जातो तर त्यापासून दुप्पट मजुरी परत घ्यावी, असा विरोध परिहार जाणावा.

४ पतकरलेलें काम मार्ग चालत असतां टाकील तर त्याच्या मजुरीचा चौथा हिसा दंड करावा आणि अर्धमार्गांत टाकून जाईल तर अगदींच वेतन देऊं नये.

मार्गांत काम टाकितो तर वेतन बुडवावें.

५ चाकर पतकरलेलें काम करीत असतां धनीच पूर्वीं ( ३ ऱ्या व ४ थ्या अंकांत ) सांगितलेल्या ठिकाणीं चाकराला कामावरून दूर करील तर धन्याकडूनहि पूर्वीं ( ३ ऱ्या व ४ थ्या अंकांत) सांगितलेला सातवा वगैरे हिसा चाकराला देववावा.

६ वर ( ३ ऱ्या व ४ थ्या अंकांत ) सांगितलेले प्रकार रोग वगैरे योग्य कारण नसल्यास जाणांवे.

**स्मृति**–जो चाकर निरोगी असतांहि पतकरलेलें काम दांडगेपणानें करीत नाहीं त्यास वेतन देऊं नये, व ८ कृष्णल दंडहि करावा.

रोग वगैरे योग्य कारणानें काम टाकितो तर दंड नाहीं.

---

१ प्रस्थान लग्न ह्मणजे अमुक लग्नावर प्रस्थान करावयाचें असें जें निश्चित केलेलें इष्ट लग्न तें.

७ रोगामुळें खाडे पडलेले दिवस निरोगी झाल्यावर पुरे भरून देतो, तर करारा प्रमाणें वेतनहि पावतो.

**मनु**–रोगामुळें अंतरलेलें काम, बरा झाल्यावर पुरें करून देतो तर फारां दिवसांचें तुंबलेलेंहि त्याचें वेतन द्यावेंच.

रोगामुळें अंतरलेलें काम, बरा झाल्यावर पुरेंकरून द्यावें.

८ जो चाकर पतकरलेलें काम, बरा झाल्यावर किंवा मुळचाच निरोगी असून थोडेंसें जरी उरलेलें असलें तरी आळसामुळें ( किंवा कुचराईनें ) स्वतां संपवीत नाहीं व दुसऱ्याकडूनही संपवीत नाहीं, तर त्याचें वेतन देऊं नये.

**मनु**–पतकरलेलें काम निरोगी झाल्यावर किंवा मुळचाच समाधानी असतां ( स्वतां करीत नाहीं व) दुसऱ्याकडूनहि करवीत नाहीं, व तें काम जरीं अगदीं थोडें राहिलें असलें तरी मजुरी देऊं नये. १९८

---

## द्यूतसमाह्वय प्रकरण १७ वें.

अधुना द्यूतसमाह्वयाख्यं विवादपदमधिक्रियते ॥ तत्स्वरूपं नारदेनाभिहितम् ॥ अक्षवध्रशलाकाद्यैर्देवनं जिह्मकारितम् । पणक्रीडावयोभिश्च पदं द्यूतसमाह्वयम् ॥ अक्षाः पाशकाः वध्रश्चर्मपट्टिका शलाका दन्तादिमय्यो दीर्घचतुरस्राः । आद्यग्रहणाच्चतुरङ्गादिक्रीडासाधनं करितुरङ्गरथादिकं गृह्यते । तैरप्राणिभिर्यद्देवनं क्रीडा पणपूर्विका क्रियते । तथा वयोभिः पक्षिभिः कुक्कुटपारावतादिभिः चशब्दान्मल्लमेषमहिषादिभिश्च प्राणिभिर्या पणपूर्विका क्रीडा क्रियते तदुभयं यथाक्रमेण द्यूतसमाह्वयाख्यं विवादपदम् । द्यूतं च समाह्वयश्च द्यूतसमाह्वयम् । तदुक्तं मनुना ॥ अप्राणिभिर्या क्रियते तल्लोके द्यूतमुच्यते । प्राणिभिः क्रियमाणस्तु स विज्ञेयः समाह्वय इति ॥

### शाखा १ ली.

आतां जुगाराविषयींच्या वादाचें निरूपण करितो. त्याचें स्वरूप नारद सांगतो.

**नारद**–फांसे, वादी, शलाका, इत्यादिक, ह्यांकडून जो कपटानें पणपूर्वक खेळ तो जुगार म्हटला आहे. पशु पक्षी ह्यांकडून जो पणपूर्वक खेळ ती पैज ह्मटली आहे.

**अर्थ**–१ फांसे, कातड्याची वादी, शलाका ह्मणजे लांब चौकोनी अशा हस्तिदंती केलेल्या काड्या, ( मुळांतील ) इत्यादि शब्दें करून बुदबळें, सोंगट्या, गंजीफा, वगैरे क्रीडासाहित्य समजावें. अशा अचेतन पदार्थांकडून जी पणपूर्वक क्रीडा केली जाते तो जुगार ह्मटला आहे.

२ कोंबडें, खबुतरें वगैरे व पहिलवान एडके, टोणगे, इत्यादिक जे प्राणी त्यांकडून जी पणपूर्वक क्रीडा केली जाते, ती पैज ह्मटली आहे.

पैजेचें स्वरूप.

मनु–अचेतन पदार्थांकडून जी क्रीडा केली जाते, तो लोकांत जुगार म्हटला आहे. प्राण्यांकडून जी क्रीडा ती पैज म्हटली आहे.

---

तत्र द्यूतसभाधिकारिणो वृत्तिमाह ॥

**ग्लहे शतिकवृद्धेस्तु सभिकः पञ्चकं शतम् ।**

**गृह्णीयाद्धूर्तकितवादितराद्दशकं शतम् ॥ १९९ ॥**

परस्परसंप्रतिपत्त्या कितवपरिकल्पितः पणो ग्लह इत्युच्यते तत्र ग्लहे तदाश्रया शतिका शतपरिमिताद्धिकपरिमाणा वा वृद्धिर्यस्यासौ शतिकवृद्धिस्तस्माद्धूर्तकितवात्पञ्चकं शतमात्मवृत्त्यर्थं सभिको गृह्णीयात् । पञ्चपणा आयो यस्मिन् शते तच्छतं पञ्चकं तदस्मिन्वृद्ध्यायलाभे इत्यादिना कन् । जितग्लहस्य विंशतितमं भागं गृह्णीयादित्यर्थः । सभा कितवनिवासार्था यस्यासौ स सभिकः कल्पिताक्षादिनिखिलक्रीडोपकरणस्तदुपचितद्रव्योपजीवी सभापतिरुच्यते । इतरस्मात्पुनरपरिपूर्णशतिकवृद्धेः कितवाद्दशकं शतं जितद्रव्यस्य दशमं भागं गृह्णीयादिति यावत्॥१९९॥

जुगाराचे अड्ड्याचा जो नायक त्याची उपजीविका सांगतो.

मूलार्थ–जुगाराचे डावांत ज्याला शेंकड्यापेक्षां अधिक नफा होईल त्यापासून नायकानें शेंकडा पांच टके घ्यावे. इतरांपासून शेंकडा दहा टके घ्यावे.

टीकार्थ–३ जुगाऱ्यांनीं परस्परांच्या अनुमतानें केलेले पण ज्यामध्यें आहेत तो डाव, त्या डावांत शंभरांच्या किंवा त्यांपेक्षां अधिक अशा पणाला जो जिंकितो त्यापासून नायकानें उपजीविकार्थ शेंकडा पांच टके ह्मणजे जिंकलेल्या डावाचा विसावा अंश, कर घ्यावा. जर शंभरांपेक्षां कमी संख्येचा डाव आहे, तर त्यापासून शेंकडा दहा टके म्हणजे त्या डावांत जिंकलेल्या द्रव्याचा दहावा अंश घ्यावा.

(नायकानें जिंकलेल्या डावाचा विसावा अंश कर घ्यावा.)

४ अड्डा म्हणजे जुगार खेळण्यासाठीं केलेलें स्थळ, त्याचा जो धनी फांसे वगैरे सर्व खेळण्याचें साहित्य सिद्ध करून तत्संपादित द्रव्यानें उपजीवन करणारा, तो नायक म्हटला आहे १९९.

(अड्डा म्हणजे काय.)

---

एवं कृप्तवृत्तिना सभिकेन किं कर्तव्यमित्याह ॥

**स सम्यक्पालितो दद्याद्राज्ञे भागं यथाकृतम् ॥**

**जितमुद्ग्राहयेज्जेत्रे दद्यात्सत्यं वचः क्षमी ॥ २०० ॥**

य एवं कृप्तवृत्तिर्द्यूताधिकारी स राज्ञा धूर्तकितवेभ्यो रक्षितस्तस्मै राज्ञे यथा संप्रतिपन्नमंशं दद्यात् । तथा जितं द्रव्यमुद्ग्राहयेत् बन्धकग्रहणेनासेधादिना च पराजित-

सकाशादुद्धरेत् । उद्धृत्य च तद्धनं जेत्रे जयिने सभिको दद्यात् । तथा क्षमी भूत्वा सत्यं वचो विश्वासार्थं द्यूतकारिणां दद्यात् । तदुक्तं नारदेन ॥ सभिकः कारयेत् द्यूतं देयं दद्याच्च तत्कृतमिति ॥ २०० ॥

शाखा २ री.

अशा कर घेणाऱ्या सभापतीनें काय केलें पाहिजे तें सांगतो.

**मूलार्थ**–राजरक्षित अशा नायकानें करार केलेला राजकर द्यावा. आणि जितद्रव्य, जिंकणारास देववावें, व त्यानें क्षमायुक्त व सत्यवादी असावें.

**टीकार्थ**–१ पूर्वोक्त प्रमाणें कर घेणाऱ्या नायकाचा जुगाऱ्यां पासून राजानें संभाळ करावा. व नायकानेंहि केलेल्या कराराप्रमाणें राजकर द्यावा.

जुगाऱ्यांच्या नायकानें करारा प्रमाणें राजकर द्यावा.

२ जित द्रव्य असेल तें नायकानें तगादा, गहाण, द्वाही इत्यादिकां कडून पराजिता-पासून वसूल करून जिंकणारास द्यावें. तसेंच क्षमायुक्त होऊन विश्वास पटण्यासाठीं साखीनें जुगाऱ्यांशीं वागावें.

पराजिता पासून पैजेचें द्रव्य नायकानें वसूल करावें.

**नारद**–त्याच्या नायकानें जुगार खेळवावा व त्यांनीं केलेला पण कराराप्रमाणें देववावा. २००.

---

यदा पुनः सभिको दापयितुं न शक्नोति तदा राजा दापयेदित्याह ॥

**प्राप्ते नृपतिना भागे प्रसिद्धे धूर्तमण्डले ॥**
**जितं ससभिके स्थाने दापयेदन्यथा न तु ॥ २०१ ॥**

प्रसिद्धे अप्रच्छन्ने राजाध्यक्षसमन्विते ससभिके सभिकसहिते कितवसमाजे सभिकेन च राजभागे दत्ते राजा धूर्तकितवमविप्रतिपन्नं जितं पणं दापयेत् । अन्यथा प्रच्छन्ने सभिकरहिते अदत्तराजभागे द्यूते जितं पणं जेत्रे न दापयेत् ॥ २०१ ॥

जर नायक तें जितद्रव्य वसूल करून देऊं शकत नाहीं तर
राजानें ( वसूल करून ) देण्याचा प्रकार सांगतो.

**मूलार्थ**–जर तो अड्डा दरबार महशूर व नायकासहित आहे, व नायकाकडून राजकरहि पावत आहे,तर पराजितापासून राजानें तो जित पण देववावा, अन्यथा देववूं नये.

**टीकार्थ**–३ जुगाऱ्यांचा अड्डा प्रसिद्ध असून राजानें नियुक्त अशा अध्यक्षासहित व नायकासहित असल्यास आणि मुकदमाकडून राजकरहि पावत असल्यास जुगाऱ्यांनीं करार केलेलें प्रतिज्ञात द्रव्य देववावें. अन्यथा ह्मणजे गुप्त अध्यक्षाविरहित, व नायकाविरहित व नायकाकडून राजकर पावत नाहीं, तर जिंकणारास जितपण देवूं नये. २०१

जयपराजयविप्रतिपत्तौ निर्णयोपायमाह ॥

**द्रष्टारो व्यवहाराणां साक्षिणश्च त एव हि ॥**

द्यूतव्यवहाराणां द्रष्टारः सभ्यास्त एव कितवा एव राज्ञा नियोक्तव्याः । तत्र श्रुताध्ययनसंपन्ना इत्यादिर्नियमो नास्ति । साक्षिणश्च द्यूते द्यूतकारा एव कार्याः । न तत्र स्त्रीबालवृद्धकितवेत्यादिनिषेधोऽस्ति ॥

जयपराजयांविषयीं विप्रतिपत्ति पडली असतां निर्णयोपाय सांगतो.

**मूलार्थ**–व्यवहार पाहणारे ( अध्यक्ष ) व साक्षीहि तेच असावे.

**टीकार्थ**–४ जुगाराचा व्यवहार पाहणारे सभासद नेमणें ते जुगारी लोकच, राजानें नेमावे. एथें ( पूर्वीं १ ल्या प्रकरणीं २ ऱ्या शाखेच्या १ ल्या अंकांत सांगितलेले) सभासदांविषयींचा नियम उपयोगी नाहीं. साक्षीहि जुगारीच करावे, येथें ( ९ व्या प्रकरणीं २ ऱ्या शाखेच्या ३ ऱ्या अंकांत सांगितलेला ) साक्षीविषयींचा निषेध उपयोगी नाहीं.

क्वचित् द्यूतं निषेद्धुं दण्डमाह ॥

**राज्ञा सचिह्नं निर्वास्याः कूटाक्षोपधिदेविनः ॥ २०२ ॥**

कूटैरक्षादिभिरुपधिना च मतिवञ्चनहेतुना मणिमन्त्रौषधादिना ये दीव्यन्ति तान् श्वपदादिनाङ्कयित्वा राजा स्वराष्ट्रान्निर्वासयेत् । नारदेन निर्वासने विशेष उक्तः ॥ कूटाक्षदेविनः पापान् राजा राष्ट्राद्विवासयेत् । कण्ठेऽक्षमालामासज्य स ह्येषां विनयः स्मृत इति ॥ यानि च मनुवचनानि द्यूतनिषेधपराणि द्यूतं समाह्वयं चैव यः कुर्यात् कारयेत वा । तान् सर्वान् घातयेद्राजा शूद्रांश्च द्विजलिङ्गिन इत्यादीनि तान्यपि कूटाक्षदेवनविषयतया राजाध्यक्षसभिकरहितद्यूतविषयतया च योज्यानि ॥ २०२ ॥

शाखा ३ री.

कपटी जुगाराची मनाई होण्यासाठीं दंड सांगतो.

**मूलार्थ**–कपटी फांशानीं व ठकविद्येनें जे द्यूत खेळतात त्यांस राजानें डागून हद्दपार करावें.

**टीकार्थ**– १ कपटी फांसे इत्यादिकेंकरून व बुद्धीस व्यामोह करणारे असे मणि, मंत्र, औषधी, ह्यांकडून जे खेळतात त्यांस श्वपद इत्यादिकेंकरून डागून राजानें हद्दपार करावें.

ठकविद्येनें जुगार खेळणारास हद्दपार करावें.

नारद तर हद्दपार करण्याविषयीं विशेष सांगतो.

**नारद**– राजानें कपटी फांशांनीं द्यूत खेळणारे दुष्ट, गळ्यांत फांशांची माळ घालून हद्दपार करावे, ही त्यांस शिक्षा सांगितली आहे.

मनु–जुगार किंवा पैज जो खेळेल किंवा खेळवील आणि ब्राह्मणांचीं चिन्हें धारण करणारे शूद्र ह्या सर्वांस राजानें मारावें.

अशीं जीं मनुवचनें द्यूत निषेधाविषयीं आहेत तींहि कपटानें केलेलें जें द्यूत त्याविषयीं, किंवा जुगाराच्या अड्ड्याचा नायक व राजानें नेमलेला जो अध्यक्ष ह्यावांचून केलेला जो जुगार त्याविषयीं जाणावीं. २०२.

---

## द्यूतमेकमुखं कार्यं तस्करज्ञानकारणात् ॥

किंच । यत्पूर्वोक्तं द्यूतं तदेकमुखं एकं मुखं प्रधानं यस्य द्यूतस्य तत्तथोक्तं कार्यम् । राजाध्यक्षाधिष्ठितं राज्ञा कारयितव्यमित्यर्थः । तस्करज्ञानकारणात् । तस्करज्ञानरूपं प्रयोजनं पर्यालोच्य प्रायशश्चौर्यार्जितधना एव कितवा भवन्त्यतश्चौरविज्ञानार्थमेकमुखं कार्यम् ।

मूलार्थ– चोर समजण्यासाठीं राजानें जुगारावर एक मुख्य नेमावा.

टीकार्थ–२प्रायः चोरी करून द्रव्य मिळविणारेच जुगार खेळतात, अतएव चोर उमगण्याविषयीं हें एक साधन आहे, म्हणून वर सांगितलेल्या जुगारावर राजानें आपला अध्यक्ष नेमावा.

द्यूतधर्मं समाह्वयेऽतिदिशन्नाह ॥

## एष एव विधिर्ज्ञेयः प्राणिद्यूते समाह्वये ॥ २०३ ॥

ग्लहे शतिकवृद्धेरित्यादिना यो द्यूतधर्म उक्तः स एव प्राणिद्यूते मल्लमेषमहिषादिनिर्वर्त्ये समाह्वयसंज्ञिके ज्ञातव्यः । इति द्यूतसमाह्वयाख्यं प्रकरणम् ॥ २०३ ॥

जुगाराविषयीं जे प्रकार सांगितले त्यांचा पैजेविषयीं अतिदेश सांगतो.

मूलार्थ– हाच प्रकार प्राणिविषयक जी पैज तिजविषयीं जाणावा.

टीकार्थ–३ हे ( १ ल्या शाखेच्या ३ ऱ्या अंकापासून ) जे जुगाराचे प्रकार सांगितले, तेच प्राणिविषयक पैज म्हणजे जेठी, एडके, घोडे, इत्यादिकांची जी पैज तिजविषयीं जाणावे. २०३.

---

## वाक्पारुष्य प्रकरण १८ वें.

इदानीं वाक्पारुष्यं प्रस्तूयते । तल्लक्षणं चोक्तं नारदेन । देशजातिकुलादीनामाक्रोशं न्यङ्गसंयुतम् । यद्वचः प्रतिकूलार्थं वाक्पारुष्यं तदुच्यते ॥ देशादीनामाक्रोशं न्यङ्गसंयुतम् । उच्चैर्भाषणमाक्रोशो न्यङ्गमवद्यं तदुभययुक्तं यत्प्रतिकूलार्थमुद्वेगजननार्थं वाक्यं तद्वाक्पारुष्यं कथ्यते । तत्र कलहप्रियाः खलु गौडा इति देशाक्रोशः ॥ नितान्तं खलु लोलुपा विप्रा इति जात्याक्रोशः ॥ क्रूरचरिता ननु वैश्वामित्रा इति कुलाक्षेपः ॥ आदिग्रहणात्स्वविद्याशिल्पादिनिंदया विद्वच्छि-

रूपादिपुरुषाक्षेपो गृह्यते । तस्य च दण्डतारतम्यार्थं निष्ठुरादिभेदेन त्रैविध्यमभिधाय तल्लक्षणं तेनैवोक्तम् ॥ निष्ठुराश्लीलतीव्रत्वात्तदपि त्रिविधं स्मृतम् । गौरवानुक्रमात्तस्य दण्डोपि स्यात्क्रमाद्गुरुः ॥ साक्षेपं निष्ठुरं ज्ञेयमश्लीलं न्यङ्गसंयुतम् । पतनीयैरुपाक्रोशैस्तीव्रमाहुर्मनीषिण इति ॥ तत्र धिङ्मूर्ख जाल्ममित्यादि साक्षेपम् । अत्र न्यङ्गमित्यसभ्यम अवद्यं भगिन्यादिगमनं तद्युक्तमश्लीलम् ।सुरापोसीत्यादिमहापातकाद्याक्रोशैर्युक्तं वचस्तीव्रम् ॥

शाखा १ ली.

आतां वाक्पारुष्याचें निरूपण करितो.

वाक्पारुष्याचें स्वरूप नारद सांगतो.

नारद–१ देश, जाति, कुल, इत्यादिकांस उद्देश करून जें आक्रोशयुक्त व कठोर असें भाषण, तें वाक्पारुष्य म्हटलें आहे.

अर्थ–मनुष्यास त्रास होण्यासाठीं त्याचा देश, जात, कुल, इत्यदिकांस उद्देश करून जें ओरडून कठोर भाषण करणें, तें वाक्पारुष्य म्हटलें आहे.

देशास उद्देश करून आक्रोश ह्मणजे गौड हे निश्चयें भांडखोर आहेत.

जातीस उद्देश करून आक्रोश ह्मणजे ब्राह्मणांची जात अत्यंत लोभिष्ट आहे.

कुलाक्रोश ह्मणजे विश्वामित्र कुलोत्पन्न मोठे क्रूरकर्म करणारे आहेत.

२ ( वचनांतील ) इत्यादिक शब्देंकरून स्वविद्या, स्वशिल्प इत्यादिकांच्या निंदेनें विद्वान्, शिल्पी इत्यादि पुरुषांचा आक्रोश समजावा.

वाक्पारुष्याचे अपराधभेदेंकरून दंडतारतम्य दाखविण्याकरितां वाक्पारुष्याचे निष्ठुर, असभ्य, तीव्र, असे तीन प्रकार सांगून त्यांचें स्वरूपहि तोच सांगतो.

नारद– ३ निष्ठुर, असभ्य, तीव्र, ह्या भेदेंकरून तें तीन प्रकारचें सांगितलें आहे. त्यांत वाक्पारुष्य अपराधाच्या गौरवामुळें अनुक्रमानें दंडाचेंहि गौरव योजावें.

वरील स्मृतीचा अर्थ–निष्ठुर ह्मणजे धिक्कार व निर्भर्त्सना ह्यांकडून युक्त जें भाषण तें. असभ्य ह्मणजे शिवी गाळ करणें. तीव्र ह्मणजे तूं मद्यपी आहेस इत्यादिक आक्रोशयुक्त भाषण तें.

---

तत्र निष्ठुराक्रोशे सवर्णविषये दण्डमाह ॥

सत्यासत्यान्यथास्तोत्रैर्न्यूनाङ्गेन्द्रियरोगिणाम् ॥
क्षेपं करोतिचेद्दण्ड्यः पणानर्द्धत्रयोदशान् ॥२०३॥

न्यूनाङ्गाः करचरणादिविकलाः । न्यूनेन्द्रिया नेत्रश्रोत्रादिरहिताः । रोगिणो दु-

श्वर्मप्रभृतयः । तेषां सत्येनासत्येनान्यथास्तोत्रेण च निन्दार्थतया स्तुत्या यो नेत्रयुगलहीन एषोऽन्ध इत्युच्यते तत्सत्यम् । यत्र पुनश्चक्षुष्मानेषोऽन्ध इत्युच्यते तदसत्यम् । यत्र विकृताकृतिरेव दर्शनीयस्त्वमसीत्युच्यते तदन्यथास्तोत्रं एवंविधैर्यः क्षेपं निर्भर्त्सनं करोत्यसौ अर्द्धाधिकत्रयोदशपणान् दण्डनीयः ॥ काणं वाप्यथवा खञ्जमन्यं वापि तथाविधम् । तथ्येनापि ब्रुवन् दाप्यो दण्डं कार्षापणावरमिति यन्मनुवचनं तदतिदुर्वृत्तवर्णविषयम् । यदा पुनः पुत्रादयो मात्रादीन् शपन्ति तदा शतं दण्डनीया इति तेनैवोक्तम् । मातरं पितरं जायां भ्रातरं श्वशुरं गुरुम् । आक्षारयन् शतं दाप्यः पन्थानं चाददद्गुरोरिति । एतच्च सापराधेषु मात्रादिषु गुरुषु निरपराधायां च जायायां द्रष्टव्यम् ॥ २०३ ॥

## शाखा २ री.

त्यांत सवर्णाला निष्ठुर भाषण केलें असतां दंड सांगतो.

**मूलार्थ**–अंगहीन, व इंद्रियहीन, व रोगी, ह्यांच्या विद्यमान दोषांचें उद्धाटन, किंवा वास्तवीक दोष नसतां दोषारोप, अथवा व्याजस्तुति ह्यांकडून निर्भर्त्सना करितो, तर त्याला १३।। पण दंड करावा.

खऱ्या दोषानें किंवा मिथ्या दोषानें दुसऱ्याचा उपहास करणारास दंड.

**टीकार्थ**– १ अंगहीन ह्मणजे हातपाय इत्यादिक अवयवांतून एखादा ज्यास नाहीं तो, इंद्रियहीन ह्मणजे नेत्रादिक इंद्रिय ज्यास नाहीं तो (अंधळा बहिरा इत्यादिक), रोगी ह्मणजे कोडी, रक्तपित्या वगैरे, ह्यांच्या विद्यमान दोषांचें उद्धाटन करणें, ह्मणजे बहिऱ्याला अरे बहिऱ्या, अंधळ्याला अरे अंधळ्या, असें वास्तविक दोषांचें उद्धाटन करणें. व डोळस असतां तूं काय अंधळा आहेस असें अविद्यमान दोषांचें उद्धाटन करणें आणि व्याजस्तुति ह्मणजे वस्तुगत्या कुरूप असतां वाः तूं देखणा पुरुष आहेस, अशा प्रकारच्या भाषणांनीं जो दुसऱ्याची निर्भर्त्सना करितो त्याला १३।। पण दंड करावा.

**मनु**– २ काणा अथवा कुबडा किंवा दुसऱ्या प्रकारें अंगहीन असल्यामुळें विद्यमान दोषांचें उद्धाटन करितो त्याला किमानपक्ष ( एक ) कार्षापण दंड करावा.

असें जें मनुवचन आहे तें, अत्यंत दुराचारी असा जो वर्ण ( ब्राह्मणादिक ) त्याविषयीं जाणावें.

जर पुत्रादिक, आई बाप इत्यादिकांस शिवीगाळ देतात तर त्यांस १०० ( पण ) दंड करावा, असें तो (मनु)च सांगतो.

३ आई, बाप, भार्या, भाऊ, सासरा, गुरु, ह्यांवर तोंड टाकणारास आणि मार्गांत जात असतां गुरूला मार्ग देत नाहीं त्यासहि १०० ( पण ) दंड करावा.

हा मनु वचनांतला दंड भार्या निरपराध असतां तिला शिवी देणारा व आई, बाप, भाऊ, सासरा, गुरु हे अपराधी असले तरी त्यांस शिवी देणाराविषयीं योजावा. २०३

अश्लीलाक्षेपे दण्डमाह ॥

**अभिगन्तास्मि भगिनीं मातरं वा तवेति ह ॥**
**शपन्तं दापयेद्राजा पञ्चविंशतिकं दमम् ॥ २०४ ॥**

त्वदीयां भगिनीं मातरं वा अभिगन्तास्मीति शपन्तं राजा पञ्चविंशतिकं पणानां पञ्चाधिका विंशतिर्यस्मिन्दण्डे स तथोक्तः तं दमं दापयेत् ॥ २०४ ॥

असभ्य भाषण करणारास दंड सांगतो.

**मूलार्थ**–आईवरून किंवा बहिणीवरून शिवी देणारास राजानें २५ (पण) दंड करावा.

**टीकार्थ**– ४ आईवरून अथवा बहिणीवरून किंवा बायकोवरून शिवी देणारास राजानें २५ पण दंड करावा. २०४

बरोबरीच्या मनुष्यास शिवी गाळ करणारास दंड.

---

एवं समानगुणेषु वर्णिषु दण्डमभिधाय विषमगुणेषु दण्डं प्रतिपादयितुमाह ॥

**अर्द्धोऽधमेषु द्विगुणः परस्त्रीषूत्तमेषु च ॥**

अधमेष्वाक्षेप्त्रापेक्षया न्यूनवृत्तादिगुणेष्वर्धो दण्डः। पूर्ववाक्ये पञ्चविंशतेः प्रकृतत्वात्तदपेक्षयार्द्धः सार्द्धद्वादशपणात्मको द्रष्टव्यः । परभार्यासु पुनरविशेषेण द्विगुणः पञ्चविंशत्यपेक्षयैव पञ्चाशत्पणात्मको वेदितव्यः ॥ तथोत्तमेषु च स्वापेक्षयाधिकश्रुतवृत्तेषु दण्डः पञ्चाशत्पणात्मक एव ॥

याप्रमाणें समान योग्यतेचे, व एका वर्णाचे ह्यांनीं शिवीगाळ केली असतां
दंड सांगून आतां न्यूनाधिक योग्यतेच्या मनुष्यांनीं परस्पः
रास शिवीगाळ केली असतां दंड सांगतो.

**मूलार्थ**– अधमाविषयीं त्याचे ह्मणजे वर सांगितल्या दंडाचे निम्मे व परस्त्रीविषयीं व उत्तमाविषयीं त्याचे दुपट (दंड) योजावा.

**टीकार्थ**– ५ अधम ह्मणजे आपल्यापेक्षां आचरणानें व गुणानें कमी अशा पुरुषास शिवीगाळ करणारांस वर ( ४ थ्या अंकांत ) सांगितलेल्या २५ सांचे निम्मे ह्मणजे १२॥ पण दंड करावा.

६ सामान्यतः परस्त्रीला शिवीगाळ करणारास वर ( ४ थ्या अंकांत) सांगितलेल्या २५ पणाचे दुप्पट ह्मणजे ५० पण, तसाच उत्तम म्हणजे आपल्या पेक्षां आचरणानें व विद्येनें अधिक अशा पुरुषांस शिवीगाळ करणारासहि ५० पणच दंड करावा.

परस्त्रीला व उत्कृष्टाला शिवी देणारास पन्नास पण दंड.

वर्णानां मूर्द्धावसिक्तादीनां च परस्पराक्षेपे दण्डकल्पनामाह ॥

**दण्डप्रणयनं कार्यं वर्णजात्युत्तराधरैः ॥ २०५ ॥**

वर्णा ब्राह्मणादयः। जातयो मूर्द्धावसिक्ताद्याः। वर्णाश्च जायतश्च वर्णजातयः। उत्तराश्च अधराश्च उत्तराधराः। वर्णजातयश्च ते उत्तराधराश्च वर्णजात्युत्तराधराः तैः वर्णजात्युत्तराधरैः परस्परमाक्षेपे क्रियमाणे दण्डस्य प्रणयनं प्रकर्षेण नयनमूहनं वेदितव्यम्। तच्च दण्डकल्पनमुत्तराधरैरिति विशेषोपादानादुत्तराधरभावापेक्षयैव कर्तव्यमित्यवगम्यते। यथा मूर्द्धावसिक्तं ब्राह्मणाद्धीनं क्षत्रियादुत्कृष्टं चाक्रुश्य ब्राह्मणः क्षत्रियाक्षेपनिमित्तात्पञ्चाशत्पणदण्डात्किंचिदधिकं पञ्चसप्तत्यात्मकं दण्डमर्हति। क्षत्रियोपि तमाक्रुश्य ब्राह्मणाक्षेपनिमित्ताच्छतदण्डादूनं पञ्चसप्ततिमेव दण्डमर्हति। मूर्द्धावसिक्तोपि तावाक्रुश्य तमेव दण्डमर्हति। मूर्द्धावसिक्ताम्बष्ठयोः परस्पराक्षेपे ब्राह्मणक्षत्रिययोः परस्पराक्रोशनिमित्तकौ यथा क्रमेण दण्डौ वेदितव्यौ। एवमन्यत्राप्यूहनीयम् ॥ २०५ ॥

## शाखा ३ री.

### ब्राह्मणादि वर्णांनीं व मूर्धावसिक्तादि जातींनीं परस्परांस शिवीगाळ केली असतां दंडयोजना सांगतो.

**मूलार्थ**–वर्णांचा परस्पर व जातींचाहि परस्पर उच्चनीच भाव पाहून दंडयोजना करावी.

**टीकार्थ**– १ ब्राह्मणादि वर्णांचे व मूर्धा वसिक्तादिक जातीचे उच्चनीच मनुष्य ह्यांनीं परस्परांस शिवीगाळ केल्यास दंडयोजना करावी. जसें, ब्राह्मणापेक्षां निकृष्ट आणि क्षत्रियापेक्षां उत्कृष्ट अशा **मूर्धावसिक्तास** ब्राह्मणानें शिवीगाळ केली असतां क्षत्रियास शिवीगाळ केल्यानिमित्त जो ब्राह्मणास ५० **पण** दंड पुढें[1] सांगितला आहे त्यापेक्षां कांहीं अधिक ह्मणजे ७५ **पण** दंड करावा. क्षत्रियानेंहि **मूर्धावसिक्तास** शिवीगाळ केली असतां ब्राह्मणास शिवीगाळ केल्या निमित्त जो १०० **पण** दंड त्यापेक्षां कांहीं कमी म्हणजे ७५ **पण** दंड करावा.

२ **मूर्धावसिक्तानें** ब्राह्मणास किंवा क्षत्रियास शिवीगाळ केली असतां तोच[2] ( ७५ पण ) दंड करावा.

३ ब्राह्मण व क्षत्रिय ह्यांनीं परस्परांस शिवीगाळ केल्या निमित्त जो परस्परांस दंड सांगितला आहे, तोचे दंड **मूर्धावसिक्त** व **अंबष्ठ** ह्यांनीं परस्परांस शिवीगाळ केली असतां योजावा.

ह्याप्रमाणेंच दुसऱ्यांविषयीं ( ह्मणजे निषाद, माहिष्य, उग्र, करण, रथकार इत्यादिकांविषयीं ) उत्कृष्ट निकृष्ट जातीच्या तारतम्यानें दंडयोजना करावी. २०५

---

१ पुढें म्हणजे ४ थ्या अंकांत. २ तोच म्हणजे क्षत्रियाला शिवीगाळ करणाऱ्या ब्राम्हणास ५० पण. ब्राम्हणाला शिवीगाळ करणाऱ्या क्षत्रियाला १०० पण दंड पुढें ४ थ्या अंकांत सांगितलेला.

एवं सवर्णविषये दण्डमभिधाय वर्णानामेव प्रतिलोमानुलोमाक्षेपे दण्डमाह ॥

**प्रातिलोम्यापवादेषु द्विगुणात्रिगुणा दमाः ।**
**वर्णानामानुलोम्येन तस्मादर्द्धार्द्धहानितः ॥ २०६ ॥**

अपवादा अधिक्षेपाः । प्रातिलोम्येनापवादाः प्रातिलोम्यापवादास्तेषु ब्राह्मणाक्रोशकारिणोः क्षत्रियवैश्ययोर्यथाक्रमेण पूर्ववाक्यात् द्विगुणपदोपात्तपञ्चाशत्पणापेक्षया द्विगुणाः शतपणास्त्रिगुणाः सार्द्धशतपणा दण्डा वेदितव्याः । शूद्रस्य ब्राह्मणाक्रोशे ताडनं जिह्वाच्छेदनं वा भवति । यथाह मनुः ॥ शतं ब्राह्मणमाक्रुश्य क्षत्रियो दण्डमर्हति । वैश्योऽध्यर्द्धशतं द्वे वा शूद्रस्तु वधमर्हतीति । विट्शूद्रयोरपि क्षत्रियादनन्तरैकान्तरयोस्तुल्यन्यायतया शतमध्यर्द्धशतं च यथाक्रमेण क्षत्रियाक्रोशे वेदितव्यम् ॥ शूद्रस्य वैश्याक्रोशे शतम् । आनुलोम्येन तु वर्णानां क्षत्रियविट्शूद्राणां ब्राह्मणेनाक्रोशे कृते तस्माद्ब्राह्मणाक्रोशनिमित्ताच्छतपरिमितात्क्षत्रियदण्डात्प्रतिवर्णमर्द्धस्यार्द्धस्य हानिं कृत्वावशिष्टं पञ्चाशत्पञ्चविंशतिसार्द्धद्वादशपणात्मकं यथाक्रमं ब्राह्मणो दण्डनीयः ॥ तदुक्तं मनुना ॥ पञ्चाशत्ब्राह्मणो दण्ड्यः क्षत्रियस्याभिशंसने । वैश्यः स्यादर्द्धपञ्चाशच्छूद्रे द्वादशको दम इति ॥ क्षत्रियेण वैश्ये शूद्रे वाक्रुष्टे यथाक्रमं पञ्चाशत्पञ्चविंशतिको दमौ । वैश्यस्य च शूद्राक्रोशे पञ्चाशदित्यूहनीयम् । ब्राह्मणराजन्यवत्क्षत्रियवैश्ययोरिति गौतमस्मरणात् । विट्शूद्रयोरेवमेव स्वजातिंप्रति तत्त्वत इति मनुस्मरणाच्च ॥ २०६ ॥

असा सवर्णाविषयीं दंड सांगून आतां निकृष्ट वर्णानें आपल्यापेक्षां उत्कृष्टवर्णास शिवीगाळ केली असतां दंड सांगतो.

**मूलार्थ**—आपल्यापेक्षां उत्कृष्ट वर्णाला शिवीगाळ करणाऱ्या निकृष्ट वर्णाविषयीं दुप्पट तिप्पट दंड योजावे.

**टीकार्थ**—४ ब्राह्मणास शिवी देणाऱ्या क्षत्रियास दुप्पट ह्मणजे पूर्वी (२ ऱ्या शाखेच्या ६ व्या अंकांत) सांगितलेला जो दुप्पट ह्मणजे ५० **पण**, त्याचेहि दुप्पट ह्मणजे १०० **पण** दंड करावा, वैश्यास तिप्पठ १५० **पण** दंड करावा.

५ शूद्रानें ब्राह्मणास शिवीगाळ केली असतां ताडन करावें किंवा जीभ कापावी, ही शिक्षा.

ब्राम्हणास शिवी देणारे शूद्राची जीभ कापावी.

**मनु**—ब्राह्मणास शिवीगाळ करणारा क्षत्रिय १०० (पण) दंडास योग्य होतो. वैश्य १५० किंवा [1]२०० (पण) दंडास योग्य होतो. शूद्र तर वध[2] दंडास योग्य होतो.

---

१ येथें किंवा असा विकल्प सांगितला तो अधिक शिवीगाळ केल्यास योजावा.

२ वध दंड ह्मणजे शारीर दंड. तो नऊ प्रकारचा २ ऱ्या प्रकरणीं १० व्या शाखेच्या १५ व्या अंकांत सांगितला, त्यांत जिह्वा छेद आहे अतएव प्रकृतीं वधदंड ह्मणजे जिह्वाछेद ध्यावा.

६ ह्या न्यायेंकरूनच क्षत्रियाला शिवीगाळ करणारा वैश्य १०० (पण) दंडास व शूद्र १५० पण दंडास योग्य होतो. आणि शूद्रानें वैश्याला शिवीगाळ केली असतां तो १०० (पण) दंडास योग्य होतो.

क्षत्रियास शिवीगाळ करणारे वैश्य शूद्रास दंड.

उत्कृष्ट वर्णानें आपल्यापेक्षां निकृष्ट वर्णास शिवीगाळ केली असतां दंड सांगतो.

**मूलार्थ**– उत्कृष्ट वर्णानें आपल्यापेक्षां निकृष्ट वर्णास शिवीगाळ केली असतां त्यांतून अर्धें अर्धाचें अर्धें, कमी दंड योजावा.

**टीकार्थ**– ७ क्षत्रियास, शिवीगाळ करणारा ब्राह्मण, त्यांतून अर्धें म्हणजे ब्राह्मणाला शिवीगाळ केल्यानिमित्त जो क्षत्रियास १०० पण दंड सांगितला त्याचे निम्मे ५० पण दंडास योग्य होतो. वैश्याला शिवीगाळ करणारा ब्राह्मण अर्धाचें अर्ध ह्मणजे २५ (पण) दंडास पात्र होतो. शूद्रास शिवीगाळ करितो तर १२॥ ( पण ) दंडास योग्य होतो.

मनुहि हेंच सांगतो.

**मनु**– ब्राह्मणानें क्षत्रियास शिवीगाळ केली असतां ५० ( पण), वैश्यास केली असतां २५ ( पण ) दंड, शूद्राबद्दल १२ ( पण ) दंड द्यावा.

८ क्षत्रियानें वैश्याला व शूद्राला शिवीगाळ केली तर अनुक्रमानें ५० ( पण ) व २५ ( पण ) दंड घ्यावा. वैश्यानें शूद्रास शिवीगाळ केली असतां ५० ( पण ) दंड योजावा.

**गौतम**– ब्राह्मण व क्षत्रिय ह्यांनीं शिवीगाळ केली असतां जो परस्परांस दंड, तसाच क्षत्रिय, वैश्य ह्यांसहि.

**मनु**–वैश्य व शूद्र ह्या परस्परांसहि असाच दंड योजावा. २०६

---

पुनर्निष्ठुराक्षेपमधिकृत्याह ॥

**बाहुग्रीवानेत्रसक्थिविनाशे वाचिके दमः ।**
**शत्यस्तदर्द्धिकः पादनासाकर्णकरादिषु ॥ २०७ ॥**

बाह्वादीनां प्रत्येकं विनाशे वाचिके वाचाप्रतिपादिते । तव बाहू छिनद्मीत्येवंरूपे शत्यः शतपरिमितो दण्डो वेदितव्यः । पादनासाकर्णकरादिषु आदिग्रहणात्स्फिगादिषु वाचिके विनाशे तदर्द्धिकः तस्य शतस्यार्द्धं तदर्द्धं तद्यस्यास्त्यसौ तदर्द्धिकः पञ्चाशत्पणिको दण्डो वेदितव्यः ॥ २०७ ॥

शाखा ४ थी.

पुनः निष्ठुर भाषणाविषयीं दंड सांगतो.

**मूलार्थ**– बाहु, गळा, नेत्र, मांडी, ह्यांचा वाचिक विनाश केला असतां १०० (पण) दंड. पाय, नाक, कान, कर, इत्यादिकांच्या वाचिक विनाशाविषयीं तर त्याचे निम्मे.

**टीकार्थ**– १ बाहु, गळा, नेत्र, मांडी, ह्यांच्या छेदाच्या "ह्मणजे तुझे हात तोडीन," (तुझे डोळे फोडीन) असा वाणीनें उच्चार केला असतां १०० (पण) दंड करावा. पाय, नाक, कान, हात, इत्यादिकांच्या छेदाचा वाणीनें उच्चार केला असतां ५० पण दंड करावा. २०७

---

**अशक्तस्तु वदन्नेवं दण्डनीयः पणान्दश ।**
**तथा शक्तः प्रतिभुवं दाप्यः क्षेमाय तस्य तु ॥ २०८ ॥**

किंच। यः पुनर्ज्वरादिना क्षीणशक्तिस्त्वद्बाह्वाद्यङ्गभङ्गं करोमीत्येवं शपसमो दशपणान्दण्डनीयः । यः पुनः समर्थः क्षीणशक्तिं पूर्ववदाक्षिपत्यसौ पूर्वोक्तशतादिदण्डोत्तरकाले तस्याशक्तस्य क्षेमार्थं प्रतिभुवं दापनीयः ॥ २०८ ॥

**मूलार्थ**–ह्याप्रमाणें जर अशक्त पुरुष बोलेल तर १० पण दंड करावा. शक्त पुरुष बोलेल तर तसाच दंड करून त्यापासून बोलल्याप्रमाणें घडूं नये म्हणून जामीन घ्यावा.

**टीकार्थ**– २ ज्वरादिकेंकरून अशक्त झालेला मनुष्य वर (१ ल्या अंकांत) सांगितल्याप्रमाणें बोलेल; तर त्यापासून १० पण दंड घ्यावा. जर बळकट मनुष्य अशक्त मनुष्यास बोलेल तर पूर्वी (१ ल्या अंकांत) सांगितल्याप्रमाणें दंड करून त्या अशक्त मनुष्यास त्यापासून उपद्रव न व्हावा एतदर्थ जामीन घ्यावा. २०८

अशक्त मनुष्यास धष्ट मनुष्य बोलेल तर दंड.

---

तीव्राक्रोशे दण्डमाह ॥

**पतनीयकृते क्षेपे दण्डो मध्यमसाहसः ।**
**उपपातकयुक्ते तु दाप्यः प्रथमसाहसम् ॥ २०९ ॥**

पातित्यहेतुभिर्ब्रह्महत्यादिभिर्वर्णिनामाक्षेपे मध्यमसाहसो दण्डः । उपपातकसंयुक्ते पुनर्गोघ्नस्त्वमसीत्येवमादिरूपे क्षेपे प्रथमसाहसं दण्डनीयः ॥ २०९ ॥

---

१ ज्या शाखेंत निष्ठुर भाषणाविषयी दंड सांगून नंतर शिवीगाळ करणारास दंड सांगितला. आतां सिंहावलोकन-न्यायेंकरून पुनः निष्ठुर भाषणास उद्देश करून दंड सांगतो.

शाखा ५ वी.

तीव्र भाषणाविषयीं दंड सांगतो.

**मूलार्थ**–पतित व्हावयाजोग्या दोषांचें भाषण केलें असतां **मध्यमसाहस** दंड; उपपातक युक्त भाषण केल्यास **प्रथमसाहस** दंड.

पातित्यादि दोष व्हावयाजोगें भाषण केल्यास दंड.

**टीकार्थ**– १ पतित होण्यास कारणीभूत जीं ब्रह्महत्यादि पापें त्यांकडून वर्णांची निर्भर्त्सना केली असतां मध्यमसाहस दंड, उपपातकयुक्त म्हणजे "तूं गो हत्यारी आहेस" असें अशाप्रकारचें दुःशब्द बोलले असतां **प्रथमसाहस** दंड करावा. २०९

---

**त्रैविद्यनृपदेवानां क्षेप उत्तमसाहसः ।**
**मध्यमो जातिपूगानां प्रथमो ग्रामदेशयोः ॥ २१० ॥**

किंच। त्रैविद्याः वेदत्रयसंपन्नास्तेषां राज्ञां देवानां च क्षेपे उत्तमसाहसो दण्डः। ये पुनर्ब्राह्मणमूर्द्धावसिक्तादिजातीनां पूगाः संघास्तेषां आक्षेपे मध्यमसाहसो दण्डः। ग्रामदेशयोः प्रत्येकमाक्षेपे प्रथमसाहसो दण्डो वेदितव्यः ॥ इति वाक्पारुष्यंनाम विवादप्रकरणम् ॥ २१० ॥

**मूलार्थ**–त्रैविद्य, राजा, देव, ह्यांस दुर्भाषण केलें तर त्याबद्दल **उत्तमसाहस** दंड; जातीचे **पूग** ह्यांच्या उद्देशानें दुर्भाषण करणारास **मध्यमसाहस** दंड; गांव, देश ह्यांविषयींचे दुर्भाषणाबद्दल **प्रथमसाहस** दंड करावा.

**टीकार्थ**– २ त्रैविद्य, राजे, देव, ह्यांस दुर्भाषण केलें असतां **उत्तमसाहस** दंड; जे ब्राह्मण, **मूर्धावसिक्त**, इत्यादि जातींचे **पूग** त्यांस दुःशब्द बोलणारास मध्यमसाहस दंड; गांव, देश ह्या प्रत्येकांस उद्देश करून दुःशब्द बोलले असतां **प्रथमसाहस** दंड करावा. २१०

त्रैविद्य, राजे, देव ह्यांस दुर्भाषण करणारास दंड.

---

## दंडपारुष्य प्रकरण १९ वें.

दण्डपारुष्यं नाम संप्रति प्रस्तूयते ॥ तत्स्वरूपं च नारदेनोक्तम् ॥ परगात्रेष्वभिद्रोहो हस्तपादायुधादिभिः। भस्मादिभिश्चोपघातो दण्डपारुष्यमुच्यते इति ॥ परगात्रेषु स्थावरजङ्गमात्मकद्रव्येषु हस्तपादायुधरादिग्रहणाद्ग्रावादिभिर्योऽभिद्रोहो हिंसनं दुःखोत्पादनं तथा भस्मना आदिग्रहणाद्रजःपङ्कपुरीषाद्यैश्च यः उपघातः संस्पर्शनरूपं मनोदुःखोत्पादनं तदुभयं दण्डपारुष्यम्। दण्डयतेऽनेनेति दण्डो देहस्तेन यत्पारुष्यं विरुद्धाचरणं जङ्गमादेर्द्रव्यस्य तद्दण्डपारुष्यम्। तस्य त्वगावरणादिकरणभेदेन त्रैविध्यमभिधाय हीनमध्योत्तमद्रव्यरूपकर्मत्रैविध्यात् पुनस्त्रैविध्यं तेनैवोक्तम्।

तस्यापि दृष्टं त्रैविध्यं हीनमध्योत्तमक्रमात् । अवगोरणनिःसङ्गपातनक्षतदर्शनैः ॥ हीनमध्योत्तमानां तु द्रव्याणां समतिक्रमात् । त्रीण्येव साहसान्याहुस्तत्र कण्टकशोधनमिति॥ निःसङ्गपातनं निःशङ्कप्रहरणम् । त्रीण्येव साहसानि त्रिप्रकाराण्येव । साहसात्कृतानि दण्डपारुष्याणीत्यर्थः ॥ तथा वाग्दण्डपारुष्ययोरुभयोरपि द्वयोः प्रवृत्तकलहयोर्मध्ये यः क्षमते तस्य न केवलं दण्डाभावः किंतु पूज्य एव । तथा पूर्वं कलहे प्रवृत्तस्य दण्डगुरुत्वम् । कलहे च बद्धवैरानुसन्धातुरेव दण्डभाक्त्वम् । तथा द्वयोरपराधविशेषापरिज्ञाने दण्डः समः । तथा श्वपचादिभिरार्याणामपराधे कृते सज्जना एव दण्डदापनेऽधिकारिणस्तेषामशक्यत्वे तान् राजा घातयेदेव नार्थं गृह्णीयादित्येवं पञ्चप्रकारा विधयस्तेनैवोक्ताः । विधिः पञ्चविधस्तूक्त एतयोरुभयोरपि । पारुष्ये सति संरम्भादुत्पन्ने क्रुद्धयोर्द्वयोः ॥ स मान्यते यः क्षमते दण्डभाग्योऽतिवर्तते । पूर्वमाक्षारयेद्यस्तु नियतं स्यात्स दोषभाक् ॥ पश्चाद्यः सोऽप्यसत्कारी पूर्वे तु विनयो गुरुः । द्वयोरापन्नयोस्तुल्यमनुबध्नाति यः पुनः ॥ स तयोर्दण्डमाप्नोति पूर्वो वा यदि वेतरः । पारुष्यदोषावृतयोर्युगपत्संप्रवृत्तयोः ॥ विशेषश्चेन्न लक्ष्येत विनयः स्यात्समस्तयोः । श्वपाकषण्डचण्डालव्यङ्गेषु वधवृत्तिषु । हस्तिपव्रात्यदासेषु गुर्वाचार्यनृपेषु च ॥ मर्यादातिक्रमे सद्यो घात एवानुशासनम् । यमेव ह्यतिवर्तेरन्नेते सन्तं जनं नृषु ॥ स एव विनयं कुर्यान्न तद्विनयभाङ्नृपः । मला ह्येते मनुष्याणां धनमेषां मलात्मकम् ॥ अतस्तान्घातयेद्राजा नार्थदण्डेन दण्डयेदिति ॥

शाखा १ ली.

आतां दंडपारुष्याचें निरूपण करितो; त्याचें स्वरूप नारद सांगतो.

**नारद**—१ हात, पाय, शस्त्र, इत्यादिकेंकरून जी दुसऱ्याचे शरीरास पीडा देणें, व भस्मादिकेंकरून जो दुसऱ्याचे अंगास लेप करणें, हें सारें दंडपारुष्य ह्मटलें आहे.

**अर्थ**— हात, पाय, शस्त्र इत्यादिक शब्देंकरून धोंडे, विटा ह्यांकडून दुसऱ्याचे स्थावरजंगमरूप द्रव्याला दुःख देणें; तसेंच भस्म, धूळ, चिखल, शेण, मूत, इत्यादिक दुसऱ्याचे अंगावर टाकण्यानें अंतःकरणास दुःख देणें; हें दोहों प्रकारचें दंडपारुष्य ह्मटलें आहे.

दंडपारुष्याचें स्वरूप.

दंडतारतम्य समजण्यासाठीं हीनद्रव्य, मध्यमद्रव्य, उत्तमद्रव्य, असें तीन प्रकारचें तें दंडपारुष्य तोच ( नारद ) सांगतो.

**नारद**— २ हीन, मध्यम, उत्तम, ह्या भेदेंकरून तें दंडपारुष्य तीन प्रकारचें, व शस्त्रादिक उगारणें, निःशंक प्रहार करणें, क्षत उत्पन्न करणें, ह्यांकडून; हीन, मध्यम, उत्तम ह्या द्रव्यांस पीडा देण्यामुळें हीं तिन्हीं साहसेंच ह्मटलीं आहेत, ह्यास्तव येथें अन्यायाचा विचार करणें अवश्य आहे.

दंडपारुष्याचे प्रकार

३ तसेंच वाक्पारुष्य व दंडपारुष्य ह्या दोहों व्यवहारीं कलह करणारे जे दोघे

कलहामध्यें दोघांतून जो क्षमा करितो, त्यास दंड नाहीं. जो पहिल्यानें भांडण काढितो त्यास अधिक दंड.

( वादि प्रतिवादी ) ह्यांतून जो क्षमा करितो, तो केवळ दंड पावत नाहीं इतकेंच नाहीं, तर पूज्यहि होतो. तसेंच कलहाविषयीं पूर्वीं जो उपस्थित झाला त्याला अधिक दंड. तसेंच कलहाविषयीं बद्धवैराचें संधान करणाराच दंडास पात्र होतो. तसेंच दोघांतून कोणाचा अपराध अधिक आहे हें समजण्यांत येत नाहीं, तर समान दंड करावा. तसेंच चंडालादिकांनीं महाजनांचा अपराध केला असतां त्यांस शिक्षा करण्याविषयीं महाजनच अधिकारी, त्यांस सामर्थ्य नसल्यास राजानें शिक्षाच करावी, धनदंड घेऊं नये.

नारद– वाक्पारुष्य किंवा दंडपारुष्य ह्याविषयीं आवेशानें दोघे क्षुब्ध होऊन प्रवृत्त झाले असतां त्यांमध्यें जो क्षमा करितो तो पूज्य होतो, आणि जो क्षमा करीत नाहीं तो दंड्य ठरतो. जो अगोदर ( विनापराध दुसऱ्यास ) *शिवीगाळ करितो तो निश्चयें अपराधी ठरतो, व जो त्याला उलट करितो तोहि अपराधी खरा, पण अगोदर अपराध करणारा अधिक दंडास पात्र होतो. कलहाविषयीं समान प्रवृत्त जे दोघे त्यांतून जो पुनः पुनः उठावणी करितो तो दोघांचेहि दंडास पात्र होतो. वाक्पारुष्य व दंडपारुष्य ह्यांविषयीं एकसमयावच्छेदेंकरून प्रवृत्त झाले आणि दोघांचेहि अपराध समान आहेत तर शिक्षाहि समान करावी. श्वपाक, षंड, चांडाल, अंगहीन, हिंसेनें उपजीवन करणारे, हस्तिप, व्रात्य, †दास, गुरु, आचार्य, राजा, ( संन्यासी ) ह्यांच्या मर्यादेचा अतिक्रम केला असतां तत्काळ घातरूपच शिक्षा करावी. हे ( श्वपाक षंड इत्यादिक ) ज्या सत्पुरुषांचा उपमर्द करितील तोच त्यांस शिक्षा करील. (तो शिक्षा करावयास शक्त असल्यास)राजानें करूं नये. हे ( श्वपाक षंड इत्यादिक ) मनुष्यांचे मलरूप आहेत. अतएव त्यांचें धनहि मलरूपच म्हणून राजानें त्यांचा घातच करावा, धनदंड करूं नये. असा ह्या वाक्पारुष्य दंडपारुष्य ह्यांचा पांच प्रकारचा विधि सांगितला आहे.

---

एवंभूतदण्डपारुष्यनिर्णयपूर्वकत्वाद्दण्डप्रणयनस्य तत्स्वरूपसंदेहे निर्णयहेतुमाह ॥

**असाक्षिकहते चिह्नैर्युक्तिभिश्चागमेन च ।**
**द्रष्टव्यो व्यवहारस्तु कूटचिह्नकृतो भयात् ॥ २११ ॥**

यदा कश्चिद्रहस्यहमननेन हत इति राज्ञे निवेदयति तदा चिह्नैर्वर्णादिस्वरूपगतैर्लिंगैर्युक्त्या कारणप्रयोजनपर्यालोचनात्मिकया आगमेन जनप्रवादेन चशब्दाद्दिव्येन वा कूटचिह्नकृतसंभावनाभयात्परीक्षा कार्या ॥ २११ ॥

दंडयोजनेविषयीं दंडपारुष्याचे स्वरूपाचा निर्णय कारण आहे ह्मणून त्याचे स्वरूपाविषयीं संदेह प्राप्त झाला असतां निर्णयोपाय सांगतो.

---

* शिवीगाळ करितो किंवा दंडपारुष्य करितो.

† दासाचे पंधरा प्रकार आहेत. त्यांचीं स्वरूपें १५ व्या प्रकरणी १ ल्या शाखेच्या ३ ऱ्या अंकांत पाहवीं.

मूलार्थ– अप्रात्यक्षिक हनन घडलें असतां मुद्दा, युक्ति, जनप्रवाद, ह्यांकडून अपराध निर्णय करावा. कारण कदाचित् खोटा मुद्दाहि संभवतो.

एकांतीं दंडपारुष्य झाल्यास निर्णयोपाय.

टीकार्थ– १ जर कोणी फिर्याद करील कीं ह्यानें मला एकांतीं मारिलें (किंवा शिवीगाळ दिली), तर मुद्दा म्हणजे जखम, रक्तस्राव, ह्यांकडून अथवा कोणत्या निमित्तामुळें, किमर्थ मारिलें अशा युक्तिविचारानें, अथवा जनप्रवादावरून, अथवा दिव्यानें परीक्षा करावी. कारण, खोट्या जखमा वगैरे मुद्दा दाखवून तर्कटानेंहि असें संभवतें. २११

---

एवं निश्चिते साधनविशेषेण दण्डविशेषमाह ॥

**भस्मपङ्करजःस्पर्शे दण्डो दशपणः स्मृतः ।**
**अमेध्यपार्ष्णिनिष्ठ्यूतस्पर्शने द्विगुणः स्मृतः ॥ २१२ ॥**
**समेष्वेवं परस्त्रीषु द्विगुणस्तूत्तमेषु च ।**
**हीनेष्वर्द्धदमो मोहमदादिभिरदण्डनम् ॥ २१३ ॥**

भस्मना पङ्केन रेणुना वा यः परं स्पर्शयत्यसौ दशपणं दण्डं दाप्यः ॥ अमेध्यमिति अश्रुश्लेष्मनखकेशकर्णविट्दूषिकाभुक्तोच्छिष्टादिकं च गृह्यते ॥ पार्ष्णिः पादस्य पश्चिमो भागः। निष्ठ्यूतं मुखनिःसारितं जलम् । तैः स्पर्शने ततः पूर्वोक्तदशपणात् द्विगुणो विंशतिपणो दण्डो वेदितव्यः । पुरीषादिस्पर्शने पुनः कात्यायनेन विशेष उक्तः ॥ छर्दिमूत्रपुरीषाद्यैरापाद्यः स चतुर्गुणः । षड्गुणः कायमध्ये स्यान्मूर्ध्नि त्वष्टगुणः स्मृत इति ॥ आद्यग्रहणाद्वसाशुक्रासृङ्मज्जानो गृह्यन्ते । एवंभूतः पूर्वोक्तो दण्डः सवर्णविषये द्रष्टव्यः । परभार्यासु चाविशेषेण । तथोत्तमेषु स्वापेक्षया अधिकश्रुतवृत्तेषु पूर्वोक्ताद्दशपणाद्विंशतिपणाच्च दण्डाद्द्विगुणो दण्डो वेदितव्यः । हीनेषु स्वापेक्षया न्यूनश्रुतादिषु पूर्वोक्तस्यार्द्धदमः पञ्चपणो दशपणश्च वेदितव्यः ॥ मोहश्चित्तवैकल्यम् । मदो मद्यपानजन्योऽवस्थाविशेषः । आदिग्रहणाद्ग्रहावेशादिकम् । एतैर्युक्तेन भस्मादिस्पर्शने कृतेऽपि दण्डो न कर्तव्यः ॥ २१२ ॥ २१३ ॥

अशाप्रकारें अपराधनिश्चय झाल्यानंतर कोणत्या अपराधीं कोणता दंड करावा तें सांगतो.

**मूलार्थ**– राख, चिखल, धूळ, हीं लाविलीं असतां १० पण दंड; अमंगळपदार्थ, टांच, थुंकी, हीं लाविलीं असतां त्याचे दुप्पट दंड; हा प्रकार सजातीयाविषयीं जाणावा. परस्त्रियेविषयीं व उत्तमाविषयीं त्याचे दुप्पट; निकृष्टाविषयीं तर त्याचे निमे; मोह, मद, इत्यादि कारणामुळें घडल्यास दंड नाहीं.

---

१ एकांतीं हें उपलक्षण. वास्तव रात्री, अंधकारांत, निर्जन, अरण्यांत व अशा प्रकारचे ठिकाणींही.

**टीकार्थ**– ५ राख, चिखल, किंवा धूळ हीं जो दुसऱ्याचे आंगावर टाकितो त्यास १० **पण** दंड; तसेंच अमंगळ म्हणजे अश्रूदक, शेंबूड, नखें, केंस, कानांतला मळ, नेत्रमल, उष्टें, इत्यादिक, व टांन, आणि थुंकी हीं दुसऱ्याचे अंगावर टाकिलीं असतां दुप्पट म्हणजे २० **पण** दंड.

दुसऱ्याचे अंगावर राख चिखल वगैरे फेंकणारास १० पण दंड.

शेण ( विष्ठा ) इत्यादि टाकिलीं असतां कात्यायन दंड विशेष सांगतो.

**कात्यायन**– ६ ओक, मूत, शेण ( किंवा विष्ठा ) इत्यादिक दुसऱ्यास लाविलीं तर चौपट ( ४० पण ) दंड. तीन कमरेच्या वर, आणि गळ्याचे खालीं लाविलीं असतां सहापट ( ६० पण ) दंड आणि मस्तकीं लाविलीं तर आठपट ( ८० पण ) दंड सांगितला आहे.

शेण वगैरे दुसऱ्याचे अंगावर टाकणारास शरीराच्या अवयवभेदें करून दंड.

( ह्या अंकांतील ) इत्यादिक शब्दानें वसा, शुक्र, रक्त, मज्जा हीं घ्यावीं.

हा वर ( ५ व्या व ६ व्या अंकांत ) सांगितलेला प्रकार, साधारण सजातीयांविषयीं जाणावा.

७ सामान्यतः परस्त्रीचे अंगावर तसेंच उत्तम म्हणजे आपणापेक्षां अधिक श्रुतवृत्त संपन्न अशा मनुष्याचे आंगावर तीं तीं[1] द्रव्यें टाकिलीं असतां पूर्वी ( ५ व्या अंकांत ) सांगितलेला जो १० **पण**, २० **पण** दंड त्याचे दुप्पट घ्यावा.

परस्त्री व आपणापेक्षां मोठे यांविषयीं दुप्पट दंड.

८ निकृष्ट म्हणजे आपणापेक्षां श्रुतवृत्तानें कमी अशा मनुष्याचे अंगावर तीं तीं द्रव्यें टाकिलीं असतां पूर्वी ( ५ व्या अंकांत ) सांगितलेला जो १० **पण**, २० **पण** दंड, त्याचे निमे म्हणजे ५ पण व १० पण दंड करावा.

निकृष्टांविषयीं निमे दंड

९ मोह म्हणजे चित्तवैकल्य तद्विशिष्ट, व मत्त, उन्मत्त, प्रमत्त, इत्यादिकांनीं दुसऱ्याचे अंगावर राख वगैरे टाकिलीं असतां दंड करूं नये. २१२, २१३.

मोहादिकें करून घडल्यास दंड नाहीं.

---

प्रातिलोम्यापराधे दण्डमाह ॥

**विप्रपीडाकरं छेद्यमङ्गमब्राह्मणस्य तु ।**
**उद्गूर्णे प्रथमो दण्डः संस्पर्शे तु तदर्द्धिकः ॥ २१४ ॥**

**ब्राह्मणानां पीडाकरमब्राह्मणस्य क्षत्रियादेर्यदङ्गं करचरणादिकं. तच्छेत्तव्यम् । क्षत्रियवैश्ययोरपि पीडां कुर्वतः शूद्रस्याङ्गच्छेदनमेव । येन केनचिदङ्गेन हिंस्याच्छ्रेयांसमन्त्यजः। छेत्तव्यं तत्तदेवास्य तन्मनोरनुशासनमिति । द्विजातिमात्रस्यापराधे शूद्रस्याङ्गच्छेदविधानाद्वैश्यस्यापि क्षत्रियापकारिणोऽयमेव दण्डस्तुल्यन्यायत्वात् ।**

[1] तीं तीं म्हणजे ५ व्या अंकांत सांगितलेलीं तशीच ६ व्या अंकांत सांगितलेलीं हीं द्रव्यें टाकिलीं असतां ६ व्या अंकांतील जो ४० पण ६० पण ८० पण दंड सांगितला तोही दुप्पट वाढवावा.

उद्गूर्णे वधार्थमुद्यते शस्त्रादिके प्रथमसाहसो वेदितव्यः । शूद्रस्य पुनरुद्गूर्णेऽपि हस्तादिच्छेदनमेव । पाणिमुद्यम्य दण्डं वा पाणिच्छेदनमर्हतीति मनुस्मरणात् ॥ उद्गिरणार्थं शस्त्रादिस्पर्शने तु तदर्द्धिकः प्रथमसाहसादर्द्धदण्डो वेदितव्यः ॥ भस्मादिसंस्पर्शे पुनः क्षत्रियवैश्ययोः प्रातिलोम्यापवादेषु द्विगुणत्रिगुणा दमा इति वाक्पारुष्योक्तन्यायेन कल्प्यम् । शूद्रस्य तत्रापि हस्तच्छेद एव । अवनिष्ठीवतो दर्पाद्द्वावोष्ठौ छेदयेन्नृपः । अवमूत्रयतो मेढ्रमवशर्द्धयतो गुदमिति मनुस्मरणात् ॥ २१५ ॥

### शाखा २ री.

निकृष्ट वर्णानें आपल्या पेक्षां उत्कृष्ट वर्णाचा अपराध केला असतां दंड सांगतो.

**मूलार्थ**— ब्राह्मणास पीडा करणाऱ्या क्षत्रियादिकांचा अवयव कापावा. ( शस्त्रादिक ) उगारलें असतां **प्रथम साहस** दंड, नुस्ता स्पर्श केला असतां त्याचे निम दंड करावा.

**टीकार्थ**— १ ब्राह्मणांस पीडा करणारा असा क्षत्रिय, वैश्य, शूद्र, ह्यांचा जो हात, पाय, ( नाक, तोंड ) इत्यादिक अवयव तो कापावा.

ब्राह्मणांस पीडा करणारे इतरांचा अवयव तोडावा.

२ ह्याप्रमाणेंच क्षत्रिय, वैश्य, ह्यांस पीडा करणाऱ्या शूद्राचाहि अवयव छेदावाच.

क्षत्रिय वैश्य ह्यांस पीडा देणाऱ्या शूद्राचाही अवयव तोडावा.

**मनु**— शूद्र आपणा पेक्षां उत्कृष्टास ज्या कोणत्या अवयवानें पीडा देईल तो तो त्याचा अवयव छेदावाच. अशी मनूची आज्ञा आहे.

असा **द्विजाति** मात्राचा शूद्रानें अपराध केला असतां अंगछेदन सांगितलें आहे.

३ ह्या न्यायेंकरूनच क्षत्रियास पीडा करणारा जो वैश्य त्यासहि हाच ( वर सांगितलेला ) दंड जाणावा.

४ मारण्याच्या उद्देशानें शस्त्रादिक उगारलें असतां **प्रथम साहस** दंड करावा. परंतु शूद्रानें शस्त्रादिक उगारलें असतां हस्तादिक अवयवच तोडावा.

शस्त्रादिक उगारिलें असतां प्रथम साहस दंड.

**मनु**— ( **शूद्रानें** ) हात उगारला किंवा शस्त्र उगारिलें तर हात तोडावा.

५ उगारण्यासाठीं नुस्ता शस्त्रादिकास स्पर्श केला असतां त्याचे निमे ह्मणजे **प्रथम साहसाचे** अर्धा दंड करावा.

शस्त्रादिकास नुसता स्पर्श केला तर प्रथम साहसाचे निमे.

६ क्षत्रिय व वैश्य ह्यांनीं १ ल्या शाखेच्या ५ व ६ व्या अंकांत सांगितलेला अप-

क्षत्रिय वैश्य ह्यांनीं राख वगैरे फेंकल्यास दंड.

राध केल्यास वाक्पारुष्य प्रकरणीं ३ ऱ्या शाखेच्या ४ थ्या अंकांत जसा दंड सांगितला आहे त्या न्यायेंकरून येथेंहि योजावा. तशा अपराधींहि शूद्राचा तर हस्तच्छेदच करावा.

मनु– जर शूद्र दांडगेपणानें ( ब्राह्मणादिकाचे अंगावर ) थुंकेल तर राजानें त्याचे दोन्हीं ओंठ कापावे, मुतेल तर शिश्न कापावें, हगेल तर तें इंद्रिय कापावें. २१४

---

एवं प्रातिलोम्यापराधे दण्डमभिधाय पुनः सजातिमधिकृत्याह ॥

**उद्गूर्णे हस्तपादे तु दशविंशतिकौ दमौ ।**

**परस्परं तु सर्वेषां शस्त्रे मध्यमसाहसः ॥ २१५ ॥**

हस्ते पादे वा ताडनार्थमुद्गूर्णे यथाक्रमं दशपणो विंशतिपणश्च दण्डो वेदितव्यः ॥ परस्परवधार्थं शस्त्रे उद्गूर्णे सर्वेषां वर्णिनां मध्यमसाहसो दण्डः ॥ २१५ ॥

शाखा ३ री.

असा निकृष्ट जातीनें आपणापेक्षां उत्कृष्ट जातीचा अपराध केला असतां दंड सांगून पुनः सजातीयास उद्देश करून दंड सांगतो.

मूलार्थ– जातींमध्येंच परस्परांनीं हात उगारला असतां १० पण, पाय उगारला असतां २० पण दंड, आणि शस्त्र उगारलें असतां मध्यमसाहस दंड.

टीकार्थ– १ ताडनासाठीं हात उगारला तर १० पण दंड व पाय उगारल्यास २० पण दंड, वधाच्या उद्देशानें परस्पर शस्त्र उगारलें तर सर्व वर्णांस ( किंवा जातीस ) मध्यम साहस दंड. २१५

ताडनाच्या इराद्यानें शस्त्रादिक उगारिलें असतां दंड.

---

**पादकेशांशुककरोल्लुञ्चनेषु पणान् दश ।**

**पीडाकर्षांशुकावेष्टपादाध्यासे शतं दमः ॥ २१६ ॥**

किंच । पादकेशवस्त्रकराणामन्यतमं गृहीत्वा य उल्लुञ्चति झटित्याकर्षयति असौ दशपणं दण्ड्यः। पीडा च कर्षश्च अंशुकावेष्टश्च पादाध्यासश्च पीडाकर्षांशुकावेष्टपादाध्यासं तस्मिन् समुच्चिते शतं दण्ड्यः। एतदुक्तं भवति । अंशुकेनावेष्ट्य गाढमापीड्याकृष्य च यः पादेन घट्टयति तं शतं पणान् दापयेदिति ॥ २१६ ॥

---

१. तो न्याय म्हणजे असें १ ल्या शाखेच्या ५ व्या अंकांत सांगितलेला अपराध जर ब्राम्हणाचा क्षत्रियानें केला असेल तर त्या अंकांत त्या त्या अपराधीं जो १० पण २० पण दंड सांगितला त्याचे दुप्पट म्हणजे २० पण ४० पण दंड करावा. क्षत्रियानिमित्त वैश्यासहि दुप्पट. ब्राम्हणाचे अपराधा निमित्त वैश्यास तिप्पट म्हणजे ३० पण ६० पण दंड करावा,

२. ह्या मनुवचनांत जो शूद्राला शारीर दंड सांगितला तो सामान्य ब्राम्हणादिकांविषयीं नव्हे, श्रुत वृत्त संपन्न पूज्य अशा ब्राम्हणादिकां विषयीं असावा.

**मूलार्थ**— पाय, केश, वस्त्र, हात हीं हिसकलीं असतां १० पण दंड आणि वस्त्रानें वेष्टून पीडा होई असें जें लाथडणें त्याविषयीं १०० (पण) दंड.

**टीकार्थ**— २ जो पाय, केश, वस्त्र, हात, ह्यांतून एखादें एकाएकीं ओढितो त्याला १० पण दंड करावा. व पीडा होई असें ओढणें, वस्त्रानें बांधणें, लाथ मारणें, इतकीं एकदांच केलीं असतां, ह्मणजे ओढून बळकट धरून, वस्त्रानें बांधून लाथांनीं मारिलें असतां १०० पण दंड करावा. २१६.

केश व वस्त्रादिक हिसकणारास व मोटकळ्या बांधून मारणारास दंडयोजना.

---

## शोणितेन विना दुःखं कुर्वन्काष्ठादिभिर्नरः।
## द्वात्रिंशतं पणान्दण्ड्यो द्विगुणं दर्शनेऽसृजः ॥ २१७ ॥

**किंच।** यः पुनः शोणितं यथा न दृश्यते तथा मृदुताडनं काष्ठलोष्टादिभिः करोत्यसौ द्वात्रिंशतं पणान् दण्ड्यः ॥ यदा पुनर्गाढताडनेन लोहितं दृश्यते तदा द्वात्रिंशतो द्विगुणं चतुःषष्टिपणान् दण्डनीयः। त्वङ्मांसास्थिविभेदे पुनर्विशेषो मनुना दर्शितः। त्वग्भेदकः शतं दण्ड्यो लोहितस्य च दर्शकः। मांसभेत्ता च षण्निष्कान्प्रवास्यस्त्वस्थिभेदक इति ॥ २१७ ॥

**मूलार्थ**— रक्त न येई असें काष्ठादिकेंकरून दुखावतो त्याला ३२ पण दंड करावा, रक्त निघेल तर त्याच्या दुप्पट दंड.

**टीकार्थ**— ३ जो रक्त न निघे असें हलकें काष्ठादिकेंकरून ताडन करितो त्याला ३२ पण दंड करावा. अतिजोरानें मारिल्यामुळें रक्त निघेल तर दुप्पट म्हणजे ६४ पण दंड करावा.

काष्ठादिकेंकरून मारणारास दंडयोजना.

त्वचा, मांस, हाड, ह्यांचें विदारण केलें असतां मनु विशेष दंड सांगतो.

**मनु**— ४ त्वचेचा भेद करणारास १०० (पण) दंड. तसाच रक्त काढणारास १०० (पण) दंड. मांस विदारण करणारास ६ निष्क दंड आणि हाड मोडणारास हद्दपार करावें. २१७

रक्त मांसादिक दुखविणारास दंड योजना.

---

## करपाददतोभङ्गे छेदने कर्णनासयोः।
## मध्यो दण्डो व्रणोद्भेदे मृतकल्पहते तथा ॥ २१८ ॥

**किंच।** करपाददन्तस्य प्रत्येकं भङ्गे कर्णनासस्य च प्रत्येकं छेदने रूढव्रणस्योद्भेदने

---

१. सुबोधिनी. याज्ञवल्क्य रक्ताळ करणारास ६४ पण दंड सांगतो आणि मनु तर १०० पण दंड सांगतो. त्याची व्यवस्था अशी कीं मर्म स्थळीं रक्त काढणारास १०० पण दंड आणि इतरस्थळीं रक्ताळ करणारास ६४ पण दंड करावा.

मृतकल्पो यथा भवति तथा हते ताडिते मध्यमसाहसो वेदितव्यः । अनुबन्धादिना विषयस्य साम्यमत्रापादनीयम् ॥ २१८ ॥

मूलार्थ–हात, पाय, दांत, ह्यांचा भंग केला असतां; कान, नाक ह्यांचा छेद केला असतां; आणि मृतकल्प होई असें मारिलें असतां मध्यमसाह दंड करावा.

टीकार्थ–५ हात, पाय, दांत, ह्या प्रत्येकाचा भंग केला असतां; व कान, नाक, ह्या प्रत्येकाचा छेद केला असतां; उत्पन्न झालेला फोड दुखावला असतां; तसेंच मृतकल्प होई असें ताडन केलें असतां मध्यमसाहस दंड करावा. २१८

हस्तादिक अवयव व जखमी करणारास मध्यमसाहस दंड.

---

चेष्टाभोजनवाग्रोधे नेत्रादिप्रतिभेदने ।
कन्धराबाहुसक्थ्नां च भङ्गे मध्यमसाहसः ॥ २१९ ॥

किंच। गमनभोजनभाषणनिरोधे नेत्रस्य आदिग्रहणाज्जिह्वायाश्च प्रतिभेदने कन्धरा ग्रीवा। बाहुः प्रसिद्धः। सक्थि ऊरुस्तेषां प्रत्येकं भञ्जने मध्यमसाहसो दण्डः॥२१९॥

मूलार्थ–गमन, भोजन, वाणी, ह्यांचा अवरोध केला असतां व नेत्र इत्यादिकांचा भेद केला असतां व गळा, बाहु, मांडी, ह्यांचा भंग केला असतां मध्यमसाहस दंड.

टीकार्थ–६ मगन, भोजन, भाषण, ह्या प्रत्येकाचा अवरोध केला असतां; तसेंच नेत्र व (मूळांतील) इत्यादिक म्हणजे जीभ ह्यांचा भंग केला असतां व गळा, बाहु, मांडी, हीं प्रत्येक छेदिलीं असतां मध्यमसाहस दंड करावा. २१९

गमनादिकांचा निरोध व नेत्रादिकांचा भेद करणारास मध्यमसाहस दंड.

---

एकं घ्नतां बहूनां च यथोक्ताद्द्विगुणो दमः ।

अपिच। यदा पुनर्बहवो मिलिता एकस्याङ्गभङ्गादिकं कुर्वन्ति तदा यस्मिन्यस्मिन् अपराधे यो यो दण्ड उक्तस्तत्र तस्माद्द्विगुणो दण्डः प्रत्येकं वेदितव्यः । अतिक्रूरत्वात्तेषां प्रातिलोम्यानुलोम्यापराधयोरप्येतस्यैव सवर्णविषयेऽभिहितस्य दण्डजातस्य वाक्पारुष्योक्तक्रमेण हानिं वृद्धिं च कल्पयेत् । वाक्पारुष्ये य एवोक्तः प्रातिलोम्यानुलोमतः । स एव दण्डपारुष्ये दाप्यो राज्ञा यथाक्रममिति स्मरणात् ।

मूलार्थ–एकास मारणारे जे बहुत, त्यांस वर सांगितल्या दंडाचे दुप्पट दंड.

टीकार्थ–७ जर बहुतांनीं मिळून एकाचा वर[1] सांगितलेला अपराध केला तर ज्या ज्या अपराधीं जो जो दंड सांगितला आहे, तो त्या प्रत्येकापासून दुप्पट घ्यावा. कारण, हें त्यांचें क्रूरत्व मोठें आहे ह्मणून.

बहुतांनीं एकास मारिलें असतां प्रत्येकास दुप्पट दंड.

---

१. वर म्हणजे १ ल्या शाखेच्या ५ व्या अंकापासून वरच्या अंका पर्यंत.

८ उत्कृष्ट जातीनें आपणापेक्षां निकृष्ट जातीचा अपराध व निकृष्ट जातीनें आपणापेक्षां उत्कृष्ट जातीचा अपराध केला असतांहि हा जो सजातीयाविषयीं सांगितलेला दंडसमुदाय तोच वाक्पारुष्यांत सांगितल्या क्रमानें कमी ( निमेनिमे ) करून व वृद्धि ( दुप्पट तिप्पट ) करून योजावा.

उत्कृष्टानें निकृष्टाचा किंवा निकृष्टानें उत्कृष्टाचा अपराध केला असतां दंड योजावा.

मनु— उत्कृष्टानें आपणा पेक्षां निकृष्टाचे व निकृष्टानें आपणापेक्षां उत्कृष्टाचे अपराध केले असतां वाक्पारुष्यांत जे दंड सांगितले आहेत तेच दंड राजानें ह्या दंडपारुष्यांतहि क्रमानें करावे.

## कलहापहृतं देयं दण्डश्च द्विगुणस्ततः ॥ २२० ॥

कलहे वर्तमाने यद्येनापहृतं तत्तेन प्रत्यर्पणीयम् । अपहृतद्रव्याद्द्विगुणश्चापहारनिमित्तो दण्डो देयः ॥ २२० ॥

**मूलार्थ**— कलहांत जें अपहारिलें असेल तें देववावें व दंड दुप्पट घ्यावा.

**टीकार्थ**—९ कलह प्रवृत्त झाला असतां त्यांत जें ( वस्त्रादिक ) ज्यानें अपहारिलें असेल तें त्याजकडून ज्याचें त्याला परत देववावें आणि अपहार केला सबब त्याला अपहृत द्रव्याचे दुप्पट दंड करावा २२०.

कज्यांत जें अपहारिलें असेल तें देववून दुप्पट दंड घ्यावा.

---

## दुःखमुत्पादयेद्यस्तु स समुत्थानजं व्ययम् ।
## दाप्यो दण्डं च यो यस्मिन् कलहे समुदाहृतः ॥२२१॥

किंच । यो यस्य ताडनाद्दुःखमुत्पादयेत्स तस्य व्रणरोपणादौ औषधार्थं पथ्यार्थंच यो व्ययः क्रियते तं दद्यात् । समुत्थानं व्रणरोपणं यस्मिन्कलहे यो दण्डस्तं च दद्यान्न समुत्थानजव्ययमात्रम् ॥ २२१ ॥

**मूलार्थ**—जो दुसऱ्यास दुःख उत्पन्न करितो त्यानें तें दुःख बरें करण्यासाठीं जो खर्च लागेल तो द्यावा. आणि ज्या कलहांत जो दंड सांगितला असेल तो द्यावा.

---

१. हा म्हणजे तिसऱ्या शाखेच्या १ ल्या अंकापासून येथ पर्यंत,

२. वाक्पारुष्यांत सांगितलेल्या क्रमानें म्हणजे असें, चालत्या प्रकरणी ३ ऱ्या शाखेच्या १ ल्या अंकापासून येथपर्यंत सांगितलेला जो जो अपराध तो तो जर निकृष्ट जातीनें आपल्या उत्कृष्ट जातीचा केला आहे तर वाक्पारुष्यप्रकरणीं ३ऱ्या शाखेच्या ४ थ्या ५ व्या ६ व्या अंकांत जसा दुप्पट तिप्पट दंड चढविला आहे, तसा येथें ३ ऱ्या शाखेच्या १ ल्या अंकापासून येथपर्यंत सांगितलेला प्रत्येक दंड हा दुप्पट तिप्पट चढवावा. ह्याप्रमाणेंच उत्कृष्ट जातीनें आपणापेक्षां निकृष्ट जातीचा अपराध केला असतां वाक्पारुष्यप्रकरणीं ३ ऱ्या शाखेच्या ७ व्या ८ व्या अंकांत जसा निमे कमी केला आहे, तसा येथें ३ ऱ्या शाखेच्या १ ल्या अंकापासून येथ पर्यंत सांगितलेला प्रत्येक दंड निमे निमे उतरावा.

टीकार्थ–१० जो ज्याला ताडनादिकेंकरून दुःख उत्पन्न करील त्यानें त्याची ती जखम वगैरे बरी होण्याकरितां औषधासाठीं व पथ्यासाठीं जो खर्च लागेल तो देऊन ज्या दंडपारुष्यरूप अपराधीं जो दंड सांगितला आहे तोहि द्यावा. नुसता खर्चच द्यावा असें नाहीं. २२१

जखम वगैरे दुःख बरें करण्यासाठीं खर्च देववून सांगितलेला दंडही द्यावा.

---

परगात्राभिद्रोहे दण्डमुक्तानन्तरं बहिरङ्गार्थनाशे दण्डमाह ।

**अभिघाते तथा छेदे भेदे कुड्यावपातने ।**
**पणान्दाप्यः पञ्चदशविंशतिं तद्व्ययं तथा ॥ २२२ ॥**

मुद्गरादिना कुड्यस्याभिघाते विदारणे द्विधाकरणे च यथाक्रमं पञ्चपणो दशपणो विंशतिपणश्च दण्डो वेदितव्यः । अवपातने पुनः कुड्यस्यैते त्रयो दण्डाः समन्विता ग्राह्याः । पुनः संपादनार्थं च धनं स्वामिने दद्यात् ॥ २२२ ॥

शाखा ४ थी.

दुसऱ्याचे शरीरास दुःख दिलें असतां त्याविषयीं दंड सांगून आतां गृहादिस्थावर पदार्थांचा नाश केला असतां दंड सांगतो.

**मूलार्थ**– भिंतीचा अभिघात, भेद, छेद, केला असतां व अगदीं पाडिली असतां अनुक्रमानें ५, १०, २०, आणि ३५ पण दंड व त्याचा खर्च द्यावा.

टीकार्थ– १ मुद्गरादिकेंकरून दुसऱ्याची भिंत ( किंवा अशा प्रकारचा दुसरा माल ) दुखाविली असतां ५ पण, विदारिली असतां १० पण, दुभाग केली असतां २० पण, अगदीं पाडिलीं असतां ३५ पण, दंड करावा. आणि भिंत पुनः घालण्यासाठीं जो खर्च लागेल तो मालकास द्यावा. २२२

दुसऱ्याचे घराची भिंत फोडणारास दंड.

---

**दुःखोत्पादि गृहे द्रव्यं क्षिपन्प्राणहरं तथा ।**
**षोडशाद्यः पणान्दाप्यो द्वितीयो मध्यमं दमम् ॥ २२३ ॥**

अपिच । परगृहे दुःखजनकं कण्टकादिद्रव्यं प्रक्षिपन् षोडशपणान् दण्ड्यः । प्राणहरं पुनर्विषभुजङ्गादिकं प्रक्षिपन् मध्यमसाहसं दण्ड्यः ॥ २२३ ॥

**मूलार्थ**–पीडाकारक असें द्रव्य घरांत टाकणारास १६ पण दंड व प्राण घेणारें असें द्रव्य टाकणारास मध्यमसाहस दंड.

टीकार्थ–२ पीडाकारक असें कंटकादिद्रव्य दुसऱ्याचे घरांत टाकणारास १६ पण

विषयानें पर्यंत छाटे सर्प इत्यादिक टाकणारास दंड.

दंड करावा. व प्राण घेणारें असें विष, सर्प, इत्यादिक द्रव्य टाकणारास मध्यमसाहस दंड करावा. २२३

---

पश्वभिद्रोहे दण्डमाह ।

**दुःखे च शोणितोत्पादे शाखाङ्गच्छेदने तथा ।**
**दण्डः क्षुद्रपशूनां तु द्विपणप्रभृतिः क्रमात् ॥ २२४ ॥**

क्षुद्राणां पशूनां अजाविकहरिणप्रायाणां ताडने दुःखोत्पादने असृक्स्रावणे शाखाङ्गच्छेदने शाखाशब्देन चात्र प्राणसंचाररहितं शृङ्गादिकं लक्ष्यते । अंगानि करचरणप्रभृतीनि शाखा चाङ्गंच शाखाङ्गं तस्य छेदने द्विपणप्रभृतिदण्डः । द्वौ पणौ यस्य दण्डस्य स द्विपणः द्विपणः प्रभृतिरादिर्यस्य दण्डगणस्यासौ द्विपणप्रभृतिः स च दण्डगणो द्विपणश्चतुःपणः षट्पणोऽष्टपण इत्येवंरूपो न पुनर्द्विपणस्त्रिपणश्चतुष्पणः पञ्चपण इति । कथमिति चे दुच्यते । अपराधगुरुत्वात्तावत्प्रथमदण्डाद्गुरुतरमुपरितनदण्डत्रयमवगम्यते । तत्र चाश्रुतत्रित्वादिसंख्याश्रयणाद्वरं श्रुतद्विसंख्याया एवाभ्यासाश्रयणेन गुरुत्वसंपादनमिति निरवद्यम् ॥ २२४ ॥

पशूंस दुःख देणारास दंड सांगतो.

**मूलार्थ**–क्षुद्र पशूंस दुःख दिलें असतां, रक्ताळ केलें असतां, व शृंग छेदिलें असतां व अंगादिक छेदिलें असतां, अनुक्रमानें २ पणापासून चढता दंड (योजावा).

**टीकार्थ**–[1] शेळ्या, मेंढ्या, हरणें, इत्यादिक क्षुद्र पशूंस ताडनादिकेंकरून दुःख दिलें असतां २ पण; रक्ताळ केलें असतां ४ पण; शृंगादिक छेदिलें असतां ६ पण; हात, पाय, वगैरे अंग छेदिलें असतां ८ पण दंड. २२४

शेळ्या मेंढ्या वगैरेस इजा देणारास दंड.

---

**लिङ्गस्य छेदने मृत्यौ मध्यमो मूल्यमेव च ।**
**महापशूनामेतेषु स्थानेषु द्विगुणो दमः ॥ २२५ ॥**

किंच । तेषां क्षुद्रपशूनां लिङ्गच्छेदने मरणेच मध्यमसाहसो दण्डः । स्वामिनेच मूल्यं दद्यात् । महापशूनां पुनर्गोगजवाजिप्रभृतीनामेतेषु स्थानेषु ताडनलोहितस्रावणादिनिमित्तेषु पूर्वोक्ताद्दण्डाद्द्विगुणो दण्डो वेदितव्यः ॥ २२५ ॥

**मूलार्थ**–खच्ची केलें असतां व जिवें मारिलें असतां मध्यमसाहस दंड व त्याचें मोलहि देववावें. महापशूंविषयीं ह्या अपराधीं तर तो तो दंड दुपटीनें वाढवावा.

**टीकार्थ**–४ वर सांगितलेले क्षुद्र पशूंस खच्ची केलें असतां व जिवें मारिलें असतां

---

१ वर म्हणजे ३ ऱ्या अंकांत.

क्षुद्र पशूंस ताडनादि केलें असतां दंड.

मध्यमसाहस दंड करून आणखी मालकास किंमत द्यावी. गाय, हत्ती, घोडे, इत्यादि महापशूंविषयीं त्या त्या ह्मणजे ( ३ ऱ्या अंकांत सांगितलेल्या ) ताडन, रक्ताळ करणें, शिंग मोडणें, अंगछेद, ह्या अपराधां पूर्वी[1] सांगितलेल्या त्या त्या दंडाचे दुप्पट दंड करावा. २२५

---

स्थावराभिद्रोहे दण्डमाह।

**प्ररोहिशाखिनां शाखास्कन्धसर्वविदारणे ।**
**उपजीव्यद्रुमाणां च विंशतेर्द्विगुणो दमः ॥ २२६ ॥**

प्ररोहा अङ्कुरास्तद्वन्त्यः शाखाः प्ररोहिण्यः याश्छिन्नाः पुनरुप्ताः प्रतिकाण्डं प्ररोहन्ति ताः शाखा येषां वटादीनां ते प्ररोहिशाखिनः तेषां शाखाछेदने। यतो मूलशाखा निर्गच्छन्ति स स्कन्धस्तस्य छेदने समूलवृक्षच्छेदने च यथाक्रमं विंशतिपणदण्डादारभ्य पूर्वस्मात् पूर्वस्मादुत्तरोत्तरदण्डो द्विगुणः । एतदुक्तं भवति । विंशतिपणश्चत्वारिंशत्पणोऽशीतिपण इत्येवं त्रयो दण्डा यथाक्रमं शाखाछेदनादिष्वपराधेषु भवन्तीति । अप्ररोहिशाखिनामप्युपजीव्यद्रुमाणामाम्रादीनां पूर्वोक्तेषु स्थानेषु पूर्वोक्ता एव दण्डाः । अनुपजीव्याप्ररोहिशाखिषु पुनर्वृक्षेषु कल्प्यम् ॥ २२६ ॥

शाखा ५ वी.

वृक्षादिक छिन्न भिन्न इत्यादि केले असतां दंड सांगतो.

**मूलार्थ**–ज्यांचीं कलमें लागतात असे जे वृक्ष व उपजीव्यवृक्ष त्यांच्या शाखा, खांदा, किंवा ते समूळ छेदिलें असतां अनुक्रमानें २० पण दंडाला दुपटीनें वाढवावें.

ज्यांचीं कलमें लागतात त्या वृक्षांचे छेदाविषयीं दंड.

**टीकार्थ**– १ ज्या तोडिल्या असतां पुनः फुटतात त्या शाखा, ज्यांपासून शाखा निघतात त्या खांदा, ज्यांचीं कलमें लागतात असे जे वृक्ष त्यांच्या शाखा छेदिल्या असतां २० **पण** दंड; खांदा छेदिल्या असतां ४० **पण** दंड; समूल वृक्ष छेदिले असतां ८० **पण** दंड; ज्यांचीं कलमें लागत नाहींत असे जे **उपजीव्य** ह्मणजे अंबा, फणस, इत्यादि वृक्ष त्यांच्या शाखा, व खांदा छेदिल्या असतां २० **पण** व ४० **पण** दंड. समूल छेदिले असतां ८० **पण** दंड करावा.

अंबा फणस वगैरे वृक्षछेदाविषयीं दंड.

२ कलमें लागत नाहींत असे व उपजीव्य नव्हत असे जे वृक्ष त्यांचे शाखा स्कंधादिक छेदिलें असतां तारतम्यानें दंड कल्पावा. २२६

---

१ पूर्वी म्हणजे त्याच ३ ऱ्या अंकांत सांगितलेला जो २ पण ४ पण ६ पण ८ पण दंड.

वृक्षविशेषान्प्रत्याह ।

**चैत्यश्मशानसीमासु पुण्यस्थाने सुरालये ।**
**जातद्रुमाणां द्विगुणो दमो वृक्षेऽथ विश्रुते ॥ २२७ ॥**

चैत्यादिषु जातानां वृक्षाणां शाखाच्छेदनादिषु पूर्वोक्तादण्डाद्विगुणः । विश्रुतेच पिप्पलपलाशादिके द्विगुणो दण्डः ॥ २२७ ॥

कांहीं वृक्षांविषयीं विशेष सांगतो.

**मूलार्थ**–चैत्य, स्मशान, शींव, पवित्रभूमि, देवालय, ह्या स्थळीं झालेल्या वृक्षांच्या व प्रसिद्ध वृक्षांच्या शाखा, स्कंध छेदिले असतां दुप्पट दंड.

**टीकार्थ**–३ चैत्य, स्मशान, शींव, पवित्रभूमि, देवालय ह्या स्थळीं झालेले वृक्षांच्या शाखा स्कंध छेदिले असतां व ते समूल वृक्ष छेदिले असतां पूर्वींच्या दंडाच्या दुप्पट दंड. पिंपळ, पळस, इत्यादिक प्रसिद्ध वृक्षांविषयींहि हाच दंडाचा प्रकार जाणावा. २२७

शींव, देवालयें वगैरे ठिकाणचे वृक्ष तोडिले असतां दंड.

---

गुल्मादीन् प्रत्याह ।

**गुल्मगुच्छक्षुपलताप्रतानौषधिवीरुधाम् ।**
**पूर्वस्मृतादर्द्धदण्डः स्थानेषूक्तेषु कर्तने ॥ २२८ ॥**

गुल्मा अनतिदीर्घनिबिडलता मालत्यादयः । गुच्छा अवल्लीरूपा असरलप्रायाः कुरण्टकादयः । क्षुपाः करवीरादयः सरलप्रायाः । लता दीर्घयायिन्यो द्राक्षातिमुक्ताप्रभृतयः । प्रतानाः काण्डप्ररोहरहिताः सरलयायिन्यः सारिवाप्रभृतयः । ओषध्यः फलपाकावसानाः शालिप्रभृतयः । वीरुधः छिन्ना अपि या विविधं प्ररोहन्ति ताः गुडूचीप्रभृतयः । एतेषां पूर्वोक्तेषु स्थानेषु विकर्तने छेदने पूर्वोक्तादण्डादर्द्धदण्डो वेदितव्यः ॥ इति दण्डपारुष्यप्रकरणम् ॥ २२८ ॥

गुल्मादिकांविषयीं सांगतो.

**मूलार्थ**– गुल्म, गुच्छ, क्षुप, लता, प्रतान, ओषधि, आणि वीरुध, ह्यांच्या वर सांगितलेल्या शाखा छेदिल्या असतां पूर्वी सांगितलेल्या दंडाच्या निमे दंड.

**टीकार्थ**–४ गुल्म ह्मणजे फार लांब वाढत नाहींत असे मालती जाई इत्यादिक, गुच्छ ह्मणजे कोरांटा इत्यादिक, क्षुप ह्मणजे कण्हेर वगैरे, लता ह्मणजे द्राक्षीचा वेल वगैरे, प्रतान म्हणजे कांडवेल वगैरे, आणि ओषधि ह्मणजे साळी गहूं वगैरे, वीरुध ह्मणजे तोडिल्या असतांहि पुनः फुटतात अशी

लहान झाडें वेली वगैरे तोडिल्या असतां दंड.

---

१ पूर्वींच्या म्हणजे १ ल्या अंकांत सांगितलेल्या २० पण ४० पण ८० पण दंडाच्या.

गुळवेल वगैरे ह्यांचीं पूर्वीं ( १ ल्या अंकांत ) सांगितलेलीं स्थानें ह्मणजे शाखा त्यांचा किंवा समूल छेदिलीं असतां पूर्वीं ( १ ल्या अंकांत ) सांगितलेला जो जो दंड त्याचे निमे निमे करावा. २२८

## साहसप्रकरण २० वें.

संप्रति साहसंनाम विवादपदं व्याचिख्यासुस्तल्लक्षणं तावदाह ।

**सामान्यद्रव्यप्रसभहरणात्साहसं स्मृतम् ।**

सामान्यस्य साधारणस्य यथेष्टविनियोगानर्हत्वाविशेषेण परकीयस्य वा द्रव्यस्यापहरणं साहसं। कुतः प्रसभहरणात् प्रसह्य हरणाद्बलावष्टम्भेन हरणादिति यावत्॥ एतदुक्तं भवति। राजदण्डं जनाक्रोशं चोल्लंघ्य राजपुरुषेतरजनसमक्षं यत्किंचिन्मारणपरदारप्रधर्षणादिकं क्रियते तत्सर्वं साहसमिति साहसलक्षणम्। अतः साधारणधनपरधनयोर्हरणस्यापि बलावष्टम्भेन क्रियमाणत्वात्साहसत्वमिति ॥ नारदेनापि साहसस्य स्वरूपं विवृतम्। सहसा क्रियते कर्म यत्किञ्चिद्बलदर्पितैः । तत्साहसमिति प्रोक्तं सहो बलमिहोच्यते इति। तदिदं साहसं चौर्यवाग्दण्डपारुष्यस्त्रीसंग्रहणेषु व्यासक्तमपि बलदर्पावष्टम्भोपाधितो भिद्यते इति दण्डातिरेकार्थं पृथगभिधानम् । तस्यच दण्डवैचित्र्यप्रतिपादनार्थं प्रथमादिभेदेन त्रैविध्यमभिधाय तल्लक्षणं तेनैव विवृतम् । तत्पुनस्त्रिविधं ज्ञेयं प्रथमं मध्यमं तथा। उत्तमं चेति शास्त्रेषु तस्योक्तं लक्षणं पृथक्॥ फलमूलोदकादीनां क्षेत्रोपकरणस्य च। भङ्गाक्षेपोपमर्दाद्यैः प्रथमं साहसं स्मृतम् ॥ वासःपश्वन्नपानानां गृहोपकरणस्य च। एतेनैव प्रकारेण मध्यमं साहसं स्मृतम् ॥ व्यापादो विषशस्त्राद्यैः परदाराभिमर्शनम्। प्राणोपरोधि यच्चान्यदुक्तमुत्तमसाहसम्॥ तस्य दण्डः क्रियाक्षेपः प्रथमस्य शतावरः॥ मध्यमस्य तु शास्त्रज्ञैर्दृष्टः पञ्चशतावरः॥ उत्तमे साहसे दण्डः सहस्रावर इष्यते। वधः सर्वस्वहरणं पुरान्निर्वासनाङ्कने ॥ तदङ्गच्छेद इत्युक्तो दण्ड उत्तमसाहसे इति ॥ वधादयश्चापराधतारतम्यादुत्तमसाहसे समस्ता व्यस्ता वा योज्याः ॥

### शाखा १ ली.

आतां साहस नामक व्यवहाराचें निरूपण करितांना प्रथमतः त्याचें स्वरूप सांगतो.

**मूलार्थ**–साधारण द्रव्याचें बलात्कारानें हरण केलें असतां तें साहस ह्मटलें आहे.

**टीकार्थ**–१ यथेच्छ विनियोग करण्याविषयीं अयोग्य असें समायिक किंवा परकीय द्रव्याचें बलदर्पानें हरण केलें असतां, म्हणजे असें, राजदंड व लोकांचा गलबला ह्यांचें भय नधरितां सरकारी मनुष्य व इतर जन ह्यांच्या समक्ष जें कांहीं मारणें, परस्त्रीला झोंबणें इत्यादि केलें जातें, तें सर्व साहस ह्मटलें आहे, अतएव समायिक द्रव्याचें किंवा परकीय द्रव्याचें जबरीनें हरण केलें असतां तेंहि साहसच.

साहसाचें स्वरूप.

नारदहि साहसाचें स्वरूप विशद करितो.

**नारद**—बलेंकरून मस्त अशा पुरुषांनीं बल व दर्प ह्यांच्या धुंदीनें जें कांहीं कर्म केलें जातें, तें **साहस** म्हटलें आहे.

साहस चोरी वाक्पारुष्य स्त्री संग्रहण ह्यांचा भेद.

२ जरी हें, **साहस**, **स्तेय**, **वाक्पारुष्य**, **दंडपारुष्य**, **स्त्रीसंग्रहण**, ह्यांत संबद्ध आहे तथापि बलदर्पाच्या धुंदीनें केल्यामुळें त्यांहून निराळें आहे. ह्मणून त्याविषयीं अधिक दंड समजण्यासाठीं निराळें **साहस** सांगितलें आहे.

ह्या साहसाच्या अपराधभेदेंकरून निरनिराळे दंडाचें प्रतिपादन करण्यासाठीं प्रथमसाहस, मध्यमसाहस, उत्तमसाहस असे तीन प्रकार सांगून त्यांचें स्वरूपहि तोच सांगतो.

साहस अपराध तीन प्रकारचे.

**नारद**— ३ प्रथम, मध्यम, उत्तम, असें ( साहस ) पुनः तीन प्रकारचें सांगून, त्यांचें स्वरूपहि पार्थक्येंकरून शास्त्रांत सांगितलें आहे.

**नारद**— फल, मूल, उदक, तसेंच क्षेत्राचें आंत, वगैरे सामान ह्यांचा भंग, आक्षेप, आणि उपमर्द करणें हें **प्रथम साहस** ह्मटलें आहे.

**नारद**— वस्त्र, पशु, अन्न, पाणी, तसेंच घराचें सामान ह्यांचा भंग आक्षेप, उपमर्द करणें हें **मध्यमसाहस** ह्मटलें आहे.

उत्तम साहस अपराधाचें स्वरूप.

**नारद**— विष, शस्त्रादिक यांहींकरून दुसऱ्याचा द्रोह करणें; परस्त्रीला भोंवणें व अणखीहि जें कांहीं प्राणघातक काम तें करणें हें सर्व **उत्तमसाहस** म्हटलें आहे.

तीन प्रकारच्या साहसाअपराधीं दंड.

**नारद**— ४ त्या **प्रथमसाहसापराधीं** किमान पक्ष १००( पण ) दंड, मध्यमसाहसापराधीं किमान पक्ष ५००( पण ) दंड सांगितला आहे. उत्तमसाहसापराधीं किमान पक्ष १०००( पण ) दंड करावा. वध, सर्वस्वहरण, गांवांतून हांकून देणें, डाग देणें, अंगच्छेद, असा दंड उत्तमसाहसापराधीं सांगितला आहे.

उत्तमसाहसापराधीं हे वर सांगितलेले जे वधादिक दंड ते अपराधतारतम्येंकरून सगळे मिळून किंवा त्यांतून पाहिजेत तितके योजावे. ॥

तत्र परद्रव्यापहरणरूपे साहसे दण्डमाह ॥

**तन्मूल्याद्द्विगुणो दण्डो निह्नवे तु चतुर्गुणः ॥ २२९ ॥**

तस्यापहृतद्रव्यस्य मूल्यात् द्विगुणो दण्डः यः पुनः साहसं कृत्वा नाहमकार्षमिति निह्नुते तस्य मूल्याच्चतुर्गुणो दण्डो भवति ॥ एतस्मादेव विशेषदण्डविधानात्प्रथमसाहसादिसामान्यदण्डविधानमपहारव्यतिरिक्तविषयं गम्यते ॥ २२९ ॥

शाखा २ री.

त्यांत दुसऱ्याचे द्रव्याचा अपहार एतद्रूप जें साहस त्याविषयीं दंड सांगतो.

मूलार्थ–त्याच्या किमतीपेक्षां दुप्पट दंड, निन्हव केला तर चौपट दंड.

टीकार्थ– १ जो साहसानें द्रव्य नेतो त्याला त्या चोरलेल्या द्रव्याचें जें मोल त्याचे दुप्पट दंड करावा. जो साहस करून, " मी केलें नाहीं " असा निन्हव करितो त्याला किमतीच्या चौपट दंड करावा.

चोरलेल्या द्रव्याचे दुप्पट दंड.

२ असा विशेष दंड सांगितल्यावरूनच वर ( १ल्या शाखेच्या ४थ्या अंकांत ) सांगितलेले जे प्रथमसाहसादि सामान्य दंड ते अपहृतद्रव्याखेरीज इतरांविषयीं जाणावे २२९.

---

साहसस्य प्रयोजयितारं प्रत्याह ॥

यः साहसं कारयति स दाप्यो द्विगुणं दमम् ।
यश्चैवमुक्त्वाहं दाता कारयेत्स चतुर्गुणम् ॥ २३० ॥

यस्तु साहसं कुर्विसेवमुक्त्वा कारयत्यसौ साहसिकदण्डात् द्विगुणं दण्डं दाप्यः । यः पुनरहं तुभ्यं धनं दास्यामि त्वं कुर्वित्येवमुक्त्वा साहसं कारयति स चतुर्गुणं दण्डं दाप्योऽनुबन्धातिशयात् ॥ २३० ॥

साहस करविणाराविषयीं दंड सांगतो.

मूलार्थ– जो साहस करवितो त्याला दुप्पट दंड व जो मी द्रव्य देईन असें बोलून करवितो त्याला चौपट दंड.

टीकार्थ–३ तूं साहस कर अशी भर देऊन जो साहस करवितो त्याला साहस करणाराचे दुप्पट दंड करावा. मी तुला द्रव्य देईन, तूं साहस कर, असें सांगून साहस करवितो त्याचा अधिक अपराध अतएव चौपट दंड करावा. २३०.

साहस करवितो त्याला चौपट दंड.

---

साहसिकविशेषं प्रत्याह ॥

अर्घ्याक्रोशातिक्रमकृद्भ्रातृभार्याप्रहारदः ।
संदिष्टस्याप्रदाता च समुद्रगृहभेदकृत् ॥ २३१ ॥
सामन्तकुलिकादीनामपकारस्य कारकः ।
पञ्चाशत्पणिको दण्ड एषामिति विनिश्चयः ॥ २३२ ॥

अर्घ्यस्याघ्यार्हस्याचार्यादेराक्षेपमाज्ञातिक्रमं च यः करोति यश्च भ्रातृभार्यां ताडयति तथा संदिष्टस्य प्रतिश्रुतस्यार्थस्याप्रदाता यश्च मुद्रितं गृहमुद्घाटयति तथा स्वगृहक्षेत्रादिसंसक्तगृहक्षेत्रादिस्वामिनां कुलिकानां स्वकुलोद्भवानां आदिग्रहणात् स्वग्राम्यस्वदेशीयानां च योऽपकर्ता ते सर्वे पञ्चाशत्पणपरिमितेन दण्डेन दण्डनीयाः ॥ २३१ ॥ ॥ २३२ ॥

साहसिकाविषयीं अणखी दंड सांगतो.

**मूलार्थ**– पूज्य मनुष्याची निर्भर्त्सना व आज्ञाभंग करणारा, भ्रात्याच्या भार्येला प्रहार करणारा, देऊं केलेलें न देणारा, मुद्रित गृह उघडणारा, सामंत, स्वकुलोत्पन्न इत्यादिक ह्यांस अपकार करणारा, ह्या प्रत्येकास ५० पण दंड करावा असा निर्णय आहे.

**टीकार्थ**–४ पूज्य ह्मणजे पूजा करावयास योग्य जो आचार्यादिक त्याची निर्भर्त्सना व आज्ञा भंग जो करितो, व जो भ्रात्याच्या भार्येला ताडन करितो, व देऊं केलेलें जो देत नाहीं, व जो मुद्रित केलेलें घर उघडतो व आपल्या घराचे शेजारी व क्षेत्राचे सामंत व आपले कुलांत झालेले ते व ( मूळांतील ) इत्यादिक शब्देंकरून आपले गांवकरी व स्वदेशीय ह्यांस अपकार करणारा, ह्या प्रत्येकास ५० पण दंड करावा. २३१, २३२.

---

स्वच्छन्दं विधवागामी विक्रुष्टे नाभिधावकः ।
अकारणे च विक्रोष्टा चण्डालश्चोत्तमान् स्पृशेत् ॥ २३३ ॥
शूद्रप्रव्रजितानां च दैवे पित्र्ये च भोजकः ।
अयुक्तं शपथं कुर्वन्नयोग्यो योग्यकर्मकृत् ॥ २३४ ॥
वृषक्षुद्रपशूनां च पुंस्त्वस्य प्रतिघातकृत् ।
साधारणस्यापलापी दासीगर्भविनाशकृत् ॥ २३५ ॥
पितापुत्रस्वसृभ्रातृदम्पत्याचार्यशिष्यकाः ।
एषामपतितान्योन्यत्यागी च शतदण्डभाक् ॥ २३६ ॥

किंच । नियोगं विना यः स्वेच्छया विधवां गच्छति । चौरादिभयाकुलैर्विक्रुष्टे यः शक्तोऽपि नाभिधावति । यश्च वृथाक्रोशं करोति । यश्चण्डालो ब्राह्मणादीन् स्पृशति । यश्च शूद्रप्रव्रजितान् दिगम्बरादीन् दैवे पित्र्ये च कर्मणि भोजयति । यश्चायुक्तं मातरं ग्रहीष्यामीत्येवं शपथं करोति । तथा यश्च अयोग्य एव शूद्रादिर्योग्यकर्माध्ययनादि करोति। वृषो बलीवर्दः। क्षुद्रपशवोऽजादयस्तेषां पुंस्त्वस्य प्रजननशक्तेर्विनाशकः ॥ वृक्षक्षुद्रपशूनामिति पाठे हिंग्वाद्यौषधप्रयोगेण वृक्षादेः फलप्रसूनानां पातयिता साधारणमपलपति साधारणद्रव्यस्य वञ्चकः दासीगर्भस्य पातयिताच येच

पित्रादयोऽपतिता एव सन्तोऽन्योन्यं त्यजन्ति ते सर्वे प्रत्येकं पणशतं दण्डार्हा भवन्ति॥ इति साहसप्रकरणम् ॥ २३३ ॥ २३४ ॥ २३५ ॥ २३६ ॥

मूलार्थ- विधवेशीं यथेच्छ संग करणारा, गलबला झाला असतां जो धांवत नाहीं, व कारण नसतां ओरडतो, व जो चंडाल उत्तमांस स्पर्श करितो. व शूद्र जातीचे संन्यासी ह्मांस हव्यकव्यांत भोजन घालणारा, व अयोग्य शिवी देणारा व अयोग्य पुरुष योग्य काम करणारा, तसेंच बैल व क्षुद्रपशु ह्मांस खच्ची करणारा, समायिक द्रव्याचा अपहार करणारा, दासीचा गर्भपात करणारा, व पिता, पुत्र, भगिनी, भ्राता, भार्या, पति, आचार्य, शिष्य, ह्मांतून कोणी पतित नसतां परस्परांचा त्याग करणारा ह्मा प्रत्येकास १०० (पण) दंड करावा.

टीकार्थ-१नियोगावांचून जो यथेच्छ विधवेशीं संग करितो, व चोरादिकांच्या भयानें व्याकुल होऊन गलबला झाला असतां शक्त असूनहि जो सहाय होत नाहीं, जो कारण नसतां वृथा गलबला करितो, व जो चंडाल ब्राह्मणादिकांस स्पर्श करितो व जो शूद्रजातीचे संन्यस्त ह्मणजे नग्न गोसावी (कानफटे) इत्यादिकांस हव्यकव्यांत भोजन घालितो, व जो अयोग्य म्हणजे आईवरून (किंवा अशा प्रकारची दुसरी) शिवीगाळ देतो, तसेंच अयोग्य जो शूद्रादिक तो स्वजातीस योग्य नव्हे असें अध्ययनादि कर्म करितो, व बैल व शेळ्या मेंढ्या वगैरे क्षुद्रपशु ह्मांस खच्ची करणारा, किंवा हिंग वगैरे औषधाच्या प्रयोगेंकरून वृक्षादिकांचीं फलें पुष्पें ह्मांचा नाश करणारा, समायिक द्रव्याचें हरण करणारा, व दासीचा गर्भपात करणारा, व पिता, पुत्र, भगिनी, भ्राता, भार्या, पति, आचार्य, शिष्य, ह्मांतून कोणी पतित नसतां परस्परांचा त्याग करणारा ह्मा प्रत्येकास १०० पण दंड करावा. २३३-२३६.

---

साहसप्रसङ्गात्तत्सदृशापराधेषु नेजकादीनां दण्डमाह ॥

**वसानस्त्रीन्पणान् दण्ड्यो नेजकस्तु परांशुकम् ।**
**विक्रयावक्रयाधानयाचितेषु पणान्दश ॥ २३७ ॥**

नेजको वस्त्रस्य धावकः स यदि निर्णेजनार्थं समर्पितानि वासांसि स्वयमाच्छादयति तदासौ पणत्रयं दण्ड्यः । यः पुनस्तानि विक्रीणीते अवक्रयं वा एतावत्कालमुपभोगार्थं वस्त्रं दीयते मह्यमेतावद्धनं देयमित्येवं भाटकेन यो ददाति आधित्वं वा नयति स्वसुहृद्भ्यो याचितं वा ददात्यसौ प्रत्यपराधं दशपणान् दण्डनीयः । तानि च वस्त्राणि श्लक्ष्णशाल्मलीफलके क्षालनीयानि न पाषाणे न च व्यत्यसनीयानि न च स्वगृहे वासयितव्यानि इतरथा दण्ड्यः ॥ शाल्मले फलके श्लक्ष्णे निज्याद्वासांसि नेजकः । न च वासांसि वासोभिर्निर्हरेन्न च वासयेदिति मनुस्मरणात् ॥ यदा पुनस्तानि प्रमादान्नाशयति तदा नारदेनोक्तं द्रष्टव्यम् । मूल्याष्टभागो हीयेत सकृद्धौतस्य वाससः । द्विःपादस्त्रिस्तृतीयांशश्चतुर्द्धौतेऽर्द्धमेव च ॥ अर्द्ध-

क्षयात्तु परतः पादांशापचयः क्रमात्। यावत्क्षीणदशं जीर्णं जीर्णस्यानियमः क्षय इति। अष्टपणक्रीतस्य सकृद्धौतस्य वस्त्रस्य नाशितस्याष्टमभागोनपणं मूल्यं देयम्। द्विर्धौतस्य तु पादोनं त्रिर्धौतस्य पुनस्तृतीयांशन्यूनम्। चतुर्धौतस्यार्द्धं पणचतुष्टयं देयम्। ततःपरं प्रतिनिर्णेजनमवशिष्टं मूल्यं पादाद्यपचयेन देयम्। यावज्जीर्णं जीर्णस्य पुनर्नाशितस्येच्छातो मूल्यदानकल्पनम्॥ २३७॥

## शाखा ३ री.

साहसप्रसंगानें साहसामाखिले जे परीट (रंगारी) वगैरेचे अपराध त्यांविषयीं दंड सांगतो.

**मूलार्थ**– दुसऱ्याचें वस्त्र नेसणारा जो परीट त्यास ३ पण दंड करावा, तें वस्त्र विकलें, भाड्यानें दिलें, गहाण ठेविलें, तसलमांत दिलें, असतां १० पण दंड.

धुवायास दिलेलीं वस्त्रें बहिवाटणारे परिटास दंड.

**टीकार्थ**–१ धुवायास दिलेलीं वस्त्रें जर परीट स्वतां नेसतो, (पांघरतो) तर त्यास ३ पण दंड. जो तीं (वस्त्रें) विकतो, भाड्यानें देतो, किंवा गहाण ठेवितो, अथवा मित्रांस तसलमांत देतो त्यास प्रत्येक अपराधीं १० पण दंड करावा.

धुवायास दिलेल्या वस्त्रांची परिटानें सदलाबदल केल्यास दंड.

२ परिटानें तीं वस्त्रें मृदु सांवरीच्या फळीवर धुवावीं, धोंड्यावर धुऊं नयेत, त्यांची सदलाबदल करूं नये. व घरांत ठेवूं नयेत. अन्यथा दंड करावा.

**मनु**– परिटानें तीं वस्त्रें मृदु अशा सांवरीच्या फळीवर धुवावीं, त्यांची सदलाबदल करूं नये. व घरीं वहिवाटूं नयेत.

जर तीं परिटाचे हयगईनें नाश पावतील तर त्याविषयीं नारद सांगतो.

परिटाचे हयगईनें वस्त्र खराब झाल्यास दंडयोजना.

**नारद**–३ एकवार धुतलेल्या वस्त्राचे किमतीचा आठवा भाग कमी, दोनवार धुतलेल्यास चतुर्थांश कमी. तीनवेळ धुतलेल्याचे तीनभाग, चारवेळ धुतलेल्याचें अर्धें मोल कमी, अर्धें जुनें झाल्यावर पुढें एकेक पाद मूल्य देववावें. परंतु जोंपर्यंत त्याच्या दशा झडल्या नाहींत तोंपर्यंत.

**अर्थ**– आठां पणांला खरीद केलेलें एकवार धुतलेलें वस्त्र जर परिटापासून नाश पावेल तर आठवा भाग कमी, ह्मणजे १ पण कमी करून परिटापासून मोल देववावें. तेंच दोनवेळ धुतलेलें असल्यास २ पण कमी करून ह्मणजे ६ पण किंमत भरून देवावी. तेंच वस्त्र तीनवेळ धुतलेलें परिपाटापासून नाश पावेल तर ५ पण किंमत देववावी. चारवेळ धुतलेलें असल्यास निमे किंमत देववावी. ह्यापुढें दर धुपण्यास ३, २, १, पण किंमत देववावी, परंतु दशा झडल्या नाहींत तोंपर्यंत. पुढें इच्छे प्रमाणें. २३७

---

**पितापुत्रविरोधे तु साक्षिणां त्रिपणो दमः ।**
**अन्तरे च तयोर्यः स्यात्तस्याप्यष्टगुणो दमः ॥ २३८ ॥**

पितापुत्रयोः कलहे यः साक्ष्यमङ्गीकरोति न पुनः कलहं निवारयति असौ पणत्रयं दण्ड्यः । यश्च तयोः सपणे विवादे पणदाने प्रतिभूर्भवत्यसौ चकारात्तयोर्यः कलहं वर्द्धयति सोपि त्रिपणादष्टगुणं चतुर्विंशतिपणान्दण्डनीयः॥दम्पत्यादिष्वयमेव दण्डोऽनुसरणीयः ॥ २३८ ॥

मूलार्थ– पितापुत्रांच्या कलहांत साक्षीस ३ पण दंड व त्यांत जो जामीन राहतो त्यास आठपट दंड.

टीकार्थ– ४ पिता पुत्र ह्यांच्या कलहांत जो कलह न तोडितां उलटा साक्षी राहातो त्याला ३ पण दंड व जो त्यांच्या प्रतिज्ञापूर्वक वादांत प्रतिज्ञात द्रव्य देण्याविषयीं जामीन राहतो व त्यांचा कलह वाढवितो त्याला ३ पणाच्या आठपट ह्मणजे २४ पण दंड करावा. स्त्री पुरुषांच्या कलहाविषयींहि हाच प्रकार योजावा. २३८

पिता पुत्र स्त्री पुरुष ह्यांचे कलहांत साक्षी व जामीन राहणारास दंड.

---

**तुलाशासनमानानां कूटकृन्नाणकस्य च ।**
**एभिश्च व्यवहर्ता यः स दाप्यो दममुत्तमम् ॥ २३९ ॥**

तुला तोलनदण्डः । शासनं पूर्वोक्तम् । मानं प्रस्थद्रोणादि । नाणकं मुद्रादिचिह्नितं द्रम्मनिष्कादि । एतेषां यः कूटकृत् देशप्रसिद्धपरिमाणादन्यथान्यूनत्वमाधिक्यं वा द्रम्मादेरव्यवहारिकमुद्रात्वं वा ताम्रादिगर्भत्वं वा करोति यश्च तैः कूटैर्जानन्नपि व्यवहरति तावुभौ प्रत्येकमुत्तमसाहसं दण्डनीयौ ॥ २३९ ॥

मूलार्थ– तराजू, सनद, माप, नाणें, ह्यांत खोटें करणारा, व हीं खोटीं करून त्यांकडून व्यवहार करणारा, ह्या प्रत्येकास उत्तमसाहस दंड.

टीकार्थ– ५ तराजू, सनद, ( शासन ), पूर्वीं[1] सांगितलेलीं मापें, ह्मणजे प्रस्थे, द्रोण, इत्यादि व द्रम्म, निष्क, इत्यादि नाणीं, ह्यांत त्यात्या देशप्रसिद्ध परिमाणापेक्षां कम जास्ती करितो, किंवा नाणें तांब्याहिणाचें करून चालवितो तो, व मुळचें खोटें माहीत असतांहि त्याकडून व्यवहार करितो, त्या प्रत्येकास उत्तमसाहस दंड करावा. २३९[2]

---

१. पूर्वी म्हणजे २ ऱ्या प्रकरणीं ७ व्या शाखेच्या १ ल्या अंकांत.

२. हल्लींच्या व्यवहारांत प्रस्थ द्रोण हीं मापें चालू नाहींत, म्हणून त्यांचे बदल अधोली पायली वगैरे मापें घ्यावीं. ह्याचप्रमाणें द्रम्म, निष्क ह्या नाण्याबद्दलही रुपये मोहरा व पुतळ्या वगैरे नाणीं घ्यावीं.

नाणकपरीक्षिणं प्रसाह ॥

**अकूटं कूटकं ब्रूते कूटं यश्चाप्यकूटकम् ।**
**सनाणकपरीक्षी तु दाप्य उत्तमसाहसम् ॥ २४० ॥**

यः पुनर्नाणकपरीक्षी ताम्रादिगर्भमेव द्रम्मादिकं सम्यगिति ब्रूते सम्यकूच वा कूटकमिति असावुत्तमसाहसं दण्ड्यः ॥ २४० ॥

सराफाविषयीं सांगतो.

**मूलार्थ–** जो सराफ खऱ्या नाण्याला खोटें ह्मणतो, आणि खोटें असतां माल खरा ह्मणून सांगतो त्याला उत्तमसाहस दंड करावा.

खोठ्याला खरें किंवा खऱ्याला खोटें सांगणाऱ्या सराफास दंड.

**टीकार्थ–** ६ जो सराफ रुपया वगैरे नाणें गैरसाळ असतां माल खरा आहे असें सांगतो, व माल खरा असतां खोटा ह्मणतो, त्या प्रत्येकास उत्तमसाहस दंड करावा. २४०

चिकित्सकं प्रसाह ॥

**भिषङ्मिथ्याचरन्दण्ड्यस्तिर्यक्षु प्रथमं दमम् ।**
**मानुषे मध्यमं राजपुरुषेषूत्तमं दमम् ॥ २४१ ॥**

यः पुनर्भिषक् मिथ्या आयुर्वेदानभिज्ञ एव जीवनार्थं चिकित्सितज्ञोऽहमिति तिर्यङ्मनुष्यराजपुरुषेषु चिकित्सामाचरत्यसौ यथाक्रमेण प्रथममध्यमोत्तमसाहसान् दण्डनीयः । तत्रापि तिर्यगादिषु मूल्यविशेषेण वर्णविशेषेण राजप्रसासत्तिविशेषेण दण्डस्य लघुगुरुभावः कल्पनीयः ॥ २४१ ॥

वैद्याविषयीं सांगतो.

**मूलार्थ–** जो अडाणी वैद्य पशु पक्षी इत्यादिकांविषयीं वैद्यक्रिया करणारा त्यास **प्रथमसाहस** दंड, सामान्य मनुष्यांविषयीं **मध्यमसाहस**, सरकारी मनुष्याविषयीं **उत्तमसाहस दंड.**

खोट्या वैद्यक्रियेवर उपजीवन करणारास दंड.

**टीकार्थ–** ७ जो अडाणी म्हणजे वैद्यशास्त्रांत अनभिज्ञ असा वैद्य आपली उपजीविका चालावी ह्मणून पशु पक्षी इत्यादिकांविषयीं वैद्यक्रिया करितो त्यास **प्रथमसाहस** दंड, सामान्य मनुष्याविषयीं करितो त्यास **मध्यमसाहस**, सरकारी मनुष्याविषयीं **उत्तमसाहस** दंड, पशु पक्षी इत्यादिकांविषयीं किमतीच्या तारतम्यानें, सामान्य मनुष्यांत वर्ण व गुण ह्यांच्या तारतम्यानें आणि सरकारी मनुष्यांत अधिकाराच्या तारतम्यानें वर सांगितलेला दंड न्यूनाधिक करून योजावा. २४१

**अबध्यं यश्च बध्नाति बद्धं यश्च प्रमुञ्चति ।**
**अप्राप्तव्यवहारं च स दाप्यो दममुत्तमम् २४२ ॥**

यः पुनर्बन्धनानर्हमनपराधिनं राजाज्ञयाविना बध्नाति । यश्च बद्धं व्यवहारार्थमाहूतं अनिर्वृत्तव्यवहारं चोत्सृजत्यसौ उत्तमसाहसं दाप्यः ॥ २४२ ॥

मूलार्थ– बांधायास योग्य नव्हे अशा मनुष्यास जो बांधितो, व बांधायास योग्य अशा मनुष्यास व्यवहारनिर्णय झाल्यापूर्वी जो सोडितो त्याला उत्तम साहस दंड.

टीकार्थ– ८ बांधायास योग्य नव्हे ह्मणजे निरपराधी अशा मनुष्यास राजाज्ञेवांचून जो बांधितो, व व्यवहारासाठीं बोलावून आणिलेला अशा मनुष्यास व्यवहारनिर्णय झाल्यापूर्वी सोडून देतो, त्या प्रत्येकास उत्तमसाहस दंड करावा. २४२.

निरपराधी मनुष्याला धरणारास व अपराध्याला सोडून देणारास उत्तमसाहस दंड.

---

**मानेन तुलया वापि योंऽशमष्टमकं हरेत् ।**
**दण्डं स दाप्यो द्विशतं वृद्धौ हानौ च कल्पितम् ॥ २४३**

यः पुनर्वणिक् व्रीहिकार्पासादेः पण्यस्याष्टममंशं कूटमानेन कूटतुलया वा अन्यथा वा परिहरति असौ पणानां द्विशतं दण्डनीयः । अपहृतस्य द्रव्यस्य पुनर्वृद्धौ हानौ च दण्डस्यापि वृद्धिहानी कल्प्ये ॥ २४३ ॥

मूलार्थ– जो उदमी विकाऊ जिनसाचा आठवा भाग मापानें किंवा तराजूनें चोरितो त्याला २०० ( पण ) दंड, ह्यापेक्षां कमी किंवा जास्ती चोरितो तर दंडहि कमजास्ती करावा.

टीकार्थ–९ जो उदमी तांदूळ कापूस वगैरे विकाऊ जिनसाचा आठवा भाग खोट्या तराजूनें किंवा खोट्या मापानें अथवा दुसऱ्या प्रकारानें चोरितो, त्याला २०० पण दंड करावा. ह्यापेक्षां कमजास्ती चोरील तर दंडहि कमजास्ती योजावा. २४३

खोट्या तराजूनें किंवा मापानें कमजास्तो जिनस देणारास दंड.

---

**भेषजस्नेहलवणगन्धधान्यगुडादिषु ।**
**पण्येषु प्रक्षिपन् हीनं पणान् दाप्यस्तु षोडश ॥ २४४ ॥**

भेषजमौषधद्रव्यम् । स्नेहो घृतादिः । गन्धद्रव्यमुशीरादि । आदिशब्दाद्धिङ्गुमरीचादि । एतेष्वसारं द्रव्यं विक्रयार्थं मिश्रयतः षोडशपणो दण्डः ॥ २४४ ॥

शाखा ४ थी.

**मूलार्थ**— औषध, स्नेह, लवण, सौगंधिक, धान्य, मूळ, इत्यादिक जो विकाऊ जिनस त्यांत जो हीन द्रव्य मिश्रित करितो त्यास १६ पण दंड करावा.

चांगल्या मालांत वाईट माल मिसळणारास दंड.

**टीकार्थ**— १ औषध, स्नेह ह्मणजे तेल तूप वगैरे, लवण, वाळा, (कापूर) वगैरे सौगंधिक द्रव्य, धान्य, मूळ, व (मूळांतील) इत्यादि शब्दें करून हिंग मिरें, ह्यांत तो तो वाईट पदार्थ मिसळणारास १६ पण दंड. २४४

**मृच्चर्ममणिसूत्रायःकाष्ठवल्कलवाससाम् ।**
**अजातौ जातिकरणे विक्रेयाष्टगुणो दमः ॥ २४५ ॥**

किंच। न विद्यते बहुमूल्या जातिर्यस्मिन्मृच्चर्मादिके तदजाति तस्मिन् जातिकरणे विक्रयार्थं गन्धवर्णरसान्तरसञ्चारणेन बहुमूल्यजातीयसादृश्यसम्पादनेन। यथा मल्लिकामोदसञ्चारेण मृत्तिकायां सुगन्धामलकमिति। मार्जारचर्मणि वर्णोत्कर्षापादनेन व्याघ्रचर्मेति। स्फटिकमणौ वर्णान्तरकरणेन पद्मराग इति। कार्पासिके सूत्रे गुणोत्कर्षाधानेन पट्टसूत्रमिति। कालायसे वर्णोत्कर्षाधानेन रजतमिति। बिल्वकाष्ठे चन्दनामोदसञ्चारणेन चन्दनमिति। कङ्कोले त्वगाख्यं लवङ्गमिति। कार्पासिके वाससि गुणोत्कर्षाधानेन कौशेयमिति। विक्रेयस्यापादितसादृश्यमृच्चर्मादेः पण्यस्याष्टगुणो दण्डो वेदितव्यः ॥ २४५ ॥

**मूलार्थ**— मृत्तिका, चर्म, मणि, सूत, लोखंड, काष्ठ, वल्कल, वस्त्रें, एतज्जातीय हीन पदार्थांस कृतीनें उत्तम जातीचे पदार्थांत आणणारास विकाऊ जिनसाचे आठपट दंड करावा.

हलका पदार्थ असतां कृतीनें मोठ्या किमतीचा करणारास आठपट दंड.

**टीकार्थ**— २ हलक्या मोलाचे जे मृत्तिका, चर्म, मणि इत्यादि पदार्थ ते अधिक किमतीनें विकावे एतदर्थ, त्या त्या पदार्थांस दुसऱ्या पदार्थांचे गंध, वर्ण (शुक्लनीलादिक), रस इत्यादिक लावून अधिक किमतीचा करून दाखविणें, ह्मणजे असें, मृत्तिकेला मालतीचा सुवास लावून हें सुगंधामलक ह्मणणें; मांजराच्या कातड्याला एक तऱ्हेचा रंग देऊन व्याघ्रचर्मासारिखें करणें, स्फटिकादि मण्यास रूपांतर देऊन पद्मरागासारिखा करणें; सुतालाच कांहीं प्रकारचा गुणोत्कर्ष करून पट्टसूत्रासारिखें करणें; लोखंडास आंगची चकाकी आणून (किंवा मुलामा देऊन) रुप्यासारिखें करणें; बिल्वकाष्ठास चंदनाचा सुवास लावून चंदनासारिखें करणें, सुती कापडास कांहीं प्रकारचा गुणोत्कर्ष करून रेशमी वस्त्रासारिखें करणें; अशा कृतीचा जिनस करणारास त्या त्या विकाऊ जिनसाचे आठपट दंड करावा. २४५

**समुद्रपरिवर्तं च सारभाण्डं च कृत्रिमम् ।**
**आधानं विक्रयं वापि नयतो दण्डकल्पना ॥ २४६ ॥**
**भिन्ने पणे तु पञ्चाशत्पणे तु शतमुच्यते ।**
**द्विपणो द्विशतो दण्डो मूल्यवृद्धौ च वृद्धिमान् ॥ २४७ ॥**

मुद्रः पिधानं मुद्रेण सह वर्तत इति समुद्रं करण्डकं परिवर्तनं व्यत्यासः योऽन्यदेवमुक्तानां पूर्णं करण्डकं दर्शयित्वा हस्तलाघवेनान्यदेव स्फटिकानां पूर्णकरण्डकं समर्पयति यश्च सारभाण्डं कस्तूरिकादिकं कृत्रिमं कृत्वा विक्रयमाधिं वा नयति तस्य दण्डकल्पना वक्ष्यमाणा वेदितव्या । कृत्रिमकस्तूरिकादेर्मूल्यभूते पणे भिन्ने न्यूने न्यूनपण इति यावत् । यस्मिन् कृत्रिमे विक्रीते पञ्चाशत्पणो दण्डः । पणमूल्ये पुनः शतम् । द्विपणमूल्ये द्विशतो दण्ड इत्येवं मूल्यवृद्धौ दण्डवृद्धिरूह्या २४६,२४७

**मूलार्थ–** जो आंतल्या मालासुद्धां करंड्याची सदलाबदल करितो, जो कृतीचें उत्तम द्रव्य करून गहाण ठेवितो, किंवा विकतो, त्यास दंडयोजना अशी कीं, सदर्हू जिनस पणापेक्षां कमी किमतीचा असल्यास ५० ( पण ) दंड; एकपण किमतीचा असल्यास १०० ( पण ); दोन पण किमतीचा असल्यास २०० पण; ह्याप्रमाणें किमतीच्या आधिक्याप्रमाणें दंडहि अधिक योजावा.

**टीकार्थ–** ३ जो गिऱ्हाइकास प्रथमतः मोत्यांनीं भरलेला करंडा दाखवून हातचलाखीनें दुसरा स्फटिकांनीं भरलेला करंडा देतो, व जो कस्तूरिकादि जिनस कृतीचा करून विकतो, किंवा गहाण ठेवितो, त्याला दंडयोजना अशी कीं, जर कृतीचा जो कस्तूरिका वगैरे जिनस त्याची किंमत एकपणापेक्षां कमी आहे, असा जिनस विकला तर ५० पण दंड घ्यावा. कृत्रिमानें केलेला व तोच जिनस जर एकपण किमतीचा असेल तर १०० पण दंड; दोनपण किमतीचा असेल तर २०० पण दंड; ह्याप्रमाणें त्या कृत्रिमजिनसाची किंमत जसजशी अधिक असेल तसा दंडहि अधिक योजावा. २४६, २४७

*कृतीचा जिनस करून विकणारास दंड योजना.*

---

वणिजः प्रसाह ॥

**संभूय कुर्वतामर्घं सबाधं कारुशिल्पिनाम् ।**
**अर्घस्य ह्रासं वृद्धिं वा जानतो दम उत्तमः ॥ २४८ ॥**

---

१ येथें किमतीची तारतम्ययोजना अशी कीं, ज्या जिनसाची किंमत तांब्याचा पण संभवेल तेथें तो घ्यावा. जेथें रुपया किंवा दुसरें नाणें संभवेल तेथें तें घ्यावें. कारण कस्तुरी मोत्यें वगैरेची किंमत तांब्याचा पण संभवत नाहीं.

राजनिरूपितार्थस्य ह्रासं वृद्धिं वा जानन्तोपि वणिजः संभूय मिलित्वा कारूणां रजकादीनां शिल्पिनां चित्रकारादीनां सबाधं पीडाकरमर्घान्तरं लाभलोभात्कुर्वन्तः पणसहस्रं दण्डनीयाः ॥ २४८ ॥

उदम्याविषयीं सांगतो.

मूलार्थ— तोटा नफा जाणत असतांहि जे व्यापारी लोक एकोपा करून कारू व शिल्पी ह्यांस पीडा होई अशा महागाईनें विकतात त्यांस उत्तमसाहस दंड.

टीकार्थ— ४ राजानें ठरवून दिलेल्या निरखांत आपला तोटा नफा जाणूनहि सर्व वाणी उदमी मिळून अधिक लाभासाठीं रंगारी वगैरे कारू ( तसेच साळी वगैरे व्यापारी ) व चितारी वगैरे शिल्पी ह्यांचें नुकसान होई असा भारी निरख ठरवितात त्यांस १००० पण दंड करावा. २४८

सरकारानें ठरविलेल्या निरखा पेक्षां कमजास्ती दरानें विकणारास दंड.

---

संभूय वणिजां पण्यमनर्घेणोपरुन्धताम् ।
विक्रीणतां वा विहितो दण्ड उत्तमसाहसः ॥ २४९ ॥

किंच। ये पुनर्वणिजो मिलित्वा देशान्तरादागतं पण्यमनर्घेण हीनमूल्येन प्रार्थयमाना उपरुन्धन्ति महार्घेण वा विक्रीणन्ते तेषामुत्तमसाहसो दण्डो विहितो मन्वादिभिः ॥ २४९ ॥

मूलार्थ— जे वाणी एक मत करून कमीदरामुळें जिनसाची बंदी करितात, किंवा महाग विकतात, त्यांस उत्तम साहस दंड विहित आहे.

टीकार्थ— ५ जे वाणी उदमी मिळून देशांतराहून आलेला जिनस कमी दरानें मागतात, त्याप्रमाणें त्यांनीं न दिल्यामुळें त्या जिनसाचा अवरोध करितात, किंवा महाग विकतात, त्यांस उत्तमसाहस दंड मन्वादि ऋषींनीं सांगितला आहे. २४९

देशांतराहून आलेला माल माहागाईनें विकणारास दंड.

---

केन पुनरर्घेण पणितव्यमित्यत आह ॥

राजनि स्थाप्यते योऽर्घः प्रत्यहं तेन विक्रयः ।
क्रयो वा निस्त्रवस्तस्माद्वणिजां लाभकृत्स्मृतः ॥ २५० ॥

राजनि संनिहिते सति यस्तेनार्घः स्थाप्यते निरूप्यते तेनार्घेण प्रतिदिनं क्रयो विक्रयो वा कार्यः । निर्गतः स्रवो निःस्रवो विशेषस्तस्माद्राजनिरूपितार्घाद्योनिःस्रवः स एव वणिजां लाभकारी न पुनः स्वच्छन्दपरिकल्पितात् । मनुना चार्घकरणे विशेषो दर्शितः । पञ्चरात्रे पञ्चरात्रे पक्षे मासे तथागते । कुर्वीत चैषां प्रत्यक्षमर्घसंस्थापनं नृप इति ॥ २५० ॥

जिनस कोणत्या निरखानें विकावा तें सांगतो.

मूलार्थ—राजानें आपल्या समक्ष जो निरख ठरवून दिला असेल त्याप्रमाणें दररोज क्रय विक्रय करावा. त्यांत जी शिलक राहील तो त्यांचा नफा सांगितला आहे.

टीकार्थ—६ राजानें आपल्या समक्ष जो निरख ठरवून दिला असेल त्याप्रमाणें वाण्यांनीं दररोज विकरी किंवा खरेदी करावी. त्या निरखांतून जी शिल्लक राहील तो वाण्यांनीं नफा समजावा. आपल्या इच्छेनें निरख ठरवून नफा मिळवूं नये.

निरखाचा ठराव.

मनुहि निरख ठरविण्या विषयीं विशेष सांगतो.

मनु—राजानें आपल्या समक्ष पांच पांच दिवसांनीं किंवा पंधरा पंधरा दिवसांनीं किंवा दर महिन्यास जिनसाचा निरख ठरवून द्यावा. १५०

---

**स्वदेशपण्ये तु शतं वणिग्गृह्णीत पञ्चकम् ।**
**दशकं पारदेश्ये तु यः सद्यः क्रयविक्रयी ॥ २५१ ॥**

किंच । स्वदेशप्राप्तं पण्यं गृहीत्वा यो विक्रीणीते असौ पञ्चकं शतं पणशते पणपञ्चकं लाभं गृह्णीयात् । परदेशात्प्राप्ते पुनःपण्ये शतपणमूल्ये दशपणान्लाभं गृह्णीयात् । यस्य पण्यस्य ग्रहणदिवस एव विक्रयः संपद्यते । यः पुनः कालान्तरे विक्रीणीते तस्य कालोत्कर्षवशाल्लाभोत्कर्षः कल्प्यः । एवं च यथार्घे निरूपिते पणशते पञ्चपणो लाभो भवति तथैवार्घे राज्ञा स्वदेशपण्यविषये स्थापनीयः ॥ २५१ ॥

मूलार्थ— सद्यः क्रय विक्रय करणाऱ्या उदम्यानें स्वदेशींच्या मालावर शेंकडा ५ आणि परदेशींच्या मालावर शेंकडा १० नफा घ्यावा.

टीकार्थ—७ जो उदमी ज्या देशांत उदीम करितो, त्या देशांतलाच जिनस घेऊन विकतो, त्यानें शेंकडा ५ ह्मणजे १०० पणा स ५ पण नफा घ्यावा. परदेशांतील आलेला माल घेऊन विकतो तर शेंकडा १० ह्मणजे १०० पणांस १० पण नफा घ्यावा.

स्वदेशींच्या मालाला शेंकडा ५नफा आणि परदेशींच्या मालावर शेंकडा १० नफा.

८ खरीद केल्या दिवशींच जो जिनस विकला जातो व जो कालांतरीं विकला जातो त्याविषयीं दिवसांच्या तारतम्यानें नफाहि अधिक उणा योजावा.

सारांश जेणेंकरून स्वदेशींच्या जिनसांवर शेंकडा ५ पणाप्रमाणें नफा मिळेल तसा राजानें निरख ठरवावा. २५१

---

पारदेश्यपण्येऽर्घनिरूपणप्रकारमाह ॥

**पण्यस्योपरि संस्थाप्य व्ययं पण्यसमुद्भवम् ।**
**अर्घोऽनुग्रहकृत्कार्यः क्रेतुर्विक्रेतुरेव च ॥ २५२ ॥**

देशान्तरगदागते पण्ये देशान्तरागमनप्रत्यागमनभाण्डग्रहणशुल्कादिस्थानेषु यावानुपयुक्तोऽर्थस्तावन्तमर्थं परिगणय्य पण्यमूल्येन सह मेलयित्वा यथा पणशते दशपणो लाभः संपद्यते तथा क्रेतृविक्रेत्रोरनुग्रहकार्यर्घो राज्ञा स्थापनीयः ॥ २५२ ॥

परदेशांतील जिनसाविषयीं निरख ठरविण्याचा प्रकार सांगतो.

**मूलार्थ**– विकाऊ मालासाठीं जो खर्च झाला असेल तो त्यांत भागून जेणेंकरून खरीद करणारा व विकणारा ह्यांस सोईवार पडेल तसा निरख ठरवावा.

**टीकार्थ**–९ देशांतराहून आलेले जिनसाचा जाणें, येणें, व बैल, भाडें, वासन, व जकात वगैरे जितका योग्य खर्च लागला असेल तो भागून जेणेंकरून १०० पणास १० पण नफा मिळेल, असा खरीद करणारास व विकणारास किफायतवार राजानें निरख ठरवून द्यावा. २५२

परदेशाहून आलेल्या मालाचा निरख.

---

## विक्रीयासंप्रदान प्रकरण २१ वें.

प्रासङ्गिकं परिसमाप्याधुना विक्रीयासंप्रदानं प्रक्रमते ॥ तत्स्वरूपं च नारदेनाभिहितम् ॥ विक्रीय पण्यं मूल्येन क्रेतुर्यन्न प्रदीयते । विक्रीयासंप्रदानं तद्विवादपदमुच्यते इति ॥ तत्र विक्रेयद्रव्यस्य चराचरभेदेन द्वैविध्यमभिधाय पुनः षड्विधत्वं तेनैव प्रत्यपादि ॥ लोकेऽस्मिन्द्विविधं पण्यं जङ्गमं स्थावरं तथा । षड्विधस्तस्य तु बुधैर्दानादानविधिः स्मृतः ॥ गणितं तुलितं मेयं क्रियया रूपतः श्रियेति । गणितं क्रमुकफलादि । तुलितं कनककस्तूरीकुङ्कुमादि । मेयं शाल्यादि । क्रियया वाहदोहादिरूपयोपलक्षितमश्वमहिष्यादि । रूपतः पण्याङ्गनादि । श्रिया दीप्त्या मरकतपद्मरागादीति ॥

### शाखा १ ली.

आतां विक्रीयासंप्रदान संज्ञक व्यवहाराचें निरूपण करितो.

त्याचें स्वरूप नारद सांगतो.

**नारद**– १ जिनसाचें मोल घेऊन तो जिनस खरीद करणारास देत नाहीं तर त्याविषयींचा जो वाद त्याचें नांव विक्रीयासंप्रदान.

विक्रीयासंप्रदानाचें स्वरूप.

त्यांत विकाऊ जिनसाचे स्थावर, जंगम, असे दोन भेद सांगून आणखी सहा प्रकारहि तोच प्रतिपादित करितो.

**नारद**–२ व्यवहारांत माल दोन प्रकारचा, स्थावर आणि जंगम. अशा दोन प्रकारच्या मालाचे देण्याघेण्याविषयीं आणखी सहा प्रकार सांगितले आहेत. ते असे–गणित, वजनी, मापी, क्रिया, रूपवान्, आणि कांतिमान्.

व्यवहारांत परीक्षा करून देण्या घेण्याविषयीं जिनसाचे प्रकार.

गणित ह्मणजे गणना करून घ्यावयाजोगा सुपारी (नारळ केळीं बदाम) वगैरे; वजनी ह्मणजे वजन करून घ्यावया जोगा कापूर ( कुंकूं केशर) वगैरे; मापी ह्मणजे गहूं, साळी, वगैरे धान्य; क्रियावान् ह्मणजे वाहन, दोहन, इत्यादि क्रियेनें परीक्षा करून घ्यावयाजोगा घोडा, हैस इत्यादिक; रूपवान् ह्मणजे रूपावर किंमत करून घ्यावयाजोगा वारांगना इत्यादि; कांतिमान् ह्मणजे तेजावर परीक्षा करून घ्यावयाजोगा पाच, हिरा वगैरे.

---

एतत्षट्प्रकारकमपि पण्यं विक्रीयासंप्रयच्छतो दण्डमाह ॥

**गृहीतमूल्यं यः पण्यं क्रेतुर्नैव प्रयच्छति ।**
**सोदयं तस्य दाप्योऽसौ दिग्लाभं वा दिगागते॥ २५३ ॥**

गृहीतं मूल्यं यस्य पण्यस्य विक्रेत्रा तद्गृहीतमूल्यं तद्यदि विक्रेता प्रार्थयमानाय स्वदेशवणिजे क्रेत्रे न समर्पयति तच्च पण्यं यदि क्रयकाले बहुमूल्यं सत्कालान्तरेऽल्पमूल्येनैव लभ्यते तदार्घह्रासकृतो य उदयो वृद्धिः पण्यस्य स्थावरजङ्गमात्मकस्य तेन सहितं पण्यं विक्रेता क्रेत्रे दापनीयः । यदा मूल्यह्रासकृतः पण्यस्योदयो नास्ति किंतु क्रयकाले यावदेव यतो मूल्यस्येयत्पण्यमिति प्रतिपन्नं तावदेव तदा तत्पण्यमादाय तस्मिन्देशे विक्रीणानस्य यो लाभस्तेनोदयेन सहितं द्विकं त्रिकमित्यादिप्रतिपादितवृद्धिरूपोदयेन वा सहितं क्रेतुर्वाञ्छावशाद्दापनीयः । यथाह नारदः । अर्घश्चेदवहीयेत सोदयं पण्यमावहेत् । स्थानिनामेष नियमो दिग्लाभं दिग्विचारिणामिति । यदा त्वर्घमहत्त्वेन पण्यस्य न्यूनभावस्तदा तस्मिन्पण्ये वस्त्रगृहादिके य उपभोगस्तदाच्छादनसुखनिवासादिरूपो विक्रेतुस्तत्सहितं पण्यमसौ दाप्यः ॥ यथाह नारदः । विक्रीय पण्यं मूल्येन यः क्रेतुर्न प्रयच्छति । स्थावरस्य क्षयं दाप्यो जङ्गमस्य क्रियाफलमिति । विक्रेतुरुपभोगः क्षय उच्यते । क्रेतृसंबन्धित्वेन क्षीयमाणत्वात् । न पुनः कुड्यपातसस्यघातादिरूपः । तस्य तु उपहन्येत वा पण्यं दह्येतापह्रियेत वा। विक्रेतुरेव सोऽनर्थो विक्रीयासंप्रयच्छत इत्यत्रोक्तत्वात् ॥ यदा त्वसौ क्रेता देशान्तरात्पण्यग्रहणार्थमागतस्तदा तत्पण्यमादाय देशान्तरे विक्रीणानस्य यो लाभस्तेन सहितं पण्यं विक्रेता क्रेत्रे दापयितव्यः । अयं च क्रीतपण्यसमर्पणनियमोऽनुशयाभावे द्रष्टव्यः ॥ सति त्वनुशये क्रीत्वा विक्रीय वा किंचिदित्यादि मनूक्तं वेदितव्यम्॥२५३॥

शाखा २ री.

अशा सहा प्रकारचे जिनसांची विकरी करून तो मालकास न देणाराविषयीं दंड सांगतो.

**मूलार्थ—** ज्याचें मोल घेतलें तो जिनस जो उदमी खरीददारास देत नाहीं त्यापासून तो जिनस नफ्यासुद्धां देववावा. जिनस देशांतराहून आलेला असल्यास देशांतरींच्या नफ्यासुद्धां देववावा.

**टीकार्थ**–१ विकणारानें गिऱ्हाइकापासून ज्या जिनसाचें मोल घेतलें आहे, तो जिनस स्वदेशींचा खरीद करणारा मागत असतांहि उदमी देत नाहीं व तो जिनस विकत घेतेवेळेस महाग घेतला पण कालांतरीं सवंग मिळतो असें असल्यास त्याच्या सवंगाईमुळें त्या जिनसावरचा जो नफा बुडाला असेल त्यासुद्धां तो जिनस खरीद करणारास देववावा.

जिनसाचें मोल घेऊनहि न दिल्यास नफ्यासुद्धां देववावा.

२ जर सवंगाई झाल्यामुळें जिनसापासून कांहीं नफा नाहीं आणि विकत घेतेवेळेसच इतक्या मोलाचा हा जिनस आहे व खरीद करणारानें तें पतकरलें आहे तर तो जिनस घेऊन स्वदेशीं विकणारास जो नफा होतो, त्यासुद्धां किंवा शेंकडा दोन तीन अशा पूर्वी ( ऋणादान प्रकरणीं १ ल्या शाखेच्या २ ऱ्या अंकांत ) सांगितलेल्या व्याजासुद्धां खरीद करणाराच्या इच्छेप्रमाणें तो जिनस विकणारानें द्यावा.

**नारद**– जर दर कमी होईल तर नफ्यासुद्धां किंवा व्याजासुद्धां खरीद करणारास जिनस द्यावा. असा स्वदेशींच्या उदम्याविषयीं नियम आहे. परदेशांतून जिनस आणणारास परदेशीय जिनसाप्रमाणेंच नफा द्यावा.

३ जर महागाईमुळें जिनसाची कमती पडली तर त्या त्या वस्त्र, घर, इत्यादिक जिनसाचा जो वापरणें सुखानें राहणें वगैरे विकणारानें उपभोग घेतला असेल त्यासुद्धां ( म्हणजे त्याच्या लाभासुद्धां ) तो जिनस खरीद करणारास द्यावा.

**नारद**– जिनसाचा भाव ठरवून त्याचें मोल घेऊन जो गिऱ्हाइकास देत नाहीं त्याजकडून तो जिनस जर स्थावर आहे तर त्यास स्थावराच्या नुकसानासुद्धां तो खरीद करणारास देववावा, आणि जंगम मालाचें भाडें वगैरे देववावें.

येथें नुकसान म्हणजे विकणाराचा उपभोग समजावा. कारण, स्थावरादिक माल, मोल दिल्यानें खरीद करणाराच्या सत्तेंत आल्या नंतर जर विकणारा भोगवटा करितो तर त्यांत खरीद करणाराचें नुकसान होतें. केवळ नुकसान म्हणजे भिंत पडली, धान्यनाश झाला, वगैरे समजूं नये. कारण, त्याविषयीं तर निराळेंच सांगितलें आहे कीं, " जर माल नासेल, जळेल, किंवा चोरीस जाईल तर तें विकणाराचें नुकसान होईल. कारण, त्यानें मोल घेतलें असतां जिनस गिऱ्हाइकास दिला नाहीं. "

४ जर खरीद करणारा परमुलखांतून मालाच्या खरेदीसाठीं आला असेल तर तो जिनस घेऊन जाऊन परमुलखीं विकरी केल्यानें जो त्याला नफा व्हावयाचा असेल त्यासुद्धां तो जिनस विकणाराकडून खरीद करणाराचा देववावा परंतु हा (एतावत्पर्यंत सांगितलेला) जो विकलेला जिनस देण्याविषयींचा नियम, तो अनुशय झाला नसल्यास समजावा. जर अनुशय झाला तर परत करण्याविषयीं ( क्रीतानुशय प्रकरणीं १ ल्या शाखेच्या ५ व्या अंकांतील ) मनुवचनांतील मुदत येथेंहि योजावी. २५३

खरीद करणारा परमुलखाहून माल खरेदीसाठीं आला असल्यास त्याच्या नफ्यासुद्धां देववावें.

**विक्रीतमपि विक्रेयं पूर्वक्रेतर्यगृह्णति ।**
**हानिश्चेत्क्रेतृदोषेण क्रेतुरेव हि सा भवेत् ॥ २५४ ॥**

किंच । यदा पुनर्जातानुशयः क्रेता पण्यं न जिघृक्षति तदा विक्रीतमपि पण्यमन्यत्र विक्रेयम् ॥ यदा पुनर्विक्रेत्रा दीयमानं क्रेता न गृह्णाति तच्च पण्यं राजदैविकेनोपहतं तदा क्रेतुरेवासौ हानिर्भवेत् । पण्याग्रहणरूपेण क्रेतृदोषेण नाशितत्वात् ॥ २५४ ॥

**मूलार्थ**–पहिला खरीददार घेत नसल्यास विकलेलाहि जिनस विकावा. पहिल्या खरीदीमुळें जो तोटा येईल तो पहिल्या खरीददाराचाच.

**टीकार्थ**–१ जर खरेदी करणारा, विकत घेतलेला जिनस अनुशय झाल्यानंतर घेऊं इच्छीत नाहीं तर तो विकलेलाहि जिनस मालकानें दुसऱ्याला विकावा.

विकलेलाहि जिनस तो घेत नसल्यास दुसऱ्यास विकावा.

जर विकरी झालेला जिनस विकणारा देत असतांहि खरीद करणारा घेत नाहीं आणि तो जिनस राजदैविक उपद्रवानें नाश पावेल तर तें खरीद करणाराचें नुकसान. कारण, विक्रेता देत असतां खरीद करणारानें घेतला नाहीं, हा अन्याय खरीददाराचाच आहे. २५४

विकलेला माल विकणारा देत असतांहि खरीददारानें घेतला नाहीं तर नुकसान होईल तें खरीददाराचें.

---

**राजदैवोपघातेन पण्ये दोषमुपागते ।**
**हानिर्विक्रेतुरेवासौ याचितस्याप्रयच्छतः ॥ २५५ ॥**

अपिच । यदा पुनः क्रेत्रा प्रार्थ्यमानमपि पण्यं विक्रेता न समर्पयति अजातानुशयोऽपि तच्च राजदैविकेनोपहतं भवति तदाऽसौ हानिर्विक्रेतुरेव । अतोऽन्यददुष्टं पण्यं विनष्टसदृशं क्रेत्रे देयम् ॥ २५५ ॥

**मूलार्थ**– मागत असतांहि उदम्यानें माल दिला नाहीं आणि पुढें राजदैविक उपद्रवानें तो माल खराब झाला, तर तें नुकसान विकणाराचेंच.

**टीकार्थ**–६ जर खरीददार खरीद केलेला जिंनस मागत असतां आणि विकणारास अनुशय झाला नसतांहि विकणारा जिनस देत नाहीं आणि तो जिनस जर राजदैविक उपद्रवानें नाश पावला तर तो तोटा विकणाराचा झाला. ह्यास्तव पहिल्या जिनसासारखाच दुसरा चांगला जिंनस खरीद करणारास घेऊन द्यावा. २५५

विकरी झाल्यानंतर खरीददार जिनस मागत असतां विकणारानें न दिल्यामुळें माल खराब झाल्यास तें नुकसान विकणारानें.

---

**अन्यहस्ते च विक्रीतं दुष्टं वाऽदुष्टवद्यदि ।**
**विक्रीणीते दमस्तत्र मूल्यात्तु द्विगुणो भवेत् ॥ २५६ ॥**

किंच । यः पुनर्विनैवानुशयमेकस्य हस्ते विक्रीतं पुनरन्यस्य हस्ते विक्रीणीते सदोषं वा पण्यं प्रच्छादितदोषं विक्रीणीते तदा तत्पण्यमूल्याद्विगुणो दमो वेदितव्यः । नारदेनाप्यत्र विशेषो दर्शितः ॥ अन्यहस्ते च विक्रीय योऽन्यस्मै तत्प्रयच्छति । द्रव्यं तद्द्विगुणो दाप्यो विनयस्तावदेव तु ॥ निर्दोषं दर्शयित्वा तु सदोषं यः प्रयच्छति । स मूल्याद्द्विगुणं दाप्यो विनयं तावदेवखिति ॥ सर्वश्चायं विधिर्दत्तमूल्ये पण्ये द्रष्टव्यः ॥ अदत्तमूल्ये पुनः पण्ये वाङ्मात्रक्रये क्रेतृविक्रेत्रोर्नियमकारिणः समयादृते प्रवृत्तौ निवृत्तौ वा न कश्चिद्दोषः । यथाह नारदः । दत्तमूल्यस्य पण्यस्य विधिरेष प्रकीर्तितः । अदत्तेऽन्यत्र समयान्न विक्रेतुरविक्रय इति ॥ २५६ ॥

**मूलार्थ**–जो एकाला विकलेला जिंनस दुसऱ्यास विकतो अथवा सदोष जिंनस असून निर्दोषाप्रमाणें विकतो, त्या प्रत्येकास किमतीच्या दुप्पट दंड होईल.

एकाला विकलेला जिंनस दुसऱ्यास विकतो किंवा चोख माल दाखवून वाईट देतो त्यास दुप्पट दंड.

**टीकार्थ**–७ जो विकणारा, एकाला विकलेला जिंनस अनुशय नसतां पुनः दुसऱ्यास विकतो, अथवा जिंनसाला दोष असतां तो आच्छादून विकतो त्याला त्या विकलेल्या जिनसाचे किमतीच्या दुप्पट दंड करावा.

नारदहि ह्याविषयीं विशेष सांगतो.

**नारद**– जो उदमी कांहींएक जिंनसाची एकाशीं विकरी करून तोच जिंनस पुनः दुसऱ्यास विकतो त्यापासून पहिल्या खरीददाराचें द्रव्य दुप्पट देववून तितकाच (दुप्पट) राजदंड घ्यावा. तसेंच जो निर्दोष जिंनस दाखवून सदोष देतो त्यापासूनहि दुप्पट मोल देववून तितकाच राजदंड घ्यावा.

मोल न देतां नुसता तोंडचाच करार झाला असल्यास दुसऱ्यालाहि विकावा.

८ हा वरचा (ह्या शाखेंतील) सर्व प्रकार ज्या जिंनसाचें मोल दिलें असेल त्याविषयीं समजावा. ज्या जिंनसाचें मोल दिलें नाहीं, केवळ देण्याघेण्याचा तोंडचा करार मात्र ठरला, आणि त्याची देवघेव, विकणारा व गिऱ्हाईक ह्यांनीं करार केलेल्या मुदतीबाहेर (किंवा मुदतीशिवाय) अन्यत्र स्थळीं झाली तर कोणाकडेसच दोष नाहीं.

**नारद**– हा प्रकार ज्या जिंनसाचें मोल दिलें आहे त्याविषयीं जाणावा. मोल दिलें नाहीं व कराराहि झाला नाहीं तर दुसरे ठिकाणीं विकरी होईल. २५६

---

विक्रयानुशयोऽभिहितः क्रीतानुशयस्वरूपं तु प्राक् प्रपञ्चितं अधुना तदुभयसाधारणं धर्ममाह ॥

**क्षयं वृद्धिं च वणिजा पण्यानामविजानता ।**
**क्रीत्वा नानुशयः कार्यः कुर्वन् षड्भागदण्डभाक् ॥ २५७ ॥**

परीक्षितक्रीतपण्यानां क्रयोत्तरकालं क्रयकालपरिमाणतोऽर्घकृतां वृद्धिमपश्यता क्रेतानुशयो न कार्यः। विक्रेत्रा च महार्घनिबन्धनं पण्यक्षयमपश्यता नानुशयितव्यम्। वृद्धिक्षयपरिज्ञाने पुनः क्रेतृविक्रेत्रोरनुशयो भवतीति व्यतिरेकादुक्तं भवति॥ अनुशयकालावधिस्तु नारदेनोक्तः। क्रीत्वा मूल्येन यत्पण्यं दुष्क्रीतं मन्यते क्रयी। विक्रेतुः प्रतिदेयं तत्तस्मिन्नेवाह्न्यविक्षतम्॥ द्वितीयेऽह्नि ददत्क्रेता मूल्यात्त्रिंशांशमावहेत्। द्विगुणं तु तृतीयेऽह्नि परतः क्रेतुरेव तदिति॥ अपरीक्षितक्रयविक्रये पुनः पण्यवैगुण्यनिबन्धनानुशयावधिर्दशैकपञ्चसप्ताहेत्यादिना दर्शित एव। तदनया वाचोयुक्त्या वृद्धिक्षयपरिज्ञानस्यानुशयकारणत्वमवगम्यते। तथा पण्यपरीक्षाविधिबलात्पण्यदोषाणामनुशयकारणत्वं अतः पण्यदोषतद्वृद्धिक्षयकारणत्रितयाभावेनुशयकालाभ्यन्तरेऽपि यद्यनुशयं करोति तदा पण्यषड्भागं दण्डनीयः। अनुशयकारणसद्भावेऽप्यनुशयकालातिक्रमेणानुशयं कुर्वतोऽप्ययमेव दण्डः। उपभोगेनाविनश्वरेषु स्थिरार्घेष्वनुशयकालातिक्रमेणानुशयं कुर्वतो मनूक्तो दण्डो द्रष्टव्यः। परेण तु दशाहस्य न दद्यान्नापि दापयेत्। आददानो ददच्चैव राज्ञा दण्ड्यः शतानि षडिति॥ इति विक्रीयासंप्रदानं नाम प्रकरणम्॥ २५७॥

शाखा ३ री.

असा विकरीविषयीं येथें अनुशय सांगितला. खरीदीविषयीं अनुशयाचें स्वरूप तर पूर्वीं (क्रीतानुशय प्रकरणीं) सांगितलें. आतां त्या दोहोंविषयीं साधारण प्रकार सांगतो.

**मूलार्थ–** उदम्यानें (पूर्वीं) जिनसाचा तोटा नफा न जाणून खरेदी केली, नंतर अनुशय करूंनये. केला असतां सहावा भाग दंड पावेल.

पुढें होणारा तोटा नफा पूर्वींच पहावा तें न पाहतां उदाम केल्यावर मग जिनस परत होणार नाहीं.

**टीकार्थ–**१ चौकशी करून जिनस खरेदी केल्यानंतर खरीद केलेल्या वेळेच्या मोलापेक्षां पुढें जिनस सवंग मिळेल असें नजरेस न आलें तर अनुशय करूंनये. विकणारानेंहि पुढें महागाई झाल्यामुळें आपला नफा होईल हें समजण्यांत न येतां विकरी केली असतां अनुशय करूंनये. अर्थात् नफा तोटा समजण्यांत आला असतां अनुशय करावा हें सिद्ध झालें.

किती दिवसपर्यंत अनुशय करावा ती मुदत नारद सांगतो.

जिनस परत करण्याची मुदत.

२ जिनस खरीद केल्यानंतर खरीददारास वाटेल कीं खरीदी चांगली झाली नाहीं, तर त्याच दिवशीं जशाचातसा तो (जिनस) परत करावा. दुसऱ्या दिवशीं परत केल्यास किमतींत तिसावा अंश कमी करून किंमत माघारीं द्यावी. ती (किंमत) तिसऱ्यादिवशीं परत केल्यास किमतीचा पंधरावा अंश कमी करावा. ह्याच्यापुढें जिनस परत होणार नाहीं.

३ चौकशी केल्यावांचून केलेल्या खरेदीविषयीं ( किंवा विकरीविषयीं ) तर नफा तोटा समजल्यामुळें परत करण्याची मुदत तर पूर्वी ( क्रीतानुशय प्रकरणाच्या १ ल्या शाखेच्या ४ थ्या अंकांत ) सांगितलीच आहे. तस्मात् अशा युक्तीनें तोटा नफा समजणें हेंच अनुशयास मुख्य कारण अवगत होतें. जशी जिनसाची चौकशी केल्यानें तो बरा वाईट समजला असतां अनुशय संभवतो, तसाच जिनसाविषयीं दोषोद्भावन व तोटा, नफा अशीं तिन्ही कारणें नसतां अनुशय करण्याच्या मुदतींतहि अनुशय करितो तर ( खरीद करणारापासून किमतीचा सहावा भाग ) विकणारापासून जिनसाचा सहावा भाग दंड घ्यावा.

४ अनुशयाविषयीं योग्य कारण असतांहि जर अनुशय करण्याची मुदत टळल्यावर अनुशय करितो, तर त्यासहि हा ( सहावा भाग ) दंड जाणावा.

५ उपभोगानें खराब न होणारा अशा टिकाऊ ( घर शेत वगैरे ) मालाविषयीं मुदत टळल्यावर अनुशय केला असतां मनूनें ( खालीं ) सांगितलेला दंड योजावा.

मनु– कांहीं जिनसाचा सौदा झाल्यावर दहा दिवसांनंतर तो जिनस खरीद करणारानें परत देऊंनये, व विकणारानेंहि परत घेऊंनये, अतएव परत देणारा व घेणारा ह्यांपासून राजानें ६०० ( पण ) दंड घ्यावा. २५७

---

# संभूयसमुत्थान प्रकरण २२ वें.

संभूयसमुत्थानं नाम विवादपदमिदानीमभिधीयते ।

**समवायेन वणिजां लाभार्थं कर्म कुर्वताम् ।**
**लाभालाभौ यथाद्रव्यं यथा वा संविदा कृतौ ॥ २५८ ॥**

सर्वे वयमिदं कर्म मिलिताः कुर्म इत्येवंरूपा संप्रतिपत्तिः समवायः तेन ये वणिङ्नटनर्तकप्रभृतयो लाभलिप्सवः प्रातिस्विकं कर्म कुर्वते तेषां लाभालाभावुपचयापचयौ यथाद्रव्यं येन यावद्धनं पण्यग्रहणार्थं दत्तं तदनुसारेणावसेयौ । यद्वा । प्रधानगुणभावपर्यालोचनयास्य भागद्वयमस्यैको भाग इत्येवंरूपया संविदा समयेन यथा संप्रतिपन्नौ तथा वेदितव्यौ ॥ २५८ ॥

शाखा १ ली.

आतां अनेक उदमी किंवा कसबी मिळून पांथीनें उदीम करण्याविषयींचा जो व्यवहार त्याचें निरूपण करितो.

**मूलार्थ**–जे वाणी लाभार्थ पांथीनें कांहींएक उदीम करितात, त्यांस त्यांचे पांथीप्रमाणें तोटा नफा, किंवा कराराप्रमाणें तोटा नफा जाणावा.

टीकार्थ–१ आपण इतके मंडळी मिळून (एका विचारें) हा व्यापार करूं, असा करार करून जे वाणी, उदमी, तमासगीर, नाचे वगैरे लाभार्थ निरनिराळा व्यापार करितात, त्यांस त्यांच्या द्रव्याप्रमाणें ह्मणजे मालखरेदीसाठीं ( किंवा कसबासाठीं ) ज्यानें जितका ऐवज पांथीनें दिला असेल त्याला त्याच्या हिशाप्रमाणें तोटा नफा होईल, अथवा प्रधानगुणभावाचा विचार करून अमुकानें दोन भाग घ्यावे, अमुकाला एक भाग, अमुकानें अर्धा भाग, वगैरे जसा प्रथमतः करार केला असेल त्या विभागा अन्वयें तोटा नफा वांटून घ्यावा. २५८

पांथीनें उदीम करणारांनीं तोटा नफा आपले हिशाअन्वयें किंवा आरंभींच्या करारा-प्रमाणें वांटून घ्यावा.

---

**प्रतिषिद्धमनादिष्टं प्रमादाद्यच्च नाशितम् ।**
**स तद्दद्याद्विप्लवाच्च रक्षिताद्दशमांशभाक् ॥ २५९ ॥**

किंच । तेषां संभूय प्रचरतां मध्ये पण्यमिदमित्थं न व्यवहर्तव्यमिति प्रतिषिद्धमाचरता यन्नाशितमनादिष्टमननुज्ञातं वा कुर्वाणेन तथा प्रमादात्प्रज्ञाहीनतया वा येन यन्नाशितं स तत्पण्यं वणिग्भ्यो दद्यात् । यः पुनस्तेषां मध्ये चौरराजादिजनिताद्व्यसनात्पण्यं पालयति स तस्माद्रक्षितात्पण्याद्दशममंशं लभते ॥ २५९ ॥

मूलार्थ–पांथीदारांनीं निषेधिलेलें किंवा न सांगितलेलें काम करण्यानें किंवा हैयगयीमुळें जो नुकसान करील त्यानें तें भरून द्यावें. आणि संकटापासून रक्षिलें तर दशमांश नफा घ्यावा.

टीकार्थ–२ पांथीनें उदीम करणारांमध्यें ह्या जिनसाचा अमुक प्रकारें उदीम करूं नये अशी ताकीद झाली असतांहि ती न मानितां, ज्यानें जें नुकसान केलें असेल तें, अथवा ज्याविषयीं मंडळीची आज्ञा नसेल तें काम करणारानें जें नुकसान केलें असेल तें, किंवा ज्यानें जें प्रमादेंकरून नाशिलें असेल तें, नुकसान त्यानें पांथीदारांस भरून द्यावें.

पांथीदारांतून ज्यानें नुकसान केलें असेल त्यानें भरून द्यावें.

३ पांथीदारांतून जो कोणी चोर, राजा, वगैरेच्या उपद्रवापासून मालाचें संरक्षण करितो तो त्या संभाळलेल्या मालांतून दहावा हिसा पावतो. २५९

त्यांतून जो मालाचा उपद्रवापासून बचाव करील त्यास दहावा हिसा नफा द्यावा.

---

सुबोधिनी. १ उदाहरण, तीहीं असामींनीं आपलें द्रव्य एकत्र करून कांहीं एक व्यापार आरंभिला. त्यांत एकाचे पांच रुपये, दुसऱ्याचे दहा, आणि तिसऱ्याचे पंधरा एकूण रुपये ३० ह्याप्रमाणें प्रत्येकानें द्रव्य जमा करून व्यवहार रीतीप्रमाणें उदीम केला असतां एकंदर मुदलावर सहा रुपये नफा झाला. तेव्हां ज्याचे पांच रुपये मुद्दल होते त्यानें एक रुपया, ज्याचे दहा रुपये होते त्यानें दोन रुपये, ज्याचे पंधरा रुपये मुद्दल होते त्यानें तीन रुपये, असा नफा वांटून घ्यावा ह्याप्रमाणें तोटा असल्यास तोही वांटून घ्यावा.

**अर्घप्रक्षेपणाद्विंशं भागं शुल्कं नृपो हरेत् ।**
**व्यासिद्धं राजयोग्यं च विक्रीतं राजगामि तत् ॥ २६० ॥**

इयतः पण्यस्येयन्मूल्यमित्यर्घस्तस्य प्रक्षेपणात् राजतो निरूपणाद्धेतोरसौ मूल्याद्विंशतितममंशं शुल्कार्थं गृह्णीयात् । यत्पुनर्व्यासिद्धमन्यत्र न विक्रेयमिति राज्ञा प्रतिषिद्धं यद्राजयोग्यं मणिमाणिक्याद्यप्रतिषिद्धमपि तद्राज्ञे निवेद्य लाभलोभेन विक्रीतं चेद्राजगामि मूल्यदाननिरपेक्षं तत्सर्वं पण्यं राजापहरेदित्यर्थः ॥ २६० ॥

मूलार्थ–निरख ठरवून देण्याबद्दल राजानें विसावा अंश कर घ्यावा व जे राजाज्ञेनें निषिद्ध व जे राजयोग्य असे जिन्नस विकलेले असले तरी राजानें घ्यावे.

टीकार्थ– ४ अमुक जिनस अमुक दरानें विकावा, असा राजानें निरख ठरवून द्यावा, आणि त्याबद्दल जिन्नसाचे किमतीचा विसावा अंश जकात घ्यावी.

*खुषकी वरील जकात घेण्यांचा प्रकार.*

५ जो राजोपभोगास योग्य असा मोत्यें, हिरे वगैरे माल, व " अमुक माल सरकाराखेरीज दुसरे ठिकाणीं विकूं नये " असा राजाज्ञेनें निषिद्ध केलेला माल राजाला न कळवितां अधिक नफ्याच्या लोभानें अन्यत्र विकला तर त्याची किंमत न देतां तो सर्व माल सरकारांत घ्यावा. २६०

*सरकारास उपयोगी अथवा सरकारानें अन्यत्र मनाकेलेला सरकारानें घ्यावा.*

---

**मिथ्यावदन्परीमाणं शुल्कस्थानादपासरन् ।**
**दाप्यस्त्वष्टगुणं यश्च स व्याजक्रयविक्रयी ॥ २६१ ॥**

यः पुनर्वणिक् शुल्कवञ्चनार्थं पण्यपरिमाणं निह्नुते शुल्कग्रहणस्थानाच्चापसरति यश्चास्येदमस्येदं वेत्येवं विवादास्पदीभूतं पण्यं क्रीणाति विक्रीणीते वा ते सर्वे पण्यादष्टगुणं दण्डनीयाः ॥ २६१ ॥

मूलार्थ–जिन्नसाचें खोटें परिमाण सांगतो, किंवा जकातीचें नाकें चुकवितो, अथवा संशयित मालाचा क्रयविक्रय करितो त्या प्रत्येकास आठपट दंड करावा.

टीकार्थ–६ जो उदमी जकात न पडावी किंवा कमी जकात पडावी ह्मणून परिमाणांत लबाडी सांगतो, अथवा जकातीचें नाकें चुकावून जातो, व जो " ह्याचा किंवा त्याचा असा " विवादास्पदीभूत माल खरीद करितो किंवा विकतो त्या प्रत्येकापासून मालाच्या आठपट दंड घ्यावा. २६१

*जो जकातदारास ठकवितो त्यास आठपट दंड.*

---

**तरिकः स्थलजं शुल्कं गृह्णन् दाप्यः पणान्दश ।**
**ब्राह्मणप्रातिवेश्यानामेतदेवानिमन्त्रणे ॥ २६२ ॥**

अपि च । शुल्कं हि द्विविधं । स्थलजं जलजंच । तत्र स्थलजमर्घप्रक्षेपणा-द्विंशं भागं शुल्कं नृपो हरेदित्यत्रोक्तम् ॥ जलजं तु मानवेऽभिहितम् । पणं यानान्तरे दाप्यः पुरुषोऽर्द्धपणं तरे । पादं पशुश्च योषिच्च पादार्द्धं रिक्तकः पुमान् ॥ भाण्डपूर्णानि यानानि तार्यं दाप्यानि सारतः । रिक्तभाण्डानि यत्किंचित्पुमांसश्चापरिच्छदाः ॥ गर्भिणी तु द्विमासादिस्तथा प्रव्रजितो मुनिः। ब्राह्मणा लिङ्गिनश्चैव न दाप्यास्तारिकं नरा इति ॥ शुल्कद्वयेऽप्ययमपरो विशेषः । न भिन्नकार्षापणमस्ति शुल्कं न शिल्पवृत्तौ न शिशौ न दूते। न भैक्षलब्धे न हृतावशेषे न श्रोत्रिये प्रव्रजिते न यज्ञे इति ॥ तीर्यतेऽनेनेति तरिः नावादिः तज्जन्यशुल्केऽधिकृतस्तरिकः स यदा स्थलोद्भवं शुल्कं गृह्णाति तदा दशपणान्दण्डनीयः । वेशो वेश्म प्रतिवेश इति स्ववेश्माभिमुखं स्ववेश्मपार्श्वस्थं चोच्यते तत्रभवाः प्रातिवेश्याः ब्राह्मणाश्च ते प्रातिवेश्याश्च ब्राह्मणप्रातिवेश्याः तेषां श्रुतवृत्तसंपूर्णानां श्राद्धादिषु विभवे सत्यनिमन्त्रणे एतदेव दशपणात्मकं दण्डनं वेदितव्यम् ॥ २६२ ॥

**मूलार्थ**–जलमार्गाचा जकातदार जर खुपकीवरील जकात घेतो तर १० पण दंड, तसेंच स्वगृहसन्मुख किंवा शेजारीं रहाता अशा ब्राह्मणास आमंत्रण न करणारासहि हाच दंड.

**टीकार्थ**– ७ जकात दोन प्रकारची, खुपकीची आणि जळमार्गाची, पैकीं खुपकीच्या जकातीचा प्रकार ४ थ्या अंकांत सांगितला. जळमार्गावरील जकातीचा प्रकार खालीं मनुवचनांत ( ८ व्या अंकांत ) सांगितला आहे.

जळ मार्गाचा जकातदार खुपकीवरील जकात घेतो तर त्यास दंड.

तरीवरील जकातदार ( नावाडी वगैरे ) जर खुपकीवरील जकात घेतो तर त्यापासून राजानें १० दंड घ्यावा, तसेंच जो आपल्या घरा समोरचे घरांतल्या व शेजारच्या घरांतल्या श्रुतवृत्तसंपन्न ब्राम्हणास आनुकूल्य असतां श्राद्धादिकांत आमंत्रण करीत नाहीं त्यालाहि हाच म्हणजे १० पण दंड जाणावा.

जळमार्गावरील जकात घेण्याचा प्रकार.

**मनु**–८ रिकाम्या वाहनाविषयीं तरीवर १ पण जकात घ्यावी. भारवाही पुरुषापासून अर्धा पण उतार घ्यावा. पशु व स्त्रिया ह्यांपासून एक दमडी उतार घ्यावा. रिकाम्या मनुष्यापासून पणाचा आठवा हिसा उतार घ्यावा. आणि गाडे वगैरे वाहनें जर मालानें भरलेलीं आहेत, तर मालाच्या सारासार तारतम्यानें उतार घ्यावा. ( पेट्यावगैरे ) रिकामें सामान, तसेंच मालावांचून रिकामे वाणी उदमी ह्यांविषयीं थोडा उतार घ्यावा. दोन महिन्यांहून अधिक महिन्यांची गर्भिणी स्त्री, संन्यासी, वानप्रस्थ, ब्राह्मण आणि ब्रह्मचारी ह्यांपासून तरीचा उतार घेऊं नये.

दोहों प्रकारच्या ( खुषकीवरील व जळमार्गावरील ) जकाती-
विषयीं आणखी विशेष सांगतो.

स्मृति– कार्षापणापेक्षां कमी मोलाचा ( किंबहुना एका पणाचा ) जिनस व कारागीर ( सुतार गौंडी चितारी वगैरे ) व लेंकरें, जासूद व भिक्षेनें मिळालेलें व चोरीस जाऊन उरलेलें व श्रोत्रिय, तसाच प्रव्रजित ह्यांवर जकात नाहीं. तसेंच यज्ञोपयोगि द्रव्य आणावयाचें असल्यास अथवा तें आणावयासाठीं जात असल्यास त्याला जकात नाहीं. २६२

---

देशान्तरमृतवणिग्रिक्थं प्रत्याह ॥

**देशान्तरगते प्रेते द्रव्यं दायादबान्धवाः ।**
**ज्ञातयो वा हरेयुस्तदागतास्तैर्विना नृपः ॥ २६३ ॥**

यदा संभूयकारिणां मध्ये यः कश्चिद्देशान्तरगतो मृतस्तदा तदीयमंशं दायादाः पुत्राद्यपत्यवर्गो बन्धवो मातृपक्षा मातुलाद्याः । ज्ञातयोऽपत्यवर्गव्यतिरिक्ताः सपिण्डा वा । आगताः संभूयव्यवहारिणो ये देशान्तरादागतास्ते वा गृह्णीयुः॥ तैर्विना दायादाद्यभावे राजा गृह्णीयात् । वाशब्देन च दायादादीनां वैकल्पिकमधिकारं दर्शयति । पौर्वापर्यनियमस्तु पत्नी दुहितर इत्यादिप्रतिपादित एवात्रापि वेदितव्यः । शिष्यसब्रह्मचारिब्राह्मणनिषेधो वणिक्प्राप्तिश्च वचनप्रयोजनम् । वणिजामपि मध्ये यः पिण्डदानर्णदानादिसमर्थः स गृह्णीयात् । सामर्थ्याविशेषे सर्वे वणिजः संसृष्टिनो विभज्य गृह्णीयुः । तेषामप्यभावे दशवर्षं दायादाद्यागमनं प्रतीक्ष्यानागतेषु स्वयमेव राजा गृह्णीयात् ॥ तदिदं नारदेन स्पष्टीकृतम् ॥ एकस्य चेत्स्यान्मरणं दायादोऽस्य तदाप्नुयात् । अन्यो वाऽसति दायादे शक्ताश्चेत्सर्व एव ते ॥ तदभावे तु गुप्तं तत्कारयेद्दशवत्सरान् । अस्वामिकमदायादं दशवर्षस्थितं ततः ॥ राजा तदात्मसात्कुर्यादेवं धर्मो न हीयत इति ॥ २६३ ॥

शाखा २ री.

देशांतरीं मृत जो उदमी त्याचे जिंदगीविषयीं सांगतो.

**मूलार्थ**– ( भागीनें व्यापार करणाऱ्यांपैकीं कोणी ) देशांतरीं जाऊन तेथें मरेल तर ( त्याची ) जिंदगी ( त्याच्या ) दायादानीं ( पुत्रादिकानीं ), बंधूंनीं ( मातेच्या पक्षाच्यांनीं ) किंवा ज्ञातीनीं ( सपिंडांनीं ), तदभावीं आगतांनीं ( देशांतराहून आलेल्या पांथीदारांनीं ), ह्या सर्वांच्याहि अभावीं, राजानें घ्यावी.

पांथीदारांतून कोणी मरण पावला असतां जिंदगीचे विभागाचा प्रकार.

**टीकार्थ**–१. जेव्हां भागीदारांपैकीं, कोणीएक परदेशास जातो आणि ( तेथें ) मरण पावतो तेव्हां त्याचा हिस्सा, त्याचे दायाद, म्हणजे त्याचे जवळचे वारस पुत्र व दुसरे वंशज; ( बांधवाः ) त्याच्या मातेचे संबंधी, म्हणजे मातुल इत्यादिक; ( ज्ञातयः ) एक मूळपुरुषापासून उत्प-

न्न झालेले सपिंड संबंधी, म्हणजे अपत्याच्या वर्गांत न आलेले; अथवा ( आगताः ) जे आलेले असतील ते, म्हणजे त्या व्यापारांतील भागीदार परदेशाहून परत आले असतील ते; यांनीं घ्यावा; अथवा त्यांनींहि घ्यावा. त्यांच्या अभावीं म्हणजे दायादादिकांच्या अभावीं तो राजानें घ्यावा.

येथें (मूळांत) वा ह्या शब्दानें दायादादिकांस जिंदगी घेण्याविषयीं वैकल्पिक अधिकार दाखविला, म्हणजे सर्वांस मिळून नाहीं; तर एकामागून एकास असा आहे.

२ अपुत्र मरण पावला असतां जिंदगीची अधिकारी पत्नी, तिच्या अभावीं कन्या वगैरे जो क्रम पूर्वीं (दायविभाग प्रकरणीं २६व्या शाखेंत) सांगितला आहे तोच एथें जाणावा. ( भागीदार व्यापारी मेल्यास त्याच्या वारशाबद्दल ) हें निराळें वचन सांगण्याचें प्रयोजन इतकेंच कीं पूर्वीं ( दायविभाग प्रकरणीं २६ व्या शाखेंत) बंधु, त्यांच्या अभावीं शिष्य, त्यांच्या अभावीं सब्रह्मचारी, त्यांच्या अभावीं ब्राह्मण, असें जें सांगितलें त्याचा बाध करून त्यांच्याबद्दल येथें पांथीदार जिंदगीचे अधिकारी जाणावे. ( ह्मणजे पुत्र आदिकरून बांधवांपर्यंत वारिसांच्या अभावीं पांथीदार जिंदगी घेतील. )

त्यांतून जो कर्ज फेडण्यास व पिंड देण्यास अधिकारी असेल तो घेईल. सगळे तसे असल्यास त्यांनी वांटून घ्यावी.

३ पांथीदारांतूनहि जो पिंड देण्यास व ऋण फेडण्यास समर्थ असेल तो जिंदगी घेईल. जर पिंडदान व कर्ज फेडणें ह्यांविषयीं सर्वांचेंहि सामर्थ्य समान आहे तर, सर्व पांथीदार संसृष्टी ह्यांनीं विभागून घ्यावें. त्यांच्याहि अभावीं राजानें दहा वर्षेंपर्यंत वारिसांची वाट पहावी. दहा वर्षेंपर्यंत कोणी वारस हजर न झाल्यास पुढें राजानें घ्यावें.

नारदहि हेंच स्पष्ट सांगतो.

**नारद**— पांथीदारांतून एखादा मरण पावला तर त्याची जिंदगी त्याचे दायाद घेतील. दायाद नसल्यास दुसरा जो त्या पांथीदारांतून पिंड देण्यास व कर्ज फेडण्यास समर्थ असेल, तो घेईल. कोणीहि समर्थ नसल्यास अथवा सर्व समर्थ असल्यास सर्वांनीं वांटून घ्यावी. त्यांच्या अभावीं ती जिंदगी राजानें दहा वर्षेंपर्यंत तशीच ( अनामत ) राखावी. दहा वर्षांत कोणी वारीस हजर होत नाहीं, तर पुढें राजानें घ्यावी. असें केलें असतां धर्मलोप होत नाहीं. २६३

---

## जिह्मं त्यजेयुर्निर्लाभमशक्तोऽन्येन कारयेत् ।

किंच । जिह्मो वञ्चकः तं निर्गतलाभमाच्छिद्य त्यजेयुर्बहिः कुर्युः । यश्च संभूयकारिणां मध्ये भाण्डप्रसवेक्षणादिकं कर्तुमसमर्थोऽसावन्येन स्वं कर्म भाण्डभारवाहनं तदायव्ययपरीक्षणादिकं कारयेत् ॥

**मूलार्थ**—त्यांत जो प्रतारक असेल त्याला लाभहीन करून घालवावें. व जो असमर्थ असेल, त्यानें काम दुसऱ्याकडून करवावें.

पांथीदारांत जो प्रतारक असेल त्याला घालवावें. अशक्त असल्यास त्यानें आपलें काम दुसऱ्याकडून करवावें.

टीकार्थ—१ पांथीदारांतून ज्यानें इतरांस प्रतारणा करून व्यापारांत लाभ संपादिला असेल, त्यापासून तो घेऊन त्याला मंडळींतून हांकून द्यावें. आणि पांथीदारांमध्यें ज्याच्यानें सामग्रीची देखरेख वगैरे स्वतांचें काम न करवेल त्यानें तें, सामान वाहणें, तोटा नफा पाहणें, वगैरे आपलें काम दुसऱ्याकडून करवावें.

प्रागुपदिष्टं वणिग्धर्ममृत्विगादिष्वतिदिशति ॥

## अनेन विधिराख्यात ऋत्विक्कर्षककर्मिणाम् ॥ २६४ ॥

अनेन लाभालाभौ यथाद्रव्यमित्यादिवणिग्धर्मकथनेन ऋत्विजां होत्रादीनां कृषीवलानां नटनर्तकतक्षादीनांच शिल्पकर्मोपजीविनां विधिर्वर्त्तनप्रकार आख्यातः तत्रच ऋत्विजां धनविभागे विशेषो मनुना दर्शितः । सर्वेषामर्धिनो मुख्यास्तदर्द्धेनार्धिनोऽपरे । तृतीयिनस्तृतीयांशाश्चतुर्थांशाश्च पादिन इति ॥ अस्यायमर्थः । ज्योतिष्टोमेन तं शतेन दीक्षयन्तीति वचनेन गवां शतमृत्विगानतिरूपे दक्षिणाकार्ये विनियुक्तम् । ऋत्विजश्च होत्रादयः षोडश तत्र कस्य कियानंश इत्यपेक्षायामिदमुच्यते । सर्वेषां होत्रादीनां षोडशर्त्विजां मध्ये ये मुख्याश्चत्वारो होत्रध्वर्युब्रह्मोद्गातारः ते गोशतस्यार्द्धिनः सर्वेषां भागपूरणोपपत्तिवशादष्टाचत्वारिंशद्रूपार्द्धेनार्द्धभाजः । अपरे मैत्रावरुणप्रतिप्रस्थातृब्राह्मणाच्छंसिप्रस्तोतारस्तदर्द्धेन मुख्यांशस्यार्द्धेन चतुर्विंशतिरूपेणार्द्धभाजः । ये पुनस्तृतीयिनः अच्छावाक्नेष्ट्राग्नीध्रप्रतिहर्तारस्ते तृतीयिनो मुख्यांशस्य षोडशगोरूपतृतीयांशेन तृतीयांशभाजः । येतु पादिनः ग्रावस्तुदुन्नेतृपोतृसुब्रह्मण्यास्ते मुख्यभागस्य यश्चतुर्थांशो द्वादशगोरूपस्तद्भाजः ॥ ननु कथमयमंशनियमो घटते । न तावदत्र समयो नापि द्रव्यसमवायो नापि वचनं यद्वशाद्भागनियमः स्यादतः समंस्यादश्रुतत्वादिति न्यायेन सर्वेषां समांशभाक्कं कर्मानुरूपेण वांशभाक्कमिति युक्तम् । अत्रोच्यते । ज्योतिष्टोमप्रकृतिके द्वादशाहेऽर्द्धिनस्तृतीयिनः पादिन इति सिद्धवदनुवादो न घटते । यदि तत्प्रकृतिभूते ज्योतिष्टोमे अर्द्धतृतीयचतुर्थांशभाक्कं मैत्रावरुणादीनां न स्यादतो वैदिकार्द्धिप्रभृतिसमाख्यावलात् प्रागुक्तोंऽशनियमोऽवकल्प्यत इति निरवद्यम् ॥ इति संभूयसमुत्थानप्रकरणम् ॥ २६४ ॥

### शाखा २ री.

वर सांगितलेला जो उदम्यांच्या विभागाचा प्रकार तोच ऋत्विज वगैरे ह्यांविषयीं समजावा, असा अतिदेश सांगतो.

मूलार्थ— ऋत्विज, शेतकरी व कारागीर ह्यांविषयींहि हाच प्रकार जाणावा.

टीकार्थ— १ [illegible]

पांथीदारांप्रमाणेंच तमासगीर ह्यांची वर्तणूक असावी.

गितलेला जो उदग्र्यांच्या विभागाचा प्रकार, तोच होता, अध्वर्यु, इत्यादिक ऋत्विज, व शेतकरी, आणि तमासगीर, नाचे, नर्तक, व सुतार वगैरे शिल्पकर्मानें उपजीवन करणारे, त्यांजविषयींहि समजावा.

पैकीं ऋत्विजांच्या धनविभागाविषयीं विशेष नियम मनु सांगतो.

**मनु**– सर्व ऋत्विजांमध्यें जे मुख्य ते अर्ध विभागाचे अधिकारी, दुसरे अर्धाच्या अर्धभागाचे विभागी, तिसरे तृतीयांशाचे विभागी, आणि चौथे चतुर्थांशाचे विभागी होतात.

**अर्थ**– २ ज्योतिष्टोम यज्ञांत यजमानाला शतसंख्याक गोरूप द्रव्यानें दीक्षा देऊन नंतर तें दक्षिणारूप गोशत सोळा ऋत्विजांनीं वांटून घ्यावें. त्यांत सोळा ऋत्विजांनीं शंभर गाई कशा वांटून घ्याव्या तो प्रकार असा;–सोळा ऋत्विजांमध्यें जे मुख्य चार, ह्मणजे होता, अध्वर्यु, ब्रह्मा, उद्गाता, हे अर्ध विभागाचे ह्मणजे चौवांस समसमान विभाग आले पाहिजेत अतएव अठ्ठेचाळीस गाईंचे समविभागी होतात. दुसरे चार ह्मणजे मैत्रावरुण, प्रतिप्रस्थाता, ब्राह्मणाच्छंसी, प्रस्तोता, हे अर्धभागाच्या अर्धाचे ह्मणजे चोवीस गाईंचे समविभागी होतात. जे तिसरे चार ऋत्विज ह्मणजे अच्छावाक्, नेष्टा, आग्नीध्र, प्रतिहर्त्ता, ते तृतीयांशाचे ह्मणजे सोळा गाईंचे समविभागी होतात. आणि चौथे ह्मणजे ग्रावस्तुत, उन्नेता, पोता, व सुब्रह्मण्य, हे चतुर्थांश बारा गाई समविभाग वांटून घेतात. २६४

---

## स्तेय प्रकरण २३ वें.

इदानीं स्तेयं प्रस्तूयते। तल्लक्षणं च मनुनाभिहितम्। स्यात्साहसं त्वन्वयवत्प्रसभं कर्म यत्कृतम्। निरन्वयं भवेत्स्तेयं कृत्वापह्नुवते च यदिति। अन्वयवत् द्रव्यरक्षिराजाध्यक्षादिसमक्षम्। प्रसभं बलावष्टम्भेन यत्परधनहरणादिकं क्रियते तत्साहसम्। स्तेयं तु तद्विलक्षणं निरन्वयं द्रव्यस्वाम्याद्यसमक्षं वञ्चयित्वा यत्परधनहरणं तदुच्यते। यच्च सान्वयमपि कृत्वा न मयेदं कृतमिति भयान्निह्नुते तदपि स्तेयम्॥ नारदेनाप्युक्तम्। उपायैर्विविधैरेषां छलयित्वापकर्षणम्। सुप्तमत्तप्रमत्तेभ्यः स्तेयमाहुर्मनीषिण इति॥

शाखा १ ली.

आतां चोरीचें निरूपण करितो.

चोरीचें स्वरूप मनु सांगतो.

चोरीचें स्वरूप.

**मनु**– १ द्रव्याचा संरक्षक व सरकारी मनुष्य वगैरे ह्यांच्या समक्ष बलात्कारानें जें दुसऱ्याचें धन हरण इत्यादिक केलें जातें तें साहस ह्मटलें आहे. आणि चोरी ह्मणजे द्रव्याचा मालक व सरकारी मनुष्य ह्यांस न कळतां त्यांच्या असमक्ष दुसऱ्याच्या धनाचा अपहार करणें.

जो द्रव्याचा मालक व राजपुरुष वगैरेच्या समक्ष अपहारादिक करून मी केलें नाहीं, असा भयानें निन्हव करतो तेंहि स्तेयच होय.

नारदहि सांगतो.

**नारद**— निद्रित, मत्त, प्रमत्त अशांचें द्रव्य, कपट करून नानाप्रकारच्या उपायांनीं त्यांपासून हरण करितो ती चोरी म्हटली आहे.

तत्र तस्करग्रहणपूर्वकत्वाद्दण्डनस्य ग्रहणस्य च ज्ञानपूर्वकत्वात् ज्ञानोपायं तावदाह।

**ग्राहकैर्गृह्यते चौरो लोप्त्रेणाथ पदेन वा ।**
**पूर्वकर्मापराधी च तथा चाशुद्धवासकः ॥ २६५ ॥**

यश्चौरोऽयमिति जनैर्विख्याप्यते असौ ग्राहकै राजपुरुषैः स्थानपालप्रभृतिभिर्गृहीतव्यः। लोप्त्रेणापहृतभाजनादिना वा चौर्यचिह्नेन नाशदिवसादारभ्य चौर्यपदानुसरणेन वा ग्राह्यः। यश्च पूर्वकर्मापराधी प्राक् प्रख्यातचौर्यः अशुद्धोऽप्रज्ञातो वासः स्थानं यस्यासौ अशुद्धवासकः सोऽपि ग्राह्यः ॥ २६५ ॥

त्यांत चोरीचा मुद्दा शाबीत झाल्यावांचून दंड संभवत नाहीं. आणि मुद्दा शाबीत करणें तर चौकशीचे स्वाधीन आहे, ह्मणून प्रथमतः चोर समजण्याचा उपाय सांगतो.

**मूलार्थ**—जो चोर म्हटलेला तो रक्षकांनीं धरावा. किंवा मुद्यावरून अथवा माग काढून धरावा. तसाच पूर्वीं चोरीच्या अपराधांत सांपडलेला, व अविज्ञातस्थळीं वस्ती करणाराहि धरावा.

**टीकार्थ**—१ हा चोर, हा चोर, असा ज्याविषयीं लोक गलबला करितात तो चौकीदार वगैरे सरकारी माणसांनीं धरावा. अथवा भांडें वगैरे चोरलेल्या जिनसाच्या मुद्यावरून धरावा. किंवा चोरी झालेल्या ठिकाणापासून चोरीचा माग काढून धरावा. अगर पूर्वीं हा चोऱ्या करीत होता, असा प्रसिद्धीस आलेला, तसाच ज्याचें राहण्याचें ठिकाण माहीत नाहीं तोहि धरावा. २६५

चोर धरण्याचा व मुद्दा शाबीत करण्याचा उपाय.

---

**अन्येपि शङ्कया ग्राह्या जातिनामादिनिह्नवैः ।**
**द्यूतस्त्रीपानसक्ताश्च शुष्कभिन्नमुखस्वराः ॥ २६६ ॥**
**परद्रव्यगृहाणां च पृच्छका गूढचारिणः ।**
**निराया व्ययवंतश्च विनष्टद्रव्यविक्रयाः ॥ २६७ ॥**

किंच। न केवलं पूर्वोक्ता ग्राह्याः किंत्वन्येऽपि वक्ष्यमाणैर्लिङ्गैः शङ्कया ग्राह्याः। जातिनिह्नवेन नाहं शूद्र इत्येवंरूपेण। नामनिह्नवेन नाहं लपित्थ इत्येवंरूपेण। आदिग्रहणात्स्वदेशग्रामकुलाद्यपलापेन च लक्षिता ग्राह्याः। द्यूतपण्याङ्गनामद्यपाना-

दिव्यसनेष्वतिप्रसक्तास्तथा कुतस्त्योऽसि त्वमिति चौरग्राहिभिः पृष्टो यदि शुष्कमुखो भिन्नस्वरो वा भवति तद्सावपि ग्राह्यः । बहुवचनात् स्विन्नललाटादीनां ग्रहणम् । तथा ये निःकारणं कियदस्य धनं किंवास्य गृहमिति पृच्छन्ति वेषान्तरधारणेनात्मानं गूहयित्वा ये चरन्ति ये चायाभावेपि बहुव्ययकारिणः ये च विनष्टद्रव्याणां जीर्णवस्त्रभिन्नभाजनादीनांमविज्ञातस्वामिकानां विक्रयकास्ते सर्वे चौरसंभावनया ग्राह्याः । एवं नानाविधचौर्यलिङ्गान्पुरुषान् गृहीत्वा एते चौराः किं वा साधव इति सम्यक्परीक्षेत न पुनर्लिङ्गदर्शनमात्रेण चौरनिर्णयं कुर्यात् । अचौरस्यापि लोप्त्रादिलिङ्गसंबन्धसंभवात् ॥ यथाह नारदः । अन्यहस्तात्परिभ्रष्टमकामादुत्थितं भुवि । चौरेण वा परिक्षिप्तं लोप्त्रं यत्नात्परीक्षयेत् । तथा । असत्याः सत्यसंकाशाः सत्याश्चासत्यसन्निभाः । दृश्यन्ते विविधा भावास्तस्माद्युक्तं परीक्षणमिति ॥२६६,२६७॥

**मूलार्थ**–आणखीहि जे जात, नांव इत्यादिकांचा निन्हव करितात; व जे जुगार, स्त्रिया, मद्यपान, ह्यांत धुंद; जे म्लानवदन; भिन्नशब्द; जे दुसऱ्याचीं घरें, द्रव्यें, विचारणारे; जे वेष बदलून संचार करणारे, जे आदा नसतांहि बहुत खर्च करणारे, जे हरवलेल्या द्रव्याचा विक्रय करणारे; तेही वहम्यानें धरावे.

**टीकार्थ**– ३ वर सांगितल्याप्रमाणें असतील तेच चोर ओळखावे इतकेंच नाहीं, तर चोर ओळखण्याचा उपाय. अणखीही खालीं सांगितलेल्या चिन्हावरून चोर ओळखून धरावे, कदाचित् हा चोर असेल अशा संशयित अपराध्यासहि धरावें आणि जे जात, नांव, देश, गांव, कूळ वगैरे वास्तविक सांगत नाहींत ते चोर समजावे. व जे कसबिणी, जुगार, मद्यपान, ह्यांविषयीं अत्यंत व्यसनी; तसेच चौकीदार वगैरे धरणारांनीं "कोण रे तूं" असें पुसलें असतां घाबरेपणानें ज्याची मुखश्री उतरते व शब्द बदलतो, तोहि चोर जाणावा. व अणखीहि ( कोण रे तूं कोठचा असें पुसिलें असतां ) ज्यांच्या कपाळावर घाम येतो, कांप सुटतो इत्यादिक तेहि चोर समजावे. तसेच जे ह्याजपाशीं द्रव्य किती आहे हें आणि ह्याचें घर कोठें आहे असें विनाकारण पुसतात ते, व जे दुसरा वेष घेऊन संचार करितात, व जे मिळकत नसतांहि पुष्कळ खर्च करितात, आणि जे जुनीं वस्त्रें, भांडीं, वगैरे, हरवलेल्या अस्वामिक द्रव्याची विकरी करितात, ते सर्व चोर असतील अशा शंकेनें धरावे.

४ अशा नानाप्रकारच्या चोरीच्या चिन्हांवरून त्यांस धरावें आणि हे चोर किंवा साव ह्यांविषयीं पुरी चौकशी करावी. केवळ मुद्दा दिसल्यावरूनच निर्णय करूं नये. कारण, सर्वांवर देखील कदाचित् चोरीच्या मुद्याचा संबंध घडतो.

**नारद**–कोणाच्या हातांतून एकाद्याच्या घरांत कांहीं वस्तु पडलेली संभवते, किंवा जमीन खणीत असतां तींत पूर्वीं दुसऱ्यांनीं पुरून ठेवलेलें द्रव्य खणणारास सहज सांपडलेलें संभवतें, अथवा चोरांनीं बुद्ध्या टाकलेलेंहि संभवतें. ह्मणून अशा मुद्याविषयीं पुरतेपणें चौकशी करावी.

तसेंच लबाड मनुष्य भल्या गृहस्थासारिखे दिसतात, आणि भले मनुष्य अप्रनाणिका-

सारिखे वाटतात; असे नानातऱ्हेचे भाव होतात; म्हणून पुरी चौकशी करणें अवश्य आहे. २६६, २६७.

---

एवं चौर्यशङ्कया गृहीतेनात्मा संशोधनीय इत्याह ॥

**गृहीतः शङ्कया चौर्ये नात्मानं चेद्विशोधयेत् ।**
**दापयित्वा गतं द्रव्यं चौरदण्डेन दण्डयेत् ॥ २६८ ॥**

यदि चौर्यशङ्कया गृहीतस्तन्निस्तरणार्थमात्मानं न शोधयति तर्हि वक्ष्यमाणधनदापनवधादिदण्डभाग्भवेत् । अतो मानुषेण तदभावे दिव्येन वा शोधनीयः ॥ ननु नाहं चौर इति मिथ्योत्तरे कथं प्रमाणं संभवति । तस्याभावरूपत्वात् ॥ उच्यते । दिव्यस्य तावद्भावाभावगोचरत्वं रुच्याऽवान्यतरः कुर्यादित्यत्र प्रतिपादितम् । मानुषं पुनर्यद्यपि साक्षाच्छुद्धमिथ्योत्तरे न संभवति तथापि कारणेन संसृष्टभावरूपमिथ्याकारणसाधनमुखेनाभावमपि गोचरयत्येव । यथा नाशापहारकाले अहं देशान्तरस्थ इत्यभियुक्तैर्भाविते चौर्याभावस्याप्यर्थात्सिद्धेः शुद्धिर्भवत्येव ॥ २६८ ।

शाखा २ री.

ह्याप्रमाणें चोरीच्या शंकेनें धरलेल्या मनुष्यानें आपणावरील दोष घालविण्याचा प्रकार सांगतो.

**मूलार्थ**– चोरीच्या वहम्यानें धरलेला मनुष्य आपणाला निर्दोष करूं शकत नाहीं तर चोरीस गेलेलें द्रव्य त्याजकडून देववून चोरदंडानें दंडावा.

**टीकार्थ**– १ चोरीच्या वहम्यानें धरलेला पुरुष जर आपला निर्दोषपणा शाबीत करीत नाहीं, तर पुढें सांगितलेल्या धन वध इत्यादिक दंडांचा अधिकारी होतो. ह्यास्तव त्यानें **मनुष्यप्रमाणानें**, त्याच्या अभावीं **दिव्यप्रमाणें**करून, आपणावरील वहमा घालवावा.

चोरीच्या वहम्यानें धरलेला जो निर्दोष होऊं शकत नाहीं तर दंड.

**शंका**–२ जर चोर मी चोरी केली नाहीं असें **मिथ्योत्तर** सांगेल तर **प्रमाण** कसें संभवेल बरें, कारण, **मिथ्योत्तर** केवळ **अभावरूप** आहे आणि **प्रमाण** तर **भावगोचर** आहे. ( म्हणून मी चोरी केली नाहीं, ह्याविषयीं अमुक साक्षी आहेत असें सांगणें संभवत नाहीं.)

**समाधान**– ३ **मानुषप्रमाण** केवळ **भावगोचर** आहे खरें, पण **दिव्यप्रमाण** तर **भावगोचर** व **अभावगोचर**हि आहे. कारण " परस्परांच्या संतोषानें वादिप्रतिवादींतून एकानें **दिव्य** करावें. आणि दुसऱ्यानें ( अनुमोदन द्यावें अथवा ) **मानुषप्रमाण** करावें " असें **दिव्यप्रकरणीं** प्रतिपादन केलें आहे.

**मानुषप्रमाण** जरी शुद्ध **मिथ्योत्तरीं** संभवत नाहीं, तथापि **कारणोत्तरविशिष्ट मिथ्योत्तरस्थळीं** संभवतें. ह्मणजे **मिथ्योत्तराचें** साधन करणारें जें **भावगोचर कार**

णोत्तर तेणेंकरून (मिथ्योत्तरांतील) अभावक्रियेसहि दाखवितेंच. **सकारण मिथ्योत्तर** ह्मणजे, जसें ह्याची वस्तु नाहींशी झाली किंवा चोरीस गेली, त्या वेळेस मी देशांतरीं होतों असें प्रतिवादीनें पुराव्यानें शाबीत करून दिलें असतां मी चोरी केली नाहीं हें अर्थात् सिद्ध झाल्यामुळें प्रतिवादी निर्दोष होतो. २६८

चौरदण्डमाह ॥

## चौरं प्रदाप्यापहृतं घातयेद्विविधैर्वधैः ।

यस्तु प्रागुक्तपरीक्षया तन्निरपेक्षं वा निश्चितचौर्यस्तं स्वामिने अपहृतं धनं स्वरूपेण मूल्यकल्पनया वा दापयित्वा विविधैर्घातैर्घातयेत् । एतच्चोत्तमसाहसदण्डप्राप्तियोग्योत्तमद्रव्यविषयम् । न पुनः पुष्पवस्त्रादिक्षुद्रमध्यमद्रव्यापहारविषयम् । साहसेषु य एवोक्तस्त्रिषु दण्डो मनीषिभिः। स एव दण्डः स्तेयेऽपि द्रव्येषु त्रिष्वनुक्रमादिति नारदवचनेन वधरूपस्योत्तमसाहसस्योत्तमद्रव्यविषये व्यवस्थापितत्वात् ॥ यत्पुनर्वृद्धमनुवचनम् । अन्यायोपात्तवित्तत्वाद्धनमेषां मलात्मकम् । अतस्तान् घातयेद्राजा नार्थदण्डेन दण्डयेदिति तदपि महापराधविषयम् ॥

शाखा ३ री.

चोरास दंड सांगतो.

**मूलार्थ**– अपहृत द्रव्य चोराकडून परत देववून विविध वधांनीं त्याला शिक्षा करावी.

**टीकार्थ**– १ जो वर (१ ल्या शाखेंत) सांगितलेल्या चौकशीनें चोर ठरला किंवा तशा चौकशीची गरज न लागतांहि, ज्यावर चोरी शाबीत झाली त्याजकडून मालकाचें चोरीस गेलेलें द्रव्य किंवा त्या द्रव्याचें मोल देववून अनेक प्रकारच्या [1]वधांनीं त्याला मारावें.

चोराला दंड.

२ हा प्रकार **उत्तमसाहस** दंड करावयाजोगा असा **उत्तम द्रव्याचा** जो अपहार करितो त्याविषयीं जाणावा. केवळ फुलें वस्त्रें वगैरे क्षुद्रद्रव्य व **मध्यमद्रव्य** ह्यांच्या अपहाराविषयीं नव्हे.

**नारद**–प्रथमसाहस, मध्यमसाहस, उत्तमसाहस, अशा तिहीं अपराधीं जो दंड सांगितला आहे तोच दंड क्षुद्रद्रव्य, मध्यमद्रव्य, उत्तमद्रव्य, ह्यांच्या **स्तेयाविषयीं** अनुक्रमानें जाणावा.

अशी नारदवचनांत वधरूप उत्तमसाहसदंडाची **उत्तम** द्रव्याच्या **स्तेयाविषयीं** व्यवस्था सांगितली आहे.

**वृद्धमनु**– हे चोर अन्यायानें धन संपादन करितात म्हणून त्यांचें धन केवळ पापरूप आहे. ह्यास्तव **राजानें** त्यांचा घातच करावा, धनदंड करूं नये.

असें जें वचन आहे तेंहि महापराधाविषयींच.

---

१ येथें वध म्हणजे शारीरदंड, अथवा जीव जाण्याचे उपाय.

चौरविशेषेऽपवादमाह ॥

**सचिह्नं ब्राह्मणं कृत्वा स्वराष्ट्राद्विप्रवासयेत् ॥ २६९ ॥**

ब्राह्मणं पुनश्चौरं महत्यपराधेऽपि न घातयेदपि तु ललाटेऽङ्कयित्वा स्वदेशान्निष्कासयेत् । अङ्कनं च श्वपदाकारं कार्यम् ॥ तथाच मनुः । गुरुतल्पे भगः कार्यः सुरापाने सुराध्वजः । स्तेये च श्वपदं कार्यं ब्रह्महण्यशिराः पुमानिति । एतच्च दण्डोत्तरकालं प्रायश्चित्तमचिकीर्षतो द्रष्टव्यम् ॥ यथाह मनुः । प्रायश्चित्तं तु कुर्वाणाः सर्वे वर्णा यथोदितम् । नाङ्क्या राज्ञा ललाटे तु दाप्यास्तूत्तमसाहसमिति ॥२६९ ॥

कांहीं चोराविषयीं अपवाद सांगतो.

**मूलार्थ**– ब्राह्मण चोर असल्यास सचिन्ह करून राष्ट्रांतून हांकून द्यावा.

**टीकार्थ**– ३ जरी ब्राह्मण मोठा अपराधी किंवा चोर आहे तरी त्याचा घात करूं नये. त्याच्या कपाळीं श्वपदाचें चिन्ह करून तो राष्ट्रांतून हांकून द्यावा.

ब्राह्मण चोर असल्यास हद्दपार करावा.

**मनु**– गुरुतल्पगमनाविषयीं भगाकार डाग द्यावा. मद्यप्राशनाच्या ( अपराधाविषयीं ) सुराध्वजाकार डाग द्यावा. स्तेयाविषयीं श्वपदाकारानें डागावें. आणि ब्रह्महत्यारीला कबंधाकार डागावें.

डाग देण्याचे किंवा चिन्ह करण्याचे प्रकार.

**मनु**– सर्व वर्ण यथाविधि प्रायश्चित्त करितात, तर राजानें त्यांच्या कपाळीं डागूं नये. त्यांपासून उत्तमसाहस दंड घ्यावा. २६९

प्रायश्चित्त घेणारांस डागूं नये.

---

चौरादर्शने अपहृतद्रव्यप्राप्त्युपायमाह ॥

**घातितेऽपहृते दोषो ग्रामभर्तुरनिर्गते ।**

**विवीतभर्तुस्तु पथि चौरोद्धर्तुरवीतके ॥ २७० ॥**

यदि ग्राममध्ये मनुष्यादिप्राणिवधो धनापहरणं वा जायते तदा ग्रामपतेरेव चौरोपेक्षादोषस्तत्परिहारार्थं स एव चौरं गृहीत्वा राज्ञेऽर्पयेत् । तदशक्तौ हृतं धनं धनिने दद्यात् । यदि चौरपदं स्वग्रामान्निर्गतं न दर्शयति । दर्शिते पुनस्तत्पदं यत्र प्रविशति तद्विषयाधिपतिरेव चौरं धनं चार्पयेत् ॥ तथाच नारदः । गोचरे यस्य लुप्येत तेन चौरः प्रयत्नतः । ग्राह्यो दाप्योऽथवा शेषं पदं यदि न निर्गतम् ॥ निर्गते पुनरेतस्मान्न चेदन्यत्र पातितम् । सामन्तान्मार्गपालांश्च दिक्पालांश्चैव दापयेदिति ॥ विवीते त्वपहारे विवीतस्वामिन एव दोषः । यदा त्वध्वन्येव तं भवत्यवीतके वा विवीतादन्यत्र क्षेत्रे तदा चौरोद्धर्तुर्मार्गपालस्य दिक्पालस्य वा दोषः २७०

## शाखा ९ थी.

चोर न सांपडल्यास चोरीस गेलेलें द्रव्य मिळण्याचा उपाय सांगतो.

**मूलार्थ**— जर गांवांत वध किंवा चोरी झाली तर ग्रामाधिपतीचा दोष, परंतु चोराचा माग निघालेला दाखवीत नाहीं तर, विवीतांत झाल्यास विवीतस्वामीचा दोष, विवीता खेरीज व वाटेवर झाल्यास चोर धरणारांचा दोष.

**टीकार्थ**— १ जर गांवामध्यें मनुष्यादिकांचा वध किंवा चोरी झाली तर गांवच्या अधिकाऱ्याचा ( पाटील जमीदार मामलेदार वगैरेचा)च उपेक्षादोष होय. ह्मणून त्यांनीं आपला दोष जाण्यासाठीं चोर धरून राजाकडे पाठवावा. असें न करवेल तर मालकाची चोरी भरून द्यावी. परंतु जर चोराचा माग आपल्या गांवच्या शिवेबाहेर गेलेला दाखवूं शकत नाहीं तर. जर माग दाखवून देतो तर, ज्या तालुक्यांत जाईल तेथच्या अधिकाऱ्यानें तो चोर व चोरीस गेलेला माल असें हुजूर पाठवावें.

गांवांत चोरी वध झाल्यास अधिकाऱ्यानें चोर किंवा चोरी भरून द्यावी.

**नारद**— ज्या तालुक्यांत चोराचा माग जाईल तेथच्या अधिकाऱ्यानें तो चोर धरावा. त्याच्यानें न धरवेल तर चोरी भरून द्यावी. परंतु जर माग त्या शिवेच्या बाहेर गेला नसेल तर. आणि माग बाहेर गेला पण जर दुसऱ्या ठिकाणीं पडलेला आढळत नाहीं तर तेथच्या सामंतांकडून व वाटराख्यांकडून व नाकेदार ह्यांजकडून देववावी.

२ जर विवीतांत चोरी झाली तर विवीताच्या धन्याचा दोष. जर मार्गांत चोरी होईल किंवा विवीताहून दुसऱ्या क्षेत्रांत चोरी होईल, तर चोर धरणारांचा अथवा वाटराख्यांचा किंवा नाकेदारांचा अपराध. २७०

मार्गांत चोरी होईल तर नाकेदाराचा दोष.

---

**स्वसीम्नि दद्याद्ग्रामस्तु पदं वा यत्र गच्छति।**
**पञ्चग्रामी बहिःक्रोशाद्दशग्राम्यथवा पुनः ॥ २७१ ॥**

किंच । यदा पुनर्ग्रामाद्बहिः सीमापर्यन्ते क्षेत्रे मोषादिकं भवति तदा तद्ग्रामवासिन एव दद्युः । यदि सीम्नो बहिश्चौरपदं न निर्गतम् । निर्गते पुनर्यत्र ग्रामादिके चौरपदं प्रविशति स एव चौरार्पणादिकं कुर्यात् । यदा त्वनेकग्राममध्ये क्रोशमात्राद्बहिःप्रदेशे घातितो मुषितो वा चौरपदं च जनसंमर्दादिना भग्नं तदा पञ्चानां ग्रामाणां समाहारः पञ्चग्रामी दशग्रामसमाहारो वा दद्यात् ॥ विकल्पवचनं तु यथा तत्प्रत्यासत्त्यपहृतधनप्रत्यर्पणादिकं कुर्यादित्येवमर्थम् ॥ यदा त्वन्यतोऽपहृतं द्रव्यं दापयितुं न शक्नोति तदा स्वकोशादेव राजा दद्यात् ॥ चौरहृतमवजित्य यथास्थानं गमयेत् स्वकोशाद्वा दद्यादिति गौतमस्मरणात् । मुषितामुषितसन्देहे मानुषेण दिव्येन वा निर्णयः कार्यः । यदि तस्मिन् दाप्यमाने भवेन्मोषे तु संशयः । मुषितः शपथं दाप्यो बन्धुभिर्वापि साधयेदिति वृद्धमनुस्मरणात् ॥ २७१ ॥

**मूलार्थ**— गांवहद्दीच्या आंत चोरी वगैरे झाल्यास गांवानें चोरी भरून द्यावी. अथवा जेथें माग जाईल तेथच्यांनीं द्यावी. कोसाच्या बाहेर असल्यास, पांचागांवांनीं किंवा दहा गांवांनीं भरून द्यावी.

**टीकार्थ**— ३ ज्या गांवाच्या बाहेर गांवशिवेपर्यंत शेतांत चोरी वगैरे होईल, तर त्या गांवकऱ्यांनीं चोरी भरून द्यावी. परंतु जर त्या शिवेच्या बाहेर चोरीचा माग गेला नसेल तर. शिवेबाहेर गेला असल्यास ज्या ग्रामादिकांत माग शिरला असेल त्या गांवानें चोर धरून द्यावा. ( चोर धरवत नाहीं तर चोरी भरून द्यावी. )

४ जर अनेक गांवाच्या मध्यभागीं एका कोसावर खून पडला किंवा चोरी झाली, आणि माग लोकांच्या वर्दळीमुळें मोडला, तर भोंवतालच्या पांच गांवांनीं किंवा दहा गांवांनीं चोरी भरून द्यावी, ( अथवा खून असल्यास मुद्दा धरून द्यावा.) "पांचगांव किंवा दहा गांव" असा विकल्प सांगितला तो, चोरी झालेल्या ठिकाणाला जे जे गांव सन्निहित असतील त्यांनीं द्यावी, केवळ पांच गांवांनींच व दाहा गांवांनीच चोरी भरून द्यावी असें नाहीं, अशा प्रकारें व्यवस्थित जाणावा.

. माग न सांपडे तर साभंतांनीं चोरी भरून द्यावी.

५ जर राजा चोरीस गेलेलें द्रव्य सदरहू सांगितलेल्यांकडून देववूं शकत नाहीं, तर त्याणें आपल्या कोशांतून द्यावें.

**गौतम**—चोरांनीं अपहृत केलेलें (द्रव्य) जिंकून ज्याचें त्याला द्यावें. (असें न होईल तर) आपल्या कोशांतून द्यावें.

६ चोरी झाली किंवा नाहीं याविषयीं संदेह झाला असतां, **मानुषप्रमाणानें** किंवा **दिव्यानें** निर्णय करावा.

**वृद्धमनु**— चोराकडून मालकाचें धन देवविलें पाहिजे, परंतु चोरी झाली किंवा नाहीं ह्याविषयीं संशय होईल तर चोरी झाली ह्याबद्दल मालकाकडून शपथ घ्यावी, किंवा मालकानें बंधूकडून ( साक्षी वगैरेकडून ) शाबीत करावें. २७१

---

अपराधविशेषेण दण्डविशेषमाह ॥

**बन्दिग्राहांस्तथा वाजिकुञ्जराणां च हारिणः ।**
**प्रसह्य घातिनश्चैव शूलानारोपयेन्नरान् ॥ २७२ ॥**

बन्दिग्राहादीन् बलावष्टम्भेन घातकांश्च नरान् शूलानारोपयेत् । अयं च वधप्रकारविशेषोपदेशः ॥ अग्न्यगारायुधागारदेवतागारभेदकान् । हस्त्यश्वरथहर्तृंश्च हन्यादेवाविचारयन्निति मनुस्मरणात् ॥ २७२ ॥

## शाखा ५ वी.

कांहीं अपराधविशेषामुळें निराळा दंड सांगतो.

**मूलार्थ**— बंदिग्राह, तसेच अश्व गज ह्यांचें हरण करणारे, व बलात्कारानें घात करणारे, अशा मनुष्यांस सुळीं द्यावें.

**टीकार्थ-** १ बंदिग्राह, तसेच अश्व गज ह्यांचा अपहार करणारे, व बलात्कारानें घात करणारे, अशा पुरुषांस सुळावर द्यावें. हा वधदंड करण्याचा एक विशेष नियम सांगितला.

घोडाहत्तीवगैरेचा अपहार करणाराचा वध करावा.

**मनुहि-** होमशाळा, शस्त्रशाळा, देवालय, हीं फोडणारे व हत्ती, घोडा, रथ ह्यांचा अपहार करणारे ह्यांस विचार न करितां मारावेंच. २७२

---

**उत्क्षेपकग्रन्थिभेदौ करसन्दंशहीनकौ ।**
**कार्यौ द्वितीयापराधे करपादैकहीनकौ ॥ २७३ ॥**

किंच । वस्त्राद्युत्क्षिपत्यपहरतीत्युत्क्षेपकः । वस्त्रादिबद्धं स्वर्णादिकं विस्रस्योत्कृत्य वा योऽपहरत्यसौ ग्रन्थिभेदकः तौ यथाक्रमं करेण सन्दंशसदृशेन तर्जन्यङ्गुष्ठेन च हीनौ कार्यौ । द्वितीयापराधे पुनः करश्च पादश्च करपादं तच्च तदेकं च करपादैकं तद्धीनं ययोस्तौ करपादैकहीनकौ कार्यौ । उत्क्षेपकग्रन्थिभेदकयोरेकमेकं करं पादं च छिन्द्यादित्यर्थः । एतदप्युत्तमसाहसप्राप्तियोग्यद्रव्यविषयम् । तदङ्गच्छेद इत्युक्तो दण्ड उत्तमसाहस इति नारदवचनात् ॥ तृतीयापराधेतु वध एव ॥ तथाच मनुः । अङ्गुली ग्रन्थिभेदस्य छेदयेत्प्रथमे ग्रहे । द्वितीये हस्तचरणौ तृतीये वधमर्हतीति । जातिद्रव्यपरिमाणतो मूल्याद्यनुसारतो दण्डः कल्पनीय इति ॥ २७३ ॥

**मूलार्थ-** उचलून घेणाराचा हात तोडावा, व गांठ सोडून घेणाराचीं बोटें तोडावीं. दुसऱ्यानें हे अपराध केल्यास एकेक हात पाय तोडावा.

**टीकार्थ-** २ आंगावरील वस्त्रादिक उचलून चोरून घेणाराचा हात तोडावा. वस्त्रांत बांधलेलें सुवर्णादिक गांठ सोडून किंवा वस्त्रादिक कातरून चोरून घेणाराच्या हाताचीं बोटें ( आंगठा व तर्जनी ) तोडून टाकावीं, परंतु एकवार अपराध घडला असल्यास ही शिक्षा. दुसऱ्यानें असा अपराध घडेल तर त्यांचा एक हात व एक पाय तोडावा.

हा प्रकार **उत्तमसाहस** दंड करावयाजोग्या **उत्तम द्रव्याच्या** अपहाराविषयीं जाणावा, कारण "( वध, सर्वस्वहरण, गांवांतून हांकून देणें, डाग देणें व) त्यांचा अंगच्छेद करणें" असा **उत्तमसाहस** अपराधाविषयीं नारदानें दंड सांगितला आहे. तिसऱ्यानें सदरहू अपराध करील तर त्याचा वध करावा.

**मनु-** गांठचें सोडून नेणाराचीं दोन बोटें तोडावीं. परंतु एकवार असें घडल्यास. दुसऱ्यानें असें करील तर एकेक हात पाय तोडावा, तिसऱ्यानें करील तर वध करावा.

तिसऱ्यानें अपराध केल्यास वध.

ह्याप्रमाणें जात, द्रव्य, परिमाण, व द्रव्याचें मोल, ह्यांच्या तारतम्यानें दंडाची योजना करावी. २७३

जातिद्रव्यपरिमाणपरिग्रहविनियोगवयःशक्तिगुणदेशकालादीनां दण्डगुरुलघुभावकरणानामानन्त्यात्प्रतिद्रव्यं वक्तुमशक्तेः सामान्येन दण्डकल्पनोपायमाह ॥

क्षुद्रमध्यमहाद्रव्यहरणे सारतो दमः।
देशकालवयःशक्ति सञ्चिन्त्य दण्डकर्मणि ॥ २७४ ॥

क्षुद्राणां मध्यमानामुत्तमानां च द्रव्याणां हरणे सारतो मूल्याद्यनुसारतो दण्डः कल्पनीयः ॥ क्षुद्रादिद्रव्यस्वरूपं च नारदेनोक्तम्। मृद्भाण्डासनखट्वास्थिदारुचर्मतृणादि यत्। शमीधान्यं कृतान्नं च क्षुद्रं द्रव्यमुदाहृतम्॥ वासः कौशेयवर्जं च गोवर्जं पशवस्तथा। हिरण्यवर्जं लोहं च मध्यं व्रीहियवा अपि ॥ हिरण्यरत्नकौशेयं स्त्रीपुङ्गोगजवाजिनः। देवब्राह्मणराज्ञां च द्रव्यं विज्ञेयमुत्तमम् ॥ त्रिप्रकारेष्वपि द्रव्येष्वौत्सर्गिकः प्रथममध्यमोत्तमसाहसरूपो दण्डनियमस्तेनैव दर्शितः। साहसेषु य एवोक्तस्त्रिषु दण्डो मनीषिभिः। स एव दण्डः स्तेयेपि द्रव्येषु त्रिष्वनुक्रमादिति ॥ मृन्मयेषु मणिकमल्लिकादिषु गोवाजिव्यतिरिक्तेषु च महिषमेषादिपशुषु ब्राह्मणसंबन्धिषु च कनकधान्यादिषु तरतमभावोऽस्तीति उच्चावचदण्डविशेषाकाङ्क्षायां मूल्याद्यनुसारेण दण्डः कल्पनीयः। तत्र च दण्डकर्मणि दण्डकल्पनायां तद्धेतुभूतं देशकालवयःशक्ति सम्यक् चिन्तनीयम्। एतच्च जातिद्रव्यपरिणामपरिग्रहादीनामुपलक्षणम् ॥ तथाहि। अष्टापाद्यं स्तेयकिल्बिषं शूद्रस्य द्विगुणोत्तराणीतरेषां प्रतिवर्णं विदुषोऽतिक्रमे दण्डभूयस्त्वमिति। अयमर्थः। किल्बिषशब्देनात्र दण्डो लक्ष्यते। यस्मिन्नपहारे यो दण्ड उक्तः स विद्वच्छूद्रकर्तृकेऽपहारे अष्टगुण आपादनीयः। इतरेषां पुनर्विट्क्षत्रब्राह्मणादीनां विदुषां द्विगुणोत्तराणि किल्बिषाणि षोडशद्वात्रिंशच्चतुःषष्टिगुणा दण्डा आपादनीयाः। यस्माद्विद्वच्छूद्रादिकर्तृकेऽपहारे दण्डभूयस्त्वम्। मनुनाप्ययमेवार्थो दर्शितः। अष्टापाद्यं तु शूद्रस्य स्तेये भवति किल्बिषम्। षोडशैव तु वैश्यस्य द्वात्रिंशत्क्षत्रियस्य तु ॥ ब्राह्मणस्य चतुःषष्टिः पूर्णं वापि शतं भवेत्। द्विगुणा वा चतुःषष्टिस्तद्दोषगुणवेदिन इति ॥ तथा परिमाणकृतमपि दण्डगुरुत्वं दृश्यते। यथाह मनुः। धान्यं दशभ्यः कुम्भेभ्यो हरतोऽभ्यधिकं वधः। शेषेष्वेकादशगुणं दाप्यस्तस्य च तद्धनमिति ॥ विंशतिद्रोणकः कुम्भः। हर्तुर्ह्रियमाणस्वामिगुणापेक्षया सुभिक्षदुर्भिक्षकालाद्यपेक्षया ताडनाङ्गच्छेदनवधरूपा दण्डा योज्याः ॥ तथा संख्याविशेषादपि दण्डविशेषो रत्नादिषु। सुवर्णरजतादीनामुत्तमानां च वाससाम्। रत्नानां चैव सर्वेषां शताऽभ्यधिके वधः ॥ पञ्चाशतस्त्वभ्यधिके हस्तच्छेदनमिष्यते। शेषेष्वेकादशगुणं मूल्याद्दण्डं प्रकल्पयेदिति ॥ तथा द्रव्यविशेषादपि। पुरुषाणां कुलीनानां नारीणां वा विशेषतः। रत्नानां चैव सर्वेषां हरणे वधमर्हति। अकुलीनानां तु दण्डान्तरम्। पुरुषं हरतो दण्ड उक्त उत्तमसाहसः। स्त्र्यपराधे तु सर्वस्वं कन्यां तु हरतो वध इति ॥ क्षुद्रद्रव्याणां तु मापतो न्यूनमूल्यानां मूल्यात्पञ्चगुणो दमः। काष्ठभाण्डतृ-

णादीनां मृन्मयानां तथैव च ॥ वेणुवैणवभाण्डानां तथा स्नाय्वस्थिचर्मणाम् ॥ शाकानामार्द्रमूलानां हरणे फलमूलयोः । गोरसेक्षुविकाराणां तथा लवणतैलयोः ॥ पक्वान्नानां कृतान्नानां मत्स्यानामामिषस्य च । सर्वेषां मूल्यभूतानां मूल्यात्पञ्चगुणो दम इति नारदस्मरणात् ॥ यः पुनः प्रथमसाहसः क्षुद्रद्रव्येषु शतावरः पञ्चाशत्पर्यन्तोऽसौ माषमूल्ये तदधिकमूल्ये वा यथायोग्यं व्यवस्थापनीयः ॥ यः पुनर्मानवं क्षुद्रद्रव्यगोचरवचनं तन्मूल्याद्दिगुणो दम इति तदल्पप्रयोजनशरावादिविषयम् ॥ तथापराधगुरुत्वादपि दण्डगुरुत्वम् । संधिं छित्वा तु ये चौर्यं रात्रौ कुर्वन्ति तस्कराः । तेषां छित्वा नृपो हस्तौ तीक्ष्णशूले निवेशयेत् ॥ इत्येवं सर्वेषामानन्त्यात्प्रतिद्रव्यं वक्तुमशक्तेर्जातिपरिमाणादिभिः कारणैर्दण्डगुरुलघुभावः कल्पनीयः ॥ पथिकादीनां पुनरल्पापराधे न दण्डः ॥ यथाह मनुः । द्विजोऽध्वगः क्षीणवृत्तिर्द्वाविक्षू द्वे च मूलके । आददानः परक्षेत्रान्न दण्डं दातुमर्हति ॥ तथा । चणकव्रीहिगोधूमयवानां मुद्गमाषयोः । अनिषिद्धैर्गृहीतव्यो मुष्टिरेकः पथि स्थितैः ॥ तथैव सप्तमे भक्ते भक्तानि षडनश्नता । अश्वस्तनविधानेन हर्तव्यं हीनकर्मण इति ॥ २७४ ॥

शाखा ६ वी.

जात, द्रव्य, परिमाण, परिग्रह[1], विनियोग, वय, शक्ति, गुण, देश, काल वगैरे ह्यांच्या दंडाविषयीं लाघवगौरवाचीं कारणें अनंत आहेत, सबब प्रत्येक द्रव्यापहारीं निराळें सांगतां पुरवत नाहीं, ह्यास्तव सामान्यतः दंडकल्पनेचा उपाय सांगतो.

**मूलार्थ–** क्षुद्रद्रव्य, मध्यमद्रव्य, व उत्तमद्रव्य, ह्यांच्या अपहाराविषयीं तारतम्यानें दंड योजावा. तो दंड, देश काल वय व शक्ति ह्यांचा विचार पाहून करावा.

**टीकार्थ–** क्षुद्रद्रव्य, मध्यमद्रव्य, आणि उत्तमद्रव्य; ह्यांची चोरी केली असतां द्रव्याचे किमतीच्या तारतम्यानें दंड योजावा.

चोरलेल्या द्रव्याच्या तारतम्यानें दंडयोजना.

क्षुद्रद्रव्यादिकांचें स्वरूप नारद सांगतो.

**नारद–** १ मडकीं, आसन, बाज, हाडें ( हस्तिदंती फांसे सोंगट्या वगैरे ), लांकडी सामान, कातडें, तृण, शमीधान्य ( उडीद, मूग, वगैरे ), शिजलेलें अन्न, अशीं क्षुद्रद्रव्यें जाणावीं.

क्षुद्रद्रव्यें कोणतीं.

**नारद–** कौशेयाखेरीज वस्त्रें व गाईखेरीज इतर पशुच, तसे सोन्याखेरीज इतर धातु आणि व्रीहि यव, अशीं मध्यमद्रव्यें जाणावीं.

मध्यमद्रव्यें कोणतीं.

**नारद–** हिरण्य, रत्नें, कौशेय, स्त्री, पुरुष, गाय, हत्ती, घोडा, हीं द्रव्यें आणि देव, ब्राह्मण, राजा ह्यांचें द्रव्य हीं, उत्तमद्रव्यें जाणावीं.

उत्तमद्रव्यें कोणतीं.

---

सुबोधिनी १. परिग्रह म्हणजे असें. सामान्यतः गाईच्या चोरीपेक्षां ब्राह्मणप्रतिगृहीत गोहरणाविषयीं अधिक दंड.

अशा तीन प्रकारच्या द्रव्याचे चोरीविषयीं साधारण **प्रथमसाहस, मध्यमसाहस** आणि उत्तमसाहस दंडहि तोच ( नारद ) सांगतो.

**नारद**—३ **प्रथमसाहस, मध्यमसाहस, उत्तमसाहस,** अपराधांविषयीं जो दंड सांगितला आहे, तोच दंड सदरहू तीन प्रकारच्या चोरीविषयींहि अनुक्रमानें जाणावा.

मडकीं वगैरे क्षुद्रद्रव्यें, गाईखेरीज म्हैस शेळी वगैरे मध्यमद्रव्यें, व ब्राह्मणसंबंधी कनक, धान्य, इत्यादिक उत्तमद्रव्यें ह्यांचें तारतम्य आहे. ह्यास्तव चोरलेल्या द्रव्याचे किमतीच्या तारतम्यानें दंड कल्पावा. आणि त्या दंडकल्पनेविषयीं कारणभूत जीं देश, काल, वय, शक्ति, जाति, द्रव्य, परिग्रह, इत्यादिक ह्यांचा नीट विचार करावा. तो प्रकार असा; ज्या चोरीविषयीं जो दंड सांगितला आहे, ती चोरी विद्वान् शूद्रानें केली आहे तर तिजविषयीं तो दंड आठपट अधिक योजावा. आणि विद्वान् असे वैश्य, क्षत्रिय, ब्राह्मण, ह्यांनीं केली आहे तर अनुक्रमानें सोळापट, बत्तीसपट, आणि चौसष्टपट, योजावा, ह्यास्तव कीं, त्यांच्या अपराधांविषयीं अधिक दंड योजण्याचें कारण, त्या शूद्रादिकांची विद्वत्ता होय.

विद्वानानें केलेल्या चोरीविषयीं अधिक दंड वाढवावा.

मनुहि हेंच स्पष्ट करितो.

**मनु**—गुण दोष जाणणाऱ्या शूद्रानें केलेल्या चोरीविषयीं आठपट दंड, तशा वैश्याला सोळापट दंड, तशा क्षत्रियाला बत्तीसपट दंड, आणि तशा ब्राह्मणाला चौसष्टपट किंवा बरोबर १०० पट किंवा चौसष्टाच्याही दुप्पट दंड योजावा.

तसेंच चोरलेल्या द्रव्याच्या परिमाणतारतम्यानेंही दंडाधिक्य पाहाण्यांत येतें.

**मनु**— ४ दहा कुंभांपेक्षां अधिक धान्याची चोरी करणारास वधदंड करावा. त्यापेक्षां कमी धान्य चोरणारास चोरलेल्याच्या अकरापट दंड करून मालकाची चोरी भरून देववावी. वीस द्रोणांचा एक कुंभ होतो.

५ चोर व चोरीस गेलेला जिनस व मालक ह्याचे गुण, व सुकाळ, दुकाळ, ह्यांचे तारतम्यानें वरच्या ( मनुवचनांतील ) वधशब्देंकरून ताडन, अंगछेद, वध हे दंड योजावे.

रत्नादिकांविषयीं संख्येच्या आधिक्यामुळें दंडाचें आधिक्य सांगतो.

**मनु**—६ सुवर्ण, रजत, व महावस्त्रें[1] आणि सर्व जातींचीं रत्नें, हीं प्रत्येक द्रव्यें १००रांपेक्षां अधिक चोरिलीं असतां वधदंड करावा. ५० सांपेक्षां अधिक चोरिलीं असतां हात तोडावा. ५० सांपेक्षां कमी चोरलीं असतां त्या द्रव्याच्या ११ पट दंड योजावा.

सोनें रत्नें वगैरेच्या चोरीबद्दल दंडप्रकार.

तसाच आणखी द्रव्याविषयींहि दंडाचा प्रकार सांगतो.

**मनु**—७ कुलीन पुरुष, स्त्रिया, व सर्वप्रकारचीं रत्नें, ह्यांचा अपहार करणारा, वधदंडास योग्य होतो.

पुरुष स्त्रिया वगैरेच्या चोरीविषयीं वधदंड.

---

१ महावस्त्रें म्हणजे शालजोडी, पितांबर, भरजरी पोषाख वगैरे.

शाखा ८ वी.

**मूलार्थ**– शस्त्रघात व गर्भपात केला असतां, उत्तमसाहस दंड, पुरुष व स्त्री ह्यांच्या हननाविषयींहि उत्तमसाहस किंवा प्रथमसाहस दंड योजावा.

**टीकार्थ**– १ दुसऱ्याच्या अंगावर शस्त्रघात करणारास व दासीगर्भ व ब्राह्मणीगर्भ ह्यांवांचून गर्भपात करणारास उत्तमसाहस दंड करावा. दासीगर्भाविषयीं तर साहस प्रकरणीं २ ऱ्या शाखेच्या ९ व्या अंकांत १०० पण दंड सांगितलाच आहे. ब्राह्मणीच्या गर्भपाताविषयीं तर प्रायश्चित्ताध्यायांत ब्रह्महत्येचा अतिदेश सांगितला आहे. पुरुष व स्त्री ह्यांचा वध करणाऱ्यास त्या पुरुषस्त्रियांचें शील वृत्त ह्यांच्या तारतम्यानें उत्तमसाहस किंवा प्रथमसाहस दंड योजावा. ह्मणजे कुल शील सदाचारसंपन्न अशा पुरुषाचा किंवा स्त्रीचा वध करणारास उत्तमसाहस दंड, तद्रहित पुरुष किंवा स्त्री ह्यांचा वध करणारास प्रथमसाहस दंड योजावा. (अर्थात् यत्किंचित् कुल शील सदाचारसंपन्न पुरुष किंवा स्त्री ह्यांचा वध करणारास मध्यमसाहस दंड.) २७६

जखम व गर्भपात वगैरे करणारास उत्तमसाहस दंड.

---

**विप्रदुष्टां स्त्रियं चैव पुरुषघ्नीमगर्भिणीम् ।**
**सेतुभेदकरीं चाप्सु शिलां बध्वा प्रवेशयेत् ॥ २७७ ॥**

अपि च । विशेषेण प्रदुष्टा विप्रदुष्टा भ्रूणघ्नी स्वगर्भपातनी च या च पुरुषस्य हन्त्री सेतूनां भेत्री च एता गर्भरहिताः स्त्रीर्गले शिलां बध्वा अप्सु प्रवेशयेत् यथा न प्लवन्ति ॥ २७७ ॥

**मूलार्थ**– भ्रूणहत्या करणारी, पुरुषवध करणारी व सेतूचा विच्छेद करणारी, अशा स्त्रीला शिळा बांधून पाण्यांत बुडवावें. परंतु गर्भवती नसल्यास.

**टीकार्थ**– २ आपला गर्भपात करणारी, पुरुषास मारणारी, सेतूचा भेद करणारी, अशा स्त्रियांच्या गळ्यांत शिळा बांधून त्या पाण्यांत बुडवाव्या, कीं पुनः वर न येईत. परंतु त्या गर्भिणी नसल्यास. २७७

गर्भपात वगैरे साहस करणाऱ्या स्त्रीला पाण्यांत बुडवावें.

---

**विषाग्निदां पतिगुरुनिजापत्यप्रमापणीम् ।**
**विकर्णकरनासौष्ठीं कृत्वा गोभिः प्रमापयेत् ॥ २७८ ॥**

---

१ ब्रह्महत्येचा अतिदेश म्हणजे न जाणतां ब्राह्मणवध घडला असतां जें, द्वादशवार्षिक प्रायश्चित्त सांगितलें आहे तेंच, न जाणतां ब्राह्मणीगर्भाचा पात केला असतां प्रायश्चित्त करावें. जाणून घडल्यास तें प्रायश्चित्त करून कडेलोट करून मरावें.

किंच । अगर्भिणीमित्यनुवर्तते । या च परवधार्थमन्नपानादिषु विषं ददाति क्षिपति या च दाहार्थं ग्रामादिष्वग्निं ददाति । तथा या च निजपतिगुर्वपत्यानि मारयति तां छिन्नकर्णकरनासौष्ठीं कृत्वा अदान्तैर्दुष्टबलीवर्दैः प्रवाह्य मारयेत् । स्तेयप्रकरणे यदेतत्साहसिकस्य दण्डविधानं तत्प्रासङ्गिकमिति मन्तव्यम् ॥ २७८ ॥

मूलार्थ– विषप्रयोग करणारी, आग लावणारी, व नवरा, गुरु, आपलें अपत्य, ह्यांस मारणारी, अशा स्त्रीला कान, हात, नाक, ओष्ठ कापून बैलांकडून मारवावें.

टीकार्थ–१ जी दुसऱ्याचा जीव घेण्याच्या उद्देशानें अन्नादिकांत विषप्रयोग करिते; जी गांव इत्यादिक जाळण्यासाठीं अग्निप्रयोग करिते; तशीच जी आपला नवरा, गुरु, अपत्य, ह्यांस मारते; तिचे कान, हात, ओंठ कापून माजलेल्या पोळांकडून तिला मारवावें. परंतु "ती गर्भिणी नसल्यास" ह्या वाक्याची मागील स्मृतींतून अनुवृत्ति घ्यावी.

पति इत्यादिकांस मारणाऱ्या स्त्रीला पोळांकडून मारवावें.

स्तेयप्रकरणीं जें हें साहसिकाविषयीं दंडविधान सांगितलें तें प्रसंगें प्राप्त झालें ह्मणून लिहिलें असें समजावें. २७८.

---

अविज्ञातकर्तृके हनने हन्तृज्ञानोपायमाह ॥

**अविज्ञातहतस्याशु कलहं सुतबान्धवाः ।**
**प्रष्टव्या योषितश्चास्य परपुंसि रताः पृथक् ॥ २७९ ॥**

अविज्ञातपुरुषेण घातितस्य संबन्धिनः सुताः प्रत्यासन्नाश्च बान्धवाः केनास्य कलहो जात इति कलहमाशु प्रष्टव्याः । तथा मृतस्य संबन्धिन्यो योषितो याश्च परपुंसि रता व्यभिचारिण्यस्ता अपि प्रष्टव्याः ॥ २७९ ॥

शाखा ९ वी.

वध करणारा माहीत नसल्यास त्याच्या समजण्याचा उपाय सांगतो.

मूलार्थ– वध करणारा माहीत नाहीं तर मृताचे पुत्र बांधव ह्यांस त्याचे कलहाविषयीं लौकर पुसावें व त्याच्या स्त्रिया व ज्या परपुरुषाशीं रत झालेल्या स्त्रिया त्यांसहि पृथक् पृथक् पुसावें.

टीकार्थ–१ वध करणारा माहीत नाहीं तर मेलेल्यांचे पुत्रांस व जवळचे बांधवांस लागलेंच पुसावें कीं कोणाशीं ह्याचा कलह झाला होता कीं काय. तसेंच त्याच्या स्त्रियांस व ज्या परपुरुषाचे ठायीं रत झालेल्या स्त्रिया त्यांसहि पुसावें कीं ह्याचा कोणाबरोबर कज्या झाला होता काय? २७९.

खून करणारा अविज्ञात असल्यास ठिकाणा लावण्याचा उपाय.

---

कथं प्रष्टव्या इत्यत आह ॥

**स्त्रीद्रव्यवृत्तिकामो वा केन वायं गतः सह ।**
**मृत्युदेशसमासन्नं पृच्छेद्वापि जनं शनैः ॥ २८० ॥**

किमयं स्त्रीकामो द्रव्यकामो वृत्तिकामो वा । तथा कस्यां किंसंबन्धिन्यां वा स्त्रियामस्य रतिरासीत् । कस्मिन् वा द्रव्ये प्रीतिः । कुतो वा वृत्तिकामः । केन वा सह देशान्तरं गत इति नानाप्रकारं व्यभिचारिण्यो योषितः पृथक्पृथक् विश्वास्य प्रष्टव्याः । तथा मरणदेशनिकटवर्तिनो गोपाटविकाद्या ये जनास्तेपि विश्वासपूर्वकं प्रष्टव्याः । एवं नानाप्रकारैः प्रश्नैर्हन्तारं निश्चित्य तदुचितो दण्डो विधातव्यः ॥ २८० ॥

कोणत्या रीतीनें पुसावें हें सांगतो.

**मूलार्थ**– हा स्त्रीकाम होता, कीं द्रव्यकाम, किंवा वृत्तीविषयीं यत्न करीत होता, अथवा कोणाबरोबर हा गेला होता, ह्याप्रमाणें वधस्थानाजवळच्या लोकांसहि युक्तीनें पुसावें.

**टीकार्थ**– २ काय हा स्त्रीविषयीं इच्छा करीत होता? असल्यास कोणाच्या स्त्रीवर त्याची प्रीति होती, किंवा कोणत्या द्रव्यावर त्याची प्रीति होती, कशाकरितां हा वृत्तीविषयीं अभिलाष करीत होता, व कोणाबरोबर देशांतरीं गेला होता, असें त्याच्या व्यभिचारिणी स्त्रियांस वेगवेगळें आश्वासन देऊन पुसावें. तसेंच वध झालेल्या ठिकाणाजवळ राहणारे जे गौळी, आरण्यक वगैरे लोक त्यांसहि विश्वासपूर्वक पुसावें.

प्रश्न करण्याचा प्रकार.

ह्याप्रमाणें नाना तऱ्हेचे प्रश्नांकडून वध करणारा अमुक असा निर्णय करून त्याला जो योग्य दंड असेल तो करावा. २८०.

---

**क्षेत्रवेश्मवनग्रामविवीतखलदाहकाः ।**
**राजपत्न्यभिगामी च दग्धव्यास्तु कटाग्निना ॥ २८१ ॥**

किंच । क्षेत्रं पक्वफलसस्योपेतम् । वेश्म गृहम् । वनमटवीम् । क्रीडावनं वा । ग्रामम् । विवीतमुक्तलक्षणम् । खलं वा ये दहन्ति यश्च राजपत्नीमभिगच्छति तान्सर्वान् कटैर्वीरणमयैर्वेष्टयित्वा दहेत् । क्षेत्रादेर्दाहकानां मारणदण्डप्रसंगाद्दण्डविधानम् । इति स्तेयप्रकरणम् ॥ २८१ ॥

**मूलार्थ**– क्षेत्र, घर, क्रीडावन, गांव, विवीत, खळें ह्यांस आग लावणारा, व राजपत्नीशीं संग करणारा ह्यांस कटाग्नीनें जाळावें.

**टीकार्थ**– ३ जें परिपक्वदशेस आलेलें क्षेत्र, घर, वैन, अथवा क्रीडावन, गांव, विवीत, किंवा खळें, जाळतात व जो राजपत्नीशीं संग करणारा त्या सर्वांस कटाग्नीनें जाळावें. २८१.

घर इत्यादिकास आग लावणारा व राजपत्नीशीं संग करणारा ह्यांस जाळून टाकावें.

---

## स्त्रीसंग्रहण प्रकरण २४ वें.

**स्त्रीसंग्रहणाख्यं विवादपदं व्याख्यायते ॥ प्रथमसाहसादिदण्डप्राप्त्यर्थं त्रेधा तत्स्वरूपं व्यासेन विवृतम् । त्रिविधं तत्समाख्यातं प्रथमं मध्यमोत्तमम् । अदेशकालभाषाभिर्निर्जने च परस्त्रियाः ॥ कटाक्षावेक्षणं हास्यं प्रथमं साहसं स्मृतम् । प्रेषणं गन्धमाल्यानां धूपभूषणवाससाम् ॥ प्रलोभनं चान्नपानैर्मध्यमं साहसं स्मृतम् । सहासनं विविक्तेषु परस्परमुपाश्रयः। केशाकेशिग्रहश्चैव सम्यक् संग्रहणं स्मृतम् ॥ स्त्रीपुंसयोर्मिथुनीभावः संग्रहणम् ॥**

### शाखा १ ली.

आतां **स्त्रीसंग्रहणाविषयींचा व्यवहार** सांगतो.

**स्त्रीसंग्रहण** म्हणजे परस्त्री व पुरुष ह्यांचा परस्पर संयोग ( किंवा संयोग होण्याचे उपाय ). **स्त्रीसंग्रहण** करणारास **प्रथमसाहस, मध्यमसाहस, उत्तमसाहस,** दंड होण्यासाठीं त्या **स्त्रीसंग्रहणाचें** स्वरूप तीन प्रकारचें व्यास सांगतो.

**व्यास**–१ निर्जनस्थळीं व अकाळीं व प्रसिद्ध देशभाषेखेरीज ( संकेत शब्दांनीं ) जो परस्त्रीशीं कटाक्षावलोकन, हास्य ( विनोद ) केलाजातो, तें प्रथम **स्त्रीसंग्रहण** म्हटलें आहे.

प्रथम स्त्रीसंग्रहण.

**व्यास**– सुवासिक गंध ( चंदन बुका अर्गजा वगैरे), फुलें, धूप, भूषणें, वस्त्रें, आणि अन्नपान ह्यांकडून प्रलोभन करणें, हें **मध्यमस्त्रीसंग्रहण** म्हटलें आहे.

मध्यम स्त्रीसंग्रहण.

**व्यास**– एकांतीं व एका आसनावर बसणें, व परस्परांचें आलिंगन, खांद्यावर हात ठेवणें, व हातांत हात धरणें, आणि परस्परांचे केशपाश धरून क्रीडा करणें, हें **उत्तम स्त्रीसंग्रहण** म्हटलें आहे.

उत्तम स्त्रीसंग्रहण.

**संग्रहणज्ञानपूर्वकत्वात्तत्कर्तुर्दण्डविधानं तज्ज्ञानोपायं तावदाह ॥**

**पुमान्संग्रहणे ग्राह्यः केशाकेशिपरस्त्रियाः ।**
**सद्यो वा कामजैश्चिह्नैः प्रतिपत्तौ द्वयोस्तथा ॥ २८२ ॥**

**संग्रहणे प्रवृत्तः पुमान् केशाकेश्यादिभिर्लिङ्गैर्ज्ञात्वा ग्रहीतव्यः । परस्परं केशग्र-**

---

१ येथें वन म्हणजे जें नदी इत्यादिकाचे आश्रयानें स्वतःसिद्ध वृक्षादिकेंकरून युक्त स्थळ तें.

हणपूर्विका क्रीडा केशाकेशि ॥ तत्र तेनेदमिति सरूप इति बहुव्रीहौ सति इच्कर्मव्यतिहार इति समासांत इच्प्रत्ययः । अव्ययत्वाच्च लुप्ततृतीया विभक्तिः ॥ ततश्चायमर्थः । परभार्यया सह केशाकेशिक्रीडनेनाभिनवैः कररुहदशनादिकृतव्रणैः रागकृतैर्लिङ्गैर्द्वयोः संप्रतिपत्त्या वा ज्ञात्वा संग्रहणे प्रवृत्तो ग्रहीतव्यः ॥ परस्त्रीग्रहणं नियुक्तावरुद्धादिव्युदासार्थम् ॥ २८२ ॥

स्त्रीसंग्रहण करणारास जो दंड करणें तो प्रथमतः तें संग्रहण
समजल्यावांचून घडत नाहीं म्हणून तें समजण्याचा
उपाय प्रथमतः सांगतो.

**मूलार्थ**– परस्त्रीशीं संभोग करण्याविषयीं प्रवृत्त जो पुरुष, तो परस्पर केशग्रहण अथवा तात्कालिक जीं कामजनित चिन्हें, तसाच उभयतांचा संकेत, ह्या मुद्यावरून धरावा.

**टीकार्थ**–२ परस्त्रीबरोबर परस्पर केशपाश धरून क्रीडा केल्यावरून अथवा कामाच्या आवेशानें नखक्षत दंतक्षतादि तात्कालिक चिन्हें होतात त्या मुद्यावरून अथवा दोघांच्या संकेतावरून हा संयोगाविषयीं प्रवृत्त झालेला असें समजून धरावा. येथें परस्त्रीशब्देंकरून **नियुक्ता व अवरुद्धा** ह्यांवांचून इतर घ्याव्या. २८२

स्त्रीसंग्रहण समजण्याचा उपाय.

---

**नीवीस्तनप्रावरणसक्थिकेशावमर्शनम् ।**
**अदेशकालसंभाषं सहैकासनमेव च ॥ २८३ ॥**

किंच । यः पुनः परदारपरिधानग्रन्थिप्रदेशकुचप्रावरणजघनमूर्द्धरुहादिस्पर्शनं साभिलाष इवाचरति । तथा अदेशे निर्जने जनताकीर्णे वान्धकाराकुले संलापनं करोति । परभार्यया वा सहैकमञ्चकादौ रिरंसयेवावतिष्ठते सोऽपि संग्रहणे प्रवृत्तो ग्राह्यः । एतच्चाशंक्यमानदोषपुरुषविषयमितरस्य तु न दोषः ॥ यथाह मनुः । यस्त्वनाक्षारितः पूर्वमभिभाषेत कारणात् । न दोषं प्राप्नुयात्किंचिन्न हि तस्य व्यतिक्रम इति ॥ यः परस्त्रिया स्पृष्टः क्षमते असावपि ग्राह्य इति तेनैवोक्तम् ॥ स्त्रियं स्पृशेददेशे यः स्पृष्टो वा मर्षयेत्तथा । परस्परस्यानुमते सर्वं संग्रहणं स्मृतमिति । यश्च मयेयं विदग्धाऽसकृद्रमितेति श्लाघया भुजंगजनसमक्षं ख्यापयत्यसावपि ग्राह्य इति तेनैवोक्तम् । दर्पाद्वा यदि वा मोहाच्छ्लाघया वा स्वयं वदेत् । पूर्वं मयेयं भुंक्तेति तच्च संग्रहणं स्मृतमिति ॥ २८३ ॥

**मूलार्थ**– जो नेसलेल्या वस्त्राची गांठ, व स्तनावरील पदर, मांडी, केश ह्यांस स्पर्श करितो तो व अकाळीं निर्जनस्थळीं संभाषण करितो, किंवा एकासनीं बसलेला तोहि धरावा.

**टीकार्थ**–३ जो परस्त्रीच्या नेसलेल्या वस्त्राची गांठ, व स्तनावरील पदर, मांडी, केशपाश, इत्यादिकांस प्रीतिपूर्वक स्पर्श करितो, तसाच जो एकांतीं किंवा मंडळींत असून

अंधकारांत किंवा अकाळीं संभाषण करितो, व क्रीडेच्या उद्देशानें परस्त्रीसहवर्तमान एका शय्येवर बसतो, तोहि संयोगाविषयीं प्रवृत्त झालेला समजून धरावा.

४ हे ( सदर्हू सांगितलेले ) प्रकार, ज्या पुरुषाविषयीं अशा दोषाची शंका आलेली असेल त्याविषयीं; इतरांकडून[१] असें घडलें असतां दोष नाहीं.

**मनु**– हा सोदा आहे असा पूर्वीं निंदित न केलेला ( साळसूद ) पुरुष जर कांहीं योग्य कारणावरून तिशीं बोलेल तर तो किंचित् देखील अपराधी होत नाहीं.

जो परस्त्रीनें धरिलें असतां क्षमा करितो तोहि धरावा असें तोच सांगतो.

**मनु**–५ जो एकांतीं परस्त्रीला धरितो व स्त्रीनें ( कामबुद्धीनें ) धरिलें असतां रागावत नाहीं ( क्षमा करितो ) असें परस्परांच्या अनुमतानें घडतें तर तें सर्व स्त्रीसंग्रहण म्हटलें आहे.

जो, मी ही सुंदरी पुष्कळदां उपभोगिली अशी श्लाघेनें मंडळींत ख्याति करितो तोहि धरावा असें तोच सांगतो.

**मनु**–६ जो गर्वानें, किंवा मोहानें अथवा श्लाघेसाठीं, बोलेल कीं, हिला मी पूर्वीं उपभोगिलें आहे, तर तेंहि **संग्रहण** म्हटलें आहे. २८३

---

प्रतिषिद्धयोः स्त्रीपुंसयोः पुनः सल्लापादिकरणे दण्डमाह ।

**स्त्री निषेधे शतं दद्याद्विशतं तु दमं पुमान् ।**
**प्रतिषेधे तयोर्दण्डो यथा संग्रहणे तथा ॥ २८४ ॥**

प्रतिषिद्ध्यत इति प्रतिषेधः पतिपित्रादिभिर्येन सह संभाषणादिकं निषिद्धं तत्र प्रवर्तमाना स्त्री शतपणं दण्डं दद्यात्। पुरुषः पुनरेवं निषिद्धे प्रवर्तमानो द्विशतं दद्यात्। द्वयोस्तु स्त्रीपुंसयोः प्रतिषिद्धे प्रवर्तमानयोः संग्रहणे संभोगे वर्णानुसारेण यो दण्डो वक्ष्यते स एव विज्ञेयः । एतच्च चारणादिभार्याव्यतिरेकेण ॥ नैषचारणदारेषु विधिर्नात्मोपजीविषु। सज्जयन्ति हि ते नारीं निगूढाश्चारयन्ति चेति मनुस्मरणात्२८४

शाखा २ री.

जीं स्त्रीपुरुषें निषेधिलें असतां पुनः परस्पर संभाषणादिक करतात त्यांस दंड सांगतो.

**मूलार्थ**– स्त्रीला निषेधिलें असतां प्रवृत्त झाली तर १०० **पण** दंड, पुरुष प्रवृत्त झाला तर २०० **पण** दंड, उभयतांसहि निषेधिलें असतां पुनः प्रवृत्त झालीं तर स्त्रीसंग्रहणीं जो दंड तो येथें घ्यावा.

**टीकार्थ**–१ नवरा पिता वगैरेनीं ह्या पुरुषाशीं तूं संभाषणादिक करूं नको असा ज्या-

---

१ इतरांकडून म्हणजे निश्चयें अव्यभिचारी आहेत त्यांकडून. असें म्हणजे एकांतीं, अकाळीं, संभाषण, एकासनीं बसणें वगैरे दूरचा व्यापार.

निषेध केला असतां पुनः परस्पर संभाषणादि करणारे स्त्रीपुरुषांस दंड.

विषयीं निषेध केला, त्या पुरुषांशीं संभाषणादि करणारी जी स्त्री तिला १०० पण दंड करावा. पुरुषास ( अमुक स्त्रीशीं तूं संभाषणादिक करूं नको असा ) निषेध केला असतां संभाषणादिकाविषयीं प्रवृत्त होतो तर त्याला २०० पण दंड. दोघांसहि निषेधिलें असतां पुनः प्रवृत्त झालीं तर ह्या स्त्रीसंग्रहणप्रकरणीं वर्णभेदेंकरून जो जो दंड पुढें सांगितला आहे तोच येथें जाणावा.

२ हा ( वर सांगितलेला ) दंड नट वगैरेच्या स्त्रिया खेरीज करून इतर स्त्रियांविषयीं जाणावा.

नट वगैरेच्या बायकांशीं संग करणारास दंड नाहीं.

**मनु**– हा दंडविधि नटादिकांच्या स्त्रीयांविषयीं व ज्या स्त्रिया व्यभिचारानें उपजीविका करणाऱ्या त्यांविषयीं नव्हे, कारण, ते ( नटादिक )च आपल्या स्त्रियांस परपुरुषासाठीं सज्ज करितात व गुप्तरूपेंकरून अशा कर्माविषयीं पाठवितात २८४.

---

तदिदानीं संग्रहणे दण्डमाह ॥

**स्वजातावुत्तमो दंड आनुलोम्येन मध्यमः ॥**
**प्रातिलोम्ये वधः पुंसो नार्याः कर्णादिकर्तनम् ॥ २८५ ॥**

चतुर्णामपि वर्णानां बलात्कारेण सजातीयगुप्तपरदाराभिगमने साशीतिपणसहस्रं दण्डनीयः । यदा त्वानुलोम्येन हीनवर्णां स्त्रियमगुप्तामभिगच्छति तदा मध्यमसाहसं दण्डनीयः । यदा पुनः सवर्णामगुप्तामानुलोम्येन गुप्तां वा व्रजति तदा मानवे विशेष उक्तः ॥ सहस्रं ब्राह्मणो दण्ड्यो गुप्तां विप्रां बलाद्व्रजन् । शतानि पञ्च दण्ड्यः स्यादिच्छन्त्या सह संगतः ॥ सहस्रं ब्राह्मणो दण्डं दाप्यो गुप्ते तु ते व्रजन् । शूद्रायां क्षत्रियविशोः सहस्रं तु भवेद्दम इति ॥ एतच्च गुरुसखिभार्याव्यतिरेकेण द्रष्टव्यम् । माता मातृष्वसा श्वश्रूर्मातुलानी पितृष्वसा ॥ पितृव्यसखिशिष्यस्त्री भगिनी तत्सखी स्नुषा ॥ दुहिताचार्यभार्या च सगोत्रा शरणागता । राज्ञी प्रव्रजिता धात्री साध्वी वर्णोत्तमा च या ॥ आसामन्यतमां गच्छन् गुरुतल्पग उच्यते । शिश्नस्योत्कर्तनात्तत्र नान्यो दण्डो विधीयत इति नारदस्मरणात् ॥ प्रातिलोम्ये उत्कृष्टवर्णस्त्रीगमने क्षत्रियादेः पुरुषस्य वधः । एतच्च गुप्ताविषयमन्यत्र तु धनदण्डः ॥ उभावपि हि तावेव ब्राह्मण्या गुप्तया सह । विप्लुतौ शूद्रवद्दण्ड्यौ दग्धव्यौ वा कटाग्निना ॥ ब्राह्मणीं यद्यगुप्तां तु सेवेतां वैश्यपार्थिवौ ॥ वैश्यं पञ्चशतं कुर्यात्क्षत्रियं तु सहस्रिणमिति मनुस्मरणात् ॥ शूद्रस्य पुनरगुप्तामुत्कृष्टवर्णां स्त्रियं व्रजतो लिङ्गच्छेदनसर्वस्वापहारौ । गुप्तां तु व्रजतस्तस्य वधसर्वस्वापहाराविति तेनैवोक्तम् ॥ शूद्रो गुप्तमगुप्तं वा द्वैजातं वर्णमावसन् । अगुप्तैकाङ्गसर्वस्वी गुप्तो सर्वेण हीयत इति ।

नार्याः पुनर्हीनवर्णं व्रजन्त्याः कर्णयोरादिग्रहणान्नासादेश्च कर्तनम् । आनुलोम्ये सवर्णं वा व्रजन्त्या दण्डः कल्प्यः । अयं च वधाद्युपदेशो राज्ञ एव तस्यैव पालनाधिकारान्न द्विजातिमात्रस्य । तस्य ब्राह्मणः परीक्षार्थमपि शस्त्रं नाददीतेति शस्त्रग्रहणनिषेधात् । यदा तु राज्ञो निवेदने कालविलम्बनेन कार्यातिपाताशङ्का तदा स्वयमेव जारादीन् हन्यात् । शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुद्ध्यते ।तथा । नाततायिवधे दोषो हन्तुर्भवति कश्चन । प्रकाशं वाप्रकाशं वा मन्युस्तं मन्युमृच्छतीति शस्त्रग्रहणाभ्यनुज्ञानाच्च ॥ तथा क्षत्रियवैश्ययोरन्योन्यस्त्र्यभिगमने यथाक्रमं सहस्रशतपणात्मकौ दण्डौ वेदितव्यौ । तदाह मनुः । वैश्यश्चेत्क्षत्रियां गुप्तां वैश्यां वा क्षत्रियो व्रजेत् । यो ब्राह्मण्यामगुप्तायां तावुभौ दण्डमर्हत इति ॥ २८९ ॥

शाखा २ री.

आतां व्यभिचाराविषयीं दंड सांगतो.

**मूलार्थ**— स्वजातीविषयीं उत्तमसाहस दंड, अनुलोम जातीविषयीं मध्यमसाहस, आणि प्रतिलोम जातीविषयीं पुरुषाचा वध, व स्त्रीचें कर्णादिक कापावें.

**टीकार्थ**—१ चोंहीं वर्णांमध्येंहि बलात्कारानें सजातीय गरत परस्त्रीशीं संग करणारास १०८० पण दंड करावा.

सजातीय स्त्रीबरोबर जबरी करणारास उत्तमसाहस दंड.

२ आपल्यापेक्षां निकृष्ट वर्णाची व अगुप्त अशा परस्त्रीशीं जो संग करितो त्याला मध्यमसाहस दंड करावा.

सजातीय असून अगुप्त किंवा आपल्यापेक्षां निकृष्ट जातीची असून गरत अशा स्त्रीशीं संग करणाराविषयीं तर मनु विशेष सांगतो.

**मनु**— ३ अगुप्त[१] ब्राह्मणीशीं जर बलात्कारानें ब्राह्मण संग करितो तर त्याला १००० पण दंड करावा. जर तिच्या इच्छेनें संग करितो तर ५०० पण दंड करावा. गरत क्षत्रियेशीं किंवा गरत वैश्यस्त्रीशीं बलात्कारानें संग करणारा ब्राह्मण १००० पण दंडास योग्य होतो. तसाच क्षत्रिय किंवा वैश्य जर गरत शूद्रेशीं बलात्कारानें संग करितो तर त्यालाहि १००० पणच दंड करावा.

आपल्यापेक्षां निकृष्ट जातीच्या स्त्रीशीं संग करणारास मध्यमसाहस दंड.

हें जें दंडविधान सांगितलें तें गुरु, मित्र इत्यादिकांचे भार्येखेरीज इतर स्त्रियांविषयीं जाणावें.

**नारद**— ४ आई, मावशी, सासू, मामी, आत, चुलती, मित्रभार्या, शिष्यस्त्री, बहीण,

---

१ सुबोधिनी— ह्याप्रमाणेंच अगुप्त क्षत्रियेशीं क्षत्रिय, अगुप्त वैश्येशीं वैश्य, अगुप्त शूद्रेशीं शूद्र संग करितो तर हाच दंड.

आई वगैरेशीं संग करणारा जो गुरुतल्पगामी त्याचें शिश्न कापावें.

बहिणीची सखी, सून, कन्या, आचार्यस्त्री, सगोत्र, तशीच जी शरण आली ती, राजपत्नी, प्रव्रजिता, दाई ( उपमाता ), साध्वी आणि उत्तमवर्णाची स्त्री ह्यांतून एखादीजवळ जाणाराहि गुरुतल्पग ह्मटला आहे. त्या गुरुतल्पगामीचें शिश्न कापावें. ह्याशिवाय दुसरा दंड नाहीं.

५ आपल्यापेक्षां उत्कृष्ट वर्णाच्या स्त्रीशीं क्षत्रियादि पुरुष संग करितो तर त्याचा वध करावा. परंतु ती गरत असेल तर. गरत नसल्यास धनदंड करावा.

उत्कृष्ट जातीच्या स्त्रीशीं संग करणाराचा वध करावा.

मनु– जर गुप्त ब्राह्मणी स्त्रीशीं क्षत्रिय ( किंवा ) वैश्य संग करितो तर त्याला शूद्राप्रमाणें दंड करावा ( ह्मणजे वधदंड करावा ), अथवा कटाग्नीनें जाळावें.

मनु– जर वैश्य अथवा क्षत्रिय, अगुप्त अशा ब्राह्मणी स्त्रीशीं व्यभिचार करील तर वैश्यास ५०० व क्षत्रियास १००० पण दंड करावा.

६ आपल्यापेक्षां उत्तम वर्णांतली असून अगुप्त अशा स्त्रीशीं जो शूद्र व्यभिचार करितो त्याचें शिश्न कापून सर्वस्व हरण करावें. गरतीशीं संग करील तर त्याचें सर्वस्व हरण करून वध करावा.

उत्कृष्ट जातीच्या अगुप्त स्त्रीशीं संग करणाऱ्या शूद्राचा लिंगच्छेद करावा. गरतीशीं संग करील तर वध.

मनु– द्विजातीच्या व्यभिचारिणी स्त्रीशीं जर शूद्र संग करील तर त्याचें एकांग ( शिश्न ) कापून सर्वस्वहरण दंड करावा. आणि गुप्त अशा स्त्रीशीं संग करील तर सर्वस्व हरण करून वध करावा.

७ जर स्त्री आपल्यापेक्षां नीच जातीच्या पुरुषाशीं संग करील तर तिचें नाक कान वगैरे कापावें. आपल्यापेक्षां उत्कृष्ट जातीच्याशीं किंवा सजातीयाशीं संग करणाऱ्या स्त्रीला तारतम्यानें दंडयोजना करावी.

निकृष्ट वर्णाच्या पुरुषाशीं संग करणाऱ्या स्त्रीचें कान नाक कापावें.

८ वर सांगितलेला वधादि दंड राजानेंच करावा. कारण, प्रजापालनाविषयीं राजालाच

---

१ दुसरा दंड नाहीं, असें येथें म्हटलें खरें परंतु गुरुतल्पगामीच्या कपाळीं भगाकार डागून, सर्वस्वहरण करून, राष्ट्रांतून हांकून द्यावें, असें सांगितलें आहे तेंही प्राप्त होतें.

सुबोधिनी— २ ह्या वचनांत नुसता वधदंड अथवा कटाग्नीनें दहन असा विशेष सांगितला तो अग्निहोत्र्याची भार्या व गुणवती ब्राह्मणी ह्यांविषयीं जाणावा.

३ क्षत्रिय हा वैश्यापेक्षां उत्कृष्ट व जवळचा असतांहि त्याला अधिक दंड सांगितला, याचें कारण तो प्रजापालनपदास अधिकारी सबब त्याकडून असें कुकर्म न घडावें एतदर्थ.

४ तारतम्य म्हणजे निकृष्ट जातीच्या पुरुषाशीं संग करणाऱ्या स्त्रीला शारीर दंड सांगितल्यावरून अर्थात् आपल्यापेक्षां उत्कृष्ट जातीच्या पुरुषाशीं संग करणारी सगुण व अगुण ह्याच्या तारतम्यानें धनदंड करावा. सजातीयाशीं संग करणारीला तर धिग्दंड करावा.

वधादि दंड करण्याविषयीं अधिकारी राजा.

अधिकार.आहे. केवळ द्विजातिमात्रास अधिकार नाहीं. कारण, “ब्राह्मणांनीं (हें शस्त्र चांगलें किंवा वाईट आहे असी) परीक्षा पहावयास देखील शस्त्र धारण करूं नये,” असा शस्त्रग्रहणाविषयीं ब्राह्मणास निषेध आहे.

जर सरकारास जाहीर करावयास गेलें असतां कालविलंबामुळें इकडे कार्यहानि होईल असी शंका असेल तर आपणच जीरादिकांस मारावें.

सरकारांत कळविण्याची सवड नाहीं तर आपणच धरून मारावें.

**मनु**— जेव्हां धर्माचा नाश होण्याचा समय असेल तशा समयीं द्विजांनीं शस्त्र धारण करावें.

**मनु**— तसेंच प्रसिद्धपणें किंवा गुप्तपणेंहि आततायीचा वध केला असतां मारणारास दोष लागत नाहीं. कारण, ह्याचा राग त्याचे रागाला मारतो. (हा त्याला मारतो असें नाहीं.)

असी शस्त्रधारणाविषयीं द्विजातींस आज्ञा आहे.

९ क्षत्रिय जर वैश्येशीं गमन करितो तर त्याला १००० पण दंड करावा, आणि क्षत्रियेशीं वैश्य संग करितो तर त्याला ५०० पण दंड करावा.

**मनु**— जर गरत क्षत्रियेशीं वैश्य संग करितो तर तो ५०० पण दंडास योग्य होतो. तसाच गरत वैश्येशीं गमन करणारा क्षत्रिय १००० पण दंडास पात्र होतो. २८५

---

पारदार्यप्रसङ्गात् कन्यायामपि दण्डमाह ॥

**अलङ्कृतां हरेत्कन्यामुत्तमं ह्यन्यथाधमम् ।**
**दण्डं दद्यात्सवर्णासु प्रातिलोम्ये वधः स्मृतः ॥ २८६ ॥**

विवाहाभिमुखीभूतामलङ्कृतां सवर्णां कन्यामपहरन्नुत्तमसाहसं दण्डनीयः। तदनभिमुखीं सवर्णां हरन् प्रथमसाहसम्। उत्कृष्टवर्णजां कन्यामपहरतः पुनः क्षत्रियादेर्वध एव ॥ दण्डविधानाचापहर्तृसकाशादाच्छिद्यान्यस्मै देयेति गम्यते ॥२८६॥

परस्त्रीगमनाविषयीं दंड सांगण्याचे प्रसंगसंगतीनें कन्येविषयींहि दंड सांगतो.

**मूलार्थ**— अलंकृत व सजातीय कन्येचें हरण करणारास उत्तमसाहस दंड. अलंकृत नसल्यास प्रथम साहस दंड. आपल्यापेक्षां उत्तम जातीच्या कन्येचें हरण करणाराला वधदंड सांगितला आहे.

**टीकार्थ**—१० विवाहास सिद्ध, सालंकृत व सजातीय अशा कन्येचें हरण करणारास उत्तमसाहस दंड करावा. विवाहास सिद्ध न झालेल्या सजातीय कन्येचें हरण करणारास प्रथमसाहस दंड क-

कन्येचा अपहार करणाराविषयीं दंडयोजना.

रावा. आपल्यापेक्षां उत्तम जातीच्या कन्येचा अभिलाष करणाऱ्या क्षत्रियादिजातीचा वध करावा.

असा दंडाचा प्रकार सांगितल्यावरून हरण करणारापासून कन्या घेऊन दुसऱ्याला द्यावी असा अर्थ सिद्ध होतो. २८६

---

आनुलोम्यापहरणे दण्डमाह ॥

**सकामास्वनुलोमासु न दोषस्त्वन्यथा दमः ।**

**यदि सानुरागां हीनवर्णां कन्यामपहरति तदा दोषाभावान्न दण्डः । अन्यथा त्वनिच्छन्तीमपहरतः प्रथमसाहसो दण्डः ।**

आपल्यापेक्षां निकृष्ट जातीच्या कन्येचा अपहार करणाराविषयीं दंड सांगतो.

मूलार्थ– अनुलोम जातीच्या कन्येचा अभिलाष करणारास दोष ( दंड ) नाहीं, परंतु ती सकाम असेल तर, अन्यथा प्रथमसाहस दंड.

टीकार्थ– ११ जो आपल्यापेक्षां निकृष्टजातीय सकाम अशा कन्येचा अभिलाष करितो तो अपराधी नाहीं, ह्मणून दंडास पात्र नाहीं. परंतु ती कन्या सकाम नसतां तिचें हरण करील तर तो प्रथमसाहस दंडास पात्र होतो.

निकृष्ट जातीच्या सकाम कन्येचें हरण करणारास दंड नाहीं. सकाम नसल्यास प्रथमसाहस दंड.

कन्यादूषणे दण्डमाह ॥

**दूषणे तु करच्छेद उत्तमायां वधस्तथा ॥ २८७ ॥**

**अनुलोमास्वित्यनुवर्तते । यद्यकामां कन्यां बलात्कारेण नखक्षतादिना दूषयति तदा तस्य करश्छेत्तव्यः । यदा पुनस्तामेवाङ्गुलिप्रक्षेपेण योनिक्षतं कुर्वन्दूषयति तदा मनूक्तषट्शतसहितोऽङ्गुलिच्छेदः । अभिषह्य तु यः कन्यां कुर्याद्दर्पेण मानवः । तस्याशु कर्त्ये अङ्गुल्यौ दण्डं चार्हति षट्शतमिति । यदा पुनः सानुरागां पूर्ववद्दूषयति तदापि तेनैव विशेष उक्तः । सकामां दूषयानस्तु नाङ्गुलिच्छेदमर्हति । द्विशतं तु दमं दाप्यः प्रसङ्गविनिवृत्तये इति ॥ यदा तु कन्यैव कन्यां दूषयति विदग्धा वा तत्रापि विशेषस्तेनैवोक्तः । कन्यैव कन्यां या कुर्यात्तस्यास्तु द्विशतो दमः । या तु कन्यां प्रकुर्यात् स्त्री सा सद्यो मौण्ड्यमर्हति ॥ अङ्गुल्योरेव च च्छेदं खरेणोद्वहनं तथेति । कन्यां कुर्यादिति कन्यां योनिक्षतवतीं कुर्यादित्यर्थः । यदा पुनरुत्कृष्टजातीयां कन्यामविशेषात्सकामामकामां वाभिगच्छति तदा हीनस्य क्षत्रियादेर्वध एव । उत्तमां सेवमानस्तु जघन्यो वधमर्हतीति मनुस्मरणात् । यदा सवर्णां सकामामभिगच्छति तदा गोमिथुनं शुल्कं तत्पित्रे दद्यात् यदीच्छति ॥ पितरि तु शुल्कमनिच्छति द-**

ण्डरूपेण तदेव राज्ञे दद्यात् । सवर्णामकामां तु गच्छतो वध एव । यथाह मनुः । शुल्कं दद्यात्सेवमानः समामिच्छेत्पिता यदि । योऽकामां दूषयेत्कन्यां स सद्यो वधमर्हति । सकामां दूषयंस्तुल्यो न वधं प्राप्नुयान्नर इति ॥ २८७ ॥

कन्येला क्षत करणारास दंड सांगतो.

**मूलार्थ**— कन्येला नखक्षतादि करणाराचा हात तोडावा. उत्तमजातीय कन्येविषयीं तसें करील तर वध करावा.

**टीकार्थ**— अनुलोम जातीची कन्या, सकाम नसतां तिला जो बलात्कारानें नखक्षतादिकेंकरून दुखावतो त्याचा हात तोडावा. जर तिच्या योनींत बोटें घालून क्षत करून दुखावतो तर ( खालीं सांगितलेल्या ) मनुवचनांतील ६०० पण दंड करून बोटें तोडावीं.

कन्येला बलात्कारानें क्षत करणाराचा हात तोडावा.

**मनु**— जो पुरुष कामावेशानें बलात्कार करून कन्येला ( योनींत बोटें घालून ) क्षत करितो त्याचीं बोटें ( २ ) तोडावीं, आणि ६०० पण दंड घ्यावा.

जो सकाम कन्येला वर सांगितल्याप्रमाणें दुखावतो त्याविषयीं विशेषहि तोच सांगतो.

**मनु**— सकाम कन्येला ( योनींत बोटें घालून ) दुखावणाराचीं बोटें तोडूं नयेत, तर पुनः त्याचे हातून असें घडूं नये म्हणून २०० पण दंड मात्र करावा.

सकाम कन्येला क्षत करणारास दोनशें पण दंड.

जर कन्याच कन्येला दुखावते किंवा जाणती स्त्री कन्येला दुखावते तर तिजविषयींहि विशेष तोच सांगतो.

**मनु**— १३ कन्याच कन्येला ( योनिक्षत ) करील तर तिला २०० पण दंड करावा. आणि जर जाणती स्त्री ( योनिक्षत ) करिते तर तिचें तत्काळ मुंडन करावें. किंवा तिचीं बोटें तोडावीं. अथवा तिला गाढवावर बसवावें.

१४ जर उत्कृष्ट जातीची कन्या सकाम किंवा कामरहित असो, तिशीं निकृष्ट जातीचा पुरुष संग करील तर त्याचा वध करावा. कारण,

**मनु**— उत्कृष्ट जातीच्या कन्येशीं गमन करणारा पुरुष वधदंडास योग्य होतो.

१५ सजातीय सकाम कन्येशीं संग केला असतां त्यानें कन्येच्या पित्याला दोन गाई शुल्क द्यावें, परंतु जर पिता घेऊं इच्छितो तर. पिता घेत नसल्यास त्याच दोन गाई राजाला दंडरूपेंकरून द्याव्या. सजातीय कामरहित अशा कन्येशीं संग करणाराचा तर वधच करावा.

सजातीय सकाम कन्येला क्षत करणारानें तिच्या पित्याला दोन गाई द्यावा.

**मनु**— सजातीय, सकाम, अशा कन्येशीं संग करणारानें तिच्या पित्याला ( दोन गाई) शुल्क द्यावें, परंतु तो पिता घेऊं इच्छितो तर. जी सकाम नव्हे अशा सजातीय कन्येला बलात्कारानें दूषित करील तर तो तत्काल वधदंडास पात्र होतो. २८७

ती सकाम नसतां तिशीं संग करणाराचा वध करावा.

**शतं स्त्रीदूषणे दद्याद्द्वे तु मिथ्याभिशंसने ।**
**पशून् गच्छन् शतं दाप्यो हीनां स्त्रीं गां च मध्यमम् ॥ २८८ ॥**

किंच । स्त्रीशब्देनात्र प्रकृतत्वात्कन्यावमृश्यते । तस्या यदि कश्चिद्विद्यमानानेवापस्मारराजयक्ष्मादिदीर्घकुत्सितरोगसंसृष्टमैथुनत्वादिदोषान्प्रकाशयेयमकन्येति दूषयत्यसौ शतं दाप्यः । मिथ्याभिशंसने तु पुनरविद्यमानदोषाविष्कारेण दूषणे द्वेशते दापनीयः । गोव्यतिरिक्तपशुगमने तु शतं दाप्यः । यः पुनर्हीनां स्त्रियमन्त्यावसायिनीमविशेषात्सकामामकामां वा गां चाभिगच्छत्यसौ मध्यमसाहसं दण्डनीयः ॥ २८८ ॥

**मूलार्थ**– कन्येच्या वास्तविक दोषाचें उद्घाटन करणारास १०० पण दंड; मिथ्या दोष सांगणारास २०० दंड; पशूंशीं संग करणारासहि १०० पण दंड; आणि हीनजाति स्त्री व गाय, त्यांशीं संग करणारास मध्यमसाहस दंड करावा.

**टीकार्थ**– १६ जो एखाद्या कन्येचे वास्तविक अपस्मार, राजयक्ष्मादिक निंद्य महारोग व पुरुषसंगादि दोष प्रसिद्ध करून ही कन्या अयोग्य आहे असें तिला दूषण ठेवितो त्याला १०० पण दंड करावा. अविद्यमान दोषाचें उद्घाटन करील तर त्याला २०० पण दंड करावा. आणि गाईवांचून इतर पशूंशीं संग करणारापासून १०० (पण) दंड घ्यावा. तसेंच अंत्यजस्त्री सकाम असो किंवा अकाम असो तिशीं संग करणारास व गाईशीं संग करणारास मध्यमसाहस दंड करावा. २८८

(Margin: कन्येला दूषण ठेवणारास व पशूंशीं संग करणारास दंड.)

-

साधारणस्त्रीगमने दण्डमाह ॥

**अवरुद्धासु दासीषु भुजिष्यासु तथैव च ।**
**गम्यास्वपि पुमान्दाप्यः पञ्चाशत्पणिकं दमम् ॥ २८९ ॥**

गच्छन्नित्यनुवर्तते । उक्तलक्षणा वर्णस्त्रियो दास्यस्ता एव स्वामिना शुश्रूषाहानिव्युदासार्थं गृह एव स्थातव्यमित्येवं पुरुषान्तरोपभोगतो निरुद्धाः अवरुद्धाः । पुरुषनियतपरिग्रहाः भुजिष्याः । यदा दास्योऽवरुद्धा भुजिष्या वा भवेयुस्तदा तासु तथा चशब्दाद्वेश्यास्वैरिणीनामपि साधारणस्त्रीणां भुजिष्याणां च ग्रहणम् । तासु च सर्वपुरुषसाधारणतया गम्यास्वपि गच्छन् पञ्चाशत्पणान् दण्डनीयः । परपरिगृहीतत्वेन तासां परदारतुल्यत्वात् । एतच्च स्पष्टमुक्तं नारदेन ॥ स्वैरिण्यब्राह्मणी वेश्या दासी निष्कासनी च या । गम्याः स्युरानुलोम्येन स्त्रियो न प्रतिलोमतः ॥ आस्वेव तु भुजिष्यासु दोषः स्यात्परदारवत् । गम्यास्वपि हि नोपेयास्यत्ताः परपरिग्रहा इति ॥ निष्कासिनी स्वाम्यनवरुद्धा दासी । ननु च स्वैरिण्यादीनां साधारणतया गम्यत्वाभिधानमयुक्तम् । नहि जातितः शास्त्रतो वा काश्चन लोके साधारणाः

स्त्रिय उपलभ्यन्ते । तथाहि । स्वैरिण्यो दास्यश्च तावद्वर्णस्त्रिय एव । स्वैरिणी या पतिं हित्वा सवर्णं कामतः श्रयेत् । वर्णानामानुलोम्येन दास्यं न प्रतिलोमत इति मनुस्मरणात् ॥ न च वर्णस्त्रीणां पत्यौ जीवति मृते वा पुरुषान्तरोपभोगो घटते । दुःशीलः कामवृत्तो वा गुणैर्वा परिवर्जितः । परिचर्यः स्त्रिया साध्व्या सततं देववत्पतिः ॥ कामं तु क्षपयेद्देहं पुष्पमूलफलैः शुभैः ॥ न तु नामापि गृह्णीयात् पत्यौ प्रेते परस्यत्विति निषेधस्मरणात् ॥ नापि कन्यावस्थायाः साधारणत्वम् पित्रादिपरिरक्षितायाः कन्याया एव दानोपदेशात् । दात्रभावेऽपि तथाविधाया एव स्वयंवरोपदेशात् । नच दासीभावात् स्वधर्माधिकारच्युतिः ।पारतन्त्र्यं हि दास्यं न स्वधर्मपरित्यागः । नापि वेश्यासाधारणी वर्णानुलोमजव्यतिरेकेण गम्यजात्यन्तरासंभवात् । तदन्तःपातित्वे च पूर्ववदेव गम्यत्वम् । प्रतिलोमजत्वे तु तासां नितरामगम्यत्वम् । अतः पुरुषान्तरोपभोगे तासां निन्दितकर्माभ्यासेन पातित्यात् । पतितसंसर्गस्य निषिद्धत्वाच्च न सकलपुरुषोपभोगयोग्यत्वम् । सत्यमेवम् । किंत्वत्र स्वैरिण्याद्युपभोगे पित्रादिरक्षकराजदण्डभयादिदृष्टदोषाभावाद्गम्यत्ववाचो युक्तिः । दण्डाभावश्चावरुद्धासु दासीष्विति नियतपुरुषपरिग्रहोपाधितो दण्डविधानात्तदुपाधिरहितास्वर्थादवगम्यते । स्वैरिण्यादीनां पुनर्दण्डाभावो विधानाभावात् ॥ कन्यां भजन्तीमुत्कृष्टं न किंचिदपि दापयेदिति लिङ्गनिदर्शनाच्चावगम्यते । प्रायश्चित्तं तु स्वधर्मस्खलननिमित्तं गम्यानां गन्तॄणां चाविशेषाद्भवत्येव । यत्पुनर्वेश्यानां जात्यन्तरासंभवे न वर्णान्तःपातित्वमनुमानादुक्तम् । वेश्या वर्णानुलोमाद्यन्तःपातिन्यो मनुष्यजात्याश्रयत्वात् ब्राह्मणादिवदिति । तन्न । तत्र कुण्डगोलकादिभिरनैकान्तिकत्वात् । अतो वेश्याख्या काचिज्जातिरनादिर्वेश्यायामुत्कृष्टजातेः समानजातेर्वा पुरुषादुत्पन्ना पुरुषसंभोगवृत्तिर्वेश्येति ब्राह्मण्यादिवल्लोकप्रसिद्धबलादभ्युपगमनीयम् । न च निर्मूलेयं प्रसिद्धिः । स्मर्यते हि स्कन्दपुराणे । पञ्चचूडा नाम काश्चनाप्सरसस्तत्सन्ततिर्वेश्याख्या पञ्चमी जातिरिति । अतस्तासां नियतपुरुषपरिणयनविधिविधुरतया समानोत्कृष्टजातिपुरुषाभिगमनेनादृष्टदोषो नापि दण्डस्तासु चानवरुद्धासु गच्छतां पुरुषाणां यद्यपि न दण्डस्तथाप्यदृष्टदोषोऽस्त्येव । स्वदारनियतः सदेति नियमात् । पशुवेश्याभिगमने प्राजापत्यं विधीयत इति प्रायश्चित्तस्मरणाच्चेति निरवद्यम् ॥ २८९ ॥

## शाखा ४ थी.

### साधारण स्त्रीशीं संग करणारास दंड सांगतो.

**मूलार्थ-** अवरुद्धा, दासी, भुजिष्या, तशाच ( वेश्या ) ह्या संगयोग्य असल्या तरी पुरुषास ५० पणं दंड करावाच.

**टीकार्थ-** १ दासी, म्हणजे अभ्युपेत्याशुश्रूषाप्रकरणीं सांगितलेले जे दासाचे प्रकार त्याच प्रकारानीं युक्त ज्या स्त्रिया त्या. दासी आपआपल्या जातीच्या किंवा आपल्यापेक्षां निकृष्ट जातीच्या होतात.

साधारण स्त्रीने स्वरूप व त्यांशीं संग करणारास दंड.

२ **अवरुद्धा** म्हणजे ह्या दासीच, धन्यानें आपल्या सेवेंत अंतर न पडावें म्हणून त्यांस घरींच राहावें अशी आज्ञा करून परपुरुषापाशीं उपभोगाची बंदी करून घरांत ठेवलेल्या त्या.

३ **भुजिष्या** म्हणजे जी एका पुरुषानें अंकित करून ठेवलेली स्त्री ती.

४ जर दासीच अवरुद्धा किंवा भुजिष्या होतात, तर त्यांशीं संग करणारापासून, तसेंच पुरुषमात्रास संग करावयास योग्य अशा स्वैरिणी व वेश्या ह्या स्त्रिया भुजिष्या होतात तर अशांशीं संग करणारापासून ५० पण दंड घ्यावा. कारण, त्या, परपुरुषानें अंकित करून ठेविल्यामुळें परस्त्रीसमानच आहेत.

दुसऱ्यानें ठेवलेल्या स्त्रीशीं संग करणारास ५० पण दंड.

**नारद**– अब्राह्मणी[१] अशी स्वैरिणी, वेश्या, दासी व जी निष्कासिनी, ह्या स्त्रियां स्वजातीच्या किंवा आपल्यापेक्षां निकृष्ट जातीच्या असल्यास संग करावयास योग्य होतात. आपल्यापेक्षां उत्कृष्टजातीच्या स्त्रियांशीं संग करूं नये. परंतु ह्याच (म्हणजे स्वैरिणी, वेश्या दासी, आणि निष्कासिनी) भुजिष्या आहेत तर ह्यांशीं संग करणारास परस्त्रीगमनाचा दोष लागतो. कारण, त्या संग करावयास योग्य असल्या तरी त्या दुसऱ्यानें अंकित करून ठेविल्यामुळें परस्त्रीसमानच आहेत. निष्कासिनी म्हणजे स्वामीनें प्रतिबंध न केलेली दासी.

५ शंका–वर सांगितलेल्या **स्वैरिणी** इत्यादिक स्त्रिया सर्व साधारण्येंकरून संग करावयाजोग्या होत, असें सांगणें सयुक्त नव्हे, कारण, जातिधर्मानें, किंवा शास्त्रप्रमाणानें, सर्व पुरुषांस संभोगाचें पात्र अशा स्त्रिया लोकांत उपलभ्यमान नाहींत. तो प्रकार असा;–

**याज्ञवल्क्य**– **स्वैरिणी** ह्मणजे जी नवऱ्याला सोडून स्वेच्छेनें सजातीय परपुरुषाचा आश्रय करिते ती स्त्री.

**याज्ञवल्क्य**– निकृष्ट जातीनें आपणापेक्षां उत्कृष्ट जातीचें (किंवा समान जातीचें) दास्य करावें, उत्कृष्टानें निकृष्टाचें दास्य करूं नये.

असें आहे ह्मणून **स्वैरिणी**, दासी ह्या तर आपल्या जातीच्या (किंवा उत्कृष्ट जातीच्या) स्त्रिया होतात.

**स्मृति**– नवरा दुःशील, विषयी, किंवा गुणहीन कसाहि असो, पतिव्रता स्त्रीनें तो देवाप्रमाणें पूज्य मानावा.

**मनु**– पति मृत झाल्यानंतर (स्त्रीनें) अनिषिद्ध अशीं फुलें, मुळें, फळें भक्षण करून आपला देह क्षीण करावा; परपुरुषाचें नांव देखील घेऊं नये.

असा निषेध सांगितला आहे म्हणून त्या त्या **वर्णाच्या** (किंवा जातीच्या) स्त्रियांस पति जिवंत असतां किंवा मृत झाल्यावरहि परपुरुषाशीं संभोगक्रियेची उंपपत्ति होत नाहीं.

६ स्त्री, कन्यावस्थेंतहि सर्व पुरुषांच्या संभोगाचें पात्र होत नाहीं, कारण, मातापिता

१ अब्राह्मणी शब्देंकरून क्षत्रियादिक व अनुलोम यांचाहि संग्रह होतो.

इत्यादिकांनीं संरक्षण केलेल्या कन्येचेंच दान करावें असें सांगितलें आहे. दान करणारा कोणी नसेल तरी तसल्याच कन्येचा स्वयंवर करावा, अशी शास्त्राज्ञा आहे.

७ दासीभावामुळें स्वधर्माधिकार भ्रष्ट होतो असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण, दास्य म्हणजे पराधीनपणा मात्र आहे, स्वधर्माचा परित्याग नाहीं.

८ वेश्या ही सर्व पुरुष साधारण्येंकरून संभोगाचें पात्र आहे असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण, ब्राह्मणादि **वर्णा**वांचून व **अनुलोम** जातीवांचून सर्व साधारण पुरुषांस संभोग करावयाजोगी अशा निराळे जातीचा मुळींच संभव नाहीं. ब्राह्मणादि **वर्णांत** किंवा **अनुलोम** जातींत अंतर्भाव म्हणावा तर वर सांगितल्याप्रमाणें ती ( स्वैरिणी अगर दासी असल्यास त्या त्या पुरुषाचे स्वाधीन असल्यामुळें ) सर्व पुरुषांचें संभोगपात्र होत नाहीं. **प्रतिलोम** जातीची म्हणावी तर ती अगदींच अगम्य आहे.

९ असें आहे म्हणून कोणत्याहि **वर्णा**च्या किंवा जातीच्या स्त्रीला नवऱ्यावांचून ( स्वैरिणी असल्यास नियत पुरुषावांचून ) परपुरुषाशीं संभोग निषिद्ध आहे, अतएव निषिद्ध कर्माचरणानें त्या पतित होतात, आणि पतितांचा संसर्ग तर अगदीं निषिद्ध आहे, याकरितां त्या सर्व पुरुषांचें संभोग पात्र होत नाहींत.

१० **समाधान**— खरें, परंतु जसें परस्त्रीशीं संग केला असतां माता, पिता, नवरा इत्यादिकांकडून मारण्याचें व राजदंडाचें दृष्टभय आहे, तसें स्वैरिणी, वेश्या ह्यांच्या उपभोगाविषयीं नाहीं, अतएव त्या सर्वांस संभोगयोग्य होत, असें ह्मणणें सुयुक्त आहे.

११ "**अवरुद्धा, भुजिष्या** इत्यादि स्त्रिया पुरुषविशेषानें अंकित केल्यामुळें त्यांशीं संभोग करणारास ५० **पण** दंड" असें ( ४ थ्या अंकांत ) सांगितल्यावरून ज्या पुरुषविशेषाच्या अंकित नाहींत अशा **स्वैरिणी**, वेश्या ह्यांशीं संभोग करणारास दंड नाहीं हें अर्थसिद्ध होतें.

१२ ( पुरुषास दंड नाहीं तर नसो ) **स्वैरिण्यादि** स्त्रियांसहि दंड नाहीं, कारण, स्त्रियांस दंड करावा, असा ( शास्त्रांत ) विधि नाहीं, आणि "उत्कृष्टजातीय पुरुषाशीं संग करणाऱ्या कन्येपासून कांहींच दंड घेऊं नये" असा दंडनिषेध सांगितला आहे.

स्वधर्मस्खलननिमित्त प्रायश्चित्त तर **स्वैरिणी**, वेश्या ह्यांस व त्यांशीं संभोग करणारास समानच ( सारखेंच ) आहे.

१३ वेश्येचा अंतर्भाव **वर्णांत** किंवा **अनुलोम**जातींत होतो, कारण, ती मनुष्य जातीची आहे. जसे ब्राह्मणादिक, तशी वेश्या अशा **अनुमान प्रमाणें**करून वेश्येचा **वर्णांत** अंतर्भाव कोणी सांगितला आहे, परंतु हें अनुमान बरोबर होत नाहीं, कारण, कुंडगोलकादिकांवर व्यभिचाराचा दोष येतो, तो असा कीं, जसा वेश्येला जात्यंतर नसतां मनुष्य जातीची, ह्या हेतूवरून तिचा **वर्णांत** किंवा **अनुलोम** जातींत अंतर्भाव होतो, तसा कुंडगोलक ह्यासहि जात्यंतर संभवत नसतां मनुष्य जातीचे आहेत, या कारणावरून त्यांचाहि **वर्णांत** व **अनुलोम**जातींत अंतर्भाव होऊं लागेल.

वेश्येचे लक्षण.

त्याचा तर आचाराध्यायांत निषेध केला आहे. यास्तव वेश्या ही कोणी एक निराळी अनादिसिद्ध जाति आहे. वेश्या ह्मणजे जी वेश्येचे ठायीं आपल्यापेक्षां उत्कृष्ट जातीच्या किंवा स्वजातीच्या पुरुषापासून उत्पन्न झालेली असून पुरुषसंभोगच जिची उपजीविका अशी स्त्री, ब्राह्मण इत्यादिकांप्रमाणें लोकप्रसिद्धीवरून जाणावी, व लोकप्रसिद्धि निर्मूलहि नाहीं. कारण, स्कंदपुराणांत सांगितलें आहे कीं, "पंचचूडा नामें कोणी अप्सरा होत्या, त्यांची संतति ही वेश्यासंज्ञक पांचवी जातच" होय, यास्तव त्या वेश्यांस नियतपुरुषांशीं विवाहसंस्काराचा मुळींच असंभव आहे, ह्मणून त्यांनीं समान किंवा उत्कृष्ट जातीच्या पुरुषाशीं संभोग केला असतां त्या स्त्रियांस पाप नाहीं, व राजदंडहि नाहीं, परंतु अशा स्त्रियांशीं संग करणारास जरी राजदंड नाहीं तथापि पातक आहेच. "कारण, सर्वकाळ स्वस्त्रीशींच रत असावें," असा नियम सांगितला आहे. दुसरें असें कीं, "पशु व वेश्या ह्यांशीं संग केला असतां प्राजापत्य करावें," असें प्रायश्चित्तहि सांगितलें आहे. ह्याप्रमाणें सर्व निर्दोष जाणावें. २८९

---

अवरुद्धासु दासीष्विसनेन दासीस्वैरिण्यादिभुजिष्याभिगमने दण्डं विदधत स्तास्वभुजिष्यासु दण्डो नास्तीत्यर्थादुक्तं तदपवादमाह ॥

**प्रसह्य दास्यभिगमे दण्डो दशपणः स्मृतः ।**
**बहूनां यद्यकामाऽसौ चतुर्विंशतिकः पृथक् ॥ २९० ॥**

पुरुषसंभोगजीविकासु दासीस्वैरिण्यादिषु शुल्कदानविरहेण प्रसह्य बलात्कारेणाभिगच्छतो दशपणो दण्डः । यदि बहव एकामनिच्छन्तीमपि बलात्कारेणाभिगच्छन्ति तर्हि प्रत्येकं चतुर्विंशतिपणपरिमितं दण्डं दण्डनीयाः । यदा पुनस्तदिच्छया भाटिं दत्वा पश्चादनिच्छन्तीमपि बलाद्व्रजन्ति तदा तेषामदोषः। यदि व्याध्याद्यभिभवस्तस्या न स्यात् । व्याधिता सश्रमा व्यग्रा राजकर्मपरायणा । आमन्त्रिता चेन्नागच्छेददण्ड्या वडवा स्मृतेति नारदवचनात् ॥ २९० ॥

शाखा ५ वी.

( ४ थ्या शाखेच्या ४ थ्या अंकांत ) अवरुद्धा, दासी इत्यादिक स्त्रियांच्या संभोगाविषयीं दंड सांगितल्यावरून स्वतंत्र स्त्रियांविषयीं दंड नाहीं हें अर्थसिद्ध झालें त्याचा अपवाद सांगतो.

**मूलार्थ**— बलात्कारानें दासीशीं संभोग करणारास १० **पण** दंड, व बहुत मिळून एकीशीं बलात्कारानें उपभोग करितील तर प्रत्येकास २४ **पण** दंड सांगितला आहे.

**टीकार्थ**— १ पुरुषसंभोगेंकरून उपजीविका करणाऱ्या दासी, स्वैरिणी इत्यादिकांशीं

मोल न देतां बलात्कारानें संग करणारास १० पण दंड.

जो मोल न देतां बलात्कारानें संभोग करितो त्याला १० **पण** दंड करावा.

२ जर बहुत मिळून एकीशीं व तिची इच्छा नसतां बलात्कारानें संभोग करितात तर प्रत्येकास २४ पण दंड करावा.

बहुत मिळून बलात्कारानें संग करणारास २४ पण दंड.

जर तिच्या इच्छेप्रमाणें मोल दिलें, नंतर ती संभोग करूं देत नाहीं ह्मणून बलात्कारानें संभोग करितात तर त्यांजकडे दोष नाहीं, परंतु जर तिला कांहीं व्याधि वगैरे उपद्रव नसेल तर. कारण,

**नारद**– व्याधित, श्रमलेली, व्यग्रचित्त, राजकार्याविषयीं तत्पर असी दासी (संभोगार्थ) बोलाविली असतां ती येणार नाहीं तर तिला दंड नाहीं. २९०

व्याधित असल्यामुळें संभोगार्थ न आल्यास दंड नाही.

**गृहीतवेतना वेश्या नेच्छन्ती द्विगुणं वहेत् ।**
**अगृहीते समं दाप्यः पुमानप्येवमेव च ॥ २९१ ॥**

यदा शुल्कं गृहीत्वा स्वस्थापि नेच्छति तदा शुल्कं द्विगुणं दद्यात् । तथा शुल्कं दत्वा स्वयमनिच्छतः स्वस्थस्य पुंसः शुल्कहानिरेव । शुल्कं गृहीत्वा पण्यस्त्री नेच्छन्ती द्विगुणं वहेत् । अनिच्छन्दत्तशुल्कोऽपि शुल्कहानिमवाप्नुयादिति तेनैवोक्तम् । तथान्योपि विशेषस्तेनैव दर्शितः । अप्रयच्छंस्तथा शुल्कमनुभूय पुमान् स्त्रियम् । आक्रमेण च संगच्छन् तथा दन्तनखादिभिः ॥ अयोनौ वाभिगच्छेद्यो बहुभिर्वापि वासयेत् । शुल्कमष्टगुणं दाप्यो विनयं तावदेव तु ॥ वेश्या प्रधाना यास्तत्र कामुकास्तद्गृहोषिताः । तत्समुत्थेषु कार्येषु निर्णयं संशये विदुरिति ॥ २९१ ॥

**मूलार्थ**– मोल घेऊन वेश्या संग करूं इच्छीत नाहीं, तर (मोल) दुप्पट परत देववावें. करार मात्र झाला असल्यास करार केलेलें मोल परत देववावें. पुरुषाविषयींहि असाच न्याय.

**टीकार्थ**–१ जर वेश्या मोल घेऊन निरोगी असतांहि त्याशीं संभोग करूं इच्छीत नाहीं, तर घेतलेल्या मोलाचें दुप्पट द्रव्य त्याला द्यावें. तसेंच, द्रव्य दिलें परंतु करार झाला आणि संग करूं इच्छीत नाहीं, तर तिजकडून करार केलेलें (द्रव्य) परत देववावें. करार करून हा तिशीं संग करीत नाहीं तर ह्याजकडून करार केलेलें देववावें. ह्यानें मोल दिलें आणि संग करावयास न इच्छील तर मोल परत मिळणार नाहीं.

मोल घेऊन संग करूं इच्छित नाहीं तर तिला दुप्पट दंड.

**नारद**– वेश्या द्रव्य घेऊन त्याशीं संग करूं इच्छीत नाहीं तर तिनें दुप्पट परत द्यावें. मोल दिल्यावर पुरुषच तिशीं संग करूं इच्छीत नाहीं तर दिलेलें मोल त्याला परत मिळणार नाहीं.

तसाच अणखीहि विशेष तोच सांगतो.

**नारद**– वेश्येशीं संभोग करून मोल देत नाहीं, किंवा लोकक्रम सोडून पाद, दंत,

संभोग करून मोल देत नाहीं, किंवा बहुतांकडून संभोग करवितो तर आठपट दंड.

नख, इत्यादिकेंकरून संग करितो तर, अथवा जो योनीवांचून इतर इंद्रियांत ( मुखांत ) वगैरे रतिसुख करितो, तसाच बहुतांकडून संभोग करवितो तर त्या प्रत्येकाकडून कबूल केलेल्या मोलाच्या आठपट तिला मोल देववावें, आणि तितकाच राजदंड घ्यावा, व वेश्यांच्या घरांत कांहींएक वाद उपस्थित झाला असतां त्या वेश्यांच्या घरांत ज्या मुख्य स्त्रिया ( नायकिणी ) असतील त्यांच्या विचारें निर्णय करावा. २९१

---

**अयोनौ गच्छतो योषां पुरुषं वापि मेहतः ।**
**चतुर्विंशतिको दण्डस्तथा प्रव्रजितागमे ॥ २९२ ॥**

किंच। यस्तु स्वयोषां मुखादावभिगच्छति पुरुषं वाभिमुखो मेहति तथा प्रव्रजितां वा गच्छत्यसौ चतुर्विंशतिपणान्दण्डनीयः ॥ २९२ ॥

मूलार्थ– जो स्त्रीशीं योनिभिन्न इंद्रियांत संग करितो, अथवा पुरुषासम्मुख लघुशंका करितो, तसाच जो प्रव्रजिता स्त्रीशीं संग करितो त्या प्रत्येकास २४ पण दंड करावा.

टीकार्थ– जो स्त्रीचे मुखाचेठायीं रतिसुख अनुभवितो, किंवा पुरुषाच्या सम्मुख लघुशंका करितो, तसाच प्रव्रजिता स्त्रीशीं संग करितो त्या प्रत्येकास २४ पण दंड करावा २९२.

---

**अन्त्याभिगमने त्वंक्यः कुबन्धेन प्रवासयेत् ।**
**शूद्रस्तथान्त्य एव स्यादन्त्यस्यार्यागमे वधः ॥ २९३ ॥**

किंच। अन्त्या चाण्डाली तद्गमने त्रैवर्णिकान्प्रायश्चित्तानभिमुखान् सहस्रं त्वन्त्यजस्त्रियमिति मनुवचनात्पणसहस्रं दण्डयित्वा कुबन्धेन कुत्सितबन्धेन भगाकारेणाङ्कयित्वा स्वराष्ट्रान्निर्वासयेत। प्रायश्चित्ताभिमुखस्य पुनर्दण्डनमेव। शूद्रः पुनश्चाण्डाल्यभिगमेऽन्त्य एव चाण्डाल एव भवति। अंत्यजस्य पुनश्चाण्डालादेरुत्कृष्टजातिस्त्र्यभिगमे वध एव ॥ इति स्त्रीसंग्रहणप्रकरणम् ॥ २९३ ॥

मूलार्थ–चांडालीशीं गमन करणारास भगाकार डागून हद्दपार करावें. शूद्र जर चांडालीप्रत गमन करील तर तो चांडालच होतो, आणि अंत्यजानें आर्यस्त्रीशीं गमन केलें तर त्याचा वध करावा.

---

१ तिसऱ्या शाखेच्या ४ थ्या अंकांतील नारदवचनांत राजपत्नी, प्रव्रजिता, उपमाता असा उपक्रम करून ह्यांतून कोणत्याही स्त्रीजवळ गमन करणारा गुरुतल्पगामी म्हटला आहे. त्या गुरुतल्पगामीचें शिश्न कापावें, ह्याखेरीज दुसरा दंड नाहीं, असें सांगितलें आणि एथें ( याज्ञवल्क्यवचनांत ) तर प्रव्रजिता स्त्रीगमनाविषयीं २४ पण दंड सांगितला, यावरून स्मृतींचा परस्पर विरोध येतो, त्याचा परिहार असा,— अत्यंत सदाचारसंपन्न प्रव्रजिता स्त्रीगमनाविषयीं व तिचेठायीं वारंवार गमन केलें असल्यास नारदवचन, एतद्विपरीत प्रव्रजिताविषयक याज्ञवल्क्यवचन असें समजावें. सुबोधिनी.

टीकार्थ– ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, हे चांडालीशीं संग करून जर प्रायश्चित्त न घेतील तर " अंत्यज स्त्रीशीं गमन करणारास १००० पण दंड " अशा अर्थाचें मनुवचन आहे म्हणून १००० पण दंड घेऊन कपाळीं भगाकार डागून आपल्या राष्ट्रांतून त्यास घालवून लावावें.

चांडालीशीं संग करणारास १००० पण दंड.

जर प्रायश्चित्त घेण्यास सिद्ध आहेत तर केवळ ( धन ) दंडच मात्र करावा.

शूद्र जर चांडालीशीं गमन करील तर तोहि चांडालच होतो. चांडालादिक जर उत्कृष्ट जातीच्या स्त्रीशीं जातो तर त्याचा वधच करावा. २९३

चांडाल उत्कृष्टवर्ण स्त्रीशीं जातो तर त्यास वधदंडच.

---

# प्रकीर्णक प्रकरण २५ वें.

व्यवहारप्रकरणमध्ये स्त्रीपुंसयोगाख्यमप्यपरं विवादपदं मनुनारदाभ्यां विहितम् । तत्र नारदः । विवाहादिविधिः स्त्रीणां यत्र पुंसां च कीर्त्यते । स्त्रीपुंसयोगसंज्ञं तद्विवादपदमुच्यत इति ॥ मनुरप्याह । अस्वतन्त्राः स्त्रियः कार्याः पुरुषैः स्वैर्दिवानिशम् । विषयेषु च सज्जन्त्यः संस्थाप्या ह्यात्मनो वश इत्यादि ॥ यद्यपि स्त्रीपुंसयोः परस्परमर्थिप्रत्यर्थितया नृपसमक्षं व्यवहारो निषिद्धस्तथापि प्रत्यक्षेण कर्णपरम्परया वा विदिते तयोः परस्पराभिचारे दण्डादिना दम्पती निजधर्ममार्गे राज्ञा स्थापनीयौ । इतरथा दोषभाग्भवतीति व्यवहारप्रकरणे राजधर्ममध्ये अस्य स्त्रीपुंधर्मजातस्योपदेशः । एतच्च विवादप्रकरण एव सप्रपञ्चं प्रदिपादितमिति योगीश्वरेण न पुनरत्रोक्तम् ॥

## शाखा १ ली.

व्यवहारप्रकरणामध्यें स्त्रीपुंधर्मसंज्ञक अणखी एक व्यवहार मनु नारद यांनीं सांगितला आहे.

नारद–१ जेथें स्त्रियांचा व पुरुषांचा विवाहादि विधि होतो तत्संबंधी जो व्यवहार तो स्त्रीपुरुषसंबंधी व्यवहार म्हटला आहे.

स्त्रीपुरुषांचा व्यवहार.

मनु– पुरुषांनीं स्त्रिया सर्वकाल आपल्या आधीन ठेवाव्या, स्वतंत्र ठेवूं नयेत. आणि गृहकृत्याविषयीं तत्पर व आपणास अनुकूळ राहतील अशा ठेवाव्या.

२ इत्यादिक वचनें सांगितलीं आहेत, जरी स्त्रीपुरुषांचा परस्पर वादीप्रतिवादीपणानें राजाच्या समोर व्यवहार निषेधिला आहे तथापि स्त्रीपुरुषांचा परस्पर व्यभिचार प्रत्यक्ष समजल्यावरून किंवा कर्णोपकर्णी ऐकिल्यावरून राजानें दंडादिकेंकरून तीं स्त्रीपुरुषें आपापल्या धर्ममार्गांत राहात असें करावें. असें न केल्यास राजा दोषी होतो, ह्यास्तव ह्या व्यवहारप्रकरणीं राजधर्मांत स्त्रीपुरुषांचे धर्माचा उपदेश सांगितला, परंतु हा ( स्त्रीपुंधर्म ) विवाहप्रकरणीं ( आचाराध्यायांत ) सविस्तर सांगितला म्हणून याज्ञवल्क्य योगीश्वरानें पुनः येथें सांगितला नाहीं.

स्त्रीपुरुषें आपापल्या मार्गीं राजानें स्थापावीं.

सांप्रतं प्रकीर्णकाख्यं व्यवहारपदं प्रस्तूयते॥ तल्लक्षणं च कथितं नारदेन ॥ प्रकीर्णके पुनर्ज्ञेया व्यवहारा नृपाश्रयाः। राज्ञामाज्ञाप्रतीघातस्तत्कर्मकरणं तथा ॥ पुरःप्रदानं संभेदः प्रकृतीनां तथैव च। पाखण्डिनैगमश्रेणीगणधर्मविपर्ययाः॥ पितापुत्रविवादश्च प्रायश्चित्तव्यतिक्रमः। प्रतिग्रहविलोपश्च कोप आश्रमिणामपि ॥ वर्णसंकरदोषश्च तद्वृत्तिनियमस्तथा ॥ न दृष्टं यच्च पूर्वेषु सर्वं तत्स्यात्प्रकीर्णके इति ॥ प्रकीर्णके विवादपदे ये विवादा राजाज्ञोल्लङ्घनतदाज्ञाकरणादिविषयास्ते नृपसमवायिनः। नृप एव तत्र स्मृत्याचारव्यपेतमार्गे वर्तमानानां प्रतिकूलतामास्थाय व्यवहारनिर्णयं कुर्यात् ॥ एवं च वदता यो नृपाश्रयो व्यवहारस्तत्प्रकीर्णकमित्यर्थाल्लक्षितं भवति ॥

शाखा २ री.

आतां प्रकीर्णक ह्या नांवाचें व्यवहारप्रकरण सांगतो. त्याचें स्वरूप नारद सांगतो.

नारद—१ ह्या प्रकीर्णक व्यवहारीं, जें राजाज्ञेचें उल्लंघन, व राजाप्रमाणें आज्ञा वगैरे चालविणें, व गांव वगैरे देणें, लोकांमध्यें फितूर करणें, पाखंडी, निगमवादी, श्रेणी, हत्यारबंद, ह्यांचा प्रत्येकाचा धर्मविपर्यास, पितापुत्रांचा वाद, प्रायश्चित्ताचा विपर्यास, प्रतिग्रहाचा लोप, ब्रह्मचारी इत्यादिक आश्रमसंपन्नाचा धर्मभ्रंश, तसाच वर्णसंकरदोष, आणि त्या त्या ब्राह्मणादि वर्णांच्या वृत्तींचा नियम व जें पूर्वीं ( ऋणादानादिप्रकरणीं ) सांगितलें नाहीं तें, ह्या सर्व विवादांचा निर्णय केवळ राजानेंच करावा.

प्रकीर्णकसंज्ञक व्यवहारांचें स्वरूप.

ह्याप्रमाणें ज्या व्यवहारांचा केवळ राजानेंच निर्णय केला पाहिजे असे जे व्यवहार ते ह्या प्रकरणांत उक्त आहेत ह्मणून हें प्रकीर्णक असें अर्थात् सिद्ध झालें.

तत्रापराधविशेषेण दण्डविशेषमाह ॥

**ऊनं वाभ्यधिकं वापि लिखेद्यो राजशासनम् ।**
**पारदारिकचौरं वा मुञ्चतो दण्ड उत्तमः ॥ २९४ ॥**

राजदत्तभूमेर्निबन्धस्य वा परिमाणान्न्यूनत्वमाधिक्यं वा प्रकाशयन् राजशासनं यो लिखति यश्च पारदारिकं चौरं वा गृहीत्वा राज्ञेऽनर्पयित्वा मुञ्चति तावुभावुत्तमसाहसं दण्डनीयौ ॥ २९४ ॥

त्या प्रकीर्णकांत अपराधविशेषेंकरून दंडहि निराळे सांगतो.

मूलार्थ—जो राजशासनांत न्यूनाधिक लिहितो, व परदाररत किंवा चोर ह्यांस सोडून देतो, त्याला उत्तमसाहस दंड.

टीकार्थ—२ जो राजानें दिलेलें जें स्थावर किंवा निबंध त्याच्या परिमाणांत कमी

सरकारी पत्रांत कमजास्ती करणारास उत्तम साहस दंड.

जास्ती करून त्या अन्वयें राजशासनांत लिहितो; आणि जो परस्त्रीलंपटाला वं चोराला धरून राजाकडे न पाठवितां सोडून देतो, त्या प्रत्येकास उत्तमसाहस दंड करावा. २९४

प्रसंगान्नृपाश्रयव्यतिरिक्तव्यवहारविषयमपि दण्डमाह ॥

**अभक्ष्येण द्विजं दूष्य दण्ड उत्तमसाहसम् ।**
**मध्यमं क्षत्रियं वैश्यं प्रथमं शूद्रमर्द्धिकम् ॥ २९५ ॥**

मूत्रपुरीषादिना अभक्ष्येण भक्ष्यानर्हेणान्नपानादिमिश्रणेन द्रव्यरूपेण वा ब्राह्मणं दूषयित्वा खादयित्वोत्तमसाहसं दण्ड्यो भवति । क्षत्रियं पुनरेवं दूषयित्वा मध्यमम् । वैश्यं दूषयित्वा प्रथमम् । शूद्रं दूषयित्वा प्रथमसाहसस्यार्द्धं दण्ड्यो भवतीति संबन्धः । लशुनाद्यभक्ष्यदूषणे तु दोषतारतम्याद्दण्डतारतम्यमूहनीयम् ॥ २९५ ॥

खुद्द राजानें निर्णय करावयाजोगे जे व्यवहार त्यांच्या प्रसंगानें दुसरेहि व्यवहारविषय सांगतो.

मूलार्थ–अभक्ष्यपदार्थानें द्विजाला दूषित करणारास उत्तमसाहस दंड; क्षत्रियाला दूषित करणारास मध्यमसाहस; वैश्याविषयीं प्रथमसाहस; आणि शूद्राविषयीं प्रथम साहसाचे निमे दंड करावा.

ब्राह्मणादिकांकडून अभक्ष्य खावविणारास दंड.

टीकार्थ–[१] भक्षणास अयोग्य जें मूत्रपुरीषादिक तें अन्नांत अथवा पाण्यांत मिळवून किंवा स्वरूपेंकरून, ब्राह्मणाकडून खाववितो, त्याला उत्तमसाहस दंड करावा. ह्याप्रमाणें क्षत्रियास खावावितो, तर मध्यमसाहस दंड करावा. तसेंच वैश्याला खावावितो तर प्रथमसाहस दंड करावा. आणि शूद्राकडून खावविणारास त्याच्या ( प्रथमसाहसाच्या ) निमें दंड करावा. लसूण वगैरे अभक्ष्य पदार्थ खावविल्यास दोषतारतम्येंकरून दंड योजावा. २९५

**कूटस्वर्णव्यवहारी विमांसस्य च विक्रयी ।**
**अङ्गहीनस्तु कर्तव्यो दाप्यश्चोत्तमसाहसम् ॥ २९६ ॥**

किंच । रसवेधाद्यापादितवर्णोत्कर्षैः कूटैः स्वर्णैर्व्यवहारशीलो यः स्वर्णकारादिः यश्च विमांसस्य कुत्सितमांसस्य श्वादिसंबन्धस्य विक्रयशीलः मौनिकादिः । चशब्दात्कूटरजतादिव्यवहारी च ते सर्वे प्रत्येकं नासाकर्णकरैस्त्रिभिरङ्गैर्हीनाः कार्याः । चशब्दादङ्गच्छेदेन समुचितमुत्तमसाहसं दण्डं दाप्याः । यत्पुनर्मनुनोक्तम् । सर्व-

[१] तारतम्य ह्मणजे असें, लसूण वगैरे अभक्ष्य पदार्थ भक्षणा जे जे प्रायश्चित्त सांगितलें आहे त्यावरून दोषबाहुल्य जाणून ब्राह्मणादिवर्ण व सगुणनिर्गुणत्वादि तारतम्यानें दंड योजावा.

कण्टकपापिष्ठं हेमकारं तु पार्थिवः ॥ प्रवर्तमानमन्याये च्छेदयेल्लवशः क्षुरैरिति तद्देवब्राह्मणराजस्वर्णविषयम् ॥ २९६ ॥

**मूलार्थ**– खोट्या सोन्यानें व्यवहार करणारा, व निंद्य मांस विकणारा, ह्या प्रत्येकास अंगहीन करून उत्तमसाहस दंड करावा.

**टीकार्थ**–४ निरस सोन्याला पारदसंयोगादिकेंकरून रंग आणून तें सरस सोन्यासारिखें करून तेणेंकरून व्यवहार करणारा जो सोनार वगैरे, व जो कुत्रें वगैरेचें कुत्सित मांस विकणारा खाटिक वगैरे, तसेंच जो खोटें रुपें वगैरे धातूनें व्यवहार करितो, त्या प्रत्येकाचीं नाक, कान, हात, अशीं तीन अंगें तोडावीं, आणि उत्तमसाहस दंड करावा.

सोनें वगैरेंत लबाडी करणारा व कुत्सित मांस वगैरे विकणारा ह्यास दंड.

**मनु**– सर्वांस कंटकरूपी, पापिष्ठ, असा सोनार जर अन्याय कर्माविषयीं प्रवृत्त होतो तर त्याचे सुरीनें तुकडे तुकडे करावे.

असें जें मनुवचन आहे तें देव ब्राह्मण राजा ह्यांच्या सुवर्णाविषयीं जाणावें. २९६

विषयविशेषे दण्डाभावमाह ॥

## चतुष्पादकृतो दोषो नापैहीति प्रजल्पतः ।
## काष्ठलोष्टेषु पाषाणबाहुयुग्यकृतस्तथा ॥ २९७ ॥

चतुष्पादैर्गोगजादिभिः कृतो यो दोषो मनुष्यमारणादिरूपोऽसौ गवादिस्वामिनो न भवति । अपसरेति प्रकर्षेणोच्चैर्भाषमाणस्य । तथा लकुटलोष्टसायकपाषाणोत्क्षेपणेन बाहुना युग्येन च युगं वहताश्वादिना कृतो यः पूर्वोक्तो दोषः सोऽपि काष्ठादीन्प्रास्यतो न भवत्यपसरेति प्रजल्पतः। काष्ठाद्युत्क्षेपणेन हिंसायां दोषाभावकथनं दण्डाभावप्रतिपादनार्थम् । प्रायश्चित्तं पुनरबुद्धिकरणनिमित्तमस्त्येव । काष्ठादिग्रहणं च शक्तितोमरादेरुपलक्षणार्थम् ॥ २९७ ॥

कांहीं एक अपराधाविषयीं दंड नाहीं असें सांगतो.

**मूलार्थ**– चतुष्पादाकडून घडलेला अन्याय धन्याकडे नाहीं. परंतु एकीकडे सरा असें मोठ्यानें बोलत आहे तर. तसाच काठी, ढेंकूळ, तीर, धोंडा फेंकल्यानें जो दोष व बाहु, जुंपलेलें जनावर ह्यांकडून घडलेला दोष त्या मनुष्याकडे नाहीं.

**टीकार्थ**–५ गाय, हत्ती, घोडा, इत्यादिक चतुष्पादांकडून घडलेला जो मनुष्यमारण वगैरे दोष, तो त्या गाई हत्ती वगैरेच्या धन्याकडे नाहीं. परंतु धनी जर "एकीकडे सरा असें" मोठ्यानें ओरडून सांगत आहे तर. तसेंच सोटा, ढेंकूळ ( शक्ति, तोमर), तीर, धोंडा, फेंकण्यानें व बाहूनें व वाहनाला जुंपलेल्या अश्वादिकांकडून, घडलेला जो मनुष्यमारणादिक दोष, तोहि

पशूंकडून खून वगैरे झाल्यास धन्याला दंड नाहीं.

लांकूड वगैरे फेंकणाराकडे ( व अश्वादिक हांकणाराकडे ) नाहीं. परंतु एकीकडे सरा असें ओरडून सांगत आहे तर.

लांकूड वगैरे फेंकण्यानें मनुष्यादिहिंसा घडली असतां फेंकणाराकडे दोष नाहीं, असें जें सांगितलें तें दंड न होण्यासाठीं, परंतु अबुद्धिपूर्वक हिंसादि घडलें ह्मणून तें प्रायश्चित्त तर आहेच. २९७

**छिन्ननस्येन यानेन तथा भग्नयुगादिना ।**
**पश्चाच्चैवापसरता हिंसने स्वाम्यदोषभाक् ॥ २९८ ॥**

किंच । नसि भवा रज्जुर्नस्या छिन्ना शकटादियुक्तबलीवर्दनस्यारज्जुर्यस्मिन् तत् छिन्ननस्यं शकटादि तेन । तथा भग्नयुगेन आदिग्रहणाद्भग्नाक्षचक्रादिना च यानेन पश्चात्पृष्ठतोपसरता चशब्दात्तिर्यगपगच्छता प्रतिमुखं चागच्छता च मनुष्यादिहिंसने स्वामी प्राजको वा दोषभाङ्ग भवति । अतत्प्रयत्नजनितत्वाद्धिंसनस्य । तथाच मनुः । छिन्ननस्ये भग्नयुगे तिर्यक्प्रतिमुखागते । अक्षभङ्गे च यानस्य चक्रभङ्गे तथैवच॥ छेदने चैव यन्त्राणां योक्तृरश्म्योस्तथैव च । आक्रन्दे सत्यपैहीति न दण्डं मनुरब्रवीदिति ॥ २९८ ॥

मूलार्थ– जुंपलेल्या जनावराची वेसण तुटल्यामुळें, तसेंच जूं वगैरे मोडल्यामुळें, व वाहन पाठीमागें सरल्यामुळें हिंसा घडली असतां धनी अपराधी होत नाहीं.

टीकार्थ–६ वाहनास जुंपलेल्या चतुष्पदाची वेसण ( किंवा लगाम ) तुटल्यामुळें, तसेंच जूं, आंस, चाक, मोडल्यामुळें, व पाठीमागें किंवा एकीकडे किंवा समोर होत असतां, जर मनुष्यादिहिंसा घडली तर धन्याकडे किंवा सारथ्याकडे दोष नाहीं. कारण, ती हिंसा बुद्ध्या त्यांनीं केलेली नव्हे.

वाहनास जुंपलेल्या पशूकडून अपराध घडल्यास धन्याला दंड नाहीं.

मनु– वेसण तुटल्यामुळें, जूं मोडल्यामुळें, वाहन तिर्कस किंवा समोर गेल्यामुळें, तसेंच आंस किंवा चाक मोडल्यामुळें व जुंपलेल्या चतुष्पदाच्या मानेवरचें आडवें लांकूड मोडल्यामुळें, व कासरा ( किंवा लगाम ) तुटल्यामुळें आणि पैस व्हा असें ओरडून सांगत असतांहि मनुष्यादिहिंसा घडली तर ( धन्याला किंवा सारथ्याला ) दंड नाहीं, असें मनु सांगता झाला. २९८

उपेक्षायां स्वामिनो दण्डमाह ॥

**शक्तोऽप्यमोक्षयन्स्वामी दंष्ट्रिणां शृङ्गिणां तथा ।**
**प्रथमं साहसं दद्याद्विक्रुष्टे द्विगुणं तथा ॥ २९९ ॥**

अप्रवीणप्राजकप्रेरितैर्दंष्ट्रिभिर्गजादिभिः शृङ्गिभिर्गवादिभिर्वध्यमानं समर्थोपि

स्वामी यद्यमोक्षयन् उपेक्षते तदा अकुशलप्राजकनियोजननिमित्तं प्रथमं साहसं दण्डं दद्यात् । यदा तु मारितोऽहमिति विक्रुष्टेऽपि न मोक्षयति तदा द्विगुणम् । यदा पुनः प्रवीणमेव प्राजकं प्रेरयति तदा प्राजक एव दण्ड्यो न स्वामी। यथाह मनुः। प्राजकश्चेद्भवेदाप्तः प्राजको दण्डमर्हतीति॥ प्राजको यन्ता। आप्तोऽभियुक्तः। प्राणिविशेषाच्च दण्डविशेषः कल्पनीयः। यथाह मनुः। मनुष्यमारणे क्षिप्रं चोरवत्किल्बिषी भवेत्। प्राणभृत्सु महत्स्वर्द्धं गोगजोष्ट्रहयादिषु॥ क्षुद्राणां तु पशूनां तु हिंसायां द्विशतो दमः। पञ्चाशत्तु भवेद्दण्डः शुभेषु मृगपक्षिषु॥ गर्दभाजाविकानां तु दण्डः स्यात्पञ्चमाषकः। माषकस्तु भवेद्दण्डः श्वशूकरनिपातन इति२९९

हयगय केली असतां धन्याला दंड सांगतो.

**मूलार्थ**– जो धनी समर्थ असतांहि दाढांचे जनावरापासून व शृंगींपासून मनुष्यास सोडवीत नाहीं तर त्यापासून **प्रथमसाहस** दंड घ्यावा. ओरडत असतांहि सोडवीत नाहीं तर दुप्पट दंड घ्यावा.

**टीकार्थ**–७ गेरमाहीत हांकणारानें हांकलेलीं दाढांचीं जनावरें ( हत्ती वगैरे), शिंगाचीं जनावरें बैल वगैरे, ह्यांकडून घात पावणाऱ्या मनुष्यादिकांस धनी, त्या घातापासून मुक्त करावयास समर्थ असतांहि उपेक्षा करितो तर गेरमाहीत सारथ्याला त्या कामावर योजिलें यास्तव धन्याला **प्रथमसाहस** दंड करावा.

हयगय केल्यामुळें हिंसा वगैरे घडल्यास धन्याला दंड.

जर अरे मेलों, मारलें, धांवा, असें ओरडत असतांहि सोडवीत नाहीं तर ( प्रथम साहसाच्या ) दुप्पट दंड घ्यावा.

जर माहीतगार सारथ्याच्या हातून वर सांगितल्याप्रमाणें घडेल तर सारथ्यालाच दंड करावा, धन्याला नाहीं. ( प्रमाण )

**मनु**– जर सारथि त्या कामांत प्रवीण आहे, ( आणि त्याच्या हांकण्यानें मनुष्यादिकांस पीडा होईल ) तर सारथीच दंडास योग्य होतो.

प्राणिविशेषेंकरून दंडकल्पना मनु सांगतो.

**मनु**–८ मनुष्यहिंसा घडली असतां हिंसक चोराप्रमाणें दोषी[1] ठरतो. गाय, हत्ती, उंट, घोडे, इत्यादि महापशूंची हिंसा घडली असतां अर्धा[2] दंड करावा. क्षुद्र पशूंची हिंसा घडली असतां २०० ( पण ) दंड करावा. पवित्र असे मृग ( हरण वगैरे), पक्षी ( राघू मोर वगैरे ) ह्यांची हिंसा घडली असतां ५० ( **पण** ) दंड करावा. गाढव, शेळी, मेंढी ह्यांच्या हिंसेनिमित्त ५ **माष** दंड करावा. आणि कुतरें, डुकर, ह्यांच्या हिंसेनिमित्त १ **माष** दंड करावा. २९९

१ दोषी म्हणजे उत्तमसाहस दंडाचे पात्र. २ अर्धा म्हणजे मध्यमसाहस.

जारं चोरेत्यभिवदन् दाप्यः पञ्चशतं दमम् ।
उपजीव्यधनं मुञ्चंस्तदेवाष्टगुणीकृतम् ॥ ३०० ॥

किंच । स्ववंशकलङ्कभयाज्जारं पारदारिकं चौर निर्गच्छेत्यभिवदन् पञ्चशतं पणानां पञ्चशतानि यस्मिन् दमे स तथोक्तस्तं दमं दाप्यः। यः पुनर्जारहस्ताद्धनमुपजीव्य उत्कोचरूपेण गृहीत्वा जारं मुञ्चत्यसौ यावद्गृहीतं तावदष्टगुणीकृतं दण्डं दाप्यः ३००

मूलार्थ– जाराला, चोर, असें बोलणारास ५०० पण दंड, आणि त्यापासून लांच घेऊन सोडून देणारापासून तो आठपट घ्यावा.

टीकार्थ–९ आपल्या कुळाला बट्टा न लागावा म्हणून जारालाच चोरचोर असा हाकाटा करणारास ५०० पण दंड करावा. आणि जो जारापासून लांच घेऊन सोडून देतो तर त्याणें जितका लांच घेतला असेल त्याच्या आठपट दंड द्यावा. ३००

जारपुरुषास चोर असें बोलणारास ५०० पण दंड.

राज्ञोऽनिष्टप्रवक्तारं तस्यैवाक्रोशकारिणम् ।
तन्मन्त्रस्य च भेत्तारं छित्त्वा जिह्वां प्रवासयेत् ॥ ३०१ ॥

किंच । राज्ञोऽनिष्टस्यानभिमतस्यामित्रस्तोत्रादेः प्रकर्षेण भूयोभूयो वक्तारं तस्यैव राज्ञ आक्रोशकारिणं निन्दाकरणशीलं तदीयस्य च मन्त्रस्य स्वराष्ट्रविवृद्धिहेतोः परराष्ट्रापक्षयकरस्य वा भेत्तारं अमित्रकर्णेषु जपन्तं तस्य जिह्वामुत्कृत्य स्वराष्ट्रान्निष्कासयेत् । कोशापहरणादौ पुनर्वध एव । राज्ञः कोशापहर्तॄंश्च प्रतिकूलेषु च स्थितान् । घातयेद्विविधैर्दण्डैररीणां चोपकारकानिति मनुस्मरणात् । विविधैः सर्वस्वापहाराङ्गच्छेदवधरूपैरित्यर्थः ॥ सर्वस्वापहारेऽपि यद्यस्य जीवनोपकरणं तन्नापहर्तव्यम् । चौर्योपकरणं विना । यथाह नारदः ॥ आयुधान्यायुधीयानां वाह्यादीन्वाह्यजीविनाम् । वेश्यास्त्रीणामलङ्कारान् वाद्यतोद्यादि तद्विदाम् ॥ यच्च यस्योपकरणं येन जीवन्ति कारुकाः । सर्वस्वहरणेऽप्येतन्न राजा हर्तुमर्हतीति ॥ ब्राह्मणस्य पुनर्न शारीरो दण्ड इति निषेधाद्वधस्थाने शिरोमुण्डनादिकं कर्तव्यम् । ब्राह्मणस्य वधो मौण्ड्यं पुरान्निर्वासनाङ्कने । ललाटे चाभिशस्ताङ्कः प्रयाणं गर्दभेन त्विति मनुस्मरणात् ॥ ३०१ ॥

मूलार्थ– वारंवार राजाचें अनिष्ट बोलणारा, व त्याचीच निंदा करणारा, व त्याची मसलत उघाडीस आणणारा ह्या प्रत्येकाची जीभ कापून हद्दपार करावें.

टीकार्थ–१० राजास अभिमत नव्हे, अशी त्याच्या शत्रूची स्तुति वारंवार करणाराची, व राजाची निंदा करणाराची, आणि आपल्या राजाची स्वराष्ट्र वाढविण्याविषयीं, व परराष्ट्रपक्षाचा क्षय करण्याविषयीं जी मसलत ती शत्रूंस कळविणाराची, जीभ कापून राष्ट्रांतून हांकून द्यावें.

राजाची निंदा व अनिष्ट करणारास जीभ कापून हद्दपार करावें.

सरकारचा ऐवजांना चोरणारास वधदंड.

११ जो सरकारचा जामदारखाना इत्यादि चोरतो त्याचा वधच करावा.

**मनु**– राजाचें भांडार हरण करणारे, व त्याच्या अनिष्टाविषयीं प्रवृत्त, व शत्रूंशीं फितूर करणारे, अशा पुरुषांचा ( सर्वस्वहरण, अंगच्छेद, वध इत्यादिक ) विविध दंडांनीं घात करावा.

सर्वस्वहरण केलें तरी उपजीविकेच्या साधनाचें हरण करूं नये.

१२ सर्वस्वहरण केलें तरी जें ज्याचें उपजीविकेचें साधन असेल त्याचें हरण करूं नये. परंतु चोरी करण्याच्या साधनाखेरीज.

**नारद**–शिपायांचीं शस्त्रें, पाटाळ, जिन्नस, वगैरेवर उपजीविका करणाराचें तें तें साधन; तसेंच वेश्यांचे अलंकार; वाद्यें वाजविणारांचीं वाद्यें; तसेंच अणखीहि जें ज्याचें उपजीविकेचें साधन असेल तें, व जेणेंकरून शिल्पी उपजीवन करितात तें, जरी राजानें सर्वस्वहरण केलें तरी ह्यांचें ( वर सांगितलेल्यांचें ) हरण करूं नये.

१३ "शारीर दंड ब्राह्मणास नाहीं" असा निषेध सांगितल्यावरून ब्राह्मणास तर वधाबद्दल त्यानें मुंडन करावें ( शिंड काढावी).

**मनु**–ब्राह्मणाचें मुंडन करावें, हाच त्याचा वध. तसेंच गांवांतून हांकून देणें, कपाळीं डाग देणें, आणि गाढवावर बसवून फिरविणें. ३०१

**मृताङ्गलग्नविक्रेतुर्गुरोस्ताडयितुस्तथा ।**
**राजयानासनारोढुर्दण्ड उत्तमसाहसः ॥ ३०२ ॥**

किंच । मृतशरीरसंबन्धिनो वस्त्रपुष्पादेर्विक्रेतुः गुरोः पित्राचार्यादेस्ताडयितुः तथा राजानुमतिं विना तद्यानं गजाश्वादि आसनं सिंहासनादि आरोहतश्चोत्तमसाहसो दण्डः ॥ ३०२ ॥

मूलार्थ–प्रेताच्या अंगावरचें विकणारा, गुरूला ताडन करणारा, तसाच राजाच्या वाहनासनावर बसणारा, ह्या प्रत्येकास उत्तमसाहस दंड करावा.

प्रेतावरचें वस्त्रादिक विकणारास दंड.

टीकार्थ– १४ प्रेतावरचें वस्त्रपुष्पादिक विकणारा, व बाप, आचार्य ह्यांस ताडन करणारा, तसेंच राजाज्ञेवांचून राजाच्या हत्ती घोडा वगैरे वाहनावर व सिंहासनादिकांवर बसणारा, ह्यांस उत्तमसाहस दंड करावा. ३०२

**द्विनेत्रभेदिनो राजद्विष्टादेशकृतस्तथा ।**
**विप्रत्वेन च शूद्रस्य जीवतोऽष्टशतो दमः ॥ ३०३ ॥**

किंच । यः पुनः क्रोधादिना परस्य नेत्रद्वयं भिनत्ति यश्च ज्योतिःशास्त्रवित् गुर्वादिहितेप्सुर्व्यतिरिक्तो राज्ञो द्विष्टमनिष्टं संवत्सरांते तव राज्यच्युतिर्भविष्यतीत्यादिरूपमादेशं करोति तथा यः शूद्रो भोजनार्थं यज्ञोपवीतादिब्राह्मणलिङ्गानि दर्शयति तेषामष्टशतो दमः । अष्टौ पणशतानि यस्मिन्दमे स तथोक्तः । श्राद्धभोजनार्थं पुनः शूद्रस्य विप्रवेषधारिणः तप्तशलाकया यज्ञोपवीतवद्वपुष्यालिखेदिति स्मृत्यन्तरोक्तं द्रष्टव्यम् । वृत्त्यर्थं यज्ञोपवीतादिब्राह्मणलिङ्गधारिणो वध एव । द्विजातिलिङ्गिनः शूद्रान्घातयेदिति स्मरणात् ॥ ३०३ ॥

**मूलार्थ**—जो दोन्ही डोळे फोडितो, व जो राजाच्या अनिष्टाचें भविष्य सांगतो आणि जो ब्राह्मणवृत्तीनें उपजीवन करणारा शूद्र ह्या प्रत्येकास ८०० पण दंड करावा.

**टीकार्थ**—१५ जो क्रोधादिकांच्या आवेशानें दुसऱ्याचे दोन्ही डोळे फोडितो, व इष्ट सांगणारे व ज्योतिःशास्त्रज्ञ असे गुरु आचार्य ह्यांशिवाय जो राजाचें अनिष्ट म्हणजे "अमुक वर्षांत तूं राज्यापासून भ्रष्ट होशील" असा आदेश करितो, तसाच जो शूद्र भोजनार्थ यज्ञोपवीतादिक ब्राह्मणचिन्हें धारण करतो, त्या प्रत्येकास ८०० पण दंड करावा.

दुसऱ्याचे डोळे फोडणारास व राजाचें अनिष्ट भविष्य सांगणारास आठशें पण दंड.

१६ श्राद्धभोजनासाठीं ब्राह्मणवेष घेणाऱ्या शूद्राचे अंगावर तप्तशलाकेनें यज्ञोपवीताकार डागावें; असें स्मृत्यंतरीं सांगितलेलें पहावें. उपजीविकार्थ ब्राह्मणवेष धारण करणाऱ्या शूद्राचा तर वधच करावा. कारण, "द्विजचिन्हें धारण करणारे अशा शूद्रांचा तर घातच करावा." अशी स्मृति आहे. ३०३

ब्राह्मणाचा वेष घेणाऱ्या शूद्राचा वध करावा.

---

रागलोभादिनाऽन्यथाव्यवहारदर्शने दण्डमाह ॥

**दुर्दृष्टांस्तु पुनर्दृष्ट्वा व्यवहारान्नृपेण तु ।**
**सभ्याः सजयिनो दण्ड्या विवादाद्द्विगुणं दमम् ॥३०४॥**

दुर्दृष्टान्स्मृत्याचारप्राप्तधर्मोल्लङ्घनेन रागलोभादिभिरसम्यग्विचारितत्वेनाशंक्यमानान् व्यवहारान्पुनः स्वयं राजा सम्यग्विचार्य निश्चितदोषाः पूर्वसभ्याः सजयिनः प्रत्येकं विवादपदे यो दमः पराजितस्य तद्द्विगुणं दाप्याः । अप्राप्तजेतृदण्डविधिपरत्वाद्वचनस्य रागाल्लोभादित्यादिना श्लोकेनापौनरुक्त्यम् । यदा पुनः साक्षिदोषेण व्यवहारस्य दुर्दृष्टता तदा साक्षिण एव दण्ड्या न जयी नापि सभ्याः । यदा तु राज्ञानुमत्या व्यवहारस्य दुर्दृष्टत्वं तदा सर्व एव राजसहिताः सभ्यादयो दण्डनीयाः । पादो गच्छति कर्तारं पादः साक्षिणमृच्छति । पादः सभासदः सर्वान् पादो राजानमृच्छतीति वचनात् ॥ एतच्च प्रत्येकं राजादीनां दोषप्रतिपादनपरं न पुनरेकैकस्यैव पापापूर्वस्य विभागाय । यथोक्तम् । कर्तृसमवायिफलजननस्वभावत्वादपूर्वस्य ॥ ३०४ ॥

### शाखा ३.

### सभासदांनीं अनुराग, लोभ, इत्यादिकेंकरून निर्णय विपरीत केला असतां दंड सांगतो.

**मूलार्थ**— दुर्लक्ष्यानें निर्णीत केलेले वाद राजानें स्वतां पाहून ज्यानें वाद जिंकला आहे त्यासुद्धां सभासदांस वादपराजयनिमित्त दंडाच्या दुप्पट दंड करावा.

**टीकार्थ**— १ शास्त्रप्रतिपादित व आचारप्राप्त जो धर्म त्याचें उल्लंघन करून पुरी चौकशी न करितां, प्रीतीनें, लोभानें किंवा भयानें **सभासदांनीं** विपरीत निर्णय केलेल्या **व्यवहाराची राजानें स्वतः** चौकशी करून जर त्या **सभासदांवर** खचित दोष लागू होतो तर ज्याच्या तर्फेनें **निर्णय** केला असेल त्यांसुद्धां प्रत्येक सभासदापासून त्या वादांत पराजितास जो दंड केला असेल त्याच्या दुप्पट दंड घ्यावा.

विपरीत व्यवहार पाहणारास दंड.

विपरीत व्यवहारनिर्णय केला असतां सभासदांस दुप्पट दंड, १ त्या प्रकरणांतील ३ऱ्या शाखेच्या ४थ्या अंकांत सांगितला असतां पुनः येथें सांगितल्यानें **पुनरुक्ति** दोष येतो, असें समजूं नये. कारण, तेथें केवळ **सभासदांसच** दुप्पट दंड सांगितला आहे आणि येथें तर ज्याच्या तर्फेनें निर्णय केला असेल त्यासहि **सभासदांबरोबर** दुप्पट दंड करावा इतका विशेष सांगितला आहे.

२ जर साक्षीच्या दोषानें विपरीत **व्यवहार** निर्णय झाला तर त्या साक्षींसच (दुप्पट) दंड करावा. वाद जिंकणारास व **सभासदांस** करूंनये.

साक्षीच्या दोषामुळें विपरीत चौकशी झाल्यास साक्षीस दंड.

जो **सभासदांनीं** विपरीत व्यवहार निर्णय केला तो **राजाच्या** अनुमतानें झाला तर राजानें आपल्यासुद्धां **सभासदादिकांस** दंड करावा.

राजाच्या अनुमतानेंहा चौकशी झालेली बराबर नाहीं तर राजादिकांस दंड.

**स्मृति**—खोटी चौकशी केल्यानिमित्त जो दोष त्याचा एक चतुर्थांश वाद जिंकणाराकडे जातो. व दुसऱ्या चतुर्थांशाचे विभागी साक्षी होतात. तिसऱ्या अंशाचे विभागी **सभासद**, आणि चतुर्थांश राजाकडे जातो.

३ ही वर सांगितलेली स्मृति राजादिक प्रत्येक निरनिराळे दोषी होतात इतकेंच सुचविते. पापाच्या विभागाचे अधिकारी होतात असें नाहीं.

शास्त्रप्रतिपादित जीं **ऐहिक** ( धर्मशास्त्रोक्त राजदंडादिक ), **पारलौकिक** ( नरकपातादिक ) फलें तीं करणारा भोगितो. कारण, करणारापासून फलसंभोगाचें साधन ( अन्यायादिक ) घडतें म्हणून. ३०४

सुबोधिनी १ कारण, एका दोषांतच जर सर्व मिळून विभागी होतील तर प्रत्येकास दुप्पट दंड सांगितला आहे तो संभवणार नाहीं. एका दंडांतच सर्व विभागी होऊं लागतील.

न्यायतो निर्णीतव्यवहारस्य प्रत्यावर्तयितुर्दण्डमाह ॥

**यो मन्येताजितोऽस्मीति न्यायेनापि पराजितः ।**
**तमायान्तं पुनर्जित्वा दापयेद्द्विगुणं दमम् ॥ ३०५ ॥**

यः पुनर्न्यायमार्गेण पराजितोपि औद्धत्यान्नाहं पराजितोस्मीति मन्यते तमायान्तं कूटलेख्याद्युपन्यासेन पुनर्धर्माधिकरणमधितिष्ठन्तं धर्मेण पुनः पराजयं नीत्वा द्विगुणं दण्डं दापयेत् ॥ नारदेनाप्युक्तम् । तीरितं चानुशिष्टं वा यो मन्येत विधर्मतः । द्विगुणं दण्डमास्थाय तत्कार्यं पुनरुद्धरेदिति ॥ तीरितं साक्षिलेख्यादिनिर्णीतमनुद्धृतदण्डम् । अनुशिष्टमुद्धृतदण्डं दण्डपर्यन्तं नीतमिति यावत् ॥ यत्पुनर्मनुवचनम् । तीरितं चानुशिष्टं च यत्र क्वचन विद्यते । कृतं तद्धर्मतो ज्ञेयं न तत्प्राज्ञो निवर्तयेदिति । तदर्थिप्रत्यर्थिनोरन्यतरवचनाद्व्यवहारस्याधर्मतो वृत्तत्वाशङ्कायां पुनर्द्विगुणं दण्डं प्रतिज्ञापूर्वकं व्यवहारं प्रवर्तयेत् । न पुनर्धर्मतो वृत्तत्वनिश्चयेपि राज्ञा लोभादिना प्रवर्तयितव्य इत्येवंपरम् । यत्पुनर्नृपान्तरेणापि न्यायापेतं कार्यं निर्वर्तितं तदपि सम्यक्परीक्षणेन धर्म्ये पथि स्थापनीयम् । न्यायापेतं यदन्येन राज्ञाज्ञानकृतं भवेत् । तदप्यन्यायविहितं पुनर्न्याये निवेशयेदिति स्मरणात् ॥३०५॥

यथान्यायेंकरून निर्णीत केलेला व्यवहार फिरविणारास दंड सांगतो.

**मूलार्थ**— यथान्याय पराजित झाला असतांहि, मी अजित आहें, असें मानून जो पुनः वाद सांगायास येतो त्याला पुनः जिंकून दुप्पट दंड करावा.

**टीकार्थ**— ४ जो यथान्याय निर्णय होऊन पराजय पावला असतांही माझी चौकशी नीट झाली नाहीं, असें दांडगेपणानें समजून खोटे कागद वगैरे साधनांनीं आपला दावा शाबीत करण्यासाठीं न्यायाधीशाकडे येतो, तर न्यायाधीशांनीं यथान्याय त्याचा पुनः पराजय करून त्यापासून दुप्पट दंड घ्यावा.

यथान्याय निर्णीत केलेल्या व्यवहाराबद्दल पुनः फिर्याद करणारास दुप्पट दंड.

**नारद**— विवादाचा साक्षिलेख्यादि साधनांकडून निर्णय करून व त्यांत पराजितास दंड केला असतां यथान्याय निर्णय झाला नाहीं, असें जो मानितो त्याचा विवाद पुनः घेऊन त्यापासून दुप्पट दंड घ्यावा.

**मनु**— साक्षिलेख्यादि यथायोग्य साधनें घेऊन निर्णय केला, व त्या व्यवहारांत पराजितास दंडहि केला. असें असतां ज्या वादांत कांहीं संशय राहिला नाहीं तो यथान्याय निर्णीत झाला असें समजावें. चतुर पुरुषानें तो फिरवूं नये.

असें जें मनुवचन आहे तें वादिप्रतिवादींतून एखाद्याच्या बोलण्यावरून हा व्यवहारनिर्णय अधर्मेंकरूनें झाला, असा संशय उत्पन्न झाल्यास पुनः "मी ह्या वादांत पराजित झालों तर दुप्पट दंड देईन" अशी प्रतिज्ञा करवून व्यवहार चालू करावा, एतदर्थ सांगितलें. केवळ हा व्यवहारनिर्णय यथान्याय झाला असा निश्चय असतांहि राजानें लोभामुळें पुनः तोच व्यवहार चालू करावा एतदर्थ नव्हे.

९ अन्य राजानेंहि जें कार्य न्यायविरुद्ध झालें ह्मणून फिरविलें असेल तेंहि नीट चौकशी करून धर्ममार्गांत राही असें करावें.

विपरीत निर्णय झालेला पुनः सुरळीत करण्याचा प्रकार.

स्मृति- जें दुसऱ्या राजानें जाणून न्यायविरुद्ध केलें असेल तें पुनः न्यायमार्गांत स्थापावें. ३०५

अन्यायगृहीतदण्डधनस्य गतिमाह ॥

**राज्ञाऽन्यायेन यो दण्डो गृहीतो वरुणाय तम् ।**
**निवेद्य दद्याद्विप्रेभ्यः स्वयं त्रिंशद्गुणीकृतम् ॥ ३०६ ॥**

अन्यायेन यो दण्डो राज्ञा लोभाद्गृहीतस्तं त्रिंशद्गुणीकृतं वरुणायेदमिति संकल्प्य ब्राह्मणेभ्यः स्वयं दद्यात् । यस्माद्दण्डरूपेण यावद्गृहीतमन्यायेन तावत्तस्मै प्रतिदेयमितरथापहारदोषप्रसंगात् । अन्यायदण्डग्रहणे पूर्वस्वामिनः स्वत्वविच्छेदाभावाच्चेति ॥ ३०६ ॥

अन्यायानें घेतलेल्या दंडाचे द्रव्याचा विनियोग सांगतो.

मूलार्थ- राजानें अन्यायानें जो दंड घेतला असेल तो स्वतांचे द्रव्यानें तीसपट करून वरुणाला समर्पण करून ब्राह्मणास धर्म करावा.

टीकार्थ-६ राजानें अन्यायमार्गानें ह्मणजे लोभादिकेंकरून जो धनदंड घेतला असेल तो आपल्या पदरच्या द्रव्यानें तीसपट करून " हें वरुणाकारणें असो " असा संकल्प करून ब्राह्मणास द्यावें. आणि ज्यापासून अन्यायानें जितकें धन दंडरूपेंकरून घेतलें असेल तितकें त्याचें परत द्यावें. नाहीं तर अपहारदोषाचा अधिकारी होतो. आणि अन्यायानें घेतलेल्या द्रव्यावर स्वामीचें स्वत्व जाऊन राजाचें स्वत्व उत्पन्न होत नाहीं. ३०६

अन्यायानें घेतलेल्या धनदंडांत तीसपट भर घालून धर्म करावा.

इतिश्रीमत्पद्मनाभभट्टोपाध्यायात्मजस्य श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यविज्ञानेश्वरभट्टारकस्य कृतौ ऋजुमिताक्षराख्यायां याज्ञवल्कीयधर्मशास्त्रविवृतौ द्वितीयोऽध्यायो व्यवहाराख्यः समाप्तिमियात् ।

अथास्मिन्नध्याये प्रकरणानुक्रमणिका कथ्यते । आद्यं व्यवहारमातृकाप्रकरणं१। भुक्तिलक्षणं २ । ऋणादानं ३ । निक्षेपप्रकरणं४। साक्षिलक्षणं५। लेख्यलक्षणम्६। दिव्यस्वरूपकथनं ७ । दायविभागः ८ । सीमाविवादः ९ । स्वामिपालविवादः१०। अस्वामिविक्रयः ११ । दत्ताप्रदानिकं १२। क्रीतानुशयः १३। अभ्युपेत्याशुश्रूषा१४। संविद्व्यतिक्रमः १५ । वेतनादानं १६ । द्यूतसमाह्वयाख्यं १७ । वाक्पारुष्यं १८ । दण्डपारुष्यं १९। साहसं २० । विक्रीयासंप्रदानं २१। संभूयसमुत्थानं २२ । स्तेयप्रकरणं २३ । स्त्रीसंग्रहणं २४। प्रकीर्णकम् २५ ॥ इति पञ्चविंशतिप्रकरणानि ॥

उत्तमोपपदस्येयं शिष्यस्य कृतिरात्मनः। धर्मशास्त्रस्य विवृतिर्विज्ञानेश्वरयोगिनः॥१॥

# कोश.

**अकारित.** व्याजाचा एक प्रकार.
**अकूटशास्त्र.** ज्या शस्त्रांत विषादि कृत्रिमें नाहींत तें.
**अकृत.** साक्षीचा एक भेद आहे.
**अकृतकाल.** अमुक दिवशीं सोडवीन अशी ज्याविषयीं मुदत केली नाहीं असें एक प्रकारचें गहाण.
**अक्रोध.** ज्यास क्रोध नाहीं तो.
**अचिकित्सनीय.** ज्याची चिकित्सा होत नाहीं असा जो व्याधि तो.
**अच्छावाक.** यज्ञांतील एक ऋत्विज.
**अतिदेश.** एका स्थळीं सांगितलेला जो विधि किंवा स्वतःसिद्ध जो अर्थ त्याचें स्थलांतरीं म्हणजे तसेंच येथेंही करावें, जाणावें, इत्यादि जें कथन तो.
**अतिभूरि.** पृष्ठ २५ पहा.
**अंतेवासी.** शिल्पशास्त्र शिकण्यासाठीं गुरूच्या घरीं करार मुदत भरेपर्यंत राहणारा.
**अत्यल्प.** पृष्ठ २५ पहा.
**अदत्त.** जें दिलेलें नव्हे तें.
**अदेय.** द्यावयास योग्य नव्हे तें.
**अदृष्ट.** पुण्य.
**अदृष्टार्थ.** पुण्यासाठीं.
**अदृष्टफल.** पुण्याचें फल, स्वर्गादिप्राप्ति.
**अधनव्यवहार.** शिवीगाळ मारामारी खून इत्यादिक विवाद. ज्यास हल्लीं फौजदारी म्हणतात.
**अधमर्ण.** कर्जदार.
**अधर्मवर्ती.** अधर्मानें वागणारा.
**अधिगंता.** चोरीस गेलेलें किंवा हरवलेलें द्रव्य सांपडून राजा इत्यादिकांपाशीं जो आणून देतो तो.
**अधिगम.** पृष्ठ २२२ पहा.
**अधिवास.** शेजारीं राहणारे जन.
**अधिविन्न.** जिच्यावर दुसरें लग्न केलें जातें ती पहिली स्त्री.
**अध्यग्नि.** एकप्रकारचें स्त्रीधन.
**अध्यात्मशास्त्र.** वेदांतशास्त्र.
**अध्यापन.** पढविणें.
**अध्यावहनिक.** एकप्रकारचें स्त्रीधन आहे.
**अध्याहार.** ज्या पदावांचून ज्या वाक्याची पूर्ति होत नाहीं अतएव त्या वाक्यांत अन्वय लाविते समयीं जीं बाहेरचीं पदें आणितात तो.
**अध्वर्यु.** यज्ञांतील एक ऋत्विज.
**अनवस्था.** पृष्ठ १४४ पहा.
**अनंश.** विभागाविषयीं अनधिकारी.
**अनन्याश्रित द्रव्य.** पृष्ठ १०९ पहा.
**अनागमस्मृतिपरंपरा.** पृष्ठ ७२ पहा.
**अनाथस्त्री.** जिच्याविषयीं सर्वांस दुःख होतें ती.
**अनियुक्त.** पृष्ठ ५ पहा.
**अनुत्तर.** जें चार प्रकारचें उत्तर सांगितलें आहे त्याचा अभाव.
**अनुपलब्ध.** अप्राप्ति.
**अनुलोम.** नीच जातीचे स्त्रीचेठायीं उत्तम जातीचे पुरुषापासून संतति होऊन जी मनुष्यादि जाति होते ती प्रत्येकीं.
**अनुवाद.** स्थलांतरीं सांगितलेला जो विधि किंवा लोकसिद्ध प्रकार त्याचें जें सिद्धवत्कथन तो. उ० जसें चोरीस गेलेलें द्रव्य राजानें ज्याचें त्यास परत देववावें हें लोकप्रसिद्ध आहे त्याचाच शास्त्रानें अनुवाद केला.
**अनुवादक.** अनुवाद करणारा.
**अनुवृत्ति.** अन्वयांत कांहीं एक पदाची किंवा वाक्याची अपूर्ति असल्यामुळें त्या अन्वयाची किंवा वाक्याची पूर्ति होण्यासाठीं ज्या मागील स्मृति इत्यादिकांतून पद किंवा वाक्य घेतलें जातें ती.

**अनुबंध्या.** यज्ञांत वधार्थ यूपाशीं बांधावयास योग्य जी गाय ती. कोठें अनुबंध्या असेंही आहे. त्या पक्षीं वांझ.

**अन्यायवर्ती.** अन्यायानें वागणारा.

**अन्वयव्यतिरेक.** अन्वय म्हणजे कार्यकारणांची नियमेंकरून एकत्र स्थिति• आणि व्यतिरेक म्हणजे कार्याचा अभाव तेथें कारणाचाही नियमेंकरून अभाव राहतो, अशी जी उभय व्याप्ति तो.

**अन्वाधेयक.** एकप्रकारचें स्त्रीधन आहे.

**अन्वाहित.** पृष्ठ १३५ पहा.

**अपन्हव.** ठाऊक असतां नाकबूल जाणें.

**अपवाद.** सामान्यविधीचा विशेषविधीनें जो बाध होतो तो. असें कोणी एकापाशीं ठेव ठेविली असतां ती जशाची तशी परत द्यावी. हें सामान्य, परंतु राजदैवोपद्रवानें नाश पावल्यास परत मिळणार नाहीं हा त्याचा अपवाद केला.

**अपवादक.** बाधक वचन.

**अपविद्ध.** बारा पुत्रांतील बारावा.

**अप्यर्थबोधक.** पृष्ठ ७३ पहा.

**अप्रतिबंध दाय.** खुला दाय.

**अप्रकृत.** एक प्रकारचा उत्तराभास आहे.

**अप्रसिद्ध.** एक प्रकारचा पक्षाभास आहे.

**अप्राप्तव्यवहार.** सोळा वर्षांचे आंत ज्याचें वय तो.

**अप्रामाण्य.** प्रामाण्याचा अभाव.

**अंबष्ठ.** ब्राह्मणापासून विवाहित वैश्येचेठायीं झालेली संतति.

**अभावग्राहक प्रमाण.** अभावाचें ग्राहक म्हणजे दाखविणारें प्रमाण.

**अभियोग.** फिर्याद.

**अभिषेकादिगुणयुक्त.** राज्याभिषेक. आदिशब्देंकरून पट्टबंध छत्र चामर किंवा दुसरीं जीं चिन्हें, त्यांकडून युक्त.

**अभिशाप.** वास्तविक दुर्गुण किंवा दुष्कर्म अंगीं नसतां ह्याचे अंगीं अमुक दुष्कर्म आहे अशी स्फीत होते तो.

**अभिशापित.** अभिशापानें विशिष्ट जो तो.

**अभ्रातृक.** जिला भ्राता नाहीं ती.

**अमात्य.** राजाचे प्रधान.

**अर्जक.** संपादन करणारा.

**अर्थवाद.** स्तावकवाक्य. वाक्याचे स्वार्थीं प्रामाण्य नसतां स्थलांतरीं सांगितलेल्याची प्रशंसा उ० मोठा वैदिकही आततायी आला असतां त्याला मारावेंच. ह्या वाक्याला स्वार्थीं प्रामाण्य नाहीं. म्हणजे वैदिक आततायीस मारावें, मग सामान्य आततायीला मारावें हें सांगायास नको. हें कैमुतिक न्यायेंकरून सिद्ध झालें.

**अर्थशास्त्र.** पृष्ठ ४ पहा.

**अल्पविषय.** ज्या फिर्यादींत फार विषय नाहीं अशी, म्हणजे अगदीं थोडया रकमेची, फिर्याद.

**अवरुद्ध.** इतर पुरुषांशीं संगाची बंदी करून जी संभोगार्थ ठेविली स्त्री ती.

**अवध्य.** वधास योग्य नव्हे तो.

**अवसथ्य.** स्मार्ताग्नि, विवाहाग्नि.

**अविभक्त.** विभक्त झालेला नव्हे तो.

**अविभाज्य.** विभाग करावयाजोगें नव्हे असें धन वगैरे.

**अविभाज्यत्व.** अविभाज्य धनावरचा धर्म. २ अविभागरूप.

**अविवक्षित स्वार्थपर.** आपला वास्तवार्थ सोडून लाक्षणिक अर्थ दाखविणारें जें पद त्याचें विशेषण.

**अविवाहित.** ज्याचा विवाह झाला नाहीं तो किंवा ती.

**अव्यापि.** पृष्ठ २५ पहा.

**अश्रुत.** अविद्वान् किंवा ज्यानें करार केला नाहीं तो.

**असंकीर्ण.** संकीर्ण म्हणजे मिश्रित नव्हे असें उत्तर.

**असपिंड.** आपल्या सपिंडांतला जो नव्हे तो.

**असवर्ण.** ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, असे चार वर्ण आहेत त्यांत आपापल्या वर्णाचा नव्हे तो.

**असंस्कृत.** ज्याचे विवाहादि संस्कार झाले नाहींत तो किंवा ती.

**असंसृष्ट.** विभक्त होऊन पुनः एकवट झालेला

नव्हे तो किंवा तें धन.

**असंसृष्टी**. असंसृष्ट.

**असाध्यरोगग्रस्त**. साध्य व्हावयाजोगा नव्हे अशा रोगानें व्यापलेला.

**असार**. पृष्ठ २६ पं. ५ पहा.

**अस्वामिक**. ज्या द्रव्याला स्वामी नाहीं तें.

**अस्मार्तकाल**. स्मरण रहावयाजोगा नव्हे असा जो काल तो. शंभर वर्षांपुढें.

**अस्मार्तकाल, अस्मार्तकालिक**. शंभर वर्षांपुढें जो भोगवटा तो.

**अज्ञानधन**. ज्यास ज्ञान नाहीं म्हणजे लौकिक व शास्त्रीय व्यवहार माहीत नाहीं त्याचें धन.

**आगम**. सत्ता उत्पन्न होण्याचें साधन जें, खरेदी, वांटा, परिग्रह, ठेव सांपडणें, प्रतिग्रह, विजित, वाढी दिढी वगैरे, सेवा, हे व्यवहार किंवा व्यवहार होऊन झालेलें पत्र तो.

**आगमनिरपेक्ष**. ज्याला आगमाची अपेक्षा नाहीं असा भोगवटा वगैरे.

**आगमविरहित**. आगमावांचून झालेला भोगवटा.

**आगमसंपादक**. आगमाचें संपादन करणारा.

**आगमसापेक्ष**. आगमाची अपेक्षा ज्यास आहे असा भोगवटा वगैरे.

**आचारविरुद्ध**. आचारास जो विरुद्ध तो.

**आचार्य**. उपनयन करून विद्या देणारा. किंवा काहीं एक विधान करण्यासाठीं वरलेला जो तो.

**आततायी**. शस्त्रादि घेऊन वधार्थ उद्युक्त तो.

**आत्मबंधु**. पृष्ठ २९० पं. ५ पहा.

**आधान**. अग्निसिद्ध करणें.

**आश्रम**. ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ, आणि संन्यास असे चार आश्रम आहेत, ते प्रत्येकीं.

**आश्रमांतर**. अन्य आश्रम.

**आश्रमांतरगत**. आश्रमांतरांत गेलेला ह्मणजे संन्यासी, वानप्रस्थ.

**आसिद्ध**. ज्यास•द्वाही घातली आहे तो.

**आसुर. आसुरविवाह**. पृष्ठ २३८ पहा.

**आक्षेप**. निर्भर्त्सना.

**आज्ञांकित**. आज्ञाधारक.

**उद्गाता**. यज्ञांतील एक ऋत्विज.

**उत्तमर्ण**. सावकार.

**उत्तमसाहस**. एक हजार ऐशीं पण, किंवा हजार पण धनदंड, वध, सर्वस्वहरण, गांवांतून हाकून देणें, डाग देणें, अंगछेद, हे दंड उत्तमसाहस म्हटले आहेत. व ह्या शिक्षा मिळायाजोगा जो अपराध तोही उत्तमसाहस.

**उत्तमद्रव्यें**. पृष्ठ ४३० पहा.

**उत्तमांग**. शिर, शिरःकमळ.

**उत्तर**. पृष्ठ २४ पहा.

**उत्तरत्व**. उत्तरावरचा धर्म.

**उत्तरपक्ष**. उत्तर देणाराचा जो पक्ष तो. उत्तरकालीं मीं घेतलें भोगिलें असें प्रतिपादन करण्याचा पक्षही.

**उत्तरवादी**. उत्तर सांगणारा. उत्तरकालीं मीं हें घेतलें, उपभोगलें, असें प्रतिपादन करणारा तोही.

**उत्तराभास**. वस्तुगत्या उत्तर नसतां उत्तरासारिखें भासतें जें वाक्य तें.

**उत्पन्नसंकट**. ज्याला संकट उत्पन्न झालें आहे तो.

**उत्पादक**. उत्पन्न करणारा, जनक.

**उत्पादकत्व**. उत्पादकावरचा धर्म. उत्पादन गुण.

**उद्धत**. शिवधडी, एकप्रकारचे सामंत.

**उद्धार**. काढून ठेवलेला अंश.

**उद्धारक**. हरण केलेलें, किंवा जप्तीस राहिलेलें द्रव्य, हस्तगत करणारा.

**उद्धारविभाग**. सांगितलेला श्रेष्ठादि विभाग.

**उद्भावन**. प्रगट करणें, शाबीत करणें.

**उन्मत्त**. पृष्ठ ८३ पहा.

**उपकारक**. उपकार करणारा.

**उपजीव्य**. उपजीवनोपयोगी वृक्षादिक.

**उपन्यास**. उपपादन.

**उपपातक**. पृष्ठ १४५ पहा.

**उपपादन**. प्रतिपादन.

**उपप्लव**. उपद्रव.

**उपलब्धि**. प्राप्ति.

**उपसंहार**. आकर्षण, संकोच.

**उपस्थ**. गुह्येंद्रिय.

**ऋणमोचित**. दासांतील एक प्रकार.

**ऋतु**. वसंतादिक किंवा स्त्रियांचे रजोदर्शनापासून

सोळा दिवस.
**ऋत्विज.** यज्ञांतील अध्वर्यु, होता, इत्यादिक अधिकारी.
**एकछायाश्रित.** अधमर्णस्थानापन्न जे जामीन ते प्रत्येकीं.
**एकशफ.** एकाखुराचा पशु, घोडा गाढव, खेचर.
**एकार्थवादी.** एका अर्थाविषयीं वाद सांगणार.
**एकार्थविषयक.** पृष्ठ ५२ पं. १८ पहा.
**एकीय.** एकाचें जें मत तें.
**औरस.** बारा पुत्रांतील मुख्य पुत्र.
**कटाग्नि.** कट म्हणजे एक प्रकारचें तृण आहे, तद्विशिष्ट जो अग्नि तो.
**कबंधाकार.** कबंध म्हणजे धड त्याचे आकारासारिखा.
**कर्कशा.** जीविषयीं व्यभिचाराची शंका आहे ती.
**कर्तव्यतासामग्री.** करावयाचें जें कार्य त्याची सामग्री.
**कर्मजन्य.** कर्मापासून झालेलें.
**कर्मकृत.** दाहीचा एक प्रकार.
**काकिणी.** वीस कवडया म्हणजे एक काकिणी, दमडी.
**काणा.** एकाक्ष, एकया डोळयानें अंधळा.
**कानीन.** बारा पुत्रांतील पांचवा.
**काम्यधर्म.** इष्टफलप्राप्तीच्या उद्देशानें केलेला धर्म.
**कायिक.** शरीरेंकरून घडलेला किंवा शरीरसंबंधी जो प्रकार तो.
**कायिक.** व्याजाचा एक प्रकार.
**कारणोत्तर.** पृष्ठ ४० पं. १८ पहा.
**कारित.** व्याजाचा एक प्रकार.
**कार्मिक.** पृष्ठ ३४९ पं. २४ पहा.
**कार्षापण.** तांब्याचा पण, सुमारें पैसा.
**कालकृत.** दाहीचा एक प्रकार. २ अमुक दिवशीं सोडवीन अशी मुदत केलेलें गहाण.
**कालिक.** व्याजाचा एक प्रकार.
**कुंड.** नवरा जिवंत असतां व्यभिचारापासून झालेली संतति.
**कुदृष्टवादी.** माझ्या वादाची न्यायाधीशांनीं चांगली चौकशी केली नाहीं असें बोलणारा.
**कुपित.** कोपानें युक्त.
**कुप्य.** जस्त कथील शिसें इत्यादि.
**कुंभ.** एक धान्य मोजायाचें माप. २० द्रोण म्हणजे एक कुंभ. सुमारें १० पायली.
**कुलपरंपरायात.** वंशांत परंपरेनें प्राप्त जें क्षेत्रादिक तें.
**कूटसाक्षी.** खोटी साक्ष देणारा.
**कूप.** ज्याला पायऱ्या नाहींत असा आड.
**कृत.** साक्षीचा एक प्रकार.
**कृतकाल.** मुदतीचें गहाण, २ दासांतील एक प्रकार.
**कृतकालापनेय, कृतकालोपनेय.** मुदतीचें गहाण.
**कृतान्न.** शिजलेलें अन्न.
**कृत्रिम.** बारा पुत्रांतील नववा पुत्र.
**कृष्णल.** गुंजा.
**कृष्णभौम.** पृष्ठ २३४ पं. ३० पहा.
**केदार.** भात खाचरें, केदार साळी.
**केवलदत्तक.** हा पुत्र तुमचें आमचें श्राद्धादिक करील असा करार नसतां दत्तक दिला जातो तो.
**कैमुतिक न्याय.** "किमुत" असा शब्द ज्या न्यायांत आहे तो उ० मोठा चतुःशास्त्रीही आततायी आला असतां मारावेंच. किमुत सामान्य ब्राह्मणास मारावें. एथें सामान्य ब्राह्मणास मारणें कैमुतिकन्यायेंकरून सिद्ध होतें. ह्यास अर्थवादही म्हणतात.
**कोश.** जामदारखाना. २ एक दिव्य आहे. ज्यांत अपराध्यास त्याच्या आराध्य देवतेचें तीर्थ पाजावें लागतें. त्या दिव्यास कोशपान संज्ञाही आहे. ३ रेशमी किडा. व त्याचें घर.
**कौशेय.** रेशीम, रेशमी वस्त्र.
**क्रतु.** यज्ञ, याग, अदृष्ट.
**क्रमोढा.** ज्या क्रमानें विवाह व्हावयाचा त्या क्रमानें विवाहित जी स्त्री. ती.
**क्रय.** खरीदी.

**क्रिया.** साक्षिलेख्यादिक प्रमाण. पुरावा.

**क्रियोपन्यास.** प्रमाणाचें प्रतिपादन. पुरावा दाखविणें.

**क्रीत.** बारा पुत्रांतील आठवा.

**क्रीत.** खरीद केलेला. २ दासांतील एक भेद आहे.

**क्रोधनिमित्तक व्यवहार.** वर प्रमाणें.

**क्रोधमूलक व्यवहार.** क्रोधानें उत्पन्न झालेला वाद.

**क्लीब.** नपुंसक.

**गण.** नेमलेली मंडळी. खूट. सैनिकांचा गट.

**गणद्रव्य.** मंडळीचें जें समायीक द्रव्य तें.

**गर्भदास.** जो गर्भांत असतां ज्याची आई दासी झाली तो, किंवा दासीपुत्रही.

**गुणप्रधानभाव.** एक मुख्य व दुसरे गौण त्यांचा जो प्रकार तो.

**गुणवान्.** १४७ वे पृष्ठांतले साक्षी.

**गुणी.** गुणवान्.

**गुरु.** जो चौलोपनयनादि क्रिया करून वेदाध्ययन सांगतो तो.

**गुरुतल्पग.** आई वगैरे ह्यांच्याशीं संग करणारा.

**गुरुतल्पगामी.** गुरुतल्पग.

**गुरुतल्पगमन.** आई वगैरे ह्यांच्याशीं संग करणें.

**गुल्म.** पृष्ठ ३९३ पं. २३ पहा.

**गूढ.** साक्षीचा भेद.

**गूढज.** बारा पुत्रांतील चौथा.

**गूढोत्पन्न.** गूढज.

**गृहदास, गृहजात.** घरच्या दासीचे ठायीं झालेला.

**गोप्य.** एक प्रकारचें गहाण. २ भूमींत पुरून रक्षण करावयाजोगें सोनें रुपें इत्यादि धन.

**गोत्रज.** गोत्र म्हणजे वासिष्ठ, काश्यप, इत्यादिक त्यांत जन्मलेले ते.

**ग्रहावेश.** ग्रहपीडा.

**ग्रावस्तुत.** यज्ञांतील एक ऋत्विज आहे.

**ग्राहक.** घेणारा, गिऱ्हाईक.

**चतुष्पाद.** पशु. २ जबानी, उत्तर, पुरावा, आणि निर्णय असे चार आहेत पाय ज्यास असा जो व्यवहार तो.

**चंडाल, चांडाल.** शूद्रापासून ब्राह्मणीचे ठायीं झालेला. महार. अंत्यज.

**चमरी.** वनगाय. वनगाईचे केश. चवरी.

**चरित्र.** एक प्रकारचें गहाण.

**छल.** कपट.

**छलानुसारी.** पृष्ठ ४६ पं. १८ पहा.

**जडधन.** अंतःकरणानें विकल जो त्याचें धन.

**जनकपिता.** ज्यापासून जन्म होतें तो पिता.

**जानपद.** जनपद म्हणजे देश. तत्संबंधी जो लेख इत्यादिक तो.

**तत्सम.** त्याइतका, म्हणजे विवादास्पदीभूत द्रव्याइतका किंवा विवाद पराजयनिमित्त धनदंडाइतका.

**तत्साधक.** त्याचें साधन करणारें जें प्रमाण इत्यादिक तें.

**तर्क.** न्याय, युक्ति.

**त्रैविद्य.** तिहीं वेदांचे किंवा तीन आहेत विद्या ज्यांस ते त्रिविद्य त्यांचा समूह.

**दंडापूपिकान्याय.** पृष्ठ २५६ पं. २० पहा.

**दंड्य.** दंड करावयास योग्य.

**दत्त.** दिलेलें द्रव्य.

**दत्तात्मा.** बारा पुत्रांतील दाहावा. तोच स्वयंदत्त.

**दान.** पृष्ठ ७५ पं. ३१ पासून पहा.

**दासीदान.** दासीचें दान.

**दायप्राप्त.** दासांतील एक प्रकार. पृष्ठ ३५२ पहा.

**दायाद.** वारीस.

**दिगंबर.** पृष्ठ ३६२ पहा.

**दिव्य.** मानुषप्रमाणेंकरून निर्णय व्हावयाजोगा नव्हे, असा जो व्यवहार. त्याचा निर्णय करणारें जें धट, तप्तमाष, इत्यादि प्रमाण तें.

**दुर्बोधविभक्तिसमास.** कष्टेंकरून ज्यांचा बोध होतो अशा ज्या विभक्ति, समास, ते प्रत्येकीं.

**दुर्भिक्षरक्षित.** दासांतील एक भेद.

**दुर्व्यसनी.** व्यभिचार, जुगार, भांग इत्यादि दुर्व्यसन ज्यास आहे तो.

**दुष्प्रतिग्रह.** जो प्रतिग्रह केला असता अधोग-

तीस जातो तो. म्हणजे वैतरणी, शय्या, लोखंड, तेल, म्हैस, इत्यादि निंद्य प्रतिग्रह.

**द्यूतसमाव्हय.** द्यूत म्हणजे जुगार, आणि समाव्हय म्हणजे टोणये, एडके, इत्यादिकांची पैज (लढाया) प्रकरण १६ वें.

**दृष्टदोष.** ज्याचें मिथ्या भाषण वगैरे दोष पाहण्यांत आले तो.

**देय.** द्यावयास योग्य जें द्रव्य. तें.

**देश.** पृष्ठ १८ पं. ९ पहा.

**दैव.** यज्ञांतील ऋत्विजास कन्यादान केलें जातें तो दैवविवाह. २ मनुष्यसाध्य नव्हे असा जो कांहीं आग लागणें, पाण्यानें वाहणें, इत्यादि दैवकृत उपद्रव तो.

**दैविक.** दैव, दैवोपद्रव.

**दोषनिषिद्ध.** दोषामुळें निषेधिलेला.

**दोषोद्भावन.** दोष प्रगट करणें, शाबीत करणें.

**दौहित्र.** कन्येचा पुत्र.

**दौहित्री.** कन्येची कन्या.

**द्रम्म.** सोळा पण, टका, पावला, सुमारें सोळा पैसे.

**द्रोण.** एक धान्य मोजावयाचें माप.

**द्वादशवार्षिक.** बारा वर्षांच्या अवधीचें प्रायश्चित्त इत्यादिक.

**द्विज.** उपनयनाचे अधिकारी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य. २ अर्थविशेषीं केवळ ब्राह्मणच.

**द्विपद.** दासी दास इत्यादिक.

**द्विपितृक.** दोन आहेत बाप ज्यास तो. (द्व्यामुष्यायण) (दत्तक).

**द्व्यामुष्यायण.** एक प्रकारचा पुत्र, दोघाचें पुत्रत्व पावलेला.

**द्व्यामुष्यायण दत्तक.** हा मी तुम्हांस दत्तक देतों, हा तुमचें व माझें पुत्रकार्य करील, असा करार करून दिलेला दत्तक.

**द्वैध.** भेद, मतभेद, विप्रतिपत्ति.

**धनव्यवहार.** ज्या व्यवहारामध्यें देणें घेणें इत्यादि धनसंबंध आहे तो. ज्यास हल्लीं दिवाणी म्हणतात.

**धर्मशास्त्र.** धर्मसंरक्षणपूर्वक राजनीति ज्यांत आहे असें शास्त्र.

**धर्मप्रधान.** धर्मरूप पुरुषार्थाविषयीं तत्पर.

**धर्मध्वात्रेकतीर्थो.** पृष्ठ २९२ पं. ८ पहा.

**धर्मादिकउपाय.** पृष्ठ ९७ पं. १६ पहा.

**धर्म्य.** धर्मास अनुसरलेला, धर्मयोग्य.

**धिग्दंड.** धिक्काररूप जो दंड तो.

**ध्वजाहृत.** युद्धांत जिंकून आणिलेला जो दास केला तो. २ एक प्रकारचें अविभाज्य धन आहे.

**ध्वजिनी.** सैन्याचा प्रकार.

**नाष्टिक.** ज्याचें द्रव्य हरवलें (किंवा चोरीस गेलें) आहे तो.

**निगमवादी.** पृष्ठ ३६१ पहा.

**निगूढार्थ.** एक प्रकारचा उत्तराभास.

**नित्यकर्म.** संध्याहोमादिक.

**निधि.** ठेवा.

**निधिप्राप्ति.** ठेवा सांपडणें.

**निबंध.** वृत्ति, शेटयेपणा, महाजनकी, वगैरे वतन, कर, जकात, दस्त.

**नियतोपायक.** ज्याचे उपाय नियमित केले आहेत असें स्वत्व.

**नियुक्त.** व्यवहार पाहण्याविषयीं वेतन देऊन नेमलेले सभासद. २ ज्यास पुत्रोत्पादनाविषयीं गुरुचा नियोग झाला आहे तो किंवा ती.

**नियोग.** निपुत्रिक विधवेला अपत्योत्पादनार्थ युगांतरीं जी शास्त्राज्ञा सांगितली आहे ती.

**निरग्निक.** ज्यास श्रौताग्नि किंवा स्मार्ताग्नि नाहीं तो.

**निराबाध.** पृष्ठ १९ पं. २ पहा.

**निरिंद्रिय.** ज्यास इंद्रिय नाहीं तो, नकटा अंधळा बहिरा इत्यादिक.

**निरुद्ध.** बंदींत पडलेला. किंवा उत्तमर्णानें कार्यादिनिरोध ज्याचा केला आहे तो.

**निर्ग्रंथ.** नास्तिक. २ आत्मवादी.

**निरर्थक.** पृष्ठ १९ पं. ४ पहा.

**निवर्तन.** क्षेत्राचें एक प्रमाण.

**निवृत्तरमण.** ज्याची प्रजनन शक्ति नष्ट झाली तो.

**निवृत्तरजस्क.** जिचा विटाळ गेला ती स्त्री.

**निवेशन.** वैरण, काडी वगैरे ठेवण्याची जागा.

**निन्हव.** अपन्हव. ठाऊक असतां नाकबूल जाणें.

**निन्हववादी.** खोटें बोलणारा अपन्हववादी.
**निन्हवोत्तर.** खोटें उत्तर.
**निश्चितापराध.** निश्चित असा जो अपराध तो.
**निष्क.** चार सुवर्ण. सुमारें चार तोळे. सोळा द्रम्म म्ह० १६ टके. सुमारें, चार रुपये. हा बहुतकरून होन असावा.
**निष्प्रयोजन.** पृष्ठ १९ पं. ६ पहा.
**निक्षेप.** रूपसंख्यादि दाखवून जें विश्वासानें दुसऱ्यापाशीं द्रव्य ठेविलें जातें तें, ठेव.
**नेष्टा.** यज्ञांतील एक ऋत्विज.
**नैमित्तिककर्म.** ग्रहण, व्यतीपात, अर्धोदय एतत्प्रयुक्त दान, श्राद्ध, इत्यादिक.
**नैधानी.** सीमेचा प्रकार.
**नैष्ठिकब्रह्मचारी.** व्रतबंधापासून ब्रह्मचारी धर्मांतच कालक्रमण करणारा.
**न्याय.** निर्णय, चौकशी, इनसाफ, युक्ति, तर्क; मीमांसेंतील न्याय; देहलीदीपन्याय; काकाक्षिगोलन्याय; इत्यादिक; लोकन्यायही.
**न्यायमूल.** पृष्ठ ५९ पं. २ पहा.
**न्यायाधीश.** न्याय करण्याविषयीं मुख्य नेमलेला. सभासद, प्राड्विवाक, राजप्रतिनिधि, पूग, श्रेणी, गण, मुनसफ, जडज, मामलतदार वगैरे.
**न्यास.** एकप्रकारची ठेव.
**पंचमहायज्ञ.** ब्रह्मयज्ञ, पितृयज्ञ, ( श्राद्धादिक, ) देवयज्ञ ( होमादिक, ) मनुष्ययज्ञ ( ब्राह्मणभोजन, ) बलिकर्म ( वैश्वदेव ).
**पण-कार्षापण.** सोळा माष भार किंवा वीस माष भार एक तांब्याचें नाणें अथवा चार काकिणी ( दमडया ) म्हणजे एक पण. २ प्रतिज्ञा.
**पणजित.** दासांतील एक भेद.
**पण्य.** विकावयासाठीं बाजारांत मांडलेला माल.
**पतित.** शूद्राद्यन्नभक्षणानें अथवा महापातकाद्याचरणानें, किंवा तत्संसर्गानें जो जातिभ्रष्ट झाला तो.
**पत्नी.** स्वजातिविहित विवाहानें जी ज्याशीं विवाहित ती त्याची.
**परपूर्वस्त्रीः स्वैरिणी.** पुनर्भू.
**परामर्श.** विचार.
**परार्थवादी.** तिन्हाइताचे अर्थाविषयीं वाद सांगणारा.
**परिग्रह.** सत्ता उत्पन्न होण्याचा एक उपाय.
**परीभांड.** घरांतील सूप टोपलें वगैरे उपसाहित्य.
**परोक्ष.** डोळ्याआड, पाठीमागें.
**पलाल.** कडबा वाटूक इत्यादि.
**पक्ष.** फिर्यादीची जबानी किंवा अर्जीही. परंतु प्रायः जबानीच.
**पक्षाभास.** निरुपयोगी फिर्याद.
**पक्षैकदेशव्यापि.** पक्षाच्या एक देशास मात्र व्यापून राहिलेलें.
**पाखंडी.** एक देवतेस पूज्यत्व मानून इतर देवांची निंदा करावी अशीं जीं अनेक मतें आहेत. त्यांतून एखाद्या मतानें चालणारा. नास्तिकासही म्हणतात.
**पातकी.** महापातक, उपपातक, ह्यांजखेरीज सामान्य पातक करणारा.
**पाद.** चरण, अंश.
**पादवंदनिक** तेंच **प्रीतिदत्त.** एक प्रकारचें स्त्रीधन.
**पारिभाषिक.** शब्दाची शक्ति म्हणजे अवयवव्युत्पत्ति ती न धरितां केवळ परिभाषेनें म्हणजे संकेतानें क्लृप्त केलेला शब्द तो, सांकेतिक. जसें, मंडप अश्व इत्यादिक.
**पारुष्य.** दंडपारुष्य. ( मारामारी ) वाक्पारुष्य. ( शिवीगाळ ).
**पाशुपत.** एक तंत्र आहे व त्या मतास अनुसरणारे ते. लिंगाईत, जंगम, इत्यादिक.
**पितृत्व.** पितृनिष्ठगुण किंवा धर्म.
**पितृद्वेषी.** बापाचा द्वेष करणारा.
**पितृबंधु.** पृष्ठ २९० पहा.
**पुत्रिका.** कन्या किंवा पुत्रस्थानीं मानलेली कन्याही.
**पुत्रिकासुत.** बारा पुत्रांतील दुसरा.
**पुनरुक्तदोष.** एकत्र सांगितलेला प्रकार किंवा विधि पुनः सांगणें, हा शास्त्रांत वाक्यदोष सांगितला आहे.
**पुनर्भू.** तीन प्रकारची. पृष्ठ ११० पं. २७ पहा.
**पुरोहित.** उपाध्याय.
**पूग.** हकीमदार, जमेदार. पृष्ठ ८० पं. २७ पहा.

**पूर्त**. वापी, कूप, तळाव इत्यादि बांधणें तें.

**पूर्वपक्ष**. जबानी, पहिल्यानें फिर्याद करणाराचा पक्ष. २ पूर्वी हें मला क्षेत्रादिक मिळालें आहे असें प्रतिपादन करणाराचा पक्ष.

**पूर्वक्रमागत**. पूर्वीपासून म्हणजे तीन पिढ्यांपासून क्रमानें चालत आलेला भोगवटा, क्षेत्र इत्यादिक.

**पूर्ववादी**. पहिल्यानें वाद सांगणारा, पूर्वी हें क्षेत्र मला मिळालें व मीं उपभोगिलें असा वाद सांगणारा.

**पूर्वसंस्कृत**. पूर्वी ज्याचा उपनयनादि संस्कार झाला आहे तो किंवा ते.

**पूर्वापरकाल**. प्रथम काल आणि त्याहून दुसरा काल.

**पैशाच**. कन्या हरण करून नेऊन तिशीं जो विवाह करणें तो.

**पौगंड**. आठा वर्षांपासून सोळा वर्षांचे आंत जें वय तें, व तद्विशिष्ट मनुष्यही.

**पौत्रिकेय**. पुत्रिकासुत.

**पौनर्भव**. बारा पुत्रांतील सहावा.

**प्रकृतार्थोपयोगी**. चालत्या अर्थाला उपयोगी.

**प्रचार**. गृहादिकांत जाण्यायेण्याचा मार्ग.

**प्रतिग्रह**. अदृष्ट संपादक असा सत्ता उत्पन्न होण्याचा असाधारण उपाय आहे.

**प्रतिग्रहलब्ध**. प्रतिग्रहानें जें मिळालें तें.

**प्रतिगृहीत**. प्रतिग्रहानें घेतलेला.

**प्रतिग्राह्य**. ज्याचा प्रतिग्रह करावयाचा तो.

**प्रतिग्रहप्राप्त**. प्रतिग्रहलब्ध.

**प्रतिप्रस्थाता**. यज्ञांतील एक ऋत्विज.

**प्रतिलोम**. उलट क्रम. निकृष्ट वर्णाचे किंवा जातीचे पुरुषापासून उत्कृष्ट वर्णाच्या किंवा जातीच्या स्त्रीचेठायीं संतति होऊन जी मनुष्य जाति होते ती प्रत्येकीं.

**प्रतिश्रुत**. प्रतिज्ञात, देऊं केलेला.

**प्रतिहर्ता**. यज्ञांतील एक ऋत्विज.

**प्रतिज्ञा**. जबानी, किंवा अर्जी. २ पण.

**प्रतिज्ञात**. ज्याविषयीं प्रतिज्ञा केली आहे तें द्रव्यादिक.

**प्रत्यासत्ति**. नातें, संबंध.

**प्रत्यासत्त्यतिशय**. अधिक जवळचें नातें.

**प्रत्यासन्न सामंत**. जवळचे सामंत.

**प्रत्युदाहरण**. एकदां सांगितलेल्या एका उदाहरणाचें जें विपरीत उदाहरण तें.

**प्रथमसाहस**. प्रथमसाहस दंड व्हावयाजोगा जो अपराध तें. २ शंभर पणापासून अडीचशें पणपर्यंत किंवा केवळ दोनशें पण अथवा अडीचशें पण जो दंड तो.

**प्रपौत्र**. पणतू.

**प्रभूतार्थविषय**. ऋणादानादिव्यवहारीं ज्या फिर्यादींत मोठी रकम आहे ती.

**प्रमाद**. भ्रम, विस्मृति, गैर सावधपणा.

**प्रमाण**. पुरावा, वादाचें साधन. (लेख, भोग, अनुमान, अर्थापत्ति, दिव्य, शपथ.)

**प्रमाणोपन्यास**. प्रमाणाचें प्रतिपादन. उपपादन पुरावा देणें.

**प्रमेय**. प्रमाणेंकरून सिद्ध करावयाचा जो विषय तो. साध्य.

**प्रमेयरूप**. प्रमेय.

**प्रलाप**. निरर्थक भाषण.

**प्रवक्ता**. अधिक व चांगलें बोलणारा. २ अर्थ सांगणारा.

**प्रवासकृत**. दाहीचा एक प्रकार. पृष्ठ १२ पहा.

**प्रव्रजित**. संन्यासी, विरक्त स्त्री.

**प्रस्थ**. पायली. कोणी अधोली, शेरही, म्हणतात. पृष्ठ ५ पं. १४ पहा.

**प्राङ्न्यायोत्तर**. उत्तरातील एक प्रकार. पृष्ठ २४ पं. २२ पहा.

**प्राड्विवाक**. व्यवहार पाहण्याविषयीं राजप्रतिनिधि म्हणजे राजाच्या खालचा मुख्य न्यायाधीश. हालीं त्यास जडज, कलेक्टर, म्हणतात. पृष्ठ ५ पं. १४ पहा.

**प्रातिलोम्य**. प्रतिलोमपणा.

**प्राप्तव्यवहार**. सोळा वर्षांपुढें ज्याचें वय तो. व्यवहार जाणणारा.

**प्रायश्चित्त**. पापनिर्मुक्ति व्हावी एतदर्थ अदृष्टसंपादक संस्कारविशेष.

**प्रासाद**. राजमंदिर. देवालय.

**प्रीतिदत्त**. प्रीतीनें दिलेलें.

**प्रीतिदान**. प्रीतीनें केलेलें दान.

**बंदिग्राह**. बंदिवानास धरणारे, पळविणारे.

**बंधु**. भाऊ, बांधव.

**बंधुदत्त**. एक प्रकारचें स्त्रीधन. पृष्ठ २०१ पहा.

**बलाबलविचार**. गौणप्रधानविचार.

**बहुभ्रातृक**. बहुत जिला भाऊ, आहेत ती.

**बहुभगिनीक**. बहुत आहेत भगिनी ज्याला तो.

**बहुश्रुत**. पृष्ठ ९ पहा.

**बांधव**. पृष्ठ २९० पं. ४ पहा.

**बाल**. सोळा वर्षांचे आंत ज्याचें वय तो.

**बालधन**. बालाची जिंदगी.

**बीजी**. ज्याचें बीज तो, जनक. २शेतांत पेरायास ज्याणें जो देतो तो.

**ब्रह्मा**. यज्ञांतील एक ऋत्विज.

**ब्राह्म-ब्राह्मविवाह**. वराला बलावून आणून कन्या यथाशक्ति सालंकार करून देतात तो विवाह.

**भक्तदास**. दासांतील एक प्रकार, जो अन्नार्थ दास्य पतकरून राहिलेला.

**भगाकार**. उपस्थासारिखा आहे आकार ज्याचा असा डाग किंवा चिन्ह.

**भयवर्जिता**. सीमेचा भेद.

**भागिनेय**. बहिणीचा पुत्र.

**भावसिद्धि**. पृष्ठ १५३ पं. १९ पहा.

**भाषा**. जबानी.

**भिन्नमातृक**. ज्याचा जननीभेद आहे ते परस्पर सावत्र, चुलत इत्यादि.

**भिन्नोदर**. भिन्नमातृक. सावत्र, चुलत वगैरे.

**भिक्षु**. संन्यासी.

**भुजिष्या**. जी एका पुरुषानें अंकित करून ठेवलेली स्त्री.

**भूतानुसारी**. पृष्ठ ४६ पं. १७ पहा.

**भृति**. मजूरी, रोज, वेतन, दरमहा.

**भेदनिषिद्ध**. एक प्रकारचा वर्ज्य साक्षी.

**भोग्य**. उपभोग करावयाजोगें गहाण जमीन, घर, बैल, घोडा वगैरे.

**भ्रूणहत्या**. गर्भपात. २ बालहत्याही.

**मज्जा**. हाडांचे आंतला मगज.

**मत्त**. दारू भांग इत्यादि पिऊन बेशुद्ध झालेला.

**मत्स्यिनी**. सीमेचा भेद. पृष्ठ ३११ पं. २० पहा.

**मध्यमसाहस**. मध्यम साहस दंड व्हावयाजोगा अपराध तें.

**मध्यमद्रव्यें**. पृष्ठ ४३० पं. २७ पहा.

**मध्यमसाहस**. पांचशें किंवा ५४० पण दंड.

**महारोगग्रस्त**. ज्वर, क्षय, संनिपात, मूळव्याध, संग्रहणी, इत्यादिक जे आठ महारोग त्यांतून एखाद्या रोगानें व्यापलेला.

**महापातक**. पृष्ठ १४५ पं. १९ पहा.

**महायज्ञ**. पंचमहायज्ञ.

**मांडलिक**. सार्वभौमराजास करभार देणारे जे संस्थानी राजे, सरंजामी, जहागीरदार वगैरे.

**मातृधन**. आईची जिंदगी, स्त्रीधन.

**मातृबंधु**. पृष्ठ २९० पं. ४ पहा.

**मादकद्रव्य**. जेणेंकरून माज, अमल येतो तें द्रव्य अफू भांग वगैरे.

**माधुपर्किक**. मधुपर्कसमयीं जें मिळतें तें.

**मानसिक**. अंतःकरणसंबंधी विकार, संकल्प इत्यादिक.

**मानुष**. लेख, भोग, साक्षी, एतद्रूप प्रमाण.

**माष**. पांच गुंजा.

**माषशत**. शंभर माष.

**मित्रलब्धि**. मित्राचा लाभ.

**मिथ्योत्तर**. उत्तराचा एक भेद.

**मूर्धावसिक्त**. ब्राह्मणापासून विवाहित क्षत्रियेचे ठायीं झालेली संतति.

**मूल**. मुद्दल. २ मुद्दा.

**मृतकल्प**. मेल्यासारखा, मरणांत कांहीं न्यून असा अर्धा मेला.

**मृतांतर**. एक वर्ज्यसाक्षी.

**मैत्र**. मित्रापासून प्राप्त जें द्रव्यादिक तें.

**मैत्रावरुण**. यज्ञांतील एक ऋत्विज.

**मौल**. एकप्रकारचे शिवधडे.

**म्लेंछ.** यवन, विंध्याद्रि व हिमाचल ह्यांच्या बहिर्देशीं राहणारे.

**यदृच्छागत.** साक्षींतला एक भेद.

**यज्ञशाला.** जेथें यज्ञ होतो तें स्थळ.

**यज्ञसभा.** यज्ञशाळा.

**याचित, याचितक.** पृष्ठ १३५ पं. १७ पहा.

**याजन.** याग करविणें.

**यावद्देयोद्यत.** दाम दुप्पट झाली तरी चिंता नाहीं. जेव्हां व्याज मुद्दल देऊं तेव्हां आपलें गहाण परत घेऊं अशा करारानें ठेविलेलें गहाण.

**युद्धप्राप्त.** एक प्रकारचा दास.

**योग.** अवयवार्थबोधक जी शब्दाची शक्ति तो. २ एक प्रकारचें अविभाज्य धन. पृष्ठ २४२पं. १४ पहा.

**योगार्थ.** शब्दाच्या शक्तीपासून निघालेला अर्थ. शक्यार्थ.

**योग्यप्रमिति.** योग्य प्रमाण.

**योषिद्ग्राह.** पृष्ठ १०९ पं. २२ पहा.

**यौगिक.** योगार्थानें म्हणजे शक्यार्थानें सिद्ध करून घेतलेला शब्द.

**यौतक.** एकप्रकारचें स्त्रीधन.

**रस.** तेल, तूप, गुळ, गोरस, लवण, इत्यादिक.

**रक्षक.** रक्षण करणारा.

**राजत.** रुप्याचें नाणें. दहा पलें म्हणजे एक धरण. असे दहा धरण म्हणजे एक पुराण राजत. सोळा धरण म्हणजे एक शतमान राजत परिमाण.

**राजदैविक.** दरवडा, चोरी, जप्ती. युद्धप्रसंग वगैरे जो, व दैविक म्हणजे आग लागणें नदीला पूर येऊन गांव वाहणें वगैरे जो उपद्रव तो.

**राजमुद्रा.** राजचिन्ह, सरकारी गोतंब शिक्का नाण्यावरील शिक्का वगैरे.

**राजयक्ष्मा.** क्षयरोग.

**राजशासन.** राजाचें शासन. ( आज्ञा )

**राजशासननीता.** सीमेचा भेद.

**राजिक.** युद्धप्रसंग, दरवडा जप्ती वगैरे जो राजोपद्रव तो.

**राक्षस.** युद्धांत कन्येचें हरण करून जो विवाह होतो तो.

**रिक्थ, ऋक्थ.** जिंदगी, धन. खुली जिंदगी, अप्रतिबंध दाय.

**रिक्थग्राह.** जिंदगी घेणारा.

**रिक्थी.** मालक, जिंदगी घेण्यास अधिकारी, दायाद, वारस.

**रोगार्त.** रोगानें पीडित.

**रोमबद्ध.** लोकर कापूस मिळून केलेलें. किंवा नुसतें लोकरीचें वस्त्र, धुसा शाल जोडी वगैरे.

**लघुप्रायश्चित्त.** पृष्ठ ५२ पं. २१ पहा.

**लब्ध.** दासांतील एक भेद.

**लव.** पृष्ठ ९५ पं. १९ पहा.

**लिखित.** साक्षींतील एक भेद.

**लोकसिद्ध.** लोकव्यवहारानें सिद्ध जी सत्ता इत्यादिक तो, किंवा लोकांत सिद्ध जो व्यवहार.

**लौकिक.** लोकसिद्ध.

**वचननिषिद्ध.** वर्ज्य साक्षींतील एक प्रकार.

**वडवाहृत.** दासांतील एक भेद.

**वधदंड.** शारीर दंड. अंगछेद, किंवा खून.

**वर्ण.** ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र हे प्रत्येकीं.

**वर्णी.** त्या त्या वर्णाचा जो तो प्रत्येकीं.

**वल्कल.** वृक्षविशेषाच्या त्वचेपासून झालेलें. तसरी, पट इत्यादिक.

**वसा.** मेदोधातुभेद.

**वस्तुहानि.** स्वरूपहानि, विवादविषयीभूत द्रव्याची हानि.

**वाक्पारुष्य.** शिवीगाळ, मर्मोद्घाटन, कठोर भाषण, निंदा.

**वाग्दंड.** शिवीगाळ, निर्भर्त्सना, एतद्रूप जो दंड तो.

**वाग्दत्त.** वाणीनें जी देऊं केलेली ती कन्या इत्यादिक, प्रतिश्रुत.

**वाग्दान.** वाणीनें जें देऊंकरणें तें, वाङ्निश्चय.

**वाचकशब्दघटित.** त्या त्या अर्थाचे वाचक जे शब्द त्यांकडून युक्त.

**वाचनिक.** वचनानें जो सिद्ध. तो प्रकार किंवा ती व्यवस्था, इत्यादिक.

**वाचनिक धर्मकृत्यें.** वचनानें सांगितलेलीं जीं धर्मकृत्ये म्हणजे अवश्य कर्तव्य श्राद्धादिक तीं.

**वाचिक.** वाणीसंबंधी, वाणीनें केलेलें.

**वाणिज्य.** वाण्याचा उदीम, वाणीपणा.
**वानप्रस्थ.** एक आश्रम आहे. २ त्या आश्रमांत राहणारा तोही.
**वापी.** जिला पायऱ्या बांधिल्या आहेत ती विहीर.
**वाह्य.** पाठाळ. पृष्ठ ९५ पं. २० पहा.
**विक्रय.** विकरी.
**विवीत.** राखलेलें रान किंवा कुरण.
**विजयप्राप्त.** विजयानें मिळालेलें.
**विद्याधन.** विद्येपासून मिळालेलें धन.
**विद्यालब्ध.** विद्येनें मिळालेलें.
**विद्यासंपादित.** विद्येपासून संपादित केलेलें.
**विधि.** निषेधविपरीत जी शास्त्राज्ञा तो.
**विधिरूप.** पृष्ठ ११ पं. १५ पहा.
**विभक्तज.** विभक्त झाल्यानंतर आईबापांस झालेला पुत्रादिक.
**विभाज्य.** विभाग करावयाजोगा स्थावर जंगम माल.
**विरुद्ध.** एक प्रकारचा पक्षाभास, उत्तराभासही.
**विवादास्पदीभूत.** ज्याविषयीं वाद चालला असतो तें द्रव्यादिक.
**विवास.** नागवा, गृहहीन, देशनिष्कासित.
**विवाहलब्ध.** विवाहांत किंवा विवाहानें मिळालेलें द्रव्यादिक.
**विशेषशास्त्र.** अपवाद, बाधक शास्त्र, बाधक वचन.
**विषम.** समाच्या उलटा.
**विषमविभाग.** २३० व्या पृष्ठांत सांगितलेला.
**विषयव्यवस्था.** जे विरुद्ध विषय प्राप्त झाले त्यांची व्यवस्था.
**विहितप्रतिषिद्ध.** वचनानें विधान करून अन्यवचनानें निषिद्ध केलेला असा जो विषय तो.
**वृथादान.** ज्यापासून दृष्टादृष्ट पुरुषार्थाचें साधन नाहीं असें जें दान, म्हणजे गारोडी, भाट, तालिमबाज, तमासगिर, इत्यादिकांस दिलेलें.
**वृद्ध.** ऐशीं वर्षांपुढें ज्याचें वय तो ( परंतु हाल्लींचे मानानें सत्तर वर्षांपुढें ज्याचें वय तो)२ शिवेच्या निर्णयाविषयीं उपयोगी जे सामंतादिक त्यांतील एक प्रकार.
**वृद्धव्यवहार.** प्राचीन शिष्टांचा व्यवहार म्हणजे संप्रदाय.
**वेतनादान.** वेतन देणें.
**वेदपारग.** सायंत वेद पढलेला.
**वेदशास्त्रसंपन्न.** वेद शास्त्र हीं दोन्हीं पढलेला.
**वैदिक.** केवळ वेदच ज्यास येतो तो.
**वैवर्ण्य.** विवर्णता, निस्तेजपणा.
**वैवाहिक.** विवाहसंबंधी जें कांहीं तें, विवाहांत मिळालेलें.
**व्यभिचारारोप.** व्यभिचाराचा आरोप म्हणजे तुफान.
**व्यवहार.** वाद.
**व्यवहारज्ञ.** प्राप्तव्यवहार.
**व्यवहारहानि.** वादाची हानि, म्हणजे वाद सांगण्यास रस्ता नाहींसा होणें.
**व्यवहारविषय.** पृष्ठ १० पं. ३२ पहा.
**व्याकरण.** शब्दशास्त्र.
**व्याख्यागम्य.** पृष्ठ २५ पं. २७ पहा.
**व्याजस्तुति.** वर स्तुति आणि पोटीं निंदा, निंदात्मक स्तुति.
**व्याधित.** ज्याला व्याधि झाला आहे तो.
**व्याधिग्रस्त.** रोगादिव्याधीनें व्यापलेला.
**व्युत्क्रम.** प्रतिलोम क्रम, उलटा क्रम.
**व्रात्य.** गौणकालही अतिक्रांत झाला असतां, मुंजीवांचून राहिलेला ब्राह्मणादि पुत्र.
**शंकितापराध.** अपराधाची शंका म्हणजे वहमा.
**शंकितापराधी.** वहम्यानें धरलेला.
**शद.** किराणा. पृष्ठ ९५ पं. १८ पहा.
**शासन.** सनद, सरकारी पत्र, राजपत्र.
**शारीर.** अंगछेदरूप जो दंड तो.
**शास्त्रसिद्ध.** शास्त्रप्रमाणानें सिद्ध जी सत्ता, स्वत्व, व्यवहार, इत्यादिक.
**शास्त्रविरुद्ध.** शास्त्रास विरुद्ध.
**शास्त्रगम्य.** शास्त्रेंकरून समजावयाजोगें स्वत्व इत्यादि.
**शास्त्रप्रतिपादित.** शास्त्रानें ज्याचें प्रतिपादन केलें आहे तें स्वत्व, धर्म, इत्यादिक.
**शास्त्रविहित.** हें अमुक करावें, असें शास्त्रानें

ज्याचें विधान सांगितलें आहे तो.

**शास्त्रीयव्यवहार.** शास्त्रांतले जे व्यवहार ते.

**शिरोमुंडन.** डोकें भादरणें, पांचपाट काढणें.

**शिल्प.** कला, कौशल, शिल्पशास्त्र.

**शिल्पी.** शिल्पशास्त्र जाणणारा कुशल. सुनार, गौंडी, लोहार, कासार, चिनारी, वगैरे कारागीर.

**शिक्षक.** शिक्षा करणारा गुरु.

**शुक्र.** रेत, धातु.

**शुद्धमिथ्योत्तर.** दुसऱ्या उत्तराचा प्रकार नसता नुसतें मिथ्योत्तर.

**शुभचिंतक.** स्वधर्मसंरक्षण करून सरकारचें कल्याणचिंतन करावें एतदर्थ नियुक्त केलेले महाजन.

**शुल्क.** जकात, कर, धारा, एक प्रकारचें स्त्रीधन.

**शूद्रापुत्र.** ब्राह्मणापासून शूद्रेला झालेला पुत्र पृष्ठ २६८ पं. १ पहा.

**शौर्यधन.** युद्धादिप्रसंगीं शौर्य करून मिळविलेलें धन.

**शौर्यसंपादित.** शौर्यानें संपादिलेलें.

**श्रेणि.** पृष्ठ ८० पं. १९ पहा.

**श्रेष्ठविभाग.** उद्धारविभाग.

**श्रोत्रिय.** वेद पढणारा, अग्निहोत्री.

**श्रौत.** अग्निहोत्र व तत्संबंधी कर्म.

**श्वपद.** कुत्र्याचें पाऊल.

**श्वपदाकार** कुत्र्याचें पाउलासारिखा आकार म्हणजे धातचें कुत्र्याचें पाऊल करून ते तप्त करून त्याचा कपाळावर डाग किंवा नुसतें तदाकृति चिन्ह.

**श्वपाक** मुर्दफरास. डोंब, कुत्र्यांचें मांस खाणारे.

**षट्कर्म.** यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान, प्रतिग्रह.

**षंढ.** नपुंसक.

**संकर.** मिसळ.

**सकारणमिथ्योत्तर.** कारणासहित जे मिथ्योत्तर ते. पृष्ठ २८ पहा.

**संकीर्ण.** मिश्रित. ज्याचा संकर झाला आहे तो.

**सगोत्र.** एका गोत्राचे.

**सत्योत्तर.** प्रश्नाचें स्वीकाररूप उत्तर.

**सन्निपात.** एक प्रकारचा रोग, वायु जो मस्तकांत शिरतो तो.

**सन्निवेश.** पृष्ठ १८ पं. ११ पहा.

**संन्यासभ्रष्ट.** दासांतील एक भेद आहे. पृष्ठ ३५२ पं. २१ पहा.

**सपिंड.** आपल्यापासून वरच्या सात पुरुषपर्यंत जो विस्तार ते प्रत्येकीं परस्पराचे.

**सब्रह्मचारी.** पृष्ठ २९० पं. १५ पहा.

**सभा.** न्यायसभा, न्यायाधिकरण, दरबार, कचेरी, अदालत, हल्लीं ज्यास कोर्ट म्हणतात.

**सभासद.** नियुक्त, व्यवहार पाहणारे, आज्ञप्त, न्यायाधीश, अमीन, मुनसफ, सदरअमीन वगैरे; व जडज, कलेक्टर, ही सभवतात.

**संभावितस्वातंत्र्य.** ज्याचें स्वातंत्र्य संभावना करावयाजोग तो.

**समदर्शी.** समान दृष्टीने पाहणारे, निष्पक्षपाती.

**समानोदक.** सातां पिढ्यांपुढें चौदा पिढ्यांपर्यंत ते प्रत्येकीं परस्पराचे.

**सम्यक्शुभचिंतक.** आपलें इष्टचिंतन करण्याविषयीं राजानें नेमलेले.

**सरजस्क.** जिचा विटाळ गेला नाहीं अशी.

**सवर्ण.** समान वर्णाचा, म्हणजे ब्राह्मणास ब्राह्मण, क्षत्रियास क्षत्रिय ह्या रीतीनें.

**सवर्णापुत्र.** ज्या वर्णाचा नवरा त्याच वर्णाच्या विवाहित स्त्रीचे ठायीं नवऱ्यापासून झालेला.

**संविभाग.** सम्मतिबधदाय, अटकावलेली जिंदगी.

**संसर्ग.** संबंध.

**संस्कृत.** चडोपनयनादि संस्कार ज्याचे झाले आहेत ना, किंवा ती.

**संसृष्ट.** विभागिलेले धन जे पुनः एकत्र मिळविलें तें किंवा विभक्त होऊन पुन. एकत्र झाले ते.

**संसृष्टी.** संसृष्टधनविशिष्ट जे विभक्त होऊन पुनः एकत्र झाले ते.

**सहोढज.** बारा पुत्रांतील अकरावा.

**सहोदर.** एका जननीच्या पोटचे परस्पर, सखे भाऊ वगैरे.

**संज्ञी.** ज्याला संज्ञा म्हणजे विशेष नाम ठेविलें आहे तो.

**साध्यांश.** जें आपणास साध्य करावयाचें त्याचा अंश म्हणजे रकम, हिसा.
**साध्यार्थ.** ज्याचें प्रतिपादन करावयाचें तो अर्थ, विषय.
**सापत्य.** अपत्ययुक्त.
**सापिंड्य.** सपिंडता, सपिंडाचें नातें.
**सामंत.** शिवशेजारी.
**सामयिक.** संकेतानें केलेला धर्म, कायदा वगैरे.
**सामानाधिकरण्य.** नियमें करून एका अधिकरणीं राहणारीं जीं कार्यकारणें त्यांचा तो साहचर्यनियम. जसा वन्हिधूमांचा साहचर्यनियम म्हणजे जेथें जेथें धूम आहे तेथें तेथें नियमें करून वन्हि आहेच.
**सार्वभौम.** संपूर्ण भूमीचें राज्य करणारा, सर्वांवर ज्याची अप्रतिहत आज्ञा तो.
**साहस.** सरकारचें व इतर जनांचें भय न धरितां त्यांच्या समक्ष जें वध जुलूम करणें, दरोडा घालणें वगैरे तें.
**सीमापत्र.** सिवेचा निर्णय झाला असतां जें पत्र करून देतात तें.
**सीमाविवाद.** शिवेचा तंटा.
**सुब्रह्मण्य.** यज्ञांतील एक ऋत्विज.
**सुराध्वजाकार.** कपाळीं डाग देण्यासाठीं किंवा चिन्ह करण्यासाठीं सुराध्वज म्हणजे दारूचें चिन्ह सिसा, बाटली, दारू काढण्याचें यंत्र इत्यादिकासारखा लोखंडाचा आकार करितात तो.
**सुवर्ण.** सोनें. २ वजनाचें परिमाण, पृष्ठ २५ पं. ९ पहा.
**सूत.** एक प्रतिलोमजातीचा.
**सेतु.** पूल, धरण.
**सोपाधिक.** सनिमित्तक, सप्रतिबंधक, सोपाधिक गहाण, स्वत्व, इत्यादिक.
**सौगत.** पृष्ठ ३६२ पं. २ पहा.
**सौदायिक.** एक प्रकारचें स्त्रीधन.
**स्थान.** स्थळ.
**स्थानग्राही.** ग्राहीचा एक प्रकार.
**स्थिरप्राय.** स्थिर राहणारे व्यवहार म्हणजे ऋणादानादिक.
**स्मार्त.** विवाहाग्नि.
**स्मार्तकाल.** पृष्ठ ७१ पं. ११ पहा.
**स्मार्तकालिक.** भोगवटा वगैरे.
**स्मारित.** एक प्रकारचा साक्षी.
**स्त्रीधन.** स्त्रीचें सत्ताविशिष्ट धन.
**स्त्रीशुल्क.** वरापासून कन्येबद्दल द्रव्य घेतात तें एक प्रकारचें स्त्रीधन.
**स्वत्व.** सत्ता.
**स्वत्वसाधनता.** सत्तेचें साधन जें प्रतिग्रह खरेदी वगैरे तन्निष्ठ धर्म.
**स्वत्वव्यवहार.** सत्तेचा व्यापार, सत्ता दाखविणारा व्यापार.
**स्वत्वहानि.** सत्तेची हानि, सत्ता नाहींशी होणें.
**स्वत्वविवाद.** सत्तेविषयीं वाद.
**स्वदेशीय.** आपले मुलखांत राहणारा.
**स्वयमुक्ति.** निषिद्ध साक्षींतील एक प्रकार.
**स्वयंदत्त.** बारा पुत्रांतील दहावा.
**स्वयंदास.** दासांतील एक प्रकार.
**स्वार्थसाधक.** आपल्या अर्थाचें साधन करणारें प्रमाण इत्यादिक.
**स्वैरिणी.** जारिणी स्त्री.
**हस्तिप.** महात.
**हीनवादी.** खोटा वाद सांगणारा, खोटा फिर्यादी.
**हेडाबुक.** पृष्ठ ८० पं. २० पहा.
**होता.** यज्ञांतील एक ऋत्विज.
**क्षत.** पुरुषसंयोगानें दूषित अशी पुनर्भू.
**क्षुद्रद्रव्यें.** पृष्ठ ४१० पं. २४ पहा.
**क्षुप.** शेतवडा कुंभा.
**क्षेम.** पृष्ठ २४२ पं. १६ पहा.
**क्षेत्र.** जमीन बागाईत, जिराईत. स्त्री.
**क्षेत्रज.** बारा पुत्रांतील तिसरा.
**क्षेत्रदान.** भूमीचें दान.
**क्षेत्रस्वामी.** क्षेत्राचा मालक, नवरा.
**क्षेत्री.** क्षेत्रस्वामी.
**क्षौम.** क्षुमा म्हणजे अतसी तिजपासून झालेलें वस्त्र.
**ज्ञापक.** जाणविणारें प्रमाण. प्रतिग्रहादिक उपाय वगैरे.